संक्षिप्त भाष्य

# अहसनुल बयान


मूळ उर्दू अनुवाद

**मौलाना मुहम्मद जुनागढी**

भाष्य

**हाफिज सलाहुद्दीन यूसुफ**

मराठी अनुवाद

**मुहम्मद शफी अन्सारी**



प्रकाशक

**अल-बिर फाउन्डेशन**

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा

मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

# प्रकाशकाचे निवेदन

समस्त मानवजातीवर सर्वश्रेष्ठ अल्लाहचा हा सर्वांत महान उपकार आहे की त्याने मानवांना आपली पवित्र वाणी असलेल्या अति आदरणीय कुरआनाद्वारे संबोधित केले आणि त्यांना या भव्य दिव्य देणगीने उपकृत केले, ज्याबद्दल त्यांनी कितीही अभिमान बाळगला तरी कमीच आहे. तथापि सर्वश्रेष्ठ अल्लाहच्या या वाणीला आणि संबोधनाला केवळ तोच समजू शकतो, जो आपल्या पालनकर्त्याच्या या महान संदेशाचा मूळ आत्मा आणि उद्दिष्ट जाणत असावा, समजत असावा, त्यातले माधुर्य त्याला जाणवत असावे आणि या दिव्य वाणीचा अर्थ व आशय ध्यानी घेऊन तो आपले चारित्र्य व नैतिकता, कर्म व कथन आणि काही दिवसांच्या जीवनाच्या सर्व क्षणांना सुशोभित करू शकेल, दोष अवगुण दूर करून जीवनात सुधार आणू शकेल.

सृष्टी रचियत्याच्या पवित्र वाणीला समजून व जाणून घेण्याकरिता कुरआनाच्या अर्थ आशयाशी परिचिततेचे ज्ञान असणे अत्यावश्यक आहे आणि इस्लामला धर्म व जीवनप्रणाली या नात्याने त्याच वेळी समजून घेतले जाऊ शकते जेव्हा कुरआनाचा अर्थ व आशय नीट ध्यानी घेतला जाईल. याच प्रकारे इस्लामी आवाहनाचा प्रचार प्रसारदेखील कुरआनाच्या अर्थाशी परिचिततेवर अवलंबून आहे.

दारुस्सलाम, जी एक आंतरराष्ट्रीय धार्मिक प्रकाशन संस्था आहे, तिच्या ध्येय व उद्दिष्टांमध्ये सर्वांत मोठे ध्येय उद्दिष्ट, पवित्र कुरआनाचा संदेश समस्त मानवजातीप्रत पोहचविणे आहे आणि या महान उद्दिष्टाकरिता संस्थेने आजपावेतो जगातील १८ जिवंत (प्रचलित) भाषांमध्ये कुरआनाचे अनुवाद सस्पष्टीकरण प्रकाशित केले आहेत आणि काही वर्षांच्या कालावधित जगातील पन्नास भाषांमध्ये कुरआनाचा अनुवाद प्रकाशित करण्याचा दृढ-संकल्प केला आहे.

मराठी भाषा भारताची एक जिवंत भाषा आहे. मराठी बोलणाऱ्यांची संख्या कोट्यवधींच्या घरात आहे आणि महाराष्ट्र राज्याची ती शासकीय भाषा आहे. आतापावेतो या भाषेत इस्लामी लिटरेचर नगण्य आहे. यास्तव या भाषेत पिवत्र कुरआनाचा अनुवाद प्रकाशित करताना आम्हाला अतिशय आनंद वाटत आहे.

या महान कार्याच्या पूर्ततेकरिता आमच्या ज्या बांधवांनी आणि मित्रांनी आम्हाला मोलाचे सहकार्य केले त्याबद्दल आम्ही त्यांचे खूप आभारी आहोत. विशेषतः आमचे बंधु

हाफीज मुहम्मद ताहिर साहेब यांची भूमिका मोलाची ठरते. त्यांनी अनुवादक, रुजू करणारे, व्यवस्था राखणारे यांच्याशी संपर्क करून या महान कार्यास तडीस नेले. त्याचप्रमाणे मराठीचे विख्यात अनुवादक जनाब मुहम्मद शफी अन्सारी यांनी मोठ्या परिश्रमाने अनुवादकार्य पार पाडले. तद्‌वतच खालिद अन्सारी, तारिक अन्सारी या बंधुद्वयांनी पूर्ण जबाबदारीसह कंपोजिंगचे कार्य पार पाडले.

सर्वश्रेष्ठ अल्लाह, आम्हा सर्वांना आपल्या या सत्य धर्माची सेवा करण्याची सुबुद्धी प्रदान करो.

व्यवस्थापक

**अब्दुल मालिक मुजाहिद**

# अनुवादकाचे मनोगत

नि:संशय पवित्र कुरआन, सर्वश्रेष्ठ अल्लाहतर्फे संपूर्ण मानवजातीच्या हित-कल्याणासाठी, जीवनयापनात मानवाचे यथायोग्य आणि सर्वंकष मार्गदर्शन करण्यासाठी अवतिरत केला गेलेला अंतिम ग्रंथ आहे. अर्थात त्याला स्थळ-काळाची मर्यादा नाही आणि तो एका विशिष्ट जाती-धर्माच्या लोकांपुरता मर्यादित नाही. समस्त मानवांना अल्लाहनेच निर्माण केले आहे तद्नुषंगे प्रत्येक मानवाला कुरआनाच्या माध्यमाने आपल्या रचयित्या स्वामी व पालनकर्त्या अल्लाहशी नाते जोडणे आवश्यक आहे, किंबहुना हे त्याच्या हिताचेच आहे. पवित्र कुरआनासंदर्भात ज्या लोकांच्या मनात शंका-कुशंका आहेत, अनेक गैरसमज आहेत ते केवळ अज्ञानापायी आणि परंपरागत द्वेषबुद्धीमुळे. त्यांनी जर विशुद्ध मनाने आणि पूर्वग्रहविरहित बुद्धीने कुरआनाचा अभ्यास केला तर निश्चितच त्यांच्या शंका-कुशंका व गैरसमज दूर होतील. मग सत्याच्या प्रखर प्रकाशाने त्यांचे मन-मस्तिष्क तेजोमय होईल, परिणामी असत्यरूपी अज्ञानाचा अंधकार क्षणार्धात नाहीसा होईल, आणि उत्स्फूर्तपणे ते अल्लाहकडे धाव घेतील.

इस्लाम स्वीकृतीपूर्वी मी अनेक इस्लामी ग्रंथांचा अभ्यास केला, त्यात कुरआनाचे अनेकविध भाष्य आणि अनुवाद यांचा समावेश अधिक होता. मौलाना मुहम्मद जुननागढी यांचा अनुवाद 'अहसनुल बयान' आजपावेतोच्या अध्ययनात विशेष जाणवला. कारण तौहिद (एकेश्वरवादा) संदर्भात 'अहसनुल बयान'ने अनेक विवरणात्मक टीपा दिलेल्या आहेत. अर्थात तौहिद हा कुरआनाचा, पर्यायाने इस्लामचा केंद्रबिंदू आहे. आणि म्हणूनच मी दारुस्सलामच्या वरिष्ठांना सातत्याने ही विनंती करीत राहिलो की या ग्रंथाचा मराठी अनुवाद व्हायला हवा. तशी ती काळाची गरजही आहे, परंतु आपण मराठीशी अनभिज्ञ असल्याचे सांगून वरिष्ठांनी सुरुवातीला मनावर घेतले नाही. तथापि मी ध्येयाचा पाठपुरावा करीत राहिलो, शेवटी अल्लाहच्या असीम कृपेने दारुस्सलामच्या वरिष्ठांनी माझी विनंती मान्य करून या महान कार्याची जबाबदारी माझ्यावर सोपविली.

मराठी भाषा एक समृद्ध भाषा आहे. मराठी साहित्याचा दर्जा उच्च प्रतीचा आहे. आणि मराठी भाषिकांची संख्या अनेक कोटींनी आहे. तेव्हा एवढ्या प्रचंड समुदायाला कुरआनाच्या अर्थ व आशयापासून वंचित ठेवणे योग्य ठरले नसते. मराठी भाषिक अन्य धर्मीय बांधवांनी या अनुवादाचा अभ्यास करून तौहिद, ईमान, अल्लाहचे आणि त्याच्या

पैगंबरांचे आदेश, अल्लाहला अपेक्षित असलेले आचरण, शिक्षा आणि मोबदला या मूलभूत गोष्टी नीट जाणून व समजून घ्याव्यात तसेच मराठी जाणणाऱ्या मुस्लिम बांधवांनीही उपरोक्त गोष्टी ध्यानी मनी घेऊन निखालस तौहिदचा अंगिकार करावा. आणि एकाग्रतापूर्वक अल्लाहची उपासना करून अल्लाह व त्याच्या पैगंबराचे आज्ञाधारक व्हावे याच ध्येयाने प्रेरित होऊन मी या ग्रंथाच्या अनुवादाचे कार्य पार पाडले.

अनुवादासोबत मूळ ग्रंथात अनेक स्पष्टीकरणात्मक टीपा होत्या, परंतु मी केवळ अशाच टीपांची निवड केली ज्यात श्रद्धा (अकीदा) आणि कर्म (अमल) संबंधी खुलासा होता, निःसंशय श्रद्धा खरी आणि विशुद्ध असेल तर कर्मदेखील अल्लाहच्या दरबारी स्वीकृत ठरेल.

हा ग्रंथ प्रकाशित होत असलेला पाहून मला अतिशय आनंद होत आहे. अर्थात याचे खरे श्रेय दारुस्सलामचे वरिष्ठ व्यवस्थापक जनाब अब्दुल मालिक मुजाहिद यांना पोहोचते. त्यांनी हा कार्यभार माझ्यावर सोपविला नसता तर हे मराठी रूपांतर प्रकाशित झाले नसते, मी याबद्दल मालिक मुजाहिद साहेबांचा मनस्वी आभारी आहे. त्याचप्रमाणे मी हाफीज मुहम्मद ताहिर हनीफ यांचाही आभारी आहे ज्यांनी या कार्यात मला मोलाचे सहकार्य केले. सुरुवातीपासून शेवटपर्यंत त्यांनी या कामाची काळजीपूर्वक देखरेख केली.

शेवटी सर्वांत महान, सकल सृष्टीच्या निर्मात्या व पालनकर्त्या अल्लाहजवळ दुआ मागतो की आम्हा सर्वांच्या या सेवेचा त्याने स्वीकार करावा आणि ज्या ध्येय-उद्दिष्टांसह हे कार्य पार पाडले गेले ती ध्येय-उद्दिष्टे पूर्णपणे साकार होवोत.

**मुहम्मद शफी अन्सारी**

धुळे (महाराष्ट्र)

भारत

# पवित्र कुरआनातील अध्यायांची अनुक्रमणिका

# सूरह फातिहा - १

सूरह फातिहा मक्का येथे अवतरीत झाली. यात सात आयती आहेत.

**१.** अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा कृपावान आणि अतिशय दया करणारा आहे.

**२.** सर्व स्तुति - प्रशंसा अल्लाहकरिता आहे, जो समस्त विश्वाचा पालनहार[१] आहे.

**३.** मोठा कृपावान, अतिशय दया करणारा आहे.

**४.** मोबदल्याच्या दिवसा (कयामत) चा स्वामी आहे.

**५.** आम्ही तुझीच उपासना करतो आणि तुझ्याकडेच मदतीची याचना करतो.

**६.** आम्हाला सरळ (सत्य) मार्ग दाखव.[२]

**७.** अशा लोकांचा मार्ग, ज्यांच्यावर तू कृपा केली, त्या लोकांचा नव्हे, ज्यांच्यावर तुझा प्रकोप झाला आणि ना मार्गभ्रष्ट झालेल्यांचा.

---

(१) मूळ शब्द 'रब्ब' अल्लाहच्या शुभ नामांपैकी एक नाम आहे. ज्याचा अर्थ प्रत्येक चीज वस्तूला निर्माण करून तिच्या गरजा पूर्ण करणारा आणि तिला परिपूर्ण दर्जापर्यंत पोहचविणारा.

(२) ही सरळ मार्गाची व्याख्या आहे की असा सरळ मार्ग, ज्यावर ते लोक चालले, ज्यांच्यावर तुझ्या कृपा - देणग्यांचा वर्षाव झाला. अर्थात हा समूह पैगंबर, शहीद, सिद्दीक आणि नेक (सत्कर्मी, सदाचारी) लोकांचा आहे.

# सूरह बकरः - २

सूरह बकरः मदीना येथे अवतरीत झाली. यात दोनशे श्याऐंशी आयती आणि चाळीस रुकुउ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा कृपावान आणि अतिशय दया करणारा आहे.

**१.** आलिफ, लाम, मीम.[१]

**२.** या ग्रंथा (चे अल्लाहचा ग्रंथ असण्या) बाबत कसलीही शंका नाही, अल्लाहच्या आज्ञाभंगाचे भय राखणाऱ्यांना मार्गदर्शन करणारा आहे.

**३.** जे लोक न पाहिलेल्या (परलोका) वर ईमान राखतात[२] आणि नमाजला कायम करतात आमि आम्ही प्रदान केलेल्या (धन संपत्ती) मधून खर्च करतात.

**४.** आणि जे लोक ईमान राखतात त्यावर, जे तुमच्याकडे उतरविले गेले आणि जे तुमच्यापूर्वी उतरविले गेले. आणि ते आखिरतवरही अटळ विश्वास राखतात.

**५.** हेच लोक आपल्या पालनकर्त्याच्या तर्फे खऱ्या मार्गावर आहेत, आणि हेच लोक सफलता (आणि मुक्ती) प्राप्त करणारे आहेत.

**६.** निःसंशय, इन्कार करणाऱ्यांना तुम्ही भय दाखवा किंवा दाखवू नका सारखे आहे, हे लोक ईमान राखणार नाहीत.

**७.** सर्वश्रेष्ठ अल्लाहने त्यांच्या हृदयांवर आणि कानांवर मोहर लावली आहे. आणि त्यांच्या डोळ्यांवर पडदा पडला आहे. आणि त्यांच्याकरिता मोठा भयंकर अज़ाब (शिक्षा-यातना) आहे.

---

(१) या अक्षरांना अरबी भाषेत 'हरफे मुकत्तआत' (अलग अलग अक्षरे) म्हंटले जाते, अर्थात पृथकरित्या वाचली जाणारी अक्षरे. यांच्या अर्थाविषयी कोणतीही सनद किंवा पुरावा असलेले कथन नाही.

(२) मूळ शब्द 'ग़ैब' याचा अर्थ अशा गोष्टी ज्यांचे समाधान बुद्धी आणि अकलेद्वारे नाही. उदा. अल्लाहचे अस्तित्व, वहीये इलाही (अवतरीत संदेश), जन्नत, जहन्नम, फरिश्ते, कबरीचा अज़ाब, हश्र (कर्मांचा हिशोब) होणे इत्यादी. तात्पर्य अल्लाह आणि पैगंबरानी सांगितलेल्या खबरींवर बुद्धी, कयास, आभासाविना अटळ विश्वास राखणे ईमानचा भाग आहे आणि यांचा इन्कार करणे कुफ्र आणि गुमराही (नकार व मार्गभ्रष्टता) आहे.

**८.** आणि लोकांपैकी काही म्हणतात, आम्ही अल्लाहवर आणि अंतिम दिवसावर ईमान राखले आहे, परंतु खरे पाहता ते ईमानधारक नाहीत.

**९.** ते अल्लाहला आणि ईमान राखणाऱ्यांना धोका देत आहेत, परंतु खरे पाहता ते स्वतःलाच धोका देत आहेत आणि त्यांना समज नाही.

**१०.** त्यांच्या मनात रोग आहे. अल्लाहने त्यांचा रोग आणखी वाढविला, आणि त्यांच्या खोट्या बोलण्यापायी त्यांच्यासाठी दुःखदायक अज़ाब (शिक्षा-यातना) आहे.

**११.** आणि जेव्हा त्यांना सांगितले जाते की धरतीवर बिघाड निर्माण करू नका, तेव्हा ते उत्तर देतात की आम्ही तर केवळ सुधारक आहोत.

**१२.** खबरदार! वास्तविक हेच लोक बिघाड निर्माण करणार[१] आहेत, परंतु समज (ज्ञान) बाळगत नाही.

**१३.** आणि जेव्हा त्यांना सांगितले जाते की इतर लोकां (अर्थात सहाबा) प्रमाणे तुम्हीही ईमान राखा, तेव्हा ते उत्तर देतात, काय आम्ही अशा प्रकारे ईमान राखावे, जसे मूर्ख लोकांनी राखले आहे? खबरदार! वास्तविक हेच लोक मूर्ख आहे, परंतु जाणत नाहीत.

**१४.** आणि जेव्हा ईमान राखणाऱ्यांशी भेटतात, तेव्हा म्हणतात की आम्हीदेखील ईमानधारक आहोत. आणि जेव्हा एकांतात आपल्या थोरा-मोठ्यां (सैतानी प्रवृत्तीच्या लोकां) जवळ जातात, तेव्हा म्हणतात, आम्ही तर तुमच्यासोबत आहोत. त्यांच्याशी तर आम्ही केवळ थट्टा-मस्करी करतो.

**१५.** सर्वश्रेष्ठ अल्लाहदेखील त्यांच्याशी थट्टा-मस्करी करतो आणि त्यांच्या विद्रोह आणि बहकण्यात आणखी जास्त वाढ करतो.

**१६.** हे असे लोक आहेत, ज्यांनी मार्गभ्रष्टतेला, मार्गदर्शनाच्या मोबदल्यात खरेदी केले आहे. परंतु ना त्यांचा व्यापार[२] फायदेशीर ठरला, ना ते मार्गदर्शन प्राप्त करू शकले.

---

(१) बिघाड सुधारणेच्या विरूद्ध आहे. कुफ्र (सत्य धर्माचा इन्कार) आणि अपराध, दुराचारामुळे धरतीवर उत्पात व उपद्रव माजतो अर्थात बिघाड पसरतो आणि अल्लाहच्या आदेशाचे पालन केल्याने शांती सुबत्ता लाभते.

(२) या आयतीत 'व्यापार'शी अभिप्रेत सरळ आणि सत्य मार्गाला सोडून मार्गभ्रष्टतेत पडणे अर्थात हा उघड असा हानिकारक सौदा आहे.

**१७.** या लोकांचे उदाहरण त्या माणसा सारखे आहे, ज्याने आग पेटवली, परंतु जेव्हा आगीने त्याच्या आस-पास खूप प्रकाश पसरविला, तेव्हा अल्लाहने त्यांचा प्रकाश हिरावून घेतला आणि त्यांना अंधारात सोडून दिले, ज्यामुळे त्यांना काहीच दिसत नाही.

**१८.** (हे लोक) मुके, बहिरे आणि आंधळे आहेत. आता ते परतून येणार नाहीत.

**१९.** किंवा आकाशातून पडणाऱ्या पावसाप्रमाणे, ज्यात अंधार, मेघगर्जना आणि वीज असावी. विजेच्या कडाडण्यामुळे ते आपल्या कानात बोटे खुपसून घेतात आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह काफिरांना (इन्कार करणाऱ्यांना) घेरणारा आहे.

**२०.** वाटते की वीज त्यांचे डोळे हिसकून घेईल, जेव्हा ती त्यांच्याकरिता उजेड करते तेव्हा ते चालतात आणि जेव्हा अंधार करते, तेव्हा (जागच्या जागी) उभे राहतात आणि अल्लाहने इच्छिले तर त्यांचे कान आणि डोळे हिरावून घेईल. निःसंशय अल्लाह प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्य राखणारा आहे.

**२१.** हे लोकांनो! आपल्या त्या पालनकर्त्याची उपासना करा, ज्याने तुम्हाला आणि तुमच्या पूर्वीच्या लोकांना निर्माण केले, यासाठी की तुम्ही परहेजगार (दुराचारापासून दूर राहणारे) बनावे.

**२२.** ज्याने तुमच्यासाठी धरतीला बिछायत आणि आकाशाला छत बनविले आणि आकाशातून पाऊस पाडला. मग त्याच्याद्वारे फळे निर्माण करून तुम्हाला रोजी (अन्न-सामग्री) प्रदान केली. तेव्हा हे ध्यानी घेता, तुम्ही कोणालाही अल्लाहचा सहभागी बनवू नका.

**२३.** आणि जर तुम्हाला त्याबाबत शंका असेल, जे आम्ही आपल्या दासावर अवतरीत केले आहे. तेव्हा तुम्ही सच्चे असाल तर यासारखी एखादी सूरह (अध्याय) बनवून आणा तुम्हाला सूट दिली जाते की अल्लाहच्या शिवाय आपल्या सहभागींनाही (उपास्यांनाही) बोलावून घ्या.[१]

---

(१) तौहीद (अल्लाहला एक मानणे आणि फक्त त्याचीच उपासना करणे) नंतर आता रिसालत (प्रेषितत्वा) विषयी सांगितले जात आहे. आम्ही आपल्या दासावर जो ग्रंथ अवतरीत केला तो अल्लाहतर्फे उतरविल्या जाण्याबाबत जर तुम्हाला शंका-सवंशय आहे. तेव्हा तुम्ही आपल्या सर्व मदत करणाऱ्यांसह मिळून यासारखी एक तरी सूरह (अध्याय) बनवून दाखवा आणि जर तुम्ही असे करू शकत नसाल तर तुम्ही हे समजून घेतले पाहिजे की वास्तविक हा ग्रंथ एखाद्या मानवाने रचलेला ग्रंथ

**२४.** मग जर तुम्ही असे केले नाही आणि तुम्ही करूही शकत नाही.[१] तेव्हा (त्याला सत्य जाणून) त्या आगीचे भय राखा, जिचे इंधन मानव आणि दगड आहे. जी काफिरां (इन्कार करणाऱ्यां) साठी तयार केली गेली आहे.

**२५.** आणि ईमान राखणाऱ्या आणि नेक काम करणाऱ्यांना त्या स्वर्गाचा शुभ समाचार द्या, ज्यांच्या खाली प्रवाह वाहत आहेत. जेव्हा त्यांना त्यांच्यातून फळे खाण्यास दिले जातील, तेव्हा म्हणतील की याच्यापूर्वी आम्हाला खाण्यासाठी हेच दिले गेले. ती मिळतीजुळती फळे असतील आणि त्यांच्यासाठी त्यात पवित्र शुद्ध (शीलवान) पत्न्या असतील आणि ते त्यात नेहमी नेहमी राहतील.

**२६.** वास्तविक एखादे उदाहरण देण्यात अल्लाहला लज्जा-संकोच वाटत नाही, मग ते उदाहरण मच्छराचे असो किंवा त्याहूनही तुच्छ वस्तूचे. ईमान राखणारे त्याला आपल्या पालनकर्त्यातर्फे सत्य जाणतात, आणि काफिर (इन्कार करणारे) म्हणतात की असले उदाहरण देण्यात अल्लाहचे प्रयोजन काय आहे? याच्याचद्वारे अनेकांना मार्गभ्रष्ट करतो आणि बहुतेक लोकांना सत्य-मार्गावर आणतो. आणि मार्गभ्रष्ट तर केवळ आज्ञाभंग करणाऱ्या (दुराचारी लोकां) नाच करतो.

**२७.** जे लोक अल्लाहशी केलेल्या वचन- करारा (प्रतिज्ञे) ला तोडून टाकतात आणि अल्लाहने ज्या गोष्टींना जोडण्याचा आदेश दिला आहे, तिला तोडून टाकतात आणि धरतीवर उत्पात (फसाद) पसरवितात. हेच लोक मोठे नुकसान भोगणारे आहेत.

**२८.** तुम्ही अल्लाहला कसे नाही मानत, वास्तविक तुम्ही निर्जीव होते, तेव्हा त्याने तुम्हाला जीवन प्रदान केले मग तुम्हाला मृत्यू देईल मग पुन्हा दुसऱ्यांदा जिवंत करील, मग त्याच्याचकडे तुम्हाला जायचे आहे.

---

नाही. किंबहुना सर्वश्रेष्ठ अल्लाहचाच ग्रंथ आहे. तेव्हा अल्लाहवर आणि मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्या प्रेषितत्वावर ईमान राखून जहन्नमच्या भयंकर आगीपासून स्वतःला वाचविण्याचा प्रयत्न करा. कारण जहन्नमची ती आग काफिरांसाठी अर्थात इन्कार करणाऱ्यांसाठीच निर्माण केली गेली आहे.

(१) हा पवित्र कुरआनाच्या सत्यतेचा एक स्पष्ट पुरावा की अरब देश आणि प्रदेशातील सर्व इन्कारी लोकांना आव्हान दिले गेले, परंतु आजपर्यंत याचे उत्तर देऊ शकले नाही आणि खात्रीने कयामतीपर्यंत ते असे करू शकणार नाहीत.

**२९.** त्यानेच तुमच्यासाठी, जे काही धरतीवर आहे, सर्व निर्माण केले. मग आकाशाचा इरादा केला आणि त्याने सात यथायोग्य आकाश बनविले आणि तो प्रत्येक गोष्ट जाणणारा आहे.

**३०.** आणि जेव्हा तुमच्या पालनकर्त्याने फरिश्त्यांना फर्माविले की मी धरतीवर एक खलीफा (असा समूह जो एकमेकांनंतर येईल) बनवीत आहे. तेव्हा (फरिश्ते) म्हणाले, काय तू धरतीवर अशा लोकांना निर्माण करशील, जे तिच्यावर फसाद आणि रक्तपात करतील आणि आम्ही तुझ्या स्तुती-प्रशंसेसह तुझे गुणगान आणि तुझी पवित्रता वर्णन करतो. त्याने फर्माविले, जे मी जाणतो तुम्ही नाही जाणत.

**३१.** आणि त्या (अल्लाह) ने आदमला सर्व नावे शिकवून त्या चीज वस्तूंना फरिश्त्यांसमोर प्रस्तुत केले आणि फर्माविले, तुम्ही सच्चे असाल तर या चीज वस्तुंची नावे सांगा.

**३२.** फरिश्ते म्हणाले, हे अल्लाह! तू तर पवित्र (दोष- व्यंग नसलेला) आहे. आम्हाला तर तेवढेच ज्ञान आहे, जेवढे तू आम्हाला शिकविले आहे परिपूर्ण ज्ञान आणि बुद्धी कुशलता राखणारा केवळ तूच आहे.

**३३.** सर्वश्रेष्ठ अल्लाहने आदमला फर्माविले, तुम्ही यांची नावे सांगा. जेव्हा त्यांनी ती नावे सांगितली तेव्हा फर्माविले, काय मी तुम्हाला सांगितले नव्हते की मी आकाशांच्या आणि धरतीच्या अदृश्य गोष्टी जाणतो आणि जे तुम्ही करता किंवा लपविता तेही जाणतो.

**३४.** आणि जेव्हा आम्ही फरिश्त्यांना फर्माविले की आदमला सजदा करा. तेव्हा इब्लीसशिवाय सर्वांनी सजदा केला. त्याने इन्कार केला आणि घमेंड दाखविली[१] आणि तो काफिरां (इन्कारी लोकां) पैकीच होता.

---

(१) इब्लीसने आदमला सजदा करण्यास म्हणजे आदमपुढे माथा टेकण्यास नकार दर्शविला आणि अपमानित झाला. कुरआनानुसार इब्लीस जिन्नांपैकी होता, परंतु अल्लाहने त्याला सन्मानपूर्वक फरिश्त्यांमध्ये सामील करून घेतले होते, यास्तव अल्लाहच्या आदेशानुसार त्यानेदेखील सजदा केला पाहिजे होता, परंतु द्वेष आणि घमेंडीमुळे त्याने सजदा करण्यास इन्कार केला. अर्थात द्वेष, गर्व आणि घमेंड ते पाप होय, जे मानवविश्वात सर्वांत प्रथम केले गेले आणि ते करणारा इब्लीस होता.

**३५.** आणि आम्ही फर्माविले हे आदम! तुम्ही आणि तुमची पत्नी जन्नतमध्ये राहा आणि जिथून इच्छा होईल तिथून वाटेल तेवढे खा व प्या. परंतु या झाडाच्या जवळ जाऊ नका, अन्यथा अत्याचारी ठराल.

**३६.** परंतु सैतानाने त्यांना बहकवून तिथून बाहेर घालविलेच आणि आम्ही सांगून टाकले की उतरा येथून (जा, चालते व्हा), तुम्ही एकमेकांचे शत्रू आहात आणि एक ठराविक वेळेपर्यंत तुम्हाला धरतीवर राहायचे आणि लाभ घ्यायचे आहे.

**३७.** आदमने आपल्या पालनकर्त्याकडून काही वचने शिकून घेतली (आणि अल्लाहजवळ क्षमायाचना केली). अल्लाहने त्यांची तौबा (क्षमायाचना) कबूल केली. नि:संशय तोच तौबा कबूल करणारा, दया करणारा आहे.

**३८.** आम्ही फर्माविले, तुम्ही सर्व येथून उतरा, मग जर तुमच्याजवळ माझ्याकडून मार्गदर्शन आले तर जो कोणी माझ्या उचित मार्गाचा स्वीकार करील त्यांच्यावर कसलेही भय राहणार नाही, ना ते दु:खी होतील.

**३९.** आणि जे कुफ्र (इन्कार) आणि असत्याद्वारे आमच्या आयतींना खोटे ठरवतील ते जहन्नममध्ये राहणारे आहेत. नेहमी त्यातच राहतील.

**४०.** हे इस्राईलच्या पुत्रांनो! माझ्या त्या कृपा- देणगीचे स्मरण करा, जी मी तुमच्यावर केली, आणि माझ्याशी केलेला वचन- करार पूर्ण करा, मी तुमच्याशी केलेला वचन- करार पूर्ण करीन आणि फक्त माझेच भय राखा.

**४१.** आणि त्या (शरीअत) वर ईमान राखा, जिला मी त्याची सत्यता सिद्ध करण्यासाठी अवतरीत केले, जो (तौरात) तुमच्याजवळ आहे, आणि तुम्ही याचे सर्वप्रथम इन्कारी बनू नका आणि माझ्या आयतींना थोड्याशा किंमतीवर विकू नका[१]

(१) ''थोड्याशा किंमतीवर विकू नका'' याचा अर्थ असा कदापि नाही की जास्त किंमत मिळाल्यास अल्लाहच्या आदेशाचा सौदा करा, किंबहुना याचा अर्थ असा की अल्लाहच्या आदेशाच्या तुलनेत ऐहिक लाभाला मुळीच महत्त्व देऊ नका. अल्लाहचे आदेश तर इतके मौल्यवान आहेत की साऱ्या जगाची सामग्री आणि चीजवस्तू त्यांच्या तुलनेत तुच्छ आहेत. आयतीत इस्राईलच्या पुत्रांकडे संकेत केला गेला असला तरी हा आदेश कयामतपर्यंत सर्व मानवांकरिता आहे. जो कोणी सत्याला सोडून असत्याची बाजू धरेल किंवा अज्ञान दाखवून केवळ ऐहिक लाभासाठी सत्याकडे पाठ फिरविल, त्याला हा आदेश लागू पडतो.

आणि फक्त माझेच भय राखा.

**४२.** आणि सत्या (हक) ची असत्या (बातिल) शी भेसळ करू नका आणि सत्य लपवू नका. तुम्ही तर स्वतः हे जाणता.

**४३.** आणि नमाज कायम करा आणि जकात द्या आणि रुकुउ करणाऱ्यां (झुकणाऱ्यां) सह रुकुउ करा (झुका)

**४४.** काय, लोकांना सत्कर्म करण्याचा आदेश देता, आणि स्वतःला विसरून जाता? वास्तविक तुम्ही ग्रंथ वाचता तर काय तुम्हाला एवढीही अक्कल नाही?

**४५.** आणि धीर-संयम व नमाजद्वारे मदत प्राप्त करा[१] आणि ही फार मोठी गोष्ट आहे, परंतु अल्लाहचे भय राखणाऱ्यांकरिता नाही.

**४६.** जे हे जाणतात की आपल्या पालनकर्त्याशी भेटायचे आहे आणि त्याच्याकडे परतून जायचे आहे.

**४७.** हे इस्त्राईल (याकूब) च्या मुलांनो! माझ्या त्या कृपा देणगीचे स्मरण करा जो मी तुमच्यावर उपकार केला आणि मी तुम्हाला साऱ्या जगातील लोकांवर श्रेष्ठता प्रदान केली.

**४८.** आणि त्या दिवसाचे भय बाळगा, ज्या दिवशी कोणीही कोणाच्या उपयोगी पडणार नाही, ना त्याची एखादी शिफारस मान्य केली जाईल, ना त्याच्याकडून एखादा मोबदला स्वीकारला जाईल आणि ना त्यांना मदत दिली जाईल.

**४९.** आणि जेव्हा आम्ही तुम्हाला फिरऔनच्या लोकांपासून[२] सुटका दिली, जे तुम्हाला खूप वाईट शिक्षा- यातना देत राहिले. तुमच्या पुत्रांची हत्या करीत राहिले आणि तुमच्या मुलींना जिवंत सोडत राहिले. यातून सुटका करण्यात तुमच्या पालनकर्त्याचा मोठा उपकार होता.

**५०.** आणि जेव्हा आम्ही तुमच्यासाठी समुद्र फाडला आणि त्यातून तुम्हाला पार केले आणि फिरऔनच्या साथीदारांना तुमच्या डोळ्यांदेखत बुडविले.

---

(१) सबूरी आणि नमाज दोन्ही अल्लाहवाल्यांचे दोन मोठे शस्त्र आहेत. नमाजद्वारे एका ईमानधारकाचा अल्लाहशी संबंध सहजपणे होतो, ज्यामुळे त्याला अल्लाहची प्रसन्नता व सहायता लाभते.धीर सयंम राखल्याने त्याच्या चारित्र्यात दृढता आणि धर्मपालनात स्थैर्यशिलता निर्माण होते.

(२) मूळ शब्द 'आले फिरऔन'शी अभिप्रेत केवळ फिरऔन आणि त्याचे कुटुंबच नव्हे तर फिरऔनचे समस्त साथीदार आहेत.

**५१.** आणि आम्ही मूसाला चाळीस रात्रींचे वचन दिले, मग तुम्ही वासराला उपास्य (दैवत) बनवून घेतले आणि अत्याचारी बनले.

**५२.** परंतु आम्ही, असे असतानाही तुम्हाला माफ केले, यासाठी की तुम्ही उपकार मानाल.

**५३.** आणि आम्ही मूसाला, तुमच्या मार्गदर्शनासाठी ग्रंथ (तौरात) आणि ईश-चमत्कार (मोजिजा) प्रदान केला.

**५४.** आणि जेव्हा मूसा आपल्या जनसमूहाच्या लोकांना म्हणाले, हे माझ्या जमातीच्या लोकांनो! तुम्ही वासराला (दैवत) बनवून स्वतःवर मोठा जुलूम केला आहे. आता तुम्ही आपल्या निर्माण करणाऱ्याकडे ध्यान द्या. स्वतःला (गुन्हेगाराला) आपल्या हातांनी ठार करा. अल्लाहच्या दृष्टीने यातच तुमच्यासाठी भलाई आहे. तेव्हा अल्लाहने तुमची तौबा (क्षमायाचना) कबूल केली. निःसंशय तोच तौबा कबूल करणारा आणि दया करणारा आहे.

**५५.** आणि (तुम्ही त्या गोष्टीचेही स्मरण करा) जेव्हा तुम्ही मूसाला म्हणाले होते की जोपर्यंत आम्ही अल्लाहला (प्रत्यक्ष) समोर पाहून घेत नाही तोपर्यंत कधीही ईमान राखणार नाही (या अवज्ञेची शिक्षा म्हणून) तुमच्यावर, तुमच्या डोळ्यांदेखत वीज कोसळली.

**५६.** (परंतु) मग आम्ही तुम्हाला मृत्युनंतर जीवन यासाठी दिले की तुम्ही आभार मानावेत.

**५७.** आणि आम्ही तुमच्यावर ढगांची सावली केली, आणि तुमच्यावर मन्न आणि सलवा उतरविला (आणि फर्माविले) आम्ही प्रदान केलेल्या स्वच्छ शुद्ध वस्तू खा; आणि त्यांनी आमच्यावर अत्याचार नाही केला उलट ते स्वतःच आपल्यावर अत्याचार करीत होते.

**५८.** आणि आम्ही तुम्हाला फर्माविले की त्या वस्तीत जा[१] आणि जे काही, ज्या ठिकाणाहून इच्छा होईल मनसोक्त खा व प्या आणि दरवाजातून डोके नमवून दाखल व्हा[२] आणि तोंडाने म्हणत जा, आम्ही क्षमा याचना करतो.[३] आम्ही तुमचे अपराध माफ

(१) अधिकांश भाष्यकारांच्या मतानुसार त्या वस्तीशी अभिप्रेत बैतुल मुकद्दस होय.

(२) अर्थात अल्लाहसमोर आभार मानत, नम्रतापूर्वक प्रवेश करा.

(३) अर्थात ''आमच्या अपराधांना क्षमा कर.''

करू आणि भलाई करणाऱ्यांना आणखी जास्त प्रदान करू.

**५९.** मग त्या अत्याचारी लोकांनी, ही गोष्ट, जी त्यांना सांगितली गेली, बदलून टाकली. (परिणामी) आम्हीही त्या अत्याचारी लोकांवर त्यांच्या आज्ञाभंगामुळे आकाशातून अज़ाब (शिक्षा यातना) अवतरीत केला.

**६०.** आणि जेव्हा मूसाने आपल्या जनसमूहाच्या लोकांकरिता पाणी मागितले तेव्हा आम्ही फर्माविले की आपली काठी दगडावर मारा, ज्यातून बारा स्त्रोत (झरे) फुटून वाहू लागले. प्रत्येक समूहाने आपापला स्त्रोत जाणून घेतला (आणि आम्ही फर्माविले की) अल्लाहने प्रदान केलेली अन्नसामग्री खा व प्या आणि धरतीवर उत्पात (फसाद) पसरवित फिरू नका.

**६१.** आणि जेव्हा तुम्ही म्हणाले, हे मूसा! आम्हाला एकाच प्रकारच्या जेवणाने धीर-संयम राखला जाणार नाही, यास्तव आपल्या पालनकर्त्याजवळ दुआ-प्रार्थना करा की त्याने आम्हाला जमिनीतून उत्पन्न झालेली भाजी, काकडी, गहू, मसूर आणि कांदा द्यावा. मूसा म्हणाले की उत्तम वस्तूंऐवजी तुच्छ वस्तू का मागता? मग तर एखाद्या शहरात जा, तिथे तुम्हाला तुमच्या पसंतीच्या या सर्व चीज-वस्तू मिळतील. त्यांच्यावर अपमान आणि दुर्दशा टाकली गेली आणि ते अल्लाहचा अज़ाब (प्रकोप) घेऊन परतले. हे अशासाठी की ते अल्लाहच्या आयतींना मानत नव्हते, आणि पैगंबरांची नाहक हत्या करीत होते. त्यांच्या जुलूम अतिरेकाचा हा परिणाम होय.

**६२.** नि:संशय, जो मुस्लिम असो, यहूदी (ज्यू) असो, नसारा (ख्रिश्चन) असो किंवा साबी[1] असो, जो कोणी सर्वश्रेष्ठ अल्लाह आणि कयामतीच्या दिवसावर ईमान राखील आणि सत्कर्मे करील तर त्याचा मोबदला त्याच्या पालनकर्त्याजवळ आहे. त्यांना ना कसलेही भय राहील, आणि ना कसले दु:ख राहील.

**६३.** आणि जेव्हा आम्ही तुमच्याकडून वचन घेतले आणि तुमच्यावर तूर पर्वत आणून उभा केला आणि फर्माविले, जे आम्ही तुम्हाला प्रदान केले आहे, ते मजबूतीने धरून

---

(१) अर्थात ते लोक, जे जरूर सुरवातीच्या काळात एखादा सत्य-धर्म मानणारे असतील. यास्तव कुरआनात यहूदी, ख्रिश्चनांसोबत त्यांचा उल्लेख आला आहे परंतु नंतरच्या काळात, त्याच्यात फरिश्त्यांची पूजा करण्याची प्रथा पडली किंवा ते नास्तिक झाले. या कारणास्तव धर्महीन लोकांना साबी म्हटले जाऊ लागले.

ठेवा आणि जे काही त्यात आहे ते ध्यानात राखा, यासाठी की तुम्ही दुराचारापासून आपला बचाव करू शकावे.

**६४.** मग त्यानंतरही तुम्ही पाठ फिरवली जर सर्वश्रेष्ठ अल्लाहची कृपा आणि दया तुमच्यावर राहिली नसती, तर तुम्ही नुकसान उचलणारे ठरले असते.

**६५.** आणि अवश्य तुम्हाला त्या लोकांविषयीही माहिती आहे. तुमच्यापैकी ज्यांनी शनिवारबाबत मर्यादेचे उल्लंघन केले. मग आम्ही (देखील) फर्माविले की तुम्ही अपमानित वान्हरे व्हा.

**६६.** याला आम्ही पुढच्या-मागच्या लोकांकरिता सावध राहण्याचे कारण बनविले, आणि भय राखणाऱ्यांकरिता बोध आहे.

**६७.** आणि मूसा जेव्हा आपल्या जमातीच्या लोकांना म्हणाले की सर्वश्रेष्ठ अल्लाह तुम्हाला एक गाय जिबह करण्याचा (बळी देण्याचा) आदेश देतो तेव्हा ते म्हणाले, काय, तुम्ही आमच्याशी थट्टा मस्करी करता? मूसा म्हणाले, मी अशा मूर्खतेपासून सर्वश्रेष्ठ अल्लाहचे शरण घेतो.

**६८.** ते म्हणाले, हे मूसा! अल्लाहजवळ दुआ प्रार्थना करा की आम्हाला त्याविषयी माहिती द्यावी. मूसा म्हणाले, ऐका, ती गाय ना तर म्हातारी असावी आणि ना वासरी, किंबहुना मध्यम वयाची असावी. आता जो आदेश तुम्हाला दिला गेला आहे, तो अमलात आणा.

**६९.** ते पुन्हा म्हणाले की, अल्लाहशी दुआ-प्रार्थना करा की त्याने आम्हाला हे सांगावे की तिचा रंग कसा असावा? सांगितले, अल्लाह फर्मावितो की गाय, गडद सोनेरी रंगाची असावी, आणि पाहणाऱ्यांचे मन प्रसन्न करणारी असावी.

**७०.** ते म्हणू लागले की आपल्या पालनकर्त्याजवळ दुआ करा की त्याने आम्हाला स्पष्टपणे सांगावे की ती कशी असावी? या प्रकारच्या बहुतेक गायी आहेत, तेव्हा उमजत नाही. अल्लाहने इच्छिले तर आम्हाला मार्गदर्शन प्राप्त होईल.

**७१.** मूसा म्हणाले, अल्लाहचा आदेश आहे की ती गाय शेत-जमिनीवर नांगर ओढणारी आणि शेतीला पाणी देण्याच्या कामाची नसावी, ती शरीराने पूर्ण निरोगी आणि डागविरहित असावी. लोक म्हणाले, आता तुम्ही स्पष्टपणे सांगितले. तरीही ते आदेशांचे

पालन करणारे नव्हते, परंतु त्यांनी मानले आणि गायीची कुरबानी (बळी) दिली.

**७२.** आणि जेव्हा तुम्ही एका जीवाची हत्या केली, मग एकमेकांवर आरोप ठेवू लागले आणि अल्लाहला तुम्ही लपविलेली गोष्ट उघड करायची होती.

**७३.** आम्ही फर्माविले की त्या गाईचा एक तुकडा मृत शरीरावर मारा (तो जिवंत होईल) अशा प्रकारे सर्वश्रेष्ठ अल्लाह मेलेल्यांना जिवंत करून तुमच्या बुद्धिमानतेकरिता निशाण्या दाखवितो.

**७४.** मग त्यानंतर तुमची मने पाषाणासारखी, किंबहुना त्याहून अधिक कठोर झालीत. काही दगडांमधून तर जल-प्रवाह निघून वाहू लागतात. आणि काही, अल्लाहच्या भय-दहशतीने खाली कोसळतात आणि तुम्ही अल्लाहला आपल्या आचरणापासून अनभिज्ञ जाणू नका.

**७५.** (हे मुसलमानांनो!) काय, तुम्ही इच्छिता की त्या (यहूदी) नी तुमच्यावर विश्वास करावा वास्तविक त्याच्यात काही असेही आहेत, जे अल्लाहचा ग्रंथ ऐकतात मग त्याला समजून घेतल्यानंतर त्यात फेरबदल करतात आणि असे ते जाणून करतात.

**७६.** आणि जेव्हा ईमान राखणाऱ्यांशी भेटतात, तेव्हा आपण ईमानधारक असल्याचे जाहीर करतात आणि आपसात गाठी भेटी करतात, तेव्हा म्हणतात की मुसलमानांपावेतो त्या गोष्टी का पोहचविता, ज्या अल्लाहने तुम्हाला शिकविल्या आहेत. काय हे नाही जाणत की या गोष्टी तर अल्लाहच्या समोर तुमच्यावर त्यांचा पुरावा ठरतील.

**७७.** काय यांना हे नाही माहीत की सर्वश्रेष्ठ अल्लाह त्याच्या लपलेल्या व उघड अशा सर्वच गोष्टी जाणतो.

**७८.** आणि त्यांच्यापैकी काही अशिक्षित असेही आहेत, जे आशा-अपेक्षांशिवाय ग्रंथास जाणत नाहीत आणि केवळ काल्पनिक गोष्टी करतात.

**७९.** त्या लोकांसाठी विनाश आहे, जे स्वतः आपल्या हातांनी लिहिलेल्या ग्रंथास अल्लाहचा ग्रंथ म्हणतात. आणि अशा प्रकारे या जगाची कमाई करतात. आपल्या हातांनी लिहिण्यामुळे त्यांचा सर्वनाश आहे आणि आपल्या या कमाईमुळे त्यांचा विनाश आहे.

**८०.** आणि हे लोक म्हणतात की आम्ही तर काही मोजके दिवस जहन्नममध्ये राहू, (त्यांना) सांगा की, काय तुम्ही सर्वश्रेष्ठ अल्लाहकडून एखादे वचन घेतले आहे जर घेतले आहे तर खात्रीने सर्वश्रेष्ठ अल्लाह आपल्या वचनाचा भंग करणार नाही किंवा तुम्ही अल्लाहच्या संबंधाने अशा गोष्टी सांगता ज्या तुम्ही जाणत नाही.

**८१.** निःसंशय, ज्यानेदेखील अपराध केला आणि त्याच्या अपराधाने त्याला घेरले तो जहन्नमी आहे. तो नेहमीकरिता जहन्नममध्ये राहील.

**८२.** आणि ज्या लोकांनी ईमान राखले आणि सत्कर्म केले, ते जन्नती आहेत. ते नेहमीकरिता जन्नतमध्ये राहतील.

**८३.** आणि जेव्हा आम्ही इस्राईलच्या पुत्रांकडून वचन घेतले की तुम्ही अल्लाहच्या शिवाय दुसऱ्या कोणाचीही भक्ती-उपासना करू नका आणि आई-बापाशी चांगले वर्तन राखा आणि त्याचप्रमाणे जवळचे नातेवाईक, अनाथ आणि गरीब लोकांशी सद्व्यवहार करा आणि लोकांना चांगल्या- भल्या गोष्टी सांगा. नमाज कायम करा आणि जकात (कर्तव्य दान) देत राहा. परंतु काही लोक वगळता, तुम्ही सर्व मुकरले आणि तोंड फिरविले.

**८४.** आणि जेव्हा आम्ही तुमच्याकडून वचन घेतले की आपसात रक्तपात करू नका (हत्या करू नका) आणि आपल्याच लोकांना देशाबाहेर घालवू नका. तुम्ही मान्य केले आणि तुम्ही याचे साक्षीदारही बनले.

**८५.** तरीही तुम्ही स्वजनांची हत्या केली आणि आपल्या एका समूहाला देशाबाहेर घालविले आणि अपराध व द्वेष करण्याच्या कामात त्यांच्याविरूद्ध दुसऱ्याची बाजू धरली. मात्र जेव्हा ते कैदी बनून तुमच्याजवळ आले तेव्हा तुम्ही त्यांच्या मोबदल्यात धन दिले (ज्याला फिदीया म्हणतात) परंतु त्यांना देशाबाहेर घालविणे जे तुमच्यावर हराम होते (त्याची काहीच काळजी घेतली नाही) काय तुम्ही ग्रंथातल्या काही गोष्टींना मान्य करता आणि काही गोष्टींना नाकारता? तुमच्यापैकी जो कोणी असे करील, त्याची शिक्षा याखेरीज काय असावी की या जगात अपमान आणि कयामतीच्या दिवशी भयंकर शिक्षा- यातनांचा मारा! आणि अल्लाह तुमच्या कर्मांपासून गाफील नाही.

**८६.** हे असे लोक आहेत ज्यांनी ऐहिक जीवनाला आखिरतच्या मोबदल्यात खरेदी केले आहे. त्यांची ना शिक्षा कमी होईल आणि ना त्यांची काही मदत केली जाईल.

**८७.** आणि आम्ही मूसाला ग्रंथ प्रदान केला आणि त्यांच्यानंतर सतत रसूल (पैगंबर) ही पाठविले आणि आम्ही मरियम-पुत्र ईसाला स्पष्ट निशाण्या प्रदान केल्या आणि पवित्र आत्मा (हजरत जिब्रील) द्वारे त्यांना समर्थन दिले गेले. परंतु जेव्हा जेव्हा तुमच्याजवळ रसूल (पैगंबर) ती गोष्ट घेऊन आले, जी तुमच्या विचारांच्या विरूद्ध होती, तुम्ही तत्काळ घमेंड दाखविली, मग काहींना तुम्ही खोटे ठरविले आणि काहींना जीवे ठार मारले.

**८८.** आणि ते म्हणाले, आमची मने झाकलेली आहेत (नाही, नाही) किंबहुना त्यांच्या कुफ्र (इन्कारा) मुळे, अल्लाहने त्यांना धिक्कारले आहे. तेव्हा त्यांच्यात ईमान राखणारे फार थोडेच आहेत!

**८९.** आणि जेव्हा त्यांच्याजवळ त्यांचा ग्रंथ (तौरात) ची पुष्टी करण्याकरिता एक ग्रंथ (पवित्र कुरआन) येऊन पोहचला, वास्तविक याच्यापूर्वी हे स्वतः याच्याद्वारे काफिरांवर (इन्कार करणाऱ्यांवर) विजय इच्छित होते, तेव्हा येऊन पोहोचल्यानंतर आणि ओळखून घेतल्यानंतर त्यांनी नकार दिला. सर्वश्रेष्ठ अल्लाहतर्फे धिक्कार असो इन्कार करणाऱ्यांवर!

**९०.** अतिशय वाईट आहे ती गोष्ट, जिच्या मोबदल्यात त्यांनी स्वतःला विकून टाकले. ते त्यांचे कुफ्र (इन्कार) करणे होय, अल्लाहतर्फे अवतरीत ग्रंथाला केवळ या गोष्टीचा द्वेष करून की अल्लाहने आपली कृपा देणगी, ज्या दासावर इच्छिले अवतरीत केली. या कारणाने ते प्रकोपावर प्रकोपाचे भागीदार ठरले. आणि त्या काफिरां (इन्कार करणाऱ्यां) करिता अपमानदायक अज़ाब (शिक्षा-यातना) आहे.

**९१.** आणि जेव्हा त्यांना सांगितले गेले की त्यावर ईमान राखा जे अल्लाहने अवतरीत केले आहे, तेव्हा ते म्हणाले की जे आमच्यावर (तौरात) उतरविले गेले, त्यावर आमचे ईमान आहे आणि ते त्याला सोडून दुसऱ्या ग्रंथाचा (पवित्र कुरआनाचा) इन्कार करतात. वास्तविक तो सत्य आहे. त्यांच्याजवळ असलेल्या (धर्मग्रंथा) ची सत्यता सिद्ध करीत आहे. (हे पैगंबर!) त्यांना सांगा की जर तुम्ही आपल्या ग्रंथावर ईमान राखता तर यापूर्वी अल्लाहच्या पैगंबरांची हत्या का केली?

**९२.** आणि तुमच्याजवळ मूसा याच निशाण्या घेऊन आले, परंतु तरीही तुम्ही वासराची पूजा केली. तुम्ही आहातच अत्याचारी!

**९३.** आणि जेव्हा आम्ही तुमच्याकडून वचन घेतले आणि तुमच्यावर तूर पर्वत (अधांतरी) उभा केला (आणि फर्माविले) की आम्ही जे काही प्रदान केले आहे ते मजबुतीने धरा आणि ऐका. तेव्हा ते म्हणाले, आम्ही ऐकले आणि आज्ञाभंग केला आणि त्यांच्या मनात वासराचे प्रेम (जणू काही) पाजले (रुजवले) गेले. त्यांच्या कुफ्र (इन्कारा) मुळे. (त्यांना) सांगा की तुमचे ईमान तुम्हाला वाईट आदेश देत आहे. जर तुम्ही ईमानधारक असाल.

**९४.** (तुम्ही त्यांना) सांगा की जर अल्लाहजवळ आखिरतचे घर तुमच्यासाठीच आहे, अन्य कोणासाठी नाही तर या, आपली सत्यता सिद्ध करण्यासाठी मृत्युची याचना करा.

**९५.** परंतु आपल्या कर्मांचा विचार करता, ते कधीही मृत्युची याचना करणार नाहीत आणि अल्लाह अत्याचारी लोकांना चांगल्या प्रकारे ओळखतो.

**९६.** किंबहुना (हे पैगंबर!) ऐहिक जीवनाची सर्वांत जास्त आसक्ती राखणारे तुम्हाला तेच आढळून येतील. जीवनाचा लोभ राखण्यात हे मूर्तीपूजकांपेक्षाही जास्तच आहेत. त्यांच्यापैकी प्रत्येकजण हजार वर्षांचे आयुष्य इच्छितो. वास्तविक हे दीर्घायुष्य दिले जाणेही त्यांना अज़ाब (शिक्षा-यातनां) पासून वाचवू शकत नाही. अल्लाह त्यांचे कर्म चांगल्या प्रकारे पाहत आहे.

**९७.** (हे पैगंबर!) तुम्ही सांगा की जो जिब्रीलचा शत्रू असेल, ज्याने तुमच्या हृदयावर अल्लाहचा संदेश उतरविला आहे, जो संदेश त्याच्या जवळच्या ग्रंथाची सत्यता सिद्ध करणारा आणि ईमानधारकांना मार्गदर्शन आणि शुभ-समाचार देणारा आहे (तर अल्लाहदेखील त्यांचा शत्रू आहे).

**९८.** जो मनुष्य अल्लाहचा आणि त्याच्या फरिश्त्यांचा आणि त्याच्या पैगंबरांचा व जिब्रील आणि मिकाईलचा शत्रू असेल तर अशा अधर्मी लोकांचा शत्रू स्वतः अल्लाह आहे.

**९९.** आणि निःसंशय, आम्ही तुमच्याकडे स्पष्ट निशाण्या पाठविल्या आहेत. ज्यांचा इन्कार, दुराचारी लोकांशिवाय अन्य कोणी करत नाही.

**१००.** हे लोक, जेव्हा जेव्हा एखादा वचन-करार करतात, तेव्हा त्यांच्यातला एक न एक गट त्याचा भंग करतो. किंबहुना त्यांच्यापैकी अधिकांश लोक बेईमान (ईमान

नसलेले) आहेत.

**१०१.** आणि जेव्हादेखील त्यांच्याजवळ अल्लाहचा एखादा रसूल (पैगंबर) त्यांच्या ग्रंथाची पुष्टी करण्यास आला, तेव्हा त्या ग्रंथधारकांच्या एका गटाने अल्लाहच्या ग्रंथाला अशा प्रकारे पाठीमागे टाकले, जणू जाणत नव्हते.

**१०२.** आणि अशा गोष्टीच्या मागे लागले जिला सैतानी लोक, हजरत सुलेमानच्या साम्राज्यात पढत असत. सुलेमानने तर कुफ्र (इन्कार) केला नव्हता. किंबहुना हे कुफ्र-कर्म सैतानांचे होते. ते लोकांना जादू-टोणा शिकवित असत आणि बाबीलमध्ये हारुत व मारुत या दोन फरिश्त्यांवर जो उतरविला गेला होता, ते दोघेही कोणत्याही माणसाला त्या वेळपर्यंत शिकवित नसत, जोपर्यंत हे सांगत नसत की आम्ही तर एक कसोटी मात्र आहोत, तू कुफ्र करू नकोस. मग लोक त्यांच्याकडून अशी विद्या शिकत की ज्याद्वारे पती-पत्नीच्या दरम्यान फूट पाडावी. वास्तविक अल्लाहच्या मर्जीविना ते कोणाला कसलेही नुकसान पोहचवू शकत नाही.[१] हे लोक ते काही शिकतात, जे यांना न नुकसान पोहचवील आणि ना फायदा पोहचवू शकेल आणि ते खात्रीपूर्वक जाणतात की हे प्राप्त करणाऱ्याचा आखिरतमध्ये काहीच हिस्सा नाही आणि ती अतिशय वाईट गोष्ट आहे, जिच्या मोबदल्यात ते स्वतःला विकत आहेत. यांनी हे जाणले असते तर!

**१०३.** आणि जर या लोकांनी ईमान राखले असते व अल्लाहचे भय बाळगले असते तर अल्लाहच्या तर्फे यांना भलाई (शुभ-मांगल्य) लाभली असती. यांनी हे जाणले असते तर!

**१०४.** हे ईमान राखणाऱ्यांनो! तुम्ही (पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांना) आमच्याकडे लक्ष द्या किंवा आमचा विचार करा असे म्हणू नका, किंबहुना आमच्याकडे पाहा असे म्हणत जा, आणि लक्षपूर्वक ऐकत राहा, आणि इन्कार करणाऱ्या लोकांकरिता दुःदायक अज़ाब (शिक्षा-यातना) आहे.

---

(१) ही जादूदेखील त्या वेळे पर्यंत कोणाला नुकसान पोहचवू शकत नाही जोपर्यंत अल्लाहचा आदेश आणि मर्जी नसेल, यास्तव ती शिकण्याचा काय फायदा? याच कारणास्तव इस्लामने जादू शिकण्यास आणि करण्यास कुफ्र (इन्कार) म्हटले आहे. प्रत्येक प्रकारची भलाईची कामना आणि नुकसानापासून बचाव करण्याकरिता केवळ अल्लाहशीच दुआ- प्रार्थना केली जावी, कारण तोच प्रत्येक गोष्ट करणारा आहे आणि प्राणीमात्राचे प्रत्येक काम त्याच्याच मर्जीने होते.

**१०५.** ना तर ग्रंथ लाभूनही त्याचा इन्कार करणारे आणि ना मूर्तीपूजक असे इच्छितात की तुमच्यावर तुमच्या पालनकर्त्यातर्फे भलाई उतरावी (त्यांच्या या द्वेष-मत्सराने काय झाले?) अल्लाह ज्याला इच्छिल त्याला आपली दया कृपा विशेष रीतीने प्रदान करील आणि अल्लाह मोठा कृपाशील आहे.

**१०६.** ज्या आयतीला आम्ही रद्द करतो किंवा तिचा विसर पाडतो तर त्याहून चांगली किंवा तिच्यासारखी आणखी आणतो. काय तुम्ही नाही जाणत की अल्लाह प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्य बाळगतो.

**१०७.** काय तुम्हाला नाही माहीत की धरती आणि आकाशांची राज्य-सत्ता केवळ अल्लाहकरिताच आहे, आणि अल्लाहच्या शिवाय तुमचा कोणी संरक्षक आणि सहाय्यक नाही.

**१०८.** काय तुम्ही आपल्या रसूल (पैगंबर) ला तसे प्रश्न विचारू इच्छिता, जसे यापूर्वी मूसाला विचारले गेले (ऐका!) जो ईमानचा मार्ग सोडून कुफ्र (इन्कार) चा मार्ग धरतो, तो सरळ मार्गापासून भटकतो.

**१०९.** या ग्रंथधारकांपैकी अधिकांश लोक सत्य प्रकट झाल्यानंतरही केवळ द्वेष-मत्सरामुळे तुम्हालाही ईमानापासून दूर करू इच्छितात, तेव्हा तुम्हीही माफ करा आणि सोडून द्या, येथपर्यंत की अल्लाहने आपला फैसला लागू करावा. निःसंशय अल्लाह प्रत्येक कार्य करण्याचे सामर्थ्य राखतो.

**११०.** तुम्ही नमाज (नित्य-नेमाने) अदा करीत राहा, आणि जकात (धर्म दान) देत राहा आणि जी भलाई तुम्ही आपल्यासाठी पुढे पाठवाल, ती सर्वकाही अल्लाहजवळ प्राप्त कराल. निःसंशय, अल्लाह तुमचे प्रत्येक कर्म पाहत आहे.

**१११.** आणि हे म्हणतात की जन्नतमध्ये यहूदी आणि ख्रिश्चनांखेरीज अन्य कोणी जाणार नाही. या त्यांच्या काल्पिनक आशा- अपेक्षा आहेत. त्यांना सांगा, तुम्ही (आपल्या कथनात) सच्चे असाल तर एखादा पुरावा तरी प्रस्तुत करा.

**११२.** ऐका! ज्याने स्वतःला अल्लाहच्या हवाली केले, आणि नेक-सदाचारी आहे, तर त्याच्याचकरिता, त्याच्या पालनकर्त्या (अल्लाह) च्या ठिकाणी चांगला मोबदला आहे आणि ना त्यांना कसले भय राहील ना एखादे दुःख.

**११३.** यहूदी म्हणतात, ख्रिश्चन उचित मार्गावर नाहीत आणि ख्रिश्चन म्हणतात की यहूदी उचित मार्गावर नाहीत. वास्तविक हे तौरातचे वाचन करतात अशा प्रकारे यांच्यासारखी गोष्ट अज्ञानी लोकही बोलतात. कयामतीच्या दिवशी अल्लाह यांच्या या मतभेदाचा फैसला करील.

**११४.** आणि त्याहून मोठा अत्याचारी कोण आहे? जो अल्लाहच्या मस्जिदीमध्ये अल्लाहचे स्मरण करण्यापासून रोखील, आणि त्यांना उजाडण्याचा प्रयत्न करील? अशा लोकांनी अल्लाहचे भय राखत, त्यात दाखल झाले पाहिजे. त्यांच्याकरिता या जगातही अपमान आहे आणि आखिरत (मरणोत्तर जीवन) मध्येही मोठमोठ्या शिक्षा-यातना आहेत.

**११५.** आणि पूर्व आणि पश्चिमेचा स्वामी अल्लाहच आहे. तुम्ही जिकडे देखील तोंड कराल, तिकडे अल्लाहचे तोंड आहे. अल्लाह अतिशय सामर्थ्यशाली खूप खूप जाणणारा आहे.

**११६.** आणि हे म्हणतात की अल्लाहला संतान आहे (मुळीच नाही, किंबहुना) तो पवित्र (व्यंग-दोष विरहीत) आहे. धरती आणि आकाशांच्या समस्त निर्मितीवर त्याची शासन-सत्ता आहे आणि प्रत्येक त्याचा आज्ञाधारक आहे.

**११७.** तो, आकाशांना व धरतीला नव्याने बनवून उत्पन्न करणारा आहे, आणि तो ज्या कामाचा निर्णय घेतो, तेव्हा म्हणतो, होऊन जा आणि ते काम होते.

**११८.** आणि अशा प्रकारे अडाणी-अशिक्षित लोकदेखील म्हणाले की स्वत: अल्लाह आमच्याशी संभाषण का नाही करीत किंवा आमच्याजवळ एखादी निशाणी का नाही येत. अशा प्रकारचे कथन त्यांच्या पूर्वीच्या लोकांनीही केले होते, त्यांची आणि यांची मने एकसमान झालीत. आम्ही तर विश्वास (श्रद्धा) ठेवणाऱ्यांकरिता निशाण्यांचे निवेदन केले आहे.

**११९.** आम्ही तुम्हाला सत्यासह खूशखबर देणारा आणि सचेत करणारा बनवून पाठविले आहे आणि जहन्नमी लोकांविषयी तुम्हाला विचारणा केली जाणार नाही.

**१२०.** आणि यहूदी व ख्रिश्चन तुमच्याशी कधीही खूश होणार नाहीत, जोपर्यंत तुम्ही त्यांच्या धर्माचे अनुसरण न कराल. (तुम्ही) सांगा की अल्लाहचे मार्गदर्शनच, मार्गदर्शन

असते आणि जर तुम्ही, आपल्याजवळ ज्ञान घेऊन पोहोचल्यानंतरही त्यांच्या इच्छा अभिलाषांचे अनुसरण केले तर अल्लाहच्या जवळ तुमचा ना कोणी समर्थक असेल, ना कोणी सहाय्यक.

**१२१.** ज्यांना आम्ही ग्रंथ प्रदान केला आणि ते त्याला अशा प्रकारे वाचतात, जसा त्याच्या वाचनाचा हक्क आहे.[१] ते या ग्रंथावरही ईमान राखतात आणि जे यावर ईमान राखत नाहीत ते स्वतः आपला तोटा करून घेतात.

**१२२.** हे इस्राईलच्या पुत्रांनो! मी तुम्हाला ज्या कृपा- देणग्या प्रदान केल्या आहेत, त्यांची आठवण करा आणि हे की मी तुम्हाला साऱ्या जगात श्रेष्ठता प्रदान केली होती.

**१२३.** आणि त्या दिवसाचे भय बाळगा, ज्या दिवशी कोणीही कोणाला फायदा पोहचवू शकणार नाही, आणि ना कोणाकडून काही मोबदला स्वीकारला जाईल, ना त्याला एखाद्याची शिफारस लाभ देऊ शकेल, ना त्याला मदत केली जाईल.

**१२४.** आणि जेव्हा इब्राहीमची त्यांच्या पालनकर्त्याने अनेक गोष्टींद्वारे कसोटी घेतली आणि त्यांनी सर्व कसोट्यांमध्ये सफल होऊन दाखविले, तेव्हा (अल्लाहने) फर्माविले की मी तुम्हाला लोकांचा इमाम (प्रमुख) बनवीन. विचारले, आणि माझ्या संततीला? उत्तर दिले की माझा वायदा अत्याचारी लोकांबाबत(साठी) नाही.

**१२५.** आणि आम्ही बैतुल्लाह (काबा) ला मानवाकरिता पुण्य (सवाब) आणि शांतीचे ठिकाण बनविले. तुम्ही मुकामे इब्राहीम (इब्राहिमचे स्थान- काबागृहात एक निर्धारीत ठिकाणाचे नाव आहे, जे काबागृहाच्या दरवाजासमोर, किंचित डावीकडे आहे.) ला मुसल्ला (नमाज पढण्याचे स्थान) ठरवून घ्या आणि आम्ही इब्राहीम आणि इस्माईल यांच्याकडून वचन घेतले की माझ्या घराला तवाफ (प्रदक्षिणा) आणि एतिकाफ (काही

(१) ''ते अशा प्रकारे वाचतात, जसा त्याच्या वाचनाचा हक्क आहे.'' याचे अनेक अर्थ सांगितले गेले आहेत. उदा. १. ''अगदी लक्षपूर्वक वाचतात'', जन्नतचे वर्णन आल्यावर जन्नतची अभिलाषा धरतात, तसेच जहन्नमचे वर्णन आल्यावर तिच्यापासून बचाव व्हावा अशी दुआ करतात. २. यात सांगितलेल्या हलाल (वैध) ला हलाल आणि हरामला हराम समजतात आणि अल्लाहच्या ग्रंथात फेरबदल करीत नाही, जसे इतर ग्रंथधारक करीत. ३. त्यात जे काही लिहिले आहे, ते लोकांना सांगतात, त्यातली एकही गोष्ट लपवीत नाही. ४. यातल्या स्पष्ट गोष्टींच्या अनुसार आचरण करतात, अस्पष्ट (संदिग्ध) गोष्टींवर ईमान राखतात आणि ज्या गोष्टींचे आकलन होत नाही, त्या धर्मज्ञानींकडून समजून घेतात.५. त्यातल्या प्रत्येक गोष्टीचे पालन करतात.

काळ मस्जिदीत ध्यान लावून उपासना) करणाऱ्यांसाठी आणि रुकुउ आणि सजदा करणाऱ्यांसाठी पवित्र आणि साफ-स्वच्छ राखा.

**१२६.** आणि जेव्हा इब्राहीम म्हणाले, हे माझ्या पालनकर्त्या! तू या ठिकाणाला शांतीपूर्ण शहर बनव आणि इथल्या रहिवाशांना जे अल्लाह आणि कयामतच्या दिवसावर ईमान राखणारे असतील, फळांची रोजी (अन्न-सामग्री) प्रदान कर. अल्लाहने फर्माविले की मी काफीर (इन्कार करणाऱ्या) लोकांनाही थोडा लाभ पोहचवीन, मग त्यांना आगीच्या अज़ाब (शिक्षा-यातने) कडे विवश करून टाकीन. पोहचण्याचे मोठे वाईट ठिकाण आहे हे!

**१२७.** जेव्हा इब्राहीम आणि इस्माईल काबागृहाचा पाया (आणि भिंती) रचत होते आणि म्हणत जात होते की हे आमच्या पालनकर्त्या! तू आमच्याकडून (ही सेवा) स्वीकार कर. निःसंशय तूच ऐकणारा आणि जाणणारा आहे.

**१२८.** हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला तुझा आज्ञाधारक बनव आणि आमच्या संततीमधून एका समूहाला तुझा आज्ञाधारक बनव आणि आम्हाला तुझ्या उपासनेच्या रीती शिकव आणि आमची तौबा (क्षमा-याचना) कबूल कर. निःसंशय तू तौबा कबूल करणारा, दया करणारा आहे.

**१२९.** हे आमच्या पालनकर्त्या! त्यांच्यात, त्यांच्यामधूनच एक रसूल (पैगंबर) पाठव. ज्यांनी त्यांच्याजवळ तुझ्या आयतींचे पठण करावे आणि त्यांना ग्रंथ व हिकमत शिकवावे[१] आणि त्यांना स्वच्छ- पवित्र करावे. निःसंशय, तू वर्चस्वशाली आणि बुद्धीकौशल्य बाळगणारा आहे.

**१३०.** आणि इब्राहीमच्या दीन (धर्मा) पासून तोच तोंड फिरविल, जो स्वतः मूर्ख असेल. आम्ही तर त्याला या जगातही पसंत केले आणि आखिरतमध्येही तो नेक-सदाचारी लोकांपैकी आहे.

**१३१.** जेव्हा (देखील) त्यांच्या पालनकर्त्याने फर्माविले की आत्मसमर्पण करा तेव्हा ते म्हणाले की मी समस्त विश्वाच्या पालनकर्त्यासाठी आत्मसमर्पण केले.

**१३२.** याच गोष्टीची ताकीद इब्राहीम आणि याकूब यांनी आपल्या संततीला केली की

(१) ग्रंथाशी अभिप्रेत पवित्र कुरआन आणि हिकमतशी अभिप्रेत हदीस.

हे आमच्या पुत्रांनो! अल्लाहने तुमच्यासाठी हा दीन (धर्म) निर्धारित केला आहे. तेव्हा खबरदार! तुम्ही मुस्लिम असण्याच्या स्थितीतच मरा.

**१३३.** काय तुम्ही (हजरत) याकूबच्या मृत्युसमयी हजर होते? जेव्हा त्यांनी आपल्या संततीला म्हटले की तुम्ही माझ्या मृत्युनंतर कोणाची उपासना कराल? तेव्हा सर्वांनी उत्तर दिले की तुमच्या पालनकर्त्याची आणि तुमचे वाडवडील इब्राहीम आणि इस्माईल आणि इसहाक यांच्या उपास्या (दैवता) ची, जो एकमेव आहे आणि आम्ही त्याचेच ताबेदार बनून राहू.

**१३४.** हा जनसमूह तर होऊन गेला, त्यांनी जे केले ते त्यांच्यासाठी आहे आणि तुम्ही जे कराल ते तुमच्यासाठी आहे. त्यांच्या कर्माविषयी तुम्हाला विचारले जाणार नाही.

**१३५.** हे म्हणतात की यहूदी (ज्यू) आणि ख्रिश्चन व्हाल तर मार्गदर्शन लाभेल. तुम्ही सांगा की सरळ आणि उचित मार्गावर तर इब्राहीमच्या मार्गाचे अनुसरण करणारे आहेत आणि इब्राहीम केवळ अल्लाहचे आज्ञाधारक होते. ते मूर्तीपूजक नव्हते.

**१३६.** (हे ईमानधारकांनो!) तुम्ही सर्व सांगा, आम्ही अल्लाहवर ईमान राखले आणि त्यावरही जे आमच्याकडे उतरविले गेले आणि जे इब्राहीम, इस्माईल, इसहाक, याकूब आणि त्यांच्या संततीवर उतरविले गेले आणि जे काही अल्लाहच्या तर्फे मूसा, ईसा आणि अन्य पैगंबरांना दिले गेले. आम्ही त्यांच्यापैकी कोणाच्याही दरम्यान फरक करीत नाही. आम्ही अल्लाहचे ताबेदार आहोत.[१]

**१३७.** जर ते तुमच्यासारखे ईमान राखतील तर मार्गदर्शन प्राप्त करतील आणि जर तोंड फिरवतील तर विरोधात आहेत. अल्लाह त्या सर्वांच्या विरोधात भविष्यात तुमची मदत करील. अल्लाह चांगल्या प्रकारे ऐकणारा आणि जाणणारा आहे.

---

(१) अर्थात ईमानची व्यापक व्याख्या ही की सर्व पैगंबरांना अल्लाहतर्फे जे काही मिळाले किंवा त्यांच्यावर अवतरीत झाले, त्या सर्वांवर ईमान राखले जावे. कोणत्याही ग्रंथाचा किंवा पैगंबराचा इन्कार केला जाऊ नये. एखाद्या ग्रंथाला किंवा पैगंबराला मानणे, आणि दुसऱ्याचा नकार दर्शविणे ही गोष्ट पैगंबरांच्या दरम्यान फरक जाहीर करते, जी इस्लामच्या मते उचित नाही. तथापि आता आचरण मात्र पवित्र कुरआनच्या नियम आणि आदेशांना अनुसरून होईल. पूर्वीच्या अवतरीत ग्रंथातील आदेशानुसार नव्हे. कारण प्रथम तर ते ग्रंथ आपल्या मूळ स्वरूपात नाहीत. फेरबदल झालेले आहेत आणि दुसरे हे की कुरआनने त्या सर्वांच्या आदेशांना रद्द केले आहे.

**१३८.** अल्लाहचा रंग धारण करा, आणि अल्लाहपेक्षा उत्तम रंग आणि कोणाचा असेल? आम्ही तर त्याचीच उपासना करणारे आहोत.

**१३९.** (तुम्ही) सांगा, काय तुम्ही आमच्याशी अल्लाहबाबत वाद घालता, जो आमचा आणि तुमचा पालनकर्ता आहे. आमच्यासाठी आमची कर्मे आहेत, तुमच्यासाठी तुमची कर्मे. आम्ही तर केवळ अल्लाहशीच सच्चे, प्रामाणिक आहोत.

**१४०.** काय तुम्ही असे म्हणता की इब्राहीम, इस्माईल, इसहाक आणि याकूब व त्यांची संतती यहूदी किंवा ख्रिश्चन होती? सांगा, काय तुम्ही जास्त जाणता की अल्लाह? अल्लाहच्या जवळ पुरावा लपविणाऱ्यांपेक्षा जास्त अत्याचारी आणखी कोण आहे? आणि अल्लाह तुमच्या कर्मांपासून गाफील नाही.

**१४१.** हा एक जनसमूह होता जो होऊन गेला, त्यांनी जे (कर्म) केले ते त्यांच्यासाठी आहे आणि जे तुम्ही केले ते तुमच्यासाठी. तुम्हाला त्यांच्या कर्मांविषयी विचारले जाणार नाही.[१]

---

(१) या आयतीत पुन्हा लाभ आणि आचरणाची श्रेष्ठता विशद करून थोर बुजुर्ग आणि महात्मा वगैरेंशी नाते किंवा त्यांच्यावर भरोसा व्यर्थ सांगितला गेला आहे. कारण, (''ज्याला त्याच्या कर्माने मागे सोडले, त्याचा वंश त्याला पुढे नेणार नाही.'') (सहीह मुस्लिम)

अर्थात थोर बुजुर्गांच्या चांगल्या कामाने तुम्हाला काही फायदा आणि त्यांच्या वाईट कर्मांविषयी तुम्हाला काही विचारले जाणार नाही, किंबहुना त्यांच्या कर्मांविषयी तुम्हाला किंवा तुमच्या आचरणाबाबत त्यांना विचारणा केली जाणार नाही.

''कोणीही कोणाचे ओझे उचलणार नाही.'' (सूरह फातिर-१८)

''माणसाकरिता तेच काही आहे, ज्याच्यासाठी त्याने प्रयत्न केला.'' (सूरह अल नजम-३९)

**१४२.** लवकरच हे मूर्ख लोक म्हणतील की ज्या किब्ला (ज्या दिशेकडे तोंड करून नमाज पढली जाते) वर हे होते, त्याकडून यांना कोणत्या गोष्टीने फिरविले? (तुम्ही त्यांना) सांगा की पूर्व आणि पश्चिमेचा मालक अल्लाह आहे. तो ज्याला इच्छितो सरळ मार्ग दाखवितो.

**१४३.** आणि आम्ही अशा प्रकारे तुम्हाला मधली (संतुलित) उम्मत (जनसमूह) बनविले,[१] यासाठी की तुम्ही लोकांवर साक्षी राहावे आणि रसूल (स.) तुमच्यावर साक्षी राहावेत आणि ज्या किब्लावर तुम्ही पूर्वीपासून होते, तो आम्ही केवळ एवढ्यासाठी निश्चित केला होता की (याद्वारे) आम्ही हे जाणून घ्यावे की रसूलचा सच्चा ताबेदार कोण आहे आणि कोण आहे जो उलट्या पावली परत फिरतो. वास्तविक हे कठीण काम आहे, परंतु ज्यांना अल्लाहने मार्गदर्शन केले आहे (त्यांच्यासाठी काहीच कठीण नाही) अल्लाह तुमचे ईमान वाया जाऊ देणार नाही. निःसंशय, अल्लाह, लोकांशी प्रेम राखणारा आणि दया करणारा आहे.

**१४४.** आम्ही तुमचे तोंड वारंवार आकाशाकडे वर होत असलेले पाहत आहोत, आता आम्ही तुम्हाला त्या किब्लाकडे फिरवून देऊ ज्यामुळे तुम्ही खूश व्हाल. तुम्ही आपले तोंड मस्जिदे हराम (काबा) कडे फिरवून घ्या आणि तुम्ही कोठेही असा, आपले तोंड त्याच्याचकडे फिरवून घेत जा. ग्रंथधारकांना, ही गोष्ट अल्लाहतर्फे सत्य असण्याचे खरे ज्ञान आहे आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह त्यांच्या त्या कर्मांपासून गाफील नाही, जी कर्मे हे करतात.

**१४५.** आणि तुम्ही जर ग्रंथधारकांना सर्व पुरावे सादर करून द्याल, तरीही ते तुमच्या किब्लाचे अनुसरण करणार नाहीत आणि ना तुम्ही त्याचा किब्ला मान्य करणारे व्हाल, ना हे आपसात एकमेकांचा किब्ला मानणारे आहेत. तुमच्याजवळ स्पष्ट ज्ञान येऊन पोहोचल्यानंतरही जर तुम्ही त्यांच्या इच्छा-आकांक्षा पूर्ण करण्यासाठी त्यांचे अनुसरण करू लागाल तर निश्चितच तुम्हीदेखील अत्याचारी ठराल.[२]

---

(१) मूळ शब्द 'वसातुन' याचा अर्थ मध्य (मधला), परंतु हा शब्द मोठेपणा आणि श्रेष्ठता या अर्थानेही वापरला जातो. इथेही याच अर्थाने वापरला गेला आहे.

(२) ही ताकीद यापूर्वी दिली गेली आहे. हेतु मुस्लिम जनसमूहाला सावध करणे आहे की कुरआन आणि हदीसचे ज्ञान प्राप्त झाल्यावरही बिदअतवाल्यांच्या मागे लागणे अत्याचार आणि भटकणे होय.

**१४६.** ज्यांना आम्ही ग्रंथ दिला आहे, ते तर याला अशा प्रकारे ओळखतात, ज्या प्रकारे एखादा मनुष्य आपल्या पुत्रांना ओळखतो, त्यांच्यातला एक समूह सत्याला ओळखूनही ते लपवितो.

**१४७.** तुमच्या पालनकर्त्यातर्फे हे परिपूर्ण सत्य आहे. सावधान! तुम्ही शंका-संशय करणाऱ्यांपैकी होऊ नका.

**१४८.** आणि प्रत्येक मनुष्य कोणत्या न कोणत्या दिशेकडे पर्वृत्त (लक्ष केंद्रित करणारा) असतो. तुम्ही नेकी (सत्कर्मा) कडे धाव घ्या. तुम्ही कोठेही असा अल्लाह तुम्हाला घेऊन येईल. निःसंशय, अल्लाह प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्य बाळगतो.

**१४९.** आणि तुम्ही ज्या ठिकाणाहूनही निघाल आपले तोंड मस्जिदे हराम (आदरणीय मस्जिद अर्थात काबा) कडे करून घेत जा. तुमच्या पालनकर्त्यातर्फे हेच सत्य आहे आणि जे काही तुम्ही करीत आहात, त्यापासून अल्लाह गाफील नाही.

**१५०.** आणि ज्या ठिकाणाहूनही तुम्ही निघाल आपले तोंड मस्जिदे हरामकडे करून घ्या आणि ज्या ठिकाणीदेखील तुम्ही राहाल आपले तोंड त्याच्याचकडे (अर्थात काबाकडे) करून घेत जा, यासाठी की लोकांना वाद घालण्याचे कोणतेही प्रमाण बाकी राहू नये, त्यांच्याखेरीज जे यांच्यात अत्याचारी आहेत. तुम्ही त्यांचे भय बाळगू नका,[१] फक्त माझेच भय बाळगा, यासाठी की मी आपली कृपा- देणगी (नेमत) तुमच्यावर पूर्ण करावी, आणि यासाठी की तुम्ही मार्गदर्शन प्राप्त करू शकावे.

**१५१.** ज्या प्रकारे आम्ही तुमच्यात, तुमच्यामधूनच रसूल (पैगंबर मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) यांना पाठविले, जो आमच्या आयती (पवित्र कुरआन) तुमच्यासमोर वाचून ऐकवितो आणि तुम्हाला स्वच्छ शुद्ध करतो आणि तुम्हाला ग्रंथ आणि हिकमत (बुद्धिमानता) शिकवितो आणि त्या गोष्टीचे ज्ञान देतो, ज्याविषयी तुम्ही अजाण होते.

**१५२.** यासाठी तुम्ही माझे स्मरण करा, मीदेखील तुमचे स्मरण राखीन आणि माझ्याशी कृतज्ञशील राहा आणि कृतघ्नता दाखवू नका.

**१५३.** हे ईमान राखणाऱ्यांनो! धीर-संयम आणि नमाजद्वारे मदत मागा. निःसंशय,

(१) अत्याचारींचे भय बाळगू नका म्हणजे अनेकेश्वरवाद्यांच्या कारवायांची काळजी करू नका.

अल्लाह धीर-संयम राखणाऱ्यांना साथ देतो.[१]

**१५४.** आणि अल्लाहच्या मार्गात शहीद होणाऱ्यांना मेलेले म्हणू नका, ते तर जिवंत आहेत, परंतु तुम्ही समजू शकत नाही.

**१५५.** आणि आम्ही कोणत्या ना कोणत्या प्रकारे तुमची कसोटी जरूर घेऊ. शत्रूंच्या भय-दहशतीने, तहान भूकेने, संपत्ती आणि प्राण, फळांच्या कमतरतेने आणि त्या सबुरी राखणाऱ्यांना खूशखबर द्या.

**१५६.** त्यांना जेव्हा जेव्हा एखाद्या संकटाला तोंड द्यावे लागते, तेव्हा ते म्हणत असतात की आम्ही तर स्वतः सर्वश्रेष्ठ अल्लाहकरिता आहोत, आणि आम्ही त्याच्याचकडे परतणार आहोत.

**१५७.** हेच ते लोक होत, ज्यांच्यावर त्यांच्या पालनकर्त्याची रहमत (दया-कृपा) आणि मेहरबानी आहे आणि हेच लोक सरळ मार्गावर आहेत.

**१५८.** निःसंशय, सफा आणि मरवह (हे दोन्ही पर्वत) अल्लाहच्या निशाण्यांपैकी आहेत. यासाठी अल्लाहच्या घरा (काबा) चा हज आणि उमरा करणाऱ्यांवर यांच्या दरम्यान फेऱ्या करून घेण्यात काहीच हरकत नाही. आपल्या आवडीने नेकी (सत्कर्म) करणाऱ्यांचा अल्लाह सन्मान करतो आणि त्यांना चांगल्या प्रकारे जाणणारा आहे.

**१५९.** जे लोक आम्ही अवतरीत केलेल्या निशाण्यांना आणि मार्गदर्शनाला लपवितात यानंतरही की आम्ही आपल्या ग्रंथात (पवित्र कुरआनात) लोकांसाठी त्यांचे निवेदन केलेले आहे, अशा लोकांचा अल्लाहतर्फे आणि सर्व धिक्कारणाऱ्यांतर्फे धिक्कार आहे.

**१६०.** परंतु ते लोक, जे तौबा (क्षमा याचना) करतील आणि (आपल्या आचरणात) सुधार करून घेतील, आणि जे लपविले ते सांगून टाकतील तर मी त्यांची तौबा कबूल करतो, आणि मी तौबा कबूल करणारा आणि दया करणारा आहे.

**१६१.** निःसंशय, जे काफिर (इन्कारी लोक) इन्कार करण्याच्या स्थितीतच मरण पावतील तर त्यांच्यावर अल्लाहतर्फे, फरिश्त्यांतर्फे आणि सर्व लोकांतर्फे धिक्कार आहे.

---

(१) माणसाच्या दोनच अवस्था असतात. सुख-सुविधा (ऐश-आराम) किंवा दुःख आणि संकट. सुख-संपन्न अवस्थेत अल्लाहचे आभार मानण्यावर जोर आणि दुःख यातनेत धीर-संयम राखून नमाजच्या माध्यमाने अल्लाहची मदत प्राप्त करण्यावर जोर आहे.

**१६२.** यात ते नेहमीकरिता राहतील, ना त्यांच्यावरील अज़ाब (शिक्षा- यातना) हलकी (सौम्य) केली जाईल आणि ना त्यांना ढील दिली जाईल.

**१६३.** आणि तुम्हा सर्वांचा माबूद (उपास्य) एक अल्लाहच आहे. त्याच्याशिवाय कोणीही सच्चा (वास्तव) उपास्य नाही, तो अतिशय कृपाळू आणि मोठा दयाळू आहे.

**१६४.** निःसंशय, आकाश आणि धरतीची निर्मिती, रात्र आणि दिवसाचा फेरबदल, लोकांच्या लाभदायक वस्तू घेऊन नौकांचे समुद्रात चालणे, आकाशातून पाणी उतरवून मृत जमिनीला जिवंत करणे, त्यात प्रत्येक प्रकारचे जीव पसरविणे, वाऱ्यांची (हवेची) दिशा बदलणे आणि ढग जे आकाश व धरतीच्या दरम्यान हुकूमाधीन आहेत, यात बुद्धिमानांकरिता अल्लाहच्या सामर्थ्याची निशाणी आहे.

**१६५.** आणि काही लोक असेही आहेत जे दुसऱ्यांना अल्लाहचा सहभागी ठरवून त्यांच्याशी असे प्रेम राखतात, जसे प्रेम अल्लाहशी असायला हवे आणि ईमानधारक तर अल्लाहशी प्रेम राखण्यात मोठे सक्त असतात. मूर्तीपूजक लोकांनी हे जाणले असते तर! वास्तविक अल्लाहच्या शिक्षा- यातना पाहून (जाणून घेतील) की सर्व प्रकारचे सामर्थ्य अल्लाहलाच आहे आणि अल्लाह सक्त अज़ाब (शिक्षा-यातना) देणारा आहे. (तर कधीही मूर्तीपूजा केली नसती.)

**१६६.** ज्या वेळी प्रमुख (पेशवा) लोक आपल्या अनुयायींपासून वेगळे होतील आणि अज़ाबला आपल्या डोळ्यांनी पाहून घेतील आणि सर्व नाते-संबंध तुटतील.

**१६७.** आणि अनुयायी म्हणू लागतील, आम्हाला पुन्हा एकदा जगात जायला मिळाले तर किती बरे होईल, मग तर आम्हीही त्यांच्यापासून असेच वेगळे होऊ जसे हे आमच्यपासून आहेत. अशा प्रकारे अल्लाह त्यांना त्यांचे कर्म दाखविल त्यांच्या पश्चात्तापासाठी. जहन्नममधून बाहेर पडणे त्यांना कधीच शक्य होणार नाही.[१]

**१६८.** हे लोकांनो! धरतीवर जेवढ्यादेखील हलाल (वैध) आणि पाक (स्वच्छ-शुद्ध)

---

(१) अनेक ईश्वरांची उपासना करणारे आखिरतमध्ये आपले धर्मगुरू आणि धर्माचार्यांची विवशता आणि विभक्त होण्याने दुःख प्रकट करतील, परंतु हे दुःख त्यांना काहीच कामी येणार नाही. त्यांनी या जगात राहत असतानाच शिर्क (अल्लाहचे सहभागी ठरवण्या) पासून तौबा केली असती तर किती चांगले झाले असते!

वस्तू आहेत त्या खा व प्या आणि सैतानाच्या मार्गावर चालू नका[१] तो तुमचा उघड शत्रू आहे.

**१६९.** तो तुम्हाला फक्त वाईट आणि निर्लज्जपणाचा आणि अल्लाहच्या संबंधाने अशा गोष्टी सांगण्याचा आदेश देतो, ज्या तुम्ही जाणतही नाही.

**१७०.** आणि जेव्हा जेव्हा त्यांना सांगितले जाते की अल्लाहने अवतरीत केलेल्या ग्रंथानुसार आचरण करा, तेव्हा उत्तर देतात की आम्ही तर त्याच मार्गाचे अनुसरण करू, ज्यावर आम्हाला आपले वाडवडील आढळले, वास्तविक त्यांचे वाडवडील मूर्ख आणि भटकलेले असले तरी.[२]

**१७१.** आणि काफिर (इन्कारी लोक) त्या जनावरांसारखे आहेत, जे आपल्या गुराख्याची फक्त हाक आणि आवाज एकतात (समजून घेत नाहीत) ते बहिरे, मुके आणि आंधळे आहेत, त्यांना अक्कलच नाही.

**१७२.** हे ईमान राखणाऱ्यांनो! जी (पाक) वस्तू आम्ही तुम्हाला प्रदान केली आहे, ती खा व प्या आणि अल्लाहचे आभारी बनून राहा. जर तुम्ही फक्त त्याचीच उपासना करत असाल.

**१७३.** तुमच्यासाठी मेलेले आणि रक्त, डुकरांचे मांस, आणि अशी ती प्रत्येक वस्तू जिच्यावर अल्लाहच्या नावाशिवाय दुसऱ्यांचे नाव घेतले जावे, हराम आहे. परंतु जो लाचार होईल आणि तो मर्यादा ओलांडणारा व अत्याचारी नसावा, त्याच्यावर ते खाण्यात काही गुन्हा नाही. निःसंशय, अल्लाह मोठा माफ करणारा, दया करणारा आहे.

**१७४.** निःसंशय, जे लोक सर्वश्रेष्ठ अल्लाहने अवतरीत केलेला ग्रंथ लपवितात आणि

(१) अर्थात सैतानाचे अनुयायी बनून अल्लाहने हलाल ठरविलेल्या गोष्टी हराम ठरवू नका, जसे मूर्तीपूजाकांनी केले की आपल्या दैवतांच्या नावाने सोडलेल्या जनावरांना स्वतःसाठी हराम करून घेत.

(२) आजदेखील बिदअतवाल्यांना (धर्मात नवनवीन रुढी रिवाज दाखल करणाऱ्यांना) समजविले जावे की या नव्या गोष्टींची धर्मात काहीच किंमत नाही, तर ते हेच उत्तर देती की या रुढी आमच्या पूर्वजांपासून चालत आल्या आहेत, वास्तविक त्यांचे पूर्वजदेखील दीन (धर्मा) च्या खऱ्या ज्ञानापासून अपरिचित आणि मार्गदर्शनापासून वंचित असू शकतात. यास्तव धार्मिक प्रमाण- पुराव्यांसमोर, वाडवडिलांचे आदेश मानणे इमामांचे अनुसरण (पुराव्याविना त्यांचे कथन मानणे) पूर्णतः भटकणे आहे. सर्वश्रेष्ठ अल्लाह मुसमानांना मार्गभ्रष्टतेच्या दलदलीतून बाहेर काढो.

त्याला थोड्याशा किंमतीवर विकतात, खात्रीने ते आपल्या पोटात आग भरत आहेत. कयामतच्या दिवशी अल्लाह त्यांच्याशी संभाषणही करणार नाही ना त्यांना पाक (स्वच्छ-शुद्ध) करील. त्याच्यासाठी मोठी सक्त शिक्षा-यातना आहे.

**१७५.** हेच ते लोक आहेत, ज्यांनी मार्गदर्शनाच्या मोबदल्यात मार्गभ्रष्टतेला आणि माफीच्या मोबदल्यात अज़ाब खरेदी केला. हे लोक आगीचा अज़ाब किती सहन करणारे आहेत.

**१७६.** या शिक्षा-यातनांचे कारण हेच आहे की सर्वश्रेष्ठ अल्लाहने सच्चा (सत्यांवर आधारीत) ग्रंथ उतरविला आणि या ग्रंथाच्या संदर्भात मतभेद राखणारे निश्चितच दूरच्या विरोधात पडले.

**१७७.** समस्त नेकी (सत्कर्म) केवळ पूर्व आणि पश्चिमेकडे तोंड करण्यातच नाही, किंबहुना वास्तविक भला माणूस तो आहे जो अल्लाहवर, कयामतच्या दिवसावर, फरिश्त्यांवर, अल्लाहच्या ग्रंथावर आणि पैगंबरावर ईमान राखणारा आहे. धन संपत्तीचा मोह असतानाही जो आपले धन नातेवाईकांवर, अनाथांवर, गोर गरीबांवर, प्रवाशांवर आणि याचकांवर खर्च करतो. बंदी झाले त्यांना मुक्त करतो. नमाज नियमितपणे पढतो आणि जकात (धर्म दान) अदा करतो. जेव्हा वायदा करतो तर त्याला पूर्ण करतो. धन संपत्तीची तंगी-अडचण, दुःख-यातना आणि लढाईच्या प्रसंगी धीर-संयम राखतो. हेच लोक सच्चे आहेत आणि हेच परहेजगार (अल्लाहचे भय राखून दुराचारापासून अलिप्त राहणारे) आहेत.

**१७८.** हे ईमानधारकांनो! तुमच्यावर हत्या केल्या गेलेल्या माणसाचा (रक्ताचा) मोबदला घेणे अनिवार्य केले गेले आहे, स्वतंत्र माणसाच्या मोबदल्यात स्वतंत्र माणूस, गुलामाच्या मोबदल्यात गुलाम, स्त्रीच्या बदल्यात स्त्री, मात्र जर एखाद्याला, त्याच्या भावा तर्फे माफ केले जाईल, त्याने भलेपणाचा आदर राखला पाहिजे आणि सहजपणे फिदिया (एखाद्याच्या खुनाची नुकसानभरपाई म्हणून दिले जाणारे धन) अदा केले पाहिजे. तुमच्या पालनकर्त्यातर्फे ही सूट (सवलत) आहे. आणि रहमत (दया-कृपा) आहे. त्यानंतरही जो मर्यादेचे उल्लंघन करील, तर त्याला अतिशय सक्त शिक्षा- यातनेला तोंड द्यावे लागेल.

**१७९.** बुद्धिमानांनो! किसास (हत्यादंडा) मध्ये तुमच्याकरिता जीवन आहे. या

कारणाने तुम्ही (हत्या करण्यापासून) स्वतःला रोखाल.[१]

**१८०.** तुमच्यासाठी हे बंधनकारक केले गेले आहे की जेव्हा तुमच्यापैकी एखाद्याचे मरण जवळ येऊन ठेपेल आणि तो आपल्या मागे धन-संपत्ती सोडून जात असेल तर त्याने आपल्या माता-पित्यासाठी आणि नातेवाईकांसाठी भलेपणाने वसीयत (मृत्युपत्र) करून जावे. अल्लाहचे भय राखणाऱ्यांवर हे अनिवार्य कर्तव्य आहे.

**१८१.** आता जो मनुष्य त्याला ऐकून घेतल्यानंतर त्यात बदल करील तर त्याचा गुन्हा, बदल करणाऱ्यावरच राहील. निःसंशय, सर्वश्रेष्ठ अल्लाह सर्वकाही ऐकणारा व जाणणारा आहे.

**१८२.** तथापि ज्याला मृत्युपत्र करणाऱ्यातर्फे पक्षपात आणि अपराधाचे भय जाणवेल, त्याने जर त्यांच्या दरम्यान सुधार-समझोता घडवून आणला तर त्याच्यावर गुन्हा नाही. निःसंशय, अल्लाह माफ करणारा, मेहरबान आहे.

**१८३.** हे ईमानधारकांनो! तुमच्यावर रोजे (उपवास व्रत जे रमजानच्या महिन्यात राखले जाते) फर्ज (बन्धनकारक) केले गेलेत, ज्या प्रकारे तुमच्या पूर्वीच्या लोकांवर फर्ज केले गेले होते. यासाठी की तुम्ही तकवा (अल्लाहचे भय) चा मार्ग धरावा.[२]

**१८४.** काही मोजकेच दिवस आहेत, परंतु तुमच्यापैकी जर एखादा मनुष्य आजारी असेल किंवा प्रवासात असेल तर त्याने इतर दिवसात गणना पूर्ण करून घ्यावी आणि ज्याला या गोष्टीचे सामर्थ्य असेल त्याने फिदियाच्या स्वरूपात एका गरीबाला जेऊ घालावे, मग जो मनुष्य आपल्या आवडीने याहून जास्त नेकी करील तर ते त्याच्याचकरिता उत्तम आहे, परंतु तुमच्या हक्कात रोजे राखणे हेच अधिक चांगले कर्म

---

(१) जेव्हा हत्या करणाऱ्याला ही भीती असेल की हत्येच्या बदली त्यालाही ठार केले जाईल, तर तो कोणाचीही हत्या करण्याचे धाडस करणार नाही आणि ज्या समाजात हत्येच्या बदल्यात हा नियम लागू होतो, तिथे ही भीती समाजाला हत्या आणि रक्तपातापासून सुरक्षित राखते. ज्यामुळे समाजात खूप शांती सुबत्ता राहते. याचे अवलोकन सऊदी अरबच्या समाजात केले जाऊ शकते. जिथे इस्लामी कायद्याचे पालन केल्यामुळचे अल्लाहच्या कृपा देणग्यांनी युक्त असे सुख-शांतीचे वातावरण आहे.

(२) 'रोजा' याचा अर्थ, सूर्योदयापूर्वी रात्रीच्या अंधारानंतर जो सफेद प्रकाश वातावरणात असतो, त्या वेळेपासून सूर्यास्तापर्यंत, अल्लाहची प्रसन्नता प्राप्त करण्यासाठी खाणे-पिणे, पत्नीशी समागम करणे यापासून स्वतःला रोखणे. इस्लामचा हा उपासनाप्रकार आत्मशुद्धीकरिता फार आवश्यक आहे. आणि म्हणूनच हा तुमच्या पूर्वीच्या जनसमूहांवरही फर्ज (बंधनकारक) केला गेला होता.

आहे. जर तुम्ही जाणार असाल.

**१८५.** रमजान महिना तो आहे, ज्यात कुरआन उतरविला गेला, जो लोकांकरिता मार्गदर्शन आहे आणि जो मार्गदर्शक आणि सत्य व असत्याच्या दरम्यान निर्णायक आहे. तेव्हा तुमच्यापैकी जो कोणी या महिन्यास प्राप्त करील, त्याने रोजे राखले पाहिजेत, परंतु जो आजारी असेल, किंवा प्रवासात असेल तर त्याने इतर दिवसात ही संख्या पूर्ण करून घेतली पाहिजे. अल्लाह तुमच्याकरिता सहज-सुलभता इच्छितो, सक्ती-अडचण इच्छित नाही. तो इच्छितो की तुम्ही गणना पूर्ण करून घ्यावी आणि अल्लाहने प्रदान केलेल्या मार्गदर्शनानुसार त्याची महानता वर्णन करा आणि त्याचे कृतज्ञशील (दास) बनून राहा.

**१८६.** आणि जेव्हा माझे उपासक माझ्याविषयी तुम्हाला विचारतील, तेव्हा त्यांना सांगा की मी अगदी जवळ आहे. प्रत्येक प्रार्थना करणाऱ्याच्या प्रार्थनेला, जेव्हा जेव्हा तो मला पुकारतो, मी कबूल करतो. यास्तव लोकांनीही माझा हुकूम मानला पाहिजे आणि माझ्यावर ईमान राखले पाहिजे. हेच त्यांच्या भलाईचे कारण आहे.

**१८७.** रोजांच्या रात्रीत आपल्या पत्नीच्या जवळ जाण्याची तुम्हाला परवानगी आहे. त्या तुमच्या पोषाख आहेत आणि तुम्ही त्यांचे पोषाख आहात. तुम्ही लपून छपून केलेल्या खियानतीचे अल्लाहला ज्ञान आहे. त्याने तुमची तौबा (क्षमा-याचना) कबूल करून तुम्हाला माफ केले. आता तुम्हाला त्यांच्याशी समागम करण्याचा आणि अल्लाहने लिहून ठेवलेले प्राप्त करण्याचा आदेश आहे. तुम्ही खात-पीत राहा.येथेपर्यंत की प्रातःकाळच्या सफेदीचा धागा अंधाराच्या काळ्या धाग्यापासून वेगळा व्हावा, मग रात्र होईपर्यंत रोजा पूर्ण करा आणि आपल्या पत्नीशी अशा वेळी संभोग करू नका, जेव्हा तुम्ही मस्जिदींमध्ये एतिकाफ (एका ठराविक अवधीपर्यंत, अल्लाहची उपासना करण्याच्या हेतूने स्वतःला मस्जिदच्या हद्दीतच रोखणे) मध्ये असाल, या अल्लाहने घातलेल्या मर्यादा आहेत. तुम्ही त्यांच्या जवळही जाऊ नका. अशा प्रकारे अल्लाह आपल्या निशाण्या, लोकांना स्पष्ट करून सांगतो, यासाठी की त्यांनी अल्लाहचे भय राखून दुष्कर्मांपासून दूर राहावे.

**१८८.** आणि एकमेकांचे धन चुकीच्या रीतीने खाऊ नका, ना हक्कदार लोकांना लाचलुचपत पोहचवून एखाद्याची काही संपत्ती जुलूमाने हडप करा, जरी तुम्ही हे जाणत

असाल.[1]

**१८९.** लोक तुम्हाला नव्या चंद्राविषयी विचारतात. तुम्ही त्यांना सांगा की हे लोकांच्या उपासनेच्या वेळा आणि हजच्या अवधीकरिता आहे (एहरामच्या अवस्थेत) आणि घरांच्या मागच्या बाजूने तुमचे प्रवेश करणे काही नेकीचे काम नव्हे. किंबहुना नेक काम (सत्कर्म) तर ते आहे जे अल्लाहचे भय राखून केले जावे. घरांमध्ये त्यांच्या दरवाज्यामधून प्रवेश करीत जा, आणि अल्लाहचे भय बाळगून राहा. यासाठी की तुम्ही सफल व्हावे.

**१९०.** आणि लढा अल्लाहच्या मार्गात त्यांच्याशी, जे तुमच्याशी लढतात आणि अत्याचार करू नका.[2] निःसंशय, अल्लाह अत्याचारीला पसंत करीत नाही.

**१९१.** आणि त्यांना ठार करा जिथे जिथे ते आढळतील आणि त्यांना बाहेर काढा जिथून त्यांनी तुम्हाला बाहेर घालविले आहे. आणि (ऐका) फितना (भांडण-तंटा, फसाद) हत्या करण्यापेक्षाही वाईट आहे. आणि मस्जिदे हराम (काबा) च्या जवळ त्यांच्याशी लढाई करू नका, जोपर्यंत ते स्वतः तुमच्याशी न लढावेत. जर ते तुमच्याशी लढतील तर तुम्हीही त्यांना ठार करा, इन्कारी लोकांचा हाच मोबदला आहे.

**१९२.** मग जर ते (लढणे) थांबवतील, तर अल्लाह मोठा माफ करणारा, दया करणारा आहे.

**१९३.** आणि त्यांच्याशी तोपर्यंत लढा, जोपर्यंत फितना (फसाद, उपद्रव) पूर्णपणे मिटत नाही आणि अल्लाहचा दीन (धर्म) कायम राहात नाही, परंतु जर ते (लढणे) थांबवतील तर (मग तुम्हीही थांबा). जुलूम अत्याचार केवळ अत्याचारी लोकांवर आहे.

---

(१) हे अशा माणसाबद्दल सांगितले गेले आहे ज्याच्याजवळ एखाद्याची काही ठेव किंवा मिळकत असावी आणि मालकाजवळ कसलाही पुरावा नसावा की ज्या आधारे तो न्यायालयातर्फे आपल्या बाजूने निर्णय करेल. अशा प्रकारे दुसऱ्याचा हक्क मारणे, सरासर अत्याचार आणि हराम आहे. असा मनुष्य अल्लाहच्या न्यायालयात अपराधी ठरेल. (इब्ने कसीर)

(२) या आयतीत पहिल्यांदा त्या लोकांशी लढण्याचा आदेश दिला गेला आहे, जो नेहमी मुसलमानांना ठार मारण्याचा इरादा राखतात, तरीही अतिरेक करण्यापासून रोखले गेले आहे. याचा अर्थ असा की लढताना अतिरेकाची सीमा गाठू नका, अमानवीय अत्याचार करू नका. स्त्रिया, लहान मुले, वृद्ध वगैरे ज्यांचा लढाईत सहभाग नाही त्यांना ठार करू नका. झाडे, घरेदारे, मुकी जनावरे यांना मारून टाकणे किंवा जाळणे वगैरे आततायी गोष्टी आहेत. हा अतिरेक करण्यापासून दूर राहा. (इब्ने कसीर)

**१९४.** आदर-सन्मानवाल्या महिन्यांच्या मोबदल्यात आदर-सन्मानपूर्ण महिने आहेत, आणि आदर-सन्मानाच्या सर्व गोष्टींमध्ये बरोबरीचा विचार राखला पाहिजे. जो तुमच्यावर अत्याचार करील तर तुम्हीही त्याच्यावर तसाच जुलूम करा जसा तुमच्यावर केला गेला आहे आणि सर्वश्रेष्ठ अल्लाहचे भय बाळगत राहा आणि चांगले ध्यानात ठेवा की अल्लाह, दुराचारापासून दूर राहणाऱ्यांच्या सोबत आहे.

**१९५.** आणि अल्लाहच्या मार्गात खर्च करा आणि आपल्याच हातांनी स्वतःला हलाखीत टाकू नका. भलाई (नेकी) करीत राहा. निःसंशय अल्लाह भलाई करणाऱ्यांशी प्रेम राखतो.

**१९६.** आणि अल्लाहकरिता हज व उमरा पूर्ण करा जर मार्गात रोखले जाल तर जेदेखील कुर्बानीचे जनावर असेल, त्याची कुर्बानी करून टाका, आणि जोपर्यंत कुर्बानी, कुर्बानीच्या ठिकाणावर पोहचत नाही, तोपर्यंत आपल्या डोक्यावरील केस काढू नका. आणि तुमच्यापैकी जो आजारी असेल किंवा त्याच्या डोक्याला काही त्रास असेल ज्यामुळे तो डोक्यावरचे केस काढून घेईल तर त्यावर फिदिया (दंड) आहे की, वाटल्यास त्याने रोजा (व्रत) राखावा किंवा वाटल्यास सदका (दान) द्यावा, किंवा कुर्बानी करावी. परंतु शांतीपूर्ण अवस्था लाभताच जो उमरासह हज करण्याचा लाभ घेऊ इच्छिल तर त्याने, जीदेखील कुर्बानी हजर असेल, ती करून टाकावी. ज्याला हे सामर्थ्य नसेल, त्याने तीन रोजे हजच्या दिवसात राखावे आणि सात रोजे हज हून परतताना राखावेत, हे पूर्ण दहा झाले. हा आदेश त्यांच्यासाठी आहे, जे मस्जिदे हराम (मक्का) चे रहिवाशी नसावेत. (लोकांनो!) अल्लाहचे भय बाळगून राहा आणि जाणून असा की सर्वश्रेष्ठ अल्लाह फार कठोर शिक्षा-यातना देणारा आहे.

**१९७.** हजचे महिने निर्धारीत आहेत. यास्तव जो या ठराविक दिवसात हजचा पक्का इरादा करील तर त्याने आपल्या पत्नीशी संभोग करण्यापासून, अपराध करण्यापासून आणि भांडण-तंटा करण्यापासून दूर राहावे. तुम्ही जे सवाब (पुण्य) चे काम कराल, ते सर्वश्रेष्ठ अल्लाह जाणणारा आहे, आणि आपल्यासोबत प्रवासखर्च (साधन-सामग्री) अवश्य घ्या. सर्वांत उत्तम असा प्रवासखर्च तर अल्लाहचे भय आहे. आणि हे बुद्धिमानानो! माझे भय बाळगत राहा.

**१९८.** आपल्या पालनकर्त्याची कृपा शोधण्यात तुमच्यावर कसलाही गुन्हा नाही. जेव्हा

तुम्ही अरफात (या ठिकाणापासून) परत व्हाल, तेव्हा मशअरे हराम (मुज्दलिफा) जवळ अल्लाहचे स्मरण करा आणि अशा प्रकारे स्मरण करा, जसे त्याने तुम्हाला शिकविले आहे. वास्तविक यापूर्वी तुम्ही मार्गभ्रष्ट लोकांमध्ये होता.

**१९९.** मग तुम्ही त्या स्थानापासून परत फिरा, ज्या स्थानापासून सर्व लोक परत फिरतात आणि अल्लाहजवळ माफी मागत राहा. निःसंशय, अल्लाह मोठा माफ करणारा, दया करणारा आहे.

**२००.** मग जेव्हा तुम्ही हजचे प्रत्येक काम (विधी) पूर्ण करून घ्याल, तेव्हा अल्लाहचे स्मरण करा ज्याप्रकारे तुम्ही आपल्या थोर-बुजूर्ग लोकांचे स्मरण करीत होते, किंबहुना त्याहून जास्त. काही लोक तर असेही आहेत, जे म्हणतात, ''हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला या जगात देऊन टाक'' अशा लोकांचा आखिरतमध्ये काहीच हिस्सा नाही.

**२०१.** आणि काही लोक असेही आहेत, जे म्हणतात, ''हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला या जगातही भलाई प्रदान कर आणि आखिरतमध्येही भलाई प्रदान कर आणि आम्हाला जहन्नमच्या अज़ाबपासून वाचव.''

**२०२.** हे लोक असे आहेत, ज्यांच्यासाठी त्यांच्या कर्मांचा हिस्सा (चांगला मोबदला) आहे आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह लवकरच हिशोब घेणारा आहे.

**२०३.** आणि त्या काही ठराविक दिवसांमध्ये ('तशरीक'च्या दिवसांत) अल्लाहचे स्मरण करा.[१] दोन दिवसांतच घाई करणाऱ्यांवर काही गुन्हा नाही, आणि जो मागे राहील त्याच्यावरही काही गुन्हा नाही. हे अल्लाहचे भय राखणाऱ्यांकरिता आहे आणि अल्लाहचे भय बाळगत राहा आणि लक्षात ठेवा की तुम्ही सर्व त्याच्याचकडे एकत्र (जमा) केले जाल.

**२०४.** आणि काही लोकांच्या सांसारिक जीवनाच्या गोष्टी तुम्हाला आनंदित करतात

---

(१) 'तशरीकचे दिवस' म्हणजे जिलहिज्जा महिन्याची ११, १२ आणि १३ तारीख. या दिवसांत अल्लाहचे स्मरण करण्याशी अभिप्रेत उंच स्वरात, पैगंबर (स.) यांच्या आचरण शैलीनुसार ठराविक तकबीर म्हणणे. फक्त फर्ज नमाजनंतर नव्हे (जसे एका अस्पष्ट हदीसद्वारे प्रसिद्ध आहे), किंबहुना प्रत्येक क्षणी ही तकबीर पढली जावी (अल्लाहु अकबर अल्लाहु अकबर ला इलाहा इल्लल्लाह, वल्लाहु अकबर, अल्लाहु अकबर व लिल्लाहिल हम्द). जमरातला खडे (कंकरी) मारताना प्रत्येक कंकरीसह तकबीर पढणे, पैगंबर (स.) यांच्या आचरण शैलीनुसार आहे.

आणि तो आपल्या मनातल्या गोष्टींवर अल्लाहला साक्षी ठरवितो, वास्तविक तो मोठा भांडखोर आहे.

**२०५.** आणि जेव्हा तो परतून जातो, तेव्हा धरतीवर दंगा-धोपा, रक्तपात पसरविण्याचा, शेती-वाडी आणि वंशाचा विनाश करण्याचा प्रयत्न करीत राहतो. आणि अल्लाह उत्पात-उपद्रवाला पसंत करीत नाही.

**२०६.** आणि जेव्हा त्याला सांगितले जाते की अल्लाहचे भय राख, तेव्हा त्याची घमेंड त्याला अपराध करण्यास प्रवृत्त करते. अशा माणसाकरिता फक्त जहन्नमच आहे आणि निःसंशय ते अतिशय वाईट ठिकाण आहे.

**२०७.** आणि काही लोक असेही आहेत, जे अल्लाहची मर्जी प्राप्त करण्यासाठी आपला प्राणदेखील विकून टाकतात आणि अल्लाह, आपल्या दासांवर मोठा स्नेह- प्रेम राखणारा आहे.

**२०८.** हे ईमान राखणाऱ्यांनो! इस्लाममध्ये पूर्णपणे दाखल व्हा आणि सैतानाच्या पावलांवर पाऊल ठेवून चालू नका. तो तुमचा उघड शत्रू आहे.

**२०९.** जर तुम्ही निशाण्या येऊन पोहोचल्यानंतरही घसरून जाल तर लक्षात ठेवा, अल्लाह मोठा जबरदस्त आणि हिकमत राखणारा आहे.

**२१०.** काय लोकांना या गोष्टीची प्रतिक्षा आहे की अल्लाह स्वतः घनदाट ढगांमध्ये प्रकट व्हावा आणि फरिश्तेदेखील आणि मग काम तमाम केले जावे! अल्लाहकडेच सर्व कामे रुजू केली जातात.

**२११.** इस्राईलच्या संततीला विचारा की आम्ही त्यांना किती स्पष्ट निशाण्या प्रदान केल्या, आणि जो, अल्लाहची कृपा- देणगी प्राप्त झाल्यानंतर तिला बदलून टाकील तर (त्याने ध्यानी घ्यावे) की अल्लाह कठोर शिक्षा देणारा आहे.

**२१२.** काफिरां (इन्कार करणाऱ्यां) साठी या जगाचे जीवन सुशोभित केले गेले आहे आणि ते ईमानधारकांची थट्टा उटवितात, तथापि जे अल्लाहचे भय राखून दुराचारापासून दूर राहणारे आहे, कयामतच्या दिवशी (दर्जामध्ये) त्याच्यापेक्षा फार मोठे असतील. अल्लाह ज्याला इच्छितो अगणित प्रदान करतो.

**२१३.** वास्तविक, सुरुवातीच्या काळात सर्व लोक एकाच जनसमूहाचे (दीन-धर्माचे) होते. मग अल्लाहने पैगंबरांना शुभ समाचार देण्यासाठी आणि सचेत करण्यासाठी पाठविले आणि त्यांच्यासोबत ग्रंथ अवतरित केले, यासाठी की लोकांच्या दरम्यान असलेल्या प्रत्येक मतभेदाचा फैसला व्हावा, आणि केवळ त्याच लोकांनी, जे त्यांना दिले गेले होते, आपल्याजवळ प्रमाण येऊन पोहचल्यानंतरही आपल्या द्वेष आणि घमेंडीमुळे त्यात मतभेद केला. याकरिता अल्लाहने ईमानधारकांच्या या मतभेदातही सत्याकडे आपल्या आज्ञेने मार्गदर्शन केले आणि अल्लाह ज्याला इच्छितो सरळ मार्गाकडे मार्गदर्शन करतो.

**२१४.** काय तुम्ही अशी कल्पना करून बसलात की जन्नतमध्ये अगदी सहजपणे प्रवेश कराल? वास्तविक अजून तुमच्यावर ती अवस्था नाही आली, जी तुमच्या पूर्वीच्या लोकांवर आली होती. त्यांना सक्त गरीबी व रोगराईचा सामना करावा लागला. त्यांना इतके झिंजोडले गेले की रसूल (पैगंबर) आणि त्यांच्या सोबतचे ईमानधारक लोक म्हणून लागले की अल्लाहची मदत केव्हा येईल ? ऐका अल्लाहची मदत जवळच आहे!

**२१५.** तुम्हाला ते विचारतात की त्यांनी कशावर खर्च करावा? तुम्ही त्यांना सांगा की तुम्ही जो काही माल (धन) खर्च कराल तो माता-पित्याकरिता, नातेवाईकांकरिता, अनाथ व गोरगरीबांकरिता आणि प्रवाशांकरिता आहे. आणि तुम्ही जी काही भलाई कराल, अल्लाह ती चांगल्या प्रकारे जाणतो.

**२१६.** तुमच्यावर जिहाद फर्ज (बंधनकारक कर्तव्य) केले गेले. जरी ते तुम्हाला अप्रिय वाटत असले तरीही, शक्य आहे की तुम्ही एखाद्या गोष्टीला वाईट जाणावे आणि खरे पाहता तोच तुमच्यासाठी भली असावी आणि हेही शक्य आहे की तुम्ही ज्या गोष्टीला चांगली समजावे ती तुमच्यासाठी वाईट असावी. खरे ज्ञान तर अल्लाहलाच आहे. तुम्ही मात्र अजाण आहात.

**२१७.** लोक तुम्हाला आदर-सन्मानाच्या महिन्यात लढाईविषयी विचारतात. तुम्ही सांगा, त्या महिन्यात लढाई करणे फार मोठे अपराध कर्म आहे. परंतु अल्लाहच्या मार्गात रोखणे, अल्लाहचा इन्कार करणे, मस्जिदे हरामपासून रोखणे आणि तिथल्या रहिवाशांना तिथून बाहेर घालविणे, अल्लाहजवळ त्यापेक्षाही मोठा गुन्हा आहे, आणि फितना (फितूर माजवणे) हत्या करण्यापेक्षाही मोठा गुन्हा आहे. हे लोक तुमच्याशी

लढाई करतच राहतील, येथपर्यंत की त्यांना शक्य झाल्यास तुम्हाला तुमच्या धर्मापासून फिरवतील आणि तुमच्यापैकी जे लोक आपल्या धर्मापासून परत फिरतील आणि त्याच कुफ्र (इन्कारी) अवस्थेत मरण पावतील तर त्यांची या जगाची व आखिरतची सर्व कर्मे वाया जातील. हे लोक जहन्नमी असतील आणि नेहमीकरिता जहन्नममध्येच राहतील.

**२१८.** परंतु ज्यांनी ईमान कबूल केले आणि स्थलांतर केले आणि अल्लाहच्या मार्गात जिहाद केले (धर्माच्या रक्षणासाठी अल्लाहच्या मार्गात लढले) तेच अल्लाहच्या दया-कृपेची आशा बाळगतात आणि अल्लाह मोठा माफ करणारा, दया करणारा आहे.

**२१९.** लोक तुम्हाला दारू आणि जुगाराविषयी विचारतात. तुम्ही सांगा, या दोन्ही गोष्टींत मोठा गुन्हा आहे. आणि लोकांना यांपासून या जगाचा लाभही होतो, परंतु त्यांचा गुन्हा त्यांच्या फायद्यापेक्षा अनेक पटींनी जास्त आहे, तुम्हाला हेही विचारतात की काय खर्च करावे. तुम्ही सांगा, गरजेपेक्षा जे जास्त असेल ते. अल्लाह अशा प्रकारे आपला आदेश स्पष्टपणे तुम्हाला सांगतो यासाठी की तुम्ही विचार-चिंतन करावे.

**२२०.** ऐहिक आणि मरणोत्तर जीवनाच्या आचरणाला, आणि तुम्हाला अनाथांविषयी विचारतात. त्यांना तुम्ही सांगा की त्यांची भलाई करणेच उत्तम आहे. जर तुम्ही आपले धन त्यांच्या धन-संपत्तीत मिसळून घ्याल तरी ते तुमचे बांधव आहेत. वाईट इरादा राखणारा आणि नेक इरादा राखणारा सर्वांनाच अल्लाह पूर्णपणे जाणतो आणि अल्लाहने इच्छिले असते तर तुम्हाला अडचणीत (कष्ट-यातनेत) टाकले असते. निःसंशय, सर्वश्रेष्ठ अल्लाह मोठा जबरदस्त आणि हिकमतशाली आहे.

**२२१.** आणि अनेकेश्वरवादी स्त्रियांशी तोपर्यंत विवाह करू नका, जोपर्यंत त्या ईमान स्वीकारत नाहीत. ईमानधारक दासी अनेकेश्वरवादी स्वतंत्र स्त्रीपेक्षा अधिक चांगली आहे. जरी तुम्हाला आनेकेश्वरवादी स्त्री कितीही चांगली वाटत असली तरीही, आणि ना अनेकेश्वरवादी पुरुषांना आपल्या (ईमानधारक) स्त्रियांशी विवाह करू द्या, जोपर्यंत ते ईमान स्वीकारीत नाही. ईमानधारक गुलाम (मुस्लिम दास) स्वतंत्र (गुलाम नसलेल्या) अनेकेश्वरवादी पुरुषापेक्षा अधिक चांगला आहे, जरी तुम्हाला अनेकेश्वरवादी खूप चांगला वाटत असला तरीही. हे लोक जहन्नमकडे बोलवितात, आणि अल्लाह जन्नतकडे आणि माफीकडे आपल्या हुकूमाने बोलवितो. तो आपल्या निशाण्या लोकांकरिता स्पष्टपणे सांगतो, यासाठी की त्यांनी बोध (उपदेश) प्राप्त करावा.

**२२२.** आणि तुम्हाला मासिक पाळीविषयी विचारतात, सांगा ती घाणेरडी अवस्था आहे. मासिक पाळीच्या वेळी स्त्रियांपासून अलग राहा आणि जोपर्यंत त्या पाक (स्वच्छ-शुद्ध) होत नाहीत त्यांच्या जवळ जाऊ नका, मात्र जेव्हा त्या पाक होतील, तेव्हा त्यांच्या जवळ जा, जशी अल्लाहने तुम्हाला अनुमती दिली आहे. निःसंशय, अल्लाह माफी मागणाऱ्याला आणि स्वच्छ-शुद्ध (पाक) राहणाऱ्याला पसंत करतो.

**२२३.** तुमच्या पत्न्या तुमची शेते आहेत. आपल्या शेतांमध्ये वाटेल त्या प्रकारे या आणि स्वतःकरिता (पुण्य) पुढे पाठवा आणि सर्वश्रेष्ठ अल्लाहचे भय बाळगत राहा आणि लक्षात असू द्या की अल्लाहशी तुमची भेट होणारच आहे आणि ईमानधारकांना खूशखबर ऐकवा.

**२२४.** आणि सर्वश्रेष्ठ अल्लाहला आपल्या शपथांसाठी (अशा प्रकारे) निशाना बनवू नका की भलाई आणि दुराचारापासून अलिप्तता आणि लोकांच्या दरम्यान सुधारणा करणे सोडून बसावे.[१] आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह सर्व काही ऐकणारा, जाणणारा आहे.

**२२५.** सर्वश्रेष्ठ अल्लाह तुम्हाला तुमच्या त्या शपथांबाबत धरणार नाही, ज्या पक्क्या (मजबूत) नसतील, मात्र तुमची पकड त्या गोष्टीबाबत आहे, जी तुम्ही मनापासून केली आहे, आणि अल्लाह माफ करणारा मोठा सहनशील आहे.

**२२६.** जे लोक आपल्या पत्नीजवळ न जाण्याची शपथ घेतील तर त्यांच्यासाठी चार महिन्यांची मुदत आहे. मग जर ते आपली शपथ मागे घेतील, तर अल्लाह मोठा माफ करणारा, दया करणारा आहे.

**२२७.** आणि जर तलाक देण्याचाच इरादा करून घ्याल तर सर्वश्रेष्ठ अल्लाह सर्व काही ऐकणारा, जाणणारा आहे.

**२२८.** ज्यांना तलाक दिला गेला त्या (घटस्फोटित) स्त्रियांनी स्वतःला तीन मासिक

---

(१) अर्थात रागाच्या भरात अशी शपथ घेऊ नका की मी अमुक एका माणसाशी भलाईचा व्यवहार करणार नाही, अमुक एका माणसाशी बोलणारा नाही, अमक्या माणसांच्या दरम्यान समझोता घडवून आणणार नाही. अशा प्रकारच्या शपथांबाबत हदीसमध्ये उल्लेखित आहे की अशा शपथा जरी घेतल्या गेल्या तरी त्या तोडून टाका आणि मग शपथांचे प्रायश्चित (कफ्फारा) (शपथ घेतल्यानंतर ती तोडल्याबद्दलची शिक्षा) अदा करा (शपथेच्या प्रायश्चित्ताकरिता पाहा सूरह अल मायदा - आ.क्र. ८९)

पाळी येईपापर्यंत रोखून ठेवावे. त्यांच्याकरिता हे उचित नव्हे की अल्लाहने त्याच्या उदरात जे निर्माण केले असेल, त्याला लपवावे, जर त्यांचे अल्लाहवर आणि कयामतच्या दिवसावर ईमान असेल. त्यांच्या पतीला या मुदतीत, त्यांना परत येण्याचा पूर्ण हक्क आहे, जर त्यांचा इरादा सुधारणा करण्याचा असेल. स्त्रियांचेही तसेच हक्क आहेत, जसे त्यांच्यावर पुरुषांचे भलाईसह आहेत. मात्र पुरुषांना स्त्रियांवर श्रेष्ठता प्राप्त आहे आणि अल्लाह जबरदस्त हिकमत राखणारा आहे.

**२२९.** या प्रकारची तलाक दोन वेळा आहे. मग एकतर भलेपणाने रोखावे किंवा उचित रीतीने सोडून द्यावे आणि तुमच्यासाठी हे योग्य नव्हे की तुम्ही त्यांना जे काही दिले आहे, त्यातून काही परत घ्यावे. मात्र ही गोष्ट वेगळी की दोघांना अल्लाहच्या मर्यादा कायम न राखल्या जाण्याचे भय असेल, यास्तव जर तुम्हाला भय असेल की हे दोघे अल्लाहच्या मर्यादा कायम राखू शकणार नाहीत, तर स्त्रीने सुटका प्राप्त करून घेण्यासाठी काही देऊन टाकावे. यात दोघांवर कसलाही गुन्हा नाही. या अल्लाहने बांधलेल्या सीमा आहेत. सावधान! यांचे उल्लंघन करू नका आणि जे लोक अल्लाहच्या सीमा ओलांडतील, ते अत्याचारी आहेत.

**२३०.** मग जर तिला (तिसऱ्या खेपेस) तलाक दिली गेली तर आता ती स्त्री त्याच्याकरिता हलाल नाही, जोपर्यंत ती स्त्री त्याच्याशिवाय दुसऱ्या कोणाशी विवाह करून न घेईल. मग जर तोही तलाक देऊन टाकील तर त्या दोघांवर पुन्हा एकत्र येण्यात काही गुन्हा नाही, मात्र त्यांनी हे जाणून घ्यावे की अल्लाहच्या (निर्धारीत) सीमा कायम राखतील. या अल्लाहच्या मर्यादा आहेत, ज्यांना तो जाणणाऱ्यांकरिता सांगत आहे.

**२३१.** आणि जेव्हा तुम्ही स्त्रियांना तलाक द्याल आणि त्या आपली इद्दत (तीन मासिक पाळीपर्यंतचा अवधी) संपविण्याच्या बेतात असतील तर आता त्यांना चांगल्या प्रकारे राखा (नांदवा) किंवा भलेपणाने अलग करा आणि त्यांना हानी पोहचविण्याच्या हेतूने, अत्याचार व अतिरके करण्यासाठी रोखू नका. जो मनुष्य असे करील तर त्याने आपल्या जीवावर जुलूम केला. तुम्ही अल्लाहच्या आदेशाला थट्टा-खेळ बनवू नका आणि अल्लाहची जी कृपा-देणगी (नेमत) तुमच्यावर आहे तिची आठवण करा आणि जे काही ग्रंथ आणि हिकमत त्याने अवतरित केली आहे, ज्याद्वारे तुम्हाला शिकवण देत आहे तिलादेखील, आणि अल्लाहचे भय बाळगून असा आणि लक्षात ठेवा की अल्लाह

प्रत्येक गोष्ट चांगल्या प्रकारे जाणतो.

**२३२.** आणि जेव्हा तुम्ही आपल्या स्त्रियांना तलाक द्याल आणि त्या आपली इद्दत पूर्ण करून घेतील, तर त्यांना त्यांच्या पतींशी विवाह करण्यापासून रोखू नका, जेव्हा ते आपसात भलेपणाने राजीखुशी असती. ही शिकवण त्यांना दिली जाते, तुमच्यापैकी ज्यांचा अल्लाहवर आणि कयामतच्या दिवसावर विश्वास आणि ईमान असेल. यात तुमच्यासाठी चांगली शुद्धता- पवित्रता आहे आणि अल्लाह जाणतो, तुम्ही नाही जाणत.

**२३३.** आणि मातांनी आपल्या बाळांना पूर्ण दोन वर्षांपर्यंत दूध पाजावे ज्यांचा इरादा दूध पाजण्याच्या पूर्ण मुदतीचा असेल आणि ज्यांची ती संतती आहे त्यांची ही जबाबदारी आहे की त्यांना अन्न-वस्त्र द्यावे. जे भलेपणाने असावे, प्रत्येक माणसाला एवढीच कष्ट-यातना दिली जाते जेवढी त्याच्या अंगी शक्ती असेल. मातेला तिच्या संततीच्या कारणाने किंवा पित्याला त्याच्या मुलाबाळांच्या कारणाने कसलाही त्रास किंवा हानी पोहचिवली जाऊ नये, वारसावरदेखील तशी जबाबदारी आहे, मग जर दोघे (पित-पत्नी) आपल्या होकार आणि एकमेकांच्या इराद्याने दूध सोडवू इच्छित असतील तर दोघांवर काही गुन्हा नाही आणि जर तुम्ही आपल्या बालकांना दूध पाजू इच्छित असाल तरीही तुमच्यावर काही गुन्हा नाही. जेव्हा तुम्ही त्यांना जग रहाटीनुसार त्यांना (जे काही ठरले ते) देऊन टाका. सर्वश्रेष्ठ अल्लाहचे भय बाळगत राहा आणि जाणून असा की अल्लाह तुमचे प्रत्येक कर्म पाहत आहे.

**२३४.** तुमच्यापैकी जे लोक मरण पावतील आणि आपल्या मागे पत्न्या सोडून जातील, तर त्या स्त्रियांनी स्वतःला चार महिने व दहा दिवसांच्या इद्दतमध्ये राखावे. मग जेव्हा त्या, ही मुदत संपवतील तर जे काही भलेपणाने स्वतःसाठी कराल त्यात तुमच्यावर कसलाही गुन्हा नाही आणि अल्लाह तुमच्या एक एक कर्माला जाणणारा आहे.

**२३५.** आणि तुमच्यावर या बाबतीतही काही गुन्हा नाही की तुम्ही इशाऱ्याने किंवा नकळतरित्या त्या स्त्रियांशी विवाहाबाबत बोलावे किंवा आपल्या मनात इरादा लपवावा. अल्लाहला चांगले माहिती आहे की तुम्ही अवश्य त्यांची आठवण कराल. परंतु तुम्ही लपून छपून त्यांच्याशी वायदा करू नका, मात्र ही गोष्ट वेगळी की तुम्ही भलेपणाची एखादी गोष्ट बोलावी आणि जोपर्यंत इद्दतची मुदत पूर्ण होत नाही, विवाहाचे बंधन मजबूत करू नका. लक्षात ठेवा, अल्लाहला तुमच्या मनातल्या गोष्टींचेही ज्ञान आहे.

तुम्ही त्याचे भय बाळगत राहा आणि हेही लक्षात ठेवा की अल्लाह मोठा माफ करणारा आणि सहन करणारा आहे.

**२३६.** जर तुम्ही स्त्रियांना हात न लावता आणि महर निर्धारीत न करता तलाक द्याल तर अशाही स्थितीत तुमच्यावर काही गुन्हा नाही, मात्र त्यांना काही न काही फायदा पोहचवा. धनवानाने आपल्या हिशोबाने आणि गरीबाने आपल्या ताकदीच्या हिशोबाने नियमानुसार चांगला फायदा द्यावा. भलाई करणाऱ्यांकरिता हे आवश्यक आहे.

**२३७.** आणि जर तुम्ही स्त्रियांना यापूर्वी तलाक द्याल की तुम्ही त्यांना हात लावला असेल आणि तुम्ही त्यांचा महरही निश्चित केला असेल तर मग ठरलेल्या महरची निम्मी रक्कम (महर) द्या, आता तिने स्वतःच माफ केले तर गोष्ट वेगळी किंवा त्या माणसाने माफ करावे ज्याच्या हाती निकाहचे बंधन आहे. तुमचे हे माफ करणे तकवा (अल्लाहचे भय राखण्या) शी अगदी जवळचे आहे. आणि एकमेकांच्या प्रतिष्ठेला विसरू नका. निःसंशय, अल्लाह तुमच्या प्रत्येक कर्माला पाहत आहे.

**२३८.** नमाजांचे रक्षण करा, विशेषतः मधल्या नमाजची आणि अल्लाहकरिता नम्रतापूर्वक उभे राहात जा.

**२३९.** जर तुम्हाला एखादे भय असेल तर पायी चालत किंवा वाहनावर बसून आणि जर शांतीपूर्ण स्थिती झाल्यास अल्लाहचा महिमा वर्णन करा, ज्या प्रकारे त्याने तुम्हाला या गोष्टीची शिकवण दिली आहे, जी तुम्ही जाणत नव्हते.

**२४०.** आणि तुमच्यापैकी जे मरण पावतील आणि मागे पत्न्या सोडून जातील त्यांनी वसीयत (मृत्युपत्र) करून जावे की त्यांच्या पत्नींनी एक वर्षापर्यंत गुजराण करण्याचा लाभ घ्यावा. त्यांना कोणी घराबाहेर घालवू नये, परंतु जर त्या स्वतः निघून जातील तर तुमच्यावर यात काही गुन्हा नाही, जे ती स्वतःसाठी भलेपणाने करील. अल्लाह तर मोठा जबरदस्त, हिकमतशाली आहे.

**२४१.** आणि तलाक दिल्या गेलेल्या स्त्रियांना चांगल्या प्रकारे फायदा पोहचविणे अल्लाहचे भय राखणाऱ्यांकरिता आवश्यक आहे.

**२४२.** अशा प्रकारे अल्लाह तुमच्यासाठी आपल्या आयती स्पष्टपणे सांगतो, यासाठी की तुम्ही अकलेचा वापर करावा.

**२४३.** काय तुम्ही त्यांना नाही पाहिले, जे हजारोंच्या संख्येने मृत्युच्या भयामुळे आपल्या घरांमधून बाहेर पडले. अल्लाहने त्यांना फर्माविले की मरा, आणि नंतर त्यांना जिवंत केले. निःसंशय, अल्लाह लोकांवर मोठा कृपा करणारा आहे, परंतु अधिकांश लोक आभार मानत नाहीत.

**२४४.** आणि अल्लाहच्या मार्गात लढा आणि हे जाणून घ्या की अल्लाह सर्व काही ऐकणारा, जाणणारा आहे.

**२४५.** असा कोण आहे, जो अल्लाहला चांगले कर्ज देईल? ज्यास अल्लाहने अनेक पटींनी जास्त करून प्रदान करावे आणि अल्लाहच कमी-अधिक करतो आणि तुम्ही त्याच्याचकडे दुसऱ्यांदा जाल.

**२४६.** काय तुम्ही मूसानंतरच्या इस्राईली वंशाच्या जमातीस नाही पाहिले, जेव्हा त्यांनी आपल्या पैगंबरास म्हटले की आमच्यावर एखाद्याला बादशहा नेमून द्या, यासाठी की आम्ही अल्लाहच्या मार्गात लढावे. पैगंबर म्हणाले, संभवतः जिहाद फर्ज (अनिवार्य) झाल्यानंतर तुम्ही जिहाद करण्यास इन्कार कराल. लोक म्हणाले, आम्ही अल्लाहच्या मार्गात का नाही लढणार? आम्हाला तर आपल्या घरादारांपासून आणि मुलाबाळांपासून दूर केले गेले आहे. मग जेव्हा त्यांच्यावर जिहाद फर्ज (अनिवार्य) केला गेला तेव्हा काही थोड्या लोकांखेरीज इतर सर्व मुकरले, आणि अल्लाह अत्याचारी लोकांना खूप चांगले जाणतो.

**२४७.** आणि त्यांना त्यांचे पैगंबर म्हणाले, अल्लाहने तालूत (नावाच्या व्यक्ती) ला, तुमचा बादशहा बनविले आहे. तेव्हा ते म्हणू लागले, त्याची राज्य-सत्ता आमच्यावर कशी बरे असू शकते. त्याच्यापेक्षा खूप जास्त राज्य-सत्तेचे हक्कदार तर आम्ही आहोत. त्याला तर विपुल धनही प्रदान केले गेले नाही. पैगंबर म्हणाले, ऐका! सर्वश्रेष्ठ अल्लाहने त्याला तुमच्यावर प्राधान्य दिले आहे आणि त्याला ज्ञान व शारीरिक शक्तीही जास्त प्रदान केली आहे. खरी गोष्ट अशी की अल्लाह ज्याला इच्छितो आपला मुलूख प्रदान करतो. अल्लाह मोठी व्यापकता आणि ज्ञान राखणारा आहे.

**२४८.** त्यांचे पैगंबर पुन्हा त्यांना म्हणाले, त्याच्या मुलूखाची स्पष्ट निशाणी ही आहे की तुमच्याजवळ ती पेटी परत येईल, जिच्या तुमच्या पालनकर्त्यातर्फे मनाच्या शांतीची सामग्री आहे आणि मूसाच्या संततीने व हारूनच्या संततीने आपल्या मागे सोडलेले

सामान आहे. फिरश्ते ती पेटी उचलून आणतील. निःसंदेह, ही तर तुमच्यासाठी स्पष्ट निशाणी आहे, जर तुम्ही ईमान बाळगत असाल.

**२४९.** मग जेव्हा तालूत सैन्य घेऊन निघाले तेव्हा म्हणाले, ऐका, एका नदीच्याद्वारे अल्लाहला तुमची कसोटी घ्यायची आहे, तेव्हा जो कोणी त्या नदीतून पाणी पील तो माझा नव्हे आणि जो तिच्यातून पिणार नाही तो माझा आहे. आता ही गोष्ट वेगळी की जो आपल्या हाताने एक ओंजळभर घेईल ( तर हरकत नाही) तथापि काहींच्या खेरीज इतर सर्वांनी पाणी पिऊन घेतले. (हजरत) तालूत जेव्हा नदीला पार करून गेले आणि जे त्यांच्यासोबत ईमानधारक होते, तर ते म्हणाले की आज तर आमच्यात एवढे बळ नाही की जालूत आणि त्याच्या फौजांशी लढावे. परंतु ज्यांना अल्लाहच्या भेटीबाबत पूर्ण विश्वास होता ते म्हणाले, अनेकदा लहानसहान जमात, अल्लाहच्या हुकूमाने भारी भरकम (मोठ्या) जमातीवर विजय प्राप्त करते आणि अल्लाह सबुरी (धीर-संयम) राखणाऱ्यांच्या सोबत आहे.

**२५०.** आणि जेव्हा त्यांचा जालूत आणि त्याच्या सैन्यांशी मुकाबला झाला तेव्हा त्यांनी दुआ (प्रार्थना) केली, ''हे आमच्या पालनहार (अल्लाह)! आम्हाला धीर-संयम प्रदान कर आणि आमचे पाय स्थिर राख आणि इन्कारी जनसमूहाच्या विरोधात आमची मदत कर.''

**२५१.** यास्तव, अल्लाहच्या हुकूमाने त्यांनी शत्रूला पराभूत केले आणि दाऊदने जालूतला ठार मारले आणि अल्लाहने त्याला राज्य आणि हिकमत तसेच जेवढे इच्छिले ज्ञानही प्रदान केले आणि जर अल्लाह, काही लोकांना इतर समूहाद्वारे हटवित राहिला नसता तर धरतीवर फसाद पसरला असता, परंतु अल्लाह या जगातील लोकांवर फार कृपा करणारा आहे.

**२५२.** या अल्लाहच्या आयती आहेत, ज्या आम्ही तुम्हाला सत्याच्या आधारे वाचवून ऐकवित आहोत आणि निश्चितच तुम्ही पैगंबरांपैकी आहात.[१]

(१) या भूतकालीन घटना, ज्यांचे ज्ञान, पैगंबर मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्यावर अवतरित पवित्र कुरआनाच्या माध्यमाने साऱ्या जगाला होत आहे. हे मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) निःसंशय, तुमच्या प्रेषित्वाचा आणि सत्यतेचा पुरावआ आहे, या घटनांचे वर्णन ना एखाद्या ग्रंथात केले गेले आहे, ना कर्णापकर्णा ऐकिवात आहे, ज्यावरून हे सिद्ध होते की या अपरोक्षाच्या (गैबच्या) खबरी आहेत, ज्या वहयी अर्थात ईशवाणीद्वारे, अल्लाह पैगंबरावर उतरवित आहे.

**२५३.** हे सर्व रसूल (पैगंबर) आहेत, ज्यांच्यापैकी आम्ही काहींना, काहींवर श्रेष्ठता प्रदान केली आहे. त्यांच्यापैकी काहींशी सर्वश्रेष्ठ अल्लाहने संभाषण केले आहे, आणि काहींचा दर्जा उंचाविला आहे आणि आम्ही मरियमचे पुत्र ईसा यांना चमत्कार (मोजिजा) प्रदान केला आणि पवित्र आत्म्याद्वारे त्यांना समर्थन दिले[1] अल्लाहने इच्छिले असते तर त्यांच्यानंतर आलेले लोक, स्पष्ट निशाण्या येऊन पोहोचल्यावरही आपसात लढले नसते. परंतु त्या लोकांनी मतभेद केला. त्यांच्यापैकी काहींनी ईमान राखले आणि काही काफिर (इन्कारी) झाले आणि अल्लाहने इच्छिले असते तर हे आपसात लढले नसते, परंतु अल्लाह जे काही इच्छितो ते करतो.

**२५४.** हे ईमान राखणाऱ्यांनो! जी काही रोजी आम्ही तुम्हाला दिली आहे, त्यातून खर्च करीत राहा, यापूर्वी की तो दिवस यावा, ज्या दिवशी ना सौदेबाजी, ना दोस्ती आणि ना शिफारस काहीही उपयोगी पडणार नाही आणि सत्याचा इन्कार करणारे लोकच अत्याचारी आहेत.

**२५५.** अल्लाहच सच्चा माबूद (उपासना करण्यायोग्य) आहे, ज्याच्याशिवाय दुसरा कोणीही माबूद नाही, जो जिवंत आहे आणि नेहमी कायम राहणारा आहे, ज्याला ना डुलकी (गुंगी) येते ना झोप. त्याच्या स्वामीत्वात जमीन व आकाशाच्या समस्त चीज वस्तू आहेत. असा कोण आहे, जो त्याच्या आदेशाविना, त्याच्यासमोर शिफारस करू शकेल. तो जाणतो जे काही निर्मितीच्या समोर आहे व जे काही त्यांच्या मागे आहे आणि ते त्याच्या ज्ञानापैकी कोणत्याही गोष्टीला आपल्या अधिकारकक्षेत घेऊ शकत नाही, परंतु जेवढे तो इच्छिल[2] त्याच्या सत्ताकेंद्रा (कुर्सी) च्या व्यापकतेने समस्त जमीन व आकाशाला आपल्या अधिकारकक्षेत राखले आहे. या सर्वांचे रक्षण करण्यात तो थकतही नाही, आणि कंटाळतही नाही. तो मोठा आलीशान व मोठा महिमावान आहे.

---

(१) 'मोजिजा' म्हणजे अल्लाहने केलेले चमत्कार जे हजरत ईसा यांना प्रदान केले गेले होते. उदा. मृताला जिवंत करणे वगैरे. ज्याचे स्पष्टीकरण सूरह आले इमरानमध्ये येईल. 'पवित्र आत्म्या'शी अभिप्रेत जिब्रील होय, जसे की पूर्वीही उल्लेख आला आहे.

(२) ही 'आयतुल कुर्सी' होय. सहीह हदीस वचनामध्ये याचे मोठे महत्त्व सांगितले गेले आहे. उदा. ही कुरआनातील सर्वांत महान आयत आहे. रात्री हिचे पठण केल्याने माणूस सैतानापासून सुरक्षित राहतो. प्रत्येक नमाजनंतर हिचे पठण केले पाहिजे. (इब्ने कसीर)

**२५६.** दीन (धर्मा) च्या संदर्भात कसलीही जोरजबरदस्ती नाही. सत्य, असत्यापासून अलग झाले, यास्तव जो मनुष्य तागूत (अल्लाहशिवाय इतर उपास्यां) ना नाकारून एकमेव अल्लाहवर ईमान राखील, तर त्याने मोठा मजबूत आधार धरला, जो कधीही तुटणार नाही आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह ऐकणारा, जाणणारा आहे.

**२५७.** अल्लाह स्वत: ईमानधारकांचा संरक्षक (वली) आहे. तो त्यांना अंधाराकडून प्रकाशाकडे घेऊन जातो आणि काफिरांचे (इन्कारी लोकांचे) मित्र तर सैतान आहेत. ते त्यांना प्रकाशाकडून अंधाराकडे नेतात. हे लोक जहन्नमी आहेत, जे नेहमी त्यातच पडून राहतील.

**२५८.** काय तुम्ही त्याला नाही पाहिले, ज्याने राज्य-सत्ता प्राप्त करून इब्राहीमशी, त्याच्या पालनकर्त्याबाबत भांडण केले. जेव्हा इब्राहीम म्हणाले की, माझा रब (पालनकर्ता) तर तो आहे जो जिवंत करतो आणि मारतो. तो म्हणू लागला, मीदेखील जिवंत करतो आणि मारतो. इब्राहीम म्हणाले, अल्लाह तर सूर्याला पूर्व दिशेकडून उगवतो तू त्याला पश्चिमेकडून उगव. आता मात्र तो काफिर निरुत्तर आणि थक्क झाला आणि अल्लाह अत्याचारी लोकांना सन्मार्ग दाखवित नाही.

**२५९.** किंवा त्या माणसासारखे, ज्याचे जाणे एका वस्तीवरून झाले, जी आपल्या छतासमेत पालथी पडली होती. तो म्हणू लागला, त्याच्या मृत्युनंतर अल्लाह त्याला कशा प्रकारे जिवंत करील, तेव्हा अल्लाहने त्याला शंभर वर्षांकरिता मृत्यु दिला. मग नंतर त्याला (जिवंत करून) उठविले. अल्लाहने विचारले, ‘‘किती काळ तू मेलेल्या अवस्थेत होतास?’’ त्याने उत्तर दिले की एक दिवस किंवा दिवसाचा काही हिस्सा. अल्लाहने फमार्विले, ‘‘किंबहुना तू शंभर वर्षांपर्यंत (मृतावस्थेत) राहिला, मग आता तू आपल्या खाण्या-पिण्याच्या वस्तूंकडे पाहा की त्या मुळीच खराब झाल्या नाहीत आणि आपल्या गाढवाकडेही पाहा. आम्ही तुला लोकांकरिता निशाणी बनवितो. तू पाहा की आम्ही कशा प्रकारे हाडे उभी करतो, मग त्यांवर मांस चढवितो.’’ जेव्हा त्याला हे सर्व स्पष्ट करून आले, तेव्हा तो म्हणू लागला, मी चांगले जाणून घेतले की सर्वश्रेष्ठ अल्लाह सर्व काही जाणणारा आहे.

**२६०.** आणि जेव्हा इब्राहीम म्हणाले, ‘‘हे माझ्या पालनकर्त्या! मला दाखव की तू मेलेल्याला कशा प्रकारे जिवंत करशील?’’ अल्लाहने फर्माविले, ‘‘काय तुमचे (या

गोष्टीवर) ईमान नाही?'' उत्तर दिले, ''ईमान तर आहे, परंतु अशाने माझ्या मनाला समाधान लाभेल.'' अल्लाहने फर्माविले, ''चार पक्षी घ्या. त्यांचे तुकडे करून टाका, मग प्रत्येक पर्वतावर त्यांचा एक एक हिस्सा ठेवून द्या, नंतर त्यांना हाक मारा, ते तुमच्या जवळ धावत येतील आणि जाणून असा की अल्लाह मोठा जबरदस्त हिकमत राखणारा आहे.''

**२६१.** जे लोक अल्लाहच्या मार्गात आपला माल (धन) खर्च करतात, त्यांचे उदाहरण त्या दाण्यासारखे आहे, ज्यातून सात कणसे निघावीत आणि प्रत्येक कणसात शंभर दाणे असावेत आणि अल्लाह ज्याला इच्छिल अनेक पटींनी देईल, आणि अल्लाह मोठा व्यापकता राखणारा आणि ज्ञान राखणारा आहे.

**२६२.** जे लोक आपले धन, अल्लाहच्या मार्गात खर्च करतात, मग त्यानंतर उपकार दर्शवित नाही आणि क्लेश-यातनाही देत नाहीत, त्यांचा मोबदला, त्याच्या पालनकर्त्याजवळ आहे. त्यांना ना कसले भय राहील, ना ते दुःखी-कष्टी होतील.

**२६३.** भली गोष्ट बोलणे आणि माफ करणे त्या दानापेक्षा उत्तम आहे, जे दिल्यानंतर दुःख पोहचविले जावे आणि अल्लाह निस्पृह आणि सहनशील आहे.

**२६४.** हे ईमान राखणाऱ्यांनो! आपले दान, उपकार दर्शवून आणि दुःख पोहचवून वाया जाऊ देऊ नका, ज्याप्रमाणे तो मनुष्य, जो आपले धन लोकांना दाखविण्यासाठी खर्च करील आणि ना अल्लाहवर ईमान राखील, ना कयामतवर, तर त्याचे उदाहरण त्या चिकण्या दगडासारखे आहे, ज्याच्यावर थोडीशी माती असावी, मग त्यावर जोराचा पाऊस पडावा, परिणामी पावसाने त्याला अगदी साफ आणि सक्त (कठोर) सोडावे. या देखावा करणाऱ्यांना आपल्या कमाईपासून काहीच हाती लागणार नाही आणि अल्लाह इन्कार करणाऱ्यांच्या समुदायाला मार्गदर्शन करीत नाही.

**२६५.** जे लोक आपले धन अल्लाहची मर्जी (प्रसन्नता) प्राप्त करण्याकरिता मनाच्या खुशीने आणि विश्वासाने खर्च करतात, त्यांचे उदाहरण त्या बागेसारखे आहे जी जमिनीच्या उंच भागावर असावी आणि जोरदार पावसाने ती आपली फळे दुप्पट देईल आणि तिच्यावर पाऊस जरी पडला नाही, तरी पावसाचा हलका वर्षावही पुरेसा आहे आणि अल्लाह तुमच्या कर्मांना पाहत आहे.

**२६६.** काय तुमच्यापैकी कोणी असे इच्छितो की त्याच्याजवळ खजूरीच्या आणि

द्राक्षांच्या बागा असाव्यात, ज्यात पाण्याचे प्रवाह वाहत असावेत आणि प्रत्येक प्रकारची फळे असावीत आणि बागेचा मालक म्हातारा झालेला असावा, त्याला लहान मुलेही असावीत आणि अचानक त्या बागेवर आगीचे जोरदार वादळ यावे आणि ती जळून खाक व्हावी. अशा प्रकारे सर्वश्रेष्ठ अल्लाह तुम्हाला आपल्या निशाण्या स्पष्टपणे सांगतो, यासाठी की तुम्ही विचार करावा.

**२६७.** हे ईमानधारकांनो! आपल्या (कष्टाच्या) हलाल कमाईमधून आणि जमिनीतून तुमच्यासाठी आम्ही काढलेल्या वस्तूंमधून खर्च करा. त्यांच्यातल्या खराब वस्तू खर्च करण्याचा (देण्याचा) इरादा करू नका, ज्या तुम्ही स्वतः घेणार नाहीत परंतु डोळे मिटून घ्याल तर गोष्ट वेगळी. आणि लक्षात ठेवा अल्लाह निस्पृह आणि प्रशंसनीय आहे.

**२६८.** सैतान तुम्हाला गरीबीचे भय दाखवितो, आणि निर्लज्जतेचा आदेश देतो. आणि अल्लाह तुमच्याशी आपल्या दया-कृपेचा वायदा करतो. अल्लाह मोठा मेहरबान आणि ज्ञानसंपन्न आहे.

**२६९.** तो ज्याला इच्छितो ज्ञान, बुद्धी प्रदान करतो आणि ज्याला बुद्धिमानता प्रदान केली गेली, त्याला फार मोठी भलाई प्रदान केली गेली आणि बोध- उपदेश केवळ बुद्धिमान लोकच ग्रहण करतात.

**२७०.** तुम्ही वाटेल तेवढा खर्च करा (किंवा दान-पुण्य करा) आणि जो काही नवस माना[१] अल्लाह ते जाणतो. आणि अत्याचारींचा कोणी सहायक नाही.

**२७१.** जर तुम्ही दान-पुण्य खुलेआमपणे कराल तर तेही चांगले आहे, आणि जर तुम्ही ते गुपचूपपणे गरीबांना द्याल तर हे तुमच्यासाठी सर्वांत अधिक चांगले आहे. सर्वश्रेष्ठ अल्लाह तुमचे अपराध मिटवील आणि अल्लाहला तुमच्या समस्त कर्मांची खबर आहे.

**२७२.** त्यांना सन्मार्गावर आणणे तुमच्या अवाख्यातील गोष्ट नव्हे, किंबहुना अल्लाह

(१) मूळ शब्द 'नज़र' अर्थात नवस मानणे की माझे अमुक एक काम झाले किंवा दुःख दूर झाले तर मी अल्लाहच्या मार्गात एवढे दान करीन. असा नवस पूर्ण करणे आवश्यक आहे. जर एखाद्या अवज्ञा आणि अनुचित कामाचा नवस मानला असेल, तर तो पूर्ण करणे जरूरी नाही. नवसदेखील नमाज-रोजासारखी उपासना आहे. यास्तव अल्लाहशिवाय दुसऱ्याचा नवस मानणे शिर्क आहे. जसे आजच्या काळात प्रसिद्ध मजारींवर नवस आणि भेट-नजराने चढविण्याचे काम चालू आहे. अल्लाह आम्हाला या शिर्कपासून वाचवो.

ज्याला इच्छितो मार्गदर्शन करतो आणि तुम्ही जी चांगली वस्तू अल्लाहच्या मार्गात द्याल, त्याचा लाभ स्वतः प्राप्त कराल. तुम्ही केवळ सर्वश्रेष्ठ अल्लाहची प्रसन्नता प्राप्त करण्याकरिता खर्च केला पाहिजे. तुम्ही जे काही धन खर्च कराल, त्याच्या पुरेपूर मोबदला तुम्हाला दिला जाईल आणि तुमचा हक्क मारला जाणार नाही.

**२७३.** दानास पात्र केवळ ते गरीब आहेत, जे अल्लाहच्या मार्गात रोखले गेलेत, जे जमिनीवर फिरू शकत नाहीत. नादान लोक त्यांच्या न मागण्याने त्यांना श्रीमंत समजतात. तुम्ही त्यांच्या चेहऱ्यांवरील लक्षणे पाहून त्यांना ओळखून घ्याल. ते लोकांकडून अगदी पाठीशी लागून भिक्षा मागत नाहीत. तुम्ही जे काही धन खर्च कराल, अल्लाह ते जाणणारा आहे.

**२७४.** जे लोक आपले धन रात्रं-दिवस गुपचूपपणे किंवा जाहीरपणे खर्च करतात, त्यांच्यासाठी त्यांच्या पालनकर्त्याजवळ मोबदला आहे, त्यांना ना कसले भय राहील आणि ना ते दुःखी होतील.

**२७५.** व्याज खाणारे लोक उभे राहणार नाहीत. परंतु तसेच जसा तो मनुष्य उभा राहतो ज्याला सैतान बिलगून वेडसर बनवितो. हे अशासाठी की हे म्हणत असत की व्यापारदेखील व्याजाप्रमाणेच आहे. वास्तविक अल्लाहने व्यापार हलाल (वैध) केला आणि व्याजाला हराम. आणि जो मनुष्य आपल्याजवळ आलेला अल्लाहचा उपदेश ऐकून (व्याज घेण्यापासून) थांबला तर त्याच्यासाठी ते आहे जे होऊन गेले आणि त्याचा मामला अल्लाहच्या सुपूर्द आहे आणि तरीही जो (हरामकडे) परतला, तो जहन्नमी आहे आणि असे लोक नेहमी त्यातच पडून राहतील.

**२७६.** सर्वश्रेष्ठ अल्लाह व्याजाला मिटवितो आणि दानाला वाढवितो आणि अल्लाह एखाद्या कृतघ्न आणि इन्कार करणाऱ्याला मित्र बनवित नाही.

**२७७.** जे लोक ईमानासह (पैगंबरांच्या आचरण शैलीनुसार) काम करतात, नमाजांना कायम करतात आणि जकात अदा करतात त्यांचा मोबदला त्यांच्या पालनकर्त्याच्या जवळ आहे. त्यांना ना कसले भय राहील आणि ना कसले दुःख राहील.

**२७८.** हे ईमान राखणाऱ्यानो! अल्लाहचे भय राखा आणि जे व्याज बाकी राहिले आहे, ते सोडून द्या, जर तुम्ही खरोखरचे ईमानधारक असाल!

**२७९.** जर असे करत नसाल तर अल्लाह आणि त्याच्या पैगंबराशी लढण्यासाठी तयार व्हा आणि जर माफी मागाल तर तुमचे मुद्दल तुमचेच आहे. ना तुम्ही जुलूम करा आणि ना तुमच्यावर जुलूम केला जावा.

**२८०.** आणि जर कोणी गरीब असेल तर त्याला सवड मिळेपर्यंत वेळ दिली पाहिजे आणि सदका (दान) कराल तर तुमच्यासाठी अधिक चांगले आहे जर तुम्ही जाणत असाल.

**२८१.** आणि त्या दिवसाचे भय बाळगा, ज्या दिवशी तुम्ही सर्व अल्लाहकडे परतविले जाल आणि प्रत्येक माणसाला त्याच्या कर्मानुसार पुरेपूर मोबदला दिला जाईल आणि त्यांच्यावर अत्याचार केला जाणार नाही.

**२८२.** हे ईमान राखणाऱ्यांनो! जेव्हा तुम्ही आपसात एका ठराविक मुदतीकरिता एकमेकांशी उधार-उसनवारीचा व्यवहार कराल तर लिहून घेत जा आणी लिहणाऱ्याने अपसातला मामला न्यायासह लिहून द्यावा आणि लिहिणाऱ्याने लिहून देण्यास इन्कार करू नये, जसे अल्लाहने त्याला शिकविले आहे तसे त्यानेदेखील लिहून दिले पाहिजे आणि ज्याच्यावर हक्क देणे बंधनकारक आहे त्याने स्वत: सांगून लिहवून घ्यावे आणि आपल्या अल्लाहचे भय राखावे, जो त्याचा पानलकर्ता आहे. आणि हक्क-अधिकारात काहीही घटवू किंवा कमी करू नये, मात्र ज्या माणसावर हक्क बंधनकारक असतील आणि तो नादान असेल किंवा कमजोर असेल किंवा लिहून घेण्याची शक्ती राखत नसेल तर त्याच्यातर्फे त्याच्या कारभारी किंवा वारसदाराने न्यायासह लिहून द्यावे आणि आपल्यामधून दोन पुरुषांना साक्षी करून घ्या. जर दोन पुरुष उपलब्ध नसतील तर एक पुरुष आणि दोन स्त्रिया ज्यांना तुम्ही साक्षी म्हणून पसंत कराल, अशासाठी की एकीला विसर पडल्यास दुसरीने आठवण करून द्यावी. आणि साक्ष देणाऱ्यांनी, जेव्हा त्यांना बोलविले जावे, आले पाहिजे. येण्यास इन्कार करू नये. आणि कर्ज, ज्याची मुदत निश्चित आहे, मग ते लहान असो किंवा मोठे लिहिण्यात आळस करू नका, सर्वश्रेष्ठ अल्लाहजवळ ही गोष्ट फार न्यायसंगत आहे, आणि साक्ष यथायोग्य राखणारी आणि शंका-संवशयापासूनही वाचविणारी आहे. आता ही गोष्ट वेगळी की तो व्यवहार रोख व्यापाराच्या स्वरूपात असेल, जे आपसात देणे-घेणे कराल तर तो न लिहिण्यात तुमच्यावर काही गुन्हा नाही. खरेदी-विक्री करतेवेळीही साक्षीदार ठरवून घेत जा आणि (लक्षात ठेवा) ना तर लिहिणाऱ्याला नुकसान पोहोचविले जावे आणि ना साक्षीदारांना

आणि जर तुम्ही असे कराल तर ही तुमची उघड अवज्ञा आहे. अल्लाहचे भय राखा. अल्लाह तुम्हाला ताकीद करत आहे आणि अल्लाह सर्व काही जाणणारा आहे.

**२८३.** आणि जर तुम्ही प्रवासात असाल आणि लिहिणारा आढळला नाही तर तारण गहाण ठेवून व्यवहार करून घ्या आणि जर आपसात एकमेकांवर विश्वास असेल तर ज्याला अनामत दिली गेली आहे, ती त्याने अदा करावी आणि अल्लाहचे भय बाळगून राहावे, जो त्याच्या पालनकर्ता आहे. आणि साक्ष लपवू नका, आणि जो साक्ष लपवील, तो मनाने पापी आहे आणि तुम्ही जे काही करता, अल्लाह ते चांगल्या प्रकारे जाणतो.

**२८४.** जमीन आणि आकाशाची प्रत्येक वस्तू अल्लाहच्या अधिकारकक्षेत आहे. तुमच्या मनात जे काही आहे, ते तुम्ही जाहीर करा किंवा लपवा, अल्लाह त्याचा हिशोब घेईल. मग ज्याला इच्छिल माफ करील आणि ज्याला इच्छिल सजा देईल आणि अल्लाह प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्य बाळगतो.

**२८५.** पैगंबरांनी त्यावर ईमान राखले, जे त्यांच्याकडे सर्वश्रेष्ठ अल्लाहतर्फे अवतरित केले गेले आणि ईमान राखणाऱ्यांनीही ईमान राखले. या सर्वांनी अल्लाह आणि त्याच्या फरिश्त्यांवर आणि त्याच्या ग्रंथांवर आणि त्याच्या पैगंबरांवर ईमान राखले. त्याच्या पैगंबरांपैकी कोणाच्याही दरम्यान आम्ही फरक करीत नाही. ते म्हणाले की आम्ही ऐकले आणि आज्ञापालन केले. आम्ही तुझ्याजवळ माफी मागतो. हे आमच्या पालनकर्त्या! आणि आम्हाला तुझ्याचकडे परतायचे आहे.

**२८६.** अल्लाह कोणत्याही आत्म्यावर त्याच्या कुवतीपेक्षा जास्त ओझे टाकत नाही, जे सत्कर्म करील तर त्याचा मोबदला त्याच्यासाठी आहे आणि जे वाईट कर्म करील तर त्याचे संकट त्याच्यावरच आहे. हे आमच्या पालनकर्त्या! जर आम्ही विसरलो किंवा आमच्याकडून चूक झाल्यास आम्हाला त्याच्याबद्दल पकडीत घेऊ नकोस, हे आमच्या पालनकर्त्या! आमच्यावर ते ओझे टाकू नकोस जे आमच्या पूर्वीच्या लोकांवर टाकले होते. हे आमच्या पालनकर्त्या! आमच्यावर असे ओझे टाकू नकोस जे उचलण्याची आमच्यात शक्ती नसावी आणि आम्हाला माफ कर, आणि आम्हाला माफी प्रदान कर आणि आमच्यावर दया कर. तूच आमचा स्वामी (मालक) आहेस. आम्हाला काफिर (इन्कारी) जनसमूहावर विजय प्रदान कर.

# सूरह आले इमरान - ३

सूरह आले इमरान मदीना येथे अवतरली. यात दोनशे आयती आहेत आणि वीस रुकुउ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहरबान आणि दयावान आहे.

**१.** अलिफ-लाम-मीम.

**२.** अल्लाह तो आहे, ज्याच्याशिवाय कोणीही उपासनीय नाही. तो सदैव जिवंत आहे आणि सर्वांचा रक्षणकर्ता आहे.

**३.** ज्याने सत्यासह हा ग्रंथ (कुरआन) अवतरित केला, जो आपल्या पूर्वीच्या (अवतरित धर्मग्रंथां) ची सत्यता सिद्ध करतो. आणि त्यानेच (यापूर्वीचे धर्मग्रंथ) तौरात आणि इंजील अवतरित केले

**४.** यापूर्वीच्या लोकांच्या मार्गदर्शनासाठी, आणि कुरआनदेखील त्यानेच उतरविले. जे लोक अल्लाहच्या आयतींचा इन्कार करतात, त्यांच्यासाठी मोठा सक्त (कठोर) अज़ाब आहे. आणि अल्लाह जबरदस्त आहे आणि सूड घेणारा.

**५.** निःसंशय, सर्वश्रेष्ठ अल्लाहपासून धरती आणि आकाशाची कोणतीही वस्तू लपलेली नाही.

**६.** तोच मातेच्या गर्भात तुमचा चेहरा-मोहरा, जसे इच्छितो बनवितो. त्याच्याशिवाय कोणीही वस्तुतः उपासना करण्यायोग्य नाही. तो शक्ती-सामर्थ्य बाळगणारा आणि हिकमतशाली आहे.

**७.** तोच अल्लाह होय, ज्याने तुमच्यावर ग्रंथ अवतरित केला, ज्यात स्पष्ट आणि ठोस आयती आहेत, जो मूळ ग्रंथ आहे आणि काही समान आयती आहेत. मग ज्यांच्या मनात वक्रता आहे तर ते समान आयतींच्या मागे पडतात, फितुरी माजविण्याकरिता आणि त्याच्या स्पष्टीकरणाकरिता, परंतु त्यांच्या खऱ्या उद्दिष्टाला अल्लाहशिवाय कोणीही जाणत नाही. आणि परिपूर्ण व मजबूत ज्ञान राखणारे विद्वानदेखील हेच म्हणतात की आम्ही तर त्यांच्यावर ईमान राखले आहे. हे सर्व आमच्या पालनकर्त्यातर्फे आहे, आणि बोध-उपदेश तर केवळ बुद्धिमान लोकच प्राप्त करतात.

८. हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला मार्गदर्शन केल्यानंतर आमच्या मनात वाकडेपणा येऊ देऊ नकोस आणि आम्हाला आपल्या जवळून दया- मेहरबानी प्रदान कर. निःसंशय, तूच सर्वांत मोठा दाता आहेस.

९. हे आमच्या पालनकर्त्या! निश्चितच तू एक दिवस लोकांना एकत्र करणार आहे, ज्याच्या येण्याविषयी काहीच शंका नाही. निःसंशय, सर्वश्रेष्ठ अल्लाह आपल्या वायद्याविरूद्ध जात नाही.

१०. इन्कारी लोकांना त्यांची धन-दौलत आणि त्यांची संतती अल्लाहच्या अज़ाब (शिक्षा-यातने) पासून सोडिवण्यात काही कामी येऊ शकणार नाही आणि हे लोक तर जहन्नमचे इंधन आहेतच.

११. ज्याप्रमाणे फिरऔनच्या संततीची दुर्दशा झाली आणि त्यांची, जे त्यांच्यापूर्वी होऊन गेले त्यांनी आमच्या आयतींना खोटे ठरविले, मग अल्लाहने त्यांना त्यांच्या अपराधाबद्दल पकडीत घेतले आणि अल्लाह मोठी सक्त (कठोर) शिक्षा देणारा आहे.

१२. काफिर लोकांना (इन्कार करणाऱ्यांना) सांगा की तुम्हा लोकांना निकट भविष्यात पराभूत केले जाईल आणि तुम्हाला जहन्नमकडे जमा केले जाईल आणि किती वाईट ठिकाण आहे ते!

१३. निःसंशय, तुमच्यासाठी (बोधदायक) निशाणी होती, त्या दोन समूहांमध्ये जे आपसात भिडले होते. त्यापैकी एक समूह अल्लाहच्या मार्गात लढत होता आणि दुसरा समूह काफिरांचा (इन्कारी लोकांचा) होता, जो त्यांना आपल्या डोळ्यांनी दुप्पट झालेले पाहात होता. आणि अल्लाह ज्याला इच्छितो, आपल्या मदतीने मजबूत (सामर्थ्यवान) करतो. निःसंशय, डोळे असणाऱ्यांकरिता यात मोठा बोध-उपदेश आहे.

१४. आवडत्या व मनपसंत गोष्टींचे प्रेम लोकांसाठी सुशोभित केले गेले आहे. उदाहरणार्थ, स्त्रिया आणि पुत्र, सोने-चांदीचे जमा केलेले खजिने, आणि निवडक निशाणीचे घोडे आणि गुरे-ढोरे व शेती वगैरे. ही सर्व ऐहिक जीवनाची सामग्री आहे आणि परतण्याचे उत्तम ठिकाणतर अल्लाहच्याच जवळ आहे.

१५. तुम्ही सांगा, काय मी तुम्हाला याहून उत्तम अशी गोष्ट सांगू अल्लाहचे भय राखणाऱ्या लोकांकरिता, त्यांच्या पालनकर्त्याजवळ जन्नती आहेत ज्यांच्या खाली प्रवाह

वाहत आहेत. ज्यात ते नेहमी नेहमी राहतील, आणि पाक साफ (स्वच्छ-शुद्ध) पत्न्या आणि सर्वश्रेष्ठ अल्लाहची प्रसन्नता आहे आणि सर्वच्या सर्व दास अल्लाहच्या नजरेत आहेत.

**१६.** जे असे म्हणतात की, हे आमच्या पालनर्त्या! आम्ही ईमान राखले, यास्तव आमच्या अपराधांना क्षमा कर आणि आम्हाला आगीच्या अज़ाब (शिक्षा-यातने) पासून वाचव.

**१७.** जे धीर-संयम राखणारे, आणि सच्चे-प्रामाणिक व आज्ञाधारक आणि अल्लाहच्या मार्गात धन खर्च करणारे आहेत आणि रात्रीच्या अखेरच्या भागात (मोक्ष प्राप्तीकरिता) क्षमा-याचना करणारे आहे.

**१८.** अल्लाह, त्याचे फरिश्ते आणि ज्ञानी विद्वानांनी साक्ष दिली आहे की अल्लाहशिवाय कोणीही माबूद (उपासना करण्यायोग्य) नाही, तो न्यायाला कायम राखणारा आहे, तोच जबरदस्त हिकमत राखणारा आहे. त्याच्याशिवाय कोणीही उपासना करण्यास योग्य नाही.

**१९.** निःसंशय, अल्लाहच्या जवळ दीन (धर्म) केवळ इस्लामच आहे.[१]

---

(१) इस्लाम तोच दीन-धर्म आहे, ज्याचा प्रचार-प्रसार आणि शिकवण प्रत्येक पैगंबर आपापल्या काळात देत राहिले आणि आता तो परिपूर्ण स्वरूपात आहे, जो अंतिम प्रेषित मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम, यांनी जगासमोर प्रस्तुत केला आहे. ज्यात एकेश्वरवाद (तौहीद), रिसालत (प्रेषित्व) आणि आखिरत (मरणोत्तर जीवन) वर अशा प्रकारे अटळ विश्वास राखायचा आहे जसा पैगंबर (स.) यांनी सांगितला आहे. केवळ एकेश्वरवादावर धारणा राखून काही सत्कर्मे पार पाडल्याने इस्लाम साध्य होत नाही आणि ना अशाने आखिरतमध्ये मुक्ती मिळू शकेल. अकीदा (श्रद्धा) आणि दीन (धर्म) तर हा की अल्लाहला एकमेव मानले जावे, केवळ त्याच एक अल्लाहची भक्ती-उपासना केली जावी, हजरत मुहम्मद (स.) यांच्यासमेत इतर सर्व पैगंबरांवर ईमान राखले जावे आणि पैगंबर मुहम्मद (स.) यांच्यावर प्रेषित्व समाप्त झाल्याचे मानले जावे आणि आशेसह ते ईमान व कर्म पार पाडले जावे जे कुरआन आणि पैगंबरांच्या कथनांद्वारे उल्लेखित आहे. आता या इस्लामखेरीज कोणताही दीन-धर्म अल्लाहजवळ स्वीकृत ठरणार नाही.

''आणि जो मनुष्य इस्लामला सोडून अन्य एखाद्या धर्माचा शोध घेईल तर त्याचा तो धर्म कबूल केला जाणार नाही आणि आखिरतमध्ये तो नुकसान भोगणाऱ्यांपैकी असेल.'' (आले इमरान-५८)

''सांगा की लोक हो! मी तुम्हा सर्वांकडे अल्लाहचा रसूल (पैगंबर) आहे.'' (सूरह आराफ-१५८)

''मोठा शुभ आणि समृद्धशाली आहे तो (अल्लाह) ज्याने आपल्या दासावर फुर्कान (सत्य व

(अल्लाहकरिता परिपूर्ण आत्मसमर्पण) आणि ज्यांना ग्रंथ दिला गेला, त्यांनी ज्ञान येऊन पोहोचल्यानंतर आपसातील द्वेष-मत्सरामुळे मतभेद केला आणि जो अल्लाहच्या आयतींना (पवित्र कुरआनाला) न मानेल तर अल्लाह लवकरच हिशोब घेईल.

**२०.** जर ते तुमच्याशी भांडण-तंटा करतील तर तुम्ही सांगा की मी आणि माझ्या अनुयायींनी स्वत:ला अल्लाहकरिता समर्पित केले आणि तुम्ही ग्रंथधारक व अशिक्षित लोकांना सांगा की काय तुम्ही इस्लामचा स्वीकार केला आहे. जर ते इस्लामचा स्वीकार करतील तर त्यांनी सरळ मार्ग प्राप्त करून घेतला आणि जर तोंड फिरवतील तर तुमची जबाबदारी केवळ (संदेश) पोहचविण्याची आहे, आणि अल्लाह आपल्या दासांना स्वतःच पाहत आहे.

**२१.** निःसंशय, जे लोक अल्लाहच्या आयतींचा इन्कार करतात आणि अल्लाहच्या पैगंबरांची नाहक हत्या करतात आणि जे लोक न्यायाची गोष्ट बोलतात त्यांचीही हत्या करतात, तर (हे पैगंबर!) तुम्ही त्यांना फार मोठ्या अज़ाब (शिक्षा-यातने) ची सूचना द्या.

**२२.** त्यांची सर्व सत्कर्मे या जगात आणि आखिरतमध्ये वाया गेलीत. आणि त्यांचा कोणीही सहाय्यक (मदत करणारा) नाही.

**२३.** काय तुम्ही नाही पाहिले ज्यांना ग्रंथाचा एक भाग दिला गेला आहे ते आपल्या आपसातील फैसल्याकरिता अल्लाहच्या ग्रंथाकडे बोलाविले जातात, तरीदेखील त्यांच्यातला एक समूह तोंड फिरवून परत जातो.

**२४.** याला कारण त्यांचे असे म्हणणे आहे की त्यांना काही मोजकेच दिवस आग स्पर्श करील. या त्यांच्या मनाने रचलेल्या गोष्टींनी त्यांना त्यांच्या दीन (धर्मा) बाबत धोक्यात टाकलेले आहे.

**२५.** मग काय अवस्था होईल, जेव्हा त्यांना आम्ही त्या दिवशी एकत्रित करू ज्या दिवसाच्या येण्याविषयी काहीच शंका नाही आणि प्रत्येक माणसाला आपल्या कृत-कर्मांचा पुरेपूर मोबदला दिला जाईल आणि त्यांच्यावर अत्याचार केला जाणार नाही.

---

असत्यामधील भेद जाहीर करणारा ग्रंथ) अवतरित केला, यासाठी की जगाला सचेत करावे.'' (अल फुर्कान-१)

**२६.** तुम्ही सांगा, हे अल्लाह! हे साऱ्या जगाचा स्वामी! तू ज्याला इच्छितो राज्य प्रदान करतो आणि ज्याच्याकडून इच्छितो राज्य हिरावून घेतो आणि तू ज्याला इच्छितो मान-प्रतिष्ठा प्रदान करतो आणि ज्याला इच्छितो अपमानित करतो. तुझ्या हाती सर्व भलाई आहे. निःसंशय, तू प्रत्येक गोष्टीचा सामर्थ्य बाळगतो.

**२७.** तूच रात्रीला दिवसात दाखल करतो आणि तूच दिवसाला रात्रीत दाखल करतो. तूच निर्जीवातून सजीवाला निर्माण करतो आणि सजीवातून निर्जीव बाहेर काढतो आणि तो तूच आहेस जो, ज्याला इच्छितो अगणित व अमर्याद रोजी (आजिविका) प्रदान करतो.

**२८.** ईमान राखणाऱ्यांनी, ईमानधारकांना सोडून काफिर लोकांना (इन्कारी लोकांना) आपला मित्र बनवू नये आणि जो कोणी असे करील तर त्याला अल्लाहतर्फे कोणेतही समर्थन नाही. परंतु हे की त्याच्या भय-दहशतीमुळे एखाद्या प्रकारच्या संरक्षणाचा इरादा असेल आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह स्वतः तुम्हाला आपले भय दाखवित आहे आणि (शेवटी) अल्लाहकडेच परतून जायचे आहे.

**२९.** सांगा, वाटल्यास तुम्ही आपल्या मनातील गोष्टी लपवा किंवा जाहीर करा अल्लाह त्या सर्व गोष्टी जाणतो. आकाशांमध्ये आणि धरतीवर जे काही आहे ते सर्व त्याला माहीत आहे. अल्लाह प्रत्येक गोष्ट करण्याचे सामर्थ्य राखतो.

**३०.** ज्या दिवशी प्रत्येक मनुष्य आपल्या चांगल्या-वाईट कृत-कर्माला हजर असलेले (समक्ष) पाहील तेव्हा ही इच्छा करील की त्याच्या आणि अपराधाच्या दरम्यान खूप दूरचे अंतर असते तरी किती चांगले झाले असते! अल्लाह तुम्हाला आपले भय राखण्याची ताकीद करतो आणि अल्लाह आपल्या दासांवर अतिशय मेहरबान व कृपावान आहे.

**३१.** तुम्ही सांगा, जर तुम्ही सर्वश्रेष्ठ अल्लाहशी (सच्चे) प्रेम राखत असाल तर माझ्या मार्गाचे अनुसरण करा, अल्लाह स्वतः तुमच्यावर प्रेम करील आणि तुमचे अपराध माफ करील आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह मोठा माफ करणारा दया करणारा आहे.

**३२.** तुम्ही सांगा की अल्लाह आणि रसूल (पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) यांचे आज्ञापालन करा. जर ते तोंड फिरवतील तर निःसंशय, सर्वश्रेष्ठ अल्लाह काफिरांना

(इन्कारी लोकांना) दोस्त राखत नाही.[१]

**३३.** निःसंशय, अल्लाहने सर्व लोकांमधून आदमला आणि नूहला आणि इब्राहीमच्या घराण्याला व इमरानच्या घराण्याला निवडून घेतले.

**३४.** की हे सर्व आपसात एकमेकांची संतान आहेत आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह सर्व काही ऐकतो आणि जाणतो.

**३५.** जेव्हा इमरानची पत्नी म्हणाली, ''हे माझ्या पालनकर्त्या! माझ्या गर्भात जे काही आहे मी त्याला तुझ्या नावाने मोकळे सोडण्याचा[२] नवस मानला, तेव्हा तू या नवसाचा स्वीकार कर. निःसंशय, तू चांगल्याप्रकारे ऐकणारा आणि जाणणारा आहेस.''

**३६.** जेव्हा बाळाला जन्म दिला, तेव्हा म्हणू लागली, हे माझ्या पालनहार! मला तर मुलगी झाली आहे. अल्लाह चांगल्या प्रकारे जाणतो की काय जन्माला घातले आहे आणि मुलगा मुलीसारखा नाही. मी तिचे नाव मरियम ठेवले आहे. मी तिला व तिच्या संततीला तिरस्कृत सैताना (च्या उपद्रवा) पासून तुझ्या आश्रयाखाली देते.

**३७.** तिला तिच्या पालनकर्त्याने चांगल्या प्रकारे स्वीकारले आणि तिचे सर्वांत उत्तम प्रकारे पालनपोषण करविले, जकरियाला तिचा देखभाल करणारा बनविले. जेव्हा जेव्हा जकरिया मरियमच्या खोलीत (उपासना-कक्षेत) जात तेव्हा त्यांना त्यांच्याजवळ अन्न-सामग्री ठेवलेली आढळून येत असे. जकरिया विचारीत की हे मरियम! तुमच्याजवळ ही रोजी (आजिविका) कोठून आली? ती उत्तर देत असे की हे सर्वश्रेष्ठ अल्लाहच्या जवळून आहे. निःसंशय, अल्लाह ज्याला इच्छितो अमर्याद रोजी प्रदान करतो.

**३८.** त्याच स्थानावर जकरिया यांनी आपल्या पालनकर्त्याजवळ दुआ- प्रार्थना केली.

---

(१) या आयतीत अल्लाहच्या आज्ञापालनासोबत अल्लाहचे रसूल (पैगंबर) सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्या आज्ञापालनाचीही ताकीद करून हे स्पष्ट केले गेले आहे की आता मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्या मार्गाचे अनुसरण केल्याविना मोक्षप्राप्ती (जहन्नमपासून सुटका) होऊ शकत नाही. याचा इन्कार करणे कुफ्र आहे आणि अशा काफिरांना अल्लाह पसंत करीत नाही, मग ते अल्लाहशी प्रेम आणि निकट असण्याचा कितीही दावा का करेनात. या आयतीत हदीस न मानणाऱ्यांची आणि पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांचे अनुसरण न करणाऱ्यांची कानउघाडणी केली गेली आहे.

(२) ''तुझ्या नावाने मोकळे सोडण्याचा'' याचा अर्थ तुझ्या उपासनागृहाच्या सेवेसाठी अर्पण करते.

म्हणाले की हे माझ्या पालनकर्त्या! मला आपल्या जवळून नेक संतान प्रदान कर. नि:संशय, तू दुआ ऐकणारा आहे.

**३९.** मग फरिश्त्यांनी हाक मारली जेव्हा ते आपल्या हुजुऱ्यात उभे राहून नमाज पढत होते, की अल्लाह तुम्हाला यहिया (नावाच्या पुत्राचा) शुभ समाचार देतो जो अल्लाहच्या वचना (कलिमा) ची सत्यता सिद्ध करणारा, जनसमूहाचा प्रमुख, अल्लाहचे भय राखून वागणारा आणि पैगंबर असेल, नेक व सदाचारी लोकांपैकी.

**४०.** जकरिया म्हणू लागले, हे माझ्या पालनकर्त्या! मला पुत्र कसा बरे होईल? मी खूप म्हातारा झालो आहे आणि माझी पत्नी वांझ आहे. (फरिश्ते) म्हणाले, अशाच प्रकारे अल्लाह जे इच्छितो करतो.

**४१.** जकरिया म्हणाले, हे पालनकर्त्या! माझ्यासाठी एखादी निशाणी दे. फर्माविले, निशाणी ही की तीन दिवसपर्यंत तू लोकांशी बोलू शकणार नाहीस, केवळ इशाऱ्यांनी समजावशील. तू आपल्या पालनकर्त्याचे जास्तीतजास्त स्मरण कर, आणि सकाळ-संध्याकाळ त्याची महानता वर्णन कर.

**४२.** आणि जेव्हा फरिश्ते म्हणाले, हे मरियम! अल्लाहने तुझी निवड केली, आणि तुला पाक (स्वच्छ-शुद्ध) केले आणि सर्व जगातील स्त्रियांमध्ये तुझी निवड केली.

**४३.** हे मरियम! तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या आदेशांचे पालन करा आणि सजदा करा (अल्लाहच्या पुढे माथा टेका) आणि रुकुउ करणाऱ्यांसह (झुकणाऱ्यांसोबत) रुकुउ करा (झुकत जा).

**४४.** या ग़ैब (अपरोक्ष) च्या बातम्या आहेत, ज्या आम्ही तुम्हाला वहयी करीत आहोत. तेव्हा तुम्ही त्या वेळी त्यांच्याजवळ नव्हते, जेव्हा ते आपले कलम (लेखणी) टाकू लागले होते की त्यांच्यापैकी मरियमचे पालनपोषण कोण करील? आणि ना तुम्ही त्यांच्या भांडणप्रसंगी त्यांच्याजवळ होते.[१]

---

(१) सध्याच्या काळात अहले बिदअत (इस्लाममध्ये नवी रुढी व श्रद्धा प्रचलित करणाऱ्या) लोकांनी पैगंबर मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्या मान-मर्यादेत अतिशयोक्ती करताना, त्यांना अल्लाहसारखे भविष्य व अपरोक्ष ज्ञाता आणि सर्वव्यापी मानण्याची श्रद्धा मनाने रचली आहे. या आयतीत या दोन्ही गोष्टींचे खंडन होत आहे. जर पैगंबर (स.) यांना खरोखर अपरोक्ष ज्ञान असते तर अल्लाहने हे फर्माविले नसते की आम्ही या ग़ैबी बातम्या तुम्हाला पोहचवित आहोत.

**४५.** जेव्हा फरिश्ते म्हणाले, हे मरियम! अल्लाह तुम्हाला आपल्या एका कलिमा[१] चा शुभ समाचार देतो ज्याचे नाव मरियमचा पुत्र मसीह ईसा आहे, जो या जगात आणि मरणोत्तर जीवनात सन्मानित आहे आणि तो माझ्या निकट दासांपैकी आहे.

**४६.** तो लोकांशी पाळण्यात (असतानाही) संभाषण करील आणि मोठ्या वयातही[२] आणि तो नेक सदाचारी लोकांपैकी असेल.

**४७.** मरियम म्हणाली, ''हे माझ्या पालनकर्त्या! मला मुलगा कसा बरे होईल? वास्तविक मला अद्याप कोणा पुरुषाने स्पर्शही केलेला नाही.'' फरिश्ते म्हणाले, ''अशा प्रकारे अल्लाह जे इच्छितो निर्माण करतो. अल्लाह जेव्हा एखादे कार्य करू इच्छितो तेव्हा फक्त एवढेच म्हणतो- 'होऊन जा' आणि ते घडून येते.''

**४८.** आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह त्याला लिहिणे आणि बुद्धिमानता आणि तौरात व इंजील शिकवील.

**४९.** आणि तो इस्राईलच्या संततीचा रसूल (पैगंबर) असेल की मी तुमच्याजवळ तुमच्या पालनकर्त्याची निशाणी आणली आहे, मी तुमच्यासाठी पक्ष्याच्या रूपासारखीच मातीची एक चिमणी बनवितो, मग तिच्यात फुंकर मारतो तर ती अल्लाहच्या हुकुमाने (जिवंत) पक्षी बनते आणि मी अल्लाहच्या हुकुमाने जन्मजात आंधळ्याला आणि कोढी इसमाला चांगले करतो, आणि मेलेल्याला जिवंत करतो आणि जे काही तुम्ही खाऊन येता आणि जे काही तुम्ही आपल्या घरांमध्ये जमा करता मी ते तुम्हाला सांगतो. यात तुमच्यासाठी मोठी निशाणी आहे, जर तुम्ही ईमान राखणारे असाल!

**५०.** आणि मी तौरातची सत्यता साबीत करणारा आहे, जो माझ्यासमोर आहे आणि मी अशासाठी आलो आहे की तुमच्यासाठी त्या काही वस्तूंना हलाल (वैध) करावे, ज्या

---

(१) हजरत ईसा यांना अल्लाहचा कलिमा अशासाठी म्हटले गेले आहे की त्यांचा जन्म अगदी चमत्कारिकरित्या जगरहाटीविरूद्ध बापाविना, अल्लाहच्या विशेष सामर्थ्याद्वारे आणि त्याच्या (होऊन जा) या कथनाची उत्पत्ती होय.

(२) हजरत ईसा यांचे पाळण्यात असताना लोकांशी बोलण्याचा उल्लेख पवित्र कुरआनाच्या सूरह मरियममध्ये आहे. याखेरीज सहीह हदीसमध्ये अन्य दोन बालकांच्या आईच्या कुशीत बोलण्याचा उल्लेख आहे. त्यापैकी एक साहबे जुरैज आणि एक इस्राईली स्त्रीचा बालक. (सहीह बुखारी किताबुल अम्बिया)

तुमच्यासाठी हराम (अवैध) केल्या गेल्या आहेत.[१] आणि मी तुमच्याजवळ तुमच्या पालनकर्त्याची निशाणी घेऊन आलो आहे यास्तव तुम्ही अल्लाहचे भय राखा आणि माझ्या मार्गाचे अनुसरण करा.

**५१.** नि:संशय, माझा आणि तुमचा पालनहार अल्लाहच आहे, तुम्ही सर्व त्याचीच उपासना करा. हाच सरळ मार्ग आहे.

**५२.** परंतु जेव्हा (हजरत) ईसा यांना, त्या लोकांचा इन्कार जाणवला तेव्हा म्हणू लागले, ''अल्लाहच्या मार्गात माझी मदत करणारा कोण-कोण आहे?'' हवारींनी उत्तर दिले की आम्ही आहोत अल्लाहच्या मार्गात मदतनीस. आम्ही अल्लाहवर ईमान राखले आणि तुम्ही साक्षी राहा की आम्ही मुस्लिम आहोत.

**५३.** हे आमच्या पालनकर्त्या! आम्ही तू अवतरित केलेल्या (संदेशा) वर ईमान राखले आणि आम्ही तुझ्या रसूल (पैगंबरा) चा मार्ग पत्करला, तेव्हा आता तू आम्हाला सत्याची साक्ष देणाऱ्यांमध्ये लिहून घे.

**५४.** आणि इन्कार करणाऱ्यांनी षड्यंत्र रचले आणि अल्लाहनेदेखील योजना बनविली आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह सर्व योजना आखणाऱ्यांपेक्षा उत्तम आहे.

**५५.** जेव्हा अल्लाहने फर्माविले, ''हे ईसा! मी तुम्हाला पूर्णत: घेणार आहे आणि तुम्हाला आपल्याकडे उचलून घेणार आहे आणि तुम्हाला इन्कारी लोकांपासून मुक्त राखणार आहे आणि कयामतच्या दिवसापर्यंत तुमच्या अनुयायींना इन्कारी लोकांवर श्रेष्ठतम राखणार आहे.'' मग तुम्ही सर्वांना माझ्याकडेच परतावयाचे आहे, मीच तुमच्या दरम्यान समस्त मतभेदांचा फैसला करीन.

**५६.** मग इन्कार करणाऱ्यांना तर मी या जगात आणि आखिरतमध्ये अतिशय सक्त अज़ाब (कठोर शिक्षा-यातना) देईन आणि त्यांना कोणी मदत करणाराही नसेल.

---

(१) यास अभिप्रेत त्या वस्तू होत, ज्या अल्लाहने शिक्षा म्हणून त्यांच्यावर हराम केल्या होत्या किंवा त्या वस्तू ज्या त्यांच्या धर्मज्ञानी लोकांनी स्वत:च आपल्यावर हराम करून घेतल्या होत्या, अल्लाहचा तसा आदेश नव्हता (कुर्तबी) किंवा अशा वस्तूही असू शकतात, ज्या त्यांच्या धर्मज्ञानींनी आपल्या विचाराने हराम करून घेतल्या होत्या. यात त्यांच्याकडून चूक झाली आणि हजरत ईसा यांनी त्यांच्या या चुका दूर करून त्यांना हलाल केले. (इब्ने कसीर)

**५७.** परंतु ईमान राखणाऱ्यांना आणि सत्कर्म करणाऱ्यांना अल्लाह पुरेपूर मोबदला प्रदान करील आणि अल्लाह, अत्याचारी लोकांशी प्रेम राखत नाही.

**५८.** हे जे आम्ही तुम्हाला वाचून ऐकिवत आहोत, आयती आहेत आणि बोध-पत्र आहे (हिकमतीने पूर्ण असा संदेश आहे.)

**५९.** अल्लाहजवळ ईसाचे उदाहरण आदमसारखे आहे, ज्याला मातीद्वार निर्माण करून फर्माविले, ''होऊन जा'' बस तो घडून आला.

**६०.** तुमच्या पालनकर्त्यातर्फे सत्य हेच आहे, खबरदार! शंका-संवशय धरणाऱ्यांपैकी होऊ नका.

**६१.** यास्तव जो कोणी, तुमच्याजवळ हे ज्ञान येऊन पोहोचल्यानंतरही तुमच्याशी याबाबत वाद घालील तर तुम्ही सांगा की या आम्ही आणि तुम्ही आपापल्या पुत्रांना आणि आम्ही व तुम्ही आपापल्या पत्नींना आणि आम्ही व तुम्ही स्वतः आपल्याला बोलावून घेऊ, मग आम्ही सर्व मिळून दुआ (प्रार्थना) करू या आणि खोट्या लोकांवर अल्लाहचा धिःक्कार पाठवू या.

**६२.** निःसंशय, हेच सत्य निवेदन आहे आणि अल्लाहशिवाय दुसरा कोणीही उपासना करण्यास योग्य नाही आणि निःसंशय, अल्लाह मोठा शक्तिशाली आणि हिकमतशाली आहे.

**६३.** तरीही जर ते मान्य न करतील तर अल्लाहदेखील विद्रोह (बंड) करणाऱ्यांना चांगल्या प्रकारे जाणणारा आहे.

**६४.** तुम्ही सांगा की, ''हे ग्रंथ बाळगणाऱ्या लोकांनो! अशा न्यायपूर्ण गोष्टीकडे या जी आमच्या व तुमच्या दरम्यान समान आहे की आम्ही अल्लाहशिवाय अन्य कोणाचीही उपासना करू नये आणि ना अल्लाहसोबत दुसऱ्या कोणाला सहभागी करावे ना अल्लाहला सोडून आपसात एकमेकाला रब (पालनहार) बनवून घ्यावे.'' जर ते तोंड फिरवतील तर सांगा की साक्षी राहा की आम्ही तर मुस्लिम आहोत.

**६५.** हे ग्रंथधारकांनो! तुम्ही इब्राहीमच्या बाबतीत का वाद घालता? वास्तविक तौरात आणि इंजील (हे ग्रंथ) तर त्यांच्यानंतर अवतरित केले गेले. मग काय तुम्ही तरीही समजत नाहीत?

**६६.** ऐका! तुम्ही लोक आता या गोष्टीबाबत वाद घालून चुकलात, जिचे तुम्हाला ज्ञान होते. आता या गोष्टीबाबत का झगडता, जिचे तुम्हाला अजिबात ज्ञान नाही? आणि अल्लाह सर्वकाही जाणतो, तुम्ही नाही जाणत.

**६७.** इब्राहीम ना तर यहूदी होते, ना ख्रिश्चन, किंबहुना ते तर पूर्णपणे मुस्लिम होते. ते मूर्तिपूजकही नव्हते.

**६८.** सर्व लोकांपेक्षा जास्त इब्राहीमच्या निकट ते लोक आहेत ज्यांनी त्यांचे म्हणणे मान्य केले आणि हे पैगंबर आणि ते लोक ज्यांनी ईमान राखले, ईमानधारकांचा मित्र आणि मदतकर्ता अल्लाह आहे.

**६९.** ग्रंथधारकांची एक टोळी असे इच्छिते की तुम्हाला (सत्य मार्गापासून) विचलित करावे. वास्तविक ते स्वतःच स्वतःला भटकावित आहेत आणि समजत नाहीत.

**७०.** हे ग्रंथधारकांनो! तुम्ही स्वतः साक्षी असतानाही अल्लाहच्या आयतींना का मानत नाहीत?

**७१.** हे ग्रंथधारकांनो! जाणून घेतल्यानंतरही सत्य आणि असत्याचे मिश्रण का करता, आणि सत्य का लपविता?

**७२.** आणि ग्रंथधारकांचा एक समूह म्हणाला की जे काही ईमानधारकांवर उतरविले गेले आहे, त्यावर दिवसाच्या सुरुवातीला ईमान राखा आणि संध्याकाळ होताच इन्कार करा, यासाठी की या लोकांनीही परत फिरावे.

**७३.** (ते असेही म्हणतात) आणि तुमच्या दीन-धर्मावर चालणाऱ्यांशिवाय आणखी कोणावरही विश्वास ठेवू नका. तुम्ही सांगा, निःसंशय, मार्गदर्शन तर अल्लाहचेच मार्गदर्शन आहे (आणि असेही म्हणतात की या गोष्टीवरही विश्वास ठेवू नका) की कोणाला त्यासारखे दिले जावे, जसे तुम्हाला दिले गेले आहे किंवा हे की हे तुमच्याशी तुमच्या पालनकर्त्याजवळ वाद घालतील. तुम्ही सांगा की फज़्ल (श्रेष्ठता) तर अल्लाहच्या हाती आहे. तो ज्याला इच्छितो प्रदान करतो. अल्लाह अतिशय महान आणि सर्व काही जाणणारा आहे.

**७४.** ती आपल्या दया-कृपेने ज्याला इच्छितो खास करून घेतो, आणि अल्लाह मोठा कृपाशील आणि अतिशय महान आहे.

**७५.** आणि काही ग्रंथधारक असेही आहेत की तुम्ही त्यांना खजीन्याचे विश्वस्त बनवाल तरीही तुम्हाला परत करतील आणि त्यांच्यापैकी काही असेही आहेत की जर तुम्ही त्यांना एक दिनारही ठेव म्हणून द्याल तर जोपर्यंत तुम्ही त्यांच्या डोक्यावर उभे न राहाल तोपर्यंत तुम्हाला परत करणार नाहीत. हे अशासाठी की त्यांनी सांगून ठेवले आहे की या अशिक्षितांचा हक्क मारण्यात आमच्यावर काहीच गुन्हा नाही. हे लोक जाणून घेतल्यानंतरही अल्लाहच्या संबंधाने खोटे बोलतात.

**७६.** का नाही (पकड होईल) परंतु जो मनुष्य आपला फायदा पूर्ण करील आणि अल्लाहचे भय राखील तर अल्लाह अशा भय राखणाऱ्यांना आपला दोस्त राखतो.

**७७.** निःसंशय, जे लोक अल्लाहशी केलेला वचन-करार आणि आपल्या शपथांना थोड्याशा किंमतीवर विकून टाकतात त्यांच्यासाठी आखिरतमध्ये काहीच हिस्सा नाही. सर्वश्रेष्ठ अल्लाह ना तर त्यांच्याशी संभाषण करील, ना कियामतच्या दिवशी त्यांच्याकडे पाहील, ना त्यांना पाक (पवित्र) करील, आणि त्यांच्यासाठी मोठा दुःखदायक अज़ाब (शिक्षा-यातना) आहे.

**७८.** निश्चितच त्यांच्यात एक समूह असाही आहे जो ग्रंथाचे वाचन करताना आपल्या जीभेला मोड देतो, यासाठी की तुम्ही त्याला ग्रंथातलाच मजकूर समजावे. वास्तविक तो ग्रंथातला मजकूर नाही आणि ते असेही म्हणतात की ते अल्लाहतर्फे आहे, वास्तविक ते अल्लाहतर्फे नाही. ते जाणूनबुजून अल्लाहच्या संबंधाने खोटे बोलतात.

**७९.** ज्याला अल्लाहने ग्रंथ, हिकमत (बुद्धिमानता) आणि प्रेषित्व प्रदान करावे अशा एखाद्या माणसाकरिता हे उचित नव्हे की तरीही त्याने लोकांना सांगावे की अल्लाहला सोडून माझे दास (उपासक) बना, किंबहुना तो तर असेच म्हणेल की तुम्ही सर्व लोक 'रब' (पालनकर्त्या) चे व्हा ज्याअर्थी तुम्ही ग्रंथ शिकविता आणि त्याचा पाठदेखील देता.

**८०.** आणि तो तुम्हाला हा आदेश नाही देणार की फरिश्त्यांना आणि पैगंबरांना आपले आराध्य दैवत बनवून घ्या, काय आज्ञाधारक झाल्यानंतर तो तुम्हाला अवज्ञाकारी बनण्याचा आदेश देईल?

**८१.** आणि जेव्हा अल्लाहने पैगंबरांकडून वचन घेतले की जे काही मी तुम्हाला ग्रंथ आणि हिकमत देईन, मग तुमच्याजवळ तो रसूल (पैगंबर) येईल जो तुमच्याजवळ

असलेल्या ग्रंथाची सत्यता दर्शवील तर त्याच्यावर ईमान राखणे व त्याची मदत करणे तुमच्यावर बंधनकारक आहे. फर्माविले की तुम्ही काय हे कबूल करता आणि त्यावर माझी जबाबदारी घेता? सर्व म्हणाले, आम्हाला मान्य आहे. फर्माविले, तर साक्षी राहा आणि मी स्वतःदेखील तुमच्यासोबत साक्षी आहे.

**८२.** आता यानंतरही जो परत फिरेल, तो निश्चितच अवज्ञाकारी आहे.

**८३.** काय ते अल्लाहच्या दीन-धर्माला सोडून दुसऱ्या एखाद्या दीन-धर्माच्या शोधात आहेत? वास्तविक आकाशांमध्ये व धरतीवर वास्तव्य करणारे सर्वच्या सर्व अल्लाहचे आज्ञाधारक आहेत. मग राजीखुशीने असो किंवा लाचार होऊन, सर्वांना त्याच्याचकडे परतविले जाईल.

**८४.** तुम्ही सांगा, ''आम्ही अल्लाहवर आणि जे काही आमच्यावर उतरविले गेले आहे आणि जे इब्राहीम आणि इस्माईल आणि याकूब आणि त्यांच्या संततीवर उतरविले गेले आणी जे काही मुसा आणी ईसा आणि इतर पैगबरांना अल्लहाच्या तर्फे प्रदान केले गेले त्या सर्वांवर ईमान ( विश्वास) राखले,आम्ही त्यांच्यापैकी कोणाच्याही दरम्यान फरक करीत नाही आणि आम्ही सर्वश्रेष्ठ अल्लाहचे आज्ञधारक आहोत.''

**८५.** आणि जो कोणी इस्लामऐवजी अन्य एखाद्या दीन-धर्माचा शोध करील त्याचा तो दीन-धर्म कबूल केला जाणार नाही आणि तो आखिरतमध्ये तोटा उचलणाऱ्यांपैकी राहील.

**८६.** अल्लाह कशाप्रकारे त्या लोकांना मार्गदर्शन करील, जे स्वतः ईमान राखल्यानंतर, पैगंबरांची सत्यता जाणण्याची साक्ष दिल्यानंतर आणि आपल्या स्वतःजवळ स्पष्ट निशाणी येऊन पोहोचल्यानंतरही इन्कारी व्हावेत. अल्लाह अशा अत्याचारींना सरळ मार्ग दाखवित नाही.

**८७.** त्यांची शिक्षा ही की, त्यांच्यावर अल्लाहचा धिःक्कार आहे आणि फरिश्त्यांचा व समस्त लोकांतर्फेही धिःक्कार आहे.

**८८.** ते सदैव त्यात राहतील ना त्यांची सजा हलकी (सौम्य) केली जाईल आणि ना त्यांना कसली सूट दिली जाईल.

**८९.** परंतु जे लोक यानंतर तौबा (क्षमा-याचना) करून (आपल्या आचरणात) सुधार

करून घेतली तर निःसंशय, अल्लाह मोठा माफ करणारा, मेहरबान आहे.

**९०.** निःसंशय, जे लोक स्वतः ईमान राखल्यानंतर कुफ्र (इन्कार) करतील मग इन्कार करण्यात अधिक पुढे जातील तर त्यांची तौबा (क्षमा-याचना) कधीही कबूल केली जाणार नाही आणि हेच लोक मार्गभ्रष्ट आहेत.

**९१.** निःसंशय, जे लोक काफिर (इन्कारी, अविश्वासी) असतील, आणि मरेपर्यंत काफिर राहतील, त्यांच्यापैकी जर कोणी अज़ाबपासून सुटका मिळविण्यासाठी दंड (फिदिया) म्हणून जमिनीइतके सोने देईल, तरीही ते कधीही स्वीकारले जाणार नाही. अशाच लोकांकरिता सक्त अज़ाब (अतिशय कठोर शिक्षा-यातना) आहे आणि त्यांचा कोणी मदतकर्ता नाही.

**९२.** जोपर्यंत तुम्ही आपल्या आवडत्या व प्रिय धन-संपत्तीतून अल्लाहच्या मार्गात खर्च न कराल, तोपर्यंत तुम्हाला भलाई लाभणार नाही, आणि जे काही तुम्ही खर्च कराल, अल्लाह ते चांगल्या प्रकारे जाणतो.

**९३.** तौरात (हा ग्रंथ) उतरण्यापूर्वीच (हजरत) याकूब यांनी ज्या वस्तूला स्वतःसाठी हराम करून घेतले होते, त्याच्याव्यतिरिक्त सर्व खाद्यवस्तू इस्राईलच्या संततीकरिता हलाल होत्या. (हे पैगंबर!) तुम्ही त्यांना सांगा की तुम्ही सच्चे असाल तर तौरात आणा, आणि वाचून ऐकवा.

**९४.** तरीही जे लोक सर्वश्रेष्ठ अल्लाहवर खोटा आरोप लावतील तर असे लोक अत्याचारी आहेत.

**९५.** तुम्ही सांगा की अल्लाह आपल्या कथनात सच्चा आहे. तुम्ही सर्व इब्राहीमच्या जनसमूहाच्या मार्गाचे अनुसरण करा, जे मूर्तिपूजक नव्हते.

**९६.** निःसंशय, (सर्वश्रेष्ठ अल्लाहचे) पहिले घर, जे लोकांसाठी बनविले गेले, तेच आहे, जे मक्का येथे आहे, जे साऱ्या जगाकरिता शुभ- मंगलप्रद आणि मार्गदर्शक आहे.

**९७.** ज्यात स्पष्ट निशाण्या आहेत. 'मुकामे इब्राहीम' (एक दगड आहे, ज्यावर काबागृहाचे बांधकाम करताना हजरत इब्राहीम उभे राहात) इथे जो कोणी दाखल झाला, त्याला शांती लाभली. अल्लाहने त्या लोकांवर, जे या घरापर्यंत येण्याचे सामर्थ्य राखतात,[१] या घराचे हज्ज आवश्यक ठरविले आहे आणि जो कोणी इन्कार करील तर सर्वश्रेष्ठ अल्लाहला सर्व जगाच्या लोकांची काही पर्वा नाही.

**९८.** तुम्ही त्यांना सांगा, हे ग्रंथधारकांनो! तुम्ही अल्लाहच्या आयतींचा इन्कार का करता? आणि तुम्ही जे काही करता, अल्लाह त्यावर साक्षी आहे.

**९९.** त्या ग्रंथधारकांना सांगा की तुम्ही अल्लाहच्या मार्गा (धर्मा) पासून त्या लोकांना का रोखता, ज्यांनी ईमान राखले आहे, आणि त्यात वाईटपणा शोधता, वास्तविक तुम्ही

(१) 'सामर्थ्य राखतात'चा अर्थ असा की प्रवास-खर्चाची ऐपत असावी, म्हणजे इतके धन असावे की जाण्या-येण्याचा खर्च सहजपणे पूर्ण व्हावा याशिवाय हेही आहे की मार्गात शांती व सुरक्षितता असावी आणि प्राण-वित्त सुरक्षित राहावे. तसेच तब्येत प्रवास मानवेल अशी असावी. याखेरीज स्त्रीच्या सोबत, ज्याच्याशी लग्नसंबंध होऊ शकत नाही असा एखादा नातेवाईक असावा.

स्वतः साक्षी आहात आणि अल्लाह तुमच्या कर्मांशी अनभिज्ञ नाही.

**१००.** हे ईमान राखणाऱ्यांनो! जर तुम्ही ग्रंथधारकांच्या एखाद्या समूहाचे म्हणणे ऐकाल तर तुम्ही ईमान राखल्यानंतरही तो तुम्हाला इन्कार (कुफ्र) कडे फिरवील.

**१०१.** आणि (अर्थात हे कारण आहे) तुम्ही कशा प्रकारे इन्कार करू शकता, वास्तविक तुम्हाला अल्लाहच्या आयती वाचून ऐकविल्या जातात, आणि तुमच्या दरम्यान पैगंबर (सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) हजर आहेत, आणि जो अल्लाहच्या दीन-धर्माला मजबूतपणे धरेल तर निःसंशय त्याला सरळमार्ग दाखविला गेला आहे.

**१०२.** हे ईमानधारकांनो! अल्लाहचे एवढे भय राखा, जेवढे त्याचे भय राखले पाहिजे आणि पाहा मरेपर्यंत ईमानधारकच राहा.

**१०३.** आणि अल्लाहचा दोर सर्वांनी मिळून मजबूतपणे धरून ठेवा, आणि आपसात गटबाजी करू नका आणि अल्लाहची त्या वेळीची नेमत आठवा जेव्हा तुम्ही आपसात एकमेकांचे शत्रू होते. अल्लाहने तुमच्या हृदयात प्रेम निर्माण केले आणि तुम्ही त्याच्या कृपा देणगीने बांधव झाले आणि तुम्ही आगीच्या खड्ड्याच्या किनाऱ्यापर्यंत पोहोचले होते तेव्हा अल्लाहने तुम्हाला वाचविले. सर्वश्रेष्ठ अल्लाह अशा प्रकारे आपल्या आयतींचे निवेदन करतो यासाठी की तुम्ही मार्गदर्शन प्राप्त करू शकावे.

**१०४.** आणि तुमच्यापैकी एक समूह असा असला पाहिजे, ज्याने भल्या कामांकडे बोलवावे आमि सत्कर्मांचा आदेश द्यावा आणि वाईट कामांपासून रोखावे आणि हेच लोक सफल होणारे आहेत.

**१०५.** आणि तुम्ही त्या लोकांसारखे होऊ नका, ज्यांनी आपल्याजवळ स्पष्ट प्रमाण येऊन पोहोचल्यानंतर ही फूट पाडली व मतभेद करू लागले, अशा लोकांसाठी सक्त सजा-यातना आहे.

**१०६.** त्या दिवशी काही चेहरे सफेद (तेजस्वी) असतील आणि काही चेहरे काळे[१] असतील. काळ्या चेहऱ्यांच्या लोकांना सांगितले जाईल की तुम्ही ईमान राखल्यानंतर

---

(१) हज़रत इब्ने अब्बास (रजि.) यांनी यास अहले सुन्नत वल जमात आणि अहले बिदअत (धर्मात नव्या गोष्टी, रुढी, प्रथांचा समावेश करणारे) अभिप्रेत घेतले आहेत (इब्ने कसीर आणि फतहुल कदीर) यावरून हे कळते की इस्लाम तोच आहे, ज्यावर अहले सुन्नत वल जमात काम करीत आहे

कुफ्र (इन्कार, अविश्वास) का केला ? आता आपल्या इन्कार करण्याची सजा चाखा.

**१०७.** आणि सफेद (तेजस्वी) चेहऱ्यांचे लोक अल्लाहच्या दयेत (कृपाछत्राखाली) असतील आणि त्यात नेहमी नेहमी राहतील.

**१०८.** (हे पैगंबर!) आम्ही या सत्य आयती तुम्हाला वाचून ऐकवित आहोत, आणि लोकांवर जुलूम अत्याचार करण्याचा, अल्लाहचा इरादा नाही.

**१०९.** आणि जे काही आकाशांमध्ये व धरतीवर आहे ते सर्व अल्लाहचेच आहे. अल्लाहच्याकडेच सर्व कामांना रुजू व्हायचे आहे.

**११०.** तुमचा जनसमूह, सर्वोत्तम जनसमूह आहे, जो लोकांसाठी निर्माण केला गेला आहे, कारण तुम्ही सत्कर्मांचा आदेश देता आणि दुष्कर्मांपासून रोखता आणि अल्लाहवर ईमान राखता. जर ग्रंथधारकांनीही ईमान राखले असते तर त्यांच्यासाठी फार चांगले झाले असते. त्यात काही ईमान बाळगणारेही आहेत परंतु अधिकांश लोक दुराचारी आहेत.

**१११.** असे लोक तुम्हाला सताविण्याखेरीज आणखी जास्त काही नुकसान पोहचवू शकत नाहीत आणि जर तुमच्याशी लढाई झाली तर पाठ दाखवून पळ काढतील. मग कोणी त्यांची मदत करायला येणार नाही.

**११२.** असे लोक प्रत्येक ठिकाणी अपमानित होत राहतील, तथापि अल्लाहच्या किंवा लोकांच्या आश्रयाखाली असतील तर गोष्ट वेगळी. मात्र हे लोक अल्लाहच्या प्रकोपास पात्र ठरले आणि त्यांच्यावर दारिद्य आणि दुर्दशा टाकली गेली. हे अशासाठी झाले की हे लोक अल्लाहच्या आयातींचा इन्कार करीत होते, आणि पैगंबरांची नाहक हत्या करीत होते. हा मोबदला त्यांच्या आज्ञाभंगाचा आणि मर्यादा पार करण्याचा आहे.

**११३.** हे सर्वच्या सर्व एकसमान नाहीत, किंबहुना या ग्रंथधारकांत एक समूह (सत्यावर) कायमही आहे, जे रात्री अल्लाहच्या आयतींचे पठण करतात व सजदा (अल्लाहसमोर माथा टेकत) करीत असतात.

---

आणि अहले बिदअत व विरोधक लोक इस्लामच्या त्या देणगीपासून वंचित आहे, जी मोक्षप्राप्तीची सबब आहे.

**११४.** हे लोक अल्लाह आणि कयामतच्या दिवसावर ईमान राखतात, सत्कर्मांचा आदेश देतात आणि दुष्कर्मांपासून रोखतात आणि भल्या कामांमध्ये घाई करतात. हे नेक व सदाचारी लोकांपैकी आहेत.

**११५.** आणि हे जे काही नेकीचे काम करतील, त्याची उपेक्षा केली जाणार नाही आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह, परहेजगार (अल्लाहचे भय राखून वागणाऱ्या) लोकांना चांगल्या प्रकारे जाणतो.

**११६.** निःसंशय, इन्कारी लोकांना त्यांची धन-संपत्ती आणि त्यांची संतती अल्लाहच्या इथे काहीच उपयोगी पडणार नाही. हे तर जहन्नमी (नरकवासी) आहेत, ज्यात ते नेहमी पडून राहतील.

**११७.** ते जे काही या ऐहिक जीवनात खर्च करतात, ते त्या वादळासारखे आहे, ज्यात कडाक्याची थंडी असावी, जे एखाद्या जुलमी जनसमूहाच्या शेतावरून जावे आणि त्याचा सर्वनाश करून टाकावा[१] अल्लाहने त्यांच्यावर अत्याचार नाही केला, उलट ते स्वतः आपल्या प्राणांवर अत्याचार करीत होते.

**११८.** हे ईमान राखणाऱ्यांनो! तुम्ही आपला जीवलग मित्र ईमानधारकांशिवाय दुसऱ्या कोणाला बनवू नका (तुम्ही नाही पाहत दुसरे लोक तर) तुमचा सर्वनाश करण्यात काहीच कसर बाकी ठेवत नाही. ते तर असे इच्छितात की तुम्ही दुःखातच पडून राहावे. त्यांची शत्रूता तर स्वतः त्यांच्या तोंडून उघड झाली आहे आणि त्यांच्या मनात जे काही आहे ते तर आणखी जास्त आहे. आम्ही आपल्या आयती तुम्हाला स्पष्ट करून सांगितल्या तुम्ही अक्कलवान असाल (तर काळजी घ्या)

**११९.** तुम्ही तर असे आहात की त्यांच्याशी प्रेम राखता, पण ते तुमच्याशी प्रेम राखत

---

(१) कयामतच्या दिवशी काफिरांना अर्थात इन्कारी लोकांना, ना त्यांची धन-संपत्ती कामी येईल, ना त्यांची मुले.येथेपर्यंत की भल्या कामात खर्च केलेले धनदेखील व्यर्थ ठरेल आणि त्यांची तुलना त्या कडाक्याच्या थंडीसारखी आहे, जी हिरव्या टवटवीत शेतीला जाळून तिचा सर्वनाश करते. त्यापूर्वी अत्याचारी लोक आपली डोलणारी शेते पाहून खूप आनंदित होत असत आणि मोठ्या फायद्याची आशा धरत की अचानक त्यांच्या आशा अपेक्षा धुळीस मिळतात. थात्पर्य, जोपर्यंत ईमान नसेल, तोपर्यंत भल्या कामांसाठी खर्च करणाऱ्यांची या जगात कितीही प्रसिद्धी व प्रशंसा का होईना, आखिरतमध्ये त्यांना याचा काडीमात्र मोबदला मिळणार नाही. तिथे तर त्यांच्यासाठी दररोज जहन्नमच्या आगीत निरंतर जळत राहण्याची महाभयंकर शिक्षा (अज़ाब) आहे.

नाहीत, तुम्ही अल्लाहचा संपूर्ण ग्रंथ मानून घेता आणि (ते नाही मानत, तर मग प्रेम कसे?) हे तुमच्यासमोर तर आपले ईमान कबूल करतात, परंतु जेव्हा एकटे असतात तेव्हा रागाने आपल्या बोटांचा चावा घेतात. त्यांना सांगा, मराल असेच रागाच्या भरात! सर्वश्रेष्ठ अल्लाह मनातल्या सुप्त गोष्टीही चांगल्या प्रकारे जाणतो.

**१२०.** जर तुम्हाला एखादी भलाई लाभते तर त्यांना मोठे वाईच वाटते, मात्र जेव्हा दुःख यातना पोहचते तेव्हा मात्र खूप आनंदित होतात. जर तुम्ही सबुरी (धीर-संयम) राखाला आणि स्वतःला दुराचारापासून दूर ठेवत राहाल तर त्यांची कूटनीती तुम्हाला काहीच नुकसान पोहचविणार नाही, सर्वश्रेष्ठ अल्लाहने त्यांच्या कारवायांना घेरा टाकला आहे.

**१२१.** (हे पैगंबर! त्या वेळेचे स्मरण करा) जेव्हा सकाळी सकाळी तुम्ही आपल्या घराबाहेर पडून ईमानधारकांना लढाईच्या मोर्चावर ठाव ठिकाण दाखवून बसवित होते आणि अल्लाह सर्वकाही ऐकणारा व जाणणारा आहे.

**१२२.** जेव्हा तुमच्यातल्या दोन गटांचे पाय डगमगू लागले, जेव्हा अल्लाह त्या दोघांचा मदत करणारा हजर होता आणि त्याच अल्लाहवर ईमानधारकांनी भरोसा राखला पाहिजे.

**१२३.** आणि अल्लाहने बद्रच्या युद्धात तुमची अशा वेळी मदत केली, जेव्हा तुम्ही खूप हलाखीच्या अवस्थेत होते, यास्तव अल्लाहचे भय राखा, यासाठी की तुम्ही कृतज्ञशील व्हावे.

**१२४.** जेव्हा तुम्ही ईमानधारकांना धीर देत होते, काय तुमच्यासाठी हे पुरेसे नाही की अल्लाहने तीन हजार फरिश्ते उतरवून तुमची मदत करावी.

**१२५.** का नाही? जर तुम्ही धीर-संयम आणि दुराचारापासून अलिप्तता पत्कराल आणि त्याच क्षणी हे लोक तुमच्याजवळ आल्यास, तुमचा पालनकर्ता, पाच हजार फरिश्त्यांद्वारे तुमची मदत करेल, जे निशाणी असलेले असतील.

**१२६.** आणि आम्ही याला तुमच्यासाठी फक्त शुभ-समाचार आणि तुमच्या मनाच्या समाधानाकरिता बनविले, अन्यथा मदत तर वर्चस्वशाली, हिकमतशाली अल्लाहकडूनच असते.

**१२७.** (अल्लाहच्या या मदतीचा उद्देश हा होता की, अल्लाहने) इन्कारी लोकांचा एक गट कापून टाकावा किंवा त्यांना अपमानित करून टाकावे आणि मग त्यांनी असफल होऊन परत फिरावे.

**१२८.** (हे पैगंबर!) तुमच्या अखत्यारीत काही एक नाही[१] अल्लाह इच्छिल तर त्यांची तौबा (क्षमा-याचना) कबूल करील किंवा त्यांना सजा देईल, कारण ते अत्याचारी लोक आहेत.

**१२९.** आकाशांमध्ये आणि धरतीवर जे काही आहे, सर्व अल्लाहचेच आहे, तो ज्याला इच्छिल माफ करील आणि ज्याला इच्छिल अज़ाब (शिक्ष-यातना) देईल आणि अल्लाह माफ करणारा, दया करणारा आहे.

**१३०.** हे ईमान राखणाऱ्यांनो! दुप्पट, तिप्पट करून व्याज खाऊ नका, आणि अल्लाहचे भय बाळगा, यासाठी की तुम्हाला सफलता लाभावी.

**१३१.** आणि त्या आगीचे भय राखा, जी काफिरांसाठी तयार केली गेली आहे.

**१३२.** आणि अल्लाह आणि त्याच्या पैगंबरांच्या आदेशांचे पालन करा, यासाठी की तुमच्यावर मेहरबानी केली जावी.

**१३३.** आणि आपल्या पालनकर्त्याच्या माफीकडे आणि त्या जन्नतकडे धाव घ्या, जिचा विस्तार आकाशांच्या व जमिनीच्या इतका आहे, जी दुराचारापासून दूर राहणाऱ्यांकरिता तयार केली गेली आहे.

---

(१) अर्थात त्या काफिरांना मार्गदर्शन करणे किंवा त्यांच्याबाबत एखादा निर्णय घेण्याचा अधिकार अल्लाहला आहे. हदीस वचनानुसार ओहदच्या युद्धात पैगंबर (स.) यांचे दात शहीद झाले आणि चेहराही जखमी झाला. तेव्हा पैगंबर म्हणाले, हा जनसमूह सफल कसा होईल, ज्याने आपल्या पैगंबराला घायाळ केले. पैगंबरांनी त्यांच्या सन्मार्गप्राप्तीबाबत नाउमेदी व्यक्त केली. या अनुषंगाने ही आयत उतरली. अन्य कथनांनुसार पैगंबरांनी काफिरांसाठी कुनूते नाजिलाचा इतमाम केला ज्यात त्यांच्यासाठी बद्दुआ (शाप) दिला, त्यावर ही आयत उतरली, तेव्हा त्यांनी बद्दुआ देणे बंद केले. (इब्ने कसीर व फतहूल कदीर)
या आयतीद्वारे त्या लोकांनी बोध घेतला पाहिजे, जे पैगंबरांना सर्व समर्थ मानतात, वास्तविक एखाद्याला सन्मार्गावर आणणे हे त्यांच्या अवाख्यात नव्हते जरी त्यांना सन्मार्गाकडे बोलविण्यासाठी पाठविले गेले होते.

**१३४.** जे लोक सुसंपन्न अवस्थेत आणि तंगी-अडचणीच्या अवस्थेतही (अल्लाहच्या मार्गात) खर्च करतात, राग गिळून टाकतात आणि लोकांचे अपराध माफ करतात, अल्लाह अशा नेक सदाचारी लोकांना दोस्त राखतो.

**१३५.** जेव्हा त्यांच्याकडून एखादे वाईट कृत्य घडते किंवा ते एखादा अपराध करून बसतात, तेव्हा त्वरीत अल्लाहचे स्मरण आणि आपल्या अपराधआंची माफी मागतात आणि वास्तविक अल्लाहशिवाय अपराध माफ करणारा दुसरा कोण आहे? आणि ते जाणूनबुजून आपल्या कृत-कर्मावर अडून बसत नाहीत.

**१३६.** त्यांचा मोबदला त्यांच्या पालनकर्त्यातर्फे माफी आणि जन्नत आहे, जिच्याखाली नहरी (प्रवाह) वाहत आहेत, ज्यात ते नेहमी राहतील, आणि नेक-सदाचारी लोकांचा हा किती चांगला मोबदला आहे!

**१३७.** तुमच्या पूर्वीपासून नियम चालत आला आहे. तुम्ही जमिनीवर हिंडून फिरून पाहा की, ज्यांनी अल्लाहच्या आयतींचा इन्कार केला, त्यांचा कशा प्रकारे शेवट झाला.

**१३८.** लोकांकरिता हे एक फर्मान (निवेदन(आदेश)) आहे आणि अल्लाहचे भय राखून आचरण करणाऱ्यांकरिता मार्गदर्शन आणि उपदेश आहे.

**१३९.** तुम्ही हताश होऊ नका आणि दुःखी-कष्टी होऊ नका. तुम्ही (खरोखर) ईमान राखणारे असाल तर तुम्ही विजयी व्हाल.

**१४०.** (या युद्धात) जर तुम्ही जखमी झाले असाल तर तेदेखील (बद्रच्या युद्धआत) अशा प्रकारे जखमी झाले आहेत आणि या दिवसांना आम्ही लोकांच्या दरम्यान अलटत-पालटत राहतो, यासाठी की अल्लाहने ईमानधारकांना (वेगळे करून) पाहावे, आणि तुमच्यापैकी काहींना शहीद बनवावे, आणि अल्लाह अत्याचारी लोकांशी प्रेम राखत नाही.

**१४१.** आणि यासाठी की, अल्लाहने ईमानधारकांना अलग करून घ्यावे, आणि काफिरांचा (इन्कारी लोकांचा) सर्वनाश करून टाकावा.

**१४२.** काय तुम्ही हे गृहित धरले आहे की जन्नतमध्ये दाखल होऊन जाल, वास्तविक अल्लाहने अजून हे पाहिले नाही की तुमच्यापैकी कोण जिहाद (धर्मयुद्ध) करतात आणि कोण धीर-संयम राखतात.

**१४३.** आणि तुम्ही यापूर्वी मरणाची इच्छा धरत होते, आता तर तुम्ही मृत्युला आपल्या डोळ्यांनी पाहून घेतले.

**१४४.** आणि मुहम्मद तर केवळ एक रसूल (पैगंबर) आहेत. यापूर्वी अनेक रसूल होऊन गेलेत, मग जर ते मरण पावतील किंवा जीवे मारले जातील, तर काय तुम्ही (इस्लामकडे पाठ फिरवून) उलट पावली परत फिराल? आणि जो कोणी उलट पावली परत फिरेल तो अल्लाहला कसलेही नुकसान पोहचवू शकणार नाही आणि अल्लाह कृतज्ञशील लोकांना फार लवकर मोबदला प्रदान करेल.

**१४५.** आणि सर्वश्रेष्ठ अल्लाहच्या हुकूमाविना कोणताही जीव मरू शकत नाही, ठरलेली वेळ लिखित आहे. या जगाशी प्रेम राखणाऱ्यांना आम्ही थोडेसे या जगातच देऊन टाकतो आणि आखिरतचे पुण्य प्राप्त करू इच्छिणाऱ्यांना आम्ही तेदेखील प्रदान करतो आणि आभार मानणाऱ्यांना आम्ही लवकरच चांगला मोबदला प्रदान करू.

**१४६.** आणि अनेक पैगंबरांच्या सोबत(राहून)अनेक अल्लाहवाल्यांनी जिहाद (धर्मयुद्ध) केले आहे. त्यांनाही अल्लाहच्या मार्गात दुःख-यातना पोहचल्या, परंतु ना तर त्यांनी धैर्य सोडले, ना कमजोर पडले आणि ना प्रभावित (दबले गेले) झाले आणि अल्लाह धीर-संयम राखणाऱ्यांशी प्रेम राखतो.

**१४७.** आणि ते हेच म्हणत राहिले की, हे आमच्या पालनकर्त्या! आमच्या अपराधांना माफ कर आणि जर आमच्याकडून आमच्या कामांमध्ये नाहक काही जुलूम-अतिरेक झाला असेल तर तोही माफ कर आणि आम्हाला मजबूती प्रदान कर आणि आम्हाला इन्कारी लोकांच्या जनसमूहाच्या विरोधात सहायता प्रदान कर.

**१४८.** आणि सर्वश्रेष्ठ अल्लाहने त्यांना या जगाचाही मोबदला प्रदान केला आणि आखिरतच्या पुण्याची विशेषताही प्रदान केली, आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह सत्कर्म करणाऱ्यांना आपला दोस्त राखतो.

**१४९.** हे ईमान राखणाऱ्यांनो! जर तुम्ही इन्कारी लोकांचे म्हणणे मानाल तर ते तुम्हाला उलट पावली परत फिरवतील (अर्थात तुमच्या धर्मापासून अलग करतील) परिणामी तुम्ही तोट्यात राहाल.

**१५०.** किंबहुना अल्लाह तुमचा स्वामी आणि मालक आहे आणि तोच तुमचा सर्वोत्तम

सहाय्यकर्ता आहे.

**१५१.** आम्ही लवकरच इन्कारी लोकांच्या मनात भय निर्माण करू या कारणास्तव की ते अल्लाहच्या सोबत त्या चीज वस्तूंनाही सहभागी करतात, ज्यांच्याविषयी कोणतेही प्रमाण अल्लाहने उतरविले नाही,[१] त्यांचे ठिकाण जहन्नम आहे आणि त्या अत्याचारी लोकांचे वाईट ठिकाण आहे.

**१५२.** आणि अल्लाहने आपला वायदा खरा करून दाखविला, जेव्हा अल्लाहच्या हुकुमानुसार तुम्ही त्यांचा निःपात करीत होते, येथपर्यंत की, जेव्हा तुमची हिंमत खचत होती आणि आदेशाबाबत मतभेद करू लागले आणि आज्ञापालन केले नाही. हे सर्व तुम्ही त्यानंतर केले, जेव्हा अल्लाहने तुम्हाला तुमचा मनपसंत विजय दाखवून दिला होता. तुमच्यापैकी काहीजण या जगाचा लाभ इच्छित होते आणि काही आखिरतची इच्छा करीत होते. मग त्याने तुम्हाला शत्रूंकडून फिरविले, यासाठी की तुमची कसोटी घ्यावी आणि निःसंशय अल्लाहने तुमच्या चुका माफ केल्या आणि ईमानधारकांसाठी अल्लाह अतिशय मेहरबान, कृपावान आहे.

**१५३.** जेव्हा तुम्ही चढत जात होते आणि मागे वळून कोणाला पाहातही नव्हते, आणि अल्लाहचे रसूल (पैगंबर) तुम्हाला पाठीमागून हाक मारीत होते, तेव्हा तुम्हाला दुःखावर दुःख पोहचले, यासाठी की तुम्ही आपल्या हातून निसटलेल्या (विजया) वर दुःख न करावे आणि ना त्या (मानसिक आघात) वर, जो तुम्हाला पोहचला, आणि अल्लाह तुमच्या सर्व कर्मांना चांगले जाणतो.

---

(१) ईमानधारकांना पराभूत होतांना पाहून काफिरांच्या मनात हा विचार आला की, ही मुसलमानांचा खात्मा करण्याची चांगली संधी आहे. याप्रसंगी अल्लाहने त्यांच्या मनात ईमानधारकांचे भय टाकले, मग त्यांना आपला विचार पूर्ण करण्याचे धाडस झाले नाही (फतहूल कदीर) सहीहेन या हदीस संकलनात उल्लेख आहे की पैगंबर (स.) यांनी फर्माविले की मला पाच गोष्टी अशा प्रदान केल्या गेल्या आहेत, ज्या माझ्यापूर्वी कोणत्याही नबीला प्रदान केल्या गेल्या नाहीत. त्यापैकी एक ही की शत्रूच्या मनात एक महिन्याच्या अंतरापर्यंत माझे भय टाकून माझी मदत केली गेली आहे. तात्पर्य, पैगंबर (स.) यांचे भय स्थायी स्वरूपात शत्रूंच्या मनात रुजवले गेले. तसेच पैगंबर (स.) यांच्या सोबत त्यांच्या उम्मत (जनसमूहा) चे अर्थात मुसलमानांचेही भय अनेकेश्वरवाद्यांच्या मनात टाकले गेले. याला कारण त्यांचे, अल्लाहसोबत इतरांना सहभागी ठरविणे होय. कदाचित याच कारणाने मुसलमानांची एक मोठी संख्या अनेकेश्वरवाद्यांप्रमाणेच श्रद्धा आणि कर्मांमुळे, शत्रू त्यांना भिण्याऐवजी ते शत्रूला भितात.

**१५४.** मग त्या दुःखानंतर तुमच्यावर शांती अवतरित केली आणि तुमच्यापैकी एका समूहाला शांतीपूर्ण डुलकी येऊ लागली, तथापि काही लोक असेही होते ज्यांना केवळ आपल्या जीवाची धास्ती लागली होती. ते अल्लाहविषयी नाहक मूर्खतापूर्ण विचार करू लागले आणि म्हणू लागले की आम्हालाही काही हक्क (अधिकार) आहेत. तुम्ही त्यांना सांगा, काम तर सर्वच्या सर्व अल्लाहच्या अधिकारकक्षेत आहे. हे लोक आपल्या मनातले रहस्यभेद तुम्हाला नाही सांगत. ते म्हणतात की जर आम्हाला थोडासाही अधिकार असता तर या ठिकाणी जीवे मारले गेलो नसतो. तुम्ही सांगा, जर तुम्ही आपल्या घरांतही असते, तरीही ज्यांच्या नशिबी मारले जाणे लिहिले होते, ते वधस्थळाकडे चालत गेले असते. अल्लाहला तुमच्या मनातल्या गोष्टींची परीक्षा घ्यायची होती आणि जे काही तुमच्या मनात आहे त्यापासून तुम्हाला स्वच्छ-शुद्ध करायचे होते आणि अल्लाह अपरोक्ष (गैब) जाणणारा आहे. (मनात दडलेले रहस्यभेद तो चांगल्या प्रकारे जाणतो.)

**१५५.** ज्या दिवशी दोन समूह एकमेकांशी मुकाबल्यासाठी भिडले, आणि त्या वेळी तुमच्यापैकी ज्या लोकांनी पाठ दाखवली, हे लोक आपल्या काही कर्मांमुळे सैतानाच्या बहकविण्यात आले, पण तरीदेखील अल्लाहने त्यांना माफ केले. निःसंशय अल्लाह माफ करणारा, सहनशिल (बुर्दबार) आहे.

**१५६.** हे ईमान राखणाऱ्यांनो! तुम्ही त्यांच्यासारखे होऊ नका, जे कृतघ्न झाले, आणि त्यांच्या बांधवांबद्दल, जेव्हा ते जमिनीवर प्रवासाला किंवा जिहादकरिता निघाले, तेव्हा म्हणाले की जर ते आमच्याजवळ राहिले असते तर मेले नसते, ना मारले गेले असते[१] (त्यांच्या या विचाराचे कारण हे आहे की) अल्लाहने त्यांच्या मनात हळहळ निर्माण करावी. जीवन आणि मृत्यु केवळ अल्लाहच्या अवाख्यात आहे, आणि अल्लाह तुमच्या सर्व कर्मांना पाहत आहे.

**१५७.** जर तुम्ही अल्लाहच्या मार्गात शहीद व्हाला किंवा मरण पावाल तर अल्लाहची माफी आणि दया कृपा त्या (धन-संपत्ती) पेक्षा चांगली आहे, जी ते जमा करीत

---

(१) ईमानधारकांना, इन्कारी व ढोंगी मुसलमानांसारखे ईमान राखण्यास मनाई केली जात आहे, कारण असे ईमान भेकडपणाचे लक्षण आहे. याउलट जेव्हा अटळ विश्वास असावा की जीवन-मृत्यु अल्लाहच्याच हाती आहे, तसेच मृत्युची वेळही निर्धारीत आहे, तर अशाने माणसाच्या अंगी निश्चय धैर्य आणि अल्लाहच्या मार्गात संघर्ष करण्याची भावना निर्माण होते.

आहेत.[1]

**१५८.** आणि तुम्ही मरण पावाल किंवा मारले जाल (कोणत्याही स्थितीत) तुम्हाला अल्लाहच्या जवळच एकत्र व्हायचे आहे.

**१५९.** अल्लाहच्या कृपेमुळे तुम्ही त्यांच्यासाठी कोमल बनले आहात आणि जर तुम्ही फटकळ तोंडाचे आणि कठोर मनाचे असते तर हे सर्व तुमच्या जवळून दूर पळाले असते, यास्तव त्यांना माफ करा आणि त्यांच्यासाठी क्षमा-याचना करा आणि कामासंबंधी त्यांच्याशी सल्लामसलत करा. मग जेव्हा तुमचा इरादा पक्का होईल तेव्हा अल्लाहवर भरोसा करा, आणि अल्लाह भरोसा करणाऱ्यांना आपला दोस्त राखतो.

**१६०.** जर अल्लाह तुम्हाला मदत करील तर कोणीही तुमच्यावर वर्चस्वशाली ठरू शकत नाही आणि जर तो तुम्हाला सोडून देईल तर असा कोण आहे जो तुम्हाला मदत करील? आणि ईमान राखणाऱ्यांनी अल्लाहवरच भरोसा ठेवला पाहिजे.

**१६१.** आणि हे अगदी असंभव आहे की पैगंबरांनी काही लपवून ठेवावे. प्रत्येक लपवून ठेवणारा कयामतच्या दिवशी आपले लपवून ठेवलेले घेऊन हजर होईल, मग प्रत्येक माणसाला आपल्या कर्माचा पुरेपूर मोबदला दिला जाईल आणि त्यांच्यावर अत्याचार केला जाणार नाही.

**१६२.** काय तो मनुष्य, ज्याने अल्लाहच्या मार्गाचे अनुसरण केले, त्या माणसासारखे आहे, जो अल्लाहचा प्रकोप घेऊन परतला? आणि त्याचे ठिकाण जहन्नम आहे आणि ते अतिशय वाईट ठिकाण आहे.

**१६३.** अल्लाहच्या जवळ त्यांचे वेगवेगळे दर्जे आहेत आणि त्यांच्या समस्त कर्मांना अल्लाह चांगल्या प्रकारे पाहात आहे.

**१६४.** निःसंशय, ईमानधारकांवर अल्लाहचा मोठा उपकार आहे की त्याने

---

(१) मृत्यु तर अटळ आहे, परंतु जर मृत्यु असा यावा की त्यानंतर मनुष्य अल्लाहच्या माफी आणि दया-कृपेस पात्र ठरावा तर हे या जगाच्या धन-दौलतीपेक्षा अधिक चांगले आहे, जिला जमा करण्यात मनुष्य संपूर्ण आयुष्य खपवितो. यास्तव अल्लाहच्या मार्गात संघर्ष करण्यापासून मागे हटू नये याच्याशी लगाव असला पाहिजे, कारण याद्वारे अल्लाहतर्फे माफी आणि दया-कृपा प्राप्त होते. तथापि यासोबत मनाचे पावित्र्यही आवश्यक आहे.

त्यांच्यातूनच एक रसूल त्यांच्यामध्ये पाठविला, जो त्यांना अल्लाहच्या आयती वाचून ऐकवितो आणि त्यांना पाक (पवित्र) करतो, आणि त्यांना ग्रंथ आणि अकलेच्या गोष्टी शिकवितो आणि निःसंशय, हे सर्व त्यापूर्वी उघडपणे भटकलेले होते.

**१६५.** हे काय की जेव्हा तुमच्यावर एक संकट कोसळले, ज्याच्या दुप्पट तुम्ही त्यांना पोहचविले, तर तुम्ही म्हणाले की हे कोठून आले? (हे पैगंबर!) तुम्ही सांगा की हे संकट तुम्ही स्वतः आपल्यावर ओढवून घेतले आहे. निःसंशय, अल्लाह प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्य बाळगतो.

**१६६.** आणि दोन्ही समूह मुकाबल्यासाठी ज्या दिवशी एकमेकांशी भिडले तेव्हा तुम्हाला जे काही पोहचले तर हे अल्लाहच्या आदेशाने पोहोचले, आणि यासाठी की अल्लाहने ईमानधारकांना उघडपणे जाणून घ्यावे.

**१६७.** आणि ढोंगी (वरकरणी) मुसलमानांनाही जाणून घ्यावे ज्यांना सांगितले गेले की या, अल्लाहच्या मार्गात लढा किंवा शत्रूच्या हल्ल्यापासून बचाव करा, तेव्हा ते म्हणाले की आम्हाला जर हे माहीत असते की लढाई होईल तर अवश्य तुम्हाला साथ दिली असती. ते त्या दिवशी ईमानाच्या तुलनेत कुफ्र (इन्कारा) च्या अधिक जवळ होते. आपल्या मुखाने अशी गोष्ट बोलत होते, जी त्यांच्या मनात नव्हीत आणि अल्लाह ते जाणतो, जे हे लपवितात.

**१६८.** हेच ते लोक होत जे स्वतः घरात बसून राहिले आणि आपल्या बांधवांबद्दल म्हणाले, की त्यांनी जर आमचे म्हणणे ऐकून घेतले असते तर जीवे मारले गेले नसते. त्यांना सांगा की तुम्ही सच्चे असाल तर आपल्यावरून मृत्युला टाळून दाखवा.

**१६९.** आणि जे लोक अल्लाहच्या मार्गात ठार केले गेले त्यांना मृत (मेलेले) समजू नका, किंबहुना ते जिवंत आहेत. त्यांना त्यांच्या पालनर्त्याजवळून रोजी (अन्न-सामग्री) दिली जात आहे.

**१७०.** सर्वश्रेष्ठ अल्लाहने त्यांना आपली जी कृपा प्रदान केली आहे, तिच्याद्वारे ते फार आनंदित आहेत आणि त्या लोकांबाबत आनंद साजरा करीत आहे जे अद्याप त्यांच्याजवळ पोहोचतले नाहीत, त्यांच्या मागे आहेत. या गोष्टीबद्दल की त्यांना ना कसले भय आहे आणि ना कसले दुःख.

**१७१.** ते अल्लाहच्या कृपा देणगीने खूश होतात आणि या गोष्टीनेही की अल्लाह ईमानधारकांचा मोबदला वाया जाऊ देत नाही.

**१७२.** ज्या लोकांनी जखमी अवस्थेतही अल्लाह आणि रसूलचा आदेश मानला त्यांच्यापैकी जे सत्कर्म करीत राहिले आणि अल्लाहचे भय राखून दुराचारापासून दूर राहिले, त्यांच्यासाठी फार मोठा मोबदला आहे.

**१७३.** हे ते लोक आहेत, ज्यांना भीती दाखवली गेली की लोक तुमच्यासाठी एकत्र झाले आहेत, तेव्हा तुम्ही त्यांचे भय राखा परिणामी त्यांचे ईमान आणखी वाढले आणि ते म्हणाले की अल्लाह आमच्यासाठी पुरेसा आहे आणि तो सर्वोत्तम संरक्षक आणि कार्य पार पाडणारा आहे.

**१७४.** (तात्पर्य) ते अल्लाहच्या कृपा देणगीसह परतले. त्यांना कसलेही दुःख पोहोचले नाही, त्यांनी अल्लाहच्या मर्जीचा मार्ग पत्करला आणि अल्लाह मोठा कृपाशील आहे.

**१७५.** हा सैतानच आहे, जो आपल्या मित्रांद्वारे भयभीत करतो, यास्तव त्यांचे भय बाळगू नका, फक्त माझेच भय राखा जर तुम्ही ईमानधारक असाल.

**१७६.** जे शीघ्रतेने कुफ्र (इन्कार करण्यात) फसत जात आहेत, त्याच्याबाबत तुम्ही दुःखी होऊ नका. अल्लाहचे ते काहीच बिघडवू शकणार नाहीत. आखिरतच्या वेळी अल्लाह त्यांना काहीच हिस्सा देऊ इच्छित नाही आणि अशा लोकांसाठी महाभयंकर अज़ाब (शिक्षा-यातना) आहे.

**१७७.** ईमानच्या बदल्यात कुफ्र खरेदी करणारे लोक, अल्लाहला कदापि कोणतेही नुकसान पोहचवू शकत नाहीत आणि त्यांच्याचसाठी कठोर शिक्षा (अज़ाब) आहे.

**१७८.** काफिर (इन्कारी) लोकांनी या विचारात राहू नये की आमचे त्यांना सवड देणे त्यांच्यासाठी चांगले आहे, किंबहुना आम्हीही सवड अशासाठी देत आहोत की त्यांनी आणखी जास्त अपराध करावेत, आणि त्यांच्यासाठीच अपमानित करणारी शिक्षा-यातना आहे.[१]

---

(१) या आयतीत अल्लाहतर्फे सवड देण्याचा नियम सांगितला आहे. अर्थात अल्लाह आपल्या नियम व मर्जीनुसार काफिरांना सवड देतो. ठराविक अवधीकरिता त्यांना ऐहिक सुख-सुखसमृद्धी, धन-संपदा

**१७९.** ज्या अवस्थेत तुम्ही आहात, त्याच अवस्थेत, अल्लाह ईमानधारकांना सोडणार नाही, जोपर्यंत पवित्र आणि अपवित्र वेगवेगळे न करील, आणि अल्लाह असाही नाही की तुम्हाला अपरोक्षाद्वारे सूचित करील, परंतु अल्लाह आपल्या पैगंबरांमधून ज्याची इच्छितो निवड करतो. यास्तव तुम्ही अल्लाहवर आणि त्याच्या पैगंबरांवर ईमान राखा. जर तुम्ही ईमान राखाल आणि अपराधांपासून अलिप्त राहाल तर तुमच्यासाठी फार मोठा मोबदला आहे.

**१८०.** आणि ज्या लोकांना अल्लाहने आपल्या कृपेने धनवान केले आहे आणि ते तरीही कंजूषी करतात तर त्याला त्यांनी चांगले समजू नये, उलट ते त्यांच्या हक्कात अतिशय वाईट आहे. त्यांनी ज्या (धन-संपत्ती) त कंजूषी केली आहे, कयामतच्या दिवशी त्यांच्या गळ्यातले जोखंड (तौक) बनेल, आणि आकाशांचा व जमिनीचा वारस केवळ अल्लाह आहे आणि तो तुमच्या सर्व कर्मांची खबर राखतो.

**१८१.** निःसंशय, अल्लाहने त्या लोकांचे बोलणे ऐकून घेतले, जे असे म्हणाले की अल्लाह गरीब, गरजवान आहे आणि आम्ही गनी (श्रीमंत) आहोत, आम्ही त्यांचे हे कथन लिहून घेऊ आम्ही यांच्याद्वारे पैगंबरांच्या नाहक हत्येलादेखील. आणि आम्ही फर्माविणार की आता जळत राहण्याचा अज़ाब चाखा!

**१८२.** ही तुमची वाईट कर्मे आहेत आणि निःसंशय अल्लाह आपल्या दासांवर किंचितही अत्याचार करीत नाही.

**१८३.** ते म्हणाले, अल्लाहने आमच्याकडून वचन घेतले आहे की आम्ही एखाद्या पैगंबरावर ईमान न राखावे, जोपर्यंत तो आमच्यासमोर अशी कुर्बानी (बलिदान) आणत नाही, जिला आगीने खाऊन टाकावे. तुम्ही त्यांना सांगा की तुमच्याजवळ माझ्यापूर्वी पैगंबर प्रमाण आणि त्यासोबत तेही घेऊन आले जे तुम्ही सांगितले, तर मग तुम्ही त्यांची हत्या का केली, जर तुम्ही सच्चे असाल.

---

आणि संतती प्रदान करतो. लोकांना वाटते की त्यांच्यावर अल्लाहच्या दया-कृपेचा वर्षाव होत आहे. परंतु जर अल्लाहने प्रदान केलेल्या सुख-समृद्धीने लाभान्वित होणारी पुण्यप्राप्ती आणि अल्लाहच्या आज्ञापालनाचा मार्ग पत्करणार नाहीत तर हे ऐहिक सुख अल्लाहची कृपा-देणगी नाही, अल्लाहतर्फे देण्यात आलेली सवड आहे. ज्यामुळे त्यांच्या कुफ्रनीतीत आणि अवज्ञा करणयात उत्तरोत्तर वाढहोते. परिणामी शेवटी ते जहन्नमची महाभयंकर आगीची शिक्षा-यातना भोगण्यास पात्र ठरतात.

**१८४.** तरीही तर हे लोक तुम्हाला खोटे ठरवतील, तर तुमच्यापूर्वी अनेक पैगंबर खोटे ठरविले गेले, जे आपल्यासोबत स्पष्ट प्रमाण पोथी (सहीफे) आणि दिव्य-ग्रंथ घेऊन आले.

**१८५.** प्रत्येक जीवाला मृत्युचा स्वाद चाखावा लागणारच आहे, आणि कयामतच्या दिवशी तुम्हाला आपला मोबदला पुरेपूर दिला जाईल. परंतु जो मनुष्य आगीपासून दूर हटविला गेला आणि जन्नतमध्ये दाखल केला गेला, निःसंशय, तो सफल झाला आणि या जगाचे जीवन केवळ धोक्याची सामुग्री आहे.[१]

**१८६.** निःसंशय, तुमच्या धन आणि प्राणाद्वारे तुमची कसोटी घेतली जाईल आमि अवश्य तुम्हाला त्या लोकांची ज्यांना तुमच्यापूर्वी ग्रंथ दिला गेला आणि अनेकेश्वरवाद्यांची मनाला दुःख देणारी बोलणी ऐकावी लागतील, तथापि तुम्ही धीर-संयम राखाला आणि अल्लाहचा आदेश मानाल तर निश्चितच हे फार हिमतीचे काम आहे.

**१८७.** आणि जेव्हा सर्वश्रेष्ठ अल्लाहने ग्रंथधारकांकडून करार घेतला की तुम्ही ते सर्व लोकांना जरूर सांगाल आणि त्याला लपविणार नाही, पण तरीही त्या लोकांनी तो करार पाठीमागे टाकला आणि त्याला फार कमी किमतीवर विकून टाकले. त्यांचा हा व्यापार फार वाईट आहे.

**१८८.** ते लोक, जे आपल्या कारवायांवर खूश आहेत आणि असे इच्छितात की जे त्यांनी केले नाही, त्याबद्दलही त्यांची स्तुती-प्रशंसा केली जावी. तुम्ही त्यांना अज़ाब (शिक्षा-यातना) पासून मुक्त समजू नका. त्यांच्यासाठी तर दुःखदायक अज़ाब आहे.

**१८९.** आणि आकाशांचा आणि जमिनीचा स्वामी (मालक) अल्लाहच आहे आणि अल्लाह प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्य राखतो.

**१९०.** निःसंशय, आकाशांच्या आणि जमिनीच्या रचनाकार्यात आणि रात्र-दिवसाच्या

---

(१) या आयतीत एक अटळ सत्य सांगितले आहे की मृत्युला कोणीही टाळू शकत नाही, दुसरे असे की या जगात ज्याने देखील चांगले-वाईट कर्म केले त्याला त्याचा पुरेपूर मोबदला दिला जाईल, तिसरे म्हणजे सफलतेची सीमा सांगितली गेली आहे की खऱ्या अर्थाने सफल तो आहे, ज्याने या जगात राहून आपल्या पालनकर्त्याला प्रसन्न केले, चौथे हे की हे ऐहिक जीवन केवळ धोक्याची सामुग्री आहे. एक मृगजळ आहे, जो याच्या मोहपाशातून स्वतःला वाचवून निघाला तो भाग्यवान आहे आणि जो त्यात अडकला तो असफल आणि दुर्दैवी आहे.

आळीपाळीने ये-जा करण्यात, बुद्धिमानांकरिता निशाण्या आहेत.

**१९१.** जे लोक अल्लाहचे स्मरण उभे राहून, बसलेल्या अवस्थेत आणि आपल्या कुशीवर पहुडले असताना करतात आणि आकाशांच्या व जमिनीच्या निर्मितीवर विचार-चिंतन करतात (आणि म्हणतात) की हे आमच्या पालनकर्त्या! तू हे सर्व हेतुविना बनविले नाही. तू पवित्र आहे. तेव्हा तू आम्हाला आगीच्या अज़ाब (शिक्षा-यातने) पासून वाचव.

**१९२.** हे आमच्या पालनकर्त्या! तू ज्याला आगीत टाकले, निःसंशय तू त्याला अपमानित केले, आणि अत्याचारी लोकांचा कोणीही मदत करणारा नाही.

**१९३.** हे आमच्या पालनकर्त्या! आम्ही असे ऐकले की एक पुकारणारा ईमानाकडे बोलावित आहे की लोकांनो! आपल्या पालनकर्त्यावर ईमान राखा आणि आम्ही ईमान राखले. हे आमच्या पालनकर्त्या! आता तरी आमच्या अपराधांना क्षमा कर आणि आमच्या दुष्कर्मांना आमच्यापासून दूर कर आणि नेक सदाचारी लोकांसोबत आम्हाला मृत्यु दे.

**१९४.** हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला ते प्रदान कर ज्याचा वायदा तू आमच्याशी आपल्या पैगंबरांच्या तोंडून केला आहे, आणि आम्हाला कयामतच्या दिवशी अपमानित करू नकोस. निःसंशय तू आपल्या वायद्याविरूद्ध जात नाही.

**१९५.** यास्तव त्यांच्या पालनकर्त्याने त्यांची दुआ (प्रार्थना) कबूल केली (आणि फर्माविले) की तुमच्यापैकी कोणा कर्म करणाऱ्याच्या कर्माला, मग तो पुरुष असो की स्त्री, मी वाया जाऊ देत नाही. तुम्ही आपसात एकमेकांचे सहायक आहात, यास्तव ते लोक ज्यांनी (धर्मासाठी) स्थलांतर केले आणि ज्यांना आपल्या घरातून बाहेर घालविले गेले आणि ज्यांना माझ्या मार्गात कष्ट-यातना दिली गेली आणि ज्यांनी जिहाद केले आणि शहीद केले गेले, मी अवश्य त्यांची दुष्कर्मे त्यांच्यापासून दूर करीन आणि अवश्य त्यांना त्या जन्नतमध्ये नेईन, ज्यांच्या खाली प्रवाह वाहत आहेत. हा मोबदला आहे अल्लाहतर्फे आणि अल्लाहजवळच चांगला मोबदला आहे.

**१९६.** शहरांमध्ये काफिरांचे (इन्कारी लोकांचे) येणे-जाणे तुम्हाला धोक्यात न टाकावे.

**१९७.** हा तर फार अल्पसा फायदा आहे. त्यानंतर त्यांचे ठिकाण जहन्नम आहे, आणि ते फार वाईट ठिकाण आहे.

**१९८.** परंतु जे लोक आपल्या पालनकर्त्याचे भय बाळगत राहिले, त्यांच्यासाठी जन्नत आहे ज्यांच्या खाली प्रवाह वाहत आहेत, त्यात ते नेहमी नेहमी राहतील हे अल्लाहतर्फे अतिथ्य (पाहुणचार) आहे आणि पुण्य-कार्य करणाऱ्यांकरिता अल्लाहजवळ जे काही आहे ते सर्वाधिक चांगले आणि उत्तम आहे.

**१९९.** आणि ग्रंथधारकांपैकी काही लोक अवश्य असे आहेत जे अल्लाहवर ईमान राखतात आणि जे तुमच्यावर उतरविले गेले आहे आणि जे त्यांच्याकडे उतरविले गेले आहे त्यावर ईमान राखतात. अल्लाहचे भय बाळगून राहतात, आणि अल्लाहच्या आयतींना थोडे थोडे मोल घेऊन विकत नाहीत[१] त्यांचा मोबदला त्यांच्या पालनकर्त्याजवळ आहे. निःसंशय अल्लाह लवकरच हिशोब घेणार आहे.

**२००.** हे ईमानधारकांनो! तुम्ही धीर-संयम राखा आणि एकमेकांना मजबुती देत राहा आणि जिहाद (धर्मयुद्ध) साठी तयार राहा, यासाठी की तुम्ही सफलता प्राप्त करावी.

---

# सूरह निसा - ४

सूरह निसा मदीना येथे अवतरली आणि यात एकशे शहात्तर आयती आहेत आणि चोवीस रुकुउ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहरबान आणि दयावान आहे.

**१.** हे लोकांनो! आपल्या त्या पालनकर्त्याचे भय राखा, ज्याने तुम्हाला एकाच जीवापासून निर्माण केले आणि त्याच्यापासूनच त्याच्या पत्नीलाही निर्माण केले, आणि त्या दोघांपासून अनेक स्त्री-पुरुष पसरविले आणि त्या अल्लाहचे भय राखा, ज्याच्या नावाने तुम्ही एकमेकांकडे याचना करतात आणि नाते-संबंध तोडण्यापासूनही (स्वतःला वाचवा) निःसंशय, अल्लाह तुम्हा सर्वांची देखरेख करणारा आहे.

---

(१) या आयतीत ग्रंथधारकांच्या त्या समूहाबाबत उल्लेख आहे, ज्यांना पैगंबर मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्या प्रेषित्वावर ईमान राखण्याचे सद्‌भाग्य प्राप्त झाले. त्यांचे ईमान आणि ईमानाच्या गुणविशेषांचे वर्णन करून सर्वश्रेष्ठ अल्लाहने इतर ग्रंथधारकांपेक्षा त्यांना उत्तम ठरविले.

**२.** आणि अनाथांना त्यांची धन-संपत्ती देऊन टाका आणि अनाथांचा चांगला माल हडप करून त्याऐवजी खरबा माल देऊ नका. आणि आपल्या मालात (धनात) त्यांचा माल मिसळवून गिळंकृत करू नका. निःसंशय हा फार मोठा अपराध आहे.

**३.** आणि जर तुम्हाला हे भय वाटत असेल की अनाथ मुलींशी विवाह करून तुम्ही न्याय (वर्तन) करू शकणार नाहीत तर मग इतर स्त्रियांपैकी ज्या तुम्हाला चांगल्या वाटतील त्यांच्याशी तुम्ही विवाह करून घ्या. दोन-दोन, तीन-तीन, चार-चार, परंतु (अशा स्थितीत) न्याय न राखला जाण्याचे भय असेल तर एक (पत्नी) पुरेशी आहे अथवा तुमच्या मालकीच्या दासींना. हे अधिक निकट आहे की (असे केल्याने अन्यायाकडे आणि) एकतर्फी झुकण्यापासून वाचाल.

**४.** आणि स्त्रियांना त्यांचे महर (विवाहप्रसंगी वरातर्फे वधूसाठी निर्धारीत केलेली रक्कम) राजीखुशीने देऊन टाका आणि जर स्त्री आपल्या मर्जीने काही महर सोडून देईल तर तो उचित समजून खाऊ पिऊ शकता.

**५.** आपली ती धन-संपत्ती, जिला अल्लाहने तुमच्या जीवनाचा आधार बनविले आहे ती नादान व अक्कल नसलेल्यांना देऊ नका आणि त्यातून त्यांना खाऊ घाला, त्यांना कपडे-लत्ते द्या आणि त्यांच्याशी नरमीने बोला.

**६.** आणि अनाथांना ते वयात येइपर्यंत त्यांची देखरेख ठेवा आणि त्यांची परीक्षा घेत राहा. मग जेव्हा तुम्हाला त्यांच्यात सुधारणा व लायकी दिसून येईल, तेव्हा त्यांची संपत्ती त्यांच्या हवाली करा आणि ते मोठे होतील या भीतीने त्यांचे धन घाईघाईने उधळपट्टी करीत खाऊन टाकू नका. श्रीमंतांनी त्यांच्या संपत्तीबाबत असे करण्यापासून अलिप्त राहावे, तथापि गरीब असेल तर त्याने वाजवी रितीने खावे, मग जेव्हा तुम्ही त्यांना त्यांची संपत्ती सोपवाल तेव्हा साक्षी करून घ्या, आणि हिशोब घेण्यासाठी तर अल्लाह पुरेसा आहे.

**७.** आई-बाप आणि जवळच्या नातेवाईकांच्या संपत्तीत पुरुषांचा हिस्सा आहे, आणि स्त्रियांचाही (अर्थात जी धन-संपत्ती आई-वडील आणि जवळचे नातेवाईक मागे सोडून जातील), मग ती संपत्ती कमी असो किंवा जास्त (त्यात) हिस्सा ठरलेला आहे.[१]

(१) इस्लामच्या आगमनापूर्वी हादेखील अत्याचार होता की स्त्रियांना आणि लहान मुलांना वारस या नात्याने काहीच दिले जात नव्हते. केवळ मोठी मुले, जी लढण्यायोग्य असत तेच साऱ्या संपत्तीचे

**८.** आणि वाटणीच्या वेळी जेव्हा नातेवाईक, अनाथ आणि गरीब दुबळे येतील तर तुम्ही त्या संपत्तीतून त्यांनाही थोडे-फार द्या आणि त्यांच्याशी नरमीने बोला.

**९.** लोकांनी हा विचार केला पाहिजे की आपल्या मागे जर ते लहान लहान कमजोर मुलेबाळे सोडून मेले असते तर त्यांना आपल्या मुलांबद्दल कशी भीती वाटली असती, स्वतः आपल्यावर कयास(अंदाज) करून भय राखले पाहिजे आणि त्यांनी अल्लाहचे भय बाळगले पाहिजे आणि बोलताना यथायोग्य बोलले पाहिजे.

**१०.** जे लोक नाहक अत्याचारपूर्वक अनाथांची संपत्ती गिळंकृत करतात, ते आपल्या पोटात आग भरत आहेत आणि ते जहन्नममध्ये जातील.

**११.** सर्वश्रेष्ठ अल्लाह तुम्हाला तुमच्या संततीविषयी आदेश देतो की एका मुलाचा हिस्सा दोन मुलींच्या हिश्याइतका आहे. जर फक्त मुलीच असतील आणि त्या दोनपेक्षा जास्त असतील तर त्यांना, मयताने मागे सोडलेल्या संपत्तीमधून दोन तृतियांश हिस्सा मिळेल आणि जर एकच मुलगी असेल तर तिच्यासाठी अर्धा हिस्सा आहे आणि मयताच्या आई-बापापैकी प्रत्येकाला, त्याने मागे सोडलेल्या संपत्तीचा सहावा हिस्सा आहे. मयताला संतान असेल अथवा संतान नसेल, आणि आई-बाप वारसदार असतील तर मग त्याच्या आईचा तिसरा हिस्सा आहे. तथापि मयताचे जर अनेक भाऊ असतील तर मग त्याच्या आईचा सहावा हिस्सा आहे. हा हिस्सा मयताने केलेल्या मृत्युपत्रा (वसीयत) ची पूर्तता केल्यानंतर आहे किंवा त्याचे कर्ज फेडल्यानंतर. तुमचा पिता असेल किंवा तुमची मुले, पण तुम्ही नाही जाणत की त्यांच्यापैकी कोण तुम्हाला लाभ पोहचविण्यात जास्त जवळचा आहे. हे सर्व हिस्से अल्लाहतर्फे निर्धारीत केलेले आहेत. निःसंशय अल्लाह सर्व काही जाणणारा हिकमतशाली आहे.

**१२.** आणि तुमच्या पत्न्या, जी काही संपत्ती मागे सोडून जातील आणि त्यांना मुलेबाळे नसतील तर त्यात तुमचा अर्धा हिस्सा आहे आणि जर त्यांना मुलेबाळे असतील तर त्यांनी मागे सोडलेल्या संपत्तीत तुमचा चौथा हिस्सा आहे, मात्र त्यांनी केलेल्या मृत्युपत्राची पूर्तता झाल्यानंतर किंवा त्यांचे कर्ज फेडल्यानंतर आणि जी संपत्ती तुम्ही

---

उत्तराधिकारी मानले जात. या आयतीत सर्वश्रेष्ठ अल्लाहने फर्माविले की पुरुषांप्रमाणे स्त्रिया आणि लहान मुले-मुलीदेखील आपल्या माता-पित्याचे आणि नातेवाईकांचे वारसदार ठरतील. त्यांना वारसाहक्कापासून वंचित ठेवले जाणार नाही.

आपल्या मागे सोडून जाल, त्यात त्यांचा एक चतुर्थांश हिस्सा आहे जर तुम्हाला संतती नसेल, आणि जर तुम्हाला संतती असेल तर मग त्यांना तुम्ही मागे सोडलेल्या संपत्तीत आठवा हिस्सा मिळेल, मात्र तुम्ही केलेल्या मृत्युपत्राची पूर्तता झाल्यानंतर आणि तुमचे कर्ज फेडून झाल्यानंतर, आणि जर अशा पुरुष किंवा स्त्रीने मागे सोडलेल्या संपत्तीचा मामला आला, ज्याला आई-बाप किंवा मुलेबाळे नसतील, परंतु भाऊ-बहीण असतील तर त्यांच्यापैकी प्रत्येकाला सहावा हिस्सा मिळेल आणि जर याहून जास्त असतील तर एक तृतियांश संपत्तीत सर्वांचा हिस्सा राहील. मात्र त्याने केलेल्या मृत्युपत्राची पूर्तता झाल्यानंतर व कर्जाची अदायगी झाल्यानंतरच अशा प्रकारे की इतरांना नुकसान पोहचविले गेले नसावे. हे अल्लाहतर्फे निर्धारीत केलेले आहे आणि अल्लाह प्रत्येक गोष्ट जाणणारा आणि धर्य राखणारा आहे.

**१३.** या सर्वश्रेष्ठ अल्लाहने निर्धारीत केलेल्या सीमा आहेत आणि जो कोणी अल्लाह आणि त्याचे रसूल (पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) यांच्या आदेशाचे पालन करील, त्याला अल्लाह जन्नतमध्ये दाखल करील, ज्यांच्या खाली नहरी (प्रवाह) वाहत असतील, ज्यात ते नेहमी नेहमी राहतील, आणि ही फार मोठी सफलता आहे.

**१४.** आणि जो मनुष्य अल्लाहची आणि रसूल (सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) यांची अवज्ञा करील आणि अल्लाहने निर्धारीत केलेल्या सीमांचे उल्लंघन करील त्याला तो जहन्नममध्ये टाकील, ज्यात तो नेहमी नेहमी राहील. अशा लोकांकरिता अपमानदायक अज़ाब (शिक्षा-यातना) आहे.

**१५.** तुमच्या स्त्रियांपैकी ज्या व्यभिचार करतील तर त्यांच्याबद्दल आपल्यापैकी चार साक्षीदार बोलवून घ्या जर त्यांनी साक्ष दिली तर त्या स्त्रियांना घरात बंदिस्त करून ठेवा, येथपर्यंत की मृत्युने त्यांचे आयुष्य संपवावे, किंवा सर्वश्रेष्ठ अल्लाहने त्यांच्यासाठी एखादा दुसरा मार्ग काढावा.

**१६.** आणि तुमच्यापैकी जे दोनजण असे कृत्य करतील तर त्यांना दुःख-यातना द्या. जर ते तौबा (क्षमा-याचना) करतील आणि आपले आचरण सुधारतील तर त्यांना सोडून द्या. निःसंशय, सर्वश्रेष्ठ अल्लाह तौबा (क्षमा-याचना) कबूल करणारा आणि दया करणारा आहे.

**१७.** अल्लाह केवळ अशाच लोकांची तौबा कबूल करतो, जे अजाणतेपणी वाईट कृत्य

करून बसतात, पण लवकरच तसे कृत्य करणे सोडतात आणि अल्लाहजवळ माफी मागतात, जेव्हा अल्लाहदेखील त्यांची क्षमा-याचना स्वीकारतो अल्लाह सर्व काही जाणणारा बुद्धिमान आहे.

**१८.** आणि त्यांची तौबा कदापि कबूल नाही, जे दुष्कर्मांवर दुष्कर्म करीत जातात इतके की त्यांच्यापैकी एखाद्याचे मरण जवळ येऊन ठेपते, तेव्हा म्हणू लागतो की आता मी तौबा करतो! आणि अशा लोकांचीही तौबा कबूल केली जात नाही जे इन्कार करण्याच्या अवस्थेतच मरण पावतात. अशाच लोकांसाठी आम्ही सक्त अज़ाब (कठोर शिक्षा-यातना) तयार करून ठेवला आहे.

**१९.** हे ईमान राखणाऱ्यांनो! तुमच्यासाठी हे हलाल (वैध) नव्हे की जबरदस्तीने स्त्रियांचे, त्यांच्या मर्जीविरूद्ध वारसदार बनावे[१] आणि आपण दिलेले त्यांच्याकडून काही परत घ्यावे या हेतुने त्यांना रोखून ठेवू नका मात्र जर त्या उघडपणे एखादे दुष्कर्म आणि व्यभिचाराचे काम करतील तर गोष्ट वेगळी. त्यांच्याशी चांगले वर्तन राखा, मग त्या तुम्हाला नापसंत का असेनात, कारण फार शक्य आहे की तुम्ही एखाद्या गोष्टीला वाईट जाणावे आणि अल्लाहने तिच्यात मोठी भलाई आणि खूबी ठेवली असावी.

**२०.** आणि जर एका पत्नीच्या ठिकाणी तुम्ही दुसरी पत्नी करू इच्छित असाल तर त्यांच्यापैकी एखादीला तुम्ही धन-संपत्तीचा खजिना देऊन ठेवला असेल, तरीही त्यातून काही (परत) घेऊ नका. काय तुम्ही तिला बदनाम करून उघड अशा अपराधाने परत घ्याल?

**२१.** आणि तुम्ही ते कसे परत घ्याल? यानंतरही की तुम्ही एकमेकांशी सहवास केलेला आहे आणि त्या स्त्रियांनी तुमच्याकडून पक्का वायदा-करार घेतला आहे.

**२२.** आणि त्या स्त्रियांशी विवाह करू नका, ज्यांच्याशी तुमच्या पित्यांनी विवाह केला

---

(१) इस्लामच्या आगमनापूर्वी स्त्रियांवर हाही अत्याचार होत असे की एखाद्याच्या मृत्युनंतर त्याच्या घरचे लोक, मयताच्या मागे सोडलेल्या संपत्तीप्रमाणे तिच्या पत्नीचेही जबरदस्तीने उत्तराधिकारी बनत आणि स्वतः आपल्या मर्जीने तिच्या इच्छेविरूद्ध तिच्याशी विवाह करून घेत किंवा आपल्या भावाशी, पुतण्याशी विवाह करून देत. एवढेच नव्हे तर, सावत्र मुलगा आपल्या मरण पावलेल्या बापाच्या पत्नीशी विवाह करून घेई किंवा वाटल्यास तिला दुसऱ्या कोणाशी विवाह करण्याची परवानगी देत नसत. ती बिचारी संपूर्ण आयुष्य अशाच स्थितीत जगण्यास विवश होत असे. इस्लामने अत्याचारपूर्ण अशा सर्व पद्धतींना हराम (अवैध) ठरविले.

असेल, परंतु यापूर्वी जे झाले ते झाले हे निर्लज्जतेचे काम आणि कपटीपणामुळे आहे आणि मोठा वाईट (आचरणाचा) मार्ग आहे.

**२३.** तुमच्यावर हराम (निषिद्ध) केल्या गेल्या तुमच्या माता आणि कन्या, आणि तुमच्या बहिणी तुमच्या आत्या तुमच्या मावश्या , भावाच्या मुली, बहिणीच्या मुली आणि तुमच्या त्या माता, ज्यांनी तुम्हाला आपले दूध पाजले असेल आणि तुमच्या (आईच्या) दुधात सहभागी असलेल्या बहिणी, तुमची सासू आणि तुम्ही ज्यांचे पालनपोषण केले त्या मुली ज्या तुमच्या कुशीत (कडेवर) आहेत तुमच्या त्या स्त्रियांपासून ज्यांच्याशी तुम्ही सहवास केलेला आहे, परंतु जर तुम्ही त्यांच्याशी सहवास केला नसेल तर तुमच्यावर कसलाही गुन्हा नाही, आणि तुमच्या सख्या पुत्रांच्या पत्न्यासुद्धा हराम आहेत आणि दोन बहिणींना एकाच वेळा (एकत्रपणे) निकाहमध्ये जमा करणे हेदेखील हराम आहे. मात्र यापूर्वी जे झाले ते झाले. निःसंशय अल्लाह मोठा माफ करणारा, मेहरबान, दयावान आहे.

**२४.** आणि (तुमच्यासाठी) विवाहित स्त्रिया (अवैध) केल्या गेल्या आहेत तथापि जी (दासी) तुमच्या स्वतःच्या मालकीची असेल. हे आदेश अल्लाहने तुमच्यावर अनिवार्य केले आहेत आणि याखेरीज ज्या दुसऱ्या स्त्रिया तुमच्यासाठी हलाल (वैध) केल्या गेल्या आहेत की आपले धन (महर) अदा करून त्यांच्याशी विवाह करा, व्यभिचारासाठी नाही तर पावित्र्य कायम राखण्याकरिता, यास्तव ज्यांच्यापासून तुम्ही लाभ घ्याल त्यांना त्यांचा महर अदा करा आणि तुम्ही ठरलेल्या महर नंतर एकमेकांच्या मर्जीने जे वाटेल ते ठरवाल तर यात तुमच्यावर काही गुन्हा नाही. निःसंशय अल्लाह सर्व काही जाणणारा हिकमतशाली आहे.

**२५.** आणि तुमच्यापैकी जो स्वतंत्र अशा मुलसमान स्त्रीशी विवाह करण्याचे सामर्थ्य बाळगत नसेल तर त्याने त्या मुसलमान दासीशी (विवाह करावा) जी स्वतःच्या मालकीची असावी. अल्लाह तुमच्या कर्माशी पूर्णतः जाणता आहे. तुम्ही आपसात एकमेकांचे जोडीदार आहात, यास्तव तुम्ही त्यांच्या कुटुंबियांच्या परवानगीने त्यांच्याशी विवाह करा आणि नियमानुसार त्यांचा महर देऊन टाका. त्या सत्शील, सदाचारी असाव्यात, उघडपणे दुराचार करणाऱ्या नसाव्यात, न लपून छपून प्रेम-संबंध राखणाऱ्या असाव्यात, मग जेव्हा त्या विवाहित झाल्यानंतर पुन्हा व्यभिचार करतील तर त्यांच्यासाठी, स्वतंत्र स्त्रियांना दिल्या जाणाऱ्या शिक्षेच्या निम्मी शिक्षा आहे. हा विवाहाचा आदेश त्याच्यासाठी आहे ज्याला आपल्या हातून कुकर्म होईल अशी भीती आहे धीर धराल तर तुमच्यासाठी उत्तम आहे. आणि अल्लाह माफ करणारा, दया करणारा आहे.

**२६.** अल्लाह इच्छितो की तुमच्यासाठी स्पष्ट आदेशांचे निवेदन करावे आणि तुम्हाला त्या लोकांच्या उचित मार्गावर चालवावे, जे तुमच्या पूर्वी होऊन गेलेत आणि तुमची क्षमा-याचना (तौबा) कबूल करावी आणि अल्लाह जाणणारा, हिकमतशाली आहे.

**२७.** आणि अल्लाह इच्छितो की तुमची तौबा कबूल करावी आणि जे लोक कामवासनेच्या मागे लागले आहेत, ते इच्छितात की तुम्ही सन्मार्गापासून खूप दूर हटावे.

**२८.** अल्लाह तुमचा सर्व भार हलका करू इच्छितो आणि माणूस मोठा कमकुवत निर्माण केला गेला आहे.

**२९.** हे ईमान राखणाऱ्यांनो! आपसात एकमेकांची धन-संपत्ती नाहक हडप करू नका, परंतु आशा पध्दतीने की तुम्ही आपसात राजीखुशीने व्यापार-उद्योग करा. आणि

स्वतःला जीवे ठार करू नका. निःसंशय अल्लाह तुमच्यावर दया करणारा आहे.

**३०.** आणि जे मनुष्य ही सीमा ओलांडून आणखी अत्याचार करील तर फार लवकर आम्ही त्याला आगीत टाकू आणि हे अल्लाहकरिता फार सोपे आहे.

**३१.** जर तुम्ही या मोठ्या अपराधांपासून स्वतःला वाचवाल, ज्यांच्याविषयी तुम्हाला मनाई केली जात आहे तर आम्ही तुमच्या लहान सहान अपराधांना माफ करू आणि मान सन्मानाच्या दरवाज्यात दाखल करू.

**३२.** आणि त्या गोष्टीची इच्छा धरू नका, जिच्यामुळे अल्लाहने तुमच्यापैकी एकाला दुसऱ्यावर श्रेष्ठता प्रदान केली आहे. पुरुषांचा हिस्सा तो आहे, जो त्यांनी कमविला आणि स्त्रियांसाठी तो हिस्सा आहे जो त्यांनी कमवीला अल्लाहजवळ त्याच्या दया-कृपेची याचना करा. निःसंशय अल्लाह प्रत्येक गोष्टीचे ज्ञान राखतो.

**३३.** आणि आई-बाप किंवा जवळचे नातेवाईक आपल्या मागे जे काही सोडून मरतील, त्याचे वारसदार आम्ही प्रत्येकाचे निश्चित केले आहेत आणि ज्यांच्याशी तुम्ही स्वतः वचन-करार केला आहे. त्यांना त्यांचा हिस्सा देऊन टाका. निःसंशय, अल्लाह प्रत्येक गोष्ट पाहात आहे.

**३४.** पुरुष, स्त्रीवर शासक (आणि संरक्षक) आहे. या कारणास्तव की अल्लाहने एकाला दुसऱ्यावर श्रेष्ठत्व प्रदान केले आहे आणि या कारणास्तव की पुरुषांनी आपले धन खर्च केले आहे. यास्तव नेक, आज्ञाधारक स्त्रिया पतीच्या अनुपस्थितीत अल्लाहच्या संरक्षणाद्वारे धन-संपत्ती व शील-अब्रूचे रक्षण करतात आणि ज्या स्त्रियांपासून तुम्हाला अवज्ञेचे भय असेल त्यांना चांगली ताकीद करा, त्यांचे अंथरुण वेगळे करा (तरीही न मानतील) तर मारा आणि जर तुमचे म्हणणे मानून घेतील तर त्यांच्यावर दोषारोप ठेवण्याचे निमित्त शोधू नका. निःसंशय अल्लाह मोठा महान आहे.

**३५.** जर तुम्हाला (पती-पत्नीमध्ये) मनमुटाव होण्याची भीती असेल तर एक न्याय करणारा पंच, पतीच्या कुटुंबातर्फे आणि एक पत्नीच्या कुटुंबातर्फे ठरवून घ्या. जर हे दोघे समझोता घडवून आणू इच्छितील तर अल्लाह त्या दोघांचा मिलाप करील. निःसंशय, अल्लाह जाणणारा, खबर राखणारा आहे.

**३६.** आणि अल्लाहची उपासना करा. त्याच्यासह दुसऱ्या कोणाला सहभागी करू नका

आणि आई-बाप, नातेवाईक, अनाथ, गरीब दुबळे, जवळचे शेजारी, दूरचे शेजारी आणि सोबत असलेल्या प्रवाशांसी भलेपणाचे, उपकाराचे वर्तन करा, तसेच प्रवाशी आणि तुमच्या ताब्यात असेलल्यांशीही. निःसंशय अल्लाह ऐट दाखविणाऱ्या घमेंडीशी प्रेम राखत नाही.

**३७.** जे लोक स्वतः कंजूषपणा करतात आणि इतरांनाही कंजूषपणा करण्यास सांगतात आणि सर्वश्रेष्ठ अल्लाहने, जे आपल्या कृपेने त्यांना प्रदान केले आहे, ते लपवितात, तर आम्ही अशा कृतघ्न लोकांसाठी अपमानदायक अज़ाब (शिक्षा-यातना) तयार करून ठेवला आहे.

**३८.** आणि जे लोक आपले धन लोकांना दाखविण्यासाठी खर्च करतात, आणि अल्लाहवर आणि कयामतच्या दिवसावर ईमान राखत नाही आणि ज्याचा सखा-सोबती सैतान असेल तर तो मोठा वाईट सोबती आहे.

**३९.** आणि त्यांचे काय बिघडले असते तर त्यांनी अल्लाहवर आणि कयामतच्या दिवसावर ईमान राखले असते आणि अल्लाहने जे त्यांना देऊन ठेवले आहे, त्यातून खर्च करीत राहिले असते. अल्लाह त्यांना चांगल्या प्रकारे जाणणारा आहे.

**४०.** निःसंशय, सर्वश्रेष्ठ अल्लाह एका कणाइतकाही अत्याचार करीत नाही. आणि सत्कर्म (नेकी) असेल तर त्याला दुप्पट करतो आणि विशेषतः आपल्या जवळून फार मोठा मोबदला प्रदान करतो.

**४१.** तेव्हा काय अवस्था होईल, जेव्हा प्रत्येक जनसमूहा (उम्मत) मधून एक साक्ष देणारा आम्ही आणू आणि तुम्हाला त्या लोकांवर साक्षीदार बनवून आणू.[१]

**४२.** ज्या दिवशी इन्कार करणारे आणि पैगंबराची अवज्ञा करणारे ही इच्छा करतील की त्यांना जमिनीशी सपाट (समतल) केले गेले असते तर फार बरे झाले असते आणि

---

(१) प्रत्येक उम्मत (जनसमूह) चा पैगंबर अल्लाहच्या दरबारात साक्ष देईल, हे अल्लाह, आम्ही तर तुझा संदेश आपल्या लोकांपर्यंत पोहचविला होता, आता त्यांनी मानले नाही तर यात आमचा काय दोष आहे? मग त्यांच्या कथनावर पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम साक्ष देतील, हे अल्लाह! हे खरे सांगतात. पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम ही साक्ष त्या कुरआनाद्वारे देतील जे त्यांच्यावर अवतरित झाले आणि ज्यात पूर्वी होऊन गेलेल्या पैगंबरांचे आणि त्यांच्या लोकांचे वृत्तांत आवश्यकतेनुसार सांगितले आहेत.

अल्लाहपासून ते काहीही लपवू शकणार नाहीत.

**४३.** हे ईमान राखणाऱ्यांनो! जेव्हा तुम्ही नशेत चूर असाल तेव्हा नमाजच्या जवळ जाऊ नका, जोपर्यंत आपले म्हणणे समजू न लागाल आणि (संभोगानंतरच्या) अपवित्र अवस्थेत, जोपर्यंत स्नान न करून घ्याल, परंतु रस्त्याने जाताना (नमाजच्या स्थानावरून) जाणे होत असेल तर गोष्ट वेगळी आणि जर तुम्ही आजारी असाल, किंवा प्रवासात असाल किंवा तुमच्यापैकी कोणी शौचास जाऊन आला असेल किंवा तुम्ही स्त्रियांशी समागम केला असेल आणि तुम्हाला पाणी मिळत नसेल तर साफ स्वच्छ मातीने तयम्मुम करा आणि आपले तोंड आणि आपले हात (मातीने) मळून घ्या. निःसंशय अल्लाह मोठा माफ करणारा आणि क्षमाशील आहे.

**४४.** काय तुम्ही त्यांना नाही पाहिले, ज्यांना ग्रंथाचा काही भाग दिला गेला? ते मार्गभ्रष्टता खरेदी करतात आणि इच्छितात की तुम्हीही मार्गभ्रष्ट व्हावे.

**४५.** आणि अल्लाह तुमच्या शत्रूंना चांगल्या प्रकारे जाणणारा आहे आणि अल्लाह पुरेसा आहे दोस्त होण्यासाठी आणि अल्लाह पर्याप्त आहे मदतकर्ता होण्यासाठी.

**४६.** काही यहूदी, वाणी (कलाम) ला तिच्या योग्य स्थानापासून बदलून टाकतात. आणि म्हणतात की आम्ही ऐकले आणि अवज्ञा केली आणि ऐक त्याच्याविना की तुला ऐकले न जावे आणि आमची ताबेदारी कबूल करा (परंतु हे बोलताना) आपल्या जीभेला मोड देतात आणि दीन (धर्म) कलंकित करतात आणि जर हे लोक असे म्हणाले असते की आम्ही ऐकले आणि आम्ही मान्य केले आणि तुम्ही ऐका आणि आम्हाला पाहा तर हे त्यांच्यासाठी फार चांगले झाले असते आणि अधिक उत्तम ठरले असते. परंतु अल्लाहने त्यांच्या इन्कारामुळे त्यांचा धिःक्कार केला, तेव्हा हे फार कमी ईमान राखतात.

**४७.** हे ग्रंथधारकांनो! जे काही आम्ही अवतरित केले आहे, जे तुमच्याजवळ असलेल्या (ग्रंथा) ला सत्य असल्याचे सांगतो, त्यावर यापूर्वी ईमान राखा की आम्ही चेहरे बिघडवून टाकावेत आणि त्यांना फिरवून पाठीकडे करावे किंवा त्यांच्यावर धिःक्काराचा मारा करावा, जसा आम्ही शनिवारवाल्या लोकांवर केला आहे, आणि अल्लाहचा निर्णय पूर्ण झाल्याशिवाय राहात नाही.

**४८.** निःसंशय, अल्लाह आपल्यासह कोणाला सहभागी केले जाणे माफ करत नाही

आणि याच्याखेरीज ज्याला इच्छिल माफ करील[१] आणि जो अल्लाहसोबत दुसऱ्याला सहभागी करील तर त्याने अल्लाहवर फार मोठे असत्य रचले.[२]

**४९.** काय तुम्ही त्यांना नाही पाहिले जे स्वतला फार शुद्ध पवित्र असल्याचे सांगतात? किंबहुना अल्लाह ज्याला इच्छितो स्वच्छ, शुद्ध, पवित्र करतो, आणि कोणावर धाग्याइतकाही अत्याचार केला जाणार नाही.

**५०.** पाहा, हे लोक अल्लाहवर कशा प्रकारे खोटा आरोप ठेवतात आणि हे फार मोठा गुन्हा साबीत होण्यास पुरेसे आहे.

**५१.** काय तुम्ही त्यांना नाही पाहिले, ज्यांना ग्रंथाचा काही हिस्सा लाभला आहे जे मूर्त्यांवर आणि मिथ्या देवांवर ईमान (श्रद्धा) राखतात आणि इन्कारी लोकांच्या हक्कात म्हणतात की हे लोक ईमान राखणाऱ्यांपेक्षा अधिक सरळ आणि सत्य-मार्गावर आहेत.

**५२.** हेच लोक आहेत, ज्यांचा अल्लाहने धिःक्कार केला आहे आणि अल्लाह ज्याचा धिःक्कार करील तर तुम्हाला त्याची मदत करणारा कोणीही आढळणार नाही.

**५३.** काय त्यांच्याजवळ एखाद्या साम्राज्याचा हिस्सा आहे, असे असेल तर हे कोणाला तीळभरसुद्धा देणार नाहीत.

**५४.** हे लोकांशी द्वेष-मत्सर राखतात, त्याबद्दल, जे अल्लाहने आपल्या कृपेने त्यांना प्रदान केले आहे, तेव्हा आम्ही इब्राहीमच्या संततीला ग्रंथ आणि हिकमतही प्रदान केली आणि मोठे साम्राज्यही प्रदान केले.

**५५.** मग त्यांच्यापैकी काहींनी तर ग्रंथावर ईमान राखले आणि काही त्यापासून थांबले तेव्हा (अशा लोकांसाठी) जहन्नमची आग पुरेशी आहे.

---

(१) अर्थात असे अपराध की ज्यांची माफी मागितल्याविना ईमानधारकांनी मरण पावावे, तेव्हा अल्लाहने इच्छिल्यास एखाद्याला शिक्षा-यातना न देता माफ करील, परंतु बहुतेकांना शिक्षा दिल्यानंतर आणि बहुतेकांना पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्या शिफारसीवर माफ करील, परंतु शिर्क (अल्लाहसह कोणाला सहभागी ठरविणे) कदापि माफ करणार नाही, कारण अनेकेश्वरवाद्यांवर अल्लाहने जन्नतला हराम केले आहे.

(२) अन्य एका ठिकाणी फर्माविले 'शिर्क फार मोठा अत्याचार आहे'' (लुकमान) हदीस वचनातही याला फार मोठे अपराध असल्याचे सांगितले गेले आहे.

**५६.** ज्या लोकांनी आमच्या आयतींचा इन्कार केला, त्यांना आम्ही अवश्य आगीत टाकू, जेव्हा त्यांची कातडी शिजून गळून पडेल, आम्ही लगेच तिच्या जागी दुसरी कातडी बदलून टाकू यासाठी की त्यांनी अज़ाब (शिक्षा-यातना) चाखतच राहावे. नि:संशय अल्लाह जबरदस्त हिकमतशाली आहे.

**५७.** आणि ज्यांनी ईमान राखले आणि सत्कर्म करीत राहिले, आम्ही लवकरच त्यांना जन्नतच्या बागांमध्ये दाखल करू, ज्यांच्या खाली नहरी (प्रवाह) वाहत आहेत, ज्यात ते नेहमी राहतील. तिथे त्यांच्यासाठी पावित्र्यपूर्ण, शीलवान पत्न्या असतील आणि आम्ही त्यांना दाट सावलीत (आरामशीर जागी) ठेवू.

**५८.** सर्वश्रेष्ठ अल्लाह तुम्हाला आदेश देतो की अनामत (ठेव, धरोहर) त्यांच्या मालकांना परत करा, आणि जेव्हा लोकांच्या दरम्यान फैसला कराल तर न्यायपूर्वक फैसला करा. नि:संशय, ती फार चांगली गोष्ट आहे, ज्याची शिकवण अल्लाह तुम्हाला देत आहे आणि नि:संशय अल्लाह सर्व काही ऐकणारा, पाहणारा आहे.

**५९.** हे ईमान राखणाऱ्यांनो! अल्लाहच्या आदेशाचे पालन करा आणि रसूल (पैगंबर) सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्या आदेशाचे पालन करा आणि आपल्यापैकी शासक असलेल्यांचा आदेश माना, मग जर एखाद्या गोष्टीत मतभेद कराल तर तो अल्लाह आणि पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्याकडे रुजू करा, जर तुम्ही अल्लाहवर आणि कयामतच्या दिवसावर ईमान राखत असाल. हे सर्वांत चांगले आहे आणि परिणामाच्या दृष्टीनेही फार उत्तम आहे.[१]

**६०.** काय तुम्ही त्यांना नाही पाहिले, जे दावा करतात की, जे काही तुमच्यावर उतरविले गेले आहे आणि जे काही तुमच्या पूर्वी उतरविले गेले त्यावर ते ईमान राखतात, परंतु आपसातले तंटे सोडविण्यासाठी, अल्लाहऐवजी ते दुसऱ्यांजवळ जाऊ इच्छितात, वास्तविक त्यांना आदेश दिला गेला आहे की त्यांनी, त्याचा (सैतानाचा) इन्कार करावा. सैतान तर हे इच्छितोच की त्यांना बहकवून दूर फेकून द्यावे.

---

(१) अल्लाह आणि पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्याकडे रुजू करा याचा अर्थ पवित्र कुरआन आणि पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लमयांचे कथन आणि त्यांची आदर्श आचरणशैली आहे. आपसातील मतभेद मिटविण्यासाठी हा सर्वांत चांगला उपाय सांगितला गेला आहे. या नियमान्वये हेही स्पष्ट होते की त्यानंतर आणखी तिसऱ्या कोणाचा आदेश मानणे आवश्यक नाही.

**६१.** आणि जेव्हा जेव्हा त्यांना सांगितले जाते की अल्लाहने जो (पवित्र ग्रंथ) अवतरित केला आहे, त्याच्याकडे आणि पैगंबराकडे या, तेव्हा तुम्ही पाहाल की हे मुनाफिक (संधीसाधू) तुमच्याकडून तोंड फिरवून थांबतात.

**६२.** मग काय कारण आहे की जेव्हा त्यांच्यावर त्यांच्या वाईट कर्मांमुळे एखादे संकट येऊन कोसळते तर मग हे तुमच्याजवळ येऊन अल्लाहची शपथ घेतात, आणि सांगतात, आमचा इरादा तर केवळ भलाईचा आणि चांगले संबंध घडवून आणण्याचाच होता.

**६३.** हे असे लोक आहेत, ज्यांच्या मनातील रहस्यभेद, अल्लाहला चांगल्या प्रकारे माहीत आहे. तुम्ही त्यांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करा, मात्र त्यांना शिकवण देत राहा, आणि त्यांना अशी गोष्ट बोला जी त्यांच्या मनावर प्रभाव टाकणारी असेल.

**६४.** आणि आम्ही प्रत्येक पैगंबर केवळ यासाठी पाठविला की अल्लाहच्या आदेशान्वये, त्याच्या आदेशाचे पालन केले जावे, आणि जर हे लोक, ज्यांनी स्वतःच्या प्राणांवर अत्याचार केला, तुमच्याजवळ आले असते आणि त्यांनी अल्लाहजवळ तौबा (क्षमा-याचना) केली असती आणि पैगंबरांनीही त्यांच्यासाठी माफी मागितली असती तर निःसंशय, अल्लाह या लोकांना मोठा माफ करणारा, दया करणारा आढळला असता.

**६५.** तेव्हा शपथ आहे तुमच्या पालनकर्त्याची, हे लोक (तोपर्यंत) ईमानधारक होऊ शकत नाही, जोपर्यंत सर्व आपसातील मतभेदात तुम्हाला न्याय-निवाडा करणारा स्वीकारीत नाही, मग जो फैसला तुम्ही कराल, त्यावर मनातून नाराजही नसावेत आणि आज्ञाधारकाप्रमाणे त्यांनी तो मान्य करून घ्यावा.

**६६.** आणि जर आम्ही त्यांच्यावर हे फर्ज (अनिवार्य) केले असते की स्वतःची हत्या करून घ्या, किंवा आपल्या घरातून निघून जा, तर त्यांच्यापैकी फार थोड्याच लोकांनी त्याचे पालन केले असते. आणि जर हे तेच करतील ज्याची त्यांना शिकवण दिली जाते तर निश्चितच त्यांच्यासाठी फार चांगले झाले असते आणि खूप मजबूतीचे ठरले असते.

**६७.** आणि मग तर आम्ही त्यांना आपल्या जवळून फार मोठा मोबदला प्रदान केला असता.

**६८.** आणि निःसंशय त्यांना सत्य व सरळ मार्ग प्रदान केला असता.

**६९.** आणि जो कोणी अल्लाह आणि रसूल (सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) यांच्या आदेशाचे पालन करील तर तो त्या लोकांसोबत राहील, ज्यांच्यावर अल्लाहने आपला इनाम फर्माविला आहे, जसे नबी (पैगंबर), सिद्दीक (सत्यवचनी) आणि शहीद व नेक सदाचारी लोक. हे फार चांगले सोबती आहेत.

**७०.** ही सर्वश्रेष्ठ अल्लाहतर्फे फार मोठी कृपा आहे आणि अल्लाह पर्याप्त आहे ज्ञान राखणारा.

**७१.** हे ईमान राखणाऱ्यांनो! आपल्या बचावाची सामग्री सोबत घ्या, मग समूहा-समूहाने किंवा सर्व एकत्र मिळून कूच करा.

**७२.** आणि निःसंशय तुमच्यापैकी काही असेही आहेत जे संकोच करतात, मग जर तुम्हाला एखादे नुकसान पोहोचते, तेव्हा म्हणतात की अल्लाहने माझ्यावर मोठी कृपा केली मी त्यांच्यासह हजर नव्हतो.

**७३.** आणि जर तुम्हाला अल्लाहची एखादी कृपा लाभली तर असे बोलू लागतील की जणू तुमच्या व त्यांच्या दरम्यान काही नातेच नव्हते, म्हणतील की, अरेरे! मी त्यांच्यासोबत असतो तर मोठी सफलता प्राप्त केली असती.

**७४.** तथापि ज्या लोकांनी या जगाचे जीवन, मरणोत्तर जीवना (आखिरत) च्या मोबदल्यात विकून टाकले आहे, त्यांनी अल्लाहच्या मार्गात लढले पाहिजे आणि जो अल्लाहच्या मार्गात लढता लढता शहीद होईल किंवा विजयी होईल तर खात्रीने आम्ही त्याला फार चांगला मोबदला प्रदान करू.

**७५.** बरे काय कारण आहे की तुम्ही अल्लाहच्या मार्गात आणि त्या दुर्बल पुरुष स्त्रिया आणि लहान लहान बालकांच्या सुटकेकरिता न लढावे ? जे अशा प्रकारे दुआ (प्रार्थना) करीत आहेत की हे आमच्या पालनहार! या अत्याचारी लोकांच्या वस्तीतून आम्हाला बाहेर काढआणि आमच्यासाठी स्वतः आपल्यातर्फे एखादा हिमायती (समर्थक निश्चित कर, आणि आमच्यासाठी विशेषरित्या आपल्यातर्फे मदत करणारा पाठव.

**७६.** ज्या लोकांनी ईमान राखले आहे, ते तर अल्लाहच्या मार्गात जिहाद करतात आणि ज्या लोकांनी कुफ्र (इन्कार) केला आहे ते तर तागूत (सैतान) च्या मार्गात लढतात. तेव्हा तुम्ही सैतानाच्या मित्रांशी युद्ध करा. निःसंशय सैतानाचे (डावपेच)

अतिशय कमकुवत आहेत.

**७७.** काय तुम्ही त्यांना नाही पाहिले, ज्यांना आदेश दिला गेला की आपल्या हातांना रोखून ठेवा आणि नमाज नियमित पढत राहा आणि जकात अदा करीत राहा, मग जेव्हा त्यांना जिहाद (धर्मयुद्धा) चा आदेश दिला गेला तेव्हा त्याच वेळी त्यांच्यातला एक समूह, लोकांपासून असा भयभीत होता, जणू अल्लाहचे भय असावे, किंबहुना यापेक्षा अधिक आणि म्हणू लागले, हे आमच्या पालनकर्त्या! तू आमच्यावर जिहाद अनिवार्य का केले? आणखी थोडे जीवन आम्हाला का व्यतीत करू दिले नाही? तुम्ही त्यांना सांगा की या जगाचा लाभ तर फार थोडासा आहे आणि अल्लाहचे भय राखणाऱ्यांकरिता आखिरत कितीतरी उत्तम आहे, आणि तुमच्यावर एका धाग्याइतकाही अत्याचार केला जाणार नाही.

**७८.** तुम्ही कोठेही असा, मृत्यु कोणत्याही स्थितीत तुम्हाला येऊन धरील, मग तुम्ही मजबूत अशा किल्ल्यामध्ये असाल तरीही. आणि जर यांना एखादी भलाई प्राप्त होते, तेव्हा म्हणतात, की ही सर्वश्रेष्ठ अल्लाहतर्फे आहे, आणि जर एखादी असफलता पदरी पडते तेव्हा म्हणू लागतात, हे तुमच्यामुळे झाले. त्यांना सांगा, हे सर्व काही अल्लाहतर्फे आहे. यांना झाले तरी काय की एखादी गोष्ट नीट समजूनही घेत नाही.

**७९.** तुम्हाला जी काही भलाई लाभते, ती अल्लाहतर्फे आहे आणि जी काही हानि पोहचते ती स्वतः तुमच्याकडून आहे. आम्ही (हे पैगंबर!) तुम्हाला समस्त मानवजातीकरिता रसूल बनवून पाठविले आहे आणि अल्लाह या गोष्टीची साक्ष देण्यास पुरेसा आहे.

**८०.** जो कोणी या पैगंबर (सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) चे आज्ञापालन करील, त्याने अल्लाहचे आज्ञापालन केले आणि जो तोंड फिरवील तर आम्ही तुम्हाला त्यांच्यावर देखरेख ठेवणारा बनवून पाठविले नाही.

**८१.** आणि हे म्हणतात की आम्ही आज्ञापालन करतो परंतु जेव्हा तुमच्या जवळून उठून बाहेर पडतात, तेव्हा त्यांच्यातला एक गट, जी गोष्ट तुम्ही किंवा त्याने सांगितली आहे त्याविरूद्ध रात्री सल्लामसलत करतात. त्यांचा रात्रींचा वार्तालाप अल्लाह लिहून घेत आहे. तुम्ही त्यांच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करा आणि सर्वश्रेष्ठ अल्लाहवर भरोसा ठेवा. काम बनविण्यासाठी अल्लाह पुरेसा आहे.

**८२.** काय हे लोक कुरआनवर विचार-चिंतन करीत नाही? जर हा ग्रंथ अल्लाहशिवाय दुसऱ्या कोणातर्फे असता तर खात्रीने यात अनेक मतभेद आढळले असते.

**८३.** आणि जेव्हा त्यांना एखादी खबर शांती या भीतीची पोहोचते, ते लगेच तिचा प्रचार करायला सुरुवात करतात. जर यांनी ती खबर पैगंबर (सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) यांच्यापर्यंत पोहचविली असती किंवा आपल्यातल्या जबाबदार लोकांच्या कानावर टाकली असती तर तिची जाच-पडताळ करणाऱ्यांनी तिची खरी हकीकत माहिती करून घेतली असती. आणि जर अल्लाहची कृपा आणि त्याची दयादृष्टी तुमच्यावर राहिली नसती तर काही लोकांना सोडून तुम्ही सर्व सैतानाच्या मागे चालणारे बनले असते.

**८४.** तेव्हा तुम्ही अल्लाहच्या मार्गात जिहाद करीत राहा. तुम्हाला फक्त तुमच्यासाठीच आदेश दिला जात आहे. ईमानधारकांना आकर्षित करीत राहा. फार शक्य आहे की, अल्लाह इन्कारी लोकांचा हल्ला रोखेल आणि अल्लाह मोठा शक्तिशाली आहे आणि शिक्षा देण्यातही फार कठोर आहे.

**८५.** जो मनुष्य एखादे पुण्य-कार्य आणि सत्कर्म करण्याची शिफारस करेल तर त्यालाही त्याचा काही हिस्सा मिळेल आणि जो दुराचार व दुष्कर्म करण्याची शिफारस करेल, त्याच्यासाठीही त्यात एक हिस्सा आहे, आणि अल्लाह प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्य राखतो.

**८६.** आणि जेव्हा तुम्हाला सलाम केला जाईल तर तुम्ही त्यापेक्षा चांगले प्रत्युत्तर द्या किंवा तेच शब्द परतून बोला. निःसंशय, अल्लाह प्रत्येक गोष्टीचा हिशोब घेणार आहे.

**८७.** अल्लाह तो आहे, ज्याच्याशिवाय दुसरा कोणी (सच्चा) उपास्य नाही. तो तुम्हा सर्वांना निश्चितच कयामतच्या दिवशी एकत्र करील, ज्याच्या येण्याबाबत काहीच शंका नाही. अल्लाहपेक्षा जास्त सत्य वचन आणखी कोणाचे असू शकेल?

**८८.** तुम्हाला झाले तरी काय की मुनाफिकां (वरकरणी मुसलमानां) बाबत दोन गटांत विभागले जात आहात. त्यांना तर त्यांच्या करतूतींमुळे अल्लाहने तोंडघशी पाडले आहे. आता काय तुम्ही हे इच्छिता की त्याला मार्ग दाखवावा ज्याला अल्लाहने मार्गभ्रष्ट केले आहे? तेव्हा ज्याला अल्लाह मार्गभ्रष्ट करील, त्याच्यासाठी तुम्हाला कधीही, कोणताही

मार्ग दिसून येणार नाही.

**८९.** यांना तर मनापासून वाटते की, जसे ते काफिर आहेत तसे तुम्हीही त्यांच्यासारखे ईमानाचा इन्कार करू लागावे आणि तुम्ही सर्व एकसमान व्हावे, यास्तव त्यांच्यापैकी कोणाला आपला खराखुरा मित्र बनवू नका, जोपर्यंत ते अल्लाहच्या मार्गात हिजरत (देश-त्याग) करीत नाहीत. मग जर (यापासून) तोंड फिरवतील तर त्यांना धरा आणि ठार करा, जिथेदेखील आढळतील. खबरदार! त्यांच्यापैकी कोणालाही आपला मित्र आणि सहाय्यक समजून घेऊ नका.

**९०.** परंतु जे त्या लोकांशी नाते राखतात, ज्यांच्या आणि तुमच्या दरम्यान समझोता झालेला असेल किंवा ते लोक जे तुमच्या जवळ येतात, ज्यांची मने संकुचित झाली आहेत की तुमच्याशी लढावे की आपल्या लोकांशी लढावे. अल्लाहने इच्छिले असते तर यांना तुमच्यावर वर्चस्व प्रदान केले असते आणि ते अवश्य तुमच्याशी लढले असते. तेव्हा जर असे लोक तुमच्यापासून दूर राहतील आणि लढाई न करतील आणि तुमच्याकडे संधी-समझोत्याचा प्रस्ताव मांडतील तर (अशा स्थितीत) अल्लाहने तुमच्यासाठी, त्यांच्याविरूद्ध लढाईचा कोणताही मार्ग ठेवला नाही.

**९१.** तुम्हाला दुसरे काही असेही लोक आढळतील, जे तुमच्यापासून आणि आपल्या जमातीच्या लोकांपासून सुरक्षित राहू इच्छितात, परंतु जेव्हा उपद्रवाकडे त्यांना वळविले जाते तर त्यात तोंडघशी पडतात. जर ते तुमच्यापासून हटले नाहीत आणि तुमच्याशी समझोता न करतील आणि आपले हात न रोखतील तर ते जिथे सापडतील तिथे त्यांना धरा आणि ठार करा. हेच ते लोक आहेत, ज्यांच्याबाबत आम्ही तुम्हाला खुले प्रमाण दिले आहे.

**९२.** कोणत्याही ईमानधारकाकरिता हे उचित नाही की त्याने एखाद्या ईमानधारकाची हत्या करावी. परंतु अजाणतेपणी तसे झाल्यास गोष्ट वेगळी. आणि जो मनुष्य एखाद्या ईमानधारकाची चुकीने हत्या करील तर त्याबद्दल त्याला एक ईमानधारक गुलाम (किंवा दासी) मुक्त करणे आणि मारल्या गेलेल्या व्यक्तीच्या नातेवाईकांना रक्ताची किंमत देणे आवश्यक आहे. परंतु त्याने माफ केले तर गोष्ट वेगळी. आणि ज्याची हत्या केली गेली तो मनुष्य जर तुमच्या शत्रू जमातीचा, पण मुस्लिम असेल तर एक मुस्लिम गुलाम मुक्त करणे आवश्यक आहे आणि जर ठार केली गेलेली व्यक्ती त्या जमातीची आहे ज्याच्या आणि तुमच्या (ईमानधारकांच्या) दरम्यान समझोता आहे तर रक्ताची किंमत त्याच्या

नातेवाईकांना द्यावी लागेल, तसेच एक ईमानधारक (मुस्लिम) गुलामही मुक्त करावा लागेल आणि ज्याला तसा न आढळेल, त्याला दोन महिने सतत रोजे ठावावे लागतील अल्लाहकडून माफ करून घेण्यासाठी आणि अल्लाह जाणणारा व हिकमत बाळगणारा आहे.

**९३.** आणि जो कोणी एखाद्या ईमानधारकाला जाणूनबुजून ठार करील, तर त्याची शिक्षा जहन्नम आहे, ज्यात तो नेहमीकरिता राहील, त्याच्यावर अल्लाहचा प्रकोप आहे. अल्लाहने त्याचा धिःक्कार केला आहे आणि त्याच्यासाठी फार मोठी सजा-यातना तयार करून ठेवली आहे.

**९४.** हे ईमान राखणाऱ्यांनो! जेव्हा तुम्ही अल्लाहच्या मार्गात निघाल, तेव्हा नीट जाच-पडताळ करून घेत जा आणि जो तुम्हाला सलाम करून बोलेल त्याला तुम्ही असेही म्हणू नका की तू ईमानधारक नाहीस. तुम्ही ऐहिक जीवनाच्या सुख-साधनांच्या शोधात आहात, तेव्हा अल्लाहजवळ विपुल सुख-साधने आहेत. पूर्वी तुम्हीसुद्धा असेच होते, मग अल्लाहने तुमच्यावर अनुग्रह (उपकार) केला. यास्तव तुम्ही नीट छान-बिन (चौकशी) करून घेत जा. निःसंशय अल्लाह तुमच्या कर्मांना चांगल्या प्रकारे जाणतो.

**९५.** जे ईमानधारक अकारण स्वस्थ बसून राहतील आणि जे अल्लाहच्या मार्गात आपल्या प्राणाने व धनाने जिहाद करत असतील तर दोघे समान ठरणार नाहीत. अल्लाहने त्यांना, जे आपले प्राण आणि धन लावून जिहाद करतात, स्वस्थ बसून राहणाऱ्यांवर दर्जाच्या दृष्टीने श्रेष्ठता प्रदान केली आहे. आणि तसे पाहता नेक मोबदल्याचा वायदा तर प्रत्येकाला दिला आहे. तथापि अल्लाहने जिहाद करणाऱ्यांना, स्वस्थ बसून राहणाऱ्यांवर महान मोबदल्याची श्रेष्ठता प्रदान केली आहे.

**९६.** आपल्यातर्फे दर्जाचीही, माफीचीही आणि दया-कृपेचीही, आणि अल्लाह मोठा माफ करणारा, दया करणारा आहे.

**९७.** जे लोक स्वतःवर अत्याचार करतात, जेव्हा फरिश्ते त्यांचे प्राण ताब्यात घेतात तेव्हा म्हणतात की तुम्ही कोणत्या अवस्थेत होते? ते म्हणतात, आम्ही धरतीवर कमजोर होतो. तेव्हा फरिश्ते विचारतात, काय अल्लाहची जमीन विशाल, व्यापक नव्हती की तुम्ही तिच्यात स्थलांतर केले असते. अशाच लोकांचे ठिकाण जहन्नम आहे आणि ते मोठे वाईट ठिकाण आहे.

**९८.** परंतु जे पुरुष, ज्या स्त्रिया आणि लहान मुले लाचार-विवश आहेत, जे कसलीही उपाययोजना करू शकत नाहीत आणि ना मार्ग जाणतात.

**९९.** तेव्हा फार शक्य आहे की अल्लाह त्यांना माफ करील आणि अल्लाह मोठा माफ करणारा, क्षमाशील आहे.

**१००.** आणि जो कोणी अल्लाहच्या मार्गात हिजरत (देश-त्याग) करील, तर त्याला धरतीवर निवासाकरिता खूप विस्तृत जागा मिळेल आणि खूप समृद्धीही. आणि जो आपल्या घरापासून अल्लाह आणि त्याच्या पैगंबराकडे हिजरत करील, मग त्याला मृत्युने येऊन गाठावे, तरीदेखील त्याचा मोबदला अल्लाहजवळ निश्चित आहे आणि अल्लाह मोठा माफ करणारा, दयावान आहे.

**१०१.** आणि जेव्हा जमिनीवर प्रवास करीत असाल तेव्हा नमाज कस्त्र करण्यात (चार रकअतची नमाज दोन रकअत पढण्यात) तुमच्यावर काही गुन्हा नाही, जर तुम्हाला हे भय असेल की काफिर (श्रद्धाहीन) तुम्हाला त्रास देतील. निःसंशय काफिर लोक तुमचे खुले वैरी आहेत.

**१०२.** आणि जेव्हा तुम्ही त्यांच्या दरम्यान असाल आणि त्यांच्यासाठी नमाज कायम कराल, तेव्हा त्यांच्यातला एक गट तुमच्यासोबत शस्त्रानिशी सज्ज उभा राहिला पाहिजे, मग जेव्हा हे सजदा करून घेतील, तेव्हा यांनी तेथून हटावे, व तुमच्या पाठीमागे यावे आणि मग दुसरा गट, ज्याने अद्याप नमाज अदा केली नाही त्याने (पुढे) यावे आणि तुमच्यासोबत नमाज अदा करावी आणि आपला बचाव आणि आपली हत्यारे सोबत बाळगावित. काफिर तर इच्छितात की तुम्ही कसेही करून आपल्या हत्यारांपासून व आपल्या सामुग्रीपासून गाफील व्हावे तर मग त्यांनी अचाानक तुमच्यावर हल्ला करावा, मात्र जेव्हा तुम्हाला काही त्रास-यातना असेल किंवा जोरदार पाऊस अथवा आजारपणामुळे आपली हत्यारे उतरवून ठेवाल तर अशा वेळी तुमच्यावर काही गुन्हा नाही. आणि आपल्या बचावाची सामुग्री सोबत राखत जा. निःसंशय अल्लाहने इन्कार करणाऱ्यांसाठी अपमानदायक शिक्षा तयार करून ठेवली आहे.

**१०३.** मग जेव्हा तुम्ही नमाज पढून घ्याल जेव्हा उठता बसता आणि पहुडलेल्या स्थितीत अल्लाहचे स्मरण करीत राहा आणि शांतीपूर्ण स्थिती असेल तर नमाज कायम करा. निःसंशय, नमाज ईमानधारकांवर निश्चित आणि निर्धारीत वेळेवर अदा करणे फर्ज

(अनिवार्य) केले गेले आहे.

**१०४.** आणि त्या लोकांचा पाठलाग करण्यात आळस करू नका. जर तुम्हाला त्रास-यातना होत आहे तर त्यांनाही त्रास-यातना होते, जशी तुम्हाला होते, आणि तुम्ही अल्लाहकडून त्या आशा-अपेक्षा बाळगता, ज्या ते बाळगत नाहीत, आणि अल्लाह सर्व काही जाणणारा, हिकमतशाली आहे.

**१०५.** निःसंशय, आम्ही तुमच्याकडे सत्यासह ग्रंथ अवतरीत केला आहे, यासाठी की तुम्ही लोकांच्या दरम्यान त्याला अनुसरून न्याय-निवाडा करावा, ज्याबाबत अल्लाहने तुम्हाला अवगत केले आणि अपहार करणाऱ्यांचे समर्थक बनू नका.

**१०६.** आणि अल्लाहजवळ क्षमा-याचना करीत राहा. निःसंशय अल्लाह मोठा माफ करणारा, दया करणारा आहे.

**१०७.** आणि अशा लोकांशी बाजू घेऊन भांडू नका जे स्वतः आपलाच विश्वासघात करतात. निःसंशय, धोकेबाज विश्वासघातकीशी अल्लाह प्रेम राखत नाही.

**१०८.** ते लोकांपासून तर लपतात, परंतु अल्लाहपासून लपू शकत नाही. तो त्यांच्यासोबत आहे जेव्हा ते रात्री अप्रिय गोष्टींच्या योजना आखतात आणि अल्लाहने त्यांच्या कारवायांना घेरा टाकलेला आहे.

**१०९.** हे तुम्ही आहात की त्यांच्या हक्कात या जगात वाद घालता, परंतु कयामतच्या दिवशी त्यांच्यातर्फे कोण हुज्जत घालील आणि कोण त्यांचा समर्थक बनून उभा राहील?

**११०.** आणि जो कोणी वाईट कर्म करील किंवा स्वतः आपल्यावर अत्याचार करील, नंतर अल्लाहजवळ माफी मागील तर त्याला अल्लाह माफ करणारा, दया करणारा आढळून येईल.

**१११.** आणि जो गुन्हा करतो, तर त्या गुन्ह्याचे ओझे त्याच्याच (शिरा) वर आहे आणि अल्लाह सर्व काही जाणणारा, हिकमतशाली आहे.

**११२.** आणि जो कोणी दुष्कर्म करतो, मग एखाद्या निरपराधीवर त्याचा आरोप ठेवतो, तर त्याने मोठे कुभांड(मोठा आळ घेतला) रचले आणि फार मोठा गुन्हा केला.

**११३.** आणि जर तुमच्यावर अल्लाहची दया-कृपा राहिली नसती, तर त्यांच्या एका गटाने तुम्हाला मार्गभ्रष्ट करण्याचे कारस्थान रचले होते, परंतु ते स्वतःलाच मार्गभ्रष्ट करतात आणि ते तुम्हाला काहीच नुकसान पोहचवू शकत नाही आणि अल्लाहने तुमच्यावर ग्रंथ आणि ज्ञान उतरविले आहे आणि तुम्ही जे जाणत नव्हते ते ज्ञान प्रदान केले आहे आणि तुमच्यावर अल्लाहची फार मोठी कृपा आहे.

**११४.** त्यांच्या बहुतेक गुप्त काानगोष्टींमध्ये कसलीही भलाई नाही. परंतु ज्याने उपकार, नेकी किंवा लोकांमध्ये सुधारणा होण्यासाठी आदेश दिला आणि जो हे कार्य अल्लाहची मर्जी (प्रसन्नता) प्राप्त करण्यासाठी करेल, आम्ही खरोखर त्याला फार मोठा मोबदला प्रदान करू.

**११५.** आणि जो कोणी, सरळ व सत्य मार्ग स्पष्ट झाल्यानंतर पैगंबर (मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) यांचा विरोध करील आणि ईमानधारकांच्या मार्गाशिवाय अन्य मार्गावर चालेल तर आम्ही त्याला त्याच दिशेने, जिकडे तो फिरत असेल, वळवून टाकू, मग त्याला आम्ही जहन्नममध्ये फेकून देऊ आणि ते मोठे वाईट स्थान आहे.

**११६.** अल्लाह, आपल्यासह दुसऱ्या कोणाला सहभागी केले जाणे कदापि माफ करणार नाही आणि याखेरीज इतर अपराधांना, तो ज्याला इच्छिल माफ करील आणि ज्याने अल्लाहसह अन्य कोणाला सहभागी ठरविले तो (सन्मार्गापासून) फार दूर बहकत गेला.

**११७.** हे तर अल्लाहला सोडून केवळ देवींना पुकारतात आणि वस्तुतः हे धिःक्कारलेल्या दुष्ट सैतानाला पुकारतात.

**११८.** ज्याचा अल्लाहने धिःक्कार केला आहे आणि त्याने (सैतानाने) म्हटले आहे की मी तुझ्या दासांमधून आपला ठराविक हिस्सा निश्चित घेईन.

**११९.** आणि त्यांना सरळ मार्गापासून भटकवित राहीन आणि त्यांना खोट्या आशा देत राहील आणि त्यांना शिकवण देईन की जनावरांचे कान चिरा आणि त्यांना सांगेन की अल्लाहने बनविलेले स्वरूप विकृत करा. ऐका! जो, अल्लाहला सोडून सैतानाला आपला मित्र बनवील तर तो उघड अशा तोट्यात राहील.

**१२०.** तो त्यांच्याशी तोंडी वायदे करत राहील आणि त्यांना भ्रमाच्या हिरव्या बागा दाखवित राहील (परंतु लक्षात ठेवा) सैतानाने त्यांच्याशी केलेले वायदे पूर्णपणे धोका आहे (मृगजळ) आहे.

**१२१.** हेच ते लोक आहेत, ज्यांचे ठिकाण जहन्नम आहे. जिथून त्यांना कदापि सुटका मिळणार नाही.

**१२२.** आणि ज्या लोकांनी ईमान राखले, आणि सत्कर्म केले आम्ही त्यांना त्या जन्नतीमध्ये दाखल करू, ज्यांच्या खाली नहरी (प्रवाह) वाहत आहेत. जिथे ते नेहमी नेहमी राहतील. हा अल्लाहचा वायदा आहे जो निःसंशय खरा आहे. आणि अल्लाहपेक्षा, आपल्या कथनात सच्चा आणखी कोण असू शकतो?

**१२३.** तुमच्या इच्छा-आकांक्षांनी आणि ग्रंथधारकांच्या इच्छा-आकांक्षांनी काहीही होणार नाही. जो वाईट कर्म करील, त्याची शिक्षा तो प्राप्त करील आणि त्याला अल्लाहखेरीज आपला कोणी मित्र आणि मदत करणारा आढळणार नाही.

**१२४.** आणि जो ईमानधारक असेल, मग तो पुरुष असो किंवा स्त्री आणि तो नेक आचरण करील, निःसंशय असे लोक जन्नतमध्ये दाखल होतील आणि तिळाइतकाही त्याचा हक्क मारला जाणार नाही.

**१२५.** आणि दीन-धर्म संदर्भात त्याहून चांगला कोण असू शकतो, जो अल्लाहकरिता पूर्णतः आत्मसमर्पण करील आणि तो नेक-सदाचारीही असेल आणि इब्राहीमच्या दीन-धर्माचे अनुसरण केलेला असेल जे एकाग्र होते आणि इब्राहीमला अल्लाहने आपला मित्र बनविले आहे.

**१२६.** आणि जे काही आकाशांमध्ये, आणि जमिनीवर आहे, सर्व अल्लाहचेच आहे आणि अल्लाहने प्रत्येक चीज-वस्तूला आपल्या घेऱ्यात घेतले आहे.

**१२७.** ते लोक स्त्रियांबाबत तुम्हाला विचारतात. तुम्ही त्यांना सांगा की स्वतः अल्लाह तुम्हाला त्यांच्याविषयी आदेश देतो आणि जे काही ग्रंथात (कुरआनात) तुमच्यासमोर वाचले जाते, त्या अनाथ स्त्रियां (मुलीं) विषयी, ज्यांना तुम्ही त्यांचा अनिवार्य हक्क देत नाही आणि त्यांच्याशी विवाह करू इच्छिता आणि कमजोर मुलांविषयी आणि हे की तुम्ही अनाथांबाबत न्याय करा आणि तुम्ही जेदेखील सत्कर्म कराल अल्लाह ते चांगल्या प्रकारे जाणणारा आहे.

**१२८.** आणि जर एखाद्या पत्नीला आपल्या पतीकडून उपेक्षा आणि दुर्लक्ष होण्याचे भय असेल तर त्या दोघांनी आपसात समझोता करून घेण्यात काही वाईट नाही आणि

समझोता अधिक चांगला आहे आणि लोभ तर प्रत्येक मनात समाविष्ट केला गेला आहे आणि जर तुम्ही उपकार कराल आणि अल्लाहचे भय राखून आचरण अंगिकाराल तर अल्लाह तुमच्या प्रत्येक कर्माला जाणून आहे.

**१२९.** आणि तुम्ही मनापासून इच्छा केली तरीही पत्नींच्या दरम्यान कधीही न्याय करू शकणार नाहीत. यास्तव तुम्ही (एकीच्याचकडे) पूर्णपणे न झुकावे की दुसरीला अधर लोंबकळत सोडून द्यावे आणि जर तुम्ही सुधारणा करून घ्याल, आणि (अन्याय करण्यापासून) स्वतःला वाचवाल तर खात्रीने अल्लाह मोठा माफ करणारा, दया करणारा आहे.

**१३०.** आणि जर दोन्ही विभक्त झाले तर अल्लाह आपल्या दया-कृपेने दोघांना निःस्पृह (बेपर्वा) करील आणि अल्लाह मोठा व्यापकता राखणारा हिकमत बाळगणारा आहे.

**१३१.** आणि आकाशांचे व जमिनीचे सर्व काही अल्लाहचेच आहे आणि आम्ही तुमच्या पूर्वीचे लोक, ज्यांना ग्रंथ दिला गेला होता, त्यांना आणि तुम्हाला हाच आदेश दिला की अल्लाहचे भय राखा आणि जर तुम्ही मानले नाही तर निःसंशय जे काही आकाशांमध्ये व जमिनीवर आहे सर्व अल्लाहचेच आहे आणि अल्लाह कोणाची गरज नसलेला, प्रशंसनीय आहे.

**१३२.** आणि जे काही आकाशांमध्ये व जमिनीवर आहे, सर्व अल्लाहचेच आहे आणि कार्य तडीस नेण्यास अल्लाह पुरेसा आहे.

**१३३.** लोकांनो! जर अल्लाहने इच्छिले तर तुम्हाला सर्वांना हटवून देईल, आणि दुसऱ्यांना आणील आणि अल्लाह असे करण्यास पूर्णतः समर्थ आहे.

**१३४.** जो मनुष्य या जगाचा मोबदला इच्छित असेल तर (लक्षात ठेवा की) अल्लाहजवळ या जगाचा व आखिरतचा (दोघांचाही) मोबदला हजर आहे आणि अल्लाह ऐकणारा व पाहणारा आहे.

**१३५.** हे ईमान राखणाऱ्यांनो! न्यायावर मजबूतीने कायम राहणारे आणि अल्लाहकरिता खरी साक्ष देणारे बना, मग तो साक्ष स्वतः तुमच्याविरूद्ध आणि तुमचे माता-पिता व नातेवाईकांच्या विरूद्ध का असेना, मग तो मनुष्य धनवान असो किंवा गरीब असो तर त्या दोघांपेक्षा अल्लाहचे नाते खूप (जवळचे) आहे. यास्तव न्याय

करण्यात मनाला वाटेल ते करू नका, आणि जर चुकीचे निवेदन द्याल किंवा न मानाल तर (जाणून असा की) अल्लाह तुमच्या प्रत्येक कर्माला जाणून आहे.

**१३६.** हे ईमान राखणाऱ्यांनो! अल्लाह आणि त्याचे पैगंबर (सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) आणि त्या ग्रंथा (पवित्र कुरआन) वर जो त्याने आपले पैगंबर (सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) यांच्यावर अवतरीत केला आहे आणि त्या ग्रंथांवर जे यापूर्वी अवतरीत केले गेले, ईमान राखा आणि जो अल्लाह आणि त्याच्या फरिश्त्यांना आणि त्याच्या ग्रंथांना, त्याच्या पैगंबरांना आणि कयामतच्या दिवसाला न मानेल तो वाट चुकून दूर गेला.

**१३७.** निःसंशय, ज्यांनी ईमान राखले मग इन्कार केला, पुन्हा ईमान राखले मग इन्कार केला, इन्कार करण्यात पुढेच जात राहिले, अल्लाह त्यांना कदापि माफ करणार नाही आणि ना सरळ मार्ग दाखविल.

**१३८.** मुनाफिक लोकांना (वरकरणी मुसलमानांना) दुःखदायक शिक्षा-यातनेचा शुभ-समाचार द्या.

**१३९.** जे ईमानधारकांना सोडून इन्कारी लोकांना आपला मित्र बनवितात काय ते त्यांच्याशी दोस्ती करून मान-प्रतिष्ठा मिळवू इच्छितात? (लक्षात ठेवा) सर्व मान-प्रतिष्ठा अल्लाहकरिता आहे.

**१४०.** आणि अल्लाहने तुमच्यासाठी आपल्या ग्रंथात (पवित्र कुरआनात) हा आदेश उतरविला आहे की जेव्हा तुम्ही अल्लाहच्या आयतींशी इन्कार आणि थट्टा-मस्करी होत असल्याचे ऐकाल तेव्हा त्यांच्यासोबत त्या बैठकीत बसू नका जोपर्यंत ते दुसऱ्या गोष्टीवर बोलत नाहीत कारण त्या वेळी तुम्ही त्यांच्यासमान ठराल. निःसंशय अल्लाह, मुनाफिकांना आणि इन्कारी लोकांना जहन्नममध्ये एकत्र करणार आहे.

**१४१.** जे तुमच्या बाबतीत प्रतिक्षा करतात, मग जर अल्लाहतर्फे तुमचा विजय असेल तर हे म्हणतात की, काय आम्ही तुमच्यासोबत नव्हतो? आणि जर काफिर लोकांना थोडीशीही सफलता मिळाली तर म्हणतात की, काय आम्ही तुम्हाला (रक्षणआसाठी) घेरा टाकला नव्हता, आणि ईमानधारकांपासून तुमचा बचाव केला नव्हता? तेव्हा, कयामतच्या दिवशी अल्लाहच तुमच्या दरम्यान फैसला करील आणि अल्लाह कधीही काफिरांना (इन्कारी लोकांना) ईमानधारकांवर वर्चस्वशाली होऊ देणार नाही.

**१४२.** नि:संशय, मुनाफिक (दुतोंडी) लोक अल्लाहशी कपट करीत आहेत, आणि अल्लाह त्यांना त्या कपटनीतीचा मोबदला देणार आहे आणि जेव्हा नमाजसाठी उभे राहतात तर केवळ लोकांना दाखविण्यासाठी आणि अल्लाहचे स्मरण फार कमी करतात.

**१४३.** ते मधल्यामधेच (शंका-संशयाच्या) दुविधापूर्ण अवस्थेत आहेत ना पूर्णपणे त्यांच्या बाजूला आणि ना उचितरित्या यांच्या बाजूला, आणि ज्याला अल्लाह सरळ मार्गापासून दूर करील, तर त्याच्यासाठी तुम्हाला कोणताही मार्ग आढळणार नाही.

**१४४.** हे ईमान राखणाऱ्यांनो! ईमानधारकांना सोडून इन्कारी लोकांना आपला मित्र बनवू नका. काय तुम्ही असे इच्छिता की आपल्यावर अल्लाहतर्फे (शिक्षेचे) खुले प्रमाण कायम करून घ्यावे?

**१४५.** नि:संशय, मुनाफिक लोक तर जहन्नमच्या सर्वांत खालच्या दर्जात जातील. निश्चितच तुम्हाला त्यांचा कोणताही मदत करणारा आढळणार नाही.

**१४६.** परंतु जर माफी मागतील आणि आपले आचरण सुधारतील आणि अल्लाहवर पूर्ण ईमान राखतील आणि प्रामाणिकपणे अल्लाहकरिताच दीन-धर्माचे कार्य करतील तर हे लोक ईमानधारकांच्या सोबत आहेत. अल्लाह ईमान राखणाऱ्यांना फार मोठा मोबदला प्रदान करील.

**१४७.** अल्लाह तुम्हाला शिक्षा-यातना देऊन काय करील जर तुम्ही कृतज्ञशील राहाल आणि ईमानासह राहाल आणि अल्लाह फार कदर करणारा आणि सर्व काही जाणणारा आहे.

**१४८.** उंच स्वरात वाईट गोष्ट जाहीर करणे अल्लाहला पसंत नाही, तथापि अत्याचारपीडिताला याची मुभा आहे, आणि अल्लाह ऐकणारा व जाणणारा आहे.

**१४९.** जर तुम्ही एखादे सत्कर्म उघडपणे करा किंवा लपवून करा अथवा एखाद्या वाईट गोष्टीला माफ कराल तर नि:संशय अल्लाह माफ करणारा, सामर्थ्यशाली आहे.

**१५०.** जे लोक अल्लाह आणि त्याच्या पैगंबरांवर ईमान राखत नाहीत आणि असे इच्छितात की अल्लाह आणि त्याच्या पैगंबरांच्या दरम्यान दुरावा निर्माण करावा आणि म्हणतात की आम्ही काहींना मानतो आणि काहींना मानत नाही. आणि याच्या दरम्यान एक वेगळा मार्ग काढू इच्छितात.

**१५१.** निःसंशय, हे सर्व लोक पक्के काफिर आहेत[१] आणि अशा इन्कारी लोकांसाठी आम्ही अतिशय कठोर शिक्षा-यातना तयार करून ठेवली आहे.

**१५२.** आणि ज्या लोकांनी अल्लाह आणि त्याच्या पैगंबरांवर ईमान राखले, आणि त्यांच्यापैकी कोणाच्या दरम्यान फरक केला नाही, तर अशाच लोकांना अल्लाह त्यांचा पुरेपूर मोबदला देईल आणि अल्लाह मोठा माफ करणारा दया करणारा आहे.

**१५३.** (हे पैगंबर!) ग्रंथधारक तुमच्याजवळ अशी मागणी करतात की तुम्ही त्यांच्यावर आकाशातून एखादा ग्रंथ उतरवून दाखवा[२] तेव्हा त्यांनी मूसाकडे यापेक्षा मोठी मागणी केली होती आणि म्हटले की आम्हाला स्पष्टपणे अल्लाहला दाखवा. मग त्यांना त्यांच्या या अत्याचारामुळे विजेने येऊन घेरले, मग त्यांनी स्पष्ट निशाण्या येऊन पोहचल्यावरही वासराला उपास्य बनविले. तरीही आम्ही त्यांना माफ केले आणि मूसा यांना स्पष्ट प्रमाण प्रदान केले.

**१५४.** आणि त्यांच्याकडून वचन घेण्याकरिता, आम्ही तूर पर्वताला त्यांच्यावर अधांतरीत ठेवले आणि त्यांना आदेश दिला की सजदा करीत दरवाज्यात प्रवेश करा आणि हाही आदेश दिला की शनिवारच्या दिवशी उल्लंघन करून नका आणि आम्ही त्यांच्याकडून अगदी पक्का वायदा घेतला.

**१५५.** मग त्यांनी आमच्याशी जो वायदा केला होता, त्यापासून मुकरले आणि अल्लाहच्या आयतींचा इन्कार करू लागले, येथपर्यंत की अल्लाहच्या पैगंबरांना नाहक ठार मारले आणि असेही म्हणू लागले होते की आमची मने आवरणाखाली आहेत, (असे नाही) किंबहुना अल्लाहने त्यांच्या इन्कार करण्यापायी त्यांच्या हृदयांना मोहरबंद केले आहे. तेव्हा त्यांच्यापैकी फार थोडेच लोक ईमान राखतात.

---

(१) ग्रंथधारकांविषयी यापूर्वी हे सांगितले गेले की ते काही पैगंबरांना मान्य करीत, तर काहींना मानत नसत. उदा. यहूदी लोक पैगंबर ईसा आणि हजरत मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांना मानत नाहीत आणि ख्रिश्चन लोक हजरत मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लमयांना मान्य करीत नाही. सर्वश्रेष्ठ अल्लाहने फर्माविले की पैगंबरांच्या दरम्यान फरक करणारे कट्टर काफिर आहेत.

(२) अर्थात ज्याप्रमाणे हजरत मूसा (अलैहिस्सलाम) तूर पर्वतावर गेले आणि येताना शिळांवर लिहिलेला तौरात घेऊन आले. त्याचप्रमाणे तुम्ही आकाशात जाऊन लिखित स्वरूपात पवित्र कुरआन घेऊन या. अर्थात ही मागणी केवळ उपद्रव, इन्कार आणि द्वेष मस्तरावर आधारीत होती.

**१५६.** आणि त्यांच्या इन्कार करण्यामुळे आणि मरियमवर मिथ्या आरोप ठेवण्यामुळे.

**१५७.** आणि त्यांच्या या कथनामुळे की आम्ही मरियमचे पुत्र ईसा मसीहची हत्या करून टाकली, जे अल्लाहचे पैगंबर होते, वास्तविक ना तर त्यांनी हत्या केली, ना त्यांना सूळावर चढविले, परंतु त्यांच्यासाठी ईसाची छबी बनविली गेली[१] निश्चितच ईसा यांच्याविषयी मतभेद करणारे संशयात पडले आहेत. केवळ अटकळीच्या गोष्टीवर चालण्याखेरीज त्यांना कसलेही ज्ञान नाही. एवढे निश्चित की त्यांचा वध केला गेला नाही.

**१५८.** किंबहुना अल्लाहने त्यांना आपल्याकडे उचलून घेतले आणि अल्लाह जबरदस्त हिकमत बाळगणारा आहे.

**१५९.** ग्रंथधारकांपैकी कोणी असा नसेल जो (हजरत) ईसा यांच्या मृत्युपूर्वी त्यांच्यावर ईमान न राखेल, आणि कयामतच्या दिवशी ते त्यांच्यावर साक्षी राहतील.

**१६०.** यहूदी लोकांच्या जुलूम-अत्याचारामुळे आम्ही त्यांच्यावर हलाल (वैध) चीज वस्तूंना, हराम (अवैध) करून टाकले आणि त्यांचे अल्लाहच्या मार्गापासून लोकांना अडवण्यामुळे.

**१६१.** आणि त्यांच्या व्याज घेण्यामुळे, ज्यापासून त्यांना रोखले गेले होते, आणि लोकांचा माल (धन-दौलत) नाहक हडप केल्यामुळे, आणि आम्ही यांच्यातल्या काफिरांकरिता दुःखदायक शिक्षा-यातना तयार करून ठेवली आहे.

**१६२.** परंतु त्यांच्यात जे परिपक्व आणि मजबूत ज्ञान राखणारे आहेत, आणि ईमानधारक आहेत, जे त्यावर ईमान राखतात, जे तुमच्याकडे उतरविले गेले, आणि जे

---

(१) अर्थात जेव्हा हजरत ईसा यांना यहूद्यांच्या कटाची बातमी कळाली तेव्हा त्यांनी आपल्या अनुयायींना, ज्यांची संख्या १२ किंवा १७ होती, जमा केले आणि फर्माविले की तुमच्यापैकी कोण माझ्या जागी बलिदान देण्यास तयार आहे? यासाठी की अल्लाहने त्याचे स्वरूप अगदी माझ्यासारखे बनवावे. एक तरुण यासाठी तयार झाला, म्हणून हजरत ईसा यांना तेथून आकाशात उचलले गेले, त्यानंतर यहूदी आले आणि त्यांनी या तरुणाला सूळावर चढविले, ज्याला ईसासारखे बनविले गेले होते. यहूदी हेच समजत राहिले की आम्ही हजरत ईसा यांना सूळावर चढविले. वास्तविक हजरत ईसा त्याच क्षणी तिथे हजर नव्हतेच. त्यांना तर जिवंत अवस्थेत सशरीर आकाशात उचलले गेले होते. (इब्ने कसीर आणि फतहुल कदीर)

तुमच्यापूर्वी उतरविले गेले आणि नमाज कायम करणारे आहेत, जकात अदा करणारे आहेत, अल्लाहवर आणि कयामतच्या दिवसावर ईमान राखणारे आहेत. हे असे लोक आहेत, ज्यांना आम्ही फार मोठा मोबदला प्रदान करू.

**१६३.** निःसंशय, आम्ही तुमच्याकडे त्याचप्रमाणे संदेश अवतरीत केला आहे, ज्याप्रमाणे नूह (अलैहिस्सलाम) आणि त्यांच्या नंतरच्या पैगंबरांकडे आम्ही संदेश अवतरीत केला, आणि इब्राहीम आणि इस्माईल आणि इसहाक आणि याकूब आणि त्यांच्या संततीवर आणि ईसा व अय्यूब आणि यूनुस आणि हारुन आणि सुलेमान यांच्याकडे आणि आम्ही दाऊद (अलैहिस्सलाम) यांना जबूर (ग्रंथ) प्रदान केला.

**१६४.** आणि तुमच्या पूर्वीच्या अनेक पैगंबरांचे वृत्तांत आम्ही तुम्हाला सांगितले आहेत, आणि बहुतेक पैगंबरांचे सांगितले नाहीत आणि (हजरत) मूसा यांच्याशी अल्लाहने सरळ संभाषण केले.

**१६५.** (आम्ही या सर्वांना) शुभ वार्ता देणारा आणि सचेत करणारा रसूल (पैगंबर) बनविले, यासाठी की पैगंबरांना पाठविल्यानंतर लोकांना एखादे निमित्त वा सबब अल्लाहपुढे मांडण्याची संधी राहू नये आणि अल्लाह मोठा जबरदस्त आणि हिकमतशाली आहे.

**१६६.** जे काही तुमच्याकडे उतरविले गेले आहे, त्याविषयी अल्लाह स्वतः साक्ष देतो की ते त्याने आपल्या ज्ञानाने अवतरीत केले आहे आणि फरिश्तेदेखील साक्ष देतात आणि साक्ष देण्यास केवळ अल्लाह पुरेसा आहे.

**१६७.** निःसंशय, ज्यांनी इन्कार केला आणि अल्लाहच्या मार्गा (दीन-धर्मा) पासून रोखले, तर ते खूप दूर भटकले.

**१६८.** निःसंशय, ज्यांनी इन्कार केला आणि जुलूम-अत्याचार केला तर अल्लाह त्यांना माफ करणारा नाही आणि ना त्यांना एखादा सन्मार्ग दाखवील.

**१६९.** परंतु जहन्नमचा मार्ग, ज्यात ते सदासर्वदा राहतील आणि हे अल्लाहकरिता फार सोपे आहे.

**१७०.** लोक हो! तुमच्याजवळ तुमच्या पालनकर्त्यातर्फे सत्य घेऊन पैगंबर (मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) आले. त्यांच्यावर ईमान राखा. तुमच्यासाठी अधिक

चांगले आहे आणि जर तुम्ही इन्कार केला तर आकाशांमध्ये व धरतीवर जे काही आहे सर्व अल्लाहचेच आहे आणि अल्लाह सर्वज्ञ आणि हिकमतशाली आहे.

**१७१.** हे ग्रंथधारकांनो! आपल्या दीन-धर्माबाबत अतिशयोक्ती करू नका, आणि अल्लाहच्या संबंधाने सत्य तेच बोला. निःसंशय मरियमपुत्र ईसा मसीह केवळ अल्लाहचे रसूल आणि कलिमा आहे जो मरियमकडे पाठविला गेला आणि त्याच्यातर्फे आत्मा आहे, यास्तव अल्लाह आणि त्याच्या पैगंबरांवर ईमान राखा आणि अल्लाह तीन आहे असे म्हणू नका.[१] हे म्हणणे थांबवा यातच तुमचे हित आहे. निःसंशय तुमचा उपास्य केवळ एक अल्लाह आहे. तो पाक-पवित्र आहे, यापासून की त्याची एखादी संतान असावी. त्याच्याचकरिता आहे जे काही आकाशांमध्ये व धरतीवर आहे आणि अल्लाह काम बनविण्यासाठी पुरेसा आहे.

**१७२.** मसीह, अल्लाहचे दास होण्यात कधीही तिरस्कार करीत नाहीत आणि ना निकटचे फरिश्ते, आणि जो अल्लाहची उपासना करण्यापासून तिरस्कार व घमेंड करील तर तो त्या सर्वांना आपल्याकडे एकत्र करील.

**१७३.** तेव्हा, ज्या लोकांनी ईमान राखले आणि सत्कर्म करीत राहिले, त्यांना त्यांचा पुरेपूर मोबदला देईल, आणि आपल्या कृपेने आणखी जास्त प्रदान करील, परंतु ज्यांनी तिरस्कार केला आणि घमेंड केली त्यांना दुःखदायक शिक्षा-यातना देईल, मग त्यांना अल्लाहशिवाय आपला कोणी मित्र व मदत करणारा आढळणार नाही.

**१७४.** लोकांनो! तुमच्याजवळ तुमच्या पालनकर्त्यातर्फे प्रमाण येऊन पोहचले आहे[२] आणि आम्ही तुमच्याकडे दिव्य तेज (पवित्र कुरआन) अवतरीत केले आहे.

**१७५.** मग ज्या लोकांनी अल्लाहवर ईमान राखले आणि त्याला मजबूतपणे धरले तर

---

(१) ख्रिश्चनांमध्ये अनेक गट आहेत. काहीजण हजरत ईसा यांना अल्लाह, काहीजण अल्लाहचे सहभागी तर काही अल्लाहचा पुत्र मानतात, मग जे अल्लाह मानतात ते तीन अल्लाहचे आणि हजरत ईसा यांना तीनपैकी एक असण्यावर श्रद्धा ठेवतात. यास्तव सर्वश्रेष्ठ अल्लाह फर्मावितो की तीन अल्लाह म्हणणे थांबवा. अल्लाह केवळ एक आहे.

(२) मूळ शब्द बुरहान अर्थात असे अकाट्य प्रमाण की ज्याच्यानंतर कसल्याही निमित्त किंवा बहाण्याला वाव न राहावा. अशी उपाययोजना की ज्यामुळे सर्व प्रकारच्या शंका-कुशंका नष्ट व्हाव्यात यास्तव पुढे याला आकाशीय दिव्य तेज (नूर) म्हटले गेले आहे.

अल्लाह त्यांना आपल्या कृपाछत्रात घेईल आणि त्यांना आपल्याकडे येण्याचा सरळ मार्ग दाखवील.

**१७६.** ते तुम्हाला कलालाविषयी (अर्थात आई-बाप आणि संतती नसलेल्या मयताविषयी) विचारतात. तुम्ही सांगा, अल्लाह कलालाविषयी आदेश देतो की जर एखादा पुरुष मरण पावेल आणि त्याच्या वारसांमध्ये कोणी संतान नसेल आणि त्याला एक बहीण असेल तर तिच्यासाठी मयताने मागे सोडलेल्या धन-संपत्तीचा अर्धा हिस्सा आहे आणि तो त्या (बहिणी) चा वारस आहे. जर त्याला एखादी संतती नसेल, जर दोन बहिणी असतील तर त्या दोघींसाठी दोन तृतियांश हिस्सा आहे. त्यातून जे तो सोडून गेला. आणि जर भाऊ बहिणी दोन्ही असतील पुरुषही आणि स्त्रियाही तर पुरुषाकरिता, दोन स्त्रियांच्या हिश्याइतका हिस्सा आहे. अल्लाह तुमच्यासाठी स्पष्ट सांगत आहे, यासाठी की तुम्ही (इतस्ततः) भटकत फिरू नये आणि अल्लाह सर्व काही जाणणारा आहे.

—-

## सूरह मायेदा - ५

सूरह मायेदा मदीना येथे अवतरली. यात एकशे वीस आयती आणि सोळा रुकूउ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** हे ईमान राखणाऱ्यांनो! आपले वचन-करार पूर्ण करा. तुमच्यासाठी चार पायांचे पाळीव पशू हलाल (वैध) केले गेले आहेत, त्यांच्याखेरीज, जे वाचून तुम्हाला ऐकविले जात आहेत. परंतु एहरामच्या स्थितीत शिकार करू नका. निःसंशय अल्लाहने जे इच्छिले त्याचा आदेश देतो.

**२.** हे ईमान राखणाऱ्यांनो! अल्लाहच्या धर्म-प्रतिकांचा (शआईरचा) अवमान करू नका, ना आदरणीय महिन्यांचा, ना कुर्बानीकरिता हरम (काबागृहा) पर्यंत नेल्या जाणाऱ्या आणि गळ्यात पट्टा घातलेल्या जनावराचा, ना आदरणीय घरा (काबागृहा) कडे जाणाऱ्या लोकांचा जे अल्लाहची दया आणि प्रसन्नता शोधत आहेत. आणि जेव्हा एहराम उतरवाल तेव्हा मग शिकार करू शकतात आणि ज्यांनी तुम्हाला आदरणीय मसजिदीपासून रोखले, त्यांची शत्रूता तुम्हाला हद्द ओलांडण्यास प्रवृत्त न करावी आणि

नेकी व अल्लाहचे भय राखण्यात एकमेकांची मदत करा. अपराध आणि अत्याचाराच्या कामात मदत करू नका. अल्लाहचे भय बाळगून राहा. निःसंशय अल्लाह मोठा सक्त अज़ाब (कठोर शिक्षा-यातना) देणारा आहे.

**३.** तुमच्यावर हराम (अवैध) केले गेले आहे मेलेले जनावर आणि रक्त आणि डुकराचे मांस, आणि ज्यावर अल्लाहशिवाय दुसऱ्यांचे नाव घेतले गेले असेल आणि ते जनावर जे गळा दाबल्याने मेले आणि जे ठोस लागून मेले असेल आणि जे खाली कोसळून मेले आणि जे दुसऱ्या जनावराने शिंग मारल्याने मेले आणि ज्याचा काही हिस्सा हिंस्त्र पशूंनी खआऊन टाकला असेल, परंतु ज्याला तुम्ही जिबह करून टाकले आणि जे देवस्थानावर बळी दिले गेले असेल आणि फाँसे टाकून (जुगार सट्ट्याप्रमाणे) वाटणी करणे हे सर्व फार मोठे अपराध आहेत. आज काफिर (अनेकेश्वरवादी) तुमच्या दीन-धर्माद्वारे निराश झाले, यास्तव त्यांचे भय बाळगू नका, फक्त माझेच भय बाळगा. आज मी तुमच्यासाठी तुमच्या दीन-धर्माला परिपूर्ण केले आणि तुमच्यावर आपल्या कृपा-देणग्या पूर्ण केल्या आणि तुमच्यासाठी इस्लाम धर्म पसंत केला. तथापि जो भूकेने व्याकूळ होईल आणि कोणताही गुन्हा करू इच्छित नसेल तर खात्रीने अल्लाह माफ करणारा, मोठा दयाशील आहे.

**४.** ते तुम्हाला विचारतात की त्यांच्यासाठी कोणकोणते खाद्य उचित आहे. तुम्ही सांगा की तुमच्यासाठी स्वच्छ शुद्ध व पवित्र वस्तू उचित आहेत. आणि ते शिकारी जनावर, ज्याला तुम्ही प्रशिक्षण देऊन तयार केले असेल, ज्यांना काही गोष्टी शिकविता, ज्या अल्लाहने तुम्हाला शिकविल्या, तेव्हा जर तुमच्यासाठी ते जनावर, शिकार जखमी करून धरून ठेवील आणि त्याला सोडताना अल्लाहचे नाव त्याच्यावर घ्याल तर ती शिकार तुम्ही खाऊ शकता आणि अल्लाहचे भय राखा निःसंशय, अल्लाह लवकरच हिशोब घेणारा आहे.

**५.** आज सर्व पाक-साफ वस्तू तुमच्यासाठी हलाल (वैध) केल्या गेल्या आहेत. आणि ग्रंथधारकांनी जिबह केलेले जनावर तुमच्यासाठी हलाल आहे. आणि तुम्ही जिबह केलेले त्यांच्यासाठी हलाल आहे आणि सुशील सदाचारी ईमानधारक स्त्रिया आणि ज्यांना तुमच्यापूर्वी ग्रंथ (धर्मशास्त्र) दिले गेले, त्यांच्यातल्या सुशील, सदाचारी स्त्रिया, जेव्हा तुम्ही त्यांना त्यांचा महर अदा कराल, विवाह करून, दुराचार करण्यासाठी नव्हे आणि ना लपून छपून प्रेयसी बनविण्याकरिता आणि जो ईमानचा इन्कार करील तर

त्याचे सर्व कर्म वाया गेले आणि तो आखिरतमध्ये तोट्यात राहील.

**६.** हे ईमान राखणाऱ्यांनो! जेव्हा तुम्ही नमाजसाठी उठाल तेव्हा आपले तोंड व कोपरांपर्यंत आपले हात धुवून घ्या आणि दोन्ही हात पाण्याने ओले करून आपल्या डोक्यावरून फिरवून घ्या आणि आपले पाय, घोट्यापर्यंत धुवून घ्या आणि तुम्ही जर नापाक (अपवित्र) असाल तर स्नान करा आणि जर तुम्ही आजारी किंवा प्रवासात असाल, किंवा तुमच्यापैकी कोणी शौचास जाऊन येईल किंवा तुम्ही पत्नीशी सहवास केला असेल आणि पाणी मिळत नसेल तर साफ स्वच्छ मातीने तयम्मुम करून घ्या. ती माती आपल्या चेहऱ्यावर आणि हातांवर मळा, अल्लाह तुम्हाला अडचणीत टाकू इच्छित नाही. किंबहुना तुम्हाला स्वच्छ शुद्ध व पवित्र करू इच्छितो आणि यासाठी की तुमच्यावर आपली कृपा-देणगी पूर्ण करावी आणि यासाठी की तुम्ही कृतज्ञशील राहावे.

**७.** आणि आपल्यावर झालेली अल्लाहची कृपा देणगी आणि त्या वचन कराराचे स्मरण करा, ज्याचा तुमच्याशी करार झाला, जेव्हा तुम्ही म्हटले की आम्ही ऐकले आणि मान्य केले आणि सर्वश्रेष्ठ अल्लाहचे भय बाळगत राहा. निःसंशय अल्लाह मनात लपलेल्या गोष्टींनाही जाणतो.

**८.** हे ईमान राखणाऱ्यांनो! अल्लाहकरिता सत्यावर अटळ राहून न्यायाच्या बाजूने साक्षी व्हा, आणि एखाद्या जमातीची शत्रूता तुम्हाला न्याय न करण्यावर प्रवृत्त न करावी. न्याय करा, ते अल्लाहचे भय राखण्याशी फार जवळचे आहे, आणि अल्लाहचे भय राखा. निःसंशय, अल्लाह तुमच्या प्रत्येक कर्माला चांगल्या प्रकारे जाणून आहे.

**९.** ज्या लोकांनी ईमान राखले आणि सत्कर्म करीत राहिले, अल्लाहने त्यांच्याशी माफी आणि फार मोठ्या मोबदल्याचा वायदा केला आहे.

**१०.** आणि ज्यांनी ईमान राखले नाही आणि आमच्या आदेशांना खोटे ठरविले तेच जहन्नमी आहेत.

**११.** हे ईमान राखणाऱ्यांनो! अल्लाहने तुमच्यावर जे उपकार केले आहेत, त्यांचे स्मरण करा, जेव्हा एका जनसमूहाने तुमच्यावर अत्याचार करू इच्छिले, तेव्हा अल्लाहने त्यांच्या हातांना तुमच्यापर्यंत पोहचण्यापासून रोखले, आणि अल्लाहचे भय बाळगून राहा आणि ईमान राखणाऱ्यांनी तर सर्वश्रेष्ठ अल्लाहवरच भरोसा ठेवला पाहिजे.

**१२.** आणि सर्वश्रेष्ठ अल्लाहने इस्राईलच्या पुत्रांकडून वचन-करार घेतला आणि त्यांच्यातूनच बारा सरदार आम्ही नियुक्त केले, आणि अल्लाहने फर्माविले, मी निश्चितच तुमच्यासोबत आहे, जर तुम्ही नमाज कायम राखाल आणि जकात देत राहाल आणि माझ्या पैगंबरांना मानत राहाल आणि त्यांची मदत करीत राहाल आणि अल्लाहला उत्तम कर्ज देत राहाल तर निःसंशय मी तुमचे अपराध माफ करीन आणि तुम्हाला अशा जन्नतींमध्ये दाखल करीन, ज्यांच्या खाली नहरी (प्रवाह) वाहत आहे. आता या वायद्यानंतरही तुमच्यापैकी जो इन्कार करील तर निःसंशय तो सरळ मार्गापासून दूर भटकला.

**१३.** मग जेव्हा त्यांनी वचन-कराराचा भंग केला, तेव्हा आम्ही त्यांच्यावर धिःक्काराचा मारा केला आणि त्यांची मने कठोर केलीत की ते अल्लाहच्या वाणीला तिच्या स्थानापासून बदलून टाकतात आणि जो उपदेश त्यांना दिला गेला, त्याचा फार मोठा भाग ते विसरले. त्यांच्या बेईमानी व दगाबाजीची एक न एक खबर तुम्हाला मिळत राहील. परंतु थोडेसे (लोक) असेही नाहीत, तरीही तुम्ही त्यांना माफ करीत राहा. आणि माफ करीत राहा. निःसंशय अल्लाह उपकार करणाऱ्यांना पसंत करतो.

**१४.** आणि जे स्वतःला ख्रिश्चन म्हणवून घेतात, आम्ही त्यांच्याकडूनही वायदा घेतला होता, त्यांनीही त्याचा मोठा हिस्सा ध्यानी राखला नाही, जी शिकवण त्यांना दिली गेली होती, तेव्हा आम्हीही त्यांच्या दरम्यान शत्रूता आणि तिरस्कार निर्माण केला, जो कयामतपर्यंत राहील आणि जे काही हे करतात लवकरच अल्लाह त्यांना ते सर्व दाखवून देईल.

**१५.** हे ग्रंथधारकांनो! तुमच्याजवळ आमचे पैगंबर (मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) आले आहेत, जे अनेक अशा गोष्टी सांगत आहेत, ज्या ग्रंथा (तौरात आणि इंजील) च्या गोष्टी तुम्ही लपवित होते, आणि बहुतेक गोष्टींना सोडत आहात. तुमच्याजवळ अल्लाहतर्फे नूर (दिव्य तेज) आणि स्पष्ट असा ग्रंथ (पवित्र कुरआन) येऊन पोहोचला आहे.[1]

**१६.** ज्याच्याद्वारे अल्लाह त्या लोकांना सलामतीचा मार्ग दाखवितो, जे त्याच्या

(१) नूर आणि स्पष्ट ग्रंथ, दोघांशी अभिप्रेत एकच 'पवित्र कुरआन' आहे यांच्यामधील 'वाव' (अरबी शब्द) भाष्यकरिता आहे. तथापि दोघांशी अभिप्रेत एकच अर्थात कुरआन आहे. ज्याचा स्पष्ट पुरावा

प्रसन्नतेच्या मार्गावर चालतील आणि त्यांना अंधारातून बाहेर काढून आपल्या दया-कृपेच्या दिव्य तेजाकडे आणतो आणि त्यांना सरळ मार्ग दाखवितो.

**१७.** नि:संशय ते लोक काफिर (अविश्वासी) झाले, जे म्हणाले की मरियम-पुत्र मसीह अल्लाह आहे. त्यांना सांगा की जर मरियम-पुत्र मसीह आणि त्याची माता आणि साऱ्या जगातील सर्व लोकांना तो नष्ट करू इच्छिल तर असा कोण आहे, ज्याला अल्लाहसमोर (वाचविण्याचा) तिळमात्र अधिकार आहे? आणि आकाशांमध्ये व धरतीवर आणि जे काही या दोघांच्या दरम्यान आहे, सर्वत्र अल्लाहचीच राज्य-सत्ता आहे. तो जे काही इच्छितो, निर्माण करतो आणि अल्लाह प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्य बाळगतो.

**१८.** आणि यहूदी व ख्रिश्चन म्हणतात की आम्ही अल्लाहचे पुत्र आणि मित्र आहोत. तुम्ही सांगा की मग अल्लाह तुमच्या अपराधांपायी तुम्हाला शिक्षा का देतो? नव्हे, किंबहुना तुम्ही त्याच्या सृष्ट निर्मितीत एक मानव आहात. तो ज्याला इच्छितो, माफ करतो आणि ज्याला इच्छितो शिक्षा-यातना देतो. आकाशांची व जमिनीची आणि यांच्या दरम्यानची राज्यसत्ता केवळ अल्लाहचीच आहे, आणि त्याच्याचकडे परतावयाचे आहे.

**१९.** हे ग्रंथधारकांनो! पैगंबरांच्या आगमनात एक दीर्घ काळाच्या खंडानंतर आमचे रसूल (मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) येऊन पोहोचले आहेत, जे तुमच्यासाठी धर्म विधानांचे निवेदन करीत आहेत यासाठी की तुम्ही असे न म्हणावे की आमच्याजवळ कोणी शुभ समाचार देणारा आणि सचेत करणारा आला नाही. तेव्हा तुमच्याजवळ एक शुभ समाचार देणारा आणि सचेत करणारा (अंतिम रसूल) येऊन पोहोचला आहे. नि:संशय अल्लाह प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्य बाळगतो.

**२०.** आणि स्मरण करा जेव्हा मूसा (अलैहिस्सलाम) यांनी आपल्या लोकांना म्हटले की हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! अल्लाहच्या त्या उपकाराची आठवण करा की त्याने

---

पवित्र कुरआनाची पुढची आयत आहे, ज्यात म्हटले जात आहे की याच्याद्वारे अल्लाह मार्ग दाखवितो जर नूर आणि ग्रंथ दोन भिन्न गोष्टी असत्या तर वाक्य असे राहिले असते- 'अल्लाह या दोघांद्वारे मार्गदर्शन करतो.' परंतु असे नाही. यास्तव कुरआनातील या शब्दांद्वारे स्पष्ट झाले की नूर आणि स्पष्ट ग्रंथ या दोघांशी अभिप्रेत कुरआनच आहे असे नव्हे की नूरशी अभिप्रेत नबी (सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) आणि स्पष्ट ग्रंथाशी अभिप्रेत पवित्र कुरआन, अर्थात हा आशय, इस्लाम धर्मात नवनवीन गोष्टींचा समाविष्ट करणाऱ्या, मनगढत रचना करणाऱ्या लोकांनी आपल्या मनाने घेतला आहे.

तुमच्यामधून पैगंबर बनविले आणि तुम्हाला राज्य प्रदान केले आणि तुम्हाला ते प्रदान केले, जे साऱ्या जगात कोणालाही प्रदान केले नाही.

**२१.** हे माझ्या लोकांनो! त्या पवित्र भूमीत दाखल व्हा, जी अल्लाहने तुमच्या नावे लिहून दिली आहे. आणि आपली पाठ दाखवू नका की ज्यामुळे मोठे हानिकारक व्हाल.

**२२.** त्यांनी उत्तर दिले, हे मूसा! तिथे तर शक्तिशाली लढवय्ये लोक आहेत. आणि जोपर्यंत ते तिथून निघून जात नाहीत, तोपर्यंत आम्ही कधीही जाणार नाहीत, मात्र जर ते तिथून निघून जातील तर मग आम्ही (आनंदाने) तेथे जाऊ.

**२३.** परंतु जे अल्लाहचे भय बाळगत होते, त्यांच्यापैकी दोन मनुष्य म्हणाले, ज्यांच्यावर अल्लाहने कृपा देणगी केली, की तुम्ही त्यांच्यावर (आक्रमणासाठी) दरवाजातून दाखल व्हा, जेव्हा दाखल व्हाल तेव्हा तुम्हीच वरचढराहाल, आणि ईमान राखत असाल तर अल्लाहवरच भरोसा ठेवा.

**२४.** ते म्हणाले, हे मूसा! आम्ही कधीही तिथे जाणार नाहीत, जोपर्यंत ते तिथे राहतील, यास्तव तुम्ही आणि तुमचा रब (पालनहार) दोघे जाऊन लढा, आम्ही इथेच बसतो.

**२५.** मूसा म्हणाले, हे माझ्या पालनकर्त्या! मी फक्त स्वतःवर आणि आपला भाऊ (हारून) वर अधिकार राखतो, तेव्हा आमच्या आणि या दुराचारी लोकांच्या दरम्यान अलगाव निर्माण कर.

**२६.** अल्लाहने फर्माविले, ती भूमी त्यांच्यावर चाळीस वर्षांपर्यंत हराम (निषिद्ध) राहील, ते धरतीवर भटकत फिरतील, यास्तव तुम्ही (हे मूसा!) या दुराचारी लोकांबद्दल खेद करू नका.

**२७.** आणि आदमच्या दोन पुत्रांचा किस्सा त्यांना वाचून ऐकवा. जेव्हा त्या दोघांनी एक एक कुर्बानी सादर केली तेव्हा एकाची कुर्बानी स्वीकारली गेली आणि दुसऱ्याची स्वीकारली गेली नाही, तेव्हा तो म्हणाला की मी निश्चित तुला ठार करीन, त्यावर तो म्हणाला की अल्लाह, दुराचारापासून दूर राहणाऱ्या लोकांचीच कुर्बानी कबूल करतो.

**२८.** जर तू माझी हत्या करण्यासाठी हात पुढे करशील तर मी तुझी हत्या करण्यासाठी आपला हात पुढे करू शकत नाही, मी अल्लाहचे भय राखतो जो समस्त विश्वाचा स्वामी

आणि पालनहार आहे.

**२९.** मी इच्छितो की तू माझा गुन्हा आणि स्वतःचा गुन्हा गोळा कर आणि जहन्नमी लोकांपैकी हो आणि अत्याचारी लोकांचा हाच वाईट मोबदला आहे.

**३०.** तरीही त्याच्या मनाने आपल्या भावाची नाहक हत्या करण्यास प्रवृत्त केले आणि त्याने आपल्या भावाला शेवटी मारून टाकले, ज्यामुळे तो नुकसान उचलणाऱ्यांपैकी झाला.

**३१.** मग अल्लाहने एक कावळ पाठविला, जो जमीन खोदत होता, यासाठी की त्याला हे दाखवावे की, आपल्या मृत भावाचे प्रेत त्याने कशा प्रकारे लपवावे. तो म्हणू लागला, अरेरे! खेद आहे माझ्यावर! काय मी असे करण्यायोग्यही राहिलो नाही की आपल्या भावाचे प्रेत या कावळ्याप्रमाणे जमिनीत गाडू शकलो असतो? मग तर तो खूप दुःखी आणि लज्जित झाला.

**३२.** याच कारणाने आम्ही इस्राईलच्या संततीकरिता निर्धारीत केले की जो मनुष्य एखाद्याची, याविना की तो एखाद्याचा मारेकरी असेल, किंवा धरतीवर उत्पात माजविणारा असेल, हत्या करील तर त्याने जणू समस्त लोकांची हत्या केली आणि जो मनुष्य एखाद्याचा जीव वाचवील, तर त्याने जणू समस्त मानवांना जीवन-दान दिले आणि त्यांच्याजवळ आमचे रसूल (पैगंबर) अनेक स्पष्ट निशाण्या घेऊन आले, परंतु तरीही त्यांच्यापैकी अधिकांश लोक जुलूम-अत्याचार करणारेच राहिले.

**३३.** जे लोक अल्लाह आणि त्याच्या पैगंबराशी युद्ध करतात आणि धरतीवर फसाद (उत्पात) माजवितात तर त्यांना या अपराधाची शिक्षा म्हणून ठार मारले पाहिजे, किंवा त्यांना सूळावर चढविले पाहिजे किंवा त्यांचा एका बाजूचा हात आणि दुसऱ्या बाजूचा पाय कापून टाकला जावा अथवा त्यांना देशाबाहेर काढले जावे. ही अपमानाची शिक्षा त्यांना या जगाच्या जीवनात आहे आणि आखिरतमध्ये तर त्यांच्यासाठी महाभयंकर अज़ाब (शिक्षा-यातना) आहे.

**३४.** तथापि ज्यांनी पकडीत येण्यापूर्वीच तौबा (क्षमा-याचना) केली असेल तर खात्रीने अल्लाह मोठा माफ करणारा, मोठा मेहरबान आहे.

**३५.** हे ईमान राखणाऱ्यांनो! अल्लाहचे भय बाळगून राहा आणि त्याच्या दिशेने

सान्निध्य प्राप्त करण्याचा प्रयत्न करा[1] आणि त्याच्या मार्गात जिहाद करा, यासाठी की तुम्हाला सफलता लाभावी.

**३६.** नि:संशय, जे लोक काफिर (इन्कारी) आहेत, त्यांनी जर अल्लाहच्या शिक्षा-यातने (अज़ाब) पासून सुटका होण्याकरिता, धरतीवर जे काही आहे, ते सर्वच्या सर्व दंड म्हणून देऊन टाकले आणि तेवढेच आणखी घेऊन आले, तरीदेखील कयामतीच्या दिवशी अज़ाबपासून सुटका होण्याकरिता कबूल केले जाणार नाही, आणि त्यांच्याकरिता दु:खदायक शिक्षा-यातनेचा क्रम जारी राहील.

**३७.** ते जहन्नममधून बाहेर पडण्याची खूप इच्छा करतील, परंतु त्यातून कधीच बाहेर पडू शकणार नाहीत. त्यांच्यासाठी तर निरंतर अज़ाब आहे.

**३८.** चोरी करणारा व चोरी करणारीचे हात कापून टाका. हे त्याच्या दुष्कर्माचे फळ आणि अल्लाहतर्फे शिक्षा आहे आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह शक्तिशाली आणि हिकमतशाली आहे.

**३९.** जो मनुष्य अपराधानंतर (अल्लाहकडे) क्षमा याचना करील, आणि आपले आचरण सुधारेल तर अल्लाह त्याची तौबा (क्षमा याचना) कबूल करतो. नि:संशय सर्वश्रेष्ठ अल्लाह माफ करणारा, दया करणारा आहे.

**४०.** काय तुम्ही नाही जाणत की आकाशआंची व जमिनीची राज्य सत्ता केवळ अल्लाहकरिताच आहे? तो ज्याला इच्छितो अज़ाब (शिक्षा-यातना) देतो, आणि ज्याला इच्छितो माफ करतो. अल्लाह प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्य बाळगतो.

**४१.** हे पैगंबर! तुम्ही त्यांच्यासाठी दु:खी होऊ नका जे इन्कार करण्यात धाव घेत आहेत, जे आपल्या तोंडाने म्हणाले की आम्ही ईमान राखले आणि त्यांच्या मनाने ईमान

---

(१) मूळ शब्द 'वसीला' अर्थात हेतुप्राप्तीसाठी व निकटता प्राप्त करण्यासाठी प्रयोगात आणले जाणारे माध्यम. 'अल्लाहचे जवळीक प्राप्त करण्याचे साधन शोधा'चा खरा अर्थ असे कर्म की ज्यामुळे तुम्हाला अल्लाहची मर्जी आणि त्याचे जवळीव लाभावे. इमाम शौकानीच्या कथनानुसार वसीला म्हणजे ते सत्कर्म की ज्याद्वारे मनुष्य अल्लाहचे जवळीव प्राप्त करतो. त्याचप्रमाणे वर्जित आणि हराम केलेल्या वस्तू आणि कर्मापासून अलिप्त राहिल्यानेही अल्लाहचे जवळीक प्राप्त होते. तथापि मूर्ख लोकांनी हे खरे माध्यम सोडून कबरीत गाडल्या गेलेल्या लोकांना आपला 'वसीला' बनवून घेतले आहे, ज्याला इस्लामी धर्मशास्त्रात तिळमात्र जागा नाही.

राखले नाही आणि जे यहूदी झाले, त्यांच्यातले काही खोटे बोलण्याचे अभ्यस्त आणि दुसऱ्या लोकांचे गुप्तहेर आहेत, जे तुमच्याजवळ आले नाहीत. ते वाणीला (वचनाला) मूळ स्थानापासून हटवून तिचा अर्थ बदलून टाकतात आणि असे सांगतात की जर तुम्हाला हा आदेश मिळाला तर कबूल करा आणि न मिळाल्यास अलग राहा. जर अल्लाह एखाद्यास भटकत ठेवू इच्छिल तर त्याच्यासाठी अल्लाहवर तुम्हाला किंचितही अधिकार नाही. अशाच लोकांच्या हृदयांना अल्लाह पाक (पवित्र) करू इच्छित नाही. याच लोकांसाठी या जगात अपमान आणि आखिरतमध्ये मोठा जबरदस्त अज़ाब आहे.

**४२.** हे कान लावून खोट्या गोष्टी ऐकणारे आणि मन तृप्त होईपर्यंत हराम खाणारे आहेत. जर हे तुमच्याजवळ येतील तर तुम्हाला अधिकार आहे, वाटल्यास त्यांच्या दरम्यान फैसला करा, वाटल्यास करू नका. जर तुम्ही त्यांच्यापासून तोड फिरवूनही घ्याल तरीही ते तुम्हाला कसलेही नुकसान पोहचवू शकत नाही आणि जर तुम्ही फैसला कराल तर त्यांच्या दरम्यान न्यायासह फैसला करा. निःसंशय, न्याय करणाऱ्यांशी अल्लाह प्रेम राखतो.

**४३.** आणि (आश्चर्याची गोष्ट अशी की) स्वतःजवळ तौरात असताना, ज्यात अल्लाहचा आदेश आहे, ते कसे तुम्हाला फैसला करणारा बनवितात, मग त्यानंतर आदेश मानण्याचे टाळतात. वास्तविक हे लोक (खऱ्या अर्थाने) ईमानधारक नाहीत.

**४४.** आम्ही तौरात आवतरीत केली, ज्यात मार्गदर्शन आणि नूर (दिव्य प्रकाश) आहे. यहूदी लोकांमध्ये याच तौरातद्वारे अल्लाहला मानणारे पैगंबर आणि अल्लाहवाले आणि धर्मज्ञानी लोक फैसला करीत असत कारण त्यांना अल्लाहच्या या ग्रंथाचे रक्षण करण्याचा आदेश दिला गेला होता आणि ते यावर स्वीकारणारे साक्षी होते. आता तुम्ही लोकांचे भय बाळगू नका, किंबहुना माझे भय बाळगा. माझ्या आयतींना थोड्याशा किंमतीवर विकू नका आणि जो, अल्लाहने अवतरीत केलेल्या संदेशा (वहयी) च्या आधारावर फैसला न करील तर असे लोक पुरेपूर काफीर आहेत.

**४५.** आणि आम्ही (तौरातमध्ये) यहूदींच्या हक्कात ही गोष्ट निर्धारीत केली की जीवाच्या बदल्यात जीव, आणि डोळ्याच्या बदल्यात डोळा आणि नाकाच्या बदल्यात नाक आणि कानाच्या बदल्यात कान आणि दाताच्या बदल्यात दात आणि खास जखमांचाही बदला आहे, मग जो कोणी त्यास माफ करील तर ते त्याच्यासाठी पश्चात्ताप

आहे आणि जे लोक अल्लाहच्या आदेशानुसार फैसला करणार नाहीत तर असेच लोक अत्याचारी आहेत.

**४६.** आणि आम्ही त्यांच्यामागे मरियम-पुत्र ईसाला पाठविले, जे आपल्या पूर्वीचा ग्रंथ तौरात सत्य असल्याचे सांगत होते आणि आम्ही त्यांना इंजील (हा ग्रंथ) प्रदान केला. ज्यात नूर (दिव्य प्रकाश) आणि मार्गदर्शन होते आणि तो आपल्या पूर्वीचा ग्रंथ तौरात सत्य असल्याचे सांगत होता आणि ते स्पष्ट मार्गदर्शन आणि शिकवण होती, अल्लाहचे भय राखणाऱ्यांकरिता.

**४७.** आणि इंजील बाळगणाऱ्यांकरिता हे बंधनकारक ठरते की जे काही अल्लाहने इंजीलमध्ये अवतरीत केले आहे, त्याच्याचनुसार फैसला करावा आणि जो मनुष्यदेखील अल्लाहने अवतरीत केल्यानुसार फैसला करणार नाही किंवा मानणार नाही तर असे लोक दुराचारी आहेत.

**४८.** आणि आम्ही तुमच्याकडे हा सत्यपूर्ण ग्रंथ अवतरीत केला आहे, जो आपल्या पूर्वीच्या समस्त आसमानी ग्रंथांची सत्यता दर्शवितो आणि त्यांचा संरक्षक आहे. यास्तव तुम्ही त्यांच्या दरम्यान, अल्लाहने अवतरीत केलेल्या ग्रंथानुसार फैसाला करा, या सत्याकडे पाठ फिरवून त्यांच्या इच्छा आकांक्षांवर जाऊ नका. तुमच्यापैकी प्रत्येकासाठी आम्ही एक शरीअत (धर्मशास्त्र) आणि मार्ग निर्धारीत केला आहे. अल्लाहने इच्छिले असते तर तुम्हा सर्वांचा एकच जनसमूह (उम्मत) बनविला असता. परंतु तो असे इच्छितो की, जे काही तुम्हाला दिले आहे, त्यात तुमची कसोटी घ्यावी, तेव्हा तुम्ही चांगल्या मोबदल्याच्या दिशेने त्वरा करा, तुम्हा सर्वांना अल्लाहच्याचकडे परत जायचे आहे. मग तो तुम्हाला ती प्रत्येक गोष्ट दाखवून देईल, ज्यासंदर्भात तुम्ही मतभेद राखता.

**४९.** आणि तुम्ही त्यांच्या तंट्यात अल्लाहने अवतरीत केलेल्या वहयीनुसार फैसला करा. त्यांच्या इच्छा अभिलाषांचे अनुसरण करू नका आणि त्यांच्यापासून सावध राहा की कदाचित हे तुम्हाला अल्लाहच्या अवतरीत केलेल्या एखाद्या आदेशापासून डळमळीत न करावेत. जर हे तोंड फिरवतील तर खात्रीने अल्लाहचा हाच इरादा आहे की त्यांना त्यांच्या काही अपराधांची शिक्षा देऊनच टाकावी आणि अधिकांश लोक अवज्ञाकारी असतात.

**५०.** काय हे लोक पुनश्च अज्ञानतापूर्ण फैसला इच्छितात? आणि ईमान राखणाऱ्यांकरिता अल्लाहपेक्षा उत्तम फैसला करणारा आणि आदेश करणारा आणखी कोण असू शकतो?

**५१.** हे ईमानधारकांनो! तुम्ही यहूदींना आणि ख्रिश्चनांना दोस्त बनवू नका, हे तर आपसातच एकमेकांचे दोस्त आहेत. तुमच्यापैकी जो कोणी यांच्याशी दोस्ती करील तर तो त्यांच्यापैकीच ठरेल. अत्याचारी लोकांना अल्लाह कधीही (सरळ) मार्ग दाखवित नाही.

**५२.** तुम्ही पाहाल की ज्यांच्या मनात विकार आहे ते धावत जाऊन त्यांच्यात मिसळतात आणि म्हणतात की आम्हाला भय वाटते की कदाचित असे न व्हावे की एखादे संकट आमच्यावर कोसळावे, फार शक्य आहे की अल्लाहने विजय प्रदान करावा किंवा आपल्याकडून अन्य एखादा फैसला करावा मग तर हे आपल्या मनात लपविलेल्या गोष्टीबद्दल खूप लज्जित होतील.

**५३.** आणि ईमानधारक म्हणतील की काय हेच ते लोक होते, जे मोठ्या विश्वासाने अल्लाहची शपथ घेऊन म्हणतात की आम्ही तुमच्यासोबत आहोत, त्यांचे सर्व कर्म वाया गेले आणि ते असफल झाले.

**५४.** हे ईमान राखणाऱ्यांनो! तुमच्यापैकी जो कोणी आपल्या दीन-धर्मापासून परावृत्त होईल, तर सर्वश्रेष्ठ अल्लाह लवकरच अशा जनसमूहाच्या लोकांना आणील अल्लाह ज्यांच्याशी प्रेम राखील आणि तेदेखील अल्लाहशी प्रेम करत असतील. ईमानधारकांसाठी ते कोमलहृदयी असतील, परंतु काफिरांसाठी मात्र कठोर आणि निर्दयी असतील, ते अल्लाहच्या मार्गात जिहाद करतील, कोणा निंदा-नालस्ती करणाऱ्यांच्या आरोपाची पर्वा करणार नाहीत. ही अल्लाहची कृपा आहे, ज्याला इच्छितो, प्रदान करतो, अल्लाह सर्वशक्तिमान आहे आणि अतिशय ज्ञान बाळगणारा आहे.

**५५.** (हे ईमानधारकांनो!) तुमचा मित्र स्वतः अल्लाह आणि त्याचा पैगंबर आहे आणि ईमान राखणारे लोक आहेत. जे नमाज कायम करतात आणि जकात देत राहतात आणि अल्लाहसमोर (एकाग्रचित्त होऊन) झुकणारे आहेत.

**५६.** आणि जो मनुष्य, सर्वश्रेष्ठ अल्लाहशी, त्याच्या पैगंबराशी आणि ईमानधारकांशी

दोस्ती राखील तर त्याने विश्वास ठेवला पाहिजे की अल्लाहचे दासच वर्चस्वशाली राहतील.

**५७.** (ईमानधारकांनो!) तुम्ही अशा लोकांना आपला मित्र बनवू नका, जे तुमच्या दीन-धर्माला खेळ-तमाशा बनवून थट्टा उडवितात, मग ते त्यांच्यापैकी असोत ज्यांना तुमच्यापूर्वी ग्रंथ दिला गेला किंवा काफिर (इन्कारी) असोत जर तुम्ही (खरोखर) ईमानधारक असाल तर अल्लाहचे भय बाळगून राहा.

**५८.** आणि जेव्हा तुम्ही नमाजकरिता (अजान) पुकारता तेव्हा ते त्यास खेळ-तमाशा ठरवितात, हे अशासाठी की ते अक्कल बाळगत नाहीत.

**५९.** तुम्ही सांगा, हे यहूद्यांनो आणि ख्रिश्चनांनो! तुम्ही आमच्याशी केवळ या कारणास्तव वैर राखता की आम्ही अल्लाहवर आणि जे काही आमच्याकडे उतरविले गेले आहे आणि जे काही यापूर्वी उतरविले गेले आहे त्यावर ईमान राखले आहे आणि यासाठीही की तुमच्यात अधिकांश लोक दुराचारी आहेत.

**६०.** तुम्ही सांगा की काय मी तुम्हाला सांगू की याहून जास्त वाईट मोबदला प्राप्त करणारा अल्लाहच्या जवळ कोण आहे? तो, ज्याचा सर्वश्रेष्ठ अल्लाहने धिःक्कार केला असेल आणि त्यावर क्रोधित झाला असेल आणि त्यांच्यापैकी काहींना वानर आणि डुक्कर बनविले आणि ज्यांनी खोट्या दैवतांची उपासना केली तर हेच लोक वाईट दर्जाचे आहेत आणि हेच सत्य-मार्गापासून फार जास्त भटकलेले आहेत.

**६१.** आणि जेव्हा ते तुमच्याजवळ येतात, तेव्हा म्हणतात की आम्ही ईमान राखले जरी ते इन्कार सोबत घेऊन आले होते आणि त्याच इन्कारासोबत (या जगातून) गेलेतही आणि हे जे काही लपवित आहेत, अल्लाह ते चांगल्या प्रकारे जाणतो.

**६२.** आणि तुम्ही पाहाल की यांच्यापैकी बहुतेक जण अपराधाच्या कामांकडे अत्याचार आणि विद्रोहाकडे आणि हराम माल (धन) खाणयाकडे धाव घेत आहेत. जे काही हे करीत आहेत, ते अतिशय वाईट कर्म आहे.

**६३.** त्यांना त्यांचे संत-महंत आणि धर्मज्ञानी लोक खोटे बोलण्यापासून आणि हराम (अवैध) खाण्यापासून रोखत का नाही? निःसंशय ही वाईट कर्मे आहेत, जी हे करीत आहेत.

**६४.** आणि यहूदी म्हणाले, अल्लाहचा हात बांधलेला आहे, (उलट) त्यांचेच हात बांधलेले आहेत आणि त्यांच्या या कथनामुळे त्यांचा धिःक्कार केला गेला. किंबहुना अल्लाहचे दोन्ही हात खुले आहेत. ज्याप्रकारे इच्छितो, खर्च करतो, आणि जे काही तुमच्याकडे, तुमच्या पालनकर्त्यातर्फे उतरविले गेले आहे, ते त्यांच्यापैकी बहुतेकांच्या विद्रोह आणि इन्कारात वाढकरते, आणि आम्ही त्यांच्यात आपसात कयामतापर्यंत शत्रूता आणि द्वेष मत्सर पेरले आहे. ते जेव्हा जेव्हा युद्धाची आग भडकवू इच्छितात, अल्लाह तिला विझवितो. हे जमिनीवर दहशत आणि उत्पाद माजवित फिरतात आणि अल्लाह अशा विध्वंस करणाऱ्यांशी प्रेम राखत नाही.

**६५.** आणि जर या ग्रंथधारकांनी ईमान राखले असते आणि अल्लाहचे भय बाळगले असते तर आम्ही त्यांच्या दुष्कृत्यांवर पडदा टाकला असता आणि निश्चितच त्यांना कृपा देणग्यांनी भरलेल्या जन्नतमध्ये दाखल केले असते.

**६६.** जर त्यांनी तौरात आणि इंजील आणि त्या धर्मशास्त्रांचे पालन केले असते जे त्यांच्याकडे, त्यांच्या पालनकर्त्यातर्फे उतरविले गेलेत तर त्यांना आपल्या वरूनही आणि पायाखालूनही भरपूर (अन्नसामग्री) खायला लाभले असते. त्याच्याताला एक समूह मधल्या मार्गावर आहे, मात्र अधिकांश दुराचारी आहेत.

**६७.** हे पैगंबर! तुमच्याकडे, तुमच्या पालनकर्त्यातर्फे जो (संदेश) उतरविला गेला आहे, तो लोकांपर्यंत पोहचवा. जर तुम्ही असे केले नाही, तर त्याच्या संदेशाचा हक्क अदा केला नाही आणि अल्लाह लोकांपासून तुमचे रक्षण करील निःसंशय अल्लाह इन्कारी लोकांना मार्गदर्शन करीत नाही.

**६८.** तुम्ही सांगा की, हे ग्रंथधारकांनो! तुम्हाला कसलाही आधार नाही, जोपर्यंत तौरात आणि इंजील आणि जेदेखील (धर्मशास्त्र) तुमच्या पालनकर्त्यातर्फे तुमच्याकडे उतरविले गेले आहे, त्याचे पालन न कराल आणि तुमच्याकडे जे (पवित्र कुरआन) तुमच्या पालनकर्त्यातर्फे अवतरीत केले गेले आहे, ते यांच्यातल्या बहुतेक लोकांच्या हट्ट आणि इन्कारास वाढविल. तेव्हा या इन्कारी लोकांबद्दल तुम्ही दुःख करू नका.

**६९.** ईमानधारक, यहूदी, ताऱ्यांचे उपासक आणि ख्रिश्चनांपैकी जोदेखील अल्लाह आणि अंतिम दिवसा (कयामत) वर ईमान राखील आणि सत्कर्म करीत राहील तर अशा लोकांना, ना कसले भय राहील, ना ते दुःखी होतील.

**७०.** आम्ही इस्राईलच्या पुत्रां (यहूदीं) कडून वायदा घेतला आणि त्यांच्याकडे पैगंबरांना पाठविले, जेव्हा एखादा पैगंबर त्यांच्याजवळ असा आदेश घेऊन आला ज्याला त्यांचे मन स्वीकारत नव्हते तर त्यांनी एका गटाला खोटे ठरविले आणि एका गटाची हत्या करीत राहिले.

**७१.** आणि समजून बसले की काहीच शिक्षा मिळणार नाही, यास्तव आंधळे बहीरे झाले, तरीही अल्लाहने त्यांना माफ केले.असे असतानाही त्यांच्यापैकी अधिकांश लोक आंधळे बहीरे झाले आणि अल्लाह त्यांच्या कर्मांना खूप चांगल्या प्रकारे पाहणारा आहे.

**७२.** ते लोक काफिर (इन्कारी) झालेत, ज्यांनी म्हटले की मरियमचा पुत्र मसीह हाच अल्लाह आहे, वास्तविक मसीहने (स्वतः) म्हटले की हे इस्राईलच्या पुत्रांनो! माझ्या आणि तुमच्या पालनकर्त्या अल्लाहची उपासना करा कारण जो कोणी अल्लाहसोबत दुसऱ्याला सहभागी ठरवील तर अल्लाहने त्याच्यासाठी जन्नत हराम केली आहे आणि त्याचे ठिकाण जहन्नम आहे, आणि अत्याचारी लोकांचा कोणीही मदत करणारा नसेल.

**७३.** ते लोकही पूर्णतः काफिर झाले, ज्यांनी म्हटले की अल्लाह तीनचा तिसरा आहे. वास्तविक अल्लाहशिवाय कोणीही उपास्य नाही आणि जर हे लोक असे बोलणे सोडणार नाहीत तर त्यांच्यापैकी जे इन्कार करत राहतील तर त्यांना निश्चितच मोठा सक्त अज़ाब पोहोचेल.

**७४.** हे लोक अल्लाहकडे का नाही झुकत आणि का नाही क्षमा याचना करीत? अल्लाह अतिशय माफ करणारा आणि मोठा दया करणारा आहे.

**७५.** मरियमचे पुत्र मसीह केवळ एक पैगंबर असण्याखेरीज आणखी काहीही नाही. त्यांच्या पूर्वीही अनेक पैगंबर होऊन गेलेत. त्यांची माता एक सुशील आणि सत्यनिष्ठ स्त्री होती. दोघे (माता-पुत्र) जेवण करीत असत. तुम्ही पाहा आम्ही कशा प्रकारे त्यांच्यासमोर प्रमाण प्रस्तुत करतो, मग विचार करा की ते कशा प्रकारे परतविले जातात.

**७६.** तुम्ही सांगा की, काय तुम्ही अल्लाहशिवाय त्यांची भक्ती- उपासना करता जे ना तुम्हाला नुकसान पोहचविण्याचा अधिकार राखतात, ना कसल्याही प्रकारच्या फायद्याचा. अल्लाह चांगल्या प्रकारे ऐकणारा आणि पूर्णतः ज्ञानी आहे.

**७७.** सांगा, हे ग्रंथधारकांनो! आपल्या दीन-धर्मात अतिशयोक्ती करू नका आणि अशा लोकांच्या इच्छा अभिलाषांचे अनुसरण करू नका, जे पूर्वीपासून भटकलेले आहेत. आणि बहुतेकांना पथभ्रष्ट करून गेलेत आणि सरळ मार्गापासून दूर झाले आहेत.

**७८.** इस्त्राईलच्या संततीमधील इन्कारी लोकांचा (हजरत) दाऊद आणि मरियम-पुत्र हजरत ईसा यांच्या तोंडून धिःक्कार केला गेला, या कारणाने की ते आज्ञा भंग करणारे होते आणि मर्यादेचे उल्लंघन करीत होते.

**७९.** ते आपसात एकमेकांना वाईट कामांपासून, जे ते करीत असत, रोखत नव्हते, निश्चितच जे काही ते करीत, अतिशय वाईट होते.

**८०.** त्यांच्यातल्या अधिकांश लोकांना तुम्ही पाहाल की ते इन्कारी लोकांशी मैत्री करतात. जे काही त्यांनी आपल्या पुढे पाठविले आहे ते अतिशय वाईट आहे. (परिणामी) सर्वश्रेष्ठ अल्लाह त्यांच्याशी नाराज झाला आणि ते नेहमी अज़ाब (शिक्षा-यातने) मध्ये राहतील.

**८१.** जर त्यांनी अल्लाहवर, पैगंबरांवर आणि जे अवतरीत केले गेले आहे त्यावर ईमान राखले असते तर इन्कारी लोकांशी मैत्री केली नसती, परंतु त्यांच्यापैकी बहुतेक लोक दुराचारी आहेत.

**८२.** निःसंशय, तुम्हाला ईमानधारकांचे सक्त (कट्टर) वैरी यहूदी आणि अनेकेश्वरवादी आढळून येतील आणि ईमानधारकांचे सर्वाधिक निकटचे मित्र तुम्हाला जरूर त्यांच्यात

आढळतील, जे स्वतःला ख्रिश्चन म्हणतात, हे अशासाठी की त्यांच्यात धर्मज्ञानी- विद्वान आणि संत-महात्मा आहेत, आणि या कारणास्तव की ते घमेंड करीत नाहीत.

**८३.** आणि जेव्हा ते पैगंबराकडे अवतरित झालेला संदेश ऐकतात, तेव्हा तुम्हाला त्यांच्या डोळ्यांतून अश्रूधारा वाहताना दिसतील. या कारणाने की त्यांनी सत्य ओळखून घेतले. ते म्हणतात, हे आमच्या पालनकर्त्या! आम्ही ईमान राखले, तेव्हा तू आम्हालाही साक्ष देणाऱ्यांमध्ये लिहून घे.

**८४.** आणि आम्ही का म्हणून ईमान न राखावे अल्लाहवर आणि त्या सत्यावर, जे आमच्याजवळ येऊन पोहोचले आहे आणि ही आशा न बाळगावी की आमचा पालनहार आम्हाला नेक सदाचारी लोकांमध्ये सामील करील.

**८५.** तर अल्लाहने त्यांच्या या दुआ (प्रार्थना) मुळे त्यांना (जन्नतच्या) अशा बागा प्रदान केल्या, ज्यांच्याखाली प्रवाह वाहत आहेत, ज्यात ते सदैव राहतील आणि नेक लोकांचा हाच मोबदला आहे.

**८६.** आणि जे काफिर (इन्कारी) झाले आणि ज्यांनी आमच्या आयतींना खोटे ठरविले, तेच जहन्नमी आहेत.

**८७.** हे ईमानधारकांनो! त्या पाक (स्वच्छ- शुद्ध) वस्तूंना हराम ठरवून का ज्या अल्लाहने तुमच्यासाठी हलाल ठरविल्या आहेत, आणि मर्यादेच्या बाहेर जाऊ नका निःसंशय अल्लाह अतिरेक करणाऱ्यांशी प्रेम राखत नाही.

**८८.** आणि अल्लाहने जी अन्न-सामुग्री तुम्हाला प्रदान केली आहे, त्यातून स्वच्छ-शुद्ध हलाल वस्तू खा आणि अल्लाहचे भय बाळगा, ज्याच्यावर तुम्ही ईमान राखता.

**८९.** अल्लाह तुमच्या व्यर्थ, निरर्थक शपथांबद्दल तुमची पकड करीत नाही तथापि अशाच शपथांबद्दल पकड करतो, ज्या तुम्ही पक्क्या इराद्याने घेतल्या. त्याचे प्रायश्चित्त दहा गरीबांना भोजन देणे, बऱ्यापैकी, जसे आपल्या घरच्या लोकांना खाऊ घालता किंवा त्यांना कपडे लत्ते देणे किंवा एक गुलाम अथवा दासी मुक्त करणे, आणि ज्याला हे शक्य नसेल तर त्याने तीन दिवस रोजे (उपवास- व्रत) राखावे. हे तुमच्या त्या शपथांचे प्रायश्चित्त आहे, जेव्हा तुम्ही अशी शपथ घ्याल. आणि आपल्या शपथांवर कायम राहून त्यांचे रक्षण करा, अशा प्रकारे सर्वश्रेष्ठ अल्लाह तुमच्यासाठी आपले आदेश स्पष्टतः

सांगतो यासाठी की तुम्ही आभार मानावेत.

**९०.** हे ईमान राखणाऱ्यांनो! मद्य, जुगार आणि देव-स्थान आणि भविष्य वर्तविणारे फांसे हे सर्व अमंगल सैतानी कामे आहेत, तेव्हा तुम्ही यापासून दूर राहा, यासाठी की सफल व्हावे.

**९१.** सैतान तर इच्छितोच की मद्य आणि जुगाराद्वारे तुमच्या दरम्यान शत्रूता आणि द्वेष मत्सर निर्माण करावे आणि तुम्हाला अल्लाहच्या स्मरणापासून व नमाजपासून रोखावे, तेव्हा तुम्ही अशा कामांपासून दूर का राहात नाही?

**९२.** आणि अल्लाहच्या आदेशाचे पालन करा आणि पैगंबरांचे आज्ञापालन करा आणि सावधगिरी पाळा आणि जर तुम्ही तोंड फिरवले तर लक्षात ठेवा की आमच्या पैगंबराची जबाबदारी स्पष्ट संदेश पोहचविण्याची आहे.

**९३.** ज्या लोकांनी ईमान राखले आणि सत्कर्म केले, अशांवर गुन्हा नाही जर पूर्वी काही खाल्ले असेल, वस्तुतः नंतर ते परहेजगार (दुष्कर्मापासून दूर राहणारे) बनले, आणि ईमानधारक झाले व सत्कर्म करू लागले, परहेजगारीवर कायम राहिले आणि ईमानावर अटळ राहिले, मग अल्लाहची अवज्ञा करण्यापासून दूर राहिले आणि नेकी (च्या मार्गा) वर चालत राहिले आणि अल्लाह अशा नेक काम करणाऱ्यांशी प्रेम राखतो.

**९४.** हे ईमान राखणाऱ्यांनो! अल्लाह काही शिकारद्वारे तुमची परीक्षा घेतो, ज्या पर्यंत तुमचे हात आणि तुमचे भाले पोहोचू शकतील, यासाठी की अल्लाहने हे जाणून घ्यावे की कोण त्याला न पाहता भय राखतो जो मनुष्य यानंतरही मर्यादा पार करील, त्याच्यासाठी कठोर सजा आहे.

**९५.** हे ईमान राखणाऱ्यांनो! जेव्हा तुम्ही (हज किंवा उमराप्रसंगी) एहरामच्या अवस्थेत असाल तर शिकार करू नका आणि तुमच्यापैकी जो कोणी त्याला मारेल तर त्याला फिदिया द्यावा लागेल त्याच्यासारख्याच पाळीव जनावराने, ज्याचा फैसला तुमच्यापैकी दोन न्याय करणारे करतील जे कुर्बानीकरिता काबापर्यंत पोहचविले जाईल किंवा फिदिया म्हणून गरीबांना भोजन द्यावे लागेल किंवा त्याच्या बरोबरीने रोजे (उपवास-व्रत) ठेवावे लागतील, यासाठी की आपल्या कर्माचे फळ चाखावे, जे पूर्वी झाले, अल्लाहने ते माफ केले आणि जो कोणी या (मनाई आदेशा) नंतर पुन्हा असे करील तर अल्लाह त्याचा सूड घेईल, अल्लाह मोठा शक्तिशाली सूड घेणारा आहे.

**९६.** तुमच्यासाठी समुद्रातील (प्राण्याची) शिकार पकडणे व खाणे हलाल केले गेले आहे. तुमच्या वापरासाठी आणि प्रवाशांसाठी, आणि जोपर्यंत तुम्ही एहरामच्या अवस्थेत असाल, खुश्कीची शिकार हराम केली गेली आहे आणि अल्लाहचे भय राखा, ज्याच्याजवळ तुम्ही एकत्र केले जाल.

**९७.** अल्लाहने काबागृहाला, जे आदर-सन्मानपूर्ण घर आहे, लोकांकरिता कायम राहण्याचे कारण बनविले आणि आदरणीय महिन्याला आणि हरममध्ये कुर्बानी दिल्या जाणाऱ्या जनावरांनाही आणि त्या जनावरांनाही, ज्यांच्या गळ्यात पट्टे असतील, हे अशासाठी की तुम्ही या गोष्टीवर विश्वास राखावा की निःसंशय अल्लाह आकाशांच्या व जमिनीच्या समस्त चीज-वस्तूंचे ज्ञान राखतो आणि निःसंशय अल्लाह प्रत्येक गोष्टीचे चांगल्या प्रकारे ज्ञान राखतो.

**९८.** तुम्ही जाणून असा की सर्वश्रेष्ठ अल्लाह शिक्षा यातनाही कठोर देणारा आहे आणि अल्लाह मोठा माफ करणारा आणि अतिशय दया करणाराही आहे.

**९९.** पैगंबराचे कर्तव्य तर केवळ पोहचविण्याचे आहे आणि अल्लाह सर्व काही जाणतो, जे काही तुम्ही जाहीर करता आणि जे काही तुम्ही लपविता.

**१००.** तुम्ही सांगा की नापाक आणि पाक (गलिच्छ व स्वच्छ शुद्ध) समान नाहीत, मग तुम्हाला नापाकची विपुलता चांगली वाटत असली तरी, अल्लाहचे भय बाळगून राहा हे बुद्धिमानांनो! यासाठी की तुम्ही सफल व्हावे.

**१०१.** हे ईमान राखणाऱ्यांनो! अशी गोष्ट विचारू नका की जी जाहीर केली गेली तर तुम्हाला वाईट वाटेल आणि जर कुरआन उतरतेवेळी विचाराल तर तुम्हाला त्याचे उत्तर उघड दिले जाईल. यापूर्वी जे झाले ते अल्लाहने माफ केले आणि अल्लाह मोठा माफ करणारा सहनशील आहे.

**१०२.** तुमच्यापूर्वी काही लोकांनी असेच प्रश्न विचारले, नंतर त्याचे इन्कारी झाले.

**१०३.** बहीरा, साएबा, वसीला आणि हाम वगैरेचा अल्लाहने आदेश दिला नाही, परंतु इन्कारी लोक अल्लाहवर मिथ्या आरोप ठेवतात, आणि त्यांच्यातले बहुतेक जण अक्कल बाळगत नाही.

**१०४.** आणि जेव्हा त्यांना सांगितले गेले की त्या (पवित्र कुरआना) कडे आणि पैगंबर

(मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) कडे या, तेव्हा ते म्हणाले की ज्या (रीति-रिवाजा) वर आम्हाला आमचे वाडवडील आढळलेत, ते आम्हाला पुरेसे आहे. मग त्यांचे ते वाडवडील काही जाणत नसावेत आणि सन्मार्गावर नसावेत, तरीही?

**१०५.** हे ईमान राखणाऱ्यांनो! आपली काळजी घ्या, जेव्हा तुम्ही सत्य मार्गावर चालत असाल, तर जो मनुष्य पथभ्रष्ट होईल तर त्यामुळे तुमचे काहीच नुकसान नाही, अल्लाहच्याच जवळ तुम्हा सर्वांना जायचे आहे, मग तो तुम्हा सर्वांना सांगेल तुम्ही कसकसे कर्म करीत होते.

**१०६.** हे ईमान राखणाऱ्यांनो! जेव्हा तुमच्यापैकी एखाद्याचा मृत्युसमय जवळ आला असेल तेव्हा वसीयत (मृत्युपत्र) करतेवेळी तुमच्यातले दोन न्याय करणारे साक्षी म्हणून असले पाहिजे किंवा तुमच्याखेरीज इतर दोन जण जर तुम्ही जमिनीवर प्रवास करीत असाल आणि अचाानक मृत्युचे संकट तुमच्यावर यावे (संशयाच्या स्थितीत) तुम्ही दोघा (साक्षीं) ना (जमातची) नमाज झाल्यानंतर रोखा, मग ते दोघे अल्लाहची शपथ घेतील की आम्ही या (साक्ष देण्या) च्या मोबदल्यात कसलेही मूल्य घेऊ इच्छित नाही, मग कोणी जवळचा नातेवाईक का असेना आणि आम्ही अल्लाहची साक्ष लपवू शकत नाही, जर आम्ही असे केले तर दोषी ठरू.

**१०७.** नंतर जर असे कळाले की ते दोघे (साक्षी) एखआद्या अपराधआस पात्र ठरले आहेत, तर अशा लोकांपैकी ज्यांच्या विरोधात गुन्हा घडला होता, आणखी दोन व्यक्ती, ज्या सर्वांत जवळच्या असतील, जिथे ते दोघे उभे होते, त्या जागी या दोघांनी उभे राहावे, मग ते अल्लाहची शपथ घेतील की आमची साक्ष या दोघांच्या साक्षीपेक्षा अधिक खरी आहे. आणि आम्ही मर्यादा पार केली नाही असे केल्यास आमची गणना अत्याचारी लोकांमध्ये होईल.

**१०८.** हा सर्वाधिक जवळचा मार्ग आहे की ते लोक खरी साक्ष देतील किंवा त्यांना हे भय असेल की शपथ घेतल्यानंतर पुन्हा शपथ उलट पडेल आणि अल्लाहचे भय राखा आणि ऐका! अल्लाह दुराचारी लोकांना मार्गदर्शन करीत नाही.

**१०९.** ज्या (कयामतच्या) दिवशी अल्लाह समस्त पैगंबरांना एकत्र करील, मग विचारेल की तुम्हाला काय उत्तर मिळाले होते? ते म्हणतील, आम्हाला काहीच माहीत नाही. गैब (अपरोक्ष) जाणणारा तूच आहेस.

**११०.** जेव्हा अल्लाह फर्माविल, हे मरियम-पुत्र ईसा! तुमच्यावर आणि तुमच्या मातेवर मी केलेल्या कृपा देणगीचे स्मरण करा. जेव्हा मी पवित्र आत्मा (जिब्रील) द्वारे तुमची मदत केली. तुम्ही पाळण्यात असताना व मोठ्या वयात लोकांशी संभाषण करीत राहिले आणि जेव्हा आम्ही ग्रंथ व हिकमत आणि तौरात व इंजीलचे ज्ञान दिले आणि जेव्हा तुम्ही माझ्या हुकूमाने पक्षीरूप पुतळा मातीने तयार करीत असत आणि त्यात फुंक मारीत असत, तेव्हा माझ्या हुकूमाने तो (जिवंत) पक्षी बनत असे, आणि तुम्ही माझ्या हुकूमाने जन्मजात आंधळ्याला आणि कोढी इसमाला चांगले करीत असत, आणि माझ्या हुकूमाने मेलेल्यांना (जिवंत करून) बाहेर काढीत असत आणि जेव्हा मी इस्राईलच्या पुत्रांना तुमच्यापासून रोखले. जेव्हा तुम्ही त्यांच्याजवळ मोजिजा घेऊन आले तेव्हा त्यांच्यातले इन्कारी लोक म्हणाले, की ही केवळ उघड जादू आहे.

**१११.** आणि ज्याअर्थी मी हवारींना प्रेरित केले की तुम्ही माझ्यावर आणि माझ्या पैगंबरांवर ईमान राखा, तेव्हा ते म्हणाले, आम्ही ईमान राखले आणि तुम्ही साक्षी राहा की आम्ही पूर्णतः आज्ञाधारक आहोत.

**११२.** स्मरण करा, जेव्हा हवारी म्हणाले की हे मरियम-पुत्र ईसा! काय तुमचा पालनकर्ता आमच्यावर आकाशातून (भोजनाची) एक थाळी उतरवू शकतो? ईसा म्हणाले, ईमान राखत असाल तर अल्लाहचे भय बाळगा.

**११३.** ते म्हणाले की आम्ही त्यातून खआऊ इच्छितो आणि आमच्या मनाला समाधान लाभावे आणि आमची खात्री व्हावी की तुम्ही आम्हाला खरे सांगितले आणि आम्ही त्यावर साक्षी राहावे.

**११४.** मरियम-पुत्र ईसा म्हणाले, हे अल्लाह! आमच्यावर आकाशातून एक थाळी उतरव, जी आमच्या पूर्वीच्या आणि नंतरच्या लोकांकरिता आनंदाची गोष्ट ठरावी आणि तुझ्यातर्फे एक निशाणी ठरावी आणि अम्हाला रोजी (आजिविका) प्रदान कर. तू उत्तम रोजी देणारा आहेस.

**११५.** अल्लाहने फर्माविले की मी ते भोजन तुम्हा लोकांसाठी उतरवित आहे, मग तुमच्यापैकी जो कोणी यानंतरही कुफ्र (इन्कार) करील तर मी त्याला अशी सक्त सजा देईन की तशी सजा साऱ्या जगात कोणालाही देणार नाही.

**११६.** आणि (त्या वेळेचेही स्मरण करा) जेव्हा सर्वश्रेष्ठ अल्लाह फर्माविल की हे

मरियम-पुत्र ईसा! काय तुम्ही त्या लोकांना असे सांगितले होते की मला आणि माझ्या मातेला अल्लाहशिवाय उपास्य बनवून घ्या? ईसा उत्तर देतील की मी तर तुला प्रत्येक व्यंग- दोषापासून मुक्त (पाक) समजतो तेव्हा मला अशा प्रकारे शोभेल की मी अशी गोष्ट बोलावे, जी बोलण्याचा मला काहीच हक्क नाही, जर मी असे बोललो असेल तर तुला ते माहीतही असेल. तू तर माझ्या मनातील गोष्टही जाणतो, मात्र तुझ्या मनात जे काही आहे, ते मी नाही जाणत. केवळ तूच अपरोक्ष गोष्टींचा ज्ञाता आहेस.

**११७.** मी त्यांना केवळ तेच सांगितले, ज्याचा तू मला आदेश दिला की तुमचा व माझा पालनकर्ता असलेल्या अल्लाहची उपासना करा आणि जोपर्यंत मी त्यांच्यात राहिलो, त्यांच्यावर साक्षी राहिलो, आणि जेव्हा तू मला उचलून घेतले तेव्हा तूच त्यांचा देखरेखकर्ता होता, आणि तू प्रत्येक गोष्टीवर साक्षी आहे.

**११८.** जर तू यांना अज़ाब (शिक्षा-यातना) देशील तर हे तुझेच दास आहेत आणि जर तू यांना माफ करशील तर तू मोठा जबरदस्त हिकमत बाळगणारा आहे.

**११९.** अल्लाह फर्माविल की हा तो दिवस आहे की सत्यनिष्ठ लोकांचे सत्य त्यांच्याकरिता लाभदायक ठरेल. त्यांना (जन्नतच्या) बागा मिळतील, ज्यांच्याखाली प्रवाह वाहत असतील, ज्यात ते नेहमी नेहमी राहतील. अल्लाह त्यांच्याशी प्रसन्न आणि ते अल्लाहशी खूश असतील. ही फार मोठी सफलता आहे.

**१२०.** अल्लाहचीच राज्य-सत्ता आहे आकाशांमध्ये व जमिनीवर आणि जे काही यांच्या दरम्यान आहे त्यावरदेखील! आणि अल्लाह सर्व काही करण्याचे सामर्थ्य बाळगतो.

—-

# सूरह अनआम - ६

सूरह अनआम मक्का येथे अवतरली आणि यात एकशे पासष्ट आयती आणि वीस रुकूउ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** सर्व प्रशंसा त्या अल्लाहकरिता आहे, ज्याने आकाशांना व जमिनीला निर्माण केले आणि अंधःकार व प्रकाश बनविला तरीदेखील ईमान न राखणारे लोक (इतरांना) आपल्या पालनकर्त्याच्या बरोबरीचा मानतात.

**२.** त्यानेच तुम्हाला मातीपासून घडविले, मग एक अवधी ठरविला आणि एक निर्धारीत अवधी त्याच्याजवळ आहे तरीही तुम्ही संशयात पडले आहाता?

**३.** आणि तोच अल्लाह आहे आकाशांमध्ये आणि जमिनीवर. तो तुमचे गुप्त भेद व जाहीर सर्व काही जाणतो आणि तुमच्या कमाईला जाणून आहे.[१]

**४.** आणि त्यांच्याजवळ त्यांच्या पालनकर्त्याच्या निशाण्यांपैकी कोणतीही निशाणी आणली गेली तरीही ते तिच्यापासून तोंड फिरवितात.

**५.** त्यांनी त्या सत्य-ग्रंथालाही खोटे ठरविले, जेव्हा तो त्यांच्याजवळ येऊन पोहोचला तेव्हा लवकरच त्यांना खबर मिळेल त्या गोष्टीची जिची ते थट्टा उडवित होते.

**६.** काय त्यांनी पाहिले नाही की आम्ही त्यांच्यापूर्वी कित्येक जनसमूहांना नष्ट करून टाकले, ज्यांना आम्ही या जगात एवढे सामर्थ्य प्रदान केले होते तसे तुम्हालाही प्रदान केले नाही आणि आम्ही त्यांच्यावर मुसळधार पाऊस पाडला आणि आम्ही त्यांच्या खालून जलप्रवाह जारी केले, मग आम्ही त्यांना त्यांच्या अपराधांपायी बरबाद करून टाकले आणि त्यांच्यानंतर दुसरा जनसमूह निर्माण केला.

**७.** आणि जर आम्ही कागदावर लिहिलेला एखादा ग्रंथ जरी तुमच्यावर उतरविला असता, आणि त्यास या लोकांनी आपल्या हातांनी स्पर्शही केला असता, तरीदेखील हे इन्कारी लोक असेच म्हणाले असते की ही तर उघड जादू आहे आणखी काही नाही.

**८.** आणि ते म्हणाले, तुमच्यावर एखादाा फरिश्ता का नाही उतरविला गेला? आणि जर आम्ही फरिश्ता उतरविला असता तर सारा किस्साच पूर्ण झाला असता, मग त्यांना (थोडासाही) अवसर दिला गेला नसता.

---

(१) 'अहले सुन्नत' अर्थात 'सलफ'ची श्रद्धा आहे की अल्लाह स्वतः अर्शवर आहे. जसा तो प्रशंसनीय आहे. परंतु आपल्या ज्ञानाच्या आधारे तो सर्व ठिकाणी आहे. अर्थात त्याच्या ज्ञानकक्षेच्या बाहेर काहीही नाही. तथापि काही लोकांच्या मते तो अर्शवर नाही तर सर्व ठिकाणी आहे आणि ते या आयतीद्वआरे आपल्या धारणेचे(आकिदा) समर्थन करतात की ती शक्ती जिला आकाशांमध्ये व धरतीवर 'अल्लाह' म्हणून पुकारतात आणि आकाशांमध्ये व धरतीवर जिची राज्यसत्ता आहे. आणि या दोन्ही ठिकाणी जिला उपास्य समजले जाते ती शक्ती अर्थात अल्लाह तुमचे प्रकट-अप्रकट सर्व कर्म चांगल्या प्रकारे जाणतो. (फतहुल कदीर) याचे दुसरे प्रमाणही प्रस्तुत केले गेले आहे, जे धर्माचे सखोल ज्ञान बाळगणाऱ्या विद्वानांच्या भाष्यात आढळते. उदा. 'तफसीर तबरी' आणि 'इब्ने कसीर' वगैरे.

**९.** आणि जर आम्ही पैगंबराला फरिश्ता बनविले असते तर त्याला पुरुष रूप दिले असते आणि तरीदेखील त्यावर त्याच लोकांनी संशय घेतला असता, जे या क्षणी संशय घेत आहेत.

**१०.** आणि तुमच्यापूर्वी अनेक पैगंबरांची थट्टा उडविली गेली, तर ते थट्टा उडवित होते, त्यांच्या त्या थट्टा-मस्करीचा दुष्परिणाम त्यांच्यावर उलटला.

**११.** तुम्ही सांगा, जरा जमिनीवर हिंडून फिरून पाहा की खोटे ठरविणाऱ्यांचा कसा अंत झाला!

**१२.** तुम्ही सांगा की, जे काही आकाशांमध्ये व जमिनीवर आहे ते सर्व कोणाच्या मालकीचे आहे? तुम्ही सांगा, सर्व काही अल्लाहच्याच मालकीचे आहे. दया कृपा करणे अल्लाहने स्वतःवर अनिवार्य करून घेतले आहे. तुम्हाला अल्लाह कयामतच्या दिवशी एकत्र करील, यात मुळीच शंका नाही. ज्या लोकांनी स्वतःचा सर्वनाश करून घेतला आहे, तेच ईमान राखणारे नाहीत.

**१३.** आणि जे काही दिवस आणि रात्रीत राहते ते सर्व काही अल्लाहचेच आहे आणि अल्लाह खूप ऐकणारा आणि मोठा जाणणारा आहे.

**१४.** तुम्ही सांगा, काय मी त्या अल्लाहशिवाय दुसऱ्याला आपला सहाय्यक मित्र बनवू, जो आकाशांचा व जमिनीचा रचयिता आहे आणि तो सर्वांना खाऊ घालतो, त्याला कोणी खाऊ घालत नाही. तुम्ही सांगा, मला हा आदेश दिला गेला आहे की मी त्या सर्वांत प्रथम राहावे, ज्यांनी अल्लाहसाठी आत्मसमर्पण केले आणि अनेकेश्वरवाद्यांपैकी कधीही न राहावे.

**१५.** तुम्ही सांगा की मी जर आपल्या पालनकर्त्याचा आदेश मानला नाही तर एका मोठ्या दिवसाच्या अज़ाब (शिक्षा-यातने) चे मला भय वाटते.

**१६.** ज्याच्यावरून हा अज़ाब त्या दिवशी हटविला गेला, तर त्याच्यावर अल्लाहने फार मोठी दया केली आणि ही स्पष्ट अशी सफलता आहे.

**१७.** आणि जर अल्लाह तुम्हाला काही त्रास-यातना देईल तर तिला दूर करणारा अल्लाहशिवाय अन्य कोणीही नाही आणि जर अल्लाह तुम्हाला लाभ प्रदान करील तर तो प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्य बाळगतो.

**१८.** तोच आपल्या दासांवर प्रभावशाली आणि वर्चस्वशाली आहे आणि तोच हिकमत बाळगणारा, खबर राखणारा आहे.

**१९.** तुम्ही सांगा की कोणाची साक्ष मोठी आहे? सांगा की आमच्या आणि तुमच्या दरम्यान अल्लाह साक्षी आहे आणि हा कुरआन माझ्याकडे वहयी (अवतरीत) केला गेला आहे, यासाठी की त्याच्याद्वारे तुम्हाला आणि ज्यांच्यापर्यंत हे पोहोचेल, त्या सर्वांना सचेत करावे.[१] काय तुम्ही साक्ष देता की अल्लाहसोबत अन्य इतर उपास्ये (माबूद) आहेत? तुम्ही सांगा की मी या गोष्टीची साक्ष नाही देत. तुम्ही सांगा, तो एकच उपासना करण्यायोग्य आहे आणि मी तुमच्या शिर्कपासून मुक्त आहे.

**२०.** ज्यांना आम्ही ग्रंथ (तौरात आणि इंजील) दिला आहे ते तुम्हाला (हजरत मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांना) त्याचप्रमाणे ओळखतात, ज्याप्रमाणे आपल्या पुत्रांना ओळखतात. जे स्वतः आपल्याला हरवून बसले आहेत, तेच ईमान राखणार नाहीत.

**२१.** आणि या हून मोठा अत्याचारी कोण आहे, जो अल्लाहवर खोटा आळ घेईल त्याच्या निशाण्यां (प्रतिकां) ना खोटे जाणेल. निःसंशय, अत्याचारी लोक सफल होत नाहीत.

**२२.** आणि ज्या दिवशी आम्ही सर्वांना एकत्र करू, मंग ज्यांनी अल्लाहसोबत दुसऱ्यांना सहभागी ठरविले, त्यांना सांगू, कोठे आहेत ते, ज्यांना तुम्ही (अल्लाहचा) सहभागी जाणत होते (तो दिवस आठवतो).

**२३.** मग त्यांच्या शिर्कची, याखेरीज कोणतीही सबब नसेल की म्हणतील, आमच्या पालनकर्त्या अल्लाहची शपथ, आम्ही अनेक ईश्वरांची उपासना करणारे नव्हतो.[२]

---

(१) रबीअ बिन अनस कथन करतात की आता ज्या कोणापर्यंत कुरआन पोहोचले, जर तो पैगंबर मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांचा सच्चा अनुयायी आहे तर त्याचे हे कर्तव्य ठरते की त्यानेही लोकांना अल्लाहकडे, त्याचप्रमाणे बोलवावे ज्याप्रमाणे पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम लोकांना आवाहन करीत असत आणि त्याचप्रमाणे जागृत करावे जसे पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांनी जागृत केले होते. (इब्ने कसीर)

(२) फितना या शब्दाचा एक अर्थ शिर्क आणि एक अर्थ तौबा असा केला गेला आहे. अर्थात शेवटी हे लोक प्रमाण व क्षमा याचना सादर करून अज़ाबपासून सुटका प्राप्त करण्याचा प्रयत्न करतील की आम्ही तर अनेक ईश्वरांचे उपासक नव्हतो.

या ठिकाणी ही शंका नसावी की तिथे तर माणसाचे हात पाय साक्ष देतील आणि तोंडावर मोहर लावली

**२४.** बघा, आपल्याविषयी त्यांनी कसे खोटे सांगितले आणि त्यांचे ते मिथ्या आरोप त्यांच्याकडून हरवले, गायब झाले.

**२५.** त्यांच्यापैकी काहीजण तुमच्याकडे कान लावून बसतात आणि आम्ही त्यांच्या हृदयांवर पडदे टाकून ठेवले आहेत की त्यास समजावे आणि त्यांचे कान बधीर आहेत आणि सर्व निशाण्या त्यांनी पाहून घेतल्या तरीही त्यांच्यावर ईमान राखणार नाहीत, येथपर्यंत की जेव्हा ते तुमच्याजवळ येतात, भांडण करतात, ईमान न राखणारे म्हणतात की या सर्व थोर बुजूर्ग लोकांच्या कथा-कहाण्या आहेत.

**२६.** आणि हे लोक याच्यापासून दुसऱ्यांनाही रोखतात आणि स्वतःदेखील दूर दूर राहतात आणि हे स्वतःचा सर्वनाश करून घेत आहेत आणि ध्यानी घेत नाही.

**२७.** आणि जर तुम्ही त्या वेळी पाहाल, जेव्हा या लोकांना जहन्नमच्या जवळ उभे केले जाईल, तेव्हा म्हणतील, अरेरे! आम्हाला पुन्हा परत पाठविले गेले तर किती चांगले होईल (आणि असे झाल्यास) तर आम्ही आपल्या पालनकर्त्याच्या निशाण्यांना खोटे ठरवणार नाही आणि आम्ही ईमान राखणाऱ्यांपैकी होऊ.

**२८.** किंबहुना ज्या गोष्टीला यापूर्वी लपवित असत, ती त्यांच्यासमोर आली आहे. जर या लोकांना पुन्हा परत पाठविले गेले, तरीही हे तेच करतील, ज्यापासून यांना रोखले गेले होते आणि निःसंशय हे लोक खोटे आहेत.

**२९.** आणि हे असे म्हणतात की केवळ हे ऐहिक जीवनच आमचे जीवन आहे आणि आम्हाला दुसऱ्यांदा जिवंत केले जाणार नाही.

**३०.** आणि जर तुम्ही त्या वेळी पाहाल, जेव्हा हे लोक आपल्या पालनकर्त्यासमोर उभे केले जातील, अल्लाह फर्माविल, काय हे खरे नाही? ते म्हणतील, निःसंशय, पालनकर्त्याची शपथ, हे खरे आहे. अल्लाह फर्माविल, तर मग आपल्या ईमान न राखण्याच्या परिणामी अज़ाब (शिक्षा-यातना) सहन करा.

---

जाईल, मग हे इन्कार कसे करतील? याचे उत्तर हजरत अब्बास यांनी दिले आहे की जेव्हा मूर्तिपूजक पाहतील की ईमानधारक जन्नतमध्ये प्रवेश करीत आहेत, तेव्हा ते आपसात सल्लामसलत करून मूर्तिपूजा करण्याचाच इन्कार करतील तेव्हा अल्लाह त्यांच्या तोंडावर मोहर लावील आणि त्यांचे हात पाय त्यांच्या कृत-कर्मांची साक्ष देतील. मग ते सर्वश्रेष्ठ अल्लाहपासून कोणतीही गोष्ट लपविण्याचे सामर्थ्य राखू शकणार नाहीत. (इब्ने कसीर)

**३१.** निःसंशय, मोठ्या तोट्यात पडले ते लोक ज्यांनी अल्लहाची भेट होण्याला खोटे ठरविले, येथपर्यंत की जेव्हा ती निर्धारीत वेळ त्यांच्यावर अचानक येईल, तेव्हा म्हणतील, की अरेरे! खेद आहे आमच्या सुस्तीबद्दल जी या बाबतीत झाली आणि त्यांची अवस्था अशी होईल की आपले ओझे आपल्या कमरेवर लादुन घेतलेले असतील. शावधान! ते मोठे वाईट ओझे लादून घेतील.

**३२.** आणि या जगाचे जीवन तर, खेळ-तमाशाव्यतिरिक्त आणखी काहीच नाही. आणि अंतिम घर (आखिरत) अल्लाहचे भय राखणाऱ्यांकरिता अधिक चांगले आहे, काय तुम्ही विचार चिंतन करीत नाही?

**३३.** आम्ही हे चांगल्या प्रकारे जाणतो की, त्यांच्या कथनांनी तुम्ही दुःखी कष्टी होता, तर हे लोक तुम्हाला खोटे म्हणत नाहीत, तर हे अत्याचारी अल्लाहच्या आयतींचा इन्कार करतात.[१]

**३४.** आणि तुमच्या पूर्वीच्या पैगंबरांनाही खोटे ठरविले गेले आहे आणि त्यांनी, त्या खोटे ठरविले जाण्यावर धीर-संयम राखला आणि त्यांना त्रास-यातना दिली गेली, येथपावेतो की त्यांच्याजवळ आमची मदत पोहोचली. अल्लाहचे फर्मान कोणी बदलणारा नाही आणि तुमच्याजवळ पैगंबरांचे वृत्तांत येऊन पोहोचले आहेत.

**३५.** आणि जर त्यांचे तोंड फिरविणे तुम्हाला असह्य होत असेल तर तुमच्याने हे शक्य असेल तर जमिनीत एखादे भुयार किंवा आकाशात (चढून जाण्यासाठी) एखादी शिडी शोधा आणि त्यांना एखादा मोजिजा (चमत्कार) आणून दाखवा. अल्लाहने इच्छिले असते तर त्या सर्वांना सत्य मार्गावर जमा केले असते. यास्तव नादान लोकांपैकी होऊ नका.

---

(१) पैगंबर मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांना इन्कारी लोकांतर्फे खोटे ठरविले जाण्यावर जे दुःख होत असे, त्याच्या निराकरणासाठी व पैगंबरांना सांत्वना देण्यासाठी हे सांगितले जात आहे की हे तुम्हाला खोटे ठरवित नाही. किंबहुना हे अल्लाहच्या आयतींना खोटे ठरवित आहेत. अर्थात ते अत्याचार करीत आहेत आजदेखील जे लोक पैगंबर मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्या आदर्श चारित्र्य, न्यायदान, ईमानदारी व सत्यतेविषयी खूप जोरदार भाषणे देतात, परंतु पैगंबरांचे अनुसरण करण्यात त्यांना कठीणता वाटते. पैगंबरांच्या तुलनेत ते विचार चिंतन आणि आपल्या नेत्यांच्या कथनाला जास्त महत्त्व देतात. त्यांन स्वतःलाच विचारावे की हे कोणाचे चारित्र्य आहे जे त्यांनी अंगिकारले आहे?

**३६.** आणि तेच लोक स्वीकार करतात, जे ऐकतात आणि मेलेल्या लोकांना अल्लाह जिवंत करून उठविल, मग सर्व त्या (अल्लाहच्याच) कडे आणले जातील.

**३७.** आणि ते म्हणाले की, त्यांच्यावर त्यांच्या पानलकर्त्यातर्फे एखादा मोजिजा (चमत्कार) का नाही उतरविला गेला? तुम्ही सांगा की अल्लाह एखादा चमत्कार उतरविण्याचे पुरेपूर सामर्थ्य राखतो तथापि बहुतेक लोक जाणत नाहीत.

**३८.** आणि जितक्या प्रकारचे सजीव जमिनीवर चालणारे आहेत, आणि जितक्या प्रकारचे पंखांनी उडणारे पक्षी आहेत, त्यांच्यापैकी कोणीही असा नाही, जो तुमच्यासारखा एक समूह नसावा. आम्ही ग्रंथात लिहून ठेवण्यात एकही गोष्ट सोडली नाही, मग सर्व लोक आपल्या पालनकर्त्याजवळ जमा केले जातील.

**३९.** आणि ज्या लोकांनी आमच्या आयतींचा इन्कार केला, ते बहीरे, मुके आहेत, अंधारात पडले आहेत. अल्लाह ज्याला इच्छितो पथभ्रष्ट करतो आणि ज्याला इच्छितो सन्मार्गास लावतो.

**४०.** तुम्ही सांगा की आपली काय अवस्था होईल ते सांगा की जर तुमच्यावर अल्लाहचा एखादा अज़ाब येऊन कोसळावा किंवा तुमच्यापर्यंत कयामतच येऊन पोहचावी, तर काय अल्लाहशिवाय इतरांना पुकाराल? (सांगा) जर तुम्ही सच्चे असाल.

**४१.** किंबहुना, विशेषतः त्यालाच पुकाराल, मग ज्यासाठी तुम्ही पुकाराल, जर त्याने इच्छिले तर त्यास हटवूनही देईल आणि ज्यांना तुम्ही अल्लाहचे सहभागी ठरविता, त्या सर्वांना विसरून जाल.

**४२.** आणि आम्ही तुमच्यापूर्वी होऊन गेलेल्या इतर जनसमूहांकडेही पैगंबर पाठविले होते. त्यांनादेखील आम्ही गरीबी व रोगराईने धरले, यासाठी की त्यांनी गयावया करावी.

**४३.** अशा प्रकारे जेव्हा त्यांना आमची सजा मिळाली तर ते कमजोर का नाही पडतील? परंतु त्यांची मने कठोर झालीत आणि सैतानाने त्यांच्या कर्मांना, त्यांच्या विचारात चांगले करून दाखविले.

**४४.** आणि जेव्हा ते त्या उपदेशाला विसरले, ज्याची त्यांना शिकवण दिली गेली होती, तर आम्ही त्यांच्यावर प्रत्येक चीज-वस्तूचे दरवाजे खुले केले, येथपर्यंत की जेव्हा

आपण प्राप्त केलेल्या चीजवस्तूंवर ते घमेंड करू लागले तेव्हा त्यांना आम्ही अचानक तावडीत घेतले, मग ते निराश होऊन बसले.

**४५.** मग अत्याचारी लोकांची पाळेमुळे कापली गेली आणि सर्वश्रेष्ठ अल्लाहची प्रशंसा आहे, जो साऱ्या जगाचा पालनहार आहे.

**४६.** तुम्ही त्यांना सांगा, बरे हे सांगा की जर अल्लाह तुमची ऐकण्याची व पाहण्याची शक्ती पूर्णतः हिरावून घेईल आणि तुमच्या हृदयांवर मोहर लावून देईल तर अल्लाहशिवाय कोणी उपास्य (माबूद) आहे जो तुम्हाला हे पुन्हा परत करील? तुम्ही पाहा की आम्ही कशा प्रकारे आपल्या निशाण्यांना अनेक रूपांनी प्रस्तुत करीत आहोत, तरीदेखील ते कानाडोळा करीत आहेत.

**४७.** तुम्ही सांगा, बरे हे सांगा की जर तुमच्यावर अल्लाहचा अज़ाब अचानक किंवा सावध असताना कोसळून पडला तर (या स्थितीत) काय अत्याचारी लोकांशिवाय दुसरा कोणी मारला जाईल?

**४८.** आणि आम्ही पैगंबर अशासाठी पाठवितो की त्यांनी शुभ-वार्ता दयावी आणि लोकांना (दुष्परिणतीचे) भय दाखवावे, मग जो कोणी ईमान राखील आणि आपले वर्तन सुधारेल तर अशांना ना कसले भय राहील आणि ना ते दुःखी होतील.

**४९.** आणि जे लोक आमच्या आयतींना खोटे ठरवतील, तर त्यांना अल्लाहचा अज़ाब येऊन घेरेल, कारण ते अवज्ञाकारी आहेत.

**५०.** तुम्ही सांगा की मी ना तर तुम्हाला हे सांगतो की माझ्याजवळ अल्लाहचा खजिना आहे आणि ना मी परोक्ष गोष्टींना जाणतो आणि ना मी असे सांगतो की मी फरिश्ता आहे, मी तर केवळ, जे काही वहयीच्या रूपाने माझ्याजवळ येते, त्याचे अनुसरण करतो.[१] तुम्ही सांगा की आंधळा आणि डोळस दोघे समान कसे असू शकतात? तर मग तुम्ही विचार चिंतन का नाही करीत?

---

(१) 'माझ्याजवळ अल्लाहचे खजिने नाहीत' यास अभिप्रेत हे की प्रत्येक प्रकारचे सामर्थ्य मी बाळगणार नाही की मी तुम्हाला अल्लाहच्या हुकूमाविना व मर्जीविना एखादा चमत्कार दाखवावा, जसे तुम्ही इच्छिता, ज्याला पाहून तुम्हाला माझ्या सत्यतेवर विश्वास बसावा. मी परोक्ष ज्ञानही बाळगत नाही की ज्याद्वारे मी भविष्यकालीन घटनांबद्दल तुम्हाला माहीत करावे. मी फरिश्ता असण्याचाही दावा करीत नाही की ज्यामुळे तुम्ही मला अशी कामे करण्यास विवश करावे, जी मानव-सामर्थ्यापलीकडची

**५१.** आणि अशा लोकांना भय दाखवा, जे या गोष्टीचे भय बाळगतात की आपल्या पालनकर्त्यासमोर अशा स्थितीत एकत्र केले जातील की अल्लाहखेरीज जेवढे आहेत, ना त्यांची मदत करतील आणि ना कोणी शिफारस करणारा असेल, या आशेसह की त्यांनी भय राखावे.

**५२.** आणि तुम्ही त्यांना बाहेर काढू नका, जे सकाळ-संध्याकाळ आपल्या पालनकर्त्याची उपासना करतात, विशेषतः त्याची मर्जी प्राप्त करू इच्छितात, त्यांच्या हिशोबाशी तुमचा किंचितही संबंध नाही आणि तुमच्या हिशोबाशी त्यांचा किंचितही संबंध नाही की ज्यामुळे तुम्ही त्यांना बाहेर घालवावे, किंबहुना तुम्ही अत्याचार करणाऱ्यांपैकी ठराल.

**५३.** आणि अशा प्रकारे आम्ही त्यांना आपसात कसोटीत टाकले, यासाठी की त्यांनी म्हणावे, काय अल्लाहने आमच्यामधून फक्त यांच्यावरच उपकार केला? तेव्हा काय असे नाही की अल्लाह कृतज्ञशील लोकांना चांगल्या प्रकारे जाणतो.

**५४.** आणि तुमच्याजवळ जेव्हा ते लोक येतील, जे आमच्या आयतींवर ईमान राखतात, तर त्यांना सांगा, तुमच्यावर सलामती असो तुमच्या पालनकर्त्याने स्वतःवर दया अनिवार्य करून घेतली आहे की तुमच्यापैकी ज्याने मूर्खपणाने वाईट कृत्य केले मग त्यानंतर क्षमा याचना केली आणि सुधारणा करून घेतली तर अल्लाह मोठा माफ करणारा दया करणारा आहे.

**५५.** अशा प्रकारे आम्ही आपल्या आयतींचे सविस्तर निवेदन करतो यासाठी की अपराधी लोकांचा मार्ग स्पष्ट व्हावा.

**५६.** तुम्ही सांगा की मला या गोष्टीपासून रोखले गेले आहे की मी त्यांची उपासना करावी, ज्यांना अल्लाहशिवाय तुम्ही पुकारता. तुम्ही सांगा की मी तुमच्या मनाच्या इच्छेनुसार चालणार नाही कारण अशा स्थितीत मी मार्गभ्रष्ट होईन आणि सन्मार्गावर राहणार नाही.

---

असावीत, मी तर केवळ त्या वहयीला मानणारा आहे जी माझ्यावर अवतरीत केली गेली आणि या हदीसमध्येही उल्लेखित आहे. जसे की पैगंबरानी फर्माविले, मला कुरआनसोबत त्याच्याच समानही प्रदान केले गेले यात 'समान'शी अभिप्रेत पैगंबर मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांची हदीस (कथने व आचरणशैली) आहेत.

**५७.** तुम्ही सांगा, माझ्याजवळ माझ्या पालनकर्त्यातर्फे एक प्रमाण आहे आणि ते तुम्ही खोटे ठरविता. ज्या गोष्टीची तुम्ही घाई करीत आहात ती माझ्याजवळ नाही. अल्लाहशिवाय दुसऱ्या कोणाचाही आदेश नाही अल्लाह वास्तव गोष्टींना स्पष्टतः सांगतो आणि तोच सर्वांत चांगला फैसला करणारा आहे.

**५८.** तुम्ही सांगा, ज्या गोष्टीची तुम्ही एवढ्या घाईने मागणी करीत आहात ती जर माझ्या अवाख्यात असती तर माझ्या व तुमच्या दरम्यान केव्हाच फैसला झाला असता आणि अल्लाह अत्याचारी लोकांना चांगल्या प्रकारे ओळखतो.

**५९.** आणि त्या (अल्लाह) कडेच परोक्षाच्या चाव्या आहेत, ज्यांना फक्त तोच जाणतो आणि जे काही धरतीवर आणि जलाशयात आहे ते सर्व तो जाणतो आणि जमिनीच्या अंधःकारात एक दाणाही खाली पडत नाही. आणि ना एखादी ओली व कोरडी वस्तू पडते, परंतु हे सर्व काही स्पष्ट ग्रंथात नमूद आहे.[१]

**६०.** तोच (अल्लाह) होय, जो रात्री तुमचा आत्मा (एक पट) ताब्यात घेतो आणि दिवसा जे काही करता तेही जाणतो, मग तुम्हाला त्यात एक ठरलेली मुदत पूर्ण करण्याकरिता जागे करतो. मग तुम्हाला त्याच्याचकडे परत जायचे आहे. तेव्हा तुम्ही जे काही करीत राहिले ते तुम्हाला सांगेल.

**६१.** तोच आपल्या दासांवर वर्चस्वशाली आहे आणि तुमच्यावर देखरेख ठेवणारे (फरिश्ते) पाठवितो, येथ पर्यंत की जेव्हा तुमच्यापैकी एखाद्याचा मृत्यु (समय) जवळ येतो, तेव्हा आमचे फरिश्ते त्याचा जीव काढून घेतात आणि ते किंचितही आळस करीत नाहीत.

**६२.** मग ते आपल्या सच्चा पालनकर्त्या (अल्लाह) जवळ आणले जातील सावधान! त्याचाच आदेश चालेल आणि तो फार लवकर हिशोब घेईल.

**६३.** तुम्ही सांगा, जमीन आणि जलाशयाच्या अंधःकारातून जेव्हा त्याला नरमी आणि

---

(१) स्पष्ट ग्रंथाशी अभिप्रेत 'सुरक्षित ग्रंथ' या आयतीद्वारे हे स्पष्ट कळते की गैब (परोक्ष) चे ज्ञान फक्त अल्लाहलाच आहे. समस्त परोक्षा-खजिना त्याच्याचजवळ आहे. यास्तव कृतघ्न, अनेकेश्वरवादी आणि विरोधी लोकांवर केव्हा अज़ाब टाकायचा तेही अल्लाह जाणतो. हदीसमधील उल्लेखानुसार परोक्ष गोष्टी पाच आहेत? १. खयामतचे ज्ञान. २. पर्जन्यवृष्टी. ३. मातेच्या गर्भातले मूल. ४. उद्या घडणारी घटना. ५. मृत्यु कोणत्या जागी होईल. या पाचही गोष्टींचे ज्ञान फक्त अल्लाहला आहे. (सही बुखारी : तफसीर सूरह अल अनआम)

हळू स्वरात पुकारता की जर आम्हाला यातून सोडवशिल तर आम्ही खआत्रीने तुझे कृतज्ञशील बनू, तेव्हा कोण तुम्हाला वाचवितो.

**६४.** तुम्ही स्वतः सांगा की यापासून आणि प्रत्येक संकटापासून तुम्हाला अल्लाहच वाचवितो, पण तरीही तुम्ही शिर्क करता.

**६५.** तुम्ही सांगा, तोच तुमच्यावर, तुमच्यावरून किंवा तुमच्या पायांखालून अज़ाब (शिक्षा-यातना) पाठविण्याचे किंवा तुमचे अनेक समूह बनवून आपसात लढाईची मजा चाखविण्याचे सामर्थ्य राखतो. तुम्ही पाहा की आम्ही अनेकरित्या कशा प्रकारे आपल्या आयतींचे निवेदन करतो, यासाठी की त्यांना समजावे.

**६६.** आणि तुमच्या जनसमूहाने त्याला खोटे ठरविले वास्तविक ते सत्य आहे. तुम्ही सांगा की मी तुमच्यावर अधिकारी (निरीक्षक) नाही.

**६७.** प्रत्येक खबरीची एक निर्धारीत वेळ आहे आणि हे तुम्ही फार लवकर जाणून घ्याल.

**६८.** आणि जेव्हा तुम्ही त्या लोकांना पाहाल, जे आमच्या आयतींमध्ये व्यंग दोष काढत आहेत, तेव्हा अशा लोकांपासून वेगळे व्हा, येथपर्यंत की ते दुसऱ्या कामात गुंतावेत आणि जर तुम्हाला सैतान विसरही पाडेल तरी आठवण आल्यावर पुन्हा अशा अत्याचारी लोकांसोबत बसू नका.

**६९.** आणि जे लोक अल्लाहचे भय राखून वागतात, त्यांच्यावर त्यांच्या पकडीचा काहीच परिणाम होणार नाही. मात्र त्यांना शिकवण देत राहाणे (चांगले आहे) कदाचित तेदेखील अल्लाहचे भय राखून दुष्कर्मापासून दूर राहू लागतील.

**७०.** आणि अशा लोकांशी कधीही नाते ठेवू नका, ज्यांनी आपल्या दीन (धर्मा) ला खेळ-तमाशा बनवून ठेवले आहे आणि ऐहिक जीवनाने त्यांना धोक्यात टाकले आहे. आणि या कुरआनाद्वारे उपदेश जरूर करीत राहा, यासाठी की एखादा मनुष्य आपल्या कर्मांमुळे अशा प्रकारे न फसावा की कोणी अल्लाहशिवाय त्याची मदत करणारा नसावा आणि ना शिफारस करणारा आणि अवस्था अशी व्हावी की जर सारे जग भरून मोबदल्यात देऊन टाकील, तरीही त्याच्याकडून घेतले न जावे. ते असेच लोक आहेत की आपल्या कर्मांमुळे अडकून पडले. त्यांच्यासाठी खूप गरम पाणी पिण्याचे असेल आणि त्यांच्या कुफ्र (इन्कारा) मुळे मोठी दुःदायक शिक्षा-यातना असेल.

**७१.** तुम्ही सांगा, काय आम्ही अल्लाहशिवाय त्याला पुकारावे जो आमचे भले-बुरे काहीच करू शकत नसावा, आणि अल्लाहचे मार्गदर्शन लाभल्यानंतर त्या माणसासारखे टाचा रगडत परत फिरविले जावे, जणू सैतानाने बहकविले असावे आणि तो धरतीवर भटकत फिरत असावा. त्याचे साथीदार त्याला सरळ मार्गाकडे बोलावित असावेत की आमच्या जवळ ये. तुम्ही सांगा, अल्लाहचे मार्गदर्शनच खऱ्या अर्थाने मार्गदर्शन आहे. आणि आम्हाला हा आदेश दिला गेला आहे की समस्त जगाच्या स्वामीसाठी स्वतःला त्याच्या हवाली करावे.

**७२.** आणि नमाज कायम करा आणि त्या (अल्लाह) चे भय राखा, तो, तोच आहे, ज्याच्याकडे तुम्ही एकत्रित केले जाल.

**७३.** त्यानेच आकाशआंना व जमिनीला सत्यासह निर्माण केले, आणि ज्या दिवशी तो फर्माविल, होऊन जा तर होऊन जाईल. त्याचे वचन अगदी सत्य आहे, आणि ज्या दिवशी शंख फुंकला जाईल, राज्य सत्ता त्याचीच असेल. तो जाणणारा आहे परोक्ष आणि अस्तित्वाचा आणितो हिकमतशाली व खबर राखणारा आहे.

**७४.** आणि स्मरण करा, जेव्हा इब्राहीम आपले पिता आजरला म्हणाले, काय तुम्ही मुर्त्यांना उपास्य (माबूद) बनवित आहात? मी तर तुम्हाला व तुमच्या लोकांना उघड मार्गभ्रष्टतेत पाहतोय.

**७५.** आणि अशा प्रकारे आम्ही इब्राहीमला आकाशांची व जमिनीची राज्य-सत्ता दाखविली यासाठी की त्यांनी पुरेपूर विश्वास ठेवणाऱ्यांपैकी व्हावे.

**७६.** मग जेव्हा त्यांच्यावर रात्रीचा अंधार पसरला तेव्हा एक तारा पाहिला, म्हणाले की हा माझा पालनहार आहे, मग जेव्हा तो बुडाला तेव्हा म्हणाले की मी अस्त पावणाऱ्याशी प्रेम राखत नाही.

**७७.** मग जेव्हा चंद्राला चमकताना पाहिले, तेव्हा म्हणाले, हा माझा पालनकर्ता आहे, मग जेव्हा तो बुडाला तेव्हा म्हणाले की जर माझ्या पालनकर्त्याने मला सरळ मार्ग दाखविला नाही तर मी मार्गभ्रष्ट झालेल्यांपैकी होईन.

**७८.** मग जेव्हा सूर्याला चमकताना पाहिले, तेव्हा म्हणाले, हा माझा पालनहार आहे. हा तर सर्वांत मोठा आहे, परंतु जेव्हा तो बुडाला तेव्हा म्हणाले, की निःसंशय मी तुमच्या

शिर्कपासून मुक्त आहे.

**७९.** मी आपले तोंड त्याच्याकडे फिरवून घेतले, ज्याने आकाशांना व जमिनीला निर्माण केले एकाग्रतापूर्वक, आणि मी अनेकेश्वरवाद्यांपैकी नाही.

**८०.** आणि त्यांच्याशी, त्यांचे लोक हुज्जत करू लागले. पैगंबर (इब्राहीम) म्हणाले, काय तुम्ही अल्लाहविषयी माझ्याशी वाद घालता. वास्तविक त्याने मला सरळ मार्ग दाखविला आहे आणि ज्यांना तुम्ही अल्लाहसोबत सामील करता, मी त्यांचे भय राखत नाही, परंतु हे की माझा पालनकर्ता एखाद्या कारणाने इच्छिल. माझ्या पालनकर्त्याने प्रत्येक गोष्टीला आपल्या ज्ञानकक्षेत घेरलेले आहे. काय तुम्ही तरीही विचार करीत नाही ?

**८१.** आणि मी त्या वस्तूचे का म्हणून भय राखावे जिला तुम्ही अल्लाहचा सहभागी ठरविले आहे, वास्तविक तुम्ही त्या वस्तूला अल्लाहचा सहभागी बनविण्यापासून भित नाही, ज्याचे तुमच्याजवळ अल्लाहने एखादे प्रमाण उतरविले नाही. मग या दोन्ही समूहांमध्ये कोण शांतीचा जास्त हक्कदार आहे, जर तुम्ही जाणत असाल.

**८२.** ज्या लोकांनी ईमान राखले आणि आपल्या ईमानात कसल्याही प्रकारच्या शिर्कचे मिश्रण केले नाही, त्यांच्याचसाठी शांती आहे आणि तेच सरळ मार्गावर आहेत.

८३ . आणि हे आमचे प्रमाण आहे जे आम्ही इब्राहिमला त्याच्या जनसमूहाच्या मुकाबल्यात दिले . आम्ही ज्याला इच्छितो त्याचे दर्जे बुलंद (उंचवितो ) नि:शंय तुमचा पालनकर्ता हिकमतशाली सर्वज्ञ आहे

**८४.** आणि आम्ही त्यांना इसहाक आणि याकूब प्रदान केले आणि प्रत्येकाला सरळ मार्ग दाखविला आणि यापूर्वी नूहला मार्ग दाखविला आणि संततीत दाऊद आणि सुलेमान आणि अय्यूब आणि यूसुफ आणि मूसा व हारून यांना आणि अशा प्रकारे आम्ही नेकी (सत्कर्म) करणाऱ्या लोकांना मोबदला प्रदान करतो.

**८५.** आणि जकरिया आणि यह्या आणि ईसा आणि इलियास यांना, हे सर्व नेक सदाचारी लोकांपैकी होते.

**८६.** आणि इस्माईल आणि यसअ आणि यूनुस आणि लूत यांना, या सर्वांना आम्ही या जगातील लोकांवर श्रेष्ठता प्रदान केली.

**८७.** आणि त्यांच्या वाडवडील, संतती आणि भावांमधून आणि आम्ही त्यांची निवड

केली आणि त्यांना सरळ मार्ग दाखविला.

**८८.** हाच अल्लाहचा मार्ग आहे आपल्या दासांपैकी ज्याला इच्छितो, त्याला मार्ग दाखवितो आणि जर त्या लोकांनीही अल्लाहसोबत दुसऱ्यांना सहभागी केले असते तर त्यांचे कर्म वाया गेले असते.

**८९.** यांनाच आम्ही ग्रंथ आणि हिकमत आणि नुबूवत (पैगंबरी) प्रदान केली आणि जर या लोकांनी यास मानले नाही, तर आम्ही अशा लोकांना तयार करून ठेवले आहे, जे याचा इन्कार करणार नाहीत.

**९०.** हेच ते लोक होते, ज्यांना अल्लाहने उचित मार्ग दाखविला, यास्तव तुम्ही त्यांच्या मार्गाचे अनुसरण करा. तुम्ही सांगा की मी याबद्दल कसलाही मोबदला मागत नाही. समस्त जगातील लोकांकरिता ही केवळ स्मरणिका आहे.

**९१.** आणि त्यांनी, अल्लाहची जशी कदर केली पाहिजे होती तशी कदर केली नाही. जेव्हा ते असे म्हणाले की अल्लाहने कोणा माणसावर काही उतरविले नाही. तुम्ही सांगा, मूसा जो ग्रंथ तुमच्याजवळ घेऊन आले, जो लोकांकरिता दिव्य प्रकाश आणि मार्गदर्शन आहे, तो कोणी उतरविला, ज्याला तुम्ही वेगवेगळ्या पानांमध्ये ठेवता, ज्यातून काही जाहीर करता आणि अधिकांश लपविता आणि तुम्हाला ते ज्ञान दिले गेले, जे तुम्ही आणि तुमचे वाडवडील जाणत नव्हते. तुम्ही सांगा की अल्लाहनेच उतरविला होता. मग त्यांना त्यांच्या दोष काढण्यात, खेळ तमाशा करीत सोडून द्या.

**९२.** आणि हादेखील एक शुभ ग्रंथ आहे, जो आम्ही अवतरीत केला आहे. आपल्या पूर्वीच्या ग्रंथांची सत्यता दर्शवितो, यासाठी की तुम्ही मूळ वस्ती (मक्का) आणि त्याच्या जवळपासच्या (शहरांना म्हणजे समस्त मानवविश्वा) ला सूचित करावे आणि जे आखिरतवर ईमान राखतात, तेच याला मानतील आणि तेच आपल्या नमाजांचे रक्षण करतील.

**९३.** आणि त्याहून मोठा अत्याचारी आणखी कोण असू शकतो, जो अल्लाहवर खोटा आरोप ठेवील किंवा असे म्हणेल की माझ्याकडे वहयी आली आहे, वास्तविक त्याच्याकडे काहीच आले नाही आणि जो असे म्हणाला की, ज्याप्रकारे अल्लाहने उतरविले तसे मीदेखील उतरविन. जर तुम्ही अत्याचारींना मृत्युच्या कठोर शिक्षा-यातनेत पाहाल, जेव्हा फरिश्ते आपले हात पुढे करून म्हणतील, आपला जीव काढा. आज तुम्हाला अल्लाहवर नाहक आरोप ठेवण्यामुळे आणि घमेंडीने त्याच्या आयतींचा

इन्कार करण्यापायी अपमानदायक मोबदला दिला जाईल.

**९४.** आणि तुम्ही आमच्याजवळ एकटे-एकटे आलात, जसे तुम्हाला पहिल्यांदा निर्माण केले गेले आणि तुम्हाला जे दिले ते आपल्या मागे सोडून आलात आणि तुमची शिफारस करणारे आम्हाला दृष्टीस पडत नाहीत, ज्यांना तुम्ही आपल्या कार्यात आमचा सहभागी समजत होते. निःसंशय तुमचे आणि त्यांचे संबंध तुटले आणि तुमचे ते विचार तुमच्यापासून हरवले.

**९५.** अल्लाहच बीज आणि कोय फाडून अंकूर बाहेर काढतो. तो सजीवाला निर्जीवातून, निर्जीवाला सजीवातून बाहेर काढतो. तोच अल्लाह आहे. मग तुम्ही कोठे उलट बहकत जात आहात?

**९६.** तो प्रातःकाळ फाडणारा आहे आणि त्याने रात्रीला आराम करण्यासाठी आणि सूर्य आणि चंद्राला हिशोब लावण्यासाठी बनविले. ही निर्धारीत गोष्ट आहे, जबरदस्त ज्ञान बाळगणाऱ्या (अल्लाह) ची.

**९७.** आणि त्यानेच तुमच्यासाठी तारे बनविले, यासाठी की तुम्ही जमीन आणि समुद्राच्या अंधारात त्यांच्याद्वारे मार्ग जाणून घ्यावा. आम्ही त्या लोकांसाठी निशाण्या सांगितल्या आहेत, जे ज्ञान बाळगतात.

**९८.** आणि त्यानेच तुम्हाला एका जीवापासून निर्माण केले. मग तुमचे एक कायमस्वरूपी आणि एक सुपूर्द होण्याचे ठिकाण आहे. आम्ही त्यांच्यासाठी निशाण्या (चिन्हे) सांगितल्या आहेत. जे ज्ञान बाळगतात.

**९९.** आणि तोच होय, ज्याने आकाशातून पर्जन्यवृष्टी केली. मग आम्ही त्याद्वारे सर्व प्रकारची वनस्पती उगवली, मग त्याद्वारे हिरवेगार शेती उत्पन्न केली, ज्यापासून आम्ही थरावर थर असलेले धान्य आणि खजूरीच्या गाभ्याशी लटकणारे घोंस आणि द्राक्ष व जैतून व डाळींबाच्या बागा उत्पन करतो, ज्या एकाच प्रकारच्या आणि अनेक प्रकारच्या असतात. त्यांची फळे पाहा, जेव्हा ती लागतात, त्यांचे पिकणे, निःसंशय या सर्वांत, त्या लोकांकरिता निशाण्या (चिन्हे) आहेत, जे ईमान राखतात.

**१००.** आणि लोकांनी जिन्नांना अल्लाहचे सहभागी बनविले आहे, वास्तविक त्यानेच त्यांना निर्माण केले आहे आणि त्या (अल्लाह) च्याकरिता पुत्र आणि कन्या, मनाने ठरवून घेतल्या, कसल्याही ज्ञानाविना तो (अल्लाह) यांनी सांगितलेल्या अवगुणांपासून

मुक्त आणि उत्तम आहे.

**१०१.** तो आकाशांची व धरतीची निर्मती करणारा आहे, त्याला संतती कशी असू शकते? वास्तविक त्याची कोणतीही पत्नी नाही आणि तो प्रत्येक चीज-वस्तूचा निर्माणकर्ता आणि जाणणारा आहे.

**१०२.** तोच अल्लाह तुमचा पालनकर्ता आहे, त्याच्याखेरीज कोणीही उपास्य (माबूद) नाही, प्रत्येक चीज-वस्तूचा रचयिता, यास्तव फक्त त्याचीच उपासना करा आणि तो प्रत्येक गोष्टीची देखभाल ठेवणारा आहे.

**१०३.** डोळे त्याला पाहू शकत नाहीत आणि तो सर्व नजरा पाहतो आणि तो अतिसूक्ष्मदर्शी, भेद जाणणारा खबर राखणारा आहे.

**१०४.** तुमच्या पालनकर्त्यातर्फे तुमच्याजवळ प्रमाण घेऊन पोहोचले आहे तेव्हा जो पाहील, आपल्या भल्याकरिता (पाहील) आणि जो आंधळा बनून राहील, तो आपले अहित ( नुकसान) करून घेईल आणि मी तुमचा रक्षक नाही.

**१०५.** अशा प्रकारे आम्ही (पवित्र कुरआनाच्या) आयतींना पुन्हा पुन्हा सांगात आहोत, यासाठी की त्यांनी सांगावे की तुम्ही वाचून ऐकविले त्या लोकांकरिता जे जाणतात आम्ही ते चांगल्या प्रकारे स्पष्ट करून सांगावे.

**१०६.** तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या आदेशा (वहयी) चे अनुसरण करा की अल्लाहशिवाय कोणीही उपास्य (माबूद) नाही आणि अनेकेश्वरवाद्यांपासून विमुख व्हा.

**१०७.** आणि अल्लाहने इच्छिले असते तर यांनी इतरांना अल्लाहचे सहभागी ठरविले नसते आणि आम्ही तुम्हाला या लोकांवर देखरेख ठेवणारा बनविले नाही, आणि ना तुम्ही त्यांच्यावर अधिकार राखणारे आहात.

**१०८.** आणि जे लोक अल्लाहशिवाय दुसऱ्यांना पुकारतात त्यांना अपशब्द वापरू नका, अन्यथा शत्रू बनून अजाणतेपणी तेदेखील अल्लाहसाठी अपशब्द वापरतील. अशा प्रकारे आम्ही प्रत्येक जनसमूहासाठी त्यांचे कर्म सुशोभित बनविले आहे, मग त्यांना आपल्या पालनकर्त्याकडेच परतायचे आहे. यास्तव तो त्यांना त्याबाबत सूचित करील जे काही ते करीत राहिले.

**१०९.** आणि त्यांनी जोरदारपणे अल्लाहची शपथ घेतली की त्यांच्याजवळ एखादी

निशाणी आली तर खात्रीने मानतील. तुम्ही सांगा की निशाण्या अल्लाहजवळ आहेत आणि तुम्हाला काय माहीत की त्या निशाण्या येऊन पोहचतील, तरीही ते मानणार नाहीत.

**११०.** आणि आम्ही त्यांची मने व डोळे फिरवून टाकू जसे त्यांनी पूर्वी यावर ईमान राखले नाही आणि त्यांना त्यांच्या विद्रोहा (च्या अंधारा) त असेच भटकत ठेवू.

**१११.** आणि जर आम्ही त्यांच्याजवळ फरिश्ते उतरविले असते, आणि त्यांच्याशी मेलेल्या लोकांनी बातचित केली असती आणि त्यांच्यापुढे सर्व चीज-वस्तू जमा केली असती तरीदेखील अल्लाहच्या इच्छेविना यांनी ईमान राखले नसते, परंतु यांच्यापैकी बहुतेक लोक मूर्खता करीत आहेत.

**११२.** आणि अशा प्रकारे प्रत्येक पैगंबराकरिता जिन्नांच्या आणि मानवांच्या सैतानांना शत्रू बनविले[१] जे आपसात भुरळ पडण्याकरिता मनमोहक गोष्टी मनात आणतात आणि जर तुमच्या पालनकर्त्याने इच्छिले असते तर त्यांनी असे केले नसते. तेव्हा तुम्ही त्यांना व त्यांच्या कारस्थानाला सोडा.

**११३.** आणि यासाठी की त्यांची मने त्याकडे प्रवृत्त व्हावीत, जे आखिरतवर ईमान राखत नाही आणि तशाने आनंदित व्हावेत आणि तोच अपराध करावा जो ते लोक करीत होते.[२]

**११४.** तर काय मी अल्लाहखेरीज अन्य एखाद्या शासकाचा शोध घ्यावा वास्तविक त्यानेच तुमच्याकडे एक सविस्तर ग्रंथ (कुरआन) अवतरीत केला आणि आम्ही ज्यांना

---

(१) ही तीच गोष्ट होय जी अनेकरित्या पैगंबर मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांना धीर-सांत्वना देण्यासाठी सांगितली गेली की तुमच्यापूर्वी जेवढे पैगंबर आलेत त्यांनाही खोटे ठरविले गेले, सजा-यातना दिल्या गेल्या. तात्पर्य, ज्याप्रकारे त्यांनी धीर-संयम व हिंमत राखली त्याच प्रकारे तुम्हीही या सत्याच्या शत्रूंपुढे धीर, संयम आणि दृढता दाखवा. यावरून हे कळाले की सैतानाचे अनुयायी मनवांखेरीज जिन्नांमध्येही आहेत, आणि हे ते होते जे दोन्ही गटांचे शत्रु, विद्रोही, अत्याचारी आणि दुराचारी गर्विष्ठ आहेत.

(२) अर्थात सैतानाच्या वाईट इराद्याला तेच लोक बळी पडतात, जे आखिरतवर ईमान राखत नाहीत, आणि हे खरे आहे की ज्या प्रकारे लोकांच्या मनात आखिरतचा विश्वास कमजोर होत चालला आहे, तद्नुषंगे लोक सैतानी व्यूहात फसत चालले आहेत.

ग्रंथ प्रदान केला आहे, ते जाणतात की खरोखर तो तुमच्या पालनकर्त्यातर्फे सत्यासह आहे, तेव्हा तुम्ही संशय करणाऱ्यांपैकी होऊ नका.

**११५.** आणि तुमच्या पालनकर्त्याची वचने सत्यकथन आणि न्यायाने परिपूर्ण झालीत. त्याच्या वाणीला कोणीही बदलू शकत नाही आणि तो चांगल्या प्रकारे ऐकणारा, जाणणारा आहे.

**११६.** आणि जगात राहणाऱ्यांपैकी तुम्ही जर अधिकांश लोकांचे अनुसरण कराल तर ते तुम्हाला अल्लाहच्या मार्गापासून हटवतील. ते फक्त निराधार कल्पनांच्या मागे चालतात आणि अटकळीच्या गोष्टी करतात.[१]

**११७.** निःसंशय तुमचा पालनकर्ता त्यांना चांगल्या प्रकारे जाणतो, जे त्याच्या मार्गापासून विचलित होतात आणि तो त्यांनाही चांगल्या प्रकारे जाणतो जे त्याच्या मार्गावर चालतात.

**११८.** तर ज्या (जनावरा) वर अल्लाहचे नाव घेतले जाईल, त्यातून खा, जर तुम्ही त्याच्या (अल्लाहच्या) हुकूमावर ईमान राखत असाल.

**११९.** आणि तुमच्यासाठी कोणती गोष्ट याचे कारण असावी की तुम्ही अशा जनावरांमधून न खावे, ज्यावर अल्लाहचे नाव घेतले गेले असेल जरी अल्लाहने त्या सर्व जनावरांचा तपशील सांगितला आहे. ज्यांना तुमच्यासाठी हराम केले गेले आहे,

(१) कुरआनात सांगितलेल्या सत्याचे अवलोकन प्रत्येक कालखंडात केले जाऊ शकते अन्य एका ठिकाणी अल्लाहने फर्माविले,

''तुमच्या मर्जीनंतरही अधिकांश लोक ईमान राखणार नाहीत.'' (सूरह यूसुफ-१०३)

तात्पर्य, सत्य आणि सचोटीच्या मार्गावर चालणारे नेहमी फार थोडे असतात ज्यावरून हेही सिद्ध होते की सत्याचा आधार प्रमाण व पुरावा आहे. लोकांची कमी अधिक संख्या नव्हे. ज्या गोष्टीला जास्तीत जास्त लोकांनी मानले ती सत्य असावी असे नाही आणि कमी लोक सत्यनिष्ठ नाहीत असेही नाही, किंबहुना कुरआनाद्वआरे या सत्याच्या आधारावर शक्य आहे की सत्यनिष्ठ संख्येने कमी असतात आणि खोटे लोक जास्त. ज्याची पुष्टी हदीसद्वारे होते. पैगंबर मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांनी फर्माविले, माझे अनुयायी ७३ गटांमध्ये विभागले जातील, ज्यापैकी फक्त एक गट जन्नतमध्ये जाईल, बाकी सर्व जहन्नममध्ये जातील आणि जन्नतमध्ये जाणाऱ्या गटाची लक्षणे सांगितली की जो माझ्या आणि माझ्या सहाबांच्या मार्गावर चालणारा असेल. (अबु दाऊद- किताबुस सुन्नः, प्रकरण शरह अस सुन्नः नं. ४५९६, तिर्मिजी- किताबुल ईमान, प्रकरण माजाअ फी श्फ्तराक हाजेहिल उम्मः)

परंतु तेदेखील जेव्हा तुम्हाला सक्त गरज भासल्यास (वैध आहे) आणि हे निश्चित आहे की बहुतेक लोक आपल्या चुकीच्या इराद्यांवर, कसल्याही प्रमाणाविना भटकतात. निःसंशय अल्लाह अतिरेक करणाऱ्यांना चांगल्या प्रकारे ओळखतो.

**१२०.** तुम्ही उघड आणि लपलेले असे सर्व अपराध सोडून द्या. निःसंशय जे लोक गुन्हा कमवितात, त्यांना त्यांच्या दुष्कर्मांचा मोबदला लवकरच दिला जाईल.

**१२१.** आणि ते खाऊ नका, ज्या जनावरावर जिबह करतेवेळी अल्लाहचे नाव घेतले गेले नसेल आणि हे दुष्कृत्य आहे आणि सैतान आपल्या मित्रांच्या मनात अशा गोष्टी भरवितात की त्यांनी तुमच्याशी भांडण करावे जर तुम्ही त्यांचे म्हणणे मानले तर खचितच तुम्ही शिर्क करणारे व्हाल.

**१२२.** आणि असा मनुष्य, जो पूर्वी मेलेला होता, मग आम्ही त्याला जिवंत केले आणि त्याच्यासाठी दिव्य प्रकाश बनविला, ज्याद्वारे तो लोकांमध्ये चालतो, काय त्या माणसासारखा असू शकतो, जो अंधारात असावा, आणि त्यातून बाहेर पडू शकत नसावा? अशाच अधर्मी लोकांकरिता त्यांचे आचरण सुशोभित बनविले गेले आहे.

**१२३.** आणि अशा प्रकारे आम्ही प्रत्येक वस्तीच्या मोठ्या अपराध्यांना कट-कारस्थान रचण्यासाठी बनविले यासाठी की त्यांनी वस्तीत कारस्थान रचावे आणि ते आपल्याच विरूद्ध कारस्थान रचतात मात्र त्यांना ते कळून येत नाही.

**१२४.** आणि जेव्हा त्यांच्याजवळ एखादी आयत येते तेव्हा म्हणतात की आम्ही कधीही विश्वास ठेवणार नाहीत जोपर्यंत आम्हालाही तशीच आयत दिली जात नाही, जी अल्लाहच्या पैगंबरांना दिली गेली. अल्लाह चांगल्या प्रकारे जाणतो की त्याने आपली पैगंबरी (रिसालत) कोणत्या ठिकाणी राखावी. लवकरच ज्यांनी अपराध केले आहेत, त्यांना अल्लाहच्या ठिकाणी अपमानित व्हायचे आहे आणि जे कट-कारस्थान ते करीत राहिले, त्याचा मोबदला फार मोठा अज़ाब आहे.

**१२५.** ज्याला अल्लाह सरळ मार्ग दाखवू इच्छितो त्याची छाती (हृदय) इस्लाम (धर्मा) करिता खुली करतो आणि ज्याला मार्गभ्रष्ट करू इच्छितो, त्याची छाती आणखी जास्त संकुचित करतो, जणू काही तो आकाशात चढत आहे. अशा प्रकारे अल्लाह त्यांना घाणीत टाकतो जे ईमान राखत नाही.

**१२६.** हा तुमच्या पालनकर्त्याचा सरळ मार्ग आहे आम्ही आयतींचे सविस्तर वर्णन त्या जनसमूहाकरिता दिले आहे, जे बोध प्राप्त करतात.

**१२७.** यांच्याचसाठी त्यांच्या पालनकर्त्याच्या ठिकाणी सलामतीचे घर आहे आणि तोच त्यांच्या सत्कर्मांच्या आधारावर त्यांचा मित्र आहे.

**१२८.** आणि ज्या दिवशी अल्लाह या सर्वांना एकत्र करील (आणि फर्माविल) हे जिन्न-समूह! तुम्ही मानवांपैकी बहुतेकांना आत्मसात केले आणि मानवांपैकी त्यांचे मित्र म्हणतील, हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला आपसात लाभ पोहचव आणि आम्ही तुझ्या निर्धारीत वेळेस, जी तू आमच्यासाठी निश्चित केली, जाऊन पोहोचलो. (अल्लाह) फर्माविल, की तुमची जागा जहन्नममध्ये आहे, ज्यात तुम्ही सदैव राहाल, परंतु अल्लाह इच्छिल, निःसंशय तुमचा पालनकर्ता हिकमतशाली, ज्ञानी आहे.

**१२९.** अशाच प्रकारे आम्ही अत्याचारी लोकांना त्यांच्या दुष्कृत्यांपायी एकमेकांचे दोस्त बनवितो.

**१३०.** हे जिन्न आणि मानवांच्या समूहांनो! काय तुमच्याजवळ तुमच्यामधून रसूल (पैगंबर) नाही आलेत? जे तुमच्यासमोर आमच्या आयती वाचून ऐकवित होते आणि तुम्हाला या (कयामतच्या) दिवसाचा सामना करण्याबाबत सचेत करीत राहिले. ते म्हणतील, आम्ही स्वतःविरूद्ध साक्षी आहोत आणि ऐहिक जीवनाने त्यांना धोक्यात ठेवले आणि ते स्वतःविरूद्धच साक्ष देतील की ते काफिर (इन्कारी) होते.

**१३१.** (पैगंबर पाठविले गेले) कारण तुमचा पालनकर्ता एखाद्या वस्तीच्या लोकांना एखाद्या अत्याचारापायी नष्ट करीत नाही, जेव्हा तेथील रहिवाशी गाफील असावेत.

**१३२.** आणि प्रत्येकासाठी त्याच्या कर्मानुसार अनेक दर्जे आहेत आणि तुमचा पालनकर्ता या कर्मांशी गाफील नाही जी ते करीत आहेत.

**१३३.** आणि तुमचा पालनकर्ता निःस्पृह दया करणारा आहे. जर त्याने इच्छिले तर तुमचा सर्वनाश करून टाकील आणि तुमच्यानंतर ज्याला इच्छिल तुमच्या जागी आणून ठेवील, जसे तुम्हाला अन्य एका जनसमूहाच्या वंशात निर्माण केले.

**१३४.** ज्या गोष्टीचा तुम्हाला वायदा दिला जात आहे, ती निःसंशय घडून येणार आहे आणि तुम्ही विवश करू शकत नाही.

**१३५.** तुम्ही सांगा, हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! तुम्ही आपल्या ठिकाणी आपले कर्म करीत राहा, मीदेखील (आपल्या जागी) कर्म करीत आहे. तुम्हाला लवकरच माहीत पडेल की कोणाचा शेवट या जगानंतर (चांगला) होतो. निःसंशय अत्याचार करणारे कधीही सफल होणार नाहीत.

**१३६.** आणि अल्लाहने जी शेती आणि जनावरे निर्माण केलीत, त्यांनी त्यांच्यातून काही भाग अल्लाहचा ठरविला आणि आपल्या कल्पनेनुसार म्हणाले की हा हिस्सा अल्लाहचा आहे, आणि हा आमच्या उपास्य-देवतांचा, मग जो आमच्या दैवतांचा (हिस्सा) आहे, तो अल्लाहपर्यंत पोहचत नाही, मात्र जो अल्लाहचा आहे तो त्यांच्या दैवतांपर्यंत पोहोचतो. किती वाईट फैसला ते करतात!

**१३७.** आणि अशा प्रकारे बहुतेक अनेकेश्वरवाद्यांकरिता त्यांच्या दैवतांनी त्यांना बरबाद करण्यासाठी आणि त्यांच्यावर त्यांचा धर्म संशयास्पद बनविण्यासाठी, त्यांच्या संततीच्या हत्येला सुशोभित बनविले आहे आणि अल्लाहने इच्छिले असते तर त्यांनी असे केले नसते तेव्हा तुम्ही त्यांना आणि त्यांच्या मनाने रचलेल्या गोष्टीला सोडून द्या.

**१३८.** आणि ते म्हणाले, ही जनावरे आणि शेती हराम आहे, याला तोच खाईल, ज्याला आम्ही आपल्या इच्छेने खायला सांगू आणि काही जनावरांची पाठ (अर्थात स्वार होणे) हराम आहे आणि काही जनावरांवर (जिबह करतेवेळी) अल्लाहचे नाव घेत नाही, अल्लाहवर खोटे रचण्याकरिता अल्लाह त्यांना त्यांच्या आरोपाचा मोबदला लवकरच देईल.

**१३९.** आणि ते म्हणाले, या जनावरांच्या गर्भात जे आहे ते विशेषतः आमच्या पुरुषांकरिता आहे आणि आमच्या बायकांवर हराम आहे, मात्र जर ते मृत असेल तर त्यात सर्वांचा हिस्सा आहे. तो (अल्लाह) त्यांच्या या कथनाचा मोबदला लवकरच देईल. निःसंशय तो हिकमतशाली, जाणणारा आहे.

**१४०.** मोठ्या नुकसानात राहिले ते ज्यांनी ज्ञानाविना मूर्खपणाने आपल्या संततीची हत्या केली आणि अल्लाहने जी रोजी (आजीविका) प्रदान केली तिला हराम ठरवून घेतले अल्लाहवर खोटे रचण्यापायी, ते मार्गभ्रष्ट झाले आणि सन्मार्गावर राहिले नाहीत.

**१४१.** तोच (अल्लाह) आहे, ज्याने वेलींच्या आणि विनावेलींच्या बागा निर्माण केल्या, आणि खजूर व शेती ज्यांचा स्वाद अनेक प्रकारचा आहे, आणि जैतून व डाळिंबे एक प्रकारची, अनेकविध (अनेकप्रकारची). जेव्हा त्यांना फळे येतील तेव्हा तुम्ही ती खा

आणि त्याच्या कापणीच्या दिवशी त्याचा हक्क जरूर अदा करा आणि उधळपट्टीने खर्च करू नका. निःसंशय, अल्लाह उधळपट्टी करणाऱ्यांशी प्रेम राखत नाही.

**१४२.** आणि जनावरांमध्ये काही ओझे लादण्यायोग्य आणि काही जमिनीला लागून असलेले बनविले. खा, जे तुम्हाला अल्लाहने प्रदान केले आहे, आणि सैतानाच्या पद-चिन्हांचे अनुसरण करू नका. निःसंशय, तो तुमचा उघड शत्रू आहे.

**१४३.** आठ प्रकारचे जोडे (बनविले) मेंढीच्या जातीचे दोन, बकरीच्या जातीचे दोन. तुम्ही सांगा की अल्लाहने दोघांच्या नराला हराम केले आहे किंवा दोघांच्या मादीला? किंवा त्याला जो दोन्ही माद्यांच्या गर्भाशयात आहे मला ज्ञानासह सांगा, जर सच्चे असाल.

**१४४.** आणि उंटामध्ये दोन आणि गायीच्या जातीत दोन. तुम्ही सांगा, काय अल्लाहने दोन्ही माद्यांना किंवा दोन्ही नरांना हराम केले आहे? किंवा त्याला, जो दोन्ही माद्यांच्या गर्भाशयात सामील असेल. काय तुम्ही त्या वेळी हजर होते, जेव्हा अल्लाहने याचा आदेश दिला? मग त्याहून मोठा अत्याचारी कोण असेल, जो अल्लाहवर खोटा आरोप ठेवील, यासाठी की कसल्याही ज्ञानाविना लोकांना मार्गभ्रष्ट करावे. निःसंशय, अल्लाह अत्याचारी लोकांना मार्ग दाखवित नाही.

**१४५.** तुम्ही सांगा, मला जो आदेश दिला गेला आहे, त्यात कोणा खाणाऱ्याकरिता कोणतेही खाद्य हराम आढळत नाही. परंतु हे की ते मेलेले असेल, किंवा वाहते रक्त, किंवा डुकराचे मांस, यासाठी की ते अगदी नापाक (अस्वच्छ-अशुद्ध) आहे किंवा जे शिर्कचे कारण असेल, ज्यावर अल्लाहशिवाय दुसऱ्यांचे नाव घेतले गेले असेल, मग जो कोणी लाचार असेल वास्तविक विद्रोही आणि मर्यादेचे उल्लंघन करणारा नसेल तर अल्लाह मोठा माफ करणारा, दया करणारा आहे.

**१४६.** आणि आम्ही यहूदी लोकांवर नखे असलेली जनावरे हराम केली आणि गाय व बकरीची चरबी त्यांच्यावर हराम केली, मात्र जी दोघांच्या पाठीवर आणि आतड्यात असेल किंवा जी एखाद्या हाडाशी लागून असेल. आम्ही हा त्यांच्या (धर्माशी) विद्रोहाचा मोबदला दिला आणि आम्ही सच्चे आहोत.

**१४७.** जर तो तुम्हाला खोटे ठरविल तर सांगा की तुमच्या पालनकर्त्या (अल्लाह) ची दया अतिशय विस्तृत आहे आणि त्याचा अज़ाब (शिक्षा-यातना) अपराधी लोकांवरून टळू शकत नाही.

**१४८.** अनेक ईश्वरांची उपासना करणारे म्हणतील, अल्लाहने इच्छिले असते तर आम्ही आणि आमच्या वाड-वडिलांनी, अल्लाहसोबत दुसऱ्यांना उपास्य मानले नसते, ना एखाद्या वस्तूला हराम ठरविले असते अशा प्रकारे यांच्या पूर्वीच्या लोकांनी खोटे ठरविले, येथपर्यंत की आमच्या अज़ाबचा स्वाद चाखून घेतला. त्यांना सांगा, काय तुमच्याजवळ एखादे ज्ञान आहे तर ते आमच्यासाठी बाहेर काढा (जाहीर करा) तुम्ही अटकळीवर चालता आणि फक्त अनुमान लावता.

**१४९.** तुम्ही सांगा, मग अल्लाहचेच प्रमाण प्रभावशाली आहे, यास्तव त्याने जर इच्छिले तर तुम्हा सर्वांना मार्गदर्शन करू शकतो.

**१५०.** तुम्ही सांगा, आपल्या त्या साक्ष देणाऱ्यांना आणा, ज्यांनी ही साक्ष द्यावी की अल्लाहने याला हरामे केले आहे, मग जर ते साक्ष देतील तर तुम्ही त्यांच्यासोबत साक्ष देऊ नका आणि त्यांच्या मनमानी इच्छा-आकांक्षांचे अनुसरण करू नका आणि ज्यांनी आमच्या आयतींना खोटे ठरविले आणि जे आखिरतवर ईमान राखत नाही आणि (इतरांना)आपल्या पालनकर्त्यासमान मानतात.

**१५१.** तुम्ही सांगा की, या, मी वाचून ऐकवू की तुम्हाला तुमच्या पालनकर्त्याने कशापासून मनाई केली आहे. ते हे की त्याच्यासोबत कोणत्याही चीज-वस्तूला सहभागी करू नका आणि माता पित्याशी नेक वर्तन करा आणि आपल्या संततीची गरीबीमुळे हत्या करू नका. आम्ही तुम्हाला आणि त्यांना रोजी (आजिविका) प्रदान करतो आणि खुल्या व छुप्या निर्लज्जतेच्या जवळ जाऊ नका आणि त्या जीवाला ज्याबाबत अल्लाहने मनाई केली आहे, ठार मारू नका, परंतु धर्मशास्त्रीय (शरीअतच्या) कारणाने. तुम्हाला त्याने याचाच आदेश दिला आहे, यासाठी की तुम्ही समजून घ्यावे.

**१५२.** आणि अनाथाच्या संपत्तीच्या जवळही जाऊ नका, तथापि खूप चांगल्या पद्धतीने, येथेपर्यंत की ते तारुण्यावस्थेस पोहोचावेत, आणि न्यायासह माप-तोल पूर्ण करा. आम्ही कोणावर त्याच्या कुवतीपेक्षा जास्त भार ठेवत नाही आणि जेव्हा बोलाल, तेव्हा न्याय करा, मग तो जवळचा नातेवाईक का असेना आणि अल्लाहशी केलेला

वायदा पूर्ण करा. त्याने तुम्हा लोकांना याचाच आदेश दिला आहे यासाठी की तुम्ही स्मरण राखावे.

**१५३.** आणि हाच[१] माझा सरळ मार्ग आहे यास्तव त्यावरच चाला आणि इतर मार्गांवर चालू नका, अन्यथा तुम्हाला त्याच्या मार्गपासून दूर करतील त्याने (अल्लाहने) याचाच आदेश दिला आहे यासाठी की तुम्ही सुरक्षित राहावे.

**१५४.** आणि आम्ही (पैगंबर) मूसा यांना ग्रंथ प्रदान केला, त्याच्यावर आपली कृपा देणगी (नेमत) पूर्ण करण्यासाठी, ज्याने सत्कर्मे केलीत आणि प्रत्येक गोष्टीचा तपशील आणि मार्गदर्शन आणि दया कृपाकरिता, यासाठी की त्यांनी आपल्या पालनकर्त्याशी भेट होण्यावर ईमान राखावे.

**१५५.** आणि हा (पवित्र कुरआन) एक शुभ ग्रंथ आहे, जो आम्ही अवतरित केला, यास्तव तुम्ही याचे अनुसरण करा, यासाठी की तुमच्यावर दया केली जावी.

**१५६.** यासाठी की असे न म्हणावे की आमच्या पूर्वी दोन जनसमूहांवर ग्रंथ (तौरात आणि इंजील) अवतरित केले गेले आणि आम्ही त्यांच्या शिकवणीपासून अनभिज्ञ राहिलो.

**१५७.** किंवा तुम्ही असे न म्हणावे की जर आमच्यावर ग्रंथ अवतरित झाला असता तर आम्ही त्यांच्यापेक्षा अधिक सत्य मार्गावर राहिलो असतो. तेव्हा तुमच्याजवळ तुमच्या पालनकर्त्यातर्फे स्पष्ट प्रमाण आणि मार्गदर्शन व दया येऊन पोहोचली आहे. मग त्याहून जास्त अत्याचारी कोण आहे, ज्याने अल्लाहच्या आयतींना खोटे ठरविले आणि त्यांच्याकडून तोंड फिरविले आम्ही लवकरच अशा लोकांना मोठा सक्त अज़ाब देऊ जे आमच्या आयतींकडून तोंड फिरवितात.

**१५८.** ते फरिश्त्यांच्या आगमनाची प्रतिक्षा करीत आहेत की आपल्या पालनकर्त्या (अल्लाह) च्या आगमनाची की तुमच्या पालनकर्त्याच्या एखाद्या निशाणीच्या आगमनाची? ज्या दिवशी तुमच्या पालनकर्त्यातर्फे निशाणी येईल, तेव्हा कोणत्याही

(१) 'हाच'शी अभिप्रेत पवित्र कुरआन होय किंवा इस्लाम धर्म किंवा अल्लाहचे ते आदेश, जे प्रामुख्याने या आयतीत वर्णिले गेले आहेत आणि तो तौहीद (एकेश्वरवाद) मरणोत्तर परिणती आणि प्रेषित्व आणि हेच इस्लामचे तीन मूलाधार आहेत, ज्याच्या आसावर संपूर्ण इस्लामी कायदे फिरतात. यास्तव याचा जोदेखील अर्थ घेतला जाईल, एकच अर्थ आहे.

माणसाला त्याचे ईमान कामी पडणार नाही, ज्याने यापूर्वी ईमान राखले नसेल किंवा आपल्या ईमानाने एखादे सत्कर्म केले नसेल. तुम्ही सांगा, तुम्ही प्रतिक्षा करा, आम्ही (देखील) प्रतिक्षा करीत आहोत.

**१५९.** निःसंशय, ज्यांनी आपल्या धर्माला वेगवेगळे करून घेतले आणि अनेक धार्मिक पंथ-संप्रदाय बनले, त्यांच्याशी तुमचे कसलेही नाते नाही, त्याचा फैसला अल्लाहजवळ आहे, मग तो त्यांना त्याबाबत सांगेल की ते कसकसे कर्म करीत राहिले.

**१६०.** जो मनुष्य सत्कर्म करील तर त्याला त्याच्या दहा पट (मोबदला) मिळेल आणि जो दुष्कर्म करील तर त्याला त्याच्याइतकीच सजा मिळेल आणि त्या लोकांवर किंचितही अत्याचार होणार नाही.

**१६१.** तुम्ही सांगा, मला माझ्या पालनकर्त्याने एक सरळ मार्ग दाखविला आहे की तो एक मजबूत व कायम राहणारा दीन (धर्म) आहे जो मार्ग आहे इब्राहीमचा जे अल्लाहकडे एकचित्त होते आणि ते अनेकेश्वरवाद्यांपैकी नव्हते.

**१६२.** तुम्ही सांगा, निःसंशय माझी नमाज, माझी सर्व उपासना, माझे जीवन, आणि मृत्यु, समस्त विश्वाच्या अल्लाहकरिता आहे.

**१६३.** त्याचा (अल्लाहचा) कोणीही सहभागी नाही. मला याचाच आदेश दिला गेला आहे आणि मी सर्वांत प्रथम ईमान राखणारा आहे.

**१६४.** तुम्ही सांगा, काय मी अल्लाहखेरीज दुसऱ्या पालनकर्त्याचा शोध घेऊ वास्तविक तोच प्रत्येक चीज वस्तूचा स्वामी (उपास्य) आहे आणि जो कोणी, जे काही कमवील, ते त्यालाच भोगावे लागेल आणि कोणीही कोणा दुसऱ्यांचे ओझे उचलणार नाही, मग तुम्हाला तुमच्या पालनकर्त्याकडे दुसऱ्यांदा जायचे आहे. तो तुम्हाला तुमच्या मतभेदांविषयी सांगेल.

**१६५.** आणि त्यानेच तुम्हाला धरतीत खलीफा बनविले आणि एकमेकांवर दर्जे प्रदान केले, यासाठी की जे काही तुम्हाला प्रदान केले, त्यात तुमची कसोटी घ्यावी. निःसंशय, तुमचा पालनकर्ता लवकरच अज़ाब (शिक्षा-यातना) देणार आहे आणि निःसंशय तो मोठा माफ करणारा आहे, दया करणारा आहे.

---------------------------

# सूरह आराफ-७

सूरह अल आराफ मक्का येथे अवतरली आणि यात दोनशे सहा आयती आणि चोवीस रुकुउ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** आलिफ. लाम. मीम. सॉद .

**२.** हा एक ग्रंथ आहे, जो तुमच्याकडे अवतरित केला गेला, यासाठी की याद्वारे सचेत करण्यात तुमच्या मनात संकोच निर्माण होऊ नये, आणि ईमान राखणाऱ्यांकरिता बोध आहे.

**३.** जे (धर्मविधान) तुमच्या पालनकर्त्यातर्फे उतरविले गेले, त्याचे अनुसरण करा आणि त्याच्याखेरीज इतर दोस्तांचे अनुसरण करू नका. तुम्ही लोक फार कमी बोध प्राप्त करता.

**४.** आणि कित्येक वस्त्या आम्ही नष्ट करून टाकल्या आणि त्यांच्यावर आमचा अज़ाब रात्रीच्या वेळी पोहोचला किंवा अशा स्थितीत की ते दुपारच्या वेळी आराम करीत होते.

**५.** तर जेव्हा त्यांच्याजवळ आमचा अज़ाब आला, तेव्हा त्यांची ओरड फक्त हीच राहिली की ते म्हणाले, आम्हीच अत्याचारी राहिलोत.

**६.** मग आम्ही त्यांना अवश्य विचारू ज्यांच्याजवळ संदेश पाठविला गेला आणि पैगंबरांनाही अवश्य विचारू.[१]

**७.** मग आम्ही त्यांच्यासमोर ज्ञानासह निवेदन करू, आणि आम्ही गाफील नव्हतो.

**८.** आणि त्या दिवशी ठीक वजन होईल, मग ज्याचे पारडे जड राहील, तर असेच लोक सफल होतील.

---

(१) जनसमूहांना विचारले जाईल की तुमच्याजवळ पैगंबर आले होते? त्यांनी आमचा संदेश पोहचविला होता? ते उत्तर देतील, होय. हे अल्लाह! तुझे पैगंबर खचितच आमच्याजवळ आले होते, परंतु हे आमचेच दुर्दैव होते की आम्ही त्यांची काळजी घेतली नाही. मग पैगंबरांना विचारले जाईल की तुम्ही आमचा संदेश आपल्या लोकांना पोहचविला आणि त्यांनी त्या अनुषंगाने कोणते आचरण केले? पैगंबर या प्रश्नाचे उत्तर देतील, ज्याचे सविस्तर वर्णन पवित्र कुरआनात अनेक ठिकाणी आहे.

**९.** आणि ज्याचे पारडे हलके असेल तर हे असे लोक असतील, ज्यांनी आपले नुकसान स्वतःच करून घेतले, या कारणाने की आमच्या आयतींशी ते जुलूम करीत होते.

**१०.** आणि आम्ही तुम्हाला धरतीत राहण्याचे स्थान दिले आणि त्यात तुमच्यासाठी जीवनसामुग्री निर्माण केली. तुम्ही फार कमी आभार मानता.

**११.** आणि आम्ही तुम्हाला निर्माण केले, मग तुमचे रूप घडविले, मग आम्ही फरिश्त्यांना फर्माविले की आदमला सजदा करा, तेव्हा इब्लिसला सोडून सर्वांनी सजदा केला कारण तो सजदा करणाऱ्यांमध्ये सामील झाला नाही.

**१२.** (अल्लाहने) फर्माविले, जेव्हा मी तुला सजदा करण्याचा आदेश दिला, तेव्हा कोणत्या कारणाने तुला सजदा करण्यापासून रोखले. तो म्हणाला, मी याच्यापेक्षा अधिक चांगला आहे. तू मला आगीपासून निर्माण केले आणि याला मातीपासून निर्माण केले आहे.

**१३.** (अल्लाहने) आदेश दिला की तू आकाशातून खाली उतर, आकाशात राहून घमेंड करण्याचा तुला काहीच हक्क नाही. तेव्हा चल निघ. निःसंशय तू धिःक्कारलेल्यांपैकी आहेस.

**१४.** (सैतान) म्हणाला, मला (कयामतपर्यंत) संधी प्रदान कर, जेव्हा लोक दुसऱ्यांदा जिवंत केले जातील.

**१५.** (अल्लाहने) फर्माविले, तुला ती संधी प्रदान केली गेली.

**१६.** (सैतान) म्हणाला, तू मला धिःक्कारल्यामुळे मी त्यांच्यासाठी तुझ्या सरळ मार्गावर बसेन.

**१७.** मग त्यांच्या समोरून आणि पाठीमागून आणि उजव्या व डाव्या बाजूने हल्ला करीन आणि तुला यांच्यात अधिकांश लोक कृतज्ञशील आढळणार नाहीत.

**१८.** (अल्लाहने) फर्माविले, तू यापासून (येथून) अपमानित होऊन निघून जा जे त्यांच्यापैकी तुझ्या मार्गावर चालतील तर मी तुम्हा सर्वांनी जहन्नमला भरून टाकीन.

**१९.** आणि (आम्ही फर्माविले की) हे आदम! तुम्ही आणि तुमची पत्नी जन्नतमध्ये राहा, मग जिथून इच्छा होईल तिथून खा, आणि त्या झाडाच्या जवळ जाऊ नका अन्यथा अत्याचारी ठराल.

**२०.** मग सैतानाने दोघांच्या मनात कुविचार निर्माण केला, यासाठी की दोघांच्या वर त्यांची लज्जास्थाने उघड करावीत आणि सांगितले की तुम्हा दोघांच्या पालनकर्त्याने तुम्हाला या झाडापासून अशासाठी रोखले आहे की तुम्ही दोघे फरिश्ते व्हाल किंवा सदैवकाळ राहणारे व्हाल.

**२१.** त्याने (सैतानाने) त्या दोघांच्या समोर शपथ घेतली की, मी तुम्हा दोघांचा शुभचिंतक आहे.

**२२.** अशा प्रकारे धोकेबाजीने दोघांना खाली आणले, मग त्या दोघांनी झाडाचा स्वाद घेताच, दोघांवर त्यांची गुप्तांगे उघड झाली आणि ते आपल्यावर जन्नतची पाने चिकटवू लागले, आणि त्यांच्या पालनकर्त्या (अल्लाह) ने दोघांना पुकारले की काय मी तुम्हा दोघांना या झाडापासून रोखले नव्हते? आणि तुम्हाला सांगितले नव्हते की सैतान तुमचा खुला शत्रू आहे.

**२३.** दोघे म्हणाले, हे आमच्या पालनकर्त्या! आम्ही स्वतःवर जुलून करून घेतला आणि जर तू आम्हाला माफ केले नाही आणि आमच्यावर दया केली नाही तर आम्ही नुकसान उचलणाऱ्यांपैकी होऊ.

**२४.** (अल्लाहने) फर्माविले, तुम्ही खाली उतरा. तुम्ही आपसात वैरी आहात आणि तुम्हाला एक अवधीपर्यंत धरतीत राहावयाचे आणि लाभ प्राप्त करून घ्यायचे आहे.

**२५.** फर्माविले की तुम्ही त्यातच जीवन व्यतीत कराल आणि त्यातच मरण पावाल आणि त्यातूनच बाहेर काढले जाल.

**२६.** हे आदमच्या पुत्रांनो! आम्ही तुम्हाला असे वस्त्र प्रदान केले जे तुमच्या लज्जास्थानांना झाकेल आणि शोभा देईल आणि सर्वांत उत्तम वस्त्र, अल्लाहच्या भयाचे वस्त्र आहे. ही अल्लाहची निशाणी आहे यासाठी की यांनी स्मरण राखावे.

**२७.** हे आदमच्या पुत्रांनो! तुम्हाला सैतानाने बहकवून न द्यावे, जसे तुमच्या माता-

पित्याला जन्नतमधून बाहेर घालिवले. त्याने त्यांचे वस्त्र उतरवून दिले, यासाठी की त्यांना त्यांची गुप्तांगे दाखवावीत. निःसंशय तो आणि त्याचे जातीबांधव तुम्हाला अशा ठिकाणाहून पाहतात की तुम्ही त्यांना पाहू शकत नाही. आम्ही सैतानांना अशा लोकांचे मित्र बनविले, जे ईमान (विश्वास) राखत नाही.[१]

**२८.** आणि ते जेव्हा एखादे दुष्कर्म करतात, तेव्हा म्हणतात की आम्हाला आमचे पूर्वज यावरच आढळून आलेत आणि अल्लाहने आम्हाला याचा आदेश दिला आहे. तुम्ही सांगा की अल्लाह वाईट कामाचा आदेश देत नाही. काय तुम्ही अल्लाहसंबंधी अशा गोष्टी करता ज्या तुम्ही जाणत नाहीत.

**२९.** (हे पैगंबर!) तुम्ही सांगा, माझ्या पालनकर्त्याने मला न्यायाचा आदेश दिला आहे आणि प्रत्येक सजदा करतेवेळी आपला चेहरा सरळ दिशेत करून घ्या आणि त्या (अल्लाह) करिता दीन (धर्म) सच्चा मनाने स्वीकारून त्याला पुकारा. त्याने जसे तुम्हाला सुरुवातीला निर्माण केले, त्याच प्रकारे दुसऱ्यांदाही निर्माण करील.

**३०.** आणि त्या (अल्लाह) ने काहींना सन्मार्ग दाखविला तर काही मार्गभ्रष्टतेस पात्र ठरले. त्यांनी अल्लाहच्या खेरीज सैतानांना आपला मित्र बनविले आणि असे समजतात की ते मार्गदर्शन प्राप्त केलेले लोक आहेत.

**३१.** हे आदमच्या पुत्रांनो! प्रत्येक वेळी मस्जिदीत जाताना आपले वस्त्र (पोषाख) घालत जा आणि खा व प्या आणि उधळपट्टीने खर्च करू नका. निःसंशय अमर्याद खर्च करणाऱ्यांशी अल्लाह प्रेम राखत नाही.

**३२.** (हे पैगंबर!) तुम्ही सांगा की त्या शोभा-सजावटीला कोणी हराम केले आहे, जिला अल्लाहने आपल्या दासांकरिता निर्माण केले आहे आणि पाक (स्वच्छ-शुद्ध) रोजीला. तुम्ही सांगा की हे ऐहिक जीवनात त्या लोकांसाठी आहे ज्यांनी ईमान राखले (आणि) विशेषतः कयामतच्या दिवशी त्याच लोकांकरिता आहे. आम्ही अशा प्रकारे आयतींचे सविस्तर वर्णन कतो, त्यांच्यासाठी, जे ज्ञान बाळगतात.

---

(१) अर्थात ज्यांच्या अंगी ईमान नाही, तेच सैतानाचे मित्र आहेत. विशेषतः ते सैतानाच्या कट कारस्थानांना बळी पडतात. तरीदेखील ईमान राखणाऱ्यांना तो भुरळ पाडण्याचा प्रयत्न करीत राहतो, काहीच न जमल्यास छुपे शिर्क (दिखावटी सत्कर्म) आणि खुला शिर्क (अनेकेश्वरोपासना) मध्ये मग्न करतो आणि अशा प्रकारे तो त्यांना खऱ्या ईमानाच्या पूंजीपासून वंचित ठेवतो.

**३३.** तुम्ही सांगा की माझ्या पालनकर्त्याने सर्व प्रकट-अप्रकट स्वरूपाच्या निर्लज्जतेच्या गोष्टींना हराम केले आहे. आणि अपराध व नाहक जुलूम करण्यास,[१] आणि अल्लाहसोबत अशाला सहभागी करण्यास, ज्याची त्याने कसलीही सनद उतरविली नाही आणि अल्लाहसंबंधी माहीत नसलेल्या गोष्टी बोलण्यास.

**३४.** आणि प्रत्येक उम्मत (जनसमूह) चा एक निर्धारीत अवधी आहे, मग जेव्हा त्यांची ठरलेली वेळ पूर्ण होईल, तेव्हा ना एक क्षण विलंब होईल, ना पुढे जाईल.

**३५.** हे आदमच्या पुत्रांनो! जर तुमच्याजवळ तुमच्यामधूनच माझे रसूल (पैगंबर) येतील, जे तुमच्यासमोर माझ्या आयतींचे निवेदन करतील तर जो अल्लाहचे भय राखून वागेल आणि आपले आचरण सुधारेल तर अशा लोकांना ना कसले भय राहील, आणि ना तो दुःखी होतील.

**३६.** आणि ज्या लोकांनी आमच्या आयतींचा इन्कार केला आणि त्यांच्याशी घमेंड केली तेच जहन्नमी आहेत. तेच त्यात सदैव राहतील.

**३७.** त्याहून मोठा अत्याचारी कोण आहे ज्याने अल्लाहवर असत्य रचले किंवा त्याच्या आयतींना खोटे ठरविले, यांना ग्रंथापासून ठरलेला हिस्सा पोहोचेल, येथेपर्यंत की जेव्हा त्यांच्याजवळ आमचे फरिश्ते, त्यांचे प्राण काढण्यासाठी येतील, तेव्हा म्हणतील की ते कोठे आहेत, ज्यांना तुम्ही अल्लाहखेरीज पुकारत राहिले? ते म्हणतील, आमच्यापासून हरवलेत आणि स्वतः काफिर (अधर्मी) असण्याचे स्वतःच कबूल करतील.

**३८.** तो (अल्लाह) फर्माविल, दाखल व्हा जहन्नममध्ये, जिन्न आणि मानवांच्या समूहांसोबत, जे तुमच्यापूर्वी होऊन गेलेत. जेव्हा एखादा समूह दाखल होईल, तेव्हा

---

(१) अपराधाशी अभिप्रेत अल्लाहची अवज्ञा करणे, त्याच्या आदेशाविरूद्ध वागणे. एका हदीसनुसार, पैगंबर मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांनी फर्माविले, गुन्हा तो होय, जो तुझ्या छातीत (मनात) खटकेल आणि लोकांना हे माहीत झाल्यावर तुला वाईट वाटावे. (सहीह मुस्लिम- किताबुल बिर्र) काही लोकांच्या मते गुन्हा तो आहे, ज्याचा प्रभाव करणाऱ्यापर्यंत सीमित असावा आणि बग़ाय(अरबी शब्द) तो आहे, ज्याचा परिणाम इतरांपर्यंतही पोहचावा. इथे बग़ाय सोबत नाहकचा अर्थ, अकारण अत्याचार, अतिरेक. उदा. लोकांचा हक्क हडप करणे, एखाद्याचे धन हिसकावून घेणे, अकारण मारणे, झोडणे आणि कारण नसताना बरे-वाईट व सक्त शब्द वापरून एखाद्याला अपमानित करणे वगैरे.

दुसऱ्या समूहाचा धिःक्कार करील.येथेपर्यंत की जेव्हा त्या (जहन्नम) मध्ये सर्वजण जमा होतील तेव्हा नंतरचे लोक आपल्या अगोदर गेलेल्यांविषयी म्हणतील की, हे आमच्या पालनकर्त्या! यांनीच आम्हाला मार्गभ्रष्ट केले. तू यांना जहन्नमची दुप्पट शिक्षा दे. (अल्लाह) फर्माविल की सर्वांसाठी दुप्पट शिक्षा आहे, परंतु तुम्ही जाणत नाही.

**३९.** आणि अगोदर गेलेले लोक, नंतरच्या लोकांना म्हणतील की आमच्यावर तुम्हाला कसलीही श्रेष्ठता नाही, यास्तव तुम्हीदेखील आपल्या कर्मापायी अल्लाहच्या शिक्षेचा आनंद घ्या.

**४०.** निःसंशय, ज्यांनी आमच्या आयतींना खोटे ठरविले आणि त्यांच्याशी घमेंड केली, त्यांच्यासाठी आकाशाचे दरवाजे उघडले जाणार नाहीत आणि ते जन्नतमध्ये प्रवेश करू शकणार नाहीत, जोपर्यंत उंट, सूईच्या छिद्रात दाखल होत नाही आणि आम्ही अपराधी लोकांना असाच मोबदला देतो.

**४१.** त्यांच्यासाठी जहन्नमच्या आगीचे अंथरुण असेल आणि त्यांच्यावर त्याचेच पांघरुण असेल आणि अत्याचारी लोकांना आम्ही अशीच सजा देतो.

**४२.** आणि ज्यांनी ईमान राखले आणि सत्कर्मे केलीत तर आम्ही कोणत्याही जीवाला, त्याच्या कुवतीनुसारच उत्तरदायित्व सोपवितो. हेच लोक जन्नती आहेत. हेच त्यात सदैव राहतील.

**४३.** आणि आम्ही त्यांच्या मनातले कपट दूर करू, त्यांच्याखाली नद्या वाहत असतील आणि ते म्हणतील, अल्लाहकरिता सर्व प्रशंसा आहे, ज्याने आम्हाला याच्या मार्गावर लावले जर त्याने मार्गदर्शन केले नसते तर आम्ही स्वतः सन्मार्गास लागलो नसतो. निःसंशय, आमच्या पालनकर्त्याचे रसूल (पैगंबर) सत्यासह आले आणि त्यांना पुकारून सांगितले जाईल की आपल्या कर्मांच्या मोबदल्यात तुम्ही या जन्नतचे हक्कदार बनविले गेले.

**४४.** आणि जन्नती लोक, जहन्नमी लोकांना हाक देऊन सांगतील की आम्हाला आपल्या पालनकर्त्याचा वायदा, जो आम्हाला देण्यात आला, खरा आढळला तर काय तुम्हाला, तुमच्या पालनकर्त्याने केलेला वायदा खरा आढळला? ते म्हणतील, होय! मग एक ऐलान करणारा त्यांच्या दरम्यान ऐलान करील की अल्लाहतर्फे धिःक्कार असो अत्याचारी लोकांवर.

**४५.** जे आपल्या पालनकर्त्याच्या मार्गापासून रोखू इच्छितात आणि त्याला वाकडे करू इच्छितात आणि ते आखिरतचाही इन्कार करतात.

**४६.** आणि त्या दोघांच्या दरम्यान एक आड पडदा असेल आणि आराफ (उंचवट्या) वर काही माणसे असतील जे प्रत्येकाला त्यांच्या निशाणांवरून ओळखून घेतील, आणि जन्नती लोकांना हाक देऊन सांगतील की तुमच्यावर सलामती असो, ते त्या (जन्नत) मध्ये अजून दाखल झाले नसतील आणि तिची आशा बाळगत असतील.

**४७.** आणि जेव्हा त्यांची दृष्टी जहन्नमी लोकांवर पडेल तेव्हा म्हणतील, हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला अत्याचारी लोकांत सामील करू नको.

**४८.** आणि आराफवाले काही लोकांना, ज्यांना त्यांच्या चिन्हांवरून ओळखत असतील, हाक मारून सांगतील की तुमची जमात आणि तुमची घमेंड तुमच्या उपयोगी पडली नाही.

**४९.** काय हेच ते लोक होत ज्यांच्याविषयी तुम्ही जोर देऊन शपथपूर्वक सांगत होते की यां (जन्नती लोकां) च्या वर अल्लाहची दया कृपा होणार नाही. (त्यांना सांगितले जाईल) की जन्नतमध्ये प्रवेश करा. तुमच्यावर कसलेही भय नाही आणि ना तुम्ही दुःखी व्हाल.

**५०.** आणि जहन्नमवाले जन्नतच्या लोकांना हाक देतील की आमच्यावर थोडे पाणी टाका किंवा अल्लाहने जी रोजी (आजीविका) तुम्हाला प्रदान केली आहे त्यातून थोडेसे द्या. ते म्हणतील, अल्लाहने या दोन्ही वस्तू इन्कारी लोकांकरिता हराम केल्या आहेत.

**५१.** ज्यांनी आपल्या दीन (धर्मा) ला मनोरंजन आणि खेळ-तमाशा बनविले आहे आणि ज्यांना ऐहिक जीवनाने धोक्यात टाकले यास्तव आज आम्ही त्यांचा विसर पाडू ज्याप्रमाणे ते या दिवसाला विसरले होते आणि आमच्या आयतींचा इन्कार करीत राहिले.

**५२.** आणि आम्ही त्यांच्याजवळ ज्ञानावर आधारीत एक ग्रंथ सविस्तर वर्णनासह पाठविला आहे जो मार्गदर्शन आणि दया आहे त्या लोकांकरिता जे ईमान राखतात.

**५३.** काय ते याच्या अंतिम निर्णयाची वाट पाहात आहे? ज्या दिवशी याचा अंतिम निर्णय येऊन पोहोचेल, तर ज्या लोकांनी यापूर्वी याचा विसर पाडला, ते म्हणतील की आमच्या पालनकर्त्याचे रसूल (पैगंबर) सत्य घेऊन आले, तर काय कोणी आमची शिफारस करणारा आहे, ज्याने आमच्यासाठी शिफारस करावी? किंवा आम्हाला

दुसऱ्यांदा (जगात) पाठविले गेले असते, तर त्याखेरीज कर्म केले असते, जे (पूर्वी) करीत राहिलो. त्यांनी स्वतःला नुकसानग्रस्त केले आणि ज्या गोष्टी मनाने रचत राहिले, त्यांच्यापासून हरवल्या.

**५४.** निःसंशय तुमचा स्वामी व पालनहार अल्लाहच आहे, ज्याने आकाशांना व जमिनीला सहा दिवसांत बनविले, आणि मग अर्श (सिंहासना) वर उच्च स्थिर झाला. तो रात्रीला दिवसाने अशा प्रकारे लपवितो की ती त्याला द्रुत गतीने येऊन धरते आणि सूर्य व चंद्र आणि ताऱ्यांना कामास ठेवले कारण ते त्याच्या हुकूमाधीन आहेत. ऐका, त्याचीच निर्मिती आणि आदेशही त्याचाच आहे. समस्त विश्वाचा पालनकर्ता मोठा बरकतवाला (समृद्धशाली) आहे.

**५५.** आपल्या पालनकर्त्या (अल्लाह) ला नम्रतापूर्वक आणि हळू आवाजातही पुकारत जा. अल्लाह मर्यादेचे उल्लंघन करणाऱ्यांशी प्रेम राखत नाही.

**५६.** आणि धरतीत सुधारणा झाल्यानंतर बिघाड निर्माण करू नका, आणि भय व आशेसह त्याची उपासना करा. निःसंशय अल्लाहची दया नेक सदाचारी लोकांच्या निकट आहे.

**५७.** आणि तोच अल्लाह आहे जो आपल्या दयेने प्रथम शुभ समाचारासाठी वाऱ्यांना पाठवितो, येथेपर्यंत की जेव्हा ते जड ढगांना लादून येतात तेव्हा आम्ही त्यांना एखाद्या कोरड्या जमिनीच्या दिशेने हांकतो, मग त्याद्वारे पाण्याचा वर्षाव करतो, मग त्याद्वारे प्रत्येक प्रकारची फळे काढतो. आम्ही अशाच प्रकारे मेलेल्यांना बाहेर काढू यासाठी की तुम्ही विचार चिंतन करावे.

**५८.** आणि चांगली (पाक) जमीन आपल्या पालनकर्त्याच्या आदेशाने आपली रोपटे (पीक) उगवते आणि खराब जमीन फार कमी उगवते अशा प्रकारे आम्ही निशाण्यांचे अनेक प्रकारे वर्णन करतो, त्या लोकांकरिता जे कृतज्ञता व्यक्त करतात.

**५९.** आम्ही नूह (अलैहिस्सलाम) यांना त्यांच्या जनसमूहाकडे पाठविले तेव्हा ते म्हणाले, हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! अल्लाहची उपासना करता. त्याच्याखेरीज तुमचा दुसरा कोणीही उपास्य (माबूद) नाही. निःसंशय मला तुमच्याबद्दल मोठ्या दिवसाच्या शिक्षा-यातनेचे भय वाटते.

**६०.** त्यांच्या जनसमूहाचे सरदार म्हणाले, तुम्ही आम्हाला उघड अशा मार्गभ्रष्टतेत दिसत आहात.

**६१.** नूह म्हणाले, हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! मी मार्गभ्रष्ट नाही. तथापि समस्त विश्वाच्या पालनकर्त्याचा पैगंबर आहे.

**६२.** तुम्हाला आपल्या पालनकर्त्याचा संदेश पोहचवितो आणि तुमच्या भल्याचे करीत आहे आणि अल्लाहतर्फे ते ज्ञान बाळगतो जे ज्ञान तुम्ही बाळगत नाही.

**६३.** काय तुम्हाला आश्चर्य वाटते की तुमच्या पालनकर्त्यातर्फे तुमच्याच जनसमूहाच्या एका माणसावर एखादी बोधपूर्ण गोष्ट येते, यासाठी की तुम्हाला सचेत करावे आणि तुम्ही अल्लाहचे भय राखून वागावे यासाठी की तुमच्यावर दया केली जावी.

**६४.** तर त्यांनी नूहला खोटे ठरविले, मग आम्ही नूह आणि त्यांच्या अनुयायींना नौकेत वाचविले आणि ज्यांनी आमच्या आयतींचा (निशाण्यांचा) इन्कार केला, त्यांना बुडवून टाकले. निःसंशय तो एक आंधळा जनसमूह होता.

**६५.** आणि आद जनसमूहाकडे त्यांचा भाऊ हूद यांना (पैगंबर म्हणून) पाठविले. ते म्हणाले, हे माझ्या जाती-बांधवानो! अल्लाहची उपासना करा, त्याच्याखेरीज तुमचा कोणीही उपास्य नाही. काय तुम्ही भित नाही?

**६६.** त्यांच्या जनसमूहाने काफिर सरदार म्हणाले, आम्हाला तुम्ही मूर्ख आहात असे वाटते. खात्रीने आम्ही तुम्हाला खोट्यांपैकी समजतो.

**६७.** हूद म्हणाले, हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! मी मूर्ख नाही, परंतु साऱ्या जगाच्या पालनकर्त्याचा रसूल (पैगंबर) आहे.

**६८.** मी तुम्हाला आपल्या पालनकर्त्याचा संदेश पोहचवितो, आणि तुमचा प्रामाणिक हितचिंतक आहे.

**६९.** काय तुम्हाला आश्चर्य वाटते की तुमच्या पालनकर्त्यातर्फे एखादी बोधपूर्ण गोष्ट

तुमच्यातल्याच एका माणसाजवळ आली आहे, यासाठी की त्याने तुम्हाला सचेत करावे. स्मरण करा, जेव्हा अल्लाहने तुम्हाला नूहच्या जनसमूहानंतर त्यांच्या जागी केले आणि तुमचा शरीर-बांधा अधिक वाढविला, यास्तव तुम्ही अल्लाहच्या कृपा देणग्यांचे स्मरण करा यासाठी की सफल व्हावे.

**७०.** जनसमूहाचे लोक म्हणाले, काय तुम्ही आमच्याजवळ एवढ्यासाठी आला आहात की आम्ही फक्त एक अल्लाहची उपासना करावी आणि आपल्या वाडवडिलांच्या उपास्य दैवतांचा त्याग करावा.[१] तेव्हा ज्या गोष्टीची तुम्ही आम्हाला धमकी देत आहात, ती आणा जर तुम्ही सच्चे असाल.

**७१.** हूद म्हणाले, तुमच्या पालनकर्त्यातर्फे तुमच्यावर शिक्षा आणि प्रकोप येऊनच पोहचला. काय तुम्ही माझ्याशी काही अशा नावांविषयी वाद घालता, जे तुम्ही आणि तुमच्या वाडवडिलांनी ठेवून घेतलेत ज्यांचे कसलेही प्रमाण अल्लाहने उतरविले नाही. तुम्ही प्रतिक्षा करा. तुमच्यासोबत मीदेखील प्रतिक्षा करतो.

**७२.** तेव्हा आम्ही त्यांना आणि त्यांच्या अनुयायींना आपल्या दयेने वाचवून घेतले आणि त्या लोकांची मुळे कापून टाकली, ज्यांनी आमच्या आयतींना खोटे ठरविले आणि ते ईमानधारक नव्हते.

**७३.** आणि समूदकडे त्यांचा भाऊ सॉलेह (पाठविले). सॉलेह म्हणाले, हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! अल्लाहची उपासना करा, त्याच्याखेरीज तुमचा कोणीही माबूद (उपास्य) नाही. तुमच्याजवळ तुमच्या पालनकर्त्यातर्फे प्रमाण येऊन पोहोचले. ही अल्लाहची सांडणी तुमच्याकरिता निशाणी आहे, तिला अल्लाहच्या धरतीत खाण्या (चरण्या) साठी सोडून द्या. तिला वाईट इराद्याने हात लावू नका, अन्यथा दुःखदायक अज़ाब तुम्हाला येऊन धरेल.

**७४.** आणि तुम्ही त्या अवस्थआंचे स्मरण करा जेव्हा (अल्लाहने) तुम्हाला आद (जनसमूहा) नंतर खलीफा बनविले आणि या धरतीत तुम्हाला राहण्याची जागा दिली.

---

(१) थोर-विभूती आणि वाडवडिलांचे अनुसरण प्रत्येक काळात मार्गभ्रष्टतेचे कारण राहिले. आद जनसमूहाच्या लोकांनीही हेच प्रमाण सादर केले आणि मूर्तीपूजा सोडून एकेश्वरोपासनेचा मार्ग अंगीकारण्यास तयार झाले नाहीत. दुर्दैवाने मुसलमानांमध्येही आपल्या पूर्वजांचे अंधानुकरण करण्याचा रोग सर्वसामान्यपणे आहे.

तुम्ही समतल जमिनीवर घरे बनविता आणि पर्वतांना कोरून घर बनविता, तेव्हा अल्लाहच्या कृपा देणग्यांचे स्मरण करा आणि धरतीत फसाद (उत्पात) माजवित फिरू नका.

**७५.** त्याच्या जनसमूहाचे घमेंडी सरदार म्हणाले, आपल्या कमजोर- दुबळ्या लोकांना, ज्यांनी ईमान राखले होते, काय तुमचा पक्का विश्वास आहे की सॉलेह आपल्या पालनकर्त्यातर्फे पाठविले गेले आहेत. ते म्हणाले की आम्ही त्यावर ईमान राखतो, ज्यासह त्यांना पाठविले गेले आहे.

**७६.** गर्विष्ठ सरदार म्हणाले, तुम्ही ज्याच्यावर ईमान राखता, आम्ही ईमान राखत नाही.

**७७.** यास्तव सांडणीला त्यांनी ठार मारले, आणि आपल्या पालनकर्त्याची अवज्ञा केली आणि म्हणाले, हे सॉलेह ! जर तुम्ही पैगंबर असाल तर आपली धमकी पूर्ण करा.

**७८.** तर त्यांना भूकंपाने घेरून टाकले आणि ते आपल्या घरांमध्ये पालथे पडून राहिले.

**७९.** सॉलेह त्यांच्यापासून तोंड फिरवून निघून गेले आणि म्हणाले, हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! मी तुम्हाला आपल्या पालनकर्त्याचा आदेश पोहचविला आणि तुमचा हितचिंतक राहिलो परंतु तुम्ही हितचिंतकांशी प्रेम राखत नाहीत.

**८०.** आणि (आम्ही) लूतला (पाठविले) जेव्हा ते आपल्या लोकांना म्हणाले, की तुम्ही असे वाईट कृत्य करता, जे तुमच्यापूर्वी साऱ्या जगात कोणीही केले नाही.

**८१.** तुम्ही पुरुषांशी संभोग करता, स्त्रियांना सोडून, किंबहुना तुम्ही तर मर्यादा पार केली आहे.

**८२.** आणि त्यांच्या जनसमूहाला काही उत्तर देता आले नाही याखेरीज की आपसात म्हणू लागले की या लोकांना वस्तीबाहेर घालवा. हे मोठे पाक साफ (सत्शील, पवित्र) बनतात.

**८३.** जेव्हा आम्ही त्यांना (लूतला) आणि त्यांच्या कुटुंबियांना वाचविले त्यांच्या पत्नीखेरीज, कारण ती त्याच लोकांपैकी राहिली, जे (अज़ाबग्रस्त) राहिलेत.

**८४.** आणि आम्ही त्यांच्यावर एक नवीन प्रकारचा पाऊस पाडला तेव्हा बघा तरी, त्या अपराध्यांचा कसा शेवट झाला!

**८५.** आणि (आम्ही) मदयनकडे त्यांचे भाऊ शोऐब यांना पाठविले. शोऐब म्हणाले, हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! तुम्ही अल्लाहची उपासना करा, त्याच्याखेरीज तुमचा कोणीही माबूद नाही तुमच्या पालनकर्त्यातर्फे तुमच्याजवळ स्पष्ट निशाणी येऊन पोहोचली आहे. तेव्हा तुम्ही माप तोल पुरेपूर करीत जा, आणि लोकांना त्यांच्या चीज-वस्तू कमी करून देऊ नका आणि साऱ्या धरतीवर, सुधारणा केली गेल्यानंतर फसाद (उत्पात-उपद्रव) पसरवू नका. हे तुमच्यासाठी लाभदायक आहे जर तुम्ही ईमान राखाल.

**८६.** आणि तुम्ही प्रत्येक रस्त्यावर त्यांना धमकी देण्यासाठी आणि अल्लाहच्या मार्गापासून रोखण्यासाठी, ज्यांनी अल्लाहवर ईमान राखले, बसू नका आणि त्यात चूका शोधत, आणि स्मरण करा जेव्हा तुम्ही संख्येने कमी होते, अल्लाहने तुम्हाला जास्त केले मग पाहा उत्पाती लोकांचा शेवट कसा झाला.

**८७.** आणि जर तुमच्यापैकी काही लोकांनी त्या आदेशावर ईमान राखले, ज्यासह मला पाठविले गेले आहे आणि काहींनी ईमान राखले नाही तर थोडा धीर-संयम राखा. येथेपर्यंत की अल्लाहने आमच्या दरम्यान फैसला करावा आणि तो सर्वांत उत्तम फैसला करणारा आहे.

**८८.** त्यांच्या जनसमूहाचे घमेंडी अहंकारी सरदार म्हणाले, हे शोऐब! आम्ही तुम्हाला आणि तुमच्या सोबतच्या ईमान राखणाऱ्यांना अवश्य आपल्या नगरातून बाहेर घालवू अन्यथा तुम्ही परत आमच्या धर्मात या. ते म्हणाले, काय आम्हाला त्याचा किळस येत असला तरीही?

**८९.** (असे केल्यास) आम्ही तर अल्लाहवर खोटा आरोप ठेवू जर तुमच्या धर्मात परतून आलो. वास्तविक अल्लाहने आम्हाला त्यातून मुक्त केले आहे आणि आमच्यासाठी त्यात पुन्हा परतणे शक्य नाही, परंतु हे की अल्लाह जर इच्छिल, जो आमचा स्वामी, पालनकर्ता आहे. आमच्या पालनकर्त्याने प्रत्येक गोष्टीस आपल्या ज्ञानाने घेरून ठेवले आहे. आम्ही आपल्या अल्लाहवरच भरोसा केला आहे. हे आमच्या पालनकर्त्या! आमच्या आणि आमच्या लोकांच्या दरम्यान फैसला कर सत्यासह आणि तू

सर्वांत उत्तम फैसला करणारा आहे.

**९०.** आणि त्यांच्या जनसमूहाच्या इन्कारी सरदारांनी म्हटले की जर तुम्ही शोऐबचे अनुसरण केले तर नुकसान भोगणाऱ्यांपैकी व्हाल.

**९१.** तर त्यांना भूकंपाने येऊन घेरले, यास्तव ते आपल्या घरांमध्ये पालथे पडून राहिले.

**९२.** ज्यांनी शोऐबला खोटे ठरविले, त्यांची अशी अवस्था झाली की जणू त्या (घरां) मध्ये कधी राहतच नव्हते. ज्यांनी शोऐबला खोटे ठरविले, ते लोक हानिग्रस्त झाले.

**९३.** त्या वेळी शोऐब त्यांच्याकडून तोंड फिरवून निघून गेले आणि म्हणाले की हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! मी आपल्या पालनकर्त्याचा संदेश तुमच्यापर्यंत पोहचविला आणि मी तुमचे हितचिंतन केले, मग मी त्या इन्कारी लोकांबद्दल दुःखी का व्हावे?

**९४.** आणि आम्ही जेव्हादेखील एखाद्या वस्तीत पैगंबर पाठविला, तर तिथल्या लोकांना आम्ही रोगराई आणि कष्ट यातनेत जरूर टाकले, यासाठी की त्यांनी (लाचार होऊन) गयावया करावी.

**९५.** मग आम्ही त्या दरिद्रतेला संपन्न अवस्थेने बदलून टाकले, येथपर्यंत की जेव्हा ते सुखसंपन्न झाले आणि म्हणू लागले की आमच्या वाडवडिलांनाही चांगल्या-वाईट स्थितीशी सामना करावा लागला, तेव्हा आम्ही अकस्मात त्यांना पकडीत घेतले आणि ज्यांना कळालेसुद्धा नाही.

**९६.** आणि जर त्या शहरांच्या रहिवाशींनी ईमान राखले असते आणि अल्लाहचे भय राखून आचरण केले असते तर आम्ही त्यांच्याकरिता आकाश व जमिनीच्या समृद्धीचे दरवाजे उघडले असते. परंतु त्यांनी खोटे ठरविले, तेव्हा आम्ही त्यांना त्यांच्या दुराचारापायी धरले.

**९७.** काय तरीही या वस्त्यांचे रहिवाशी या गोष्टीपासून निश्चिंत झाले की त्यांच्यावर आमचा अज़ाब रात्रीच्या वेळी येऊन कोसळावा, ज्या वेळी ते झोपेत असावेत.

**९८.** आणि काय त्या वस्त्यांचे रहिवाशी या गोष्टीपासून बेफिकीर झाले आहेत की त्यांच्यावर आमचा अज़ाब दिवस चढता यावा, ज्या वेळी ते खेळ-तमाशात मग्न

असावेत.

**९९.** काय ते अल्लाहच्या योजनेपासून निडर झालेत? तर अल्लाहच्या योजनेपासून नुकसान भोगणारेच निडर होतात.[१]

**१००.** तर काय जे लोक धरतीत, तिच्या रहिवाशांच्या विनाशानंतर वारस बनले आहेत, त्यांना हे माहीत झाले नाही की जर आम्ही इच्छिले तर त्यांच्या अपराधांपायी त्यांना संकटात टाकू आणि त्यांच्या मनांवर मोहर लावू मग ते ऐकू न शकावेत.

**१०१.** या शहरांच्या काही घटना आम्ही तुम्हाला सांगत आहोत आणि त्यांचे पैगंबर त्यांच्याजवळ प्रमाणासह आले, तरीही ज्याला त्यांनी अगोदर मानले नाही त्याला नंतर मानण्यायोग्य झाले नाहीत. अशा प्रकारे अल्लाह इन्कारी लोकांच्या हृदयांवर मोहर लावून देतो.

**१०२.** आणि आम्हाला त्यांच्यातले अधिकांश लोक वचनाचे पालन करताना आढळले नाहीत, आणि आम्हाला त्यांच्यातले अधिकांश लोक दुराचारी दिसले.

**१०३.** मग त्यांच्यानंतर आम्ही (पैगंबर) मूसा यांना आपल्या निशाण्यांसह फिरऔन आणि त्याच्या सरदारांजवळ पाठविले तर त्यांनी त्या निशाण्यांचा हक्क अदा केला नाही. मग पाहा, दुराचारी लोकांचा कसा शेवट झाला!

**१०४.** आणि मूसा म्हणाले, हे फिरऔन! मी साऱ्या जगाच्या पालनकर्त्यातर्फे पैगंबर आहे.

**१०५.** माझ्याकरिता हेच उत्तम आहे की सत्याशिवाय अल्लाहविषयी काही न बोलावे. मी तुमच्या पालनकर्त्यातर्फे एक मोठी निशाणीही आणली आहे यास्तव तू इस्राईलच्या

---

(१) या आयतीमध्ये अल्लाहने सर्वांत प्रथम हे सांगितले आहे की ईमान (श्रद्धा) आणि तकवा (अल्लाहचे भय राखून केलेले आचरण) ही अशी बाब आहे की ज्या वस्तीचे लोक तिचा अंगिकार करतील तर त्या वस्तीवर अल्लाह आकाश व धरतीचे सुख-समृद्धीचे, धन-संपत्तीचे दरवाजे उघडतो. अर्थात गरजेनुसार आकाशातून पाऊस पाडतो आणि जमिनीला त्याद्वारे सिंचित करून शेतीचे उत्पन्न वाढवितो, परिणामी विकास आणि संपन्न अवस्था उदयास येते. याउलट खोटे ठरविणारे आणि अल्लाहचा इन्कार करण्याचा मार्ग पत्करणारे जनसमूह अल्लाहच्या प्रकोपास पात्र ठरतात, मग रात्री किंवा दिवसा केव्हा प्रकोप कोसळेल हे कळून येत नाही, परिणामी सुखा-समाधानाने आबाद असलेली वस्ती एका क्षणात निर्जन व नामशेष होते. यास्तव अल्लाहच्या प्रकोपापासून निर्धास्त राहू नये. या बेफिकीरीचा परिणाम फक्त विनाश आहे. याखेरीज आणखी काही नाही.

संततीला माझ्यासोबत पाठव.

**१०६.** तो (फिरऔन) म्हणाला, जर तुम्ही एखादा मोजिजा (चमत्कार) घेऊन आला असाल तर तो प्रस्तुत करा जर तुम्ही सच्चे असाल.

**१०७.** मग मूसा यांनी आपली लाठी खाली टाकली तर अचानक त्या काठीचा साप मोठा अजगर बनला.

**१०८.** आणि आपला हात बाहेर काढला तर अचानक तो सर्व पाहणाऱ्यांसमोर लख्ख चमकणारा बनला.

**१०९.** फिरऔनच्या जनसमूहाचे सरदार म्हणाले, हा मोठा निष्णात जादूगार आहे.

**११०.** तो तुम्हाला तुमच्या देशाबाहेर घालवू इच्छितो, तेव्हा तुमचा काय विचार आहे.

**१११.** ते म्हणाले, तुम्ही त्याला आणि त्याच्या भावाला संधी द्या आणि शहरांमध्ये एकत्र करणाऱ्यांना (दवंडी देणाऱ्यांना) पाठवा.

**११२.** की त्यांनी सर्व निष्णात जादूगारांना आपल्या समोर आणून हजर करावे.

**११३.** आणि जादूगार फिरऔनजवळ आले आणि म्हणाले, आम्ही जर सफल झालो तर आमच्यासाठी काही मोबदला आहे काय?

**११४.** तो म्हणाला, होय, आणि तुम्ही सर्व जवळच्या लोकांपैकी व्हाल.

**११५.** जादूगार म्हणाले, हे मूसा! वाटल्यास तुम्ही टाका किंवा आम्हीच टाकतो.

**११६.** (मूसा) म्हणाले, तुम्हीच टाका, तर जेव्हा त्यांनी टाकले, तेव्हा लोकांची नजरबंदी केली आणि त्यांना भयभीत केले आणि एक प्रकारची मोठी जादू दाखविली.

**११७.** आणि आम्ही मूसाला आदेश दिला की आपली लाठी खाली टाका, मग अचानक ती त्यांच्या बनविलेल्या खेळाला गिळू लागली.

**११८.** तेव्हा, सत्य जाहीर झाले आणि त्यांनी जे काही बनविले होते ते सर्व गायब झाले.

**११९.** यास्तव ते लोक याप्रसंगी पराजित झाले आणि बहुतेक अपमानित होऊन परतले.

**१२०.** आणि जादूगार सजद्यात पडले.

**१२१.** म्हणाले, आम्ही ईमान राखले साऱ्या जगाच्या पालनकर्त्यावर.

**१२२.** जो मूसा आणि हारून यांचाही पालनकर्ता आहे.

**१२३.** फिरऔन म्हणाला, तुम्ही माझ्या आदेशापूर्वीच त्या (मूसा) वर ईमान राखले, निश्चित हे एक कट-कारस्थान आहे जे तुम्ही शहरात त्याच्या रहिवाशांना त्यातून बाहेर घालविण्यासाठी रचले आहे, यास्तव तुम्हाला लवकरच माहीत पडेल.

**१२४.** मी तुमचा एक बाजूचा हात आणि दुसऱ्या बाजूचा पाय कापून टाकीन, मग तुम्हा सर्वांना सूळावर लटकवीन.

**१२५.** त्यांनी उत्तर दिले, आम्ही (मेल्यावर) आपल्या पालनकर्त्या जवळच जाऊ.

**१२६.** आणि तुम्ही आमच्यात हाच दोष पाहिला की आम्ही आपल्या पालनकर्त्याच्या आयतीं (चिन्हां) वर ईमान राखले, जेव्हा त्या आमच्याजवळ येऊन पोहोचल्या. हे आमच्या पालनकर्त्या! आमच्यावर सब्र (धीर-संयम) ओत आणि आम्हाला ईमानधारक असतानाच मृत्यु दे.

**१२७.** आणि फिरऔनच्या जनसमूहाचे सरदार म्हणाले, काय तुम्ही मूसा आणि त्याच्या लोकांना असेच सोडून द्याल की त्यांनी धरतीवर फसाद (उत्पात) करावा, आणि तुमचा व तुमच्या दैवतांचा त्याग करावा. तो म्हणाला, आम्ही त्याच्या पुत्रांना ठार मारू आणि त्यांच्या स्त्रियांना जिवंत ठेवू आणि आम्ही त्यांच्यावर वर्चस्वशाली आहोत.

**१२८.** मूसा आपल्या जनसमूहाच्या लोकांना म्हणाले, अल्लाहची मदत घ्या आणि धीर-संयम राखा, ही धरती अल्लाहची आहे. तो आपल्या दासांपैकी ज्याला इच्छितो, तिचा उत्तराधिकारी बनवितो आणि अंतिम सफलता त्यांनाच लाभते, जे अल्लाहचे भय बाळगतात.

**१२९.** ते म्हणाले, तुमच्या आगमनापूर्वीही आम्हाला कष्ट-यातना दिल्या गेल्या आणि तुमच्या आगमनानंतरही. मूसा म्हणाले, लवकरच तुमचा पालनकर्ता तुमच्या शत्रूंचा सर्वनाश करील आणि या धरतीचा वारसा तुम्हाला प्रदान करील, मग हे पाहील की तुम्ही कसे आचरण करता.

**१३०.** आणि आम्ही फिरऔनवाल्यांना दुष्काळ आणि फळांच्या उत्पन्नात कमीद्वारे

घेरले, यासाठी की त्यांनी बोध प्राप्त करावा.

**१३१.** जर त्यांच्याजवळ भलाई येते, तेव्हा म्हणतात की हे तर आमच्यासाठी व्हायलाच हवे आणि जर कष्ट-यातना येते, तेव्हा मूसा आणि त्यांच्या अनुयायींना अपशकूनी ठरवितात. ऐका, त्यांचा अपशकून अल्लाहच्या जवळ आहे, परंतु अधिकांश लोक जाणत नाहीत.

**१३२.** आणि ते म्हणाले, आमच्याजवळ जीदेखील निशाणी आमच्यावर जादू करण्यासाठी आणाल तरी आम्ही तुमच्यावर ईमान राखणार नाहीत.

**१३३.** मग आम्ही त्याच्यावर वादळ आणि टोळ आणि उवा आणि बेडूक आणि रक्त पाठविले, वेगवेगळ्या निशाण्या, मग त्यांनी घमेंड केली आणि ते अपराधी लोक होते.

**१३४.** आणि जेव्हा त्यांच्यावर एखादा अज़ाब (अल्लाहचा प्रकोप) येत असे, तेव्हा म्हणत की हे मूसा! आमच्यासाठी आपल्या पालनकर्त्याजवळ त्या वायद्याद्वारे, जो तुम्हाला दिला, दुआ (प्रार्थना) करा. जर तुम्ही आमच्यावरून अज़ाब हटविला तर अवश्य आम्ही तुमच्यावर ईमान राखू आणि तुमच्यासोबत इस्त्राईलच्या पुत्रांना पाठवू.

**१३५.** मग जेव्हा आम्ही त्यांच्यावरून तो अज़ाब एका ठराविक मुदतीपर्यंत की त्यापर्यंत त्यांना पोहचणे क्रमप्राप्त होते, हटवित तेव्हा ते त्वरीत वचन भंग करू लागत.

**१३६.** मग आम्ही त्याच्याशी सूड घेतला अर्थात त्यांना समुद्रात बुडविले, या कारणास्तव की ते आमच्या आयतींना (निशाण्यांना) खोटे ठरवित, आणि त्यांच्याबाबत गाफीलपणा दर्शवित.

**१३७.** आणि आम्ही त्या लोकांना जे अतिशय दुर्बल समजले जात, त्या धरतीच्या पूर्व आणि पश्चिमेचे मालक बनविले, जिच्यात आम्ही समृद्धी राखली आहे आणि तुमच्या पालनकर्त्याचा नेक वायदा बनी इस्त्राईलविषयी, त्यांच्या धीर-संयमामुळे पूर्ण झाला आणि आम्ही फिरऔन आणि त्याच्या जनसमूहाने बनविलेल्या कारखान्यांना आणि ज्या उंच इमारती ते उभारत, सर्वकाही क्षत-विक्षत करून टाकले.

**१३८.** आणि आम्ही बनू इस्त्राईल (इस्लाईच्या मुलांना) ला समुद्रापलीकडे उतरविले, मग त्यांचे एका अशा जमातीजवळून जाणे झाले, जी आपल्या काही मूर्त्या (प्रतिमा) घेऊन बसली होती. (त्यांना पाहून हे लोक) म्हणाले, हे मूसा! आमच्यासाठी सुद्धा

असेच उपास्य ठरवून द्या, जशी यांची ही दैवते आहेत. मूसा म्हणाले, खरोखर, तुम्हा लोकांत मोठी मूर्खता आहे.

**१३९.** हे लोक ज्या कामात गुंतले आहेत ते नष्ट केले जाईल आणि त्यांचे हे काम केवळ असत्य आहे.

**१४०.** फर्माविले, काय अल्लाहखेरीज अन्य एखाद्याला तुमचा माबूद (उपास्य) ठरवून देऊ? वास्तविक त्याने समस्त जगातील लोकांवर तुम्हाला प्राधान्य प्रदान केले आहे.

**१४१.** आणि ती वेळ आठवा, जेव्हा आम्ही तुम्हाला फिरऔनच्या लोकांपासून वाचविले जे तुम्हाला सक्त शिक्षा देत असत. तुमच्या पुत्रांची हत्या करीत आणि तुमच्या स्त्रियांना जिवंत सोडून देत आणि यात तुमच्या पालनकर्त्यातर्फे फार मोठी परीक्षा होती.

**१४२.** आणि आम्ही मूसा यांना तीस रात्रींचा वायदा दिला आणि दहा अधिक रात्रींनी तो पूर्ण केला, अशा प्रकारे त्यांच्या पालनकर्त्याचा अवधी पूर्ण चाळीस रात्रींचा झाला आणि मूसा, आपला भाऊ हारूनला म्हणाले, मी (गेल्या) नंतर या (लोकां) ची व्यवस्था राखा आणि सुधारणा करीत राहा आणि उपद्रवी व उत्पाती लोकांच्या मार्गाचे अनुसरण करू नका.

**१४३.** आणि जेव्हा मूसा आमच्या वेळेवर आले, आणि त्यांच्या पालनकर्त्याने त्यांच्याशी संभाषण केले तेव्हा त्यांनी विनंती केली, हे माझ्या पालनकर्त्या! मला आपले दर्शन घडू दे, मी एक क्षण तुला पाहून घेऊ. आदेश झाला की, तुम्ही मला कधीही पाहू शकणार नाही, परंतु तुम्ही या पर्वताकडे पाहात राहा, जर तो आपल्या जागी स्थिर उभा राहिला तर तुम्हीही मला पाहू शकाल. मग त्यांच्या पालनकत्यार्तने जेव्हा त्या पर्वतावर प्रकाश टाकला तेव्हा त्या दिव्य तेजाने त्याचे तुकडे तुकडे झाले आणि मूसा बेशुद्ध होऊन खाली पडले, मग जेव्हा शुद्धीवर आले तेव्हा म्हणाले, नि:संशय (हे अल्लाह) तू पवित्र आहेस. मी तुझ्याजवळ आपल्या अपराधांची क्षमा मागतो आणि सर्वांत प्रथम तुझ्यावर ईमान राखतो.

**१४४.** अल्लाहने फर्माविले, हे मूसा! मी आपली पैगंबरी आणि आपल्याशी केलेल्या संभाषणाद्वारे इतर लोकांवर तुम्हाला श्रेष्ठता प्रदान केली आहे तेव्हा जे काही मी तुम्हाला प्रदान केले आहे, त्याचा स्वीकार करा आणि कृतज्ञता व्यक्त करा.

**१४५.** आणि आम्ही काही तक्त्यांवर प्रत्येक प्रकारचा बोध-उपदेश आणि प्रत्येक गोष्टीचा तपशील त्यांना लिहून दिला. तुम्ही त्यांना पूर्ण शक्ती-सामर्थ्याने धरा आणि

आपल्या लोकांना ताकीद करा की त्यातल्या चांगल्या आदेशानुसार आचरण करा. आता लवकरच तुम्हा लोकांना त्या दुराचारी लोकांचे स्थान दाखवितो.

**१४६.** मी अशा लोकांना आपल्या आयतींपासून विमुखच ठेवीन, जे जगात घमेंड करतात, ज्याचा त्यांना काहीच अधिकार नाही. जर ते सर्व निशाण्या पाहूनही घेतील तरीही त्या ंच्यावर ईमान राखणार नाहीत आणि जर ते सत्य मार्ग पाहूनही घेतील तरी त्याला आपला मार्ग ठरविणार नाहीत, आणि जर ते मार्गभ्रष्टता पाहतील तर तिला आपला मार्ग बनवतील. हे अशासाठी की त्यांनी आमच्या आयतींना खोटे ठरविले आणि त्यांच्यापासून गाफील राहिले.

**१४७.** आणि ते लोक ज्यांनी आमच्या आयतींना आणि आखिरतच्या येण्याला खोटे ठरविले, त्यांचे सर्व आचरण वाया गेले, त्यांना तशीच यातना दिली जाईल, जसे कर्म ते करीत होते.

**१४८.** आणि मूसाच्या जनसमूहाने त्यांच्या पश्चात आपल्या दागिन्यांनी एक वासरू बनवून त्याला उपास्य दैवत बनविले, जो एक आकार मात्र होता ज्यात एक आवाज (ध्वनी) होता. काय त्यांनी हे नाही पाहिले की ते (वासरू) त्यांच्याशी बोलतही नव्हते आणि ना त्यांना मार्गदर्शन करीत होते त्याला त्यांनी (दैवत) बनविले आणि मोठे अन्यायाचे कृत्य केले.

**१४९.** आणि जेव्हा लज्जित झाले आणि जाणून घेतले की खरोखर ते लोक वाट चुकून बहकले, म्हणू लागले की जर आमच्या पालनकर्त्याने आमच्यावर दया केली नाही आणि आमचे अपराध माफ केले नाहीत तर खात्रीने आम्ही नुकसान भोगणाऱ्यांपैकी होऊ.

**१५०.** आणि जेव्हा मूसा आपल्या जनसमूहाकडे परत आले क्रोध आणि दुःखात बुडालेले, तेव्हा म्हणाले, तुम्ही माझ्या पश्चातही मोठी वाईट हरकत केली. काय आपल्या पालनकर्त्याच्या आदेशापूर्वीच तुम्हीही घाई केली आणि त्वरेने तक्ते एका बाजूला टाकले आणि आपला भाऊ हारूनचे डोके धरून त्याला आपल्याकडे ओढू लागले. (हारून) म्हणाले, हे माझ्या मातेपासून जन्मलेले! या लोकांनी मला फार कमकुवत जाणले आणि बहुतेक त्यांनी मला ठार केले असते. तेव्हा तुम्ही माझ्या शत्रूंना हसवू नका आणि माझी गणना या अत्याचारी लोकांमध्ये करू नका.

**१५१.** (मूसा) म्हणाले, हे माझ्या पालनकर्त्या! माझ्या आणि माझ्या भावाच्या चुका

माफ कर आणि आम्हा दोघांना आपल्या दयेत दाखल कर आणि तू दया करणाऱ्यांमध्ये सर्वाधिक दया करणारा आहेस.

**१५२.** निःसंशय, ज्या लोकांनी वासराची उपासना केली, त्यांच्यावर लवकरच त्यांच्या पालनकर्त्यातर्फे प्रकोप आणि अपमान या जगाच्या जीवनातच कोसळेल आणि आम्ही खोटा आरोप ठेवणाऱ्यांना अशीच शिक्षा देतो.

**१५३.** आणि ज्या लोकांनी दुष्कर्मे केलीत, त्यानंतर त्यांनी त्याबद्दल क्षमा-याचना केली आणि ईमान राखले तर तुमचा पालनकर्ता त्या क्षमा-याचनेनंतर अपराध माफ करणारा, दयावान आहे.

**१५४.** आणि जेव्हा मूसा यांचा क्रोध शांत झाला, तेव्हा त्यांनी ते तक्ते उचलून घेतले. त्यातल्या लेखांमध्ये, त्या लोकांकरिता जे आपल्या पालनकर्त्याचे भय राखत, मार्गदर्शन आणि दया-कृपा होती.

**१५५.** आणि मूसाने आपल्या जनसमूहातून सत्तर माणसांना आमच्या ठराविक अवधीकरिता निवडले, तर जेव्हा भूकंपाने त्यांना येऊन धरले, जेव्हा (मूसा) दुआ करू लागले की हे माझ्या पालनकर्त्या! जर तुला मान्य असते तर याच्यापूर्वीच यांचा आणि माझा नाश करून टाकला असता. काय तू आमच्यापैकी काही मूर्खांमुळे सर्वांचाच नाश करशील? ही घटना तुझ्यातर्फे केवळ एक कसोटी आहे, अशा कसोट्यांद्वारे तू ज्याला इच्छिल मार्गभ्रष्ट करशील आणि ज्याला इच्छिल मार्गदर्शन करशील. तूच आमचा संरक्षक आहेस. आता आम्हाला क्षमा कर आणि आमच्यावर दया कर आणि तू माफ करणाऱ्यांमध्ये सर्वाधिक माफ करणारा आहेस.

**१५६.** आणि आम्हा लोकांच्या नावे या जगातही पुण्य लिहुन ठेव आणि आखिरतमध्येही. आम्ही तुझ्याचकडे लक्ष केंद्रित करतो. (अल्लाह) फर्मावितो की मी आपला प्रकोप त्याच्यावरच अवतरित करतो, ज्यावर इच्छितो आणि माझ्या दया-कक्षेत प्रत्येक गोष्ट आहे तर ती दया त्या लोकांच्या नावे अवश्य लिहीन, जे अल्लाहचे भय बाळगतात आणि जगात (धर्मदान) देतात आणि जे आमच्या आयतींवर ईमान राखतात.

**१५७.** जे लोक अशा अशिक्षित (जगातील गुरुजनांद्वारे शिक्षण न घेतलेल्या) पैगंबराचे अनुसरण करतात, जे त्या लोकांना आपल्या जवळच्या तौरात आणि इंजीलमध्ये लिहिलेले आढळतात. ते त्यांना नेकीच्या कामांचा आदेश देतात आणि दुष्कर्मांपासून

रोखतात आणि पाक (स्वच्छ-शुद्ध) वस्तू हलाल (वैध) असल्याचे सांगतात आणि नापाक (अस्वच्छ-अशुद्ध) वस्तू हराम (अवैध) असल्याचे सांगतात आणि त्या लोकांवर जे ओझे आणि गळ्याचे फास होते, त्यांना दूर करतात. यास्तव जे लोक या (नबी) वर ईमान राखतात, आणि त्यांचे समर्थन करतात आणि त्यांना मदत करतात, आणि त्या नूर (प्रकाशा) चे अनुसरण करतात, जो त्यांच्यासोबत पाठविला गेला आहे, असे लोक पूर्ण सफलता प्राप्त करणारे आहेत.

**१५८.** तुम्ही सांगा, लोक हो! मी तुम्हा सर्वांकडे, त्या अल्लाहतर्फे पाठविला गेलो आहे, ज्याची राज्य-सत्ता समस्त आकाशांमध्ये व धरतीत आहे त्याच्याखेरीज कोणीही उपासना करण्यायोग्य नाही. तोच जीवन प्रदान करतो आणि तोच मृत्यु देतो. यास्तव अल्लाहवर आणि त्याचे पैगंबर अशिक्षित नबीवर ईमान राखा की जे अल्लाहवर आणि त्याच्या हुकूमावर ईमान राखतात आणि त्यांचे अनुसरण करा, यासाठी की तुम्ही सत्य मार्गावर यावे.

**१५९.** आणि मूसा यांच्या जनसमूहात एक जमात अशीही आहे, जी सत्याला अनुसरून मार्गदर्शन करते आणि सत्यानुसारच न्याय करते.

**१६०.** आणि आम्ही त्यांना बारा परिवारांमध्ये विभागून सर्वांची वेगवेगळी जमात ठरवून दिली आणि आम्ही मूसाला आदेश दिला, जेव्हा त्यांच्या समुदायाच्या लोकांनी पाणी मागितले, की आपली लाठी अमक्या एका दगडावर मारा, मग त्याच क्षणी त्यातून बारा स्त्रोत वाहू लागले. प्रत्येकाने आपले पाणी पिण्याचे स्थान जाणून घेतले आणि आम्ही त्यांच्यावर ढगांची सावली केली आणि त्यांना मन्न आणि सल्वा पोहचविले की खा स्वच्छ शुद्ध स्वादिष्ट वस्तू, ज्या आम्ही तुम्हाला प्रदान केल्या आहेत. आणि त्यांनी आमचे काहीच नुकसान केले नाही, उलट ते स्वतःचेच नुकसान करीत होते.

**१६१.** आणि जेव्हा त्यांना आदेश दिला गेला की तुम्ही लोक त्या वस्तीत जाऊन राहा आणि खा तिथून, जिथे तुमची इच्छा होईल आणि तोंडाने म्हणत जा की आम्ही क्षमा मागतो आणि झुकलेल्या स्थितीत दरवाजाने प्रवेश करा. आम्ही तुमचे अपराध माफ करू, जे लोक सत्कर्म करतील, त्यांना याहून जास्त प्रदान करू.

**१६२.** परंतु या अत्याचारी लोकांनी, त्यांना सांगितलेल्या वचनाऐवजी दुसरेच वचन बदलून टाकले, त्यापायी आम्ही आकाशातून एक संकट त्यांच्यावर पाठविले, या

कारणास्तव की ते जुलूम करीत होते.

**१६३.** आणि तुम्ही त्या लोकांना, त्या वस्तीच्या रहिवाशांची, जी समुद्राच्या जवळ वसली होती, त्या वेळची अवस्था विचारा, जेव्हा ते शनिवारच्या दिवसाबाबत मर्यादेचे उल्लंघन करीत होते. वास्तविक त्यांच्या शनिवारच्या दिवशी त्यांना मासे उघडपणे त्यांच्यासमोर येत आणि जेव्हा शनिवारचा दिवस नसे तेव्हा (मासे) त्यांच्या समोर येत नसत. आम्ही अशा प्रकारे त्यांची कसोटी घेत होतो. या कारणास्तव की ते आज्ञा भंग करीत होते.

**१६४.** आणि जेव्हा त्यांच्यातला एक गट असे म्हणाला की तुम्ही अशा लोकांना उपदेश का करता, ज्यांना अल्लाह पूर्णपणे बरबाद करणार आहे किंवा त्यांना कठोर शिक्षा देणारा आहे. त्यावर त्यांनी उत्तर दिले की तुमच्या पालनकर्त्यासमोर क्षमा-याचना करण्याकरिता आणि यासाठी की कदाचित त्यांनी (अल्लाहचे) भय बाळगावे.

**१६५.** मग जेव्हा ते त्या उपदेशाला विसरले, ज्याची त्यांना आठवण करून दिली जात राहिली, तेव्हा आम्ही त्या लोकांना तर वाचवून घेतले जे त्यांना वाईट गोष्टीपासून रोखत होते, आणि त्या लोकांना जे जुलूम अत्याचार करीत होते एका सक्त शिक्षा-यातनेने धरले, या कारणाने की ते आज्ञा भंग करीत होते.

**१६६.** अर्थात जेव्हा त्यांना ज्या कामापासून मनाई केली गेली, त्यात त्यांनी मर्यादेचे उल्लंघन केले, तेव्हा आम्ही त्यांना म्हणालो, तुम्ही अपमानित वान्हरे व्हा.

**१६७.** आणि त्या वेळेचेही स्मरण राखले पाहिजे की जेव्हा तुमच्या पालनकर्त्याने सांगितले की तो या (यहूदी) लोकांवर कयामतपर्यंत अशा माणसाला आच्छादित ठेवील जो यांना कठोर शिक्षेद्वारे दुःख पोहचवित राहील. निःसंशय, तुमचा पालनकर्ता लवकरच शिक्षा-यातना देणार आहे आणि निःसंशय तो खरोखर मोठा माफ करणारा आणि दयावान आहे.

**१६८.** आणि आम्ही या जगात त्यांचे (वेगवेगळे) गट पाडले. त्यांच्यात काही नेक सदाचारी होते आणि काही वेगळ्या आचरणाचे आणि आम्ही संपन्न अवस्था आणि वाईट अवस्थेद्वारे त्यांची कसोटी घेत राहिलो यासाठी की त्यांनी परतावे.

**१६९.** मग त्यांच्यानंतर असे लोक त्यांचे वारसदार बनले की ज्यांनी त्यांच्यापासून ग्रंथ प्राप्त केला. ते या तुच्छ जगाचे थोडेसेही धन घेऊन टाकतात आणि म्हणतात की

आम्हाला अवश्य मुक्ती मिळेल, जरी त्यांच्याजवळ तसेच धन येत राहिले तर तेही घेऊन टाकतील. काय त्यांच्याशी या ग्रंथाच्या या मजकूराचा वायदा घेतला गेला नाही की अल्लाहकडे सत्य गोष्टीशिवाय दुसऱ्या कोणत्याही वचनाचा संबंध न दाखवतील. आणि त्यांनी या ग्रंथात जे काही होते, ते वाचले आणि आखिरतचे घर त्या लोकांसाठी चांगले आहे, जे अल्लाहचे भय बाळगतात, मग काय तुम्ही समजून घेत नाही ?

**१७०.** आणि ज्या लोकांनी ग्रंथ मजबूतपणे धरला (ग्रंथावर अटळ राहिले) आणि जे नमाज कायम करतात, तर आम्ही अशा लोकांचा, जे स्वतःचे आचरण सुधारून घेतील, मोबदला वाया जाऊ देणार नाही.

**१७१.** आणि ती वेळही आठवा, जेव्हा आम्ही पर्वताला छत्रीसारखे त्यांच्यावर अधांतरित ठेवले आणि त्यांना खात्री झाली की आता त्यांच्यावर येऊन कोसळेल आणि आम्ही फर्माविले, की आम्ही जो ग्रंथ तुम्हाला प्रदान केला आहे त्याचा दृढतापूर्वक स्वीकार करा आणि लक्षात ठेवा यातले आदेश, यासाठी की तुम्ही अल्लाहचे भय बाळगू लागावे.[१]

**१७२.** आणि जेव्हा तुमच्या पालनकर्त्याने आदमच्या संततीच्या पाठींमधून त्यांची अपत्ये काढली आणि त्यांच्याकडून त्यांच्याचबाबत वायदा घेतला की काय मी तुमचा स्वामी व पालनकर्ता नाही ? सर्वांनी उत्तर दिले, का नाही, आम्ही सर्व साक्षी आहोत. यासाठी की तुम्ही लोकांनी कयामतच्या दिवशी असे न म्हणावे की आम्ही तर यापासून अगदी अजाण होतो.

**१७३.** किंवा हे सांगाल की सर्वांत प्रथम शिर्क तर आमच्या वाडवडिलांनी केले आणि आम्ही त्यांच्यानंतर त्यांच्या वंशात आलो. तर काय त्या चुकीच्या लोकांच्या दुष्कृत्यांबद्दल तू आम्हाला विनाशात टाकशील ?

**१७४.** आणि आम्ही अशा प्रकारे आयतींचे स्पष्टपणे निवेदन करतो, यासाठी की (वाईट मार्गापासून) त्यांनी परत फिरावे.

---

(१) ही त्या वेळेची घटना आहे जेव्हा हजरत मूसा त्यांच्याजवळ तौरात ग्रंथ घेऊन आले आणि त्यांना त्यातले आदेश सांगितले, तेव्हा त्यांनी आपल्या चरित्र्यानुसार त्या आदेशांवर आचरण करणे मान्य केले नाही आणि अवज्ञा केली, ज्यामुळे सर्वश्रेष्ठ अल्लाहने त्यांच्या शिरावर पर्वत आणून उभा केला की तुमच्यावर कोसळवून तुमचा चेंदा मेंदा केला जाईल. त्याचे भय राखून त्यांनी वचन दिले की आता आम्ही तौरातच्या आदेशानुसारच आचरण करू.

**१७५.** आणि त्या लोकांना त्या माणसाची अवस्था वाचून ऐकवा की ज्याला आम्ही आपल्या निशाण्या प्रदान केल्या, मग तो त्यांच्यापासून अगदी निघून गेला, मग सैतान त्याच्या मागे लागला अशा प्रकारे तो वाट चुकलेल्या लोकांमध्ये सामील झाला.

**१७६.** आणि जर आम्ही इच्छिले असते तर त्याला या निशाण्यांमुळे उच्च पदावर बसविले असते, परंतु तो तर जगाच्या मोहपाशात अडकला आणि आपल्या इच्छा-आकांक्षांच्या मागे चालू लागला तेव्हा त्याची अवस्था कुत्र्यासारखी झाली की जर तुम्ही त्याच्यावर हल्ला कराल तरीही (जीभ बाहेर काढून) धापा टाकील किंवा त्याला सोडून द्याल तरीही धापा टाकील. हीच अवस्थआ त्या लोकांची आहे, ज्यांनी आमच्या आयतींना खोटे ठरविले, यास्तव तुम्ही या अवस्थेचे निवेदन करा, कदाचित त्या लोकांनी काही विचार करावा.

**१७७.** त्या लोकांची अवस्थादेखील मोठी वाईट अवस्था आहे, जे आमच्या आयतींना खोटे मानतात, आणि आपले नुकसान करून घेतात.

**१७८.** ज्याला सर्वश्रेष्ठ अल्लाह स्वतः मार्गदर्शन करतो. तो सरळ मार्गावर असतो आणि ज्यांना अल्लाह मार्गभ्रष्ट करील, तेच तोट्यात आहेत.

**१७९.** आणि आम्ही असे अनेक जिन्न आणि मानव जहन्नमकरिता निर्माण केले आहेत, ज्यांची मने अशी आहेत की ज्यांच्याद्वारे समजत नाही, आणि ज्यांचे डोळे असे आहेत, ज्यांच्याद्वारे पाहत नाहीत आणि ज्यांचे कान असे आहेत, ज्यांच्याद्वारे ऐकत नाहीत. हे लोक चतुष्पाद (पशू) सारखे आहेत, किंबहुना त्यांच्यापेक्षाही अधिक भटकलेले[१] हेच लोक गाफील आहेत.

---

(१) अर्थात ह्रदय, डोळे आणि कान सर्वश्रेष्ठ अल्लाहने अशासाठी प्रदान केले आहेत की माणसाने यांचा लाभ घेत आपल्या स्वामी व पालनकर्त्या अल्लाहला समजून घ्यावे, त्याच्या निशाण्यांना पाहावे आणि सत्य गोष्ट लक्षपूर्वक ऐकावी, परंतु जो मनुष्य यांच्याद्वारे हे काम घेत नाही, तो त्यांच्याकरावी लाभ न घडल्याने पशूवत आहे, किंबहुना जनावरांपेक्षा अधिक वाट चुकलेला आहे. यासाठी की जनावरे तरीदेखील आपले काही फायदे व नुकसान समजतात, कारण ते लाभदायक गोष्टींपासून लाभ घेतात आणि हानिकारक वस्तूंचा अव्हेर करतात. परंतु अल्लाहच्या मार्गदर्शनापासून पथभ्रष्ट मनुष्याला इतकेही समजत नाही की त्याच्यासाठी लाभदायक काय आहे आणि हानिकारक काय आहे.

**१८०.** आणि उत्तमोत्तम नावे अल्लाहकरिताच आहेत. यास्तव या नावांनी अल्लाहला पुकारीत जा आणि अशा लोकांशी संबंधही ठेवू नका, जे त्याच्या नावांमध्ये तेढनिर्माण करतात. त्या लोकांना त्यांच्या कृत कर्माची शिक्षा अवश्य मिळेल.

**१८१.** आणि आमच्या निर्मितीत एक जमात अशीही आहे, जी सत्यासह मार्गदर्शन करते आणि सत्याला अनुसरून न्याय करते.

**१८२.** आणि जे लोक आमच्या आयतीं (चिंन्हां) ना खोटे ठरवितात, आम्ही त्यांना हळू हळू (तावडीत) अशा प्रकारे घेत आहोत की त्यांना कळतदेखील नाही.

**१८३.** आणि त्यांना संधी देतो, निःसंशय माझी पद्धत मोठी मजबूत आहे.

**१८४.** काय त्या लोकांनी ही गोष्ट ध्यानी घेतली नाही की त्यांच्या साथीदाराला किंचितही वेड लागले नाही, ते तर केवळ एक स्पष्ट भय दाखविणारे आहेत.

**१८५.** आणि काय त्या लोकांनी विचार नाही केला आकाशांच्या आणि धरतीच्या विश्वात आणि दुसऱ्या चीज-वस्तूंमध्ये, ज्या अल्लाहाने निर्माण केल्या आहेत आणि या गोष्टीत की संभवतः त्याचे मरण जवळच येऊन ठेपले असावे, मग त्या (कुरआना) नंतर कोणत्या गोष्टीवर हे लोक ईमान राखतील?

**१८६.** ज्याला सर्वश्रेष्ठ अल्लाह मार्गभ्रष्ट करील त्याला कोणी सन्मार्गावर आणू शकत नाही, आणि अल्लाह अशा लोकांना मार्गभ्रष्टतेत भटकत राहण्यास सोडून देतो.

**१८७.** हे लोक तुम्हाला कयामतविषयी विचारतात की ती केव्हा येईल? तुम्ही सांगा की याचे ज्ञान फक्त माझ्या पालनकर्त्यालाच आहे. तिला तिच्या वेळेवर, अल्लाहखेरीज दुसरा कोणी जाहीर करणार नाही. ती आकाशांची व जमिनीची फार मोठी (घटना)

असेल. ती तुमच्यावर अचानक येऊन कोसळेल. ते तुम्हाला अशा प्रकारे विचारतात, जणू काही तुम्ही तिचा शोध घेऊन बसलात. तुम्ही सांगा, तिचे ज्ञान विशेषरित्या अल्लाहजवळ आहे, परंतु बहुतेक लोक जाणत नाहीत.

**१८८.** तुम्ही सांगा, मी स्वतः आपल्याकरिता एखाद्या फायद्याचा अधिकार राखत नाही, आणि ना एखाद्या नुकसानाचा, परंतु तेवढाच, जेवढा अल्लाहने इच्छिला असेल आणि जर मी अपरोक्ष गोष्टींना जाणणारा राहिलो असतो तर मी पुष्कळ लाभ प्राप्त करून घेतले असते, आणि एखादे नुकसानही मला पोहचले नसते.[१] मी तर केवळ भय दाखविणारा आणि शुभ-समाचार देणारा आहे, त्या लोकांसाठी जे ईमान राखतात.

**१८९.** तो (अल्लाह) असा आहे की ज्याने तुम्हाला फक्त एका जीवापासून निर्माण केले आणि त्याच्याद्वारे त्याची जोडी बनवली, यासाठी की त्याने आपल्या त्या जोडीदारापासून सुख चैन प्राप्त करावी, मग पतीने पत्नीशी जवळीक केली, तेव्हा तिला गर्भ राहिला हलकासा, मग ती त्याला घेऊन चालत फिरत राहिली. जेव्हा तिला भार जाणवू लागला, तेव्हा पती-पत्नी दोघे अल्लाहशी, जो त्यांचा स्वामी आहे, दुआ (प्रार्थना) करू लागले की जर तू आम्हाला सहीसलामत (व्यवस्थित स्वरूपात) संतान प्रदान केली तर आम्ही खूप खूप आभार मानू.

**१९०.** तर जेव्हा अल्लाहने त्या दोघांना यथायोग्य संतान प्रदान केली, तेव्हा अल्लाहने प्रदान केलेल्यात ते दोघे (इतरांना) अल्लाहचा सहभागी ठरवू लागले, यास्तव अल्लाह पवित्र आहे त्याच्या सहभागी ठरविण्यापासून.

**१९१.** काय अशांना अल्लाहचा सहभागी ठरवितात, जे कोणत्याही चीज-वस्तूला निर्माण करू शकत नसावे (किंबहुना) स्वतः त्यांनाच निर्माण केले गेले असावे.

**१९२.** आणि ते त्यांना कसल्याही प्रकारची मदत करू शकत नाही, आणि ते स्वतः आपली मदत करू शकत नाही.

---

(१) ही आयत या गोष्टीस अगदी स्पष्ट करते की पैगंबर मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम ग़ैब (परोक्ष) जाणणारे नाहीत. ग़ैब जाणणारा केवळ अल्लाहच आहे. परंतु जुलूम अत्याचार आणि अज्ञानाची सीमा ही की पवित्र कुरआनात एवढे स्पष्ट निवेदन असतानाही, धर्मात नवनवीन विचार व प्रथा सामील करणारे, पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांना परोक्षज्ञान असल्याचे सिद्ध करण्याचा असफल प्रयत्न करीत राहतात.

**१९३.** आणि जर तुम्ही एखादी गोष्ट सांगण्यासाठी त्यांना पुकाराल तर तुमच्या सांगण्यानुसार चालणार नाहीत. तुमच्या दृष्टीने दोन्ही गोष्टी सारख्या आहेत, मग तुम्ही त्यांना पुकारा किंवा गप्प राहा.

**१९४.** वास्तविक तुम्ही अल्लाहला सोडून ज्यांना पुकारता (ज्यांची उपासना करता) तेदेखील तुमच्यासारखेच अल्लाहचे दास आहेत, तर तुम्ही त्यांना पुकारा, मग त्यांनीही तुमच्या सांगण्यानुसार केले पाहिजे. जर तुम्ही सच्चे असाल.

**१९५.** काय त्यांना पाय आहेत, ज्या आधारे ते चालत असावेत, किंवा त्यांना हात आहेत, ज्याद्वारे एखाद्या वस्तूला धरू शकतील, किंवा त्यांना डोळे आहेत, ज्याद्वारे ते पाहात असावेत, किंवा त्यांना कान आहेत, ज्याद्वारे ते ऐकतात. तुम्ही सांगा, तुम्ही आपल्या सर्व सहभाग्यांना बोलावून घ्या, मग मला (हानी पोहचविण्याची) उपाययोजना करा. मग मला किंचितही सवड देऊ नका.

**१९६.** निःसंशय, माझा मित्र-मदतकर्ता अल्लाहच आहे ज्याने हा ग्रंथ (पवित्र कुरआन) अवतरीत केला आणि तो नेक सदाचारी लोकांची मदत करतो.

**१९७.** आणि तुम्ही ज्या लोकांना अल्लाहला सोडून पुकारता (उपासना करता) ते तुमची काहीच मदत करू शकत नाही, आणि ना ते स्वतः आपली मदत करू शकतात.

**१९८.** आणि जर त्यांना काही सांगण्यासाठी पुकाराल तर ते ऐकू शकणार नाहीत. आणि तुम्ही त्यांना पाहता की ते तुम्हाला पाहत आहेत आणि ते काहीच पाहत नाहीत.

**१९९.** तुम्ही क्षमाशीलतेचा मार्ग पत्करा, सत्कर्मांची शिकवण देत राहा, आणि मूर्ख लोकांपासून अलिप्त राहा.

**२००.** आणि जर तुम्हाला एखादा संशय सैतानाकडून येऊ लागेल तर अल्लाहचे शरण मागत जा. निःसंशय अल्लाह मोठा ऐकणारा आणि खूप जाणणारा आहे.

**२०१.** निःसंशय जे लोक (अल्लाहचे) भय बाळगतात जेव्हा त्यांना एखादा संशय सैतानाकडून उद्‌भवतो, तेव्हा ते अल्लाहच्या स्मरणात मग्न होतात, यास्तव अकस्मात त्यांचे डोळे उघडतात.

**२०२.** आणि जे सैतानांचे अनुयायी आहेत, ते त्यांना संकटात ओढून नेतात. मग ते थांबत नाही.

**२०३.** आणि जेव्हा तुम्ही एखादा मोजिजा (ईश-चमत्कार) त्यांच्यासमोर सादर करत नाही, तेव्हा ते लोक म्हणतात की तुम्ही हा चमत्कार का आणला नाही. तुम्ही सांगा की मी त्याचे अनुसरण करतो जो माझ्याकडे माझ्या पालनकर्त्यातर्फे आदेश पाठविला गेला आहे. हे मान्य करा. हे तुमच्या पालनकर्त्यातर्फे अनेक प्रमाणे आहेत आणि मार्गदर्शन व दया कृपा आहे त्या लोकांकरिता, जे ईमान राखतात.

**२०४.** आणि जेव्हा कुरआन पठण होत असेल तेव्हा ते लक्षपूर्वक ऐका, आणि शांत राहा आशा आहे की तुमच्यावर दया होईल.

**२०५.** आणि (हे मानव!) आपल्या मनात नम्रता आणि भय राखून आपल्या पालनकर्त्याचे स्मरण करीत राहा. सकाळ-संध्याकाळ स्वर सौम्य ठेवून आणि गाफील लोकांपैकी होऊ नको.

**२०६.** नि:संशय, जे लोक तुझ्या पालनकर्त्याशी निकट आहेत ते त्याच्या उपासनेपासून घमेंड करीत नाही आणि त्याची पवित्रता वर्णन करीत त्याच्या पुढे सजदा करतात (माथा टेकतात).

—-

# सूरह अन्फाल-८

सूरह अन्फाल मदीना येथे अवतरली आणि यात पंच्याहत्तर आयती आणि दहा रुकूउ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** हे लोक तुम्हाला प्राप्त झालेल्या धन-संपत्तीविषयी विचारतात, तुम्ही सांगा की युद्धात प्राप्त झालेली धन-संपत्ती अल्लाहची आहे, आणि पैगंबराची आहे. यास्तव तुम्ही अल्लाहचे भय राखा आणि आपले आपसातील नातेसंबंध सुधारून घ्या आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या आदेशाचे पालन करा, जर तुम्ही ईमान राखणारे असाल.

**२.** ईमान राखणारेच असे असतात की जेव्हा अल्लाहचे वर्णन केले जाते, तेव्हा त्यांची हृदये भयभीत होतात, आणि जेव्हा अल्लाहच्या आयती त्यांना वाचून ऐकविल्या जातात

तर त्या आयती त्यांच्या ईमानास वृद्धिंगत करतात आणि ते लोक आपल्या पालनकर्त्यावर भरोसा ठेवतात.

**३.** जे नमाज नियमितपणे पढतात आणि आम्ही जे काही त्यांना दिले आहे, त्यातून खर्च करतात.

**४.** सच्चे ईमान राखणारे हेच लोक आहेत. त्यांच्याकरिता मोठे दर्जे आहेत त्यांच्या पालनकर्त्याजवळ आणि क्षमा आणि मान सन्मानपूर्ण रोजी (आजीविका) आहे.

**५.** जसे की तुमच्या पालनकर्त्याने तुमच्या घरापासून सत्यासह तुम्हाला बाहेर काढले आणि ईमानधारकांच्या एका गटाला हे असह्य वाटत होते.

**६.** स्पष्ट कळून आल्यानंतर ते सत्याविषयी तुमच्याशी वाद घालत होते जणू काही ते मृत्युकडे हांकले जात असावेत आणि (त्याला) पाहत असावेत.

**७.** आणि तुम्ही लोक त्या वेळेची आठवण करा, जेव्हा अल्लाह तुमच्याशी त्या दोन गटांपैकी एकाचा वायदा करीत होता की जो तुमच्या हाती लागेल आणि तुम्ही या आशेवर होते की शस्त्रे नसलेला गट तुमच्या हाती लागावा आणि सर्वश्रेष्ठ अल्लाहला मान्य होते की आपल्या हुकूमाने सत्याचे सत्य असणे सिद्ध करून द्यावे आणि त्या इन्कारी लोकांच्या मुळावर घाव घालावा.

**८.** यासाठी की सत्याचे सत्य असणे आणि असत्याचे असत्य असणे सिद्ध करावे, मग या अपराधी लोकांना अप्रिय का वाटेना.

**९.** त्या वेळेची आठवण करा, जेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्यास दुआ (प्रार्थना) करीत होते, मग सर्वश्रेष्ठ अल्लाहने तुमची दुआ कबूल केली की मी तुमची एक हजार फरिश्त्यांद्वारे मदत करीन जे लागोपाठ येत जातील.

**१०.** आणि अल्लाहनेही मदत केवळ या कारणास्तव केली की शुभ समाचार ठरावा आणि तुमच्या हृदयांना शांती समाधान लाभावे आणि विजय फक्त अल्लाहतर्फे आहे. नि:संशय अल्लाह अतिशय शक्तिशाली आणि हिकमत बाळगणारा आहे.

**११.** त्या वेळेची आठवण करा जेव्हा (अल्लाह) तुमच्यावर झोपेची गुंगी चढवित होता, आपल्याकडून शांती समाधान प्रदान करण्यासाठी आणि तुमच्यावर आकाशातून पर्जन्यवृष्टी करीत होता की या पाण्याद्वारे तुम्हाला पाक (स्वच्छ-शुद्ध) करावे आणि

तुमच्यापासून सैतानी शंका-कुशंका दूर कराव्यात आणि तुमच्या हृदयांना मजबूत करावे आणि तुमचे पाय चांगले स्थिर करावेत.

**१२.** त्या वेळेची आठवण करा, जेव्हा तुमचा पालनकर्ता फरिश्त्यांना आदेश देत होता की मी तुमच्या सोबतीला आहे, यास्तव तुम्ही ईमानधारकांचे साहस वाढवा. मी आताच काफिरांच्या मनात भय टाकतो. यास्तव तुम्ही मानांवर घाव घाला आणि त्यांच्या एक एक सांध्यावर प्रहार करा.

**१३.** ही या गोष्टीची शिक्षा आहे की त्यांनी अल्लाहचा आणि त्याच्या पैगंबराचा विरोध केला आणि जे लोक अल्लाहचा आणि त्याच्या पैगंबराचा विरोध करतात, तर सर्वश्रेष्ठ अल्लाह सक्त सजा देणारा आहे.

**१४.** तेव्हा या शिक्षेची गोडी चाखा आणि लक्षात ठेवा की काफिरांकरिता (इन्कारी लोकांकरिता) आगीची शिक्षा-यातना ठरलेलीच आहे.

**१५.** हे ईमान राखणाऱ्यांनो! जेव्हा तुम्ही काफिरांशी लढण्यास भिडाल, तेव्हा त्यांच्याकडून पाठ फिरवू नका.

**१६.** आणि जो मनुष्य त्याप्रसंगी त्यांच्याकडून पाठ फिरविल, परंतु जर कोणी लढण्याचा पवित्रा बदलत असेल किंवा जो आपल्या समूहाकडे आश्रय घेण्यासाठी येत असेल (तर गोष्ट वेगळी) मात्र जो दुसरा असे करील तर तो अल्लाहचा प्रकोप ओढवून घेईल आणि त्याचे ठिकाण जहन्नम असेल, आणि ते अतिशय वाईट ठिकाण आहे.

**१७.** तेव्हा तुम्ही त्यांना ठार मारले नाही, किंबहुना अल्लाहने त्यांना ठार केले आणि तुम्ही (मूठभर धूळ) नाही फेकली, परंतु अल्लाहने फेकली, आणि यासाठी की ईमानधारकांना आपल्यातर्फे, त्यांच्या प्रयत्नाचा फार मोठा मोबदला प्रदान करावा. निःसंशय सर्वश्रेष्ठ अल्लाह खूप ऐकणारा, खूप जाणणारा आहे.

**१८.** (एक गोष्ट तर) ही झाली (दुसरी गोष्ट अशी) की सर्वश्रेष्ठ अल्लाहला काफिरांचे कट कारस्थान असफल करायचे होते.

**१९.** जर तुम्ही लोक निर्णय इच्छित असाल तर तो निर्णय तुमच्यासमोर आहे, आणि जर थांबाल तर हे तुमच्यासाठी फार उत्तम आहे आणि जर तुम्हीदेखील तेच काम

कराल तर आम्हीदेखील तेच काम करू, मग तुमचा समुदाय तुमच्या काहीच उपयोगी पडणार नाही, मग संख्येने कितीही मोठा असो. खरी गोष्ट ही आहे की सर्वश्रेष्ठ अल्लाह ईमान राखणाऱ्यांच्या सोबत आहे.

**२०.** हे ईमान राखणाऱ्यांनो! अल्लाहचे आणि त्याच्या पैगंबराचे फर्मान माना आणि त्या (फर्मानाला कबूल करण्या) पासून तोंड फिरवू नका, ऐकून आणि जाणून घेतानाही.

**२१.** आणि तुम्ही त्या लोकांसारखे होऊ नका, जे दावा तर करतात की आम्ही ऐकले, वास्तविक त्यांनी काहीच ऐकले नाही.

**२२.** निःसंशय समस्त प्राणीमात्रात अल्लाहच्या जवळ अतिशय वाईट ते लोक आहेत, जे बहीरे आहेत, मुके आहेत, जे किंचितही समजून घेत नाहीत.

**२३.** आणि जर अल्लाहला त्यांच्यात काही चांगुलपणा आढळला असता तर त्यांना श्रवणशक्ती प्रदान केली असती आणि जर त्यांना आता ऐकवीलही तरी ते तोंड फिरवतील दुर्लक्ष करीत.

**२४.** हे ईमान राखणाऱ्यांनो! तुम्ही अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या आदेशांचे अनुसरण करा, जेव्हा पैगंबर तुम्हाला तुमच्या जीवनदायी विषयाकडे बोलावित असतील आणि स्मरण राखा की अल्लाह मानवाच्या आणि त्याच्या हृदयाच्या दरम्यान आड बनतो आणि निःसंशय तुम्हाला अल्लाहच्याच जवळ एकत्र व्हायचे आहे.

**२५.** आणि तुम्ही अशा संकटापासून स्वतःला वाचवा, जे विशेषतः अशाच लोकांवर कोसळणार नाही जे तुमच्यापैकी त्या अपराधआंचे दोषी आहेत आणि हे जाणून असा की सर्वश्रेष्ठ अल्लाह मोठा सक्त शिक्षा देणारा आहे.

**२६.** आणि त्या अवस्थेचे स्मरण करा, जेव्हा तुम्ही धरतीवर थोडे होते कमजोर दुबळे मानले जात होते. या भयाने राहत होते की लोकांनी कदाचित तुम्हाला लुटून न घ्यावे, तेव्हा अल्लाहने तुम्हाला राहायला जागा दिली आणि तुम्हाला आपल्या मदतीने सामर्थ्य प्रदान केले, आणि तुम्हाला स्वच्छ शुद्ध अन्न-सामुग्री प्रदान केली, यासाठी की तुम्ही कृतज्ञता व्यक्त करावी.

**२७.** हे ईमान राखणाऱ्यांनो! तुम्ही अल्लाह आणि पैगंबराचा हक्क मारू नका आणि आपल्या सुरक्षित चीज-वस्तूंमध्ये विश्वासघात करू नका आणि तुम्ही चांगले जाणता.

**२८.** आणि तुम्ही ही गोष्ट जाणून असा की तुमचे धन आणि तुमची संतती एक कसोटी म्हणून आहे.[१] (आणि हेही जाणून असा की) सर्वश्रेष्ठ अल्लाहच्या जवळ फार मोठा मोबदला आहे.

**२९.** हे ईमान राखणाऱ्यांनो! जर तुम्ही अल्लाहचे भय बाळगत राहाल, तर अल्लाह तुम्हाला एक निर्णयाची गोष्ट प्रदान करील आणि तुमच्यापासून तुमचे अपराध दूर करील, आणि तुम्हाला माफ करील आणि अल्लाह मोठा कृपाशील आहे.

**३०.** आणि त्या घटनेचाही उल्लेख करा, जेव्हा काफिर (इन्कारी) लोक तुमच्याविषयी कट-कारस्थान रचत होते की तुम्हाला कैदी बनवून घ्यावे किंवा तुम्हाला ठार करावे किंवा तुम्हाला देशाबाहेर घालवावे आणि ते आपला कट रचत होते आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह आपली योजना आखत होता आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह सर्वांत उत्तम योजना बनविणारा आहे.

**३१.** आणि जेव्हा त्यांच्यासमोर आमच्या आयती वाचून ऐकविल्या जातात तेव्हा म्हणतात की आम्ही ऐकले, जर आम्ही इच्छिले तर आम्हीदेखील याच्यासारखेच सांगून दाखवू. हे तर काहीच नाही फक्त पूर्वजांच्या पुरावा नसलेल्या गोष्टी आहेत.

**३२.** आणि जेव्हा ते लोक म्हणाले, हे अल्लाह! जर हा कुरआन खरोखरच तुझ्यातर्फे आहे तर आमच्यावर आकाशातून दगडांचा वर्षाव कर किंवा आमच्यावर एखादा दु:खदायक अज़ाब उतरव.

**३३.** आणि अल्लाह असे नाही करणार की त्यांच्यात तुम्ही असताना त्यांना शिक्षा-यातना देईल, आणि अल्लाह त्यांना शिक्षा देणार नाही, या अवस्थेत की ते क्षमा-याचनाही करीत असावेत.

**३४.** आणि त्यांच्यात असे काय आहे की, अल्लाहने त्यांना शिक्षा न द्यावी? असे

---

(१) संपत्ती आणि संततीचे प्रेम माणसाला सर्वसामान्यत: विश्वासघात करण्यास व अल्लाह आणि पैगंबर मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांचे आदेश तोडण्यास विवश करते, यास्तव यांना कसोटी म्हटले गेले आहे. अर्थात यांच्याद्वआरे माणसाची परीक्षा घेतली जाते की ते प्रेम राखत असताना अल्लाह आणि पैगंबरांचे आज्ञापालन पूर्णत: करतो किंवा नाही? जर करत असेल तर या कसोटीत खरा उतरला अन्यथा असफल ठरला. अशा स्थितीतही धन-संपत्ती आणि संतती त्याच्याकरिता अल्लाहचा प्रकोप भोगण्याचे कारण बनतील.

असतानाही की ते लोकांना मसजिदे हराम (काबागृहा) पासून रोखतात, वास्तविक ते या मस्जिदीची देखभाल करणारे नाहीत. तिचे संरक्षक अल्लाहच्या आज्ञाधारक दासांखेरीज कोणीही नाही, परंतु त्यांच्यातले अधिकांश लोक हे जाणत नाहीत.

**३५.** आणि त्यांची नमाज काबागृहाजवळ फक्त हीच होती, शिट्या वाजविणे, टाळ्या वाजविणे. तेव्हा आपल्या इन्कारापायी या शिक्षा-यातनेचा स्वाद चाखा.

**३६.** निःसंशय हे इन्कारी लोक आपले धन अशासाठी खर्च करीत आहेत की अल्लाहच्या मार्गापासून रोखावे तर हे लोक आपले धन असेच खर्च करत राहतील, मग ते धन त्यांच्यासाठी पश्चात्तापाचे कारण ठरेल, मग पराभूत होतील आणि काफिरांना जहन्नमकडे एकत्र केले जाईल.

**३७.** यासाठी की अल्लाहने नापाक (अस्वच्छ-अशुद्ध) लोकांना पाक (स्वच्छ शुद्ध) लोकांपासून वेगळे करावे आणि नापाक लोकांची एकमेकांशी भेट करून द्यावी, मग त्या सर्वांना एकत्र करावे, मग त्या सर्वांना जहन्नममध्ये टाकावे. असे लोक पूर्णतः तोट्यात आहेत.

**३८.** तुम्ही इन्कारी लोकांना सांगा की जर हे लोक (अशी हरकत) थांबवतील तर यांचे सर्व अपराध, जे पूर्वी केले आहेत, माफ केले जातील, आणि जर आपली तीच रीत कायम राखतील तर पूर्वीच्या (काफिरांसाठी) नियम लागू झालेलाच आहे.

**३९.** आणि तुम्ही त्यांच्याशी त्या वेळेपर्यंत संघर्ष करीत राहा की त्यांच्या श्रद्धेत बिघाड शिल्लक न राहावा आणि धर्म अल्लाहचाच व्हावा. मग जर हे (हरकती) थांबवतील तर अल्लाह त्यांच्या कर्मांना चांगल्या प्रकारे पाहतो.

**४०.** आणि जर तोंड फिरवतील तर विश्वास ठेवा की सर्वश्रेष्ठ अल्लाह तुमचा मित्र आहे. तो अतिशय चांगला मित्र आणि चांगला मदत करणारा आहे.

**४१.** आणि जाणून घ्या की, युद्धात हस्तगत केलेला कोणत्याही प्रकारचा माल (धन-संपदा) तुम्ही प्राप्त कराल तर त्याचा पाचवा हिस्सा तर अल्लाह आणि रसूल आणि नातेवाईक आणि अनाथ आणि गोरगरीब, आणि प्रवाशांकरिता आहे. जर तुम्ही

अल्लाहवर ईमान राखले आहे आणि त्यावर जे आम्ही आपल्या दासावर त्या दिवशी अवतरित केले, जो सत्य आणि असत्याच्या दरम्यान अलगावाचा होता, ज्या दिवशी दोन्ही सैन्ये आपसात भिडली होती आणि अल्लाह प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्य बाळगणारा आहे. [१]

**४२.** जेव्हा तुम्ही जवळच्या किनाऱ्यावर आणि ते दूरच्या किनाऱ्यावर होते आणि काफिला तुमच्यापासून (फार) खाली होता, जर तुम्ही आपसात वायदा केला असता तर ठरलेल्या वेळेवर पोहोचण्यात मतभेद केला असता, तथापि अल्लाहला एक काम करूनच टाकायचे होते, जे ठरले गेले होते, यासाठी की, जो नष्ट होईल, तो प्रमाणावर (अर्थात ठरलेले जाणून) नष्ट व्हावा आणि जो जिवंत राहील, तोदेखील प्रमाणावर (सत्य ओळखून) जिवंत राहावा, आणि अल्लाह चांगल्या प्रकारे ऐकणारा, जाणणारा आहे.

**४३.** जेव्हा तुम्हाला तुमच्या स्वप्नात अल्लाहने त्यांची संख्या कमी दाखवली. जर त्यांना जास्त दाखविले असते तर तुम्ही भ्याड बनले असते आणि याबाबत आपसात मतभेद करू लागले असते, परंतु अल्लाहने (यापासून) वाचविले. निःसंशय अल्लाह छातीतल्या (मनात लपलेल्या) गोष्टीही जाणणारा आहे.

**४४.** आणि जेव्हा त्याने भेट होतेवेळी त्यांना तुमच्या नजरेत फार कमी (संख्येने) दाखविले आणि तुम्हाला त्यांच्या नजरेत कमी दाखविले अशासाठी की अल्लाहने ते कार्य तडीस न्यावे, जे करायचेच होते आणि सर्व कार्ये अल्लाहकडेच वळविली जातात.

**४५.** हे ईमान राखणाऱ्यांनो! जेव्हा तुम्ही एखाद्या (शत्रू) सैन्याशी भिडाल, तेव्हा अटळ राहा आणि अल्लाहचे जास्तीत जास्त स्मरण करा, यासाठी की तुम्हाला सफलता प्राप्त व्हावी.

**४६.** आणि अल्लाहचे आणि त्याच्या रसूल (पैगंबर) चे आज्ञापालन करीत राहा,

(१) अल्लाहने पैगंबर मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांना स्वप्नात अनेकेश्वरवाद्यांची संख्या कमी दाखवली. तीच संख्या पैगंबरांनी आपल्या निकटस्थ अनुयायींना सांगितली, ज्यामुळे त्यांची हिंमत वाढली, जर या उलट काफिरांची संख्या जास्त दाखवली गेली असती तर सहाबांच्या मनात भय निर्माण झाले असते(हीम्मत कमि झाली असती)आणि आपसात मतभेद निर्माण झाले असते. परंतु अल्लाहने असे होण्यापासून ईमानधारकांना वाचविले.

आपसात मतभेद ठेवू नका, अन्यथा भ्याड व भित्रे व्हाल, आणि तुमचा पाया डळमळीत होईल आणि तुमचा जोम नाहीसा होईल आणि धैर्य-संयम व विश्वास राखा. निःसंशय अल्लाह धीर-संयम राखणाऱ्यांच्या पाठीशी आहे.

**४७.** आणि त्या लोकांसारखे होऊ नका, जे मोठी घमेंड दाखवित आणि लोकांमध्ये अभिमान व अहंकार करीत आपल्या घरापासून चालले होते आणि अल्लाहच्या मार्गापासून रोखत होते. जे काही ते करीत आहेत अल्लाह त्यास घेरून टाकणारा आहे.

**४८.** आणि जेव्हा त्यांच्या कर्मांना सैतान त्यांना सुशोभित करून दाखवित होता आणि सांगत होता की माणसांपैकी कोणीही आज तुमच्यावर वर्चस्वशाली होऊ शकत नाही. मी स्वतः तुमचा समर्थक आहे, परंतु जेव्हा दोन्ही गट जाहीर झाले, तेव्हा आपल्या उलटपावली फिराला आणि म्हणू लागला की मी तर तुमच्यापासून वेगळा आहे, विभक्त आहे. मी ते काही पाहत आहे जे तुम्ही पाहत नाही. मी अल्लाहचे भय बाळगतो आणि अल्लाह मोठा सक्त अज़ाब देणारा आहे.

**४९.** जेव्हा मुनाफिक (ढोंगी) लोक म्हणत होते आणि तेदेखील, ज्यांच्या मनात रोग होता की त्यांना तर त्यांच्या धर्माने धोक्यात टाकले आहे. आणि जो मनुष्यदेखील अल्लाहवर भरोसा करील तर सर्वश्रेष्ठ अल्लाह निश्चितच मोठा जबरदस्त आणि हिकमतशाली आहे.

**५०.** आणि तुम्ही जर ते दृश्य पाहिले असते जेव्हा फरिश्ते काफिरांचे (ईमान न राखणाऱ्यांचे) प्राण काढतात, त्यांच्या तोंडावर आणि कमरेवर मारतात (आणि म्हणतात) तुम्ही जळण्याच्या शिक्षेची गोडी चाखा.

**५१.** हे त्या कर्मांमुळे, जी तुमच्या हातांनी पूर्वीच पाठवून ठेवलीत. निःसंशय सर्वश्रेष्ठ अल्लाह आपल्या दासांवर किंचितही जुलूम- अत्याचार करीत नाही.

**५२.** फिरऔनच्या अनुयायींच्या अवस्थेसारखे आणि त्यांच्या बुजूर्ग लोकांच्या की त्यांनी अल्लाहच्या आयतींवर विश्वास ठेवला नाही, तेव्हा अल्लाहने त्यांच्या अपराधांपायी त्यांना धरले. निःसंशय अल्लाह मोठा जबरदस्त आणि त्याची शिक्षा मोठी सक्त आहे.

**५३.** हे अशासाठी की सर्वश्रेष्ठ अल्लाह असा नाही की एखाद्या जनसमूहावर एखादी

कृपा देणगी (नेमत) प्रदान करून पुन्हा बदलून टाकील, जोपर्यंत तो स्वतः आपल्या त्या अवस्थेला बदलून टाकत नाही, जी त्यांची स्वतःची होती[1] आणि हे की सर्वश्रेष्ठ अल्लाह ऐकणारा जाणणारा आहे.

**५४.** फिरऔनचे लोक आणि त्याच्या पूर्वीच्या लोकांप्रमाणे की त्यांनी आपल्या पालनकर्त्याच्या गोष्टींना खोटे ठरविले, तेव्हा आम्ही त्याच्या अपराधांपायी त्यांना बरबाद करून टाकले आणि फिरऔनवाल्यांना बुडवून टाकले आणि हे सर्व अत्याचारी होते.

**५५.** समस्त सजीवांमध्ये सर्वाधिक वाईट अल्लाहच्या जवळ ते लोक आहेत जे कुफ्र (इन्कार) करतात, मग ते ईमान राखत नाहीत.

**५६.** ज्यांच्याकडून तुम्ही वचन घेतले, तरीही ते दरवेळेस आपल्या वचनाचा भंग करतात आणि कधीही अल्लाहचे भय राखून वागत नाही.

**५७.** यास्तव जेव्हा तुम्ही त्याच्यावर युद्धात वर्चस्वशाली ठराल, तेव्हा त्यांना असा जबरदस्त मार द्या की त्यांच्या मागे असलेल्यांनीही पळ काढावा. कदाचित त्यांनी बोध ग्रहण करावा.

**५८.** आणि जर तुम्हाला एखाद्या जनसमूहाकडून धोका किंवा दगाबाजी केली जाण्याचे भय असेल तर समानतेच्या स्थितीत त्यांचा समझोता तोडून टाका. अल्लाह विश्वासघात (अपहार) करणाऱ्यांशी प्रेम राखत नाही.

**५९.** आणि इन्कारी लोकांनी हा विचार करू नये की ते पळ काढतील. यात शंका नाही की ते लाचार व अगतिक करू शकत नाही.

**६०.** आणि तुम्ही त्यांच्याशी लढण्याकरिता आपल्या क्षमतेनुसार सामर्थ्य तयार करा आणि घोडे तयार ठेवण्याचेही की त्याद्वारे तुम्ही अल्लाहच्या शत्रूंना आणि आपल्या शत्रूंना भयभीत करू शकावे, आणि त्यांच्याखेरीज इतरांनाही, ज्यांना तुम्ही जाणत नाहीत, अल्लाह त्यांना चांगल्या प्रकारे जाणतो आणि जे काही अल्लाहच्या मार्गात खर्च

---

(१) अर्थात हे की जोपर्यंत एखादा जनसमूह अल्लाहशी कृतज्ञशीलतेचा मार्ग अंगिकारून आणि अल्लाहने सांगितलेल्या अनुचित गोष्टींचा अव्हेर करून आपली अवस्था व आचरण बदलत नाही, तोपर्यंत अल्लाह त्यांच्यावर आपल्या कृपा देणग्यांचे द्वार उघडे ठेवतो . दुसऱ्या शब्दात सांगायचे तर सर्वश्रेष्ठ अल्लाह दृष्कृत्यां मुळे आपल्या कृपा देणग्या संमपुष्टात आणतो, आणि सर्वश्रेष्ठ अल्लाहच्या दया कृपेस पात्र होण्यासाठी दुष्कृत्यांपासून अलिप्त राहणे अत्यावश्यक आहे.

कराल ते तुम्हाला पुरेपूर दिले जाईल आणि तुमच्या हक्काचे नुकसान केले जाणार नाही.

**६१.** आणि जर ते समझोत्याकडे झुकतील, तर तुम्हीही समझोत्याकडे झुका आणि अल्लाहवर भरोसा ठेवा. निःसंशय अल्लाह ऐकणारा जाणणारा आहे.

**६२.** आणि जर ते तुमच्याशी धोकेबाजी करू इच्छितील तर अल्लाह तुमच्यासाठी पुरेसा आहे. त्यानेच आपल्या मदतीद्वारे आणि ईमानधारकांद्वारे तुम्हाला समर्थन दिले आहे.

**६३.** आणि त्यांच्या मनात एकमेकांचे प्रेमही त्यानेच निर्माण केले आहे. जर तुम्ही धरतीच्या समस्त चीज-वस्तू खर्च केल्या असत्या, तरीही त्याच्या मनात प्रेम-भावना निर्माण करू शकत नव्हते, परंतु अल्लाहनेच त्यांच्या मनात प्रेम टाकले. निःसंशय तो वर्चस्वशाली हिकमत बाळगणारा आहे.

**६४.** हे पैगंबर! तुमच्यासाठी आणि तुमचे अनुसरण करणाऱ्या ईमानधारकांसाठी अल्लाह पुरेसा आहे.

**६५.** हे पैगंबर! ईमानधारकांना जिहाद (धर्मयुद्धा) साठी प्रोत्साहित करा. जर तुमच्यापैकी वीस धैर्यशालीही असतील तर ते दोनशे जणांवर वर्चस्वशाली राहतील आणि जर तुमच्यापैकी शंभर असतील तर एक हजार ईमान न राखणाऱ्यांवर वर्चस्वशाली राहतील. या कारणाने की ते नासमज लोक आहेत.

**६६.** आता अल्लाह तुमचे ओझे हलके करतो. तो चांगल्या प्रकारे जाणतो की तुमच्या दुर्बलता आहे, तेव्हा जर तुमच्यापैकी शंभर धैर्यशील असतील तर ते दोनशे जणांवर वर्चस्वशाली राहतील. आणि जर तुमच्यापैकी एक हजार असतील तर ते अल्लाहच्या हुकुमाने दोन हजार (शत्रूंवर) वर्चस्वशाली असतील आणि अल्लाह धैय-संयम राखणाऱ्या लोकांच्या सोबत आहे.

**६७.** पैगंबरांच्या हाती कैदी असायला नको, जोपर्यंत देशात हिंसक युद्ध न व्हावे. तुम्ही तर या जगाचे धन इच्छिता आणि अल्लाहचा इरादा आखिरतचा आहे आणि अल्लाह वर्चस्वशाली, हिकमत बाळगणारा आहे.

**६८.** जर पूर्वीपासूनच अल्लाहतर्फे हे लिखित नसते तर जे काही तुम्ही घेतले आहे,

त्याच्याविषयी तुम्हाला एखादी सक्त शिक्षा झाली असती.

**६९.** आणि जे हलाल आणि स्वच्छ शुद्ध धन युद्धाद्वारे प्राप्त करून घ्याल ते खा आणि अल्लाहचे भय बाळगून राहा. निःसंशय सर्वश्रेष्ठ अल्लाह मोठा माफ करणारा आणि दया करणारा आहे.

**७०.** हे पैगंबर! आपल्या हाताखालच्या कैद्यांना सांगा की जर सर्वश्रेष्ठ अल्लाह तुमच्या मनात नेक इरादा पाहील तर जे काही तुमच्याडून घेतले गेले आहे, त्याहून चांगले तुम्हाला प्रदान करील आणि अल्लाह माफ करणारा, दया करणारा आहे.

**७१.** आणि जर ते तुमच्याशी विश्वासघात करण्याचा इरादा करतील, तर यांनी याच्यापूर्वी खुद्द अल्लाहशी विश्वासघात केलेला आहे. शेवटी त्याने त्यांना कैद करविले आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह सर्वज्ञ, हिकमतशाही आहे.

**७२.** निःसंशय, ज्या लोकांनी ईमान राखले आणि अल्लाहसाठी देशत्याग केला अर्थात हिजरत केली आणि जिहाद केले धनाने व मनाने अल्लाहच्या मार्गात, आणि ज्यांनी अशा लोकांना आश्रय दिला, आणि त्यांना मदत केली तर ते एकमेकांचे आपसात मित्र आहेत आणि ज्यांनी ईमान राखले, पण देशत्याग केला नाही तर तुमच्याशी त्यांची किंचितही मैत्री नाही, परंतु जर ते धर्माच्या बाबतीत तुमच्याकडे मदत मागतील तर त्यांना मदत करणे तुमच्यासाठी आवश्यक आहे, मात्र त्या लोकांखेरीज, की तुमच्या व त्यांच्या दरम्यान प्रतिज्ञा करार झाला आहे आणि जे काही तुम्ही करीत आहात, अल्लाह ते चांगल्या प्रकारे पाहत आहे.

**७३.** आणि काफिर (ईमान न राखणारे) एकमेकांचे मित्र आहेत, जर तुम्ही असे केले नाही तर देशात उपद्रव पसरेल आणि मोठा उत्पात निर्माण होईल.

**७४.** ज्या लोकांनी ईमान राखले आणि देशत्याग केला आणि अल्लाहच्या मार्गात जिहाद केले आणि ज्यांनी अशा लोकांना आश्रय दिला, आणि मदत पोहचविली तर हेच लोक सच्चे ईमानधारक आहेत, त्यांच्यासाठी क्षमा आणि मान-सन्मानपूर्ण रोजी (आजीविका) आहे.

**७५.** आणि ज्या लोकांनी यानंतर ईमान राखले आणि देशत्याग केला आणि तुमच्या सोबतीने जिहाद केला तर असे लोकही तुमच्यापैकीच आहेत आणि नातेवाईक

त्यांच्यापैकी आपसात एकमेकांच्या जास्त निकट आहेत, अल्लाहच्या आदेशान्वये. नि:संशय अल्लाह सर्व काही जाणणारा आहे.

-----

# सूरह तौबा-९

सूरह तौबा मदीना येथे अवतरली आणि यात एकशे एकोणतीस आयती आणि सोळा रुकूअ आहेत.

**१.** ही अल्लाह आणि त्याच्या पैगंबरातर्फे वचनमुक्तीची घोषणा आहे त्या अनेकेश्वरवाद्यांबाबत, ज्यांच्याशी तुम्ही वचन करार केला आहे.

**२.** तेव्हा (हे अनेकेश्वरवाद्यांनो!) तुम्ही देशात चार महिने प्रवास करून घ्या आणि जाणून घ्या की तुम्ही अल्लाहला विवश करू शकत नाही आणि अल्लाह इन्कारी लोकांना अपमानित करणार आहे.

**३.** अल्लाह आणि त्याच्या पैगंबरातर्फे हज अकबर (मोठ्या हज) च्या दिवशी[1] साफ ऐलान आहे की अल्लाह अनेकेश्वरवाद्यांपासून विभक्त आहेत आणि त्याचा पैगंबरदेखील. जर अत्ताही तुम्ही तौबा (क्षमा-याचना) कराल तर तुमच्यासाठी अधिक चांगले आहे आणि जर तुम्ही तोंड फिरवाल, तर जाणून असा की तुम्ही अल्लाहला अगतिक करू शकत नाही आणि काफिरांना सक्त शिक्षेची खबर द्या.

**४.** परंतु असे अनेकेश्वरवादी, ज्यांच्याशी तुम्ही वचन करार केलेला आहे आणि त्यांनी तुम्हाला किंचितही नुकसान पोहचविले नाही, आणि तुमच्या विरोधात कोणाची मदत केली नाही, तर तुम्हीदेखील कराराचा अवधी त्यांच्यासह पूर्ण करा. नि:संशय अल्लाह

(१) सहीहैन (बुखारी व मुस्लिम) आणि अन्य सहीह-ग्रंथाद्वारे सिद्ध आहे की हज अकबरच्या दिवसापासून अर्थात १० जिलहिज्जाचा दिवस आहे (तिर्मिजी नं. ९५७, बुखारी नं. ४६५५, मुस्लिम नं. ९८२) त्याच दिवशी मिना या ठिकाणी मुक्तीची घोषणा केली गेली. १० जिलहिज्जाला हज अकबर अशासाठी म्हटले जाते की या दिवशी हजला सर्वांत जास्त आणि खास धार्मिक पद्धतीने पार पाडले जाते. सर्वसामान्य लोक उमराला हज असगर म्हणत, यास्तव उमरापेक्षा चांगले करण्यासाठी हजला मोठे हज म्हटले गेले. लोकांमध्ये जे प्रचलित आहे की हज जुमा (शुक्रवार) च्या दिवशी आल्यास हज अकबर आहे अगदी निराधार आहे.

भय राखून वागणाऱ्यांशी प्रेम करतो.

**५.** मग आदरणीय महिने संपताच अनेकेश्वरवाद्यांना, आढळतील तिथे ठार करा, त्यांना कैदी बनवा, त्यांना घेरा टाका आणि प्रत्येक घाताच्या ठिकाणी त्यांच्यावर टपून बसा परंतु जर ते तौबा (क्षमा याचना) करून घेतील आणि नित्यनेमाने नमाज पढू लागतील आणि जकात अदा करू लागतील तर तुम्ही त्यांचा मार्ग सोडून द्या. निःसंशय, सर्वश्रेष्ठ अल्लाह माफ करणारा, दया करणारा आहे.

**६.** जर अनेकेश्वरवाद्यांपैकी कोणी तुमच्या जवळ आश्रय मागेल तर तुम्ही त्याला आश्रय द्या, येथपर्यंत की त्याने अल्लाहची वाणी ऐकून घ्यावी, मग त्याला त्याच्या शांती-स्थळापर्यंत पोहचवा. हे अशासाठी की ते लोक अजाण आहेत.

**७.** अनेकेश्वरवाद्यांचा वायदा अल्लाह आणि त्याच्या पैगंबराशी कसा काय राहू शकतो, त्यांच्याखेरीज, ज्यांच्याशी तुम्ही मसजिदे हरामजवळ वचन करार केला आहे, तर जोपर्यंत ते लोक तुमच्याशी करार-पालन करतील, तुम्हीही त्यांच्याशी केलेल्या वायद्यावर कायम राहा. सर्वश्रेष्ठ अल्लाह, भय राखून वागणाऱ्या लोकांशी प्रेम राखतो.

**८.** त्यांच्या वचन-वायद्यांचा काय भरोसा? त्यांना जर तुमच्यावर वर्चस्व लाभले तर ते ना नातेसंबंधाचा विचार करतील, ना वचन-कराराचा. आपल्या मुखाने हे तुम्हाला रिझवित आहेत, परंतु यांची मने मानत नाहीत आणि त्यांच्यात अधिकांश लोक फासिक (दुराचारी) आहेत.

**९.** त्यांनी अल्लाहच्या आयतींना फार कमी किमतीत विकले, आणि त्याच्या मार्गापासून रोखले. मोठे वाईट आहे, जे हे करीत आहेत.

**१०.** हे तर एखाद्या ईमानधारकाच्या हक्कात कसल्याही नात्याची किंवा वचनाची काळजी करीत नाही. हे आहेतच हद्द ओलांडून जाणारे.

**११.** अजूनही जर ते तौबा (पश्चात्तापयुक्त क्षमा याचना) करतील आणि नमाज नियमितपणे पढू लागतील आणि जकात देत राहतील तर तुमचे धर्म-बांधव आहेत आणि आम्ही तर समंजस लोकांसाठी आपल्या आयतींचे तपशीलपूर्वक निवेदन करीत आहोत.

**१२.** जर हे लोक वचन-वायद्यानंतरही आपल्या वचनाचा भंग करतील आणि तुमच्या धर्माची निंदा-नालस्तीही करतील तर तुम्हीही अशा काफिरांच्या सरदारांशी भिडा.

त्यांची शपथ काहीच नाही. संभवतः अशा प्रकारे ते (असे करणे) थांबवतील.

**१३.** तुम्ही त्या लोकांची डोकी ठेचण्यासाठी का तयार होत नाही, ज्यांनी आपल्या शपथा तोडून टाकल्या आणि (अंतिम) पैगंबराला देशाबाहेर घालविण्याच्या विचारात आहे, आणि स्वतःच पहिल्यांदा त्यांनी तुमची छेड काढली आहे. काय तुम्ही त्यांना भिता ? वस्तुतः अल्लाहलाच सर्वांत जास्त हक्क आहे की तुम्ही त्याचे भय राखावे, जर तुम्ही ईमानधारक असाल.

**१४.** तुम्ही त्यांच्याशी युद्ध करा. अल्लाह तुमच्या हस्ते त्यांना दुःख यातना देईल, त्यांना अपमानित करील. त्यांच्या विरोधात तुमची मदत करील आणि ईमानधारकांच्या हृदयांना शितलता पोहचवील.

**१५.** आणि त्यांच्या मनाचे दुःख आणि क्रोध दूर करील आणि अल्लाह ज्याच्याकडे इच्छितो दया कृपेने ध्यान देतो आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह जाणणारा, हिकमतशाली आहे.

**१६.** काय तुम्ही हे समजून बसला आहात की तुम्हाला असेच सोडून दिले जाईल? अद्याप सर्वश्रेष्ठ अल्लाहने तुमच्यापैकी त्यांना उघडकीस आणले नाही, जे जिहादचे सैनिक आहेत, आणि ज्यांनी अल्लाह, त्याचा रसूल आणि ईमानधारकांखेरीज कोणालाही मित्र बनविले नाही, आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह खूप चांगल्या प्रकारे जाणतो, जे तुम्ही करीत आहात.

**१७.** शक्य नव्हे की अनेकेश्वरवादी, अल्लाहच्या मस्जिदीला आबाद करतील, वास्तविक स्थिती ही आहे की हे आपल्या इन्काराचे स्वतः साक्षी आहेत. त्यांची सर्व कर्मे वाया गेलीत आणि ते नेहमीकरिता जहन्नममध्ये राहतील.

**१८.** अल्लाहच्या मस्जिदीना तर ते लोक आबाद करतात, जे अल्लाहवर आणि आखिरतच्या दिवसावर ईमान राखतील, नमाज नियमित पढतील, जकात देतील आणि अल्लाहशिवाय कोणालाही भित नसतील. संभवतः हेच लोक खात्रीने मार्गदर्शन लाभलेले आहेत.

**१९.** काय तुम्ही हाजी लोकांना पाणी पाजणे आणि मस्जीदे हराम (काबागृह) ची सेवा करणे, त्याच्यासमान ठरविले आहे, जो अल्लाहवर आणि कयामतच्या दिवसावर ईमान

राखील आणि अल्लाहच्या मार्गात जिहाद (संघर्ष) करील. हे अल्लाहजवळ समान नाही[१] आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह अत्याचारी लोकांना मार्ग दाखवित नाही.

**२०.** ज्या लोकांनी ईमान राखले, देशत्याग केला, अल्लाहच्या मार्गात आपल्या धनाने व प्राणाने संघर्ष केला, ते अल्लाहच्या समोर खूप मोठ्या दर्जाचे आहेत आणि हेच लोक सफलता प्राप्त करणारे आहेत.

**२१.** त्यांचा पालनकर्ता त्यांना आपली दया आणि प्रसन्नता आणि अशा जन्नतींची खूशखबर देतो, ज्यांच्यात त्यांच्यासाठी निरंतर सुख आहे.

**२२.** तिथे ते सदैवकाळ राहतील अल्लाहच्या निकट, निःसंशय हा फार मोठा मोबदला आहे.

**२३.** हे ईमान राखणाऱ्यांनो! आपल्या पित्यांना आणि आपल्या बांधवांना मित्र बनवू नका, जर ते कुफ्र (इन्कारा) ला ईमानापेक्षा जास्त चांगले समजतील. तुमच्यापैकी जोदेखील त्यांच्याशी दोस्ती ठेवील, तो पूर्णपणे (अपराधी आणि) अत्याचारी आहे.

**२४.** तुम्ही सांगा की जर तुमचे पिता, तुमचे पुत्र आणि तुमचे बांधव आणि तुमच्या पत्न्या आणि तुमचे कुटुंब आणि कमविलेले धन आणि तो व्यापार, ज्याच्या कमतरतेचे तुम्ही भय राखता आणि ती घरे, जी तुम्हाला फार प्रिय आहेत (जर) हे सर्व तुम्हाला अल्लाह आणि त्याचा पैगंबर आणि अल्लाहच्या मार्गात जिहादपेक्षा जास्त प्रिय आहे तर मग प्रतिक्षा करा की सर्वश्रेष्ठ अल्लाहने आपला अज़ाब (शिक्षा-यातना) आणावी. सर्वश्रेष्ठ अल्लाह दुराचारी लोकांना मार्ग दाखवत नाही.

**२५.** निःसंशय, सर्वश्रेष्ठ अल्लाहने तुम्हाला अनेक युद्धभूमीत विजय प्रदान केला आहे आणि हुनैन-युद्धाच्या दिवशीही, जेव्हा तुम्हाला आपल्या जास्त संख्येबद्दल घमेंड होती,

---

(१) अनेकेश्वरवादी हजयात्रींना पाणी पाजण्याचे आणि आदरणीय मसजिद (काबागृह) च्या देखरेखीचे जे काम करीत, त्याबद्दल त्यांना मोठी घमेंड होती, आणि याच्या तुलनेत ते ईमान व जिहादला श्रेष्ठ जाणत नसत, ज्याची श्रेष्ठता ईमानधारकांमध्ये होती, यास्तव अल्लाहने फर्माविले, काय तुम्ही हजयात्रींना पाणी पाजणे व मसजिदे हरामची व्यवस्था राखणे ही गोष्ट अल्लाहवर ईमान राखणे आणि अल्लाहच्या मार्गात जिहाद करण्यासमान समजता? लक्षात ठेवा, अल्लाहच्या ठिकाणी या दोन गोष्टी समान नाहीत, किंबहुना अनेक ईश्वरांची उपासना करणाऱ्यांचे कोणतेही कर्म स्विकार्य नाही, मग ते कर्म वरवर पाहता कितीही पुण्यकारक का असेना.

परंतु अशाने तुम्हाला काहीच लाभ झाला नाही, तथापि धरती आपली विशालता (बाळगत) असतानाही तुमच्यासाठी संकुचित (तंग) झाली, मग तुम्ही पाठ फिरवून दूर पळाले.

**२६.** मग अल्लाहने आपल्यातर्फे सलामती आपल्या पैगंबरावर आणि ईमानधारकांवर अवतरित केली आणि आपले ते सैन्य पाठविले जे तुम्ही पाहत नव्हते आणि काफिरांना (इन्कारी लोकांना) पूर्ण शिक्षा दिली आणि या काफिरांचा हाच मोबदला होता.

**२७.** मग त्यानंतरही ज्याला इच्छिल, सर्वश्रेष्ठ अल्लाह माफ करील आणि अल्लाहच माफ करणारा दया करणारा आहे.

**२८.** हे ईमान राखणाऱ्यांनो! निःसंशय अनेकेश्वरवादी नापाक (अस्वच्छ अशुद्ध) आहेत.[१] ज्यांनी या वर्षानंतर मसजिदे हराम (आदरणीय मसजिद-काबागृहा) च्या जवळही येता कामा नये जर तुम्हाला गरीबीचे भय असेल तर अल्लाह तुम्हाला आपल्या दया कृपेने धनवान करील जर अल्लाह इच्छिल. निःसंशय अल्लाह सर्वज्ञ आणि हिकमतशाली आहे.

**२९.** त्या लोकांशी लढा जे अल्लाहवर आणि आखिरतवर ईमान राखत नाही. जे अल्लाह आणि त्याच्या पैगंबराद्वारे हराम ठरविलेल्या वस्तूला हराम समजत नाही, ना ते सत्य-धर्माचा स्वीकार करतात. त्या लोकांपैकी ज्यांना ग्रंथ प्रदान केला गेला आहे, येथपर्यंत की त्यांनी अपमानित होऊन स्वहस्ते जिजिया (टॅक्स) अदा करावा.

**३०.** यहूदी म्हणतात की उज़ैर अल्लाहचा पुत्र आहे आणि ख्रिस्ती म्हणतात की मसीह अल्लाहचा पुत्र आहे, हे कथन फक्त त्यांच्या तोंडची गोष्ट आहे. पूर्वीच्या काफिरांच्या कथनाची हेदेखील बरोबरी करू लागले आहेत. अल्लाह सर्वनाश करो यांचा, हे कोठे भरकटत चालले आहेत?

**३१.** त्या लोकांनी अल्लाहला सोडून आपल्या धर्म-ज्ञानी आणि धर्माचार्यांना रब (स्वामी, पालनहार) बनविले आहे, आणि मरियमपुत्र मसीहला वास्तविक त्यांना एकमेव

---

(१) अनेक ईश्वरांची भक्ती आराधना करणाऱ्यांचे नापाक (अस्वच्छ अशुद्ध) असण्याचा अर्थ श्रद्धा, ईमान आणि कर्मांची अस्वच्छता व अशुद्धता होय. काहींच्या मते हे अंतर्बाह्यरित्या नापाक आहेत, कारण ते मल-मुत्र त्याग करताना स्वच्छता व पावित्र्याचा या प्रकारे इतमाम राखत नाही ज्याबाबतचा आदेश धार्मिक नियमांद्वारे दिला गेला आहे.

अल्लाहचीच उपासना करण्याचा आदेश दिला गेला होता, ज्याच्याखेरीज कोणीही उपासना-योग्य नाही तो त्यांच्या शिर्क करण्यापासून पवित्र (पाक) आहे.

**३२.** ते अल्लाहच्या दिव्य प्रकाशाला आपल्या तोंडांनी विझवू इच्छितात आणि अल्लाह इन्कार करतो, परंतु हे की आपल्या दिव्य प्रकाशाला पूर्णत्वास पोहचवावे, मग काफिरांना कितीही अप्रिय वाटो.[१]

**३३.** त्यानेच आपल्या पैगंबराला सच्चा मार्ग आणि सत्य धर्मासह पाठविले की त्याला इतर सर्व धर्मांवर वर्चस्वशाली करावे, मन अनेकेश्वरवादी लोकांना कितीही वाईट वाटो.

**३४.** हे ईमान राखणाऱ्यांनो! बहुतेक धर्म-ज्ञानी आणि उपासक, लोकांचा माल नाहक गिळंकृत करतात आणि अल्लाहच्या मार्गापासून रोखतात आणि जे लोक सोने-चांदीचे खजिने बाळगतात आणि अल्लाहच्या मार्गात खर्च करीत नाही, त्यांना कठोर शिक्षा-यातनेची खबर ऐकवा.

**३५.** ज्या दिवशी त्या खजिन्याला जहन्नमच्या आगीत तापविले जाईल, मग त्याद्वारे त्यांचे कपाळ आणि कूस- बगल आणि पाठींना डागले जाईल (त्यांना सांगितले जाईल) हेच ते, ज्याला तुम्ही आपल्यासाठी जमवून ठेवले होते, तर आपल्या या साठवून ठेवलेल्या खजिन्यांची गोडी चाखा.

**३६.** महिन्यांची गणना अल्लाहच्या जवळ, अल्लाहच्या ग्रंथात बारा आहे, त्याच दिवसापासून, जेव्हापासून आकाशांना आणि जमिनीला त्याने निर्माण केले आहे. त्यांच्यापैकी चार महिने आदर आणि प्रतिष्ठेचे आहेत. हाच पवित्र धर्म आहे. तुम्ही या

---

(१) अर्थात अल्लाहचे पैगंबर मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांना जो दिव्य प्रकाश आणि सत्य धर्म देऊन पाठविले आहे. यहूदी, ख्रिस्ती आणि अनेकेश्वरवादी इच्छितात की त्याला भांडण आणि आरोपांद्वारे मिटवून टाकावे, त्याचे उदाहरण असेच आहे, जणू एखाद्याने फूंक मारून सूर्य-चंद्राचा प्रकाश विझविण्याचा प्रयत्न करावा. हे जसे अशक्य आहे, तसेच अल्लाहने आपल्या पैगंबरासह पाठविलेल्या सत्य धर्माला मिटविणे अशक्य आहे. तो समस्त धर्मांवर वर्चस्व राखील, जसे अल्लाहने पुढच्या आयतीत फर्माविले. काफिरचा शाब्दिक अर्थ लपविणारा असा आहे. या अनुषंगाने रात्रीलाही काफिर म्हणतात कारण तो सर्व चीज वस्तूंना आपल्या अंधारात लपवितो. शेतकऱ्यालाही काफिर म्हणतात, कारण तो धान्याचे दाणे जमिनीत लपवितो यास्तव काफिरदेखील अल्लाहचे दिव्य तेज लपवू इच्छितात किंवा आपल्या मनात इन्कार, कट-कारस्थान आणि ईमानधारकांच्या व इस्लामच्या विरूद्ध द्वेष मत्सर लपवून आहेत. याच कारणाने त्यांना 'काफिर' म्हटले जाते.

महिन्यांच्या काळात आपल्या प्राणांवर अत्याचार करू नका आणि तुही सर्व अनेकेश्वरवाद्यांशी जिहाद करा जसे ते तुम्हा सर्वांशी लढतात आणि लक्षात ठेवा की अल्लाह भय राखून कर्म करणाऱ्यांच्या सोबत आहे.

**३७.** महिन्यांना पुढे मागे करणे, कुफ्र (अधर्म) ला वाढविणे आहे. त्याद्वारे त्यांना मार्गभ्रष्ट केले जाते, जे काफिर आहेत, एका वर्षाला हलाल करून घेतात आणि एका वर्षाला हराम ठरवितात की अल्लाहने जे हराम ठरविले आहे, त्याच्या गणनेत बरोबरीने करून घ्यावे, मग ज्याला हराम केले आहे, त्याला हलाल ठरवावे. त्यांची वाईट कर्मे त्यांना चांगली दाखविली गेली आहेत आणि अल्लाह काफिरांना मार्गदर्शन करीत नाही.

**३८.** हे ईमान राखणाऱ्यांनो! तुम्हाला झाले तरी काय की जेव्हा तुम्हाला सांगितले जाते की चला, अल्लाहच्या मार्गात देशत्याग करा, तर तुम्ही जमिनीला बिलगता. काय तुम्ही आखिरतऐवजी ऐहिक जीवनावर राजी झालात? ऐका या जगाचे जीवन आखिरतच्या तुलनेत अतिशय लहान आहे.

**३९.** जर तुम्ही देशत्याग (हिजरत) केला नाही तर सर्वश्रेष्ठ अल्लाह तुम्हाला दुःखदायक शिक्षा देईल आणि तुमच्याखेरीज दुसऱ्या लोकांना बदलून आणील. तुम्ही सर्वश्रेष्ठ अल्लाहला कोणतेही नुकसान पोहचवू शकत नाही आणि अल्लाह सर्व काही करण्यास समर्थ आहे.

**४०.** जर तुम्ही पैगंबर (मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) ची मदत न कराल तर अल्लाहनेच त्यांची मदत केली अशा वेळी जेव्हा काफिर लोकांनी त्यांना (देशा) बाहेर घालविले होते. दोनपैकी दुसरा जेव्हा ते दोघे गुफेत होते, जेव्हा ते आपल्या साथीदारास सांगत होते, चिंता करू नका अल्लाह आमच्या सोबत आहे. तेव्हा अल्लाहनेच आपल्यातर्फे शांती-समाधान उतरवून अशा सैन्यांद्वारे त्यांना मदत पोहचिवली, ज्यांना तुम्ही पाहिलेसुद्धा नाही. त्याने काफिरांचा बोल खाली पाडला आणि मोठा व उत्तम बोल तर अल्लाहचाच आहे. सर्वश्रेष्ठ अल्लाह वर्चस्वशाली आणि हिकमत बाळगणारा आहे.

**४१.** निघा, उठा हलक्या अवस्थेत असाल तरीही आणि भारी अवजड असाल तरीही आणि अल्लाहच्या मार्गात आपल्या तन-मन-धनाने जिहाद करा. हेच तुमच्याकरिता चांगले आहे जर तुम्ही जाणत असाल.

**४२.** जर त्वरित प्राप्त होणारी धन-संपदा असती, आणि हलकासा प्रवास असता तर हे

अवश्य तुमच्या मागे निघाले असते, परंतु त्यांना तर लांब अंतराचा प्रवास मोठा कठीण वाटला आणि आता तर हे अल्लाहची शपथ घेऊन सांगतील की आमच्या अंगी जर शक्ती-सामर्थ्य राहिले असते तर आम्ही अवश्य तुमच्यासोबत निघालो असतो. ते आपल्या प्राणांना स्वतःच विनाशाकडे नेत आहेत. त्यांच्या खोटेपणाचे खरे ज्ञान अल्लाहला आहे.

**४३.** अल्लाह तुम्हाला क्षमा करो, तुम्ही त्यांना परवानगी का दिली, याविना की तुमच्या समोर सच्चे व प्रामाणिक लोक स्पष्टपणे जाहीर व्हावेत आणि तुम्ही खोट्या लोकांनाही जाणून घ्यावे.

**४४.** अल्लाहवर आणि कयामत (प्रलया) च्या दिवसावर ईमान आणि दृढ विश्वास राखणारे लोक तर धनाने व प्राणाने जिहाद करण्यापासून थांबून राहण्याची परवानगी तुमच्याकडे कधीही मागणार नाहीत आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह, दुष्कर्मांपासून दूर राहणाऱ्या लोकांना चांगल्या प्रकारे जाणतो.

**४५.** ही परवानगी तर तुमच्याजवळ तेच लोक मागतात, ज्यांचे ना अल्लाहवर ईमान आहे, ना आखिरच्या दिवसावर अटळ विश्वास आहे, ज्यांची मने संशयग्रस्त आहेत आणि ते आपल्या संशयातच भटकत आहेत.

**४६.** जर त्यांचा इरादा (जिहादकरिता) निघण्याचा असता तर त्यांनी या प्रवासाकरिता साधनांची तयारी केली असती, परंतु अल्लाहला त्यांचे उठणे प्रिय नव्हते, यास्तव त्यांनी काही करण्यापासून रोखले आणि त्यांना सांगितले गेले की तुम्ही बसून राहणाऱ्यांसोबत बसूनच राहा.

**४७.** जर हे तुमच्याच सोबत निघालेही असते तर तुमच्यासाठी उपद्रवाखेरीज दुसऱ्या कोणत्याही गोष्टीची वाढ केली नसती, किंबहुना तुमच्या दरम्यान उत्पात माजविण्यासाठी धावपळ केली असती आणि तुमच्यात फूट पाडण्याची संधी शोधत राहिले असते, त्यांना मानणारे स्वतः तुमच्यात हजर आहेत आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह अत्याचारी लोकांना चांगल्या प्रकारे जाणतो.

**४८.** हे तर यापूर्वीही फूट पाडण्याची संधी शोधत राहिले आणि तुमच्यासाठी कार्यात उलटफेर करीत राहिले, येथपर्यंत की सत्य घेऊन पोहोचले आणि अल्लाहचा आदेश प्रभावी झाला, तरीदेखील ते लोक वाईट मानतच राहिले.

**४९.** त्यांच्यापैकी कोणी म्हणतो की मला आदेश द्या, मला संकटात टाकू नका. जाणून असा की ते संकटग्रस्त झाले आहेत आणि निःसंशय जहन्नम काफिरांना घेरून टाकणारी आहे.

**५०.** तुम्हाला जर एखादी भलाई प्राप्त झाली तर त्यांना वाईट वाटते, आणि जर कष्ट यातना पोहोचली तर म्हणतात, आम्ही तर आपली व्यवस्था पहिल्यापासून ठीकठाक करून घेतली होती, मग खूप तोऱ्याने ऐट दाखवित परत जातात.

**५१.** तुम्ही सांगा, आम्हाला त्याखेरीज कोणतीही गोष्ट पोहोचू शकत नाही, जी अल्लाहने आमच्यासाठी लिहून ठेवली आहे. तो आमचा स्वामी आहे आणि (तुम्ही सांगा) ईमानधारकांनी अल्लाहवरच पूर्ण भरोसा ठेवला पाहिजे.

**५२.** तुम्ही सांगा, तुम्ही आमच्याबाबत ज्या गोष्टींच्या प्रतिक्षेत आहात, ती दोन चांगल्या गोष्टींपैकी एक आहे आणि आम्ही तुमच्याबाबत या गोष्टीच्या प्रतिक्षेत आहोत की एकतर अल्लाहने तुम्हाला आपल्यातर्फे एखादी शिक्षा द्यावी किंवा आमच्या हातून, तेव्हा एका बाजूला तुम्ही प्रतिक्षा करा, दुसऱ्या बाजूला आम्ही तुमच्यासोबत प्रतिक्षा करीत आहोत.

**५३.** तुम्ही सांगा की तुम्ही खुशीने खर्च करा किंवा नाखुशीने, कबूल तर कधीही केला जाणार नाही. निःसंशय तुम्ही दुराचारी लोक आहात.

**५४.** त्यांचे खर्च करणे कबूल न होण्याचे कारण याखेरीज कोणतेही नाही की हे अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचे अवज्ञाकारी आहेत आणि मोठ्या सुस्तीने नमाजला येतात आणि वाईट मनाने खर्च करतात.

**५५.** यास्तव त्यांची धन-संपत्ती आणि संततीने तुम्हाला आश्चर्यात टाकू नये. अल्लाह हेच इच्छितो की त्यांना या जगाच्या जीवनातच शिक्षा द्यावी आणि त्यांच्या इन्कार करण्याच्या अवस्थेतच त्यांचा प्राण निघावा.

**५६.** आणि हे अल्लाहची शपथ घेऊन सांगतात की हे तुमच्या गटाचे लोक आहेत, वास्तविक ते तुमच्या गटाचे नाहीत, गोष्ट केवळ एवढीच की हे भित्रे लोक आहेत.

**५७.** जर यांना एखादे सुरक्षित स्थान किंवा एखादी गुफा किंवा कोणतीही घुसून बसण्याची जागा मिळाली तर लगेच धाव घेत पळत सुटतील.

**५८.** त्यांच्यात तेदेखील आहेत, जे दानाच्या धनाच्या वाटणीबाबत तुमच्यावर आरोप

ठेवतात, जर त्यातून त्यांना मिळाल्यास आनंद होतो आणि जर त्यातून काही न मिळाले तर त्वरित नाराज होऊ लागतात.

**५९.** जर हे लोक अल्लाह आणि त्याच्या पैगंबरानी दिलेल्यावर खूश राहिले असते आणि म्हणाले असते की अल्लाह आम्हाला पुरेसा आहे, अल्लाह आपल्या कृपेने आम्हाला देईल आणि त्याचा पैगंबरही. आम्ही तर अल्लाहकडूनच अपेक्षा राखणारे आहोत.

**६०.** दान केवळ फकीरांकरिता आहे आणि गरीबांकरिता आणि त्यांचे काम करणाऱ्यांकरिता आणि त्या लोकांकरिता ज्यांची मनधरणी केली जात असेल आणि गुलाम मुक्त करण्याकरिता आणि कर्जदार लोकांकरिता, आणि अल्लाहच्या मार्गात आणि प्रवाशांकरिता, अनिवार्य कर्तव्य आहे अल्लाहतर्फे आणि अल्लाह सर्वज्ञ हिकमतशाली आहे.

**६१.** आणि त्यांच्यात असेदेखील आहेत, जे पैगंबराला दुःख यातना पोहचवितात आणि म्हणतात की हलक्या कानाचा आहे (तुम्ही) सांगा, की तो कान तुमच्या भलाईसाठी आहे. तो अल्लाहवर ईमान राखतो आणि ईमानधारकांच्या बोलण्यावर विश्वास ठेवतो आणि तुमच्यापैकी जे ईमानधारक आहेत, हे त्यांच्यासाठी दया कृपा आहेत आणि अल्लाहचे रसूल यांना जे लोक दुःख यातना पोहचवितात, त्यांच्यासाठी दुःखदायक अज़ाब (शिक्षा-यातना) आहे.

**६२.** ते केवळ तुम्हाला खूश करण्यासाठी तुमच्यासमोर अल्लाहची शपथ घेतात, वस्तुतः हे ईमान राखणारे असते तर अल्लाह आणि त्याचे रसूल (पैगंबर) खूश केले जाण्यास अधिक पात्र होते.

**६३.** काय हे नाही जाणत की जो कोणी अल्लाहचा आणि त्याच्या पैगंबराचा विरोध करील, त्याच्यासाठी निश्चितच जहन्नमची आग आहे, जिच्यात ते नेहमी राहतील. हा फार मोठा अपमान आहे.

**६४.** मुनाफिक लोकांना अर्थात ढोंगी मुसलमानांना (नेहमी) हे भय वाटत असते की कदाचित त्यांच्यावर (ईमानधारकांवर) एखादी आयत न अवतरित व्हावी, जी त्यांच्या मनातल्या गोष्टी त्यांना सांगून टाकील. तुम्ही सांगा की तुम्ही थट्टा मस्करी करीत राहा. निःसंशय सर्वश्रेष्ठ अल्लाह ते जाहीर करणारा आहे, ज्यापासून तुम्ही भयभीत आहात.

**६५.** जर तुम्ही विचाराल तर साफ म्हणतील की आम्ही तर असेच आपसात थट्टा विनोद करीत होतो. त्यांना सांगा की काय अल्लाह त्याच्या आयती आणि त्याचा रसूल एवढेच तुमच्या थट्टा-मस्करीकरिता बाकी राहिलेत?

**६६.** तुम्ही बहाणे बनवू नका. निःसंशय तुम्ही आपल्या ईमान राखल्यानंतर काफिर (इन्कारी) झाले. जर आम्ही तुमच्यापैकी काही लोकांना माफ जरी केले तरी काही लोकांना त्यांच्या अत्याचाराची सक्त सजा देणारच.

**६७.** सर्वच मुनाफिक (दांभिक) पुरुष आणि स्त्रिया आपसात सारखेच आहेत. ते वाईट गोष्टींचा आदेश देतात आणि भल्या गोष्टींपासून रोखतात आणि आपली मूठ बंद ठेवतात, हे अल्लाहला विसरले, अल्लाहनेही त्यांचा विसर पाडला. निःसंशय मुनाफिक (दुतोंडी) लोकच दुराचारी आहेत.

**६८.** सर्वश्रेष्ठ अल्लाहने या मुनाफिक पुरुष-स्त्रियांशी आणि काफिरांशी जहन्नमच्या आगीचा वायदा केलेला आहे, जिथे ते नेहमी राहतील तेच त्यांच्यासाठी पुरेसे आहे. त्यांचा अल्लाहतर्फे धिःक्कार आहे आणि त्यांच्यासाठी कायमस्वरूपी शिक्षा यातना आहे.

**६९.** तुमच्यापूर्वी होऊन गेलेल्या लोकांप्रमाणे, जे तुमच्यापेक्षा शूर आणि धन-संपत्ती व संतती जास्त बाळगत होते, तर त्यांनी आपला धार्मिक भाग उचलला, मग तुम्हीही आपला हिस्सा उचलत आहात. ज्याप्रमाणे तुमच्यापूर्वीचे लोक आपल्या हिश्यांद्वारे लाभान्वित झाले आणि तुम्हीदेखील त्याचप्रमाणे मस्करीची गोष्ट केली, जशी त्यांनी केली होती. त्यांची कर्मे या जगात आणि आखिरतमध्ये वाया गेलीत आणि हेच लोक तोट्यात आहेत.

**७०.** काय त्यांना आपल्यापूर्वी होऊन गेलेल्या लोकांची खबर नाही पोहोचली? नूह आणि आद आणि समूदचे जनसमूह आणि इब्राहीमचा जनसमूह आणि मदयनचे रहिवाशी आणि उलटून पालथ्या घातलेल्या वस्त्यांच्या लोकांची. त्यांच्याजवळ पैगंबर स्पष्ट निशाण्या घेऊन पोहोचले तेव्हा सर्वश्रेष्ठ अल्लाह असा नव्हता की त्यांच्यावर अत्याचार करील. उलट त्यांनी स्वतःच आपल्यावर अत्याचार करून घेतला.

**७१.** ईमानधारक पुरुष आणि स्त्रिया आपसात एकमेकांचे (सहाय्यक आणि) मित्र आहेत. ते चांगल्या गोष्टींचा आदेश देतात, आणि वाईट गोष्टींपासून रोखतात. नमाज

नियमितपणे पढतात. जकात अदा करतात. अल्लाह आणि त्याच्या पैगंबरांचे म्हणणे मान्य करतात. अशाच लोकांवर अल्लाह लवकरच दया कृपा करील. निःसंशय अल्लाह वर्चस्वशाली, हिकमत बाळगणारा आहे.

**७२.** या ईमानधारक पुरुष आणि स्त्रियांशी अल्लाहने त्या जन्नतींचा वायदा केला आहे, ज्यांच्याखाली प्रवाह वाहत आहेत, जिथे ते नेहमीकरिता राहतील, आणि त्या पाक स्वच्छ घराचा, जे त्या अविनाशी जन्नतमध्ये आहे आणि अल्लाहची प्रसन्नता सर्वांत महान आहे. हीच फार मोठी सफलता आहे.

**७३.** हे नबी! काफिरांशी आणि मुनाफिक लोकांशी जिहाद करीत राहा आणि त्यांच्यावर सक्ती करा. त्यांचे खरे ठिकाण जहन्नम आहे. जे अतिशय वाईट ठिकाण आहे.

**७४.** हे अल्लाहची शपथ घेऊन सांगतात की त्यांनी असे म्हटले नाही. वास्तिवक सत्याचा इन्कार त्यांनी आपल्या तोंडानी केलेला आहे. आणि हे इस्लामचा स्वीकार केल्यानंतरही काफिर झालेत आणि यांनी त्या कामाचा इरादाही केला आहे, ज्याला ते प्राप्त करू शकले नाहीत. हे केवळ याच गोष्टीचा सूड घेत आहेत की त्यांना अल्लाहने आपल्या कृपेने आणि याच्या पैगंबराने धनवान केले जर हे अजूनही तौबा (पश्चात्ताप) करून घेतील तर हे त्यांच्या हक्कात चांगले आहे आणि जर तोंड फिरवतील तर अल्लाह त्यांना या जगात आणि आखिरतमध्ये दुःखदायक शिक्षा देईल आणि संपूर्ण धरतीत त्यांना कोणी मित्र आणि मदत करणारा लाभणार नाही.

**७५.** यांच्यात असेदेखील आहेत, ज्यांनी अल्लाहशी वायदा केला होता की जर तो आम्हाला आपल्या कृपेने धन प्रदान करील तर आम्ही अवश्य दान करू आणि पूर्णतः नेक सदाचारी लोकांपैकी होऊ.

**७६.** परंतु जेव्हा अल्लाहने आपल्या कृपेने त्यांना दिले तेव्हा हे त्यात कंजूसपणा करू लागले आणि टाळाटाळ करून तोंड फिरविले.

**७७.** तेव्हा याची शिक्षा म्हणून अल्लाहने त्यांच्या मनात फूटीरता टाकली अल्लाहच्या भेटीच्या दिवसपर्यंत कारण त्यांनी अल्लाहशी केलेल्या वायद्याचा भंग केला, आणि खोटे बोलत राहिले.

**७८.** काय ते हे नाही जाणत की अल्लाहला त्यांच्या मनातला गुप्त भेद आणि त्यांच्या कानगोष्टी सर्व माहीत आहे आणि अल्लाह सर्व लपलेल्या गोष्टींना जाणणारा आहे.

**७९.** जे लोक अशा ईमानधारकांवर आरोप ठेवता, जे मोकळ्या मनाने दान करतात आणि त्या लोकांवर, ज्यांना आपल्या मेहनतीखेरीज काहीच साध्य नाही, तर हे त्यांची थट्टा उडवितात, अल्लाहदेखील त्यांची थट्टा उडवितो आणि याच लोकांसाठी मोठी सक्त शिक्षा यातना (अज़ाब) आहे.

**८०.** तुम्ही त्यांच्यासाठी तौबा (क्षमा याचना) करा किंवा न करा, जर तुम्ही सत्तर वेळाही यांच्यासाठी तौबा कराल तरीदेखील अल्लाह त्यांना कदापि माफ करणार नाही. कारण त्यांनी अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचा इन्कार केला आहे आणि अशा दुराचारी लोकांना अल्लाह मार्गदर्शन करीत नाही.

**८१.** मागे राहून जाणारे लोक, अल्लाहचे रसूल (सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) यांच्याविरूद्ध आपल्या बसून राहण्यावर खूश आहेत. त्यांनी अल्लाहच्या मार्गात आपल्या धनाने व प्राणाने जिहाद करणे अप्रिय जाणले आणि ते म्हणाले की या भयंकर उन्हात निघू नका. त्यांना सांगा की जहन्नमची आग याहून अतिशय तापदायक आहे. यांनी हे समजून घेतले असेल तर बरे झाले असते.

**८२.** तेव्हा त्यांनी हसणे फार कमी आणि रडणे जास्त केले पाहिजे. आपल्या या कृतकर्मांच्या मोबदल्यात.

**८३.** तेव्हा जर सर्वश्रेष्ठ अल्लाह तुम्हाला त्याच्या एखाद्या समूहाकडे परतवून नेईल मग हे तुमच्याशी लढाईच्या मैदानात जाण्याची अनुमती मागतील तेव्हा तुम्ही सांगा की तुम्ही माझ्यासोबत कधीही निघू शकत नाही आणि ना माझ्यासह शत्रुशी लढू शकता. तुम्ही पहिल्या खेपेलाच बसून राहणे पसंत केले होते, तेव्हा आताही तुम्ही मागे राहून जाणाऱ्यांमध्येच बसून राहा.

**८४.** आणि यांच्यापैकी कोणी मरण पावला तर त्याच्या जनाजाची नमाज तुम्ही कधीही पढू नका आणि ना त्याच्या कबरीवर जाऊन उभे राहा, हे अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचा इन्कार करणारे लोक आहेत आणि मरेपर्यंत दुराचारीच राहिले.

**८५.** आणि तुम्हाला त्यांची धन-संपत्ती आणि संतती काहीच भली वाटू नये. सर्वश्रेष्ठ अल्लाह हेच इच्छितो की त्यांना या गोष्टीद्वारे या जगात सजा द्यावी आणि हे आपला

जीव निघेपर्यंत काफिर (कृतघ्न) च राहिले.

**८६.** आणि जेव्हा एखादी सूरह (पवित्र कुरआनातील अध्याय) अवतरित केली जाते की अल्लाहवर ईमान राखा आणि त्याच्या पैगंबरासह मिळून जिहाद करा, तेव्हा त्यांच्यापैकी धनवान लोकांचा एक गट तुमच्याजवळ येऊन अनुमती घेतो की आम्हाला तर बसून राहणाऱ्यांमध्येच सोडून द्या.

**८७.** हे तर घरात राहणाऱ्या स्त्रियांना साथ देण्यावर राजी झाले, आणि त्यांच्या हृदयांवर मोहर लावली गेली. आता ते कसलेही समज उमज बाळगत नाही.[१]

**८८.** परंतु स्वतः पैगंबर आणि त्यांच्यासोबतचे ईमानधारक आपल्या धनाने व प्राणाने जिहाद करतात. त्यांच्याचसाठी भलाई आहे. आणि हेच लोक सफलता प्राप्त करणारे आहेत.

**८९.** याच लोकांसाठी सर्वश्रेष्ठ अल्लाहने ती जन्नत तयार केली आहे, जिच्याखाली प्रवाह वाहत आहेत. ज्यात ते नेहमी राहतील आणि हीच फार मोठी सफलता आहे.[२]

**९०.** ग्रामीण भागातील अशिक्षित, बहाणा करणारे लोक हजर झाले की त्यांना अनुमती दिली जावी आणि ते बसून राहावेत ज्यांनी अल्लाहशी आणि त्याच्या पैगंबराशी असत्य कथन केले होते. आता तर त्यांच्यात जेवढे काफिर (अधर्मी) आहेत त्यांना दुःखदायक अज़ाब पोहचल्याविना राहणार नाही.

**९१.** कमजोर दुबळे आणि आजारी असलेल्यांवर आणि अशा लोकांवर जे खर्च करण्यास असमर्थ आहेत दोष नाही, जोपर्यंत ते अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचे शुभचिंतक असतील. अशा नेक सदाचारी लोकांवर कसलीही कारवाई केली जाऊ नये आणि अल्लाह मोठा माफ करणारा मेहरबान आहे.

---

(१) हृदयांवर मोहर लावली जाणे हे सतत अपराध केल्यामुळे होते, ज्याबाबतचे स्पष्टीकरण या आधी केले गेले आहे. अशाने मनुष्य विचार-चिंतन व आकलनाच्या शक्तीपासून वंचित होतो.

(२) ईमानधारक असल्याचे ढोंग करणाऱ्या त्या मुनाफिकांच्या विरूद्ध सच्चा ईमानधारकांचे चारित्र्य असे की तन मन धनाने ते अल्लाहच्या मार्गात जिहाद करतात, मग ते आपल्या प्राणांचीही पर्वा करीत नाही ना धनाची. त्यांच्या दृष्टीने अल्लाहचा आदेश सर्वांत मोठा आहे. भलाई त्यांच्याचकरिता आहे, अर्थात आखिरतची भलाई आणि जन्नतचे सुख काहींच्या मते या जगाचा व आखिरतचा दोन्हींचा फायदा. हेच लोक सफल आणि उच्च पदावर बसण्यायोग्य ठरतील.

**९२.** आणि ना त्या लोकांवर जे तुमच्याजवळ येतात की तुम्ही त्यांच्यासाठी वाहनाची व्यवस्था करून द्यावी, तेव्हा तुम्ही त्यांना उत्तर देता की मला तुमच्या वाहनासाठी काहीच आढळत नाही, तेव्हा ते दुःखाने रडत, अश्रू ढाळीत परत जातात की त्यांना खर्च करण्यासाठी काहीही प्राप्त नाही.[१]

**९३.** निःसंशय, आरोप अशा लोकांवर आहे जे धनवान असूनही तुमच्याजवळ अनुमती मागतात. स्त्रियांसोबत घरी बसून राहण्यावर हे खूश आहेत आणि अल्लाहने त्यांच्या हृदयांवर मोहर लावली आहे. ज्यामुळे ते अजाण बनले आहेत.

**९४.** जेव्हा तुम्ही त्यांच्याजवळ जाल तेव्हा तुमच्यासमोर सबबी मांडतील. (हे पैगंबर!) सांगा की बहाणे बनवू नका. आम्ही तुमच्यावर विश्वास ठेवणार नाही. अल्लाहने तुमच्या करतुतींशी आम्हाला अवगत केले आहे आणि अल्लाह आणि त्याचा पैगंबर तुमचे आचरण पाहतील, मग तुम्ही अदृश्य आणि दृश्य गोष्टी जाणणाऱ्याकडे परतविले जाल, मग तो तुम्हाला सांगेल की जे काही तुम्ही करीत होते.

---

(१) हे मुसलमानांच्या एका समूहाचे वर्णन आहे, अर्थात त्या लोकांचे ज्यांच्याजवळ स्वतःचे वाहन नव्हते आणि पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांनीही वाहन उपलब्ध करून देण्याबाबत आपली विवशता जाहीर केली. यावर त्यांना एवढे दुःख झाले की दुःखातिरेकाने त्यांच्या डोळ्यांतून अश्रू वाहू लागले. सर्वश्रेष्ठ अल्लाह प्रत्येक उघड आणि लपलेल्या गोष्टीला जाणणारा आहे, त्यांना जिहादमध्ये भाग घेण्यापासून वेगळे केले. किंबहुना हदीसमध्ये उल्लेखित आहे की पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांनी त्या अगतिक लोकांविषयी, युद्धात सहभागी होणाऱ्या लोकांना फर्माविले, ''.....तुमच्या मागे मदीनेत काही लोक असेही आहेत की तुम्ही ज्या घाटीला पार करता, आणि ज्या मार्गावर चालता, तुमच्यासह ते मोबदला प्राप्त करण्यात समानरित्या सहभागी आहेत. निकटच्या अनुयायींनी विचारले, हे कसे असू शकते, वास्तविक ते मदीनेत बसले आहेत. पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांनी फर्माविले, ''सबबीने त्यांना तिथे रोखून ठेवले आहे.'' (सहीह बुखारी, किताबुल जिहाद आणि सहीह मुस्लिम नं. १५१८)

**९५.** जेव्हा तुम्ही त्यांच्याजवळ परत जाल तेव्हा ते तुमच्यासमोर अल्लाहची शपथ घेतील, यासाठी की तुम्ही त्यांना त्यांच्या दशेवर सोडावे, यास्तव तुम्ही त्यांना त्यांच्या दशेवर सोडा. निश्चितच ते मोठे अपवित्र आहेत आणि त्यांचे ठिकाण नरक (जहन्नम) आहे, त्यांच्या त्या कर्मांच्या मोबदल्यात, जे ते करीत होते.

**९६.** हे तुमच्याजवळ अशासाठी शपथ घेतील की तुम्ही त्यांच्याशी राजी व्हावे. तेव्हा जर तुम्ही त्यांच्याशी राजीही झालात तर अल्लाह अशा दुराचारी लोकांशी राजी होत नाही.

**९७.** ग्रामीण लोक इन्कार आणि वरकरणीपणात खूपच सक्त असतात, आणि त्यांनी असे असलेही पाहिजे की त्यांना त्या आदेशांचे ज्ञान नसावे, जे आदेश अल्लाहने आपल्या पैगंबरावर अवतरित केले आहेत आणि अल्लाह खूप खूप ज्ञान बाळगणारा, मोठा हिकमतशाली आहे.

**९८.** आणि त्या ग्रामीण लोकांपैकी काही असे आहेत की जे काही खर्च करतात त्याला सजा समजतात आणि तुम्ही ईमानधारकांसाठी वाईट दिवसाच्या प्रतिक्षेत असतात. वाईट प्रसंग तर त्याच्यावरच येणार आहे आणि अल्लाह ऐकणारा आणि जाणणारा आहे.

**९९.** आणि ग्रामीणांपैकी काही असेही आहेत, जे अल्लाहवर आणि कयामतच्या दिवसावर ईमान राखतात आणि जे काही खर्च करतात त्याला अल्लाहचे सान्निध्य आणि पैगंबरांच्या दुआ- प्रार्थनेचे साधन मानतात. लक्षात ठेवा की त्यांचे हे खर्च करणे, निश्चित त्यांच्यासाठी, अल्लाहची निकटता प्राप्त करण्याचे साधन आहे. त्यांना अल्लाह अवश्य आपल्या कृपा-छत्रात दाखल करील. अल्लाह मोठा माफ करणारा, दया करणारा आहे.

**१००.** आणि हे मुहाजिर (मक्केहून मदीना येथे आलेले) आणि अन्सार (मदीना येथील मूळ रहिवाशी) प्रथम आहेत आणि जेवढे लोक, कसल्याही गरजेविना त्यांचे अनुयायी आहेत अल्लाह त्या सर्वांशी राजी झाला आणि ते सर्व अल्लाहशी राजी झाले आणि अल्लाहने त्यांच्यासाठी अशा बागांची व्यवस्था करून ठेवली आहे ज्यांच्याखाली प्रवाह वाहत आहेत, ज्यात ते सदैव राहतील. ही फार मोठी सफलता आहे.

**१०१.** आणि काही तुमच्या जवळपासच्या ग्रामीणांपैकी आणि मदीनेच्या वस्तीत असे ढोंगी ईमानधारक आहेत, जे दांभिकतेवर अटळ आहेत. तुम्ही त्यांना नाही जाणत,

त्यांना आम्ही जाणतो. आम्ही त्यांना दुहेरी शिक्षा देऊ, मग ते फार मोठ्या शिक्षा-यातनेकडे पाठविले जातील.

**१०२.** आणि काही दुसरे लोक आहेत, जे आपल्या चुका मान्य करतात, ज्यांनी मिश्र स्वरूपाची कर्मे केलीत. काही चांगली तर काही वाईट. अल्लाहकडून आशा आहे की त्यांची तौबा (क्षमा-याचना) कबूल करील. निःसंशय, अल्लाह मोठा माफ करणारा आणि दया करणारा आहे.

**१०३.** तुम्ही त्यांच्या धनातून सदका (दान) स्वीकार करा, ज्याद्वारे तुम्ही त्यांना स्वच्छ- शुद्ध कराल आणि त्यांच्यासाठी दुआ- प्रार्थना करा, निःसंशय तुमची दुआ त्यांच्यासाठी समाधानाचे साधन आहे, आणि अल्लाह चांगल्या प्रकारे ऐकतो, चांगल्या प्रकारे जाणतो.

**१०४.** काय त्यांना हे माहीत नाही की अल्लाहच आपल्या दासांची तौबा (क्षमा-याचना) कबूल करतो आणि तोच दान कबूल करतो आणि हे की अल्लाहच तौबा कबूल करण्यात आणि दया करण्यात परिपूर्ण आहे.

**१०५.** आणि सांगा की तुम्ही कर्म करीत राहा. तुमचे कर्म अल्लाह स्वतः पाहील आणि त्याचा पैगंबर आणि ईमान राखणारे (ही पाहतील) आणि निश्चितच तुम्हाला अशाजवळ जायचे आहे जो सर्व लपलेल्या व उघड गोष्टी जाणणारा आहे. यासाठी की तो तुम्हाला तुम्ही केलेले प्रत्येक कर्म दाखवून देईल.

**१०६.** आणि काही दुसरे लोक आहेत, ज्यांचा मामला अल्लाहचा आदेश येईपर्यंत स्थगित आहे. एक तर तो त्यांना सजा देईल किंवा त्यांची क्षमा-याचना कबूल करील आणि अल्लाह मोठा जाणणारा, फार हिकमतशाली आहे.

**१०७.** आणि काही असे आहेत, ज्यांनी या हेतूने मस्जिद बनविली की नुकसान पोहचवावे आणि इन्कारपूर्ण गोष्टी कराव्यात आणि ईमानधारकांमध्ये फूट पाडावी, आणि अशा माणसाच्या राहण्याची व्यवस्था करावी, जो याच्या पूर्वीपासून अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचा विरोधक आहे, आणि शपथ घेतील की भलाईखेरीज आमचा कोणताही हेतु नाही आणि अल्लाह साक्षी आहे की ते पूर्णतः खोटे आहेत.

**१०८.** आपण त्या मस्जिद कधीही उभे न राहावे, परंतु ज्या मस्जिदीचा पाया पहिल्या

दिवसापासूनच तकवा (अल्लाहचे भय राखण्या) वर ठेवला गेला असेल, तर ती यायोग्य आहे की तुम्ही तिच्यात उभे राहावे. यात असे लोक आहेत की ते अधिक स्वच्छ-शुद्ध (पाक) होणे चांगले समजतात, आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह अधिक पाक राहणाऱ्यांना प्रिय राखतो.

**१०९.** मग काय असा मनुष्य अधिक चांगला आहे, ज्याने आपल्या इमारतीचा पाया अल्लाहचे भय राखण्यावर आणि अल्लाहची प्रसन्नता प्राप्त करण्यावर ठेवला असेल किंवा तो मनुष्य, ज्याने आपल्या घराचा पाया एखाद्या उतार असलेल्या दरीच्या (घाटाच्या) किनाऱ्यावर, जी कोसळण्याच्या बेतात असावी, त्यावर रचला असेल; मग तो त्यासह जहन्नमच्या आगीत जाऊन पडावा आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह अशा अत्याचारींना मार्ग दाखवित नाही.

**११०.** त्यांचे हे घर, जे त्यांनी बनविले आहे, नेहमी त्यांच्या मनाला संशयामुळे (काट्यासरखे) बोचत राहील. परंतु हे की त्यांची ह्रदयेच क्षत-विक्षत व्हावीत, आणि अल्लाह ज्ञान बाळगणारा आणि हिकमतशाली आहे.

**१११.** निःसंशय, अल्लाहने ईमानधारकांकडून त्यांच्या प्राणांना व धनांना जन्नतच्या मोबदल्यात खरेदी केले आहे. ते अल्लाहच्या मार्गात लढतात ज्यात ते ठार करतात आणि ठार केले जातात, याबाबत सच्चा वायदा आहे तौरात, इंजील आणि कुरआनामध्ये आणि अल्लाहपेक्षा जास्त आपल्या वायद्याचे पालन कोण करू शकतो? यास्तव तुम्ही आपल्या या विकण्यावर, जो (सौदा) तुम्ही करून घेतलात, आनंदित व्हा आणि ही फार मोठी सफलता आहे.

**११२.** हे असे लोक होते, जे तौबा (क्षमा-याचना) करणारे, अल्लाहची उपासना करणारे, त्याची स्तुती-प्रशंसा करणारे, रोजा (उपवास-व्रत) राखणारे (किंवा सत्य मार्गावर चालणारे) रुकूअ (झुकणारे) सजदा करणारे (माथा टेकणारे), चांगल्या गोष्टींचा उपदेश करणारे, आणि वाईट गोष्टींपासून रोखणारे आणि अल्लाहच्या नियमांना ध्यानात राखणारे आहेत आणि अशा ईमान राखणाऱ्यांना शुभ समाचार द्या.

**११३.** पैगंबर आणि इतर ईमानधारकांना अनुमती नाही की अनेकेश्वरवाद्यांकरिता माफीची दुआ- प्रार्थना करावी, मग ते नातेवाईक का असेनात. हा आदेश स्पष्ट झाल्यानंतर की ते लोक नरकात जातील.

**११४.** आणि इब्राहीमचे आपल्या पित्याकरिता माफीची दुआ-प्रार्थना करणे हे केवळ त्या वचनाच्या सबबीवर होते, जे त्यांनी आपल्या पित्यास दिले होते, मग जेव्हा त्यांना ही गोष्ट स्पष्टतः कळाली की तो (पिता) अल्लाहचा शत्रू आहे, तेव्हा ते त्याच्यापासून दूर झाले. वास्तविक इब्राहीम मोठे कोमलहृदयी सहनशील होते.

**११५.** आणि अल्लाह असे नाही करत की एखाद्या जनसमूहाला मार्गदर्शन केल्यानंतर मार्गभ्रष्ट करील, जोपर्यंत त्या गोष्टी स्पष्टतः सांगून टाकत नाही ज्यांच्यापासून त्यांनी अलिप्त राहावे. निःसंशय अल्लाह प्रत्येक गोष्ट चांगल्या प्रकारे जाणतो.

**११६.** निःसंशय, आकाशामध्ये व धरतीत अल्लाहचीच राज्य-सत्ता आहे. तोच जिंवत ठेवतो आणि मृत्यु देतो आणि तुमचा अल्लाहखेरीज कोणीही मित्र नाही आणि ना कोणी मदत करणारा.

**११७.** सर्वश्रेष्ठ अल्लाहने पैगंबरांच्या स्थितीवर दया-दृष्टी केली आणि देशत्याग करून आलेल्यांवर आणि त्यांना मदत करणाऱ्या अन्सार लोकांच्या स्थितीवरही, ज्यांनी अशा अडचणीच्या वेळी पैगंबरांना साथ दिली, त्यानंतर की त्यांच्यातल्या एका गटाची मने डळमळू लागली होती. मग अल्लाहने त्यांच्या अवस्थेवर दया केली. निःसंशय, अल्लाह त्या सर्वांवर अतिशय मेहरबान आणि दया करणारा आहे.

**११८.** आणि तीन माणसांच्या अवस्थेवरही, ज्यांचा मामला स्थगित केला गेला होता येथपर्यंत की जेव्हा जमीन आपल्या (विशाल) विस्तारानंतरही त्यांच्यासाठी संकुचित (तंग) होऊ लागली आणि ते स्वतः आपल्या अस्तित्वाशी हैराण झाले आणि त्यांनी समजून घेतले की अल्लाहपासून कोठेही आश्रय लाभू शकत नाही, याखेरीज की त्यांच्याकडे वळले जावे. मग त्यांच्या अवस्थेवर दया केली. यासाठी की त्यांनी भविष्यातही क्षमा-याचना करावी. निःसंशय सर्वश्रेष्ठ अल्लाह तौबा (क्षमा-याचना) कबूल करणारा आणि अतिशय दया करणारा आहे.

**११९.** हे ईमान राखणाऱ्यांनो! सर्वश्रेष्ठ अल्लाहचे भय बाळगा आणि खऱ्या लोकांसोबत राहा.

**१२०.** मदीना आणि त्याच्या जवळपासच्या गावात राहणाऱ्यांकरिता योग्य नव्हते की अल्लाहच्या पैगंबरांची साथ सोडून मागे राहावे आणि न हे की आपल्या प्राणाला, त्यांच्या प्राणापेक्षा अधिक प्रिय आपल्या प्राणाला, त्यांच्या प्राणापेक्षा अधिक प्रिय जाणावे. हे

अशामुळे की त्यांना अल्लाहच्या मार्गात जी तहान लागली आणि जो थकवा पोहोचला आणि जी भूक लागली आणि जे चालत गेले, जे काफिरांकरिता क्रोधाची सबब बनली असावी आणि शत्रूंचा जो काही समाचार घेतला, त्या सर्वांबद्दल त्यांच्या नावे (एक एक) सत्कर्म करणाऱ्यांचा मोबदला वाया जाऊ देत नाही.

**१२१.** आणि जो काही लहान मोठा खर्च त्यांनी केला आणि जेवढी मैदाने त्यांना पार करावी लागली, हे सर्वदेखील त्यांच्या नावे लिहिले गेले यासाठी की सर्वश्रेष्ठ अल्लाहने त्यांच्या कामांचा चांगल्यात चांगला मोबदला प्रदान करावा.

**१२२.** आणि ईमान राखणाऱ्यांनी सर्वच्या सर्व मिळून निघू नये. तेव्हा असे का न केले जावे की त्यांच्या प्रत्येक मोठ्या गटामधू लहान गट निघावा यासाठी की त्यांनी दीन (धर्मा) ची समज प्राप्त करून घ्यावी आणि यासाठी की त्यांनी आपल्या जनसमूहाच्या लोकांना, जेव्हा ते यांच्याजवळ येतील (अल्लाहचे) भय दाखवावे, यासाठी की त्यांनी भ्यावे.

**१२३.** हे ईमान राखणाऱ्यांनो! त्या काफिरांशी (इन्कारी लोकांशी) लढा जे तुमच्या भोवती आहेत आणि त्यांना तुमच्या अंगी कठोरता आढळली पाहिजे. आणि हा विश्वास राखा की सर्वश्रेष्ठ अल्लाह तकवा (धैर्य-संयम) राखणाऱ्यांच्या सोबत आहे.

**१२४.** आणि जेव्हा एखादी सूरह (अध्याय) अवतरित केली जाते, तेव्हा काही ढोंगी ईमानधारक म्हणतात की या सूरहने तुमच्यापैकी कोणाचे ईमान वाढविले आहे? तेव्हा जे (सच्चे) ईमानधारक आहेत, या सूरहने त्यांच्या ईमानात वृद्धी केली आहे आणि ते आनंदित होत आहेत.

**१२५.** आणि ज्यांच्या मनात रोग (विकृती) आहे, या सूरहने त्यांच्यात त्यांच्या गलिच्छतेसह आणखी गलिच्छता वाढवून दिली आहे आणि ते कुफ्र (इन्कार करण्या) च्या स्थितीतच मरण पावले.

**१२६.** आणि काय त्यांनी पाहिले नाही की हे लोक दरवर्षी एकदा किंवा दोनदा कोणत्या न कोणत्या संकटात टाकले जातात, तरीही ते ना तौबा (क्षमा-याचना) करतात, ना बोध प्राप्त करतात.

**१२७.** आणि जेव्हा एखादी सूरह (अध्याय) अवतरित केली जाते तेव्हा एकमेकांना

पाहू लागतात की तुम्हाला कोणी पाहत तर नाही, मग चालू लागतात. अल्लाहने यांचे मन फिरविले आहे या कारणाने की ते समजून न घेणारे लोक आहेत.

**१२८.** तुमच्याजवळ एका अशा पैगंबराचे आगमन झाले आहे, जे तुमच्यापैकीच आहेत, ज्यांना तुमच्या हानीविषयक गोष्टी खूप क्लेशदायक वाटतात जे तुमच्या लाभाचे मोठे इच्छुक असतात. ईमान राखणाऱ्यासाठी अतिशय स्नेहशील व मेहरबान आहेत.

**१२९.** मग जर ते (लोक) तोंड फिरवतील तर तुम्ही त्यांना सांगा की माझ्यासाठी अल्लाह पुरेसा आहे, त्याच्याखेरीज कोणीही सच्चा माबूद (उपास्य) नाही. मी त्याच्यावरच भरोसा केला आणि तो फार मोठ्या अर्श (सिंहासना) चा मालक (स्वामी) आहे.

# सूरह यूनुस-१०

सूरह यूनुस मक्का येथे अवतरली आणि यात एकशे नऊ आयती आणि अकरा रुकूउ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** अलिफ. लाम.रॉ या हिकमत आणि बुद्धिमत्तापूर्ण ग्रंथाच्या आयती आहेत.

**२.** काय त्या लोकांना या गोष्टीचे आश्चर्य वाटले की आम्ही त्यांच्यातल्या एका माणसाजवळ वहयी (अवतरित संदेश) पाठविली की समस्त मानवांना (अल्लाहचे) भय दाखवावे आणि जे ईमान राखतील त्यांना ही खूशखबर द्या की त्यांच्या पालनकर्त्याजवळ त्यांना पुरेपूर मोबदला आणि मान-सन्मान लाभेल. इन्कारी लोक म्हणाले की हा माणूस खात्रीने स्पष्ट जादूगार (तांत्रिक) आहे.

**३.** निःसंशय, तुमचा पालनकर्ता अल्लाहच आहे, ज्याने सहा दिवसांत आकाशांना व जमिनीला निर्माण केले, मग अर्श (सिंहासना) वर स्थिर (कायम) झाला. तो प्रत्येक कामाची व्यवस्था राखतो. त्याच्या अनुमतीविना त्याच्याजवळ कोणी शिफारस करणारा नाही. असा अल्लाह तुमचा रब (पालनकर्ता) आहे. तेव्हा तुम्ही त्याचीच उपासना करा. मग काय तरीही तुम्ही बोध प्राप्त करीत नाही ?

**४.** तुम्हा सर्वांना अल्लाहच्याच जवळ जायचे आहे. अल्लाहने सच्चा वायदा केलेला आहे. निःसंशय तोच पहिल्यांदा निर्माण करतो, मग तोच दुसऱ्यांदा निर्माण करील, यासाठी की अशा लोकांना, ज्यांनी ईमान राखले आणि सत्कर्मे केलीत, त्यांना न्यायपूर्वक मोबदला द्यावा आणि ज्यांनी इन्कार केला, त्यांना पिण्यासाठी उकळते पाणी मिळेल आणि दुःखदायक शिक्षा-यातना लाभेल त्यांच्या इन्कार करण्यापायी.

**५.** तो (अल्लाह) असा आहे, ज्याने सूर्याला तेजस्वी बनविले आणि चंद्राला प्रकाशमान बनविले आणि त्याच्यासाठी स्थान (गंतव्य) निर्धारीत केले, यासाठी की तुम्ही वर्षांची गणना व हिशोब लावू शकावे व हिशोबाला जाणून घ्यावे. अल्लाहने या सर्व वस्तू व्यर्थ निर्माण केल्या नाहीत, तो हा पुरावा त्यांना स्पष्ट सांगत आहे जे अक्कल राखतात.

**६.** निःसंशय रात्र आणि दिवसाच्या एका पाठोपाठ येण्यात, आणि अल्लाहने आकाशात व धरतीत जे काही निर्माण केले आहे, त्या सर्वांत अशा लोकांकरिता पुरावा (प्रमाण) आहे जे अल्लाहचे भय बाळगतात.

**७.** ज्या लोकांना आमच्याजवळ येण्यावर विश्वास नाही आणि ते ऐहिक जीवनावर राजी झाले आहेत आणि त्यातच जीव गुंतवून बसले आहेत आणि जे आमच्या आयतींपासून गाफील आहेत.

**८.** अशा लोकांचे ठिकाण त्यांच्या कर्मांमुळे नरक (जहन्नम) आहे.

**९.** निःसंशय, ज्या लोकांनी ईमान राखले आणि त्यांनी सत्कर्मे केलीत, तर त्यांचा पालनकर्ता ते ईमानधारक असण्याच्या सबबीवर त्यांना (त्यांच्या ध्येय उद्दिष्टाप्रत) पोहचविल, सुखाच्या अशा बागांमध्ये, ज्यांच्या खाली प्रवाह वाहत असतील.

**१०.** तिथे त्यांच्या तोंडून उद्‌गार निघेल सुबहानल्लाह[१] (अल्लाह पवित्र आहे) आणि त्यांचे एकमेकांशी अभिवादन असेल अस्सलामु अलैकुम (सलामती असो तुमच्यावर) आणि शेवटी ते हे म्हणतील की समस्त स्तुती प्रशंसा अल्लाहकरिताच आहे, जो समस्त विश्वांचा पालनकर्ता आहे.

---

(१) अर्थात जन्नतमध्ये जाणारे प्रत्येक क्षणी अल्लाहची महानता आणि त्याची प्रशंसा करण्यात मग्न असतील, ज्याप्रमाणे हदीसमध्ये उल्लेख आहे.... जन्नतवाल्यांच्या मुखातून अल्लाहची महानता आणि प्रशंसा अशा प्रकारे निघेल, ज्याप्रमाणे श्वास निघतो.

**११.** आणि जर अल्लाहने लोकांना त्वरित हानी पोहचविली असती, जसे लोक त्वरित लाभ इच्छितात, तेव्हा त्यांच्या वायदा केव्हाच पूर्ण झाला असता यास्तव आम्ही त्या लोकांना त्यांच्या दशेवर सोडतो, ज्यांना आमच्याजवळ घेण्यावर विश्वास नाही, यासाठी की त्यांनी आपल्या विद्रोहात भटकत राहावे.

**१२.** आणि जेव्हा माणसाला एखादी दुःख-यातना पोहोचते, तेव्हा आम्हाला पुकारतो, पहुडलेल्या स्थितीतही, बसलेल्या स्थितीतही, उभा असतानाही. मग जेव्हा आम्ही त्याची दुःख-यातना दूर करतो, तेव्हा तो असा होतो की जणू त्याने आपल्याला पोहोचलेल्या दुःख-यातनेकरिता आम्हाला कधी पुकारलेच नव्हते[१] या मर्यादा ओलांडणाऱ्यांची कर्मे त्याच्याकरिता त्याचप्रमाणे मनपसंत बनविली गेली आहेत.

**१३.** आणि आम्ही तुमच्यापूर्वी कित्येक अशा जनसमूहांचा सर्वनाश केला जेव्हा त्यांनी अत्याचार केला, वास्तविक त्यांच्याजवळ त्यांचे पैगंबरही निशाण्या घेऊन आले होते आणि ते केव्हा असे होते की ईमान राखले असते? अपराधी लोकांना आम्ही अशाच प्रकारे दंड देतो.

**१४.** मग त्यांच्यानंतर आम्ही या जगात त्यांच्याजागी तुम्हाला आबाद केले यासाठी की आम्ही हे बघावे की तुम्ही कशा प्रकारची कामे करतात.

**१५.** आणि जेव्हा त्यांच्यासमोर आमच्या आयती वाचल्या जातात, ज्या अगदी स्पष्ट आहेत, तेव्हा हे लोक, ज्यांना आमच्याजवळ येण्यावर विश्वास नाही, असे म्हणतात की याच्याखेरीज दुसरा कुरआन आणि किंवा यात काही फेरबदल करून टाका. तुम्ही (स.) त्यांना सांगा की मला याचा अधिकार नाही की आपल्यातर्फे त्यात काही बदल करावा. मी तर त्याचेच अनुसरण करेन जे माझ्याजवळ वहयीद्वारे आले आहे. जर मी आपल्या पालनकर्त्याची अवज्ञा करेन तर मी एका मोठ्या दिवसाच्या शिक्षा-यातनेचे भय राखतो.

---

(१) हे माणसाच्या त्या अवस्थेचे वर्णन आहे, जे अधिकांश लोकांचे आचरण आहे, किंबहुना बहुतेक लोक, जे अल्लाहला मानतात तेही असेच आचरण करतात की संकटप्रसंगी खूप अल्लाह अल्लाह कतात, दुआ मागतात, तौबा इस्तिगफार (अपराधांची माफी मागणे) करतात, परंतु अल्लाहने ते संकट दूर करताच अल्लाहला असे विसरतात की दुआ मागणे, तौबा करणे वगैरे सोडून देतात. आणि ज्या अल्लाहने त्यांची दुआ-प्रार्थना स्वीकारून संकटमुक्त केले त्या अल्लाहशी कृतज्ञता व्यक्त करण्याचेही सौभाग्य व सुबुद्धी त्यांना होत नाही.

**१६.** तुम्ही सांगा की जर अल्लाहने इच्छिले असते, तर ना मी तुम्हाला ते वाचून ऐकविले असते आणि ना अल्लाहने तुम्हाला त्याची खबर दिली असती, कारण यापूर्वी तर मी आयुष्याच्या दीर्घ अवधीपर्यंत तुमच्यात राहिलो आहे. मग काय तुम्ही समज बाळगत नाही ?

**१७.** तेव्हा, त्याहून जास्त अत्याचारी कोण असेल जो अल्लाहविषयी खोटे रचेल किंवा त्याच्या आयतींना खोटे म्हणेल. निःसंशय असे अपराधी लोक कधीही सफल होणार नाहीत.

**१८.** आणि हे लोक अल्लाहला सोडून अशा वस्तूंची उपासना करतात, जे ना त्यांना हानी पोहचवू शकतील आणि ना त्यांना लाभ पोहचवू शकतील आणि म्हणतात की हे अल्लाहच्या समोर आमची शिफारस करणारे आहेत. तुम्ही सांगा, काय तुम्ही अल्लाहला अशा गोष्टींची खबर देता, ज्या तो जाणत नाही आकाशमध्ये व धरतीत. तो पवित्र आणि श्रेष्ठ आहे त्या लोकांच्या शिर्क (सहभागी करण्या) पासून.

**१९.** आणि समस्त लोक एकाच उम्मत (धर्मसमुदाया) चे होते, मग त्यांनी मतभेद निर्माण केले[१] आणि जर एक गोष्ट नसती जी तुमच्या पालनकर्त्यातर्फे निर्धारीत केली गेली आहे तर ज्या गोष्टीत हे लोक मतभेद करीत आहेत त्यांचा पूर्णपणे निकाल लावला गेला असता.

**२०.** आणि हे लोक असे म्हणतात की त्यांच्यावर अल्लाहचा एखादा चमत्कार (मोजिजा) का नाही अवतरित झाला ? (तेव्हा तुम्ही) सांगा की अपरोक्षाचे (गैबचे) ज्ञान केवळ अल्लाहला आहे, तेव्हा तुम्हीही प्रतिक्षा करा, मीदेखील तुमच्यासोबत प्रतिक्षेत आहे.

**२१.** आणि जेव्हा आम्ही लोकांना दुःख पोहचल्यानंतर सुखाचा स्वाद चाखवतो तेव्हा ते त्वरित आमच्या आयतींविषयी चालबाजी करू लागतात. तुम्ही सांगा की अल्लाह

---

(१) अर्थात हा शिर्क (अनेकेश्वरवाद) लोकांनी स्वतः निर्माण केला आहे आणि सुरुवातीला याचे अस्तित्वही नव्हते, समस्त लोक एकाच दीन (धर्मा) च्या मार्गावर अर्थात इस्लामवर होते, ज्यात तौहीद (एकेश्वरवादा) ला विशेष स्थान आहे. पैगंबर हजरत नूह पर्यंत लोक याच तौहीदच्या मार्गावर चालत राहिले, पुढे त्यांच्यात मतभेद झाले परिणामी काही लोकांनी अल्लाहच्या सोबत इतरांनाही उपास्य आराध्य देवता आणि कष्टिनिवारक (मुश्किल कुशा) मानायला सुरुवात केली.

योजना आखण्यात तुमच्यापेक्षा अधिक चपळ आहे. निःसंशय, आमचे फरिश्ते तुमची कपट कारस्थाने लिहित आहेत.

**२२.** तो (अल्लाह) असा आहे, जो तुम्हाला समुद्रात आणि खुष्कीत प्रवासाचे सामर्थ्य देतो, येथपर्यंत की जेव्हा तुम्ही नौकेत असता आणि त्या नावा, लोकांना अनुकूल वाऱ्याद्वारे नेत असतात, आणि ते लोक त्यांच्यापासून आनंदित होतात. त्यांच्यावर वादळी वाऱ्याचा झोका येतो आणि सर्व बाजूंनी लाटा उठतात आणि ते समजतात की (वाईटरित्या) येऊन घेरले गेलो (त्या वेळी) सर्वच, सचोटीच्या ईमान आणि श्रद्धेसह अल्लाहलाच पुकारतात की जर तू या (संकटा) पासून वाचवशील तर आम्ही अवश्य (तुझे) कृतज्ञशील बनू.

**२३.** मग जेव्हा सवश्रेष्ठ अल्लाह त्यांना वाचवतो तेव्हा त्वरित ते धरतीत नाहक उत्पात (फसाद) माजवू लागतात. हे लोकांनो! तुमचा हा विद्रोह तुमच्यासाठी दुःखदायक ठरणार आहे, ऐहिक जीवनाचे काही लाभ आहेत, मग (नंतर) तुम्हाला आमच्याकडे यायचे आहे. तेव्हा आम्ही तुम्हाला तुमच्या सर्व हरकती दाखवू.

**२४.** ऐहिक जीवनाची स्थिती अशी आहे, जणू आकाशातून आम्ही पाऊस पाडला, मग त्याद्वआरे जमिनीची वनस्पती (झाडे-झुडपे) ज्यांना मानव आणि जानवरे खातात, खूप हिरवी टवटवीत होऊन निघाली, येथपर्यंत की जेव्हा त्या जमिनीने आपल्या शोभा-सजावटीचा पूर्ण हिस्सा घेतला आणि ती खूप सुंदर झाली आणि तिच्या मालकांना वाटले की आता आम्ही हिच्यावर पूर्णपणे हक्कदार झालो तेव्हा दिवसा किंवा रात्री, तिच्यावर आमच्यातर्फे एखादा (आपत्तीचा) आदेश आला, तर आम्ही तिला असे साफ करून टाकले की जणू काल (परवा) येथे नव्हतीच. अशा प्रकारे आम्ही निशाण्यांना सविस्तरपणे सांगतो त्या लोकांसाठी ते विचार चिंतन करतात.

**२५.** आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह, तुम्हाला सलामतीच्या घराकडे बोलावितो आणि ज्याला इच्छितो, सरळ मार्ग दाखवितो.

**२६.** ज्या लोकांनी सत्कर्म केले आहे, त्यांच्यासाठी भलाई आहे आणि काही जास्तही आणि त्यांच्या मुखावर काळोखी नसेल आणि ना अपमान हे लोक जन्नतमध्ये राहणारे आहेत. ते नेहमी त्यात राहतील.

**२७.** आणि ज्या लोकांनी वाईट कर्म केले, त्यांना त्यांच्या दुष्कर्मांची शिक्षा समान[१] मिळेल आणि त्यांच्यावर अपमान आच्छादित होईल, त्यांना अल्लाहपासून कोणीही वाचवू शकणार नाही, त्यांच्या तोंडावर जणू काही अंधाऱ्या रात्रीचे थर गुंडाळले गेले असतील. हे लोक नरकात राहणारे आहेत, ते सदैव तेथे राहतील.

**२८.** आणि तो दिवसदेखील आठवण करण्यायोग्य आहे, ज्या दिवशी आम्ही त्या सर्वांना एकत्र करू; मग अनेक ईश्वरांची भक्ती- आराधना करणाऱ्यांना सांगू की तुम्ही आणि तुमचे सहभागी ईश्वर आपल्या जागी थांबा, मग आम्ही त्यांच्यात आपसात फूट पाडू आणि त्यांचे ते सहभागी म्हणतील की तुम्ही आमची उपासना (पूजा) करीत नव्हता.

**२९.** तेव्हा आमच्या आणि तुमच्या दरम्यान अल्लाह पुरेसा आहे, साक्षीच्या स्वरूपात की आम्हाला तुमच्या उपासनेची खबरदेखील नव्हते.

**३०.** त्या ठिकाणी, प्रत्येक मनुष्य आपण पूर्वी केलेल्या कर्मांची जाच-पडताळ करेल आणि हे लोक अल्लाहकडे, जो त्यांचा खराखुरा स्वामी आहे, परतविले जातील आणि जी असत्य (आराध्य दैवते) त्यांनी बनविली होती ती सर्व त्यांच्यापासून गायब होतील.

**३१.** तुम्ही सांगा की तो कोण आहे, जो तुम्हाला आकाश व जमिनीतून रोजी (अन्नसामुग्री) पोहचवितो किंवा तो कोण आहे जो कानांवर आणि डोळ्यांवर पूर्ण अधिकार राखतो आणि तो कोण आहे जो निर्जीवातून सजीव बाहेर काढतो, आणि निर्जीवाला सजीवातून बाहेर काढतो आणि तो कोण आहे जो समस्त कार्यांचे व्यवस्थापन राखतो. निःसंशय ते हेच म्हणतील की अल्लाह! तेव्हा त्यांना सांगा की, मग तुम्ही भय का राखत नाही?

**३२.** तर हा आहे अल्लाह, जो तुमचा सच्चा स्वामी व पालनकर्ता आहे, मग सत्यानंतर आणखी काय बाकी राहिले भटकण्याशिवाय, मग कोठे भटकत जात आहात?

**३३.** अशाच प्रकारे तुमच्या पालनकर्त्याचे हे फर्मान की हे ईमान राखणार नाहीत, सर्व दुराचारी लोकांबाबत सिद्ध ठरले आहे.

---

(१) पहिल्या आयतीत जन्नतमध्ये राहणाऱ्या लोकांचे वर्णन होते. त्यात असे सांगितले गेले की त्यांना आपल्या सत्कर्मांचा मोबदला अनेक पटींनी मिळेल आणि याहून जास्त अल्लाहच्या दर्शनाने सन्मानित होतील. नंतरच्या आयतीत हे सांगितले जात आहे की वाईट कर्माचे फळ त्या कर्माच्या प्रमाणातच मिळेल. अरबीत 'सिकत'चा अर्थ (अधर्म) आणि शिर्क व इतर दुराचार होय.

**३४.** तुम्ही (अशा प्रकारे) सांगा की, काय तुमच्या सहभागी ईश्वरांपैकी कोणी असा आहे जो पहिल्यांदाही निर्माण करील, मग दुसऱ्यांदा निर्माण करील तुम्ही सांगा, अल्लाहच पहिल्या खेपेस निर्माण करतो, मग तोच दुसऱ्या खेपेसही निर्माण करील, मग तुम्ही उलटपावली कोठे जात आहात?

**३५.** तुम्ही सांगा, की तुमच्या त्या सहभागी ईश्वरांमध्ये कोणी असा आहे जो सत्य मार्ग दाखवित असेल? तुम्ही सांगा की अल्लाहच सत्याचा मार्ग दाखवितो, तेव्हा मग जे सामर्थ्य सत्याचा मार्ग दाखवित असेल ते जास्त अनुसरण करण्यास पात्र आहे की तो मनुष्य, ज्याला सांगितल्याविना स्वतःच मार्ग दिसून न यावा, तेव्हा तुम्हाला झाले तरी काय, तुम्ही कशा प्रकारे निर्णय घेता?

**३६.** आणि त्यांच्यापैकी बहुतेक लोक निराधार विचारांच्या मागे चालत आहेत. निःसंशय, अनुमान अटकळी, सत्य (ओळखण्या) संदर्भात काहीच उपयोगी पडू शकत नाही. हे लोक जे काही करीत आहेत, निश्चितच अल्लाह ते सर्व काही जाणतो.

**३७.** आणि हा कुरआन असा नाही की अल्लाह (च्या वहयी) शिवाय (स्वतःच) रचून घेतला गेला असेल. किंबहुना हा तर (त्या ग्रंथांच्या) सत्यतेचे समर्थन करणारा आहे, जे यापूर्वी अवतरित केले गेले आहेत. आणि ग्रंथा (आवश्यक आदेशां) चे सविस्तर वर्णन आहे. यात मुळीच शंका नाही की (हा ग्रंथ) समस्त विश्वांच्या पालनकर्त्यातर्फे आहे.

**३८.** काय हे लोक असे म्हणतात की तुम्ही या ग्रंथाला (आपल्या मनाने) रचले आहे? तुम्ही सांगा, तर मग तुम्ही यासारखी एक तरी सूरह (अध्याय) बनवून आणा, आणि अल्लाहखेरीज ज्यांना ज्यांना बोलावू शकाल त्यांना बोलावून घ्या जर तुम्ही सच्चे असाल.

**३९.** किंबहुना ते अशा गोष्टीला खोटे ठरवू लागले, जिला त्यांनी आपल्या ज्ञान-कक्षेत आणले नाही आणि अजून त्यांना याचा अंतिम परिणाम लाभला नाही. जे लोक यांच्यापूर्वी होऊन गेलेत, त्यांनीही असेच खोटे ठरविले होते, तर पाहा त्या अत्याचारींचा शेवट कसा झाला?

**४०.** आणि त्यांच्यापैकी काही असे आहेत, जे यावर ईमान राखतील, आणि काही असे आहेत की त्यावर ईमान राखणार नाहीत, आणि तुमचा पालनकर्ता उपद्रवी लोकांना

चांगल्या प्रकारे जाणतो.

**४१.** आणि जर ते तुम्हाला खोटे ठरवित राहिले तर त्यांना हे सांगा की मी केलेले मला लाभेल आणि तुम्ही केलेले तुम्हाला लाभेल. तुम्ही मी केलेल्या (कर्मा) साठी जबाबदार नाहीत आणि मी, तुम्ही केलेल्या (कर्मा) साठी जबाबदार नाही.

**४२.** आणि त्यांच्यात काही असे आहेत, जे तुमच्याकडे कान लावून ऐकतात, काय तुम्ही बहिऱ्या लोकांना ऐकवता, त्यांना अक्कल नसली तरीही ?

**४३.** आणि त्यांच्यात काही असे आहेत की तुम्हाला पाहात आहेत. मग काय तुम्ही आंधळ्यांना मार्ग दाखवू इच्छिता, ते डोळे राखत नसले तरीही ?

**४४.** निःसंशय, अल्लाह लोकांवर किंचितही अत्याचार करीत नाही, परंतु लोक स्वतःच आपल्यावर अत्याचार करतात.

**४५.** आणि त्यांना त्या दिवसाची आठवण करून द्या, ज्या दिवशी अल्लाह त्यांना (आपल्या समोर) अशा स्थितीत एकत्र करील की (त्यांना वाटेल) की (जगात) दिवसाचा एक अर्धा क्षण राहिले असावेत आणि आपसात एकमेकांना ओळखण्यासाठी उभे असतील. वास्तविक हानीग्रस्त झाले ते लोक, ज्यांनी अल्लाहजवळ जाण्याला खोटे ठरविले आणि ते मार्गदर्शन प्राप्त करणारे नव्हते.

**४६.** आणि आम्ही ज्या गोष्टीचा त्यांच्याशी वायदा करीत आहोत, तिचा काही भाग तुम्हाला दाखवून द्यावा किंवा (तो जाहीर होण्यापूर्वी) आम्ही तुम्हाला मृत्यु द्यावा, तेव्हा त्यांना आमच्याजवळ तर यायचेच आहे, मग अल्लाह साक्षी आहे यांच्या सर्व कामांवर.

**४७.** आणि प्रत्येक समुदाया (उम्मत) साठी एक रसूल (सन्देष्टा) आहे. मग जेव्हा त्यांचा पैगंबर येऊन पोहचतो तेव्हा त्यांचा निर्णय न्यायपूर्वक केला जातो आणि त्यांच्यावर जुलूम केला जात नाही.

**४८.** आणि हे लोक म्हणतात, हा कायदा केव्हा पूर्ण होईल जर तुम्ही सच्चे असाल ?

**४९.** तुम्ही सांगा, मी स्वतः आपल्याकरिता तर कसल्याही लाभ आणि हानीचा अधिकार राखत नाही, परंतु तेवढाच जशी अल्लाहची मर्जी असेल, प्रत्येक समुदाया (उम्मत) करिता एक ठरलेली वेळ आहे, जेव्हा त्यांच्या तो निर्धारीत समय येऊन पोहोचतो तेव्हा ना एक क्षण मागे सरकू शकतात आणि ना पुढे जाऊ शकतात.

**५०.** तुम्ही सांगा की हे तर सांगा की जर तुमच्यावर अल्लाहचा अज़ाब (प्रकोप) रात्री येऊन कोसळेल किंवा दिवसा, तेव्हा शिक्षा यातनेत अशी कोणती गोष्ट आहे की अपराधी लोक ती लवकर मागत आहेत.

**५१.** मग काय तो (अज़ाब) येऊन कोसळल्यावरच ईमान राखाल, आता (ईमान) स्वीकारले, वास्तविक तुम्ही त्याची (अज़ाब) ची घाई माजवित होते.

**५२.** मग अत्याचारी लोकांना फर्माविले जाईल आता निरंतर प्रकोपाची गोडी चाखा, तुम्हाला तर तुम्ही केलेल्या कर्मांचाच मोबदला लाभला आहे.

**५३.** आणि ते तुम्हाला विचारतात की काय तो (अज़ाब) खरी गोष्ट आहे? तुम्ही सांगा, माझ्या पालनकर्त्याची शपथ, ती अगदी खरी गोष्ट आहे आणि तुम्ही अल्लाहला कशाही प्रकारे विवश करू शकत नाही.

**५४.** आणि जर प्रत्येक जीव, ज्याने अत्याचार (शिर्क) केला आहे, त्याच्याजवळ एवढे असावे की संपूर्ण जमीन भरून जावी, तरीही ते देऊन आपला प्राण वाचवू लागेल आणि तेव्हा अज़ाब पाहून घेतील, तेव्हा लज्जा लपवून ठेवतील आणि त्यांचा फैसला न्यायपूर्वक होईल आणि त्यांच्यावर अत्याचार केला जाणार नाही.

**५५.** लक्षात ठेवा, जेवढ्या वस्तू आकाशांमध्ये व जमिनीत आहे, त्या सर्व अल्लाहच्याच आहेत. लक्षात ठेवा, अल्लाहचा वायदा अगदी सच्चा आहे, परंतु अधिकांश लोक हे जाणत नाहीत.

**५६.** तोच जीव टाकतो आणि तोच जीव बाहेर काढतो आणि तुम्ही सर्व त्याच्याचकडे आणले जाल.

**५७.** हे लोकांनो! तुमच्याजवळ तुमच्या पालनकर्त्यातर्फे एक अशी गोष्ट आली आहे, जी बोध- उपदेश आहे आणि हृदयात जे (विकार) आहेत, त्यांच्याकरिता रोगमुक्ती आहे आणि मार्गदर्शन करणारी आहे आणि (अल्लाहची) दया- कृपा आहे ईमान राखणाऱ्यांसाठी.

**५८.** तुम्ही सांगा की लोकांनी अल्लाहच्या दया- कृपेवर आनंदित झाले पाहिजे ते तर त्याहून कित्येक पटींनी अधिक चांगले आहे, जे हे जमा करीत आहेत.

**५९.** तुम्ही सांगा, जरा हे सांगा की अल्लाहने तुमच्यासाठी जी रोजी (अन्नसामुग्री)

पाठविली होती, मग तुम्ही तिच्यातला काही हिस्सा हराम आणि काही हल्ला करून घेतला. तुम्ही त्यांना विचारा की काय तुम्हाला अल्लाहने तसा आदेश दिला होता किंवा अल्लाहबाबत उगाच खोटे रचून घेता?

**६०.** आणि जे लोक अल्लाहच्या संबंधाने खोटे रचतात, त्यांचा कयामतविषयी काय विचार आहे? वास्तविक लोकांवर, सर्वश्रेष्ठ अल्लाहचा फार मोठा उपकार आहे. परंतु अधिकांश लोक कृतज्ञता व्यक्त करीत नाही.

**६१.** आणि तुम्ही कोणत्याही स्थितीत असा आणि या स्थितींमध्ये तुम्ही कोठूनही कुरआन पठण करा आणि तुम्ही लोक जे कामदेखील करता आम्हाला सर्वांचीच खबर असते. जेव्हा तुम्ही त्या कामात व्यस्त असता आणि तुमच्या पालनकर्त्यापासून तिळमात्र वस्तू लपलेली नाही, ना धरतीत, ना आकाशात आणि ना एखादी वस्तू त्याहून लहान आणि ना एखादी मोठी, तथापि हे सर्व खुल्या- स्पष्ट ग्रंथात आहे.

**६२.** लक्षात ठेवा, अल्लाहच्या मित्रांना[१] ना कसले भय आहे, ना ते दुःखी होतील.

**६३.** हे असे लोक आहेत, ईमान राखतात आणि (दुराचारापासून) तकवा (अल्लाहचे भय) बाळगतात.

**६४.** त्यांच्याकरिता या जगाच्या जीवनातही[२] आणि आखिरतमध्येही खूशखबर आहे.

---

(१) अवज्ञाकारी लोकांनंतर अल्लाह आपल्या आज्ञाधारकांबद्दल सांगत आहे अर्थात औलिया अल्लाहबद्दल. औलिया वली (मित्र) चे अनेकवचन आहे. वलीचा मूल अर्थ निकटचा, तेव्हा औलिया अल्लाहचा अर्थ होईल. अल्लाहचे ते सच्चे आणि निःस्वार्थ ईमानधारक ज्यांनी अल्लाहचे आज्ञापालन करून, दुष्कर्मांचा त्याग करून अल्लाहचे जवळीक प्राप्त केले. यास्तव अल्लाहने पुढच्या आयतीत फर्माविले, ज्यांनी ईमान राखले व ज्यांनी अल्लाहचे भय मनात राखले आणि याच दोन्ही गोष्टी अल्लाहचे जवळीक प्राप्त करण्याचा आधार व महत्त्वपूर्ण माध्यम आहेत. या कारणाने अल्लाहचे भय राखणारा प्रत्येक ईमानधारक अल्लाहचा वली आहे. वली असण्यासाठी लोकांना चमत्कार दाखविणे आवश्यक वाटते. मग ते आपल्या वलीच्या खऱ्या खोट्या चमत्कारांचा प्रचार करतात, हा विचार अगदी चुकीचा आहे. चमत्कार आणि वली यांचा काडीमात्र संबंध नाही. अल्लाहच्या मर्जीने एखाद्याकडून काही चमत्कार जाहीर झाला तर ती गोष्ट वेगळी. यात वलीची मर्जी सामील नाही. तथापि अल्लाहचे भय राखणाऱ्या एखाद्या ईमानधारक आणि सुन्नतचे अनुसरण करणाऱ्याकडून चमत्कार दिसून येवो किंवा न येवो तो अल्लाहचा वली असण्यात काहीच शंका नाही.

(२) जगात खूशखबर म्हणजे पुण्यकर्म होय, अथवा ती खूशखबर होय जी मृत्युसमयी फरिश्ते एका ईमानधारकाला देतात, जसे की कुरआन व हदीसद्वारे सिद्ध आहे.

सर्वश्रेष्ठ अल्लाहच्या फर्मानात काहीच बदल होत नसतो. ही फार मोठी सफलता आहे.

**६५.** आणि तुम्ही त्यांच्या बोलण्याने दुःखी-कष्टी होऊ नका. परिपूर्ण वर्चस्व अल्लाहकरिताच आहे. तो ऐकणारा, जाणणारा आहे.

**६६.** लक्षात ठेवा, जे काही आकाशांमध्ये आहे आणि जे काही धरतीत आहे ते सर्व अल्लाहचेच आहे, आणि जे लोक अल्लाहला सोडून इतर सहभागींना पुकारतात, ते कोणत्या गोष्टीचे अनुसरण करीत आहेत. केवळ काल्पनिक विचारांचेच अनुसरण करीत आहेत आणि फक्त अटकळीच्याच गोष्टी करीत आहेत.[१]

**६७.** तो (अल्लाह) असा आहे, ज्याने तुमच्यासाठी रात्र बनविली, यासाठी की तुम्ही रात्री आराम करावा आणि दिवसही अशा प्रकारे बनविला की तो पाहण्याचे साधन आहे. निःसंशय यात निशाण्या आहेत, त्या लोकांकरिता जे ऐकतात.

**६८.** ते म्हणतात की अल्लाह संतती बाळगतो, तो या गोष्टीपासून पवित्र आहे. तो तर कोणाचाही गरजवंत नाही जे काही आकाशांमध्ये आहे आणि जे काही धरतीत आहे सर्व त्याचेच आहे. तुमच्याजवळ (तुमच्या कथनाचा) कोणताही पुरावा नाही. काय अल्लाहशी अशा गोष्टीचा संबंध जोडता जिचे तुम्ही ज्ञान बाळगत नाही.

**६९.** तुम्ही सांगा की जे लोक अल्लाहविषयी खोटे रचतात, ते सफल होणार नाहीत.

**७०.** (हे) या जगात थोडेसे सुख आहे, मग त्यांना आमच्याकडे यायचे आहे. मग आम्ही त्यांना त्यांच्या कुफ्र (अविश्वासा) च्या मोबदल्यात सक्त सजा चाखवू.

**७१.** आणि तुम्ही त्यांना नूहचा वृत्तान्त वाचून ऐकवा, जेव्हा ते आपल्या जनसमूहाच्या लोकांना म्हणाले, हे माझ्या जातीबांधवांनो! जर तुम्हाला माझे राहणे आणि अल्लाहच्या आदेशांची शिकवण देणे जड जाते (असह्य होते) तेव्हा माझा तर अल्लाहवरच भरोसा आहे. तुम्ही आपली योजना आपल्या साथीदारांशी मिळून मजबूत करून घ्या, मात्र

---

(१) अर्थात अल्लाहसोबत एखाद्याला सहभागी ठरविणे, कसल्याही पुराव्यावर आधारित नाही, किंबहुना एक अटकळ अनुमानाची देणगी आहे. आज जर मनुष्य आपल्या अकलेचा उचितरित्या उपयोग करील तर निःसंशय त्याला हे स्पष्टपणे उमजू शकते की अल्लाहचा कोणीही सहभागी नाही आणि ज्याप्रमाणे तो आकाशांना व धरतीला निर्माण करण्यात एकटा आहे, कोणी त्यात भागीदार नाही तर मग भक्ती- आराधनेत त्याचे अन्य इतर सहभागी कशा प्रकारे असू शकतात?

तुमची योजना, तुमच्यासाठी मन गुदमरण्याचे कारण ठरू नये. मग माझे (काय करायचे ते) करून टाका आणि मला संधीही देऊ नका.

**७२.** तरीही जर तुम्ही तोंड फिरवित राहाल तर मी तुमच्याकडून काही मोबदला तर मागितला नाही, माझा मोबदला तर फक्त अल्लाहच देईल आणि मला आदेश दिला गेला आहे की मी इस्लाम स्वीकारणाऱ्यांपैकी राहावे.

**७३.** तर ते लोक त्यांना खोटे ठरवित राहिले, मग आम्ही त्यांना, आणि जे त्यांच्यासोबत नौकेत स्वार होते, त्या सर्वांना सुटका प्रदान केली आणि त्यांना वारस बनविले आणि ज्यांनी आमच्या आयतींना खोटे ठरविले होते त्यांना बुडवून टाकले, तेव्हा विचार केल्या पाहिजे की कसा शेवट झाला त्या लोकांचा, ज्यांना पहिल्यापासून भय दाखविले गेले होते.

**७४.** मग नूहनंतर आम्ही दुसऱ्या पैगंबरांना त्यांच्या जनसमूहाकडे पाठविले तेव्हा ते त्यांच्याजवळ स्पष्ट प्रमाण घेऊन आले, परंतु ज्या गोष्टीला त्यांनी पहिल्या खेपेस खोटे ठरविले, नंतर तिच्यावर ईमान राखले असते असे झाले नाही. अशा प्रकारे आम्ही मर्यादा पार करणाऱ्यांच्या हृदयांव मोहर लावतो.

**७५.** मग आम्ही त्या (पैगंबरां) च्या नंतर मूसा आणि हारुनला फिरऔन व त्याच्या सरदारांकडे चमत्कार घेऊन पाठविले, तेव्हा त्या लोकांनी घमेंड दाखविली आणि ते अपराधी जनसमूहाचे लोक होते.

**७६.** मग जेव्हा त्यांच्याजवळ आमच्याकडून सत्य (प्रमाण) पोहोचले तेव्हा ते लोक म्हणू लागले की निःसंशय, ही तर उघड जादू आहे.

**७७.** मूसा म्हणाले, काय तुम्ही या सत्याविषयी, जेव्हा ते तुमच्याजवळ येऊन पोहोचले आहे, अशा गोष्टी बोलता ? काय ही जादू आहे, वस्तुतः जादूगार सफल होत नाही ?

**७८.** ते लोक म्हणाले, काय तुम्ही आमच्याजवळ अशासाठी आला आहात की आम्हाला त्या मार्गापासून हटवून द्यावे, ज्या मार्गावर आम्ही आपल्या पूर्वजांना पाहिले आहे, आणि तुम्हा दोघांना जगात मोठेपणा मिळावा आणि आम्ही तर तुम्हा दोघांना कधीही माानणार नाही.

**७९.** आणि फिरऔन म्हणाला, माझ्याजवळ समस्त निष्णात जादूगारांना घेऊन या.

**८०.** मग जेव्हा जादूगार आले तेव्हा मूसा त्यांना म्हणाले की टाका जे काही तुम्ही टाकू इच्छिता.

**८१.** तर जेव्हा त्यांनी टाकले तेव्हा मूसा म्हणाले की हे जे काही तुम्ही आणले आहे, जादू आहे. निश्चितच अल्लाह याला आताच नष्ट करून टाकील, निःसंशय अल्लाह अशा उपद्रवी लोकांचे काम बनू देत नाही.

**८२.** आणि अल्लाह खऱ्या पुराव्याला आपल्या कथनाने स्पष्ट करतो, मग अपराध्याला कितीही वाईट वाटो.

**८३.** मग मूसावर त्यांच्या जनसमूहाच्या लोकांपैकी केवळ थोड्याच लोकांनी ईमान राखले, तेही फिरऔन आणि आपल्या सरदारांशी भय राखत की कदाचित त्यांना दुःख न पोहचावे आणि खरोखर फिरऔन त्या देशात उच्च (शक्तिशाली) होता आणि ही गोष्टदेखील होती की तो मर्यादेच्या बाहेर गेला होता.

**८४.** आणि मूसा म्हणाले, हे माझ्या जाती-समूहाच्या लोकांनो! जर तुम्ही अल्लाहवर ईमान राखत असाल तर त्याच्यावरच भरवसा करा जर तुम्ही मुसलमान (अल्लाहचे आज्ञाधारक) असाल.

**८५.** तेव्हा ते म्हणाले, आम्ही तर अल्लाहवरच भरोसा केला आहे. हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला या अत्याचारी लोकांसाठी उपद्रवा (चे लक्ष्य) बनवू नका.

**८६.** आणि आम्हाला आपल्या दया- कृपेने या काफिरांपासून सुटका प्रदान कर.

**८७.** आणि आम्ही मूसा व त्याच्या भावाकडे वहयी (अवतरित संदेश) पाठविला की तुम्ही दोघे आपल्या या लोकांकरिता मिस्त्र देशात घर कायम राखा आणि तुम्ही सर्व त्याच घरांना नमाज पढण्याचे स्थान निश्चित करा आणि नित्य नेमाने नमाज अदा करा आणि तुम्ही ईमान राखणाऱ्यांना खूशखबर द्या.

**८८.** आणि मूसा यांनी दुआ- प्रार्थना केली, हे माझ्या पालनहार! तू, फिरऔन आणि त्याच्या सरदारांना शोभा सजावट आणि सर्व प्रकारची धन-दौलत या जगाच्या जीवनात प्रदान केली. हे आमच्या पालनकर्त्या! (अशासाठी प्रदान केली) की त्यांनी तुझ्या मार्गापासून आम्हाला दूर करावे. हे आमच्या पालनकर्त्या! त्यांच्या धन-दौलतीला उद्ध्वस्त करून टाक आणि त्यांच्या हृदयांना सक्त (कठोर) बनव, यासाठी की त्यांना

ईमान राखणे अशक्य व्हावे, येथपर्यंत की त्यांनी दुःखदायक अज़ाब (शिक्षा-यातना) पाहून घ्यावी.

**८९.** (सर्वश्रेष्ठ अल्लाहने) फर्माविले, तुम्हा दोघांची दुआ- प्रार्थना कबूल केली गेली. तुम्ही सरळ मार्गावर राहा आणि अशा लोकांच्या मार्गावर चालू नका, जे नादान आहेत.

**९०.** आणि आम्ही इस्राईलच्या संततीला समुद्रापार केले, मग त्यांच्या पाठोपाठ फिरऔन आपल्या सैन्यासह जुलूम आणि अतिरेक करण्याच्या हेतुने निघाला. येथेपर्यंत की जेव्हा तो बुडायला लागला तेव्हा म्हणाला, मी ईमान राखतो की ज्यावर इस्राईलच्या संततीने ईमान राखले आहे. त्याच्याखेरीज कोणीही उपासनेस पात्र नाही आणि मी इस्लाम स्वीकारणाऱ्यांपैकी आहे.

**९१.** (उत्तरादाखल फर्माविले गेले) आता ईमान राखतो, आणि पूर्वी तर अवज्ञा करीत राहिला आणि उपद्रवी लोकांत सामील राहिला.

**९२.** तेव्हा आज आम्ही तुझ्या मृत शरीराला सोडून देऊ, यासाठी की तू त्या लोकांसाठी बोधचिन्ह ठरावे, जे तुझ्यानंतर (येणार आहेत. आणि निःसंशय अधिकांश लोक आमच्या निशाण्यांपासून गाफील आहेत.

**९३.** आणि आम्ही इस्राईलच्या संततीला फार उत्तम राहण्याचे ठिकाण दिले आणि आम्ही त्यांना स्वच्छ- शुद्ध वस्तू खाण्यासाठी प्रदान केल्या, तेव्हा त्यांनी मतभेद केला नाही, येथपर्यंत की त्यांच्याजवळ ज्ञान येऊन पोहोचले. निःसंशय, तुमचा पालनकर्ता त्यांच्या दरम्यान कयामतच्या दिवशी त्या गोष्टींबाबत निर्णय करील, ज्यात ते मतभेद करीत होते.

**९४.** मग जर तुम्ही त्याच्याविषयी संशयग्रस्त असाल, जे आम्ही तुमच्याकडे पाठविले आहे तर तुम्ही त्या लोकांना विचारा जे तुमच्या पूर्वीच्या ग्रंथांचे पठण करतात. निःसंशय तुमच्याजवळ तुमच्या पालनकर्त्यातर्फे सत्यनिष्ठ ग्रंथ आला आहे तेव्हा तुम्ही कधीही शंका करणाऱ्यांपैकी होऊ नका.

**९५.** आणि ना अशा लोकांपैकी व्हा, ज्यांनी सर्वश्रेष्ठ अल्लाहच्या आयतींना खोटे ठरविले अन्यथा तुम्ही तोटा उचलणाऱ्यांपैकी व्हाल.

**९६.** निःसंशय, ज्या लोकांविषयी तुमच्या पालनकर्त्याचे फर्मान खरे ठरले आहे, ते

ईमान राखणार नाहीत.

**९७.** मग त्यांच्याजवळ सर्व निशाण्या पोहचल्या असल्या तरी, जोपर्यंत ते दु:खदायक अज़ाब पाहून न घेतील.

**९८.** यास्तव कोणत्याही वस्तीने ईमान राखले नाही की ईमान राखले त्यांच्यासाठी लाभदायक ठरले असते, यूनुसच्या जनसमूहाखेरीज. जेव्हा त्यांनी ईमान राखले तेव्हा आम्ही अपमानाचा अज़ाब (प्रकोप) या जगाच्या जीवनात त्यांच्या वरून हटविला आणि त्यांना एका (निश्चित) वेळेपर्यंत सुख भोगण्याचा अवसर दिला.

**९९.** आणि जर तुमच्या पालनकर्त्याने इच्छितले असते तर साऱ्या धरतीच्या समस्त लोकांनी ईमान राखले असते. तर काय तुम्ही लोकांना विवश करू शकता की त्यांनी ईमानधारक व्हावेच.

**१००.** वास्तविक एखाद्याचे ईमान राखणे अल्लाहच्या हुकूमाविना शक्य नाही आणि अल्लाह, अक्कल नसलेल्यांना गलिच्छतेत टाकतो.

**१०१.** तुम्ही सांगा की जरा विचार करा की आकाशांमध्ये व धरतीत कस-कशा वस्तू आहेत आणि जे लोक ईमान राखत नाहीत त्यांना निशाणी आणि चेतावणी कसलाही लाभ पोहचवित नाही.

**१०२.** तेव्हा काय ते लोक केवळ त्या लोकांसारख्या घटनांची वाट बघत आहेत ज्या त्यांच्यापूर्वी होऊन गेल्यात. (तुम्ही) सांगा की ठीक आहे, तर तुम्ही वाट बघत राहा. मीदेखील तुमच्यासोबत वाट बघणाऱ्यांपैकी आहे.

**१०३.** मग आम्ही आपल्या पैगंबरांना आणि ईमान राखणाऱ्यांना वाचवित होतो. अशा प्रकारे आमच्या अधिकारात आहे की आम्ही ईमानधारकांना सुटका देत असतो.

**१०४.** (तुम्ही) सांगा, हे लोकांनो! जर तुम्ही माझ्या दीन- धर्माविषयी संशयग्रस्त असाल तर मी त्या दैवतांची उपासना करीत नाही, ज्यांची तुम्ही अल्लाहला सोडून भक्ती- आराधना करतात, परंतु हो, त्या अल्लाहची उपासना करतो जो तुमचा प्राण बाहेर काढतो आणि मला आदेश दिला गेला आहे की मी ईमान राखणाऱ्यांपैकी राहावे.

**१०५.** आणि हे की एकाग्रचित्त होऊन आपले तोंड या दीन- धर्माकडे करावे आणि कधीही अनेकेश्वरवाद्यांपैकी न बनावे.

**१०६.** आणि अल्लाहला सोडून कधीही अशा वस्तूला पुकारू नका जी तुम्हाला ना काही फायदा पोहचवू शकेल आणि ना काही नुकसान पोहचवू शकेल तरीही जर तुम्ही असे करला तर अशा स्थितीत तुम्ही जुलमी लोकांपैकी ठराल.

**१०७.** आणि जर तुम्हाला अल्लाह एखादे दु:ख पोहचविल तर त्याच्याशिवाय ते दु:ख दूर करणारा दुसरा कोणीही नाही आणि जर तो तुम्हाला एखादे सुख देऊ इच्छिल तर त्याच्या कृपेला कोणीही हटविणार नाही. तो आपली कृपा आपल्या दासांपैकी ज्यावर इच्छिल प्रदान करील, आणि तो मोठा माफ करणारा आणि अतिशय दया करणारा आहे.

**१०८.** (तुम्ही) सांगा, हे लोकांनो! तुमच्याजवळ, तुमच्या पालनकर्त्यातर्फे सत्य घेऊन पोहचले आहे. यास्तव जो मनुष्य सरळ मार्गावर येईल, तर तो स्वत: (च्या भल्या) साठी सरळ मार्गावर येईल आणि जो मनुष्य सरळ मार्गापासून भटकला तर त्याचे संकट त्याच्यावरच कोसळेल आणि मी तुमच्यावर देखरेख ठेवणारा बनविलो गेलो नाही.

**१०९.** आणि तुम्ही त्याचे अनुसरण करीत राहा, जे काही वहयी (अवतरित आदेश) तुमच्याकडे पाठविले जात आहे आणि धीर-संयम राखा, येथपर्यंत की अल्लाहने निर्णय करावा आणि तो समस्त शासकांपेक्षा उत्तम शासक आहे.

—-

# सूरह हूद-११

सूरह हूद मक्का येथे अवतरली आणि यात एकसे तेवीस आयती आणि दहा रुकूउ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** अलिफ. लाम. रॉ . हा एक असा ग्रंथ आहे की याच्या आयती मजबूत केल्या गेल्या आहेत, मग सविस्तर सांगितल्या गेल्या आहेत एका हिकमतशाली, पूर्ण ज्ञान राखणाऱ्यातर्फे.

**२.** हे की अल्लाहशिवाय कोणाचीही उपासना करू नका. मी तुम्हाला अल्लाहतर्फे भय दाखविणारा आणि खूशखबर देणारा आहे.

**३.** आणि हे की तुम्ही आपल्या अपराधांना आपल्या पालनकर्त्याकडून माफ करवून

घ्या, मग त्याच्याचकडे एकचित्त व्हा. तो तुम्हाला एका निर्धारीत वेळेपर्यंत (जीवन) सामुग्री देईल आणि प्रत्येक चांगले काम करणाऱ्यावर अधिक कृपा करील आणि जर तुम्ही लोक तोंड फिरवित राहिलात तर मला तुमच्याबाबत एका मोठ्या दिवसाच्या शिक्षेची चिंता वाटते.

**४.** तुम्हाला अल्लाहच्याच जवळ जायचे आहे आणि तो प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्य बाळगतो.

**५.** लक्षात ठेवा ते लोक आपल्या छातींना दुहेरी करून घेतात, यासाठी की आपल्या गोष्टी (बोलणे) अल्लाहपासून लपवू शकावे. लक्षात ठेवा की ते लोक ज्या वेळी आपले कपडे गुंडाळतात, त्या वेळीही तो सर्व काही जाणतो जे काही लपवितात (कानगोष्टी करतात) आणि जे काही साफ- स्पष्ट बोलतात. निःसंशय तो मनातल्या गोष्टीही जाणतो.

**६.** आणि जमिनीवर चालण्या-फिरणाऱ्या प्रत्येक सजीवाच्या अन्नसामुग्रीची जबाबदारी अल्लाहवर आहे. तोच त्यांच्या निवासाचे ठिकाणही जाणतो आणि त्यांना सोपविले जाण्याचे ठिकाणही. सर्व काही स्पष्ट ग्रंथात आहे.

**७.** आणि तो (अल्लाहच) होय, ज्याने सहा दिवसांत आकाशांना आणि जमिनीला

निर्माण केले आणि त्याचे सिंहासन (अर्श) पाण्यावर होते[1] यासाठी की त्याने तुमची कसोटी घ्यावी की तुमच्यात सदाचारी कोण आहे? जर तुम्ही त्यांना सांगाल की तुम्हाला मेल्यानंतर पुन्हा जिवंत केले जाईल, तर इन्कारी लोक उत्तर देतील की ही केवळ उघड जादू आहे.

**८.** आणि जर आम्ही काही मुदतीपर्यंत त्यांच्यावरील शिक्षा- यातना स्थगित केली तर हे निश्चित उद्‌गारतील की अज़ाबला कोणत्या गोष्टीने रोखले आहे, ऐका! ज्या दिवशी अज़ाब त्यांच्या जवळ येऊन पोहोचेल, मग तो त्यांच्यावरून टळणार नाही, मग तर ज्याची ते थट्टा उडवित होते, तोच त्यांच्यावर उलटून पडेल.

**९.** आणि जर आम्ही माणसाला एखाद्या सुखाची गोडी चाखवून, मग ते त्याच्याकडून हिरावून घेतो, तेव्हा तो फार उदास आणि मोठा कृतघ्न बनतो.

**१०.** आणि जर आम्ही त्याला एखादे सुख पोहचवितो, त्या दुःखानंतर जे त्याला पोहोचले होते, तेव्हा तो म्हणू लागतो की आता माझ्या कष्ट-यातना दूर झाल्या[2] निश्चितच तो खूप आनंदित होऊन घमेंड करू लागतो.

**११.** त्यांच्याखेरीज, जे धीर-संयम राखतात आणि सत्कर्म करीत राहतात अशाच लोकांसाठी क्षमाही आहे आणि फार मोठा मोबदलाही.

**१२.** तर कदाचित तुम्ही त्या वहयी (ईश-संदेशा) चा एखादा भाग सोडून देणार आहात, जो तुमच्याकडे अवतरीत केला जातो आणि त्यामुळे तुमच्या मनात संकोच आहे केवळ त्यांच्या या बोलण्यावर की याच्यावर एखादा खजिना का नाही उतरविला गेला? किंवा याच्यासोबत एखादा फरिश्ता तरी आला असता. ऐका! तुम्ही तर केवळ भय दाखविणारेच आहात आणि प्रत्येक चीजवस्तूची देखरेख करणारा केवळ अल्लाह आहे.

---

(१) हीच गोष्ट सहीह हदीसद्वारेही सिद्ध होते. यास्तव एका हदीस वचनात उल्लेखित आहे की सर्वश्रेष्ठ अल्लाहने आकाश व जमिनीची निर्मिती करण्याच्या पन्नास हजार वर्षे आधी सृष्टी निर्मितीचे भाग्य लिहिले त्या वेळी त्याचे अर्श अर्थात सिंहासन पाण्यावर होते. (सहीह मुस्लिम, किताबुल कदर आणि पाहा सहीह बुखारी, बदउलखल्क)

(२) अर्थात तो असे समजतो की कष्ट- यातनांचा क्रम आता संपला, यापुढे कोणत्याही कठीण प्रसंगाला तोंड द्यावे लागणार नाही.

**१३.** काय ते असे म्हणतात की या कुरआनाला त्याने आपल्या मनाने रचले आहे. तुम्ही उत्तर द्या की तुम्हीदेखील अशा दहा सूरह (अध्याय) मनाने रचून आणा आणि अल्लाहखेरीज वाटेल त्याला आपल्यासोबत सामील करून घ्या, जर तुम्ही सच्चे असाल.

**१४.** मग जर ते तुमचे हे म्हणणे मान्य न करतील तर तुम्ही खात्रीपूर्वक जाणून घ्या की हा ग्रंथ (कुरआन) अल्लाहच्या ज्ञानासह अवतरित केला गेला आहे आणि हे की अल्लाहशिवाय कोणीही उपास्य नाही. तर काय तुम्ही मुस्लिम होता?

**१५.** जो मनुष्य ऐहिक जीवन आणि शोभा- सजावटीवर आसक्त असेल तर अशांना आम्ही सर्व कर्मांचा (मोबदला) इथेच पूर्णतः देऊन टाकतो आणि इथे त्यांना कसलीही कमतरता ठेवली जात नाही.

**१६.** मात्र हेच ते लोक होत, ज्यांच्यासाठी आखिरतमध्ये आगीशिवाय दुसरे काहीही नाही आणि जे काही त्यांनी इथे केले असेल ते तिथे सर्व व्यर्थ आहे आणि जी काही त्यांची कर्मे होती, ती सर्व नाश पावणारी आहेत.

**१७.** तो, जो आपल्या पालनकर्त्यातर्फे एका प्रमाणावर कायम असेल, आणि त्याच्यासोबत अल्लाहतर्फे साक्षी असेल, आणि त्याच्यापूर्वी मूसाचा ग्रंथ (साक्षी) असेल जो मार्गदर्शक आणि दया- कृपा आहे. (दुसऱ्यांप्रमाणे असू शकतो?) हेच लोक आहेत, जे त्यावर ईमान राखतात आणि सर्व समूहांपैकी, जोदेखील याचा इन्कारी असेल त्याच्या अंतिम वायद्याचे ठिकाण जहन्नम आहे.[१] तेव्हा तुम्ही त्याबाबत कसल्याही संशयात पडू नका. निःसंशय हे तुमच्या पालनकर्त्यातर्फे पूर्णतः सत्य आहे. परंतु अधिकांश लोक ईमान बाळगणारे नसतात.

**१८.** आणि त्याहून अधिक अत्याचारी कोण असेल, जो अल्लाहबाबत खोटे रचेल. हे लोक आपल्या पालनकर्त्यासमोर सादर केले जातील आणि साक्ष देणारे सर्व म्हणतील

---

(१) सर्व समूहांशी अभिप्रेत साऱ्या जगात आढळणारे धर्म होत. यहूदी, ख्रिश्चन, अग्निपूजक, बौद्ध, अनेकेश्वरोपासक व इतर जोदेखील पैगंबर मुहम्मद (स.) आणि कुरआनावर ईमान राखणार नाही, त्याचे ठिकाण जहन्नम आहे. हीच गोष्ट हदीसमध्ये उल्लेखित आहे. शपथ आहे त्या शक्तीची जिच्या ताब्यात माझा प्राण आहे. या उम्मतीच्या ज्या यहूदी किंवा ख्रिश्चनाने माझ्या प्रेषित्वाबाबत ऐकले आणि मग माझ्यावर ईमान राखले नाही तो नरकात जाईल. (सहीह मुस्लिम, किताबुल ईमान प्रकरण वजूबुल ईमान)

की हे असे लोक आहेत ज्यांनी आपल्या पालनकर्त्याविषयी असत्य रचले. खबरदार! अल्लाहतर्फे धिक्काराचा मारा आहे अशा अत्याचारी लोकांवर.[१]

**१९.** जे अल्लाहच्या मार्गापासून रोखतात आणि त्यात चुका शोधण्यामागे लागतात. हेच ते लोक होते, जे आखिरतचा इन्कार करतात.

**२०.** असे लोक ना या जगात अल्लाहला हरवू शकले, आणि ना त्यांचा कोणी मदतकर्ता अल्लाहखेरीज झाला. त्यांच्यासाठी शिक्षा दुप्पट केली जाईल ना ते ऐकण्याचे सामर्थ्य बाळगत होते आणि पाहातही नव्हते.

**२१.** हेच ते लोक होते ज्यांनी स्वतःच आपले नुकसान करून घेतले आणि त्यांच्याकडून त्यांनी रचलेले असत्य हरवले.

**२२.** निःसंशय हे लोक आखिरत (मरणोत्तर जीवना) मध्ये तोट्यात असतील.

**२३.** निःसंशय, ज्यांनी ईमान राखले आणि सत्कर्म करीत राहिले आणि आपल्या पालनकर्त्याकडे झुकतही राहिले, तेच लोक जन्नतमध्ये जाणार आहेत जिथे ते नेहमी नेहमी राहतील.

**२४.** दोन्ही गटांचे उदाहरण असे आहे जणू एक आंधळा आणि बहिरा तर दुसरा डोळस आणि ऐकणारा. उदाहरणात काय हे दोन्ही समान आहेत? काय तरीही तुम्ही बोध प्राप्त करीत नाहीत?

**२५.** आणि निःसंशय आम्ही नूह (अलै.) यांना त्यांच्या जनसमूहाकडे रसूल (संदेशवाहक) बनवून पाठविले की मी तुम्हाला स्पष्टपणे सचेत करणारा आहे?

---

(१) हदीसमध्ये याचे स्पष्टीकरण अशा प्रकारे आहे की कयामतच्या दिवशी अल्लाह एका ईमानधारकाकडून त्याचे अपराध कबूल करून घेईल की तुला माहीत आहे की तू अमुक एक अपराध केला होता. तो म्हणेल, हो बरोबर आहे. मग अल्लाह फर्माविल की मी त्या अपराधांवर जगात आवरण घातले होते, तेव्हा आजही त्यांना क्षमा करतो. थथापि इतर लोक किंवा काफिरांचा मामला असा असेल की त्यांना साक्ष देणाऱ्यांसमोर पुकारले जाईल आणि साक्ष देणारे साक्ष देतील की हेच ते लोक होते, ज्यांनी आपल्या पालनकर्त्याबाबत खोटे रचले होते. (सहीह बुखारी - तफसीर सूरह हूद)

**२६.** की तुम्ही फक्त अल्लाहचीच उपासना करा, मला तर तुमच्याविषयी दु:खदायक दिवसाच्या शिक्षा- यातनेचे भय वाटते.

**२७.** त्यांच्या जनसमूहाच्या काफिर सरदारांनी उत्तर दिले की आम्ही तर तुम्हाला आपल्याचसारखे मनुष्य असल्याचे पाहतो आणि तुमच्या अनुयायींनाही पाहतो की स्पष्टत: खालच्या पातळीच्या लोकांखेरीज दुसरा कोणी नाही. (जे तुमचे अनुसरण करीत आहेत) आम्हाला तर तुम्ही कोणत्याही प्रकारे आमच्यापेक्षा श्रेष्ठ दिसत नाही, उलट आम्ही तर तुम्हाला खोटे समजतो.

**२८.** (नूह) म्हणाले, हे माझ्या जातीबांधवांनो! मला हे सांगा, जर मी आपल्या पालनकर्त्यातर्फे स्पष्ट निशाणीवर कामय असलेला आणि मला त्याने आपल्याकडून (एखादी चांगली) दया- कृपा प्रदान केली असेल, मग ती तुमच्या डोळ्यांत सामावली नाही तर काय जबरदस्तीने तिला तुमच्या गळ्यात टाकू, वास्तविक तुम्ही तिला इच्छित नाही.

**२९.** हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! मी याच्या मोबदल्यात तुमच्याकडून कसलेही धन मागत नाही. माझा मोबदला तर केवळ सर्वश्रेष्ठ अल्लाहजवळ आहे, ना मी ईमानधारकांना आपल्या जवळून दूर करू शकतो, त्यांना आपल्या पालनकर्त्याशी भेटायचे आहे. परंतु मी असे पाहतो की तुम्ही लोक मूर्खपणा करीत आहात.

**३०.** आणि हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! जर मी ईमानधारकांना आपल्यापासून दूर करेन, तर अल्लाहच्या विरोधात कोण माझी मदत करू शकतो, काय तुम्ही थोडादेखील विचार करीत नाहीत?

**३१.** आणि मी तुम्हाला हे नाही सांगत की माझ्याजवळ अल्लाहचे खजिने आहेत. (ऐका!) मी अपरोक्षाचेही ज्ञान बाळगत नाही, ना मी हे सांगतो की मी फरिश्ता आहे. ना माझे असे म्हणणे आहे की ज्यांच्यावर तुमची नजर अपमानाने पडत आहे त्यांना अल्लाह एखादी भलाई देणारच नाही. त्यांच्या मनात जे काही आहे अल्लाह ते चांगल्या प्रकारे जाणतो. जर मी असे म्हणेन तर निश्चितच माझीही गणना अत्याचारी लोकांत होईल.

**३२.** (जनसमूहाचे लोक) म्हणाले, हे नूह! तू आमच्याशी खूप खूप वाद घातला आहेस. आता तर ज्या गोष्टीचे भय तू आम्हाला दाखवित आहेस तीच आमच्याजवळ आणून दाखव जर तू सच्चा आहेस.

**३३.** उत्तर दिले, तीदेखील अल्लाहच आणील जर तो इच्छिल, आणि होय! तुम्ही अल्लाहला विवश करू शकत नाही.

**३४.** आणि तुम्हाला माझा उपदेश काहीच लाभ पोहचवू शकत नाही, मग मी कितीही तुमचे भले इच्छिले तरीही. जर अल्लाहची मर्जी तुम्हाला भटकत ठेवण्याची असेल. तोच तुम्हा सर्वांचा पालनकर्ता आहे आणि त्याच्याचकडे तुम्ही परतून जाल.

**३५.** काय हे म्हणतात की हा ग्रंथ पैगंबराने स्वतः मनाने रचलेला आहे? तर तुम्ही उत्तर द्या की जर तो मी मनाने रचलेला असेल तर माझा गुन्हा माझ्यावर आहे आणि मी त्या अपराधांपासून वेगळा आहे, जे तुम्ही करीत आहात.

**३६.** आणि नूहकडे वहयी (ईशसंदेश) पाठविली गेली की तुमच्या जनसमूहामध्ये ज्यांनीदेखील ईमान राखले आहे, त्यांच्याखेरीज आता कोणीही ईमान राखणार नाही. तेव्हा त्यांच्या कर्मांबद्दल दुःखी होऊ नका.

**३७.** आणि एक नौका आमच्या डोळ्यांदेखत आणि आमच्या वहयीनुसार तयार करा आणि अत्याचारी लोकांविषयी आम्हाला काहीही बोलू नका, त्यांना पाण्यात बुडविले जाणार आहे.

**३८.** ते (नूह) नाव बनवू लागले, त्यांच्या जनसमूहाचे ज्या ज्या गटाचे लोक त्यांच्या जवळून जात, त्यांची थट्टा उटवित. ते (नूह) म्हणत, जर तुम्ही आमची थट्टा उडवित असाल तर आम्हीदेखील एक दिवस तुमच्यावर हसणार जशी तुम्ही थट्टा करीत आहात.

**३९.** तुम्हाला लवकरच माहीत पडेल की कोणावर शिक्षा-यातना येणार आहे जी त्याला अपमानित करील आणि त्याच्यावर निरंतर अज़ाब उतरेल.

**४०.** येथेपर्यंत की जेव्हा आमचा आदेश येऊन पोहोचला आणि तंदूरमधून पाणी उचंबळू लागले, आम्ही सांगितले की या नौकेत प्रत्येक प्रकारच्या (नर व मादा अशा) जोड्या स्वार करून घ्या आणि आपल्या कुटुंबियांनाही, मात्र त्यांच्याखेरीज ज्यांच्याबद्दल आधीच फैसला झालेला आहे आणि सर्व ईमान राखणाऱ्यांनाही. थ्यांच्यासोबत ईमान राखणारे फारच कमी होते.

**४१.** आणि नूह म्हणाले की या नौकेत स्वार व्हा अल्लाहच्याच नावाने हिचे चालणे आणि थांबणे आहे. निःसंशय, माझा पालनकर्ता मोठा माफ करणारा आणि दया करणारा

आहे.

**४२.** आणि तो नौका त्यांना पर्वतासमान लाटांमधून नेत होती आणि नूहने आपल्या पुत्राला, जो एका किनाऱ्यावर होता, हाक मारून म्हटले, हे माझ्या प्रिय पुत्रा! आमच्यासोबत स्वार हो आणि इन्कारी लोकांत सामील राहू नकोस.

**४३.** त्याने उत्तर दिले की मी एखाद्या उंच पर्वताच्या आश्रयाला जाईन, जो मला पाण्यापासून वाचवील. नूह म्हणाले, आज अल्लाहच्या हुकुमाने वाचविणारा कोणीही नाही. केवळ तेच वाचतील, ज्यांच्यावर अल्लाहची दया- कृपा होईल, त्याच क्षणी त्यांच्या दरम्यान एक लाट आली आणि तो बुडणाऱ्यांपैकी झाला.

**४४.** आणि फर्माविले गेले की, हे जमीन! आपले पाणी गिळून टाक, आणि हे आकाश! पुरे कर,थांब. त्याच वेळी पाणी सुकवले गेले आणि काम पूर्ण केले गेले आणि नौका जूदी नावाच्या पर्वताशी जाऊन थांबली आणि फर्माविले गेले अन्याय करणाऱ्यांवर धिक्काराचा वर्षाव होवो.

**४५.** आणि नूहने आपल्या पालनकर्त्यास पुकारले आणि म्हटले, हे माझ्या पालनकर्त्या! माझा पुत्र तर माझ्या कुटुंबियांपैकी आहे. निश्चितच तुझा वायदा पूर्णतः सच्चा आहे आणि तू समस्त शासकांपेक्षा उत्तम शासक आहे.

**४६.** (अल्लाहने) फर्माविले, हे नूह! खात्रीने तो तुझ्या कुटुंबियांपैकी नाही.[१] त्याची कर्मे अगदी नापसंतीची आहेत. तू कधीही अशा गोष्टीची याचना करू नये, जिचे तुला किंचितही ज्ञान नसावे. मी तुला उपदेश करतो की तू अडाणी लोकांमध्ये आपली गणना करण्यापासून थांब.

**४७.** (नूह) म्हणाले, हे माझ्या पालनकर्त्या! मी तुझेच शरण मागतो, या गोष्टीपासून की तुझ्याकडे अशा गोष्टीची याचना करावी, जिचे मला ज्ञानच नसावे जर तू मला माफ केले नाही आणि माझ्यावर दया केली नाही तर मी तोटा उचलणाऱ्यांपैकी होईन.

---

(१) हजरत नूह यांनी आपल्या कौटुंबिक सान्निध्यापायी त्याला आपला पुत्र म्हटले होते. परंतु अल्लाहने ईमानाच्या आधारावर, धर्मनिष्ठ नियमानुसार या गोष्टीस नकार दर्शविला की तो तुमच्या कुटुंबियांपैकी आहे कारण एका पैगंबराचा खरा परिवार तर तोच आहे, जो त्याच्यावर ईमान राखेल. मग तो कोणीही असो आणि जर ईमान न राखेल तर मग तो पैगंबराचा पिता असो, पुत्र असो, किंवा पत्नी असो. पैगंबराच्या कुटुंबाचा सदस्य ठरू शकत नाही.

**४८.** फर्माविले गेले, हे नूह! आमच्यातर्फे सलामती आणि त्या समृद्धींसह उतर ज्या तुझ्यावर आहेत आणि तुझ्यासोबतच्या अनेक जनसमुदायांवर आणि अनेक समुदाय असे असतील, ज्यांना आम्ही लाभ तर निश्चित पोहोचवू, परंतु नंतर त्यांना आमच्यातर्फे दुःखदायक शिक्षाही पोहोचेल.

**४९.** ही खबर परोक्षाच्या खबरींपैकी आहे, ज्यांची वहयी (अवतरण) आम्ही तुमच्याकडे करतो. यांना यापूर्वी ना तुम्ही जाणत होते, आणि ना तुमचा जनसमूह. यास्तव तुम्ही धीर- संयम राखा. निःसंशय, परिणाम अल्लाहचे भय राखून वागणाऱ्यांकरिताच आहे.

**५०.** आणि आद जनसमूहाकडे त्यांचे भाऊ हूद यांना पाठविले. हूद म्हणाले, हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! अल्लाहची उपासना करा, त्याच्याखेरीज कोणीही उपास्य नाही, तुम्ही तर केवळ असत्य रचत आहात.

**५१.** हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! मी तुमच्याकडून याचा काही मोबदला मागत नाही. माझा मोबदला तर त्याच्याकडे आहे, ज्याने मला निर्माण केले आहे. तर काय तरीही तुम्ही अकलेचा वापर करीत नाही?

**५२.** आणि हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! तुम्ही आपल्या पालनकर्त्याजवळ आपल्या अपराधांची माफी मागा आणि त्याच्या दरबारात तौबा (क्षमा-याचना) करा. यासाठी की त्याने पाऊस पाडणारे ढग तुमच्यावर पाठवावेत. आणि तुमच्या शक्ती-सामर्थ्यात आणखी वाढ करावी आणि तुम्ही गुन्हेगार बनून तोंड फिरवू नका.

**५३.** जनसमूहाचे लोक म्हणाले, हे हूद! तू आमच्याजवळ एखादे प्रमाण तर आणले नाही, आणि आम्ही केवळ तुझ्या सांगण्यावरून आपल्या दैवतांना सोडणार नाहीत आणि ना आम्ही तुझ्यावर ईमान राखणार आहोत.

**५४.** किंबहुना आम्ही तर म्हणतो की तुला आमच्या एखाद्या दैवताने झपाटून टाकले आहे. हूद म्हणाले, मी अल्लाहला साक्षी बनवितो आणि तुम्हीदेखील साक्षी राहा की मी तर अल्लाहखेरीज त्या सर्वांपासून वेगळा आहे, ज्यांना तुम्ही (अल्लाहचा) सहभागी बनवित आहात.

**५५.** ठीक, तुम्ही सर्व मिळून माझ्याविरूद्ध वाईट कारवाई करून टाका, आणि मला कधीही सवड देऊ नका.

**५६.** माझा भरोसा केवळ अल्लाहवरच आहे, जो माझा पालनकर्ता आणि तुम्हा सर्वांचा पालनकर्ता आहे. जेवढेदेखील चालणारे फिरणारे आहेत, त्या सर्वांचे मस्तिष्क (कपाळ) त्यानेच धरून ठेवले आहे. निःसंशय माझा पालनकर्ता अगदी सरळ मार्गावर आहे.

**५७.** तरीही तुम्ही तोंड फिरवित असाल तर फिरवा. मी तर तुम्हाला तो संदेश पोहचता केला, जो देऊन मला तुमच्याकडे पाठविले गेले होते. माझा पालनकर्ता तुमच्या जागी दुसऱ्या लोकांना आणील आणि तुम्ही त्याचे काहीच बिघडवू शकणार नाहीत. निःसंशय माझा पालनकर्ता प्रत्येक चीज वस्तूचा संरक्षक आहे.

**५८.** आणि जेव्हा आमचा आदेश येऊन पोहोचला, तेव्हा आम्ही हूदला आणि त्याच्या ईमानधारक साथीदारांना आपल्या खास दया-कृपेने सुटका प्रदान केली आणि आम्ही त्या सर्वांना भयंकर (सक्त) शिक्षा-यातनेपासून वाचविले.[१]

**५९.** हा होता आदचा जनसमूह, ज्यांनी आपल्या पालनकर्त्याच्या आयतींचा इन्कार केला आणि त्याच्या पैगंबरांची अवज्ञा केली आणि प्रत्येक विद्रोही अवज्ञाकारीच्या आदेशांचे पालन केले.

**६०.** आणि या जगातही त्यांचा धिःक्कार व निर्भत्सना होत राहिली आणि कयामतच्या दिवशीही[२] पाहा, आदच्या जनसमूहाने आपल्या पालनकर्त्याशी इन्कार केला. हूदचा जनसमूह आदचा धिःक्कार असो.

**६१.** आणि समूदच्या जनसमूहाकडे त्यांचे भाऊ सॉलेह यांना पाठविले. सॉलेह म्हणाले, हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! तुम्ही अल्लाहचीच भक्ती उपासना करा, त्याच्याखेरीज तुमचा कोणीही उपास्य नाही. त्यानेच तुम्हाला जमिनीपासून निर्माण केले आहे, आणि त्याने या धरतीवर तुम्हाला आबाद केले आहे. यास्तव तुम्ही त्याच्याजवळ

---

(१) सक्त शिक्षेशी अभिप्रेत तीच वादळाची शिक्षा होय, ज्याद्वारे हजरत हूद (अलै.) यांचा जनसमूह आदला नष्ट केले गेले आणि ज्यापासून हजरत हूद आणि त्यांच्यावर ईमान राखणाऱ्यांना वाचविले गेले.
(२) मूळ शब्द लानत अर्थात अल्लाहतर्फे धिःक्कार, त्याच्या दया-कृपेपासून वंचितता सत्कर्मांपासून दुरावणे आणि लोकांतर्फे धिःक्कार निर्भत्सना जगातही लानत अशा प्रकारे की ईमान राखणाऱ्यांमध्ये यांची चर्चा नेहमी धिःक्कार आणि निर्भत्सनेच्या स्वरूपात होईल आणि कयामतमध्ये अशा प्रकारे की तिथे सर्वांच्याच समोर अपमानला तोंड देतील आणि अल्लाहच्या महाभयंकर शिक्षा-यातनेस पात्र ठरतील.

माफी मागा आणि त्याच्याचकडे तौबा (क्षमा-याचना) करा. निःसंशय माझा पालनकर्ता तौबा कबूल करणारा समीप आहे.

**६२.** जनसमूहाचे लोक म्हणाले, हे सॉलेह! याच्या पूर्वी आम्ही तुमच्याकडून अनेक आशा अपेक्षा बाळगून होतो. काय तुम्ही आम्हाला त्यांच्या भक्तीपासून रोखता, ज्यांची भक्ती आराधना आमचे वाडवडील करत आले, आम्हाला तर या धर्माबाबत शंका आहे, ज्याकडे तुम्ही आम्हाला बोलावित आहात.

**६३.** सालेह म्हणाले, हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! बरे हे सांगा, जर मी आपल्या पालनकर्त्यातर्फे एखाद्या खास प्रमाणावर असेल आणि त्याने मला आपल्या जवळून दया-कृपा प्रदान केली असेल, मग मी जर त्याची अवज्ञा केली तर असा कोण आहे, जो त्याच्यासमोर माझी मदत करेल? तुम्ही तर माझ्या नुकसानातच भर टाकत आहात.

**६४.** आणि हे माझ्या जातीबांधवांनो! ही अल्लाहने पाठविलेली सांडणी आहे, जी तुमच्याकरिता अल्लाहचा एक चमत्कार आहे. आता तुम्ही तिला अल्लाहच्या धरतीवर चरण्यासाठी मोकळे सोडा आणि तिला कशाही प्रकारचा त्रास पोहचवू नका, अन्यथा लवकरच तुम्हाला अज़ाब येऊन धरेल.

**६५.** तरीही त्या लोकांनी त्या सांडणीचे पाय कापून (मारून टाकले). यावर सॉलेह म्हणाले, ठीक तर तुम्ही आपल्या घरांमध्ये तीन दिवस पर्यंत वास्तव्य करून घ्या, हा वायदा खोटा नाही.

**६६.** मग जेव्हा आमचा आदेश येऊन पोहोचला, आम्ही सॉलेह आणि त्यांच्यावर ईमान राखणाऱ्यांना आपल्या दया-कृपेने त्या (शिक्षे) पासूनही वाचविले आणि त्या दिवसाच्या अपमानापासूनही. निःसंशय तुमचा पालनकर्ता शक्तिशाली आणि जबरदस्त आहे.

**६७.** आणि अत्याचारी लोकांना मोठा भयंकर आवाजाने येऊन धरले, मग ते आपल्या घरांमध्ये तोंडघशी मरून पडलेले राहिले.

**६८.** अशा प्रकारे जणू ते त्या ठिकाणी कधी राहिलेच नव्हते. सावधान! समूदच्या जनसमूहाने आपल्या पालनकर्त्याचा इन्कार केला. ऐका! त्या समूदच्या लोकांवर धिःक्कार आहे.

**६९.** आणि आम्ही पाठिवलेले दूत इब्राहीमजवळ शुभ समाचार घेऊन पोहोचले आणि

सलाम म्हणाले. त्यांनीदेखील सलामचे प्रत्युत्तर दिले आणि विनाविलंब भाजलेले वासरु घेऊन आले.

**७०.** आणि जेव्हा पाहिले की त्यांचे हातदेखील त्या (खाद्या) कडे पोहचत नाही, तर त्यांना अनोळखी जाणून मनातल्या मनात भयभीत होऊ लागले. दूत म्हणाले, भिऊ नका. आम्हाला तर लूतच्या जनसमूहाकडे पाठविले गेले आहे.

**७१.** आणि त्यांची पत्नी, जी उभी होती, ती हसली, तेव्हा आम्ही तिला इसहाकचा आणि त्याच्यानंतर याकूबचा शुभ समाचार दिला.

**७२.** ती म्हणू लागली, हाय रे दुर्दैव! मला मूलबाळ होऊ शकते? मी तर स्वतः म्हातारी आणि माझे पतीही खूप वयस्कर आहेत. निश्चितच ही मोठ्या आश्चर्याची गोष्ट होय.

**७३.** (फरिश्ते) म्हणाले, काय तुम्हाला अल्लाहच्या सामर्थ्याविषयी आश्चर्य वाटत आहे. या घराच्या लोकांनो! तुमच्यावर अल्लाहची दया-कृपा आणि त्याच्या बरकती (समृद्धी) अवतरीत होवो! निःसंशय समस्त स्तुती- प्रशंसा आणि शान- वैभव अल्लाहकरिताच आहे.

**७४.** जेव्हा इब्राहीम यांची भीती नाहीशी झाली आणि त्यांना शुभ समाचारही कळला तेव्हा लूतच्या जनसमूहाबाबत आमच्याशी वादविवाद करू लागले.

**७५.** निःसंशय, इब्राहीम मोठे संयमशील आणि कोमल मनाचे आणि अल्लाहकडे झुकणारे होते.

**७६.** हे इब्राहीम! हा इरादा सोडून द्या. तुमच्या पालनकर्त्याचा आदेश येऊन पोहोचला आहे, आणि त्यांच्यावर न परतविल्या जाणाऱ्या शिक्षा- यातना अवश्य येणार आहेत.

**७७.** आणि जेव्हा आम्ही पाठविलेले फरिश्ते लूतजवळ पोहोचले, तेव्हा त्यांच्या कारणाने ते फार दुःखी झाले आणि मनातल्या मनात दुःख करू लागले आणि म्हणू लागले, आजचा दिवस फार दुःखाचा दिवस आहे.

**७८.** आणि त्याच्या जनसमूहाचे लोक त्यांच्याकडे धावत आले. ते तर आधीपासूनच वाईट कामात मग्न होते. (लूत) म्हणाले की, हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! माझ्या या मुली आहेत, ज्या तुमच्यासाठी फार साफसुथऱ्या आहेत. अल्लाहचे भय राखा आणि

मला माझ्या पाहुण्यांबाबत अपमानित करू नका. काय तुमच्यात एकही भला माणूस नाही?

**७९.** जनसमूहाच्या लोकांनी उत्तर दिले की तुम्हाला चांगल्या प्रकारे माहीत आहे की आम्हाला तुमच्या मुलीवर कसलाही अधिकार नाही आणि तुम्ही आमची खरी इच्छा चांगल्या प्रकारे जाणून आहात.

**८०.** (लूत) म्हणाले, मला तुमच्याशी लढण्याची शक्ती असती तर फार बरे झाले असते किंवा मी एखाद्या मजबूत आश्रयाला असतो.

**८१.** आता (फरिश्ते) म्हणाले, हे लूत! आम्ही तुमच्या पालनकर्त्याचे पाठविलेले आहोत. अशक्य आहे की हे तुमच्यापर्यंत पोहचावेत. तेव्हा तुम्ही आपल्या कुटुंबियांना घेऊन थोडी रात्र बाकी राहताना निघून जा. तुमच्यापैकी कोणीही मागे वळून पाहू नये. मात्र तुमच्या पत्नीखेरीज, कारण तिलाही तेच पोहचणार आहे, जे सर्वांना पोहोचेल. निश्चितच त्यांच्या वायद्याची वेळ सकाळची आहे, तर काय सकाळ अगदी जवळ नाही?

**८२.** मग जेव्हा आमचा आदेश येऊन पोहोचला, आम्ही त्या वस्तीला उलथे पालथे करून टाकले. वरचा हिस्सा खाली केला आणि त्यांच्यावर खंगर दगडांचा वर्षाव केला जे थरावर थर होते.

**८३.** तुमच्या पालनकर्त्यातर्फे चिन्हांकित (निशाण असलेले) होते आणि ते त्या अत्याचारीपासून किंचितचही दूर नव्हते.

**८४.** आणि (आम्ही) मदयनच्या लोकांकडे त्यांचे भाऊ शुऐबला पाठविले. शुऐब म्हणाले, हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! अल्लाहची उपासना करा, त्याच्याखेरीज तुमचा कोणीही उपास्य नाही. तुम्ही माप-तोल करण्यात कमी करू नका. मी तुम्हाला सुसंपन्न अवस्थेत पाहात आहे आणि मला तुमच्याबद्दल घेरून टाकणाऱ्या दिवसाच्या अज़ाब (शिक्षा-यातने) चे भयदेखील आहे.

**८५.** हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! माप-तोल न्यायपूर्वक करा, लोकांना त्यांच्या वस्तू कमी (करून) देऊ नका आणि धरतीत उत्पात आणि बिघाड माजवू नका.

**८६.** अल्लाहचा हलाल (वैध) केलेला बाकी फायदा तुमच्यासाठी फारच चांगला आहे, जर तुम्ही ईमान राखणारे असाल. मी काही तुमच्यावर देखरेख ठेवणारा नाही.

**८७.** जनसमूहाच्या लोकांनी उत्तर दिले, हे शुऐब! काय तुमची उपासना तुम्हाला हाच आदेश देते की आम्ही आपल्या वाडवडिलांच्या आराध्य दैवतांना सोडून द्यावे आणि आम्ही आपल्या धन-संपत्तीत जे काही करू इच्छितो, ते करणेही सोडून द्यावे. तुम्ही तर मोठे समंजस आणि सदाचारी आहात.

**८८.** शुऐब म्हणाले, हे माझ्या जातीबांधवांनो! पाहा, जर मी आपल्या पालनकर्त्यातर्फे स्पष्ट प्रमाणासह आहे आणि त्याने आपल्याकडून चांगली रोजी (अन्नसामुग्री) देऊन ठेवली आहे. माझी कधीही ही इच्छा नाही की तुम्हाला मनाई करून स्वतः त्या गोष्टीकडे झुकावे जिच्यापासून तुम्हाला रोखत आहे. माझा इरादा तर आपल्या कुवतीनुसार सुधारणा करण्याचाच आहे, आणि माझी सुबुद्धी (तौफीक) अल्लाहच्याच मदतीने आहे. त्याच्यावरच माझा भरोसा आहे, आणि त्याच्याकडेच मला परतून जायचे आहे.

**८९.** आणि हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! कदाचित असे न व्हावे की तुम्ही माझ्या विरोधात येऊन त्या शिक्षा-यातनांना पात्र ठरावे ज्या नूहच्या जनसमूहावर आणि हूदच्या जनसमूहावर आणि सालेहच्या जनसमूहावर आल्या आणि लूतचा जनसमूह तर तुमच्यापासून किंचितही दूर नाही!

**९०.** आणि तुम्ही आपल्या पालनकर्त्याजवळ माफी मागा आणि त्याच्याचकडे झुका. निश्चितच माझा पालनकर्ता अतिशय दयावान आणि खूप प्रेम करणारा आहे.

**९१.** ते (लोक) म्हणाले, हे शुऐब! तुमच्या बहुतेक गोष्टी आम्हाला समजत नाही आणि आम्ही तुम्हाला आपल्या दरम्यान खूप कमकुवत असल्याचे पाहतो. जर तुमच्या कबिल्याविषयी आदर नसता तर आम्ही तुमच्यावर दगडफेक केली असती आणि आम्ही तुम्हाला एखादा प्रतिष्ठित मनुष्य समजत नाही.

**९२.** शुऐब म्हणाले, हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! काय तुमच्या दृष्टीने माझ्या कबिल्याचे लोक अल्लाहपेक्षा जास्त सन्मानित आहेत की (ज्यामुळे) तुम्ही त्याला पाठीमागे टाकले आहे. निःसंशय, तुम्ही जे काही करीत आहात, माझ्या पालनकर्त्याने ते सर्व घेरलेले आहे.

**९३.** आणि हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! आता तुम्ही आपल्या ठिकाणी काम

करीत राहा, मीदेखील काम करीत आहे. लवकरच तुम्हाला माहीत पडेल की कोणाकडे तो अज़ाब येतो, जो त्याला अपमानित करून टाकील आणि असा कोण आहे जो खोटा आहे? तुम्ही प्रतिक्षा करा आणि मीदेखील तुमच्यासोबत प्रतिक्षा करीत आहे.

**९४.** आणि जेव्हा आमचा आदेश (अज़ाब) येऊन पोहोचला, आम्ही शुऐबला आणि त्यांच्यासह समस्त ईमानधारकांना आपल्या खास कृपेने मुक्ती प्रदान केली आणि अत्याचारी लोकांना मोठ्या भयंकर आवाजाच्या अज़ाबाने येऊन धरले[१] ज्यामुळे ते आपल्या घरांमध्ये पालथे पडून राहिले.

**९५.** जणू काही ते त्या घरांमध्ये कधी राहिलेच नव्हते. सावध राहा! मदयनकरिताही तसाच दुरावा असो, जसा दुरावा समूदसाठी झाला.

**९६.** आणि निःसंशय, आम्हीच मूसाला आपल्या आयती आणि स्पष्ट प्रमाणांसह पाठविले होते.

**९७.** फिरऔन आणि त्याच्या सरदारांकडे, तरीही त्या लोकांनी फिरऔनच्या आदेशांचे पालन केले आणि फिरऔनचा कोणताही आदेश उचित आणि रास्त नव्हता.

**९८.** तो तर कयामतच्या दिवशी आपल्या जनसमूहाचा पुढाकार घेऊन त्या सर्वांना नरकात आणून उभा करील. तो मोठा वाईट घाट आहे जिथे हे लोक जाऊन पोहचतील.

**९९.** आणि त्यांच्यावर या जगातही धिःक्कार (चा मारा) झाला आणि कयामतच्या दिवशीही. किती वाईट इनाम (बक्षीस) आहे, जे त्यांना दिले गेले.

**१००.** वस्त्यांचा हा काही समाचार, जो आम्ही तुमच्यासमोर निवेदन करीत आहोत, त्यांच्यापैकी काही अस्तित्वात आहेत आणि काही कापणी केलेल्या पिकांसारख्या झाल्या.

**१०१.** आणि आम्ही त्यांच्यावर कोणताही जुलूम-अत्याचार केला नाही, किंबहुना त्यांनी स्वतःच आपल्यावर अत्याचार केला आणि त्यांना त्यांच्या आराध्य दैवतांनी कसलाही लाभ पोहचविला नाही, ज्यांना ते अल्लाहखेरीज पुकारत होते, वास्तविक

(१) याच भयंकर चित्काराने त्यांच्या हृदयाची शकले झाली आणि ते मरण पावलेत. त्यानंतर भूकंपही आला. असाच उल्लेख सूरह आराफ-९१ आणि सूरह अनकबूत-३७ मध्ये आहे.

तुमच्या पालनकर्त्याचा आदेश येऊन पोहोचला, किंबहुना त्यांनी त्यांच्या नुकसानात भरच घातली.

**१०२.** आणि तुमच्या पालनकर्त्याच्या पकडीचा हाच नियम आहे, जेव्हा तो वस्त्यांमध्ये राहणाऱ्या अत्याचारी लोकांना तावडीत घेतो. निःसंशय अल्लाहची पकड दुःखदायक आणि अतिशय सक्त आहे.

**१०३.** निश्चितच यात त्या लोकांसाठी बोध-उपदेश आहे, जे कयामतच्या भयंकर शिक्षा-यातनेचे भय राखतात. तो दिवस, ज्या दिवशी सर्व एकत्र केले जातील आणि तोच दिवशी सर्व एकत्र केले जातील आणि तोच दिवस की ज्या दिवशी सर्वांना हजर केले जाईल.

**१०४.** आणि त्याला आम्ही जो विलंब करतो, तो फकत् एका निर्धारीत वेळेपर्यंतच आहे.

**१०५.** ज्या दिवशी ती (कयामत) येईल, कोणाला हिंमत होणार नाही की अल्लाहच्या अनुमतीविना काही बोलावे, तेव्हा त्यांच्यापैकी कोणी दुर्दैवी असेल आणि कोणी सुदैवी.

**१०६.** तर जे दुर्दैवी असतील ते नरकात जातील, तिथे हळू आणि उंच स्वरात ओरडतील.

**१०७.** ते तिथे सदैवकाळ राहतील, जोपर्यंत आकाश व धरती कायम असतील. मात्र त्या वेळखेरीज, जी तुमच्या पालनकर्त्याची मर्जी असेल. निःसंशय, तुमचा पालनकर्ता जे काही इच्छितो ते करतोच.

**१०८.** आणि ज्यांना सुदैवी केले गेले ते जन्नत (स्वर्गा) मध्ये असतील जिथे ते नेहमीकरिता राहतील, जोपर्यंत आकाश व धरती बाकी राहील, परंतु जे तुमचा पालनकर्ता इच्छिल ही कधीही न संपणारी देणगी आहे.

**१०९.** यास्तव तुम्ही त्या वस्तूंविषयी संशयग्रस्त राहू नका, ज्यांची हे लोक पूजा करीत आहेत. त्यांची उपासना तर अशा प्रकारे आहे, ज्या प्रकारे यांच्या पूर्वजांची यापूर्वी होती. आम्ही त्या सर्वांना पुरेपूर हिस्सा कमी न करता देणारच आहोत.

**११०.** निःसंशय आम्ही मूसाला ग्रंथ प्रदान केला, मग त्यात मतभेद केला गेला जर या

आधीच तुमच्या पालनकर्त्याचे फर्मान लागू झालेले नसते तर निश्चितच त्यांचा फैसला केला गेला असता. त्यांना तर यात संशय वाटत आहे (हे तर दुविधाग्रस्त आहेत).

**१११.** आणि निःसंशय त्यांच्यापैकी प्रत्येकाला (जेव्हा त्याच्यासमोर जाईल तेव्हा) तुमचा पालनकर्ता त्याला त्याच्या कर्मांचा पुरेपूर मोबदला प्रदान करील. निःसंशय ते जे काही करीत आहेत, अल्लाह ते सर्वकाही जाणून आहे.

**११२.** तेव्हा तुम्ही अगदी अटळ राहा, जसा तुम्हाला आदेश दिला गेला आहे आणि ते लोकदेखील ज्यांनी तुमच्यासह क्षमा-याचना केली आहे. (खबरदार) तुम्ही मर्यादा पार करू नका. अल्लाह तुमच्या समस्त कर्मांना पाहत आहे.

**११३.** आणि पाहा, अत्याचारी लोकांकडे कधीही झुकू नका. अन्यथा तुम्हालाही आगीचा दाह लागेल आणि अल्लाहखेरीज कोणी तुमच्या मदतीला उभा राहू शकणार नाही, आणि ना तुम्हाला मदत दिली जाईल.

**११४.** आणि दिवसाच्या दोन्ही किनाऱ्यांवर नमाज कायम राखा, आणि रात्रीच्या काही भागातही.[१] निःसंशय सत्कर्मे वाईट गोष्टींना दूर करतात.[२] हा उपदेश आहे, बोध प्राप्त करणाऱ्यांकरिता.

**११५.** आणि तुम्ही धीर-संयम राखा. निःसंशय अल्लाह सत्कर्म करणाऱ्यांचा मोबदला वाया जाऊ देत नाही.

---

(१) दोन्ही किनाऱ्यांशी अभिप्रेत काहींनी सकाळ-संध्याकाळ, काहींनी फक्त इशा (रात्र) आणि काहींनी मगरिब (सूर्यास्त) व इशा दोघांची वेळ घेतली आहे. इमाम इब्ने कसीर फर्मावितात की संभवतः ही आयत मेराजपूर्वी उतरली असेल ज्यात पाच वेळची नमाज फर्ज (अनिवार्य) केली गेली, कारण त्यापूर्वी दोनच नमाज फर्ज होती एक सूर्योदयापूर्वी आणि एक सूर्यास्तापूर्वी, आणि रात्रीच्या उत्तरार्धात तहज्जुदची नमाज, मग तहज्जुदची नमाज सर्वसामान्य मुसलमानांना माफ केली गेली. पुढे त्या तहज्जुद नमाजची अनिवार्यता काहींच्या कथनानुसार समाप्त केली गेली. (इब्ने कसीर)

(२) ज्या प्रकारे हदीस वचनांमध्येही याला तपशीलवार सांगितले गेले आहे. उदा. पाच वेळची नमाज, जुमआ (शुक्रवार) ते जुमआपर्यंत आणि रमजानपासून दुसऱ्या रमजानपर्यंत, यांच्या दरम्यान होणाऱ्या अपराधांना दूर करणारे आहेत, जर मोठ्या अपराधांपासून स्वतःला वाचविले गेल्यास. (सहीह मुस्लिम - किताबुल तहारत....) अन्य एका हदीसमध्ये पैगंबर मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांनी फर्माविले,.... सांगा, जर तुमच्यापैकी एखाद्याच्या दारासमोर एक मोठा जलप्रवाह वाहत असेल, तो दररोज त्या प्रवाहात पाच वेळा स्नान करीत असेल, तर काय त्यानंतर त्याच्या शरीरावर मळ-घाण बाकी राहील.... पैगंबरांच्या साथीदारांनी उत्तर दिले,.... नाही. पैगंबर मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि

**११६.** जेव्हा तुमच्या पूर्वीच्या काळातील लोकांपैकी असे भलाई करणारे लोक का नाही झालेत, ज्यांनी धरतीवर फसाद (उत्पात) पसरविण्यास प्रतिबंध घातला असता, ज्या थोड्या लोकांखेरीज ज्यांना आम्ही त्यांच्यापैकी सुटका प्रदान केली होती. अत्यारारी लोक तर त्या गोष्टीच्या मागे लागले, ज्यात त्यांना सुसंपन्न केले गेले होते आणि ते दुराचारी होते.

**११७.** तुमचा पालनकर्ता असा नाही की एखाद्या वस्तीला अत्याचारपूर्वक नष्ट करून टाकील, जेव्हा की तिथले लोक अल्लाहचे भय राखणारे असावेत.

**११८.** आणि जर तुमच्या पालनकर्त्याने इच्छिले असते तर समस्त लोकांना एका मार्गावर (चालणारा) एक जनसमुदाय बनविला असता. ते तर नेहमी विरोध करणारेच राहतील.

**११९.** त्यांच्याखेरीज, ज्यांच्यावर तुमचा पालनकर्ता दया करील, त्यांना तर यासाठी निर्माण केले गेले आहे आणि तुमच्या पालनकर्त्याचे हे फर्मान पूर्ण झाल्याविना राहणार नाही की मी जहन्नमला जिन्न आणि मानव सर्वांनी भरून टाकीन.

**१२०.** आणि पैगंबरांचे सर्व वृत्तांत आम्ही तुमच्यासमोर, तुमच्या मनाला शांती लाभावी यासाठी सांगत आहोत. तुमच्याजवळ या अध्यायातही सत्य पोहचले, जे ईमान राखणाऱ्यांकरिता बोध-उपदेश आहे.

**१२१.** आणि ईमान न राखणाऱ्यांना सांगून टाका की तुम्ही आपल्या ठिकाणी काम करीत राहा. आम्हीही कर्मांमध्ये मग्न आहोत.

**१२२.** आणि तुम्हीही प्रतिक्षा करा, आम्हीही प्रतिक्षा करीत आहोत.

**१२३.** आणि आकाशांचे व जमिनीचे परोक्ष ज्ञान केवळ अल्लाहला आहे. आणि समस्त कार्यांचे परतनेही त्याच्याचकडे आहे. यास्तव तुम्ही त्याचीच उपासना केली पाहिजे आणि त्याच्यावरच भरोसा राखला पाहिजे आणि तुम्ही जे काही करता, त्यापासून अल्लाह अनभिज्ञ नाही.

---

वसल्लम) यांनी फर्माविले, अशा प्रकारे पाच वेळची नमाज आहे. त्यांच्याद्वारे सर्वश्रेष्ठ अल्लाह अपराधांना व चुकांना मिटवितो. (सहीह बुखारी, किताबुल मवाकीत, बाबुस्सालवातिल खम्से कफ्फारतुन (आणि) मुस्लिम किताबुल मसाजिद बाबुल मशये इलस्सलाते तुमहा बिहिल खताया व तुरफआ बिहिद दरजातु)

—-

# सूरह यूसुफ - १२

सूरह यूसुफ मक्का येथे अवतरली आणि यात एकशे अकरा आयती आणि बारा रुकूउ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** अलिफ. लाम. रॉ या स्पष्ट ग्रंथाच्या आयती आहेत.

**२.** निःसंशय, आम्ही हे अरबी कुरआन अवतरीत केले आहे, यासाठी की तुम्ही समजू शकावे.

**३.** आम्ही तुमच्यासमोर सर्वांत उत्तम निवेदन प्रस्तुत करतो, या कारणास्तव की आम्ही आपल्याकडे हा कुरआन वहयी (अवतरित संदेशा) द्वारे उतरविला आहे आणि निःसंशय याच्यापूर्वी तुम्ही न जाणणाऱ्यांपैकी होते.[१]

**४.** जेव्हा यूसुफ आपल्या पित्यास म्हणाले, हे पिता! मी अकरा ताऱ्यांना आणि सूर्य-चंद्राला पाहिले की ते सर्व मला सजदा करीत आहेत.

**५.** (याकूब) म्हणाले, हे माझ्या प्रिय पुत्रा! आपल्या या स्वप्नाची चर्चा आपल्या भावांजवळ करू नकोस, असे न व्हावे की त्यांनी तुझ्याशी काही कपट करावे. सैतान तर मानवाचा उघड शत्रू आहे.

**६.** आणि अशा प्रकारे तुमचा पालनकर्ता तुमची निवड करेल आणि तुम्हाला घटना व मामल्याचा खुलासा (अर्थात स्वप्नफल) सांगण्याची शिकवण देईल आणि आपली कृपा-

(१) पवित्र कुरआनच्या या शब्दांद्वारेही स्पष्ट होते की पैगंबर मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांना अपरोक्ष (गैबचे) ज्ञान नव्हते, अन्यथा अल्लाहने त्यांना न जाणणारे म्हटले नसते. दुसरे हे की पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम अल्लाहचे सच्चे पैगंबर आहेत. कारण त्यांच्यावर वहयीद्वारेच या सत्य घटनेला सांगितले गेले आहे. पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम ना कोणाचे शिष्य होते की गुरूपासून शिकून सांगितले होते आणि ना कोणा दुसऱ्याशी असे नाते होते की ज्याच्यापासून ऐकून इतिहासाची ही घटना तिच्या खास अहवालासह पैगंबरांनी प्रसारित केली असती. तेव्हा यात मुळीच शंका नाही की हे सर्वश्रेष्ठ अल्लाहने वहयीच्या माध्यमाने पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्यावर अवतरित केले आहे, जसे या ठिकाणी स्पष्ट केले गेले आहे.

देणगी तुम्हाला पूर्णतः प्रदान करील, आणि याकूबच्या परिवारालाही, जशी त्याने यापूर्वी तुमच्या दोन पूर्वजांना अर्थात इब्राहीम आणि इसहाकलाही भरपूर कृपा-देणगी प्रदान केली. निःसंशय तुमचा पालनकर्ता मोठा ज्ञान बाळगणारा आणि हिकमतशाही आहे.

**७.** निःसंशय, यूसुफ आणि त्याच्या भावांमध्ये विचारणाऱ्यांकरिता मोठ्या निशाण्या आहेत.

**८.** जेव्हा यूसुफचे भाऊ म्हणाले, यूसुफ आणि त्याचा भाऊ आमच्या पित्याला आमच्यापेक्षा जास्त प्रिय आहेत, वास्तविक आम्ही लोक एक शक्तिशाली जमात आहोत. निश्चितच आमचे पिता स्पष्ट चूक करीत आहेत.

**९.** यूसुफची हत्या करून टाका किंवा त्याला एखाद्या (अज्ञात) स्थळी पोहचवा, यासाठी की तुमच्या पित्याचे ध्यान तुमच्याकडे व्हावे. त्यानंतर तुम्ही नेक सदाचारी व्हा.

**१०.** त्यांच्यापैकी एकजण म्हणाला, यूसुफची हत्या करू नका, किंबहुना त्याला एखाद्या ओसाड विहिरीच्या तळाशी टाकून द्या, यासाठी की त्याला एखाद्या प्रवाशी काफिल्याने उचलून न्यावे. जर तुम्हाला काही करायचेच आहे तर असेच करा.

**११.** ते म्हणाले, हे पिता! शेवटी तुम्ही यूसुफच्या बाबतीत आमच्यावर विश्वास का नाही ठेवत, आम्ही तर त्याचे हितचिंतक आहोत.

**१२.** उद्या तुम्ही त्याला अवश्य आमच्यासोबत पाठवा, यासाठी की त्याने खूप खावे प्यावे आणि खेळावे. त्याच्या संरक्षणाची जबाबदारी आम्ही घेतो.

**१३.** (याकूब) म्हणाले, तुमचे त्याला घेऊन जाणे माझ्यासाठी फार दुःखदायक ठरेल. मला हे भयदेखील लागून राहील की तुमच्या गाफीलपणामुळे त्याला लांडगा खाऊन टाकील.

**१४.** त्यांनी उत्तर दिले, आमच्यासारख्या मोठ्या शक्तिशाली समूहाच्या उपस्थितीत जर त्याला लांडगा खाऊन टाकील तर आम्ही अगदी निकामी ठरू.

**१५.** मग जेव्हा त्याला घेऊन निघाले आणि सर्वांनी मिळून दृढनिश्चय केला की त्याला ओसाड व खूप खोल अशा विहिरीच्या तळाशी फेकून द्यावे. आम्ही यूसुफकडे वहयी (ईशसंदेश) पाठविली की निःसंशय (आता ती वेळ येत आहे) की तुम्ही त्यांना या गोष्टीची खबर अशा स्थितीत सांगाल की ते जाणतही नसतील.

**१६.** आणि रात्री (इशा) च्या वेळेस (ते सर्व) आपल्या पित्याजवळ रडत रडत पोहोचले.

**१७.** आणि म्हणू लागले की प्रिय पिता! आम्ही आपसात धावण्याच्या शर्यतीत लागलो, आणि यूसुफला आमच्या सामानाजवळ सोडले तेव्हा लांडग्याने त्याला खाऊन टाकले. तुम्ही तर आमच्या बोलण्यावर विश्वास ठेवणार नाही, मग आम्ही पुरेपूर सच्चे असलो तरी.

**१८.** आणि यूसुफचा सदरा खोट्या रक्ताने भिजवून आणला. (पिता) म्हणाले, (असे नाही घडले) किंबहुना तुम्ही आपल्या मनाने एक गोष्ट रचली आहे, आता सबुरी करणेच उत्तम आहे आणि तुमच्या मनगढत गोष्टींवर अल्लाहशीच मदतीची प्रार्थना (दुआ) आहे.

**१९.** आणि एक प्रवासी काफिला आला आणि त्यांनी आपल्या पाणी आणणाऱ्याला पाठविले, त्याने आपला डोल (बादली) विहीरीत टाकला, उद्गारला, वाहवा! काय आनंदाची गोष्ट आहे! हा तर एक बालक आहे. त्यांनी त्याला व्यापार-सामुग्री समजून लपविले आणि जे काही ते करीत होते, अल्लाह चांगले जाणून होता.

**२०.** आणि त्यांनी त्याला फारच थोड्या किंमतीत (अर्थात) काही मोजक्या दिरमांवर विकून टाकले. ते तर यूसुफच्या बाबतीत अधिक रुचिहीन होते.

**२१.** आणि मिस्त्र देशाच्या लोकांपैकी, ज्याने त्याला खरेदी केले होते, तो आपल्या पत्नीस म्हणाला की याला आदर-सन्मानपूर्वक ठेवा. संभवतः हा आम्हाला लाभ पोहचवील किंवा आम्ही याला आपला पुत्रच बनवून घेऊ. अशा प्रकारे आम्ही (मिस्त्रच्या) धरतीवर यूसुफचे पाय स्थिर केले, यासाठी की आम्ही त्याला स्वप्नाचा खुलासा सांगण्याचे काही ज्ञान शिकवावे अल्लाह आपल्या इराद्याला पूर्ण करण्याचे सामर्थ्य राखतो, परंतु अधिकांश लोक अनभिज्ञ असतात.

**२२.** आणि जेव्हा (यूसुफ) पूर्ण तारुण्यावस्थेस पोहोचले, आम्ही त्यांना फैसला करण्याचे सामर्थ्य आणि ज्ञान प्रदान केले, आम्ही भलाई करणाऱ्यांना अशाच प्रकारे मोबदला देतो.

**२३.** आणि त्या स्त्रीने, जिच्या घरी यूसुफ होते, यूसुफला फुसलावणे सुरू केले, जेणेकरून त्याने आपल्या मनावर ताबा ठेवणे सोडून द्यावे आणि दार बंद करून ती म्हणू

लागली, या (जवळ) या. (यूसुफ) म्हणाले, अल्लाह रक्षण करो! तो माझा पालनकर्ता आहे. त्याने मला खूप चांगल्या प्रकारे ठेवले आहे. निश्चितच अन्याय करणाऱ्यांचे कदापि भले होत नाही.

**२४.** आणि त्या स्त्रीने यूसुफची इच्छा धरली आणि यूसुफनेही तिची इच्छा धरली असती जर त्यांनी आपल्या पालनकर्त्याचे प्रमाण पाहून घेतले नसते. असेच घडले, यासाठी की आम्ही यूसुफपासून दुष्कर्म आणि निर्लज्जता दूर करावी. निःसंशय ते आमच्या निवडक दासांपैकी होते.

**२५.** आणि दोघेजण दाराकडे धावले. त्या स्त्रीने यूसुफचे वस्त्र (सदरा) मागच्या बाजूने ओढून फाडले आणि त्या स्त्रीचा पती दोघांना दाराशीच मिळाला, तेव्हा ती म्हणू लागली की जो मनुष्य तुमच्या पत्नीशी वाईट इच्छा धरेल, त्याची शिक्षा हीच आहे की त्याला कैदी बनविले जावे किंवा दुसरी एखादी कठोर शिक्षा दिली जावी.

**२६.** (यूसुफ) म्हणाले, ही स्त्रीच मला फूस लावून (माझ्या मनोकामनाच्या रक्षणात बेपर्वा करू) इच्छित होती आणि स्त्रीच्या समाजाच्या एका माणसाने साक्ष दिली की जर त्याचा सदरा पुढच्या बाजूने फाटला असेल तर स्त्री (आपल्या कथनात) खरी आहे आणि यूसुफ खोटे बोलणाऱ्यांपैकी आहे.

**२७.** आणि जर त्याचा सदरा मागच्या बाजूने फाडला गेला आहे, तर स्त्री खोटी आहे आणि यूसुफ खऱ्यांपैकी आहे.

**२८.** तर पतीने जेव्हा पाहिले की सदरा मागच्या बाजूने फाटला आहे, तेव्हा स्पष्ट सांगितले की ही तर तुम्हा स्त्रियांची चाल आहे. निःसंशय तुमचे डावपेच मोठे भारी आहेत.

**२९.** यूसुफ, आता या गोष्टीला दृष्टीआड करा आणि (हे स्त्री!) आपल्या अपराधांची क्षमा माग. निःसंशय तू अपराध्यांपैकी आहेस.

**३०.** आणि मग शहरातल्या स्त्रियांमध्ये चर्चा होऊ लागली की अजीजची पत्नी आपल्या (तरुण) गुलामाला आपली गरज पूर्ण करण्यासाठी बहकविण्यात व फुसलाविण्यात लागलेली असते. तिच्या मनात यूसुफचे प्रेम (ठाण मांडून) बसले आहे. आमच्या मते तर ती उघड चूक करीत आहे.

**३१.** तिने जेव्हा त्यांची ही कुत्सित निंदा ऐकली, तेव्हा त्यांना (भोजनासाठी) आमंत्रित

केले आणि त्यांच्यासाठी एका सभेचा इतमामही केला आणि त्यांच्यापैकी प्रत्येकीला एक एक चाकू दिला आणि म्हणाली, हे यूसुफ! यांच्या समोर या. त्या स्त्रियांनी जेव्हा त्यांना पाहिले तेव्हा खूप मोठे जाणले आणि (नकळत) आपले हात कापून घेतले आणि त्या उद्‌गारल्या, पाकी (पवित्रता) अल्लाहकरिता आहे. न मनुष्य कदापि नाही. हा तर खात्रीने कोणी फार मोठा फरिश्ता आहे.

**३२.** (त्या वेळी मिस्त्रच्या अजीजची पत्नी) म्हणाली, हाच तो, ज्याच्याविषयी तुम्ही मला बरे-वाईट बोलत होत्या. मी सर्व प्रकारे याच्याकडून आपली इच्छा पूर्ण करू इच्छिले, परंतु हा निष्कलंक राहिला आणि जे काही मी याला सांगत आहे, जर ते हा करणार नाही तर निश्चितच याला कैदी बनविले जाईल आणि खात्रीने हा मोठा अपमानित होईल.

**३३.** यूसुफ म्हणाले, हे माझ्या पालनकर्त्या! ज्या गोष्टीकडे या स्त्रिया मला बोलावित आहेत, त्यापेक्षा कारागृह मला जास्त प्रिय आहे. जर तू यांचे कपट (मोहजाल) माझ्यापासून दूर केले नाहीस तर मी यांच्याकडे आकर्षित होईन आणि अगदी मूर्खांमध्ये सामील होईन.

**३४.** त्यांच्या पालनकर्त्याने त्यांची दुआ (प्रार्थना) स्वीकारली आणि त्या स्त्रियांच्या कपटापासून यूसुफला वाचविले. निःसंशय तो ऐकणारा आणि जाणणारा आहे.

**३५.** मग त्या सर्व निशाण्यांना पाहून घेतल्यावर त्यांना हेच भले वाटले की यूसुफला काही काळ कारागृहात ठेवावे.

**३६.** आणि त्यांच्यासोबत इतर दोन तरुण कारागृहात आले. त्यांच्यापैकी एकजण म्हणाला, मी स्वप्नात स्वतःला दारु गाळताना पाहिले आहे, आणि दुसरा म्हणाला, मी स्वप्नात काय पाहतो की मी आपल्या डोक्यावर भाकरी ठेवल्या आहेत, ज्यांना पक्षी खात आहेत. तुम्ही याचा अर्थ (खुलासा) आम्हाला सांगावा. आम्हाला तर तुम्ही गुणवान दिसता.

**३७.** (यूसुफ) म्हणाले, तुम्हाला जे भोजन दिले जाते, ते तुमच्याजवळ पोहचण्यापूर्वीच मी तुम्हाला त्याचा खुलासा सांगेने, हे सर्व काही त्या ज्ञानामुळे आहे जे मला माझ्या पालनकर्त्याने शिकविले आहे. मी त्या लोकांचा दीन (धर्म) सोडला आहे, जे अल्लाहवर ईमान राखत नाही आणि आखिरतलाही मान्य करीत नाही.

**३८.** मी आपल्या पित्या आणि पूर्वजांच्या (धर्मा) चा अनुयायी आहे. अर्थात इसहाक आणि याकूब (च्या दीन) चा. आम्हाला हे कधीही मान्य नाही की आम्ही अल्लाहसोबत अन्य एखाद्याला सहभागी ठरवावे. आमच्यावर आणि इतर सर्व लोकांवर अल्लाहची ही विशेष कृपा आहे. परंतु अधिकांश लोक कृतघ्न असतात.

**३९.** हे माझ्या कारागृहातील साथीदारांनो! काय अनेक प्रकारची अनेक उपास्ये चांगली आहेत की एक जबरदस्त शक्तिशाली अल्लाह चांगला?

**४०.** त्याच्याखेरीज ज्यांची उपासना तुम्ही करीत आहात ते सर्व नावापुरतेच आहेत, ज्यांना तुम्ही आणि तुमच्या पूर्वजांनी मनाने रचून घेतले आहे. सर्वश्रेष्ठ अल्लाहने यांचा कोणताही पुरावा अवतरित केला नाही. फैसला देणे अल्लाहचेच काम आहे. त्याचा आदेश आहे की तुम्ही सर्व त्याच्याशिवाय कोणाचीही भक्ती- उपासना करू नका. हाच सत्य धर्म आहे, परंतु अधिकांश लोक जाणत नाहीत.

**४१.** हे कारागृहातील माझ्या साथीदारांनो! तुम्हा दोघांपैकी एक तर आपल्या स्वामीला मद्य पाजण्यासाठी नियुक्त केला जाईल, परंतु दुसऱ्याला फासावर लटकविले जाईल आणि पक्षी त्याचे डोके टोच मारून मारून खातील. तुम्ही दोघे ज्याविषयी विचारत होते त्याचा फैसला झाला.

**४२.** आणि ज्याच्याविषयी यूसुफची कल्पना होती की दोघांपैकी ज्याला सुटका मिळेल, त्याला म्हणाले, आपल्या राजाजवळ माझीही चर्चा कर. मग सैतानाने त्याला राजाजवळ बोलण्याचा विसर पाडला आणि यूसुफला अनेक वर्षे कारागृहात राहावे लागले.

**४३.** आणि राजाने सांगितले, मी स्वप्न पाहिले की सात धष्टपुष्ट गायी आहेत, ज्यांना सात दुबळ्या गायी खात आहेत आणि सात हिरवी कणसे आहेत तर दुसरी सात कणसे अगदी सुकलेली. हे दरबारी लोकांनो! माझ्या या स्वप्नाचा खुलासा सांगा, जर तुम्ही स्वप्नफल सांगू शकत असाल.

**४४.** दरबारी लोकांनी उत्तर दिले, ही तर विसकटलेल्या (विचारांची) स्वप्ने आहेत आणि अशा प्रकारच्या व्यग्रचित्त स्वप्नांचा खुलासा आम्ही जाणत नाही.

**४५.** आणि त्या कैद्यांपैकी सुटका झालेल्याला अकस्मात आठवण झाली, आणि तो म्हणू लागला, मी तुम्हाला याचा खुलासा येऊन सांगतो. मला जाण्याची परवानगी द्यावी.

**४६.** हे यूसुफ! हे अगदी सच्चे यूसुफ! तुम्ही आम्हाला या स्वप्नाचा खुलासा सांगा की सात धष्टपुष्ट गायी आहेत, ज्यांना सात दुबळ्या गायी खात आहेत आणि सात अगदी हिरवी कणसे आहेत आणि दुसरी सात कणसे अगदी सुकलेली आहेत. यासाठी की मी परत जाऊन त्या लोकांना सांगावे की त्या सर्वांनी जाणून घ्यावे.

**४७.** (यूसुफ यांनी) उत्तर दिले की तुम्ही सतत सात वर्षे सवयीनुसार धान्य पेरा आणि (पीक आल्यावर) त्याची कापणी करून कणसांसमेत राहू द्या. आपल्या खाण्यासाठी थोड्या संख्येशिवाय.

**४८.** त्यानंतरची सात वर्षे मोठ्या दुष्काळाची येतील ती ते धान्य खाऊन टाकतील जे तुम्ही त्यांच्यासाठी जमा करून ठेवले होते. त्याशिवाय जे थोडेसे तुम्ही रोखून ठेवाल.

**४९.** मग याच्यानंतर जे वर्ष येईल, त्यात लोकांसाठी खूप पाऊस पडेल आणि त्यात ते (द्राक्षाचा रसदेखील) खूप गाळतील.

**५०.** आणि राजा म्हणाला, त्याला (यूसुफला) माझ्याजवळ आणा. जेव्हा संदेश पोहचविणारा यूसुफजवळ पोहोचला तेव्हा यूसुफ म्हणाले, आपल्या राजाकडे परत जा आणि त्यांना विचारा की त्या स्त्रियांची खरी कहाणी काय आहे, ज्यांनी आपले हात कापून घेतले होते. त्यांचे कपट चांगल्या प्रकारे जाणणारा माझा पालनकर्ताच आहे.

**५१.** (राजाने) विचारले, हे स्त्रियांनो! त्या वेळची खरी कहाणी काय आहे, जेव्हा तुम्ही कपट करून यूसुफला त्याच्या मनापासून बहकवू इच्छित होत्या? त्यांनी स्पष्ट उत्तर दिले की (अल्लाह जाणतो) आम्ही यूसुफमध्ये कोणातही वाईट गुण पाहिला नाही, मग तर अजीजची पत्नीही उद्‌गारली, आता तर सत्य उघडकीस आलेच आहे. मीच त्याला बहकविणयाचा प्रयत्न केला होता त्याच्या मनापासून (विचलित करण्याचा) आणि निःसंशय तो खऱ्या लोकांपैकी आहे.

**५२.** हे या कारणास्तव की (अजीज) ला माहीत व्हावे की मी त्याच्याशी विश्वासघात केला नाही आणि हेही की अल्लाह कपट करणाऱ्यांचा डाव सफल होऊ देत नाही.

**५३.** आणि मी आपल्या मनाच्या पावित्र्याचे वर्णन करीत नाही, निःसंशय, मन तर वाईट गोष्टीचीच प्रेरणार देणारे आहे, परंतु हे की माझा पालनकर्ताच आपली दया- कृपा करील. निश्चितच माझा पालनकर्ता माफ करणारा, दया करणारा आहे.

**५४.** आणि बादशहा म्हणाला, त्याला माझ्या समोर आणा की मी त्याला आपल्या व्यक्तिगत कामांकरिता नेमून घ्यावे. मग जेव्हा त्याच्याशी वार्तालाप करू लागला, तेव्हा म्हणाला, तुम्ही आजपासून आमचे येथे सन्मानित आणि विश्वसनीय (अमानतदार) आहात.

**५५.** (यूसुफ) म्हणाले, तुम्ही मला देशाच्या खजीन्यावर नियुक्त करा. मी संरक्षक आणि जाणकार आहे.

**५६.** आणि अशा प्रकारे आम्ही यूसुफला देशाचा सूत्रधार बनविले की त्याने वाटेल तिथे राहावे. आम्ही ज्याला इच्छितो, त्याच्यापर्यंत आपली दया- कृपा पोहचवितो, आणि आम्ही सत्कर्म करणाऱ्यांच्या आचरणाचे फळ वाया जाऊ देत नाही.

**५७.** आणि निःसंशय ईमान राखणाऱ्यांचा आणि दुराचारापासून दूर राहणाऱ्यांचा आखिरतचा मोबदला कितीतरी चांगला आहे.

**५८.** आणि यूसुफचे भाऊ आले आणि यूसुफजवळ गेले तेव्हा यूसुफने त्यांना ओळखून घेतले, परंतु त्यांनी त्याला ओळखले नाही.

**५९.** आणि जेव्हा त्यांचे सामान तयार केले गेले तेव्हा यूसुफ म्हणाले, तुम्ही माझ्याजवळ आपल्या त्या भावाला आणा, जो तुमच्या पित्यापासून आहे, काय तुम्ही नाही पाहिले की मी मापही पुरेपूर देतो आणि अतिथीचे चांगल्या प्रकारे आदरातिथ्य करणाऱ्यांपैकी आहे.

**६०.** परंतु जर तुम्ही त्याला माझ्याजवळ आणले नाही तर माझ्याकडून तुम्हाला कसलेही माप मिळणार नाही, किंबहुना तुम्ही माझ्याजवळही येऊ शकणार नाहीत.

**६१.** ते म्हणाले, ठीक आहे, आम्ही त्याच्या पित्याशी या संदर्भात गोडीगुलाबीने बोलून पूर्ण प्रयत्न करू.

**६२.** आणि आपल्या सेवकांना सांगितले की त्यांचा माल (धन) त्यांच्याच पोत्यांमध्ये ठेवून द्या की जेव्हा परतून आपल्या कुटुंबात जातील तेव्हा आपले धन ओळखून घेतील, फार शक्य आहे की ते पुन्हा येतील.

**६३.** जेव्हा ते लोक परतून आपल्या पित्याजवळ गेले तेव्हा म्हणू लागले, आम्हाला तर

धान्य देण्यावर प्रतिबंध घातला गेला. आता तुम्ही आमच्यासोबत भावाला पाठवा की आम्ही माप भरून आणावे. आम्ही त्याच्या रक्षणाची हमी देतो.

**६४.** (याकूब) म्हणाले, काय मी याच्या बाबतीत तुमच्यावर तसाच विश्वास ठेवू जसा यापूर्वी याच्या भावाबाबत विश्वास ठेवला? सर्वश्रेष्ठ अल्लाहच सर्वांत उत्तम संरक्षक आहे आणि तो समस्त कृपावानांमध्ये जास्त कृपावान आहे.

**६५.** आणि जेव्हा त्यांनी आपले सामान उघडले तेव्हा त्यात त्यांना आपली रक्कम आढळली, जी त्यांना परत केली गेली होती. म्हणाले, हे पिता! आम्हाला आणखी काय पाहिजे? ही आमची रक्कम आम्हाला परत केली गेली आहे आणि आम्ही आपल्या कुटुंबाकरिता धान्य आणून देऊ आणि आपल्या भावाचे रक्षण करू आणि एक उंटाचे माप जास्त आणू. हे माप तर जास्त सोपे आहे.

**६६.** (याकूब) म्हणाले, मी तर त्याला तुमच्यासोबत कधीही पाठविणार नाही, जोपर्यंत तुम्ही अल्लाहला मध्यस्थी ठेवून मला वचन द्याल की तुम्ही त्याला माझ्याजवळ पोचवाल, याखेरीज की तुम्ही सर्व कैदी बनविले जाल. जेव्हा त्यांनी पक्के वचन दिले तेव्हा ते म्हणाले की आम्ही जे काही बोलत आहोत, अल्लाह त्याचा संरक्षक आहे.

**६७.** आणि (याकूब) म्हणाले, हे माझ्या मुलांनो! तुम्ही सर्व एकाच दारातून प्रवेश करू नका, किंबहुना अनेक दारांमधून वेगवेगळे होऊन प्रवेश करा. मी अल्लाहतर्फे आलेल्या कोणत्याही गोष्टीला तुमच्या वरून टाळू शकत नाही. आदेश केवळ अल्लाहचाच चालतो, माझा संपूर्ण विश्वास त्याच्यावरच आहे आणि प्रत्येक भरोसा ठेवणाऱ्याने त्याच्यावरच भरोसा ठेवला पाहिजे.

**६८.** आणि जेव्हा ते त्याच मार्गांनी, ज्यांचा आदेश त्यांच्या पित्याने दिला होता, गेले, काहीच नव्हते की अल्लाहने जी गोष्ट निश्चित केली आहे, तिच्यापासून ते त्यांना किंचितही वाचवतील. तथापि याकूबच्या मनात एक विचार आला, जो त्याने पूर्ण केला. निःसंशय ते आम्ही शिकविलेल्या त्या ज्ञानाने संपन्न होते, परंतु अधिकांश लोक जाणत नाहीत.

**६९.** आणि ते सर्व यूसुफजवळ पोहोचले, तेव्हा यूसुफने आपल्या भावाला आपल्याजवळ बसविले आणि म्हटले, मी तुझा भाऊ (यूसुफ) आहे, आतापावेतो हे जे काही करत राहिले, त्याबद्दल दुःख करू नकोस.

**७०.** मग जेव्हा त्यांचे सामान (धान्याने भरून) तयार केले तेव्हा आपल्या भावाच्या सामानात आपला पाणी पिण्याचा प्याला ठेवून दिला, मग एका ऐलान करणाऱ्याने ऐलान केले, हे काफिलावाल्यांनो! तुम्ही लोक तर चोर आहात!

**७१.** त्यांनी त्याच्याकडे तोंड फिरवून म्हटले, तुमची कोणती वस्तू हरवली आहे?

**७२.** उत्तर दिले की शाही प्याला हरवला आहे, जो तो घेऊन येईल त्याला एक उंटाचे ओझे इतके धान्य मिळेल. या वचनाची मी हमी देतो.

**७३.** ते म्हणाले, अल्लाहची शपथ! तुम्ही चांगल्या प्रकारे जाणता की आम्ही देशात उपद्रव निर्माण करण्यासाठी आलो नाहीत आणि ना आम्ही चोर आहोत.

**७४.** ते म्हणाले, बरे चोरीची काय शिक्षा आहे जर तुम्ही खोटे ठराल.

**७५.** उत्तर दिले, याची शिक्षा हीच की ज्याच्या सामान्यात तो प्याला आढळून येईल तोच त्याच्या बदली आहे. आम्ही तर अत्याचारींना हीच शिक्षा देत असतो.

**७६.** मग (यूसुफ) ने आपल्या भावाचे सामान तपासण्यापूर्वी दुसऱ्यांचे सामान तपासायला सुरुवात केली, मग त्याने पिण्याचा प्याला आपल्या भावाच्या सामानातून काढला. आम्ही यूसुफकरिता अशा प्रकारे ही योजना बनविली. त्या बादशहाच्या कायद्यानुसार तो आपल्या भावाला (रोखून) ठेवू शकत नव्हता, परंतु हे की अल्लाहला मंजूर असेल. आम्ही ज्याला इच्छितो त्याचा दर्जा बुलंद करतो. प्रत्येक ज्ञान राखणाऱ्यावर (मोठेपणात) एक मोठा ज्ञानी अस्तित्वात आहे.

**७७.** ते म्हणाले, जर याने चोरी केली आहे तर (नवलाची गोष्ट नव्हे) याच्या भावानेही यापूर्वी चोरी केली आहे. यूसुफने ही गोष्ट आपल्या मनात ठेवली आणि त्यांच्यासमोर अगदी जाहीर केले नाही, म्हटले की तुम्ही वाईट ठिकाणी आहात आणि जे काही तुम्ही सांगत आहात अल्लाह ते चांगल्या प्रकारे जाणतो.

**७८.** ते म्हणाले, हे मिस्त्र देशाचा सर्वाधिकार राखणारे! याचे पिता अतिशय वृद्ध मनुष्य आहेत. तुम्ही याच्याऐवजी आमच्यापैकी एखाद्याला ठेवून घ्या. आम्ही असे पाहतो की तुम्ही मोठे सज्जन मनुष्य आहात.

**७९.** (यूसुफ) म्हणाले की आम्हाला ज्याच्याजवळ आमची वस्तू आढळून आली आहे

त्याला सोडून दुसऱ्यांना बंदी बनविण्यापासून अल्लाहचे शरण इच्छितो. असे केल्याने निश्चितच आम्ही अन्याय करणाऱ्यांपैकी ठरू.

**८०.** जेव्हा हे, यूसुफकडून निराश झाले, तेव्हा एकांतात बसून सल्लामसलत करू लागले. त्यांच्यापैकी जो सर्वांत मोठा होता तो म्हणाला की तुम्हाला माहीत नाही की तुमच्या पित्याने तुमच्याकडून अल्लाहला मध्यस्थी ठेवून पक्के वचन घेतले आहे आणि याच्यापूर्वी तुम्ही यूसुफविषयी अपराध केलेला आहे. आता मी तर भूमीतून पाय काढणार नाही, जोपर्यंत पिता स्वतः मला अनुमती देत नाहीत किंवा सर्वश्रेष्ठ अल्लाह माझ्या या समस्येचा फैसला करील. तोच सर्वोत्तम शासक आहे.

**८१.** तुम्ही सर्व पित्याच्या सेवेत परत जा आणि सांगा की हे पिता! तुमच्या पुत्राने चोरी केली आणि आम्ही तीच साक्ष दिली, जी आम्ही जाणत होतो. आम्ही काही परोक्ष (गैब) चे रक्षण करणारे तर नव्हतो.

**८२.** आणि तुम्ही त्या शहराच्या लोकांना विचारा, जिथे आम्ही होतो आणि त्या प्रवाशांनाही विचारा ज्यांच्यासोबत आम्ही आलो आहोत आणि निःसंशय आम्ही पूर्णपणे सच्चे आहोत.

**८३.** (याकूब) म्हणाले, असे नाही, किंबहुना तुम्ही आपल्यातर्फे एक गोष्ट रचून घेतली, तेव्हा आता संयम राखणेच उत्तम आहे. संभवतः सर्वश्रेष्ठ अल्लाह त्या सर्वांना माझ्याजवळ पोहचविल. तोच ज्ञानी आणि हिकमतशाली आहे.

**८४.** आणि मग (याकूबने) त्यांच्याकडून तोंड फिरवून घेतले आणि म्हटले, अरेरे, यूसुफ! त्यांचे डोळे दुःखातिरेकाने पांढरे झाले होते आणि ते या दुःखाला सहन करीत होते.

**८५.** (पुत्र) म्हणाले, अल्लाहची शपथ! तुम्ही नेहमी यूसुफच्या आठवणीत भान हरपून राहाल येथेपर्यंत की अगदी गळून जाल किंवा मरण पावाल.

**८६.** (याकूब) म्हणाले, मी तर आपल्या संकट आणि दुःखाचे गाऱ्हाणे अल्लाहजवळ मांडत आहे. मला अल्लाहतर्फे त्या गोष्टींचे ज्ञान प्राप्त आहे, ज्यांच्याबाबत तुम्ही अनभिज्ञ आहात.

**८७.** माझ्या प्रिय पुत्रांनो! तुम्ही जा आणि यूसुफ आणि त्याच्या भावाचा चांगल्या प्रकारे

शोध घ्या आणि अल्लाहच्या दयेपासून निराश होऊ नका. नि:संशय, अल्लाहच्या दया-कृपेपासून तेच लोक निराश होतात जे काफिर (इन्कारी) असतात.

**८८.** मग जेव्हा हे लोक यूसुफजवळ पोहोचले, तेव्हा म्हणू लागले की हे अजीज! आम्ही आणि आमचे कुटुंब अतिशय अडचणीत आहे, आम्ही थोडीशी तुच्छ पुंजी आणली आहे, परंतु तुम्ही आम्हाला धान्याचे पूर्ण माप देऊन टाका आणि आम्हाला दान म्हणून द्या. निश्चितच अल्लाह दान देणाऱ्यांना चांगला मोबदला देतो.

**८९.** (यूसुफ) म्हणाले, तुमच्या ध्यानात तरी आहे का की तुम्ही यूसुफ आणि त्याच्या भावाशी आपल्या नादानपणात काय काय केले?

**९०.** ते म्हणाले, काय (खरोखर) तूच यूसुफ आहेस? उत्तर दिले, होय! मीच तो यूसुफ आणि हा माझा भाऊ आहे. अल्लाहने आमच्यावर दया आणि कृपा केली. खरी गोष्ट अशी की जो कोणी अल्लाहचे भय राखून दुराचारापासून अलिप्त राहील आणि धीर-संयम राखील तर अल्लाह एखाद्या सत्कर्म करणाऱ्याचा मोबदला वाया जाऊ देत नाही.

**९१.** ते म्हणाले, अल्लाहची शपथ! अल्लाहने तुला आमच्यावर श्रेष्ठता प्रदान केली आहे आणि हेही सत्य आहे की आम्ही अपराधी आहोत.

**९२.** उत्तर दिले, आज तुमच्यावर कसलाही आरोप नाही, अल्लाह तुम्हाला माफ करो, तो तर समस्त दया करणाऱ्यांमध्ये सर्वात मोठा दया करणारा आहे.

**९३.** माझा हा सदरा तुम्ही घेऊन जा आणि तो माझ्या पित्याच्या तोंडावर टाका की (ज्यामुळे) ते पाहू लागतील आणि येतील आणि आपल्या संपूर्ण कुटुंबाला माझ्याजवळ घेऊन या.

**९४.** आणि जेव्हा हा काफिला (मायदेशी) निघाला, तेव्हा त्यांचे पिता (याकूब) म्हणाले, मला यूसुफचा सुगंध येत आहे, जर तुम्ही मला मूर्ख समजत नसाल.

**९५.** (पुत्र) म्हणू लागले की अल्लाहची शपथ! तुम्ही तर अजूनही आपल्या त्याच जुन्या चुकीवर कायम आहात!

**९६.** जेव्हा शुभ समाचार देणाऱ्याने पोहोचून त्यांच्या तोंडावर तो सदरा टाकला, त्याच क्षणी त्यांना पुनश्च दिसू लागले. म्हणाले की, काय मी तुम्हाला सांगत नव्हतो की मी

अल्लाहतर्फे त्या गोष्टी जाणतो, ज्या तुम्ही नाही जाणत.

**९७.** ते म्हणाले, हे पिता! तुम्ही आमच्या अपराधांची क्षमा-याचना (माफीची दुआ) करा. निःसंशय आम्ही अपराधी आहोत.

**९८.** म्हणाले, ठीक आहे. मी लवकरच तुमच्यासाठी आपल्या पालनकर्त्याजवळ माफीची दुआ-प्रार्थना करेन. निश्चितच तो मोठा क्षमाशील, आणि अतिशय दयावान आहे.

**९९.** जेव्हा हा समस्त परिवार यूसुफजवळ पोहोचला, तेव्हा यूसुफने आपल्या माता-पित्यास आपल्याजवळ जागा दिली आणि म्हटले, अल्लाहने इच्छिल्यास तुम्ही सर्व मिस्त्र देशात सुख-शांतीपूर्वक राहाल.

**१००.** आणि आपल्या सिंहासनावर आपल्या माता-पित्यास उच्चस्थानी बसविले आणि सर्व त्याच्यासमोर सजद्यात पडले[१] आणि सर्व म्हणाले, हे पिता! हा माझ्या पहिल्या स्वप्नाचा खुलासा आहे, माझ्या पालनकर्त्याने तो पूर्ण करून दाखविला. त्याने माझ्यावर फार मोठा उपकार केला, की जेव्हा मला कैदखान्यातून बाहेर काढले आणि तुम्ही लोकांना वाळवंटातून येथे आणले त्या मतभेदानंतर, जो सैतानाने माझ्या आणि माझ्या भावांच्या दरम्यान निर्माण केला होता. माझा पालनकर्ता, ज्याच्यासाठी इच्छितो, त्याच्यासाठी उत्तम उपाययोजना करतो. निःसंशय तो मोठा जाणणारा, हिकमत बाळगणारा आहे.

**१०१.** हे माझ्या पालनकर्त्या! तू मला राज्य (सत्ताधिकार) प्रदान केला आणि मला स्वप्नांचा अर्थ लावण्याचे ज्ञान दिले. हे आकाशांचा व धरतीचा निर्माणकर्ता! तूच या जगात आणि आखिरतमध्ये माझा मित्र आणि मदत करणारा आहेस. तू मला इस्लामच्या अवस्थेत मृत्यु दे आणि मला नेकी करणाऱ्यांमध्ये सामील कर.

---

(१) काहींनी याचा अनुवाद असा केला आहे की आदर सन्मानार्थ यूसुफसमोर झुकले, परंतु 'व खर्रू लहू सुज्जदन्' हे शब्द दर्शवितात की त्यांनी यूसुफसमोर जमिनीवर माथा टेकला. हा सजदा माथा टेकण्याच्या अर्थाने आहे, तरीही हा सजदा आदर व सन्मानासाठी आहे, उपासना म्हणून नाही आणि आदराप्रित्यर्थ सजदा हजरत याकूब यांच्या शरीअतमध्ये उचित होता. इस्लाममध्ये शिर्कवर प्रतिबंध लावण्याकरिता अशा प्रकारचे आदरार्थी सजदे करणे वर्ज्य ठरविले गेले आणि आता आदर-सन्मान व्यक्त करण्यासाठी कोणालाही सजदा करणे अनुचित आहे.

**१०२.** हे परोक्षा (गैब) च्या खबरींपैकी आहे, जे आम्ही तुमच्याकडे वहयी करीत आहोत आणि तुम्ही त्यांच्याजवळ नव्हते जेव्हा त्यांनी आपला बेत पक्का करून घेतला होता आणि ते कपट कारस्थान करू लागले होते.

**१०३.** तुम्ही कितीही इच्छा धरा, पण अधिकांश लोक ईमान राखणार नाहीत.

**१०४.** आणि तुम्ही त्यांच्याकडून याबद्दल काही मजूरी मागत नाही, हा तर समस्त विश्वाकरिता बोध-उपदेश आहे.

**१०५.** आणि आकाशांमध्ये आणि धरतीत अनेक निशाण्या आहेत, ज्यांच्यापासून हे लोक तोंड फिरवून निघून जातात.

**१०६.** आणि त्यांच्यापैकी बहुतेक लोक अल्लाहवर ईमान राखत असतानाही शिर्क करणारे आहेत.[१]

**१०७.** काय ते या गोष्टीपासून निर्भय झाले आहेत की त्यांच्याजवळ अल्लाहच्या शिक्षा-यातनांपैकी एखादी सर्वसामान्य शिक्षा यावी किंवा त्यांच्यावर अचानक कयामत येऊन कोसळावी आणि ते गाफील असावेत.

**१०८.** (तुम्ही) सांगा, माझा हाच मार्ग आहे. मी आणि माझे अनुयायी अल्लाहकडे बोलावित आहेत पूर्ण विश्वास आणि श्रद्धेसह[२] आणि अल्लाह पवित्र आहे आणि मी अनेकेश्वरवाद्यांपैकी नाही.

**१०९.** आणि तुमच्यापूर्वी आम्ही वस्तीवाल्यांमध्ये जेवढेदेखील पैगंबर पाठविले ते सर्व

---

(१) ही ती वस्तुस्थिती आहे, जिला कुरआनाने अनेक ठिकाणी स्पष्टपणे सांगितले आहे की हे मूर्तीपूजक हे मान्य करतात की आकाश व धरतीचा रचयिता, स्वामी, पालनहार आणि संचालक केवळ अल्लाहच आहे, तरीही ते उपासनेत अल्लाहसोबत इतरांनाही सामील करतात. अशा प्रकारे अधिकांश लोक अनेकेश्वरवादी आहेत अर्थात प्रत्येक कालखंडातील लोक तौहीद (एकेश्वरवाद) उपासना मानण्यास तयार होत नाही. आजच्या काळात कबरींची पूजा करणाऱ्यांचा शिर्कही असाच आहे की ते कबरीत गाडल्या गेलेल्या बुजूर्गांना उपास्य समजून त्यांना मदतीसाठी पुकारतात आणि अनेकविध उपासना पद्धती अंगीकारतात.

(२) अर्थात तौहीद (एकेश्वरवाद) चा मार्ग हाच माझा मार्ग आहे, किंबहुना समस्त पैगंबरांचाही हाच मार्ग होता. याच मार्गाकडे मी आणि माझे अनुयायी मजबूत ईमानासह आणि धार्मिक नियमांच्या प्रमाणासह लोकांना आवाहन करतो.

पुरुषच होते, ज्यांच्याकडे आम्ही वहयी (प्रकाशना) उतरवित राहिली काय धरतीवर या लोकांनी हिंडून फिरून पाहिले नाही की त्यांच्यापूर्वी होऊन गेलेल्या लोकांचा कसा परिणाम (अंत) झाला? निःसंशय, अल्लाहचे भय राखणाऱ्या व त्याचा आज्ञाभंग करण्यापासून दूर राहणाऱ्या लोकांकरिता आखिरतचे घर फार उत्तम आहे. काय तरीही तुम्ही ध्यानी घेत नाही?

**११०.** येथेपर्यंत की जेव्हा पैगंबर निराश होऊ लागले आणि उम्मत (जनसमुदाया) चे लोक असे समजू लागले की त्यांना खोटे सांगितले गेले, त्वरित त्यांच्यापर्यंत आमची मदत येऊन पोहोचली. आम्ही ज्याला इच्छिले त्याला सुटका प्रदान केली. खरी गोष्ट अशी की आमचा अज़ाब (शिक्षा-यातना) अपराधी लोकांवरून टाळला जात नाही.

**१११.** यांच्या कहाण्यां (वृत्तांता) मध्ये बुद्धिमानांकरिता निश्चितच बोध आणि तंबी आहे. हा कुरआन काही खोट्या रचलेल्या गोष्टी नाही, किंबहुना हे सत्य-समर्थन आहे त्या ग्रंथांचे जे याच्या पूर्वीचे आहेत, आणि प्रत्येक गोष्टीचे सविस्तर वर्णन आणि मार्गदर्शन व दया-कृपा आहे ईमान राखणाऱ्यांकरिता.

---------

## शूरह रॉअद - १३

सूरह अल् राअद मदीना येथे अवतरली आणि यात त्रेचाळीस आयती आणि सहा रूकूउ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** आलिफ.लाम.मीम.रॉ.या कुरआनाच्या आयती आहेत आणि तुमच्या पालनकर्त्यातर्फे जे काही तुमच्याकडे उतरविले गेले आहेत ते सर्व सत्य आहे, परंतु अधिकांश लोक ईमान राखत नाहीत (विश्वास बाळगत नाही).

**२.** अल्लाह तो आहे, ज्याने आकाशांना खांबांविना उंच राखले आहे की तुम्ही पाहत आहात, मग तो अर्श (ईशसिंहासना) वर स्थिर आहे, त्यानेच सूर्य आणि चंद्राला अधीन करून ठेवले आहे. प्रत्येक निर्धारीत वेळेवर चालत आहे. तोच सर्व कामाची व्यवस्था राखतो. तो आपल्या निशाण्यांचे स्पष्टपणे निवेदन करीत आहे. यासाठी की तुम्ही आपल्या पालनकर्त्याशी भेट होण्यावर विश्वास करावा.

**३.** आणि त्यानेच जमिनीला पसरवून दिले आहे आणि तिच्यात पर्वत आणि नद्या निर्माण केल्या आहेत आणि त्यात प्रत्येक प्रकारच्या फळांच्या जोड्या दुहेरी निर्माण केल्या आहेत. तो रात्रीने दिवसाला लपवितो, निश्चितच विचार चिंतन करणाऱ्यांसाठी यात अनेक निशाण्या (बोधचिन्हे) आहेत.

**४.** आणि जमिनीत अनेक प्रकारचे तुकडे एकमेकांशी मिळते जुळते आहेत, आणि द्राक्षांच्या बागा आहेत आणि शेते आहेत आणि फांद्या असलेली खजुरीची झाडे आहेत आणि काही असे आहेत ज्यांना फांद्या नाहीत. सर्वांना एकाच प्रकारचे पाणी दिले जाते, तरीही आम्ही एकावर एकाला फळांमध्ये श्रेष्ठता प्रदान करतो. यात बुद्धिमान लोकांकरिता अनेक निशाण्या आहेत.

**५.** आणि जर तुम्हाला नवल वाटत असेल तर खरोखर त्यांचे हे म्हणणे आश्चर्यकारक आहे की काय जेव्हा आम्ही (मेल्यानंतर) माती होऊन जाऊ तेव्हा काय आम्ही नव्याने जन्म घेऊ? हेच ते लोक होत, ज्यांनी आपल्या पालनकर्त्याशी इन्कार केला आणि हेच ते लोक होत, ज्यांच्या गळ्यात जोखड (फंदे) असतील आणि हेच होत जे जहन्नममध्ये राहणारे आहेत, जे सदैव त्यात राहतील.

**६.** आणि जे सुख-संपन्न अवस्थेपूर्वीच तुमच्याजवळ शिक्षेची याचना करण्यात घाई करीत आहेत, निःसंशय, त्यांच्यापूर्वी (उदाहरणादाखल) शिक्षा-यातना आलेल्या आहेत, आणि निःसंशय तुमचा पालनकर्ता माफ करणारा आहे, लोकांच्या अनुचित अत्याचारानंतरही आणि निश्चितच तुमचा पालनकर्ता कठोर दंड देणाराही आहे.

**७.** आणि काफिर (कृतघ्न लोक) म्हणतात की त्याच्यावर त्याच्या पालनकर्त्यातर्फे एखादी निशाणी (चमत्कार) का नाही अवतरित केला गेला? खरी गोष्ट अशी की तुम्ही तर केवळ सचेत करणारे आहात आणि प्रत्येक जनसमूहासाठी मार्गदर्शन करणारा आहे.[१]

**८.** मादा आपल्या पोटात (गर्भात) जे काही राखते ते अल्लाह चांगल्या प्रकारे जाणतो[२]

(१) अर्थात प्रत्येक जाती-जमातीच्या मार्गदर्शनासाठी अल्लाहने पैगंबर अवश्य पाठविला आहे. आता ही गोष्ट वेगळी की त्या जनसमूहांनी तो मार्ग अंगीकारला किंवा नाही अंगीकारला, तथापि सरळ मार्ग दाखविण्यासाठी अल्लाहचा संदेश घेऊन येणारा प्रत्येक जाती-जमातीत अवश्य आला.

(२) मातेच्या गर्भात काय आहे, पुत्र की कन्या, सुंदर किंवा कुरुप, सदाचारी किंवा दुराचारी, दीर्घायुषी किंवा अल्पायुषी वगैरे सर्व गोष्टी केवळ सर्वश्रेष्ठ अल्लाहच जाणतो.

आणि पोटा (गर्भाशया) चे घटणे-वाढणेही जाणतो. प्रत्येक गोष्ट त्याच्याजवळ अनुमानानुसार आहे.

**९.** लपलेल्या आणि उघड अशा सर्व गोष्टींचे तो ज्ञान राखणारा आहे. सर्वांत महान सर्वांत उच्च आणि सर्वांत उत्तम आहे.

**१०.** तुमच्यापैकी एखाद्याचे आपली गोष्ट लपवून सांगणे किंवा ती मोठ्या आवाजात सांगणे आणि जो रात्री लपलेला असेल आणि जो दिवसा चालत असेल, सर्व अल्लाहकरिता सारखेच आहे.

**११.** त्याचे संरक्षक मानवाच्या पुढे मागे तैनात आहेत, जे अल्लाहच्या आदेशाने त्याचे रक्षण करतात. एखाद्या जनसमूहाची अवस्था सर्वश्रेष्ठ अल्लाह तोपर्यंत बदलत नाही, जोपर्यंत तो स्वतः बदलत नाही, जे त्यांच्या मनात आहे. सर्वश्रेष्ठ अल्लाह जेव्हा एखाद्या जनसमूहाला सजा देण्याचा निर्णय घेतो, तेव्हा तो निर्णय बदलत नाही आणि त्याच्याखेरीज कोणीही त्यांचा मदतकर्ता नाही.

**१२.** तो अल्लाहच होय, जो तुम्हाला विजेची चमक दाखवितो यासाठी की तुम्ही भयभीत व्हावे आणि उमेद बाळगावी आणि अवजड ढगांनाही तोच निर्माण करतो.

**१३.** आणि मेघ-गर्जना त्याची स्तुती-प्रशंसा आणि गुणगान करते आणि फरिश्तेदेखील त्याच्या भयाने, तोच आकाशातून वीज पाडतो. आणि ज्याच्यावर इच्छितो, त्याच्यावर पाडतो. काफिर लोक अल्लाहविषयी वाद-विवाद घालत आहेत आणि अल्लाह जबरदस्त शक्तिशाली आहे.

**१४.** त्यालाच पुकारणे खरे आहे. जे लोक त्याच्याखेरीज दुसऱ्यांना पुकारतात, ते त्यांच्या कोणत्याही हाकेला उत्तर देत नाहीत जणू एखाद्या माणसाने आपले हात पाण्याकडे पसरविले असावेत की पाणी त्यांच्या तोंडात येऊन पडावे, वास्तविक ते पाणी त्यांच्या तोंडात जाणार नाही.[१] त्या काफिर लोकांचे जेवढे पुकारणे आहे सर्व पथभ्रष्ट आहे.

**१५.** आणि आकाशांमध्ये व जमिनीवर असलेले समस्त जीव राजी-खुशीने व ना

(१) अर्थात जे लोक अल्लाहला सोडून इतरांना मदतीसाठी पुकारतात, त्यांचे उदाहरण असे की जणू एखाद्याने पाण्याकडे हात पसरवून पाण्याला सांगावे, ये माझ्या तोंडात ये, उघड आहे पाणी न चालणारे आहे, त्याला काय माहीत की हात पसरविणाऱ्याची गरज काय आहे आणि न त्याला हे माहीत की मला

खुशीने अल्लाहलाच सजदा करतात आणि त्यांच्या सावल्यासुद्धा सकाळ-संध्याकाळ अल्लाहला सजदा करतात.

**१६.** (तुम्ही) विचारा, आकाशांचा आणि जमिनीचा पालनकर्ता कोण आहे? सांगा अल्लाह! त्यांना सांगा, काय तरीही तुम्ही याच्याखेरीज दुसऱ्यांना मदत करणारे बनवित आहात, जे स्वतः आपल्या जीवाच्या लाभ-हानीचा अधिकार बाळगत नाही. सांगा, काय आंधळा आणि डोळस दोन्ही समान असू शकतात? किंवा अंधार आणि प्रकाश समान असू शकतो? काय, ज्यांना हे अल्लाहचा सहभागी बनवित आहेत, त्यांनीही अल्लाहप्रमाणे काही निर्माण केले आहे की त्यांच्या पाहण्यात निर्मितीच संदिग्ध ठरली? तुम्ही सांगा, केवळ अल्लाहच सर्व वस्तूंना निर्माण करणारा आहे. तो एकटा आहे आणि मोठा जबरदस्त वर्चस्वशाली आहे.

**१७.** त्यानेच आकाशातून पर्जन्य वृष्टी केली, मग आपापल्या सामर्थ्यानुसार नाले वाहू लागले, मग पाण्याच्या प्रवाहाने वर चढून फेस उचलला आणि त्या वस्तूतही जिला आगीत टाकून तापवितात दागिने किंवा सामानाकरिता, त्याच प्रकारचा फेस आहे. अशा प्रकारे सर्वश्रेष्ठ अल्लाह सत्य आणि असत्याला स्पष्ट करण्यासाठी उदाहरण देतो. आता तो फेस निकामी होऊन निघून जातो, परंतु ज्या गोष्टी लोकांना लाभ पोहचविणाऱ्या आहेत, त्या धरतीत टिकून राहतात. सर्वश्रेष्ठ अल्लाह अशा प्रकारे उदाहरण देत असतो.

**१८.** ज्या लोकांनी आपल्या पालनकर्त्याच्या आदेशाचे पालन केले, त्यांच्याकरिता भलाई आहे आणि ज्या लोकांनी त्याच्या आदेशाचे अनुसरण केले नाही, तर धरतीवर जे काही आहे ते सर्व त्याच्याजवळ असेल आणि त्यासोबत तेवढेच आणखी जास्त असेल मग ते सर्व काही आपल्या बदली (बचावासाठी) देऊन टाकील. हेच ते लोक होत, ज्यांच्यासाठी मोठा वाईट हिशोब आहे आणि त्यांचे ठिकाण जहन्नम आहे, जे फार वाईट ठिकाण आहे.

**१९.** काय तो मनुष्य, ज्याला हे माहीत असावे की जे तुमच्याकडे तुमच्या

---

तोंडापर्यंत येण्याचे सांगितले जात आहे, आणि त्याच्यात हे सामर्थ्य नाही की आपल्या जागेवरून चालत जाऊन, त्याच्या तोंडापर्यंत पोहचावे. अशा प्रकारे हे अनेक ईश्वरांची भक्ती आराधना करणारे अल्लाहखेरीज ज्यांना पुकारतात, त्यांना माहीतही नाही की कोणी त्यांना पुकारत आहे, आणि त्याची अमकी एक गरज आहे आणि ना ती गरज पूर्ण करण्याचे त्यांच्या अंगी सामर्थ्य आहे.

पालनकर्त्यातर्फे उतरविले गेले आहे ते सत्य आहे, काय त्या माणसासारखा असू शकतो जो आंधळा असावा. बोध-उपदेश तर तेच स्वीकारतात जे बुद्धिमान असावेत.

**२०.** जे लोक अल्लाहला दिलेले वचन पूर्ण करतात आणि वचन भंग करीत नाही.

**२१.** आणि अल्लाहने ज्या गोष्टींना जोडण्याचा आदेश दिला आहे, ते त्यांना जोडतात आणि ते आपल्या पालनकर्त्याचे भय राखतात आणि हिशोबाच्या कठोरतेचेही भय राखतात.

**२२.** आणि ते आपल्या पालनकर्त्याच्या प्रसन्नतेखातीर धीर-संयम राखतात आणि नमाजांना सातत्याने कायम राखतात आणि जे काही आम्ही त्यांना देऊन ठेवले आहे ते (धन) उघड आणि छुप्या रीतीने खर्च करतात आणि वाईट व्यवहाराला भलेपणाने टाळतात. अशाच लोकांकरिता आखिरतचे घर आहे.

**२३.** आणि नेहमी राहणाऱ्या बागा, जिथे हे स्वतः जातील आणि त्यांचे वाडवडील, आणि पत्न्या, आणि संतानापैकी जे नेक काम करणारे असतील, त्यांच्याजवळ फरिश्ते प्रत्येक दारातून येतील.

**२४.** (म्हणतील की) तुमच्यावर शांती-सलामती असो धीर-संयमाच्या मोबदल्यात किती उत्तम मोबदला आहे या आखिरतच्या घराचा!

**२५.** आणि जे लोक अल्लाहला दिलेले वचन, ते दृढ-मजबूत केल्यानंतर तोडून टाकतात आणि ज्या गोष्टींना अल्लाहने जोडण्याचा आदेश दिला आहे त्यांना तोडून टाकतात आणि धरतीत उपद्रव (फसाद) पसरवितात त्यांच्यावर धिःक्कार आहे आणि त्यांच्यासाठी वाईट घर आहे.

**२६.** सर्वश्रेष्ठ अल्लाह ज्याची रोजी (आजिविका) इच्छितो वाढवितो आणि ज्याची इच्छितो घटवितो. हे लोक तर ऐहिक जीवनातच मग्न झालेत.[१] वास्तविक हे जग, आखिरतच्या तुलनेत अगदी तुच्छ सामुग्री आहे.[२]

---

(१) एखाद्याला जर ऐहिक धन संपत्ती खूप जास्त लाभत आहे, वास्तविक तो अल्लाहचा अवज्ञाकारी आहे, तर ही खूप आनंदित आणि बेपर्वा होण्याची बाब नव्हे, कारण ही संधी आहे. न जाणो केव्हा ही मुदत संपेल आणि माणूस अल्लाहच्या पकडीत सापडेल.

(२) हदीस वचनात उल्लेखित आहे की या जगाचे मूल्य आखिरत अर्थात मरणोत्तर जीवनाच्या तुलनेत असे आहे की जणू एखाद्याने आपले बोट समुद्रात बुडवून बाहेर काढावे तेव्हा पाहावे की समुद्राच्या अफाट जलाशयाच्या तुलनेत त्याच्या त्या बोटात केवढे पाणी आले?

**२७.** काफिर (ईमान न राखणारे) म्हणतात की त्याच्यावर त्याच्या पालनकर्त्यातर्फे एखादी निशाणी (चमत्कार) का नाही उतरविला गेला? उत्तर द्या, ज्याला अल्लाह पथभ्रष्ट करू इच्छितो, त्याला पथभ्रष्ट करतो आणि जो त्याच्याकडे झुकतो त्याला मार्ग दाखवितो.

**२८.** ज्या लोकांनी ईमान राखले, त्यांची मने, अल्लाहच्या स्मरणाने शांती प्राप्त करतात. लक्षात ठेवा की अल्लाहच्या स्मरणानेच हृदयाला शांती समाधान लाभते.

**२९.** ज्या लोकांनी ईमान राखले आणि ज्यांनी सत्कर्मेदेखील केलीत त्यांच्याकरिता सुख-संपन्न अवस्था आहे आणि सर्वांत उत्तम स्थान आहे.

**३०.** त्याच प्रकारे आम्ही तुम्हाला त्या जनसमूहात पाठविले, ज्यात यापूर्वी अनेक जनसमूह होऊन गेलेत, यासाठी की तुम्ही त्यांना, आमच्यातर्फे जी वहयी (प्रकाशना) तुमच्यावर अवतरित केली आहे, वाचून ऐकवा. हे लोक परम दयाळू (रहमान) अल्लाहचा इन्कार करणारे आहेत. तुम्ही सांगा, माझा स्वामी व पालनकर्ता तर तोच आहे, निःसंशय, त्याच्याखेरीज कोणीही उपासनेस पात्र नाही. त्याच्यावरच माझा भरोसा आहे आणि त्याच्याचकडे मला परत जायचे आहे.

**३१.** आणि जर (गृहीत धरले की) कुरआनद्वारे पर्वत चालविले गेले असते किंवा जमिनीचे तुकडे तुकडे केले गेले असते किंवा मेलेल्या लोकांशी संभाषण करविले गेले असते (तरीही त्यांनी ईमान राखले नसते). खरी गोष्ट अशी की समस्त कार्ये अल्लाहच्याच हाती आहेत, तेव्हा काय ईमान राखणाऱ्यांचे मन या गोष्टीवर संतुष्ट होत नाही की जर अल्लाहने इच्छिले तर समस्त लोकांना सरळ मार्गावर आणील. ईमान न राखणाऱ्याला तर त्यांच्या इन्कारापायी नेहमी कोणती न कोणती सक्त सजा मिळतच राहील, किंवा त्यांच्या घरांच्या जवळपास उतरत राहील. येथेपर्यंत की अल्लाहचा वायदा येऊन पोहोचेल. निःसंशय सर्वश्रेष्ठ अल्लाह वायद्याविरूद्ध जात नाही.

**३२.** आणि निःसंशय, तुमच्या पूर्वीच्या पैगंबरांशी थट्टा-मस्करी केली गेली होती, आणि मीदेखील त्या काफिरांना थोडे सैल सोडले, नंतर मात्र त्यांना पकडीत घेतले, तर कशी राहिली माझी शिक्षा (अज़ाब)?

**३३.** तर काय तो अल्लाह जो समाचार घेणारा आहे प्रत्येक माणसाचा त्याने केलेल्या कर्माबद्दल, आणि त्या लोकांनी अल्लाहचे भागीदार ठरविले आहेत. सांगा, जरा त्यांची

नावे तर सांगा, किंवा अल्लाहला तुम्ही त्या गोष्टी सांगत आहात, ज्या तो धरतीवर जाणतच नाही, किंवा केवळ वरवरच्या गोष्टी बनवित आहात.[१] खरी गोष्ट अशी की कुफ्र (इन्कार) करणाऱ्यांकरिता, त्यांची कपट-कारस्थाने भलेही चांगली दाखविली गेली असोत आणि त्यांना सत्य मार्गापासून रोखले गेले आहे आणि ज्याला अल्लाह मार्गभ्रष्ट करील, त्याला मार्ग दाखविणारा कोणीही नाही.

**३४.** त्यांच्यासाठी या जगाच्या जीवनातही दुःख आहे आणि आखिरत (मरणोत्तर जीवना) चा अज़ाब तर फार सक्त आहे आणि त्यांना अल्लाहच्या प्रकोपापासून वाचविणारा कोणीही नाही.

**३५.** त्या जन्नतचे उदाहरण, ज्याचा वायदा अल्लाहचे भय राखणाऱ्यांशी केला गेला आहे, असे आहे की तिच्याखाली प्रवाह वाहत असतील, तिची फळे नेहमी राहणारी आहेत आणि तिची सावलीदेखील. हा आहे मोबदला अल्लाहचे भय राखणाऱ्यांचा आणि काफिर लोकांचा शेवट जहन्नम आहे.

**३६.** आणि ज्यांना आम्ही ग्रंथ प्रदान केला आहे, ते तर त्याद्वारे खूप आनंदित होतात, जे काही तुमच्यावर अवतरित केले जाते आणि इतर संप्रदाय, त्यातल्या काही गोष्टींना मान्य करीत नाही. तुम्ही त्यांना सांगून टाका की मला तर केवळ हाच आदेश दिला गेला आहे की मी अल्लाहची उपासना करावी आणि त्याच्यासोबत कोणाला भागीदार न बनवावे, मी त्याच्याचकडे बोलवित आहे आणि त्याच्याचकडे मला परतून जायचे आहे.

**३७.** आणि अशा प्रकारे आम्ही हा कुरआन, अरबी भाषेतील फर्मान अवतरित केले आहे, आणि जर तुम्ही यांच्या इच्छा आकांक्षांचे अनुसरण केले, याच्यानंतरही की तुमच्याजवळ ज्ञान येऊन पोहोचले आहे, तर अल्लाहच्या विरोधात तुम्हाला ना कोणी समर्थन देणारा भेटेल आणि ना रक्षण करणारा.

**३८.** आणि आम्ही तुमच्या पूर्वीही अनेक रसूल (पैगंबर) पाठविले आहेत, आणि आम्ही

---

(१) या ठिकाणी मूळ शब्द (जाहिर), कल्पना या अर्थाने आहे. अर्थात या त्यांच्या केवळ काल्पनिक गोष्टी आहेत. अर्थात हे की तुम्ही या आराध्य दैवतांची पूजा या विचाराने करता की हे तुम्हाला लाभ हानी पोहचवू शकतात आणि तुम्ही त्यांची नावेदेखील देवता ठेवलेली आहेत. जरी ही नावे तुम्ही आणि तुमच्या वाडवडिलांनी ठेवली आहेत, ज्यांचे कोणतेही प्रमाण अल्लाहने अवतरित केले नाही. हे केवळ कल्पना आणि मनाला आवडेल तसे करतात. (सूरह अल् नज्म-२३)

त्या सर्वांना पत्नी आणि संतान राखणारा बनविले होते. अल्लाहच्या हुकुमाविना एखादी निशाणी आणून दाखविणे कोणत्याही पैगंबराच्या अखत्यारातील (अवाख्यातील) गोष्ट नाही. प्रत्येक निर्धारीत वायद्याचा एक ग्रंथ आहे.

**३९.** अल्लाह जे इच्छिल मिटवून टाकील आणि जे इच्छिल सुरक्षित ठेवील. सुरक्षित ग्रंथ (लौहे महफूज) त्याच्याचजवळ आहे.

**४०.** आणि त्यांच्याशी केलेल्या वायद्यांपैकी जर एखादा आम्ही तुम्हाला दाखवून द्यावा किंवा तुम्हाला आम्ही मृत्यु द्यावा तर तुमच्यावर केवळ पोहचविण्याचीच जबाबदारी आहे, हिशोब घ्यायचे काम तर आमचे आहे.

**४१.** काय ते नाही पाहत की आम्ही धरतीला तिच्या किनाऱ्यांकडून घटवित आलो आहोत. अल्लाह आदेश देतो आणि कोणीही त्याच्या आदेशाला पाठीमागे टाकणारा नाही. तो लवकरच हिशोब घेणार आहे.

**४२.** आणि त्यांच्या पूर्वीच्या लोकांनीही कपट-कारस्थान करण्यात काही कसर सोडली नव्हती, परंतु समस्त उपाययोजना अल्लाहचीच आहे. मनुष्य जे काही करीत आहे, अल्लाह ते जाणतो. ईमान न राखणाऱ्यांना लवकरच माहीत पडेल की आखिरतचा मोबदला कोणासाठी आहे.

**४३.** आणि हे इन्कारी लोक असे म्हणतात की तुम्ही अल्लाहचे पैगंबर नाहीत. (तुम्ही) उत्तर द्या की माझ्या आणि तुमच्या दरम्यान साक्ष देण्यासाठी अल्लाह पुरेसा आहे, आणि तो, ज्याच्याजवळ ग्रंथाचे ज्ञान आहे.

—-

## सूरह इब्राहीम - १४

सूरह इब्राहीम मक्का येथे अवतरली आणि यात बावन्न आयती आणि सात रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** आलिफ. लाम.रॉ हा (सर्वांत उत्तम) ग्रंथ आम्ही तुमच्याकडे अवतरित केला आहे, यासाठी की तुम्ही लोकांना अंधारातून प्रकाशाकडे आणावे त्यांच्या पालनकर्त्याच्या आदेशाने जबरदस्त, प्रशंसनीय अल्लाहच्या मार्गाकडे.

**२.** आकाशांमध्ये आणि धरतीत जे काही आहे ते सर्व अल्लाहचेच आहे आणि काफिर (कृतघ्न) लोकांसाठी सक्त अज़ाबाचे संकट आहे.

**३.** जे लोक आखिरत (परलोक) च्या तुलनेत ऐहिक जीवनाचा मोह धरतात आणि अल्लाहच्या मार्गापासून रोखतात आणि त्यात वक्रता निर्माण करू इच्छितात, हेच लोक मोठ्या दूरच्या मार्गभ्रष्टतेत आहेत.

**४.** आणि आम्ही प्रत्येक पैगंबराला त्याच्या जनसमूहाच्या भाषेतच पाठविले आहे यासाठी की जनसमूहाच्या लोकांसमोर स्पष्टपणे सांगावे, आता अल्लाह ज्याला इच्छिल मार्गभ्रष्ट करील आणि ज्याला इच्छिल मार्ग दाखविल. तो मोठा जबरदस्त आणि हिकमतशाली आहे.

**५.** (स्मरण करा जेव्हा) आम्ही मूसाला आपल्या निशाण्या देऊन पाठविले की तू आपल्या जनसमूहाच्या लोकांना अंधारातून काढून उजेडात आण आणि त्यांना अल्लाहच्या उपकारांची आठवण करून दे. यात निशाण्या आहेत प्रत्येक धीर-संयम राखणाऱ्याकरिता.

**६.** आणि जेव्हा मूसा आपल्या जनसमूहाच्या लोकांना म्हणाले, की अल्लाहच्या त्या कृपा देणग्यांची आठवण करा ज्या त्याने तुम्हाला दिल्या आहेत, जेव्हा त्याने तुम्हाला फिरऔनच्या साथीदारांपासून सोडविले जे तुम्हाला फार दुःख पोहचवित होते. तुमच्या पुत्रांची हत्या करीत आणि तुमच्या मुलींना जिवंत सोडून देत. यात तुमच्या पालनकर्त्यातर्फे तुमची फार मोठी कसोटी होती.

**७.** आणि जेव्हा तुमच्या पालनकर्त्याने सचेत केले की जर तुम्ही कृतज्ञता व्यक्त कराल तर निःसंशय मी तुम्हाला आणखी जास्त प्रदान करेन आणि जर तुम्ही कृतघ्न व्हाल तर निश्चितच माझी शिक्षा-यातना मोठी सक्त आहे.

**८.** आणि मूसा म्हणाले, जर तुम्ही सर्व आणि धरतीवर राहणारे समस्त लोक अल्लाहशी कृतघ्न होतील, तरीही अल्लाह निःस्वार्थ आणि प्रशंसनीय आहे.

**९.** काय तुमच्याजवळ, तुमच्यापूर्वी होऊन गेलेल्या लोकांचा वृत्तांत आला नाही? अर्थात नूहच्या जनसमूहाचा, आणि आद व समूदचा आणि त्यांच्यानंतरच्या लोकांचा, ज्यांना अल्लाहशिवाय दुसरा कोणीही जाणत नाही. त्यांच्याजवळ त्यांचे पैगंबर चमत्कार

घेऊन आले, परंतु त्यांनी आपले हात आपल्या तोंडावर ठेवून घेतले आणि स्पष्टपणे सांगून टाकले की जे काही देऊन तुम्हाला पाठविले गेले आहे आम्ही ते मानत नाही आणि ज्या गोष्टीकडे तुम्ही आम्हाला बोलवित आहात, आम्हाला तर त्यात फार शंका वाटते (आमचा त्यावर विश्वास नाही).

**१०.** त्यांचे पैगंबर त्यांना म्हणाले की काय अल्लाह (जो सत्य आहे) त्याच्याविषयी शंका आहे, जो आकाशांचा व धरतीचा निर्माण करणारा आहे तो तर तुम्हाला अशासाठी बोलावित आहे की त्याने तुमचे सर्व अपराध माफ करावेत आणि एक ठरलेल्या अवधीपर्यंत तुम्हाला संधी प्रदान करावी ते (लोक) म्हणाले, तुम्ही तर आमच्यासारखेच मानव आहात. तुम्ही हे इच्छिता की आम्हाला त्या दैवतांच्या पूजा-अर्चनेपासून रोखावे, ज्यांची भक्ती-आराधना आमचे वाडवडील करत राहिले, बरे तर आमच्यासमोर एखादे स्पष्ट प्रमाण तरी सादर करा.

**११.** त्यांचे पैगंबर त्यांना म्हणाले, हे अगदी सत्य आहे की आम्ही तुमच्यासारखे मानव आहोत. परंतु सर्वश्रेष्ठ अल्लाह आपल्या दासांपैकी ज्याच्यावर इच्छितो आपली कृपा करतो. आमची ताकद नाही की आम्ही अल्लाहच्या हुकुमाविना एखादा मोजिजा (चमत्कार) तुम्हाला दाखवावा आणि ईमान राखणाऱ्यांनी केवळ अल्लाहवरच भरोसा ठेवला पाहिजे.

**१२.** आणि शेवटी काय सबब आहे की आम्ही सर्वश्रेष्ठ अल्लाहवर भरोसा न ठेवावा? वास्तविक त्यानेच आम्हाला आमचा मार्ग दाखविला आहे आणि जे दुःख तुम्ही आम्हाला पोहोचवाल, आम्ही त्यावर निश्चितच धीर-संयम राखू. भरोसा ठेवणाऱ्यांसाठी हेच योग्य आहे की त्यांनी अल्लाहवरच भरोसा ठेवला पाहिजे.

**१३.** आणि इन्कारी लोक आपल्या पैगंबरांना म्हणाले की आम्ही तुम्हाला देशाबाहेर घालवून देऊ किंवा तुम्ही पुन्हा आमच्या धर्मात परत या. तेव्हा त्यांच्या पालनकर्त्याने त्यांच्याकडे वहयी (प्रकाशना) पाठविली की आम्ही त्या अत्याचारी लोकांचाच नाश करून टाकू.

**१४.** आणि त्यानंतर आम्ही स्वतः तुम्हाला धरतीवर आबाद करू. हे अशा लोकांसाठी आहे, जे माझ्यासमोर उभे राहण्यापासून भित राहिले आणि माझ्या चेतावणीचे भय बाळगत राहिले.

**१५.** आणि त्यांनी निर्णय मागितला, आणि सर्व विद्रोही जिद्दी लोक असफल झाले.

**१६.** त्यांच्यासमोर जहन्नम आहे, जिथे त्यांना पीप (पू) चे पाणी पाजले जाईल.[१]

**१७.** ज्याला तो मोठ्या त्रासाने एक एक घोट करू प्यायचा प्रयत्न करील तरीही ते घशाखाली उतरवू शकणार नाही. आणि त्याला सगळीकडून मृत्यु येत असलेला दिसेल, परंतु तो मरणार नाही. त्याच्या पाठोपाठ सक्त अज़ाब (शिक्षा-यातना) आहे.

**१८.** त्या लोकांचे उदाहरण ज्यांनी आपल्या पालनकर्त्याचा इन्कार केला त्यांचे कर्म त्या राखेसारखे आहे, जिच्यावर वेगवान वारा वादळाच्या दिवशी चालावा. जे काही त्यांनी केले, त्यापैकी कोणत्याही गोष्टीवर समर्थ नसतील. हीच दूरची मार्गभ्रष्टता आहे.

**१९.** काय तुम्ही नाही पाहिले की सर्वश्रेष्ठ अल्लाहने आकाशांना आणि धरतीला सर्वोत्तम उपाययोजनेद्वारे निर्माण केले आहे. जर त्याने इच्छिले तर तुम्हा सर्वांना नष्ट करून टाकील आणि नवीन निर्मिती (सृष्टी) आणील.

**२०.** आणि अल्लाहकरिता असे करणे काहीच कठीण नाही.

**२१.** आणि सर्वच्या सर्व अल्लाहसमोर उभे राहतील. त्या वेळी कमजोर लोक घमेंडी लोकांना म्हणतील की आम्ही तर तुमच्या अधीन होतो, तर काय तुम्ही अल्लाहच्या शिक्षा-यातनांमधून थोडी सजा आमच्यावरून दूर करू शकणारे आहात? ते उत्तर देतील की जर अल्लाहने आम्हाला मार्गदर्शन केले असते तर आम्हीही तुम्हाला मार्ग दाखविला असता. आता तर आमच्यासाठी बेचैन होणे आणि सबुरी राखणे दोन्ही सारखेच आहे. आमच्याकरिता सुटकेचा कोणताही मार्ग नाही.

**२२.** आणि जेव्हा कार्याचा निर्णय लावला जाईल तेव्हा सैतान म्हणेल की अल्लाहने तर तुम्हाला सत्यवचन दिले होते आणि मी तुम्हाला जो वायदा दिला, त्याच्याविरूद्ध केले. माझा तुमच्यावर काही जोर तर नव्हताच. हो, मी तुम्हाला पुकारले आणि तुम्ही माझे

---

(१) पीप किंवा पू ते रक्त होय, जे नरकात जाणाऱ्यांच्या मांस आणि त्वचेतून वाहत राहिले असेल. काही हदीस वचनात याला 'उसारतु अहलिन्नारी' (मुसनद अहमद, भाग ५, पृ.१७१) (जहन्नमी लोकांच्या शरीरातून पिळून काढलेले) आणि काही हदीस वचनानुसार हे इतके गरम आणि उकळते असेल की त्यांच्या तोंडापर्यंत पोहोचताच त्यांच्या चेहऱ्यावरील त्वचा होरपळून गळून पडेल आणि एक एक घोट पिताच पोटातल्या आतड्या मल विसर्जनाच्या मार्गाने बाहेर पडतील.

म्हणणे मान्य केले. आता तुम्ही माझ्यावर दोषारोप ठेवू नका, उलट स्वतःचाच धिःक्कार करा. मी ना तुमची मदत करू शकतो, ना तुम्ही माझे गाऱ्हाणे दूर करू शकता. मी तर (सुरुवातीपासून) मानतच नाही की तुम्ही मला यापूर्वी अल्लाहचा सहभागी समजत राहिले. निःसंशय अत्याचारी लोकांसाठी दुःखदायक अज़ाब (शिक्षा-यातना) आहे.

**२३.** आणि ज्या लोकांनी ईमान राखले आणि सत्कर्मे केलीत तर त्यांना जन्नतींमध्ये दाखल केले जाईल, ज्यांच्यात नहरी (प्रवाह) वाहत आहेत, जिथे ते आपल्या पालनकर्त्याच्या आदेशाने नेहमी नेहमी राहतील जिथे त्यांचे स्वागत सतत सलामने होईल.

**२४.** काय तुम्ही नाही पाहिले की सर्वश्रेष्ठ अल्लाहने पवित्र गोष्टीचे उदाहरण एका पवित्र वृक्षासमान सांगितले, ज्याचे मूळ मजबूत आहे आणि ज्याच्या फांद्या आकाशात आहेत.

**२५.** जो आपल्या पालनकर्त्याच्या आदेशाने प्रत्येक वेळी आपले फळ देतो[१] आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह लोकांसमोर उदाहरण प्रस्तुत करतो यासाठी की त्यांनी बोध प्राप्त करावा.

**२६.** आणि अपवित्र व अमंगल गोष्टीची तुलना गलिच्छ वृक्षासारखी आहे, जे जमिनीच्या किंचित वरच्याच भागातून उखडून घेतले गेले त्याला कसलीही मजबूती (स्थिरता) नाही.[२]

**२७.** ईमान राखणाऱ्यांना सर्वश्रेष्ठ अल्लाह पक्क्या व मजबूत गोष्टींसह कायम राखतो. या जगाच्या जीवनातही आणि आखिरतमध्येही तथापि अत्याचारी लोकांना अल्लाह

---

(१) याचा अर्थ असा की ईमानधारकांचे उदाहरण त्या झाडासारखे आहे जे उन्हाळा, हिवाळा अशा प्रत्येक ऋतुत फळ देते. अशा प्रकारे ईमानधारकांची सत्कर्मे रात्रंदिवस प्रत्येक क्षणी आकाशाकडे नेली जातात. पवित्र वचनाशी अभिप्रेत इस्लाम किंवा 'ला इलाह इल्लल्लाह' आणि पवित्र वृक्षाशी अभिप्रेत खजुरीचे झाड होय, जसे की हदीसद्वारे सिद्ध आहे. (सहीह बुखारी, किताबिल इल्म, बाबूल फहम फिल इल्म आणि सहीह मुस्लिम, किताबुल सिफतिल कियामा, बाब मिस्लुल मोमिन, मिस्लुल नख्ला:)

(२) 'वाईट वचन'शी अभिप्रेत कुफ्र आणि 'वाईट झाडा'शी अभिप्रेत इन्द्रायणाचे झाड होय, ज्याचे मूळ जमिनीच्या वरच्या भागातच असते आणि मामुली झटक्याने उखटले जाते. तद्वतच ईमान न राखणाऱ्याच्या कर्माचे काहीच मूल्य नाही. ना ते आकाशात जाते आणि ना अल्लाहच्या दरबारात स्वीकारले जाते.

मार्गभ्रष्ट करतो आणि अल्लाह जे इच्छितो ते करतोच.

**२८.** काय तुम्ही त्यांच्यावर नजर नाही टाकली ज्यांनी अल्लाहच्या कृपा-देणगीच्या बदल्यात कृतघ्नता व्यक्त केली आणि आपल्या जनसमूहाला विनाशाच्या घरात आणून उतरविले.

**२९.** अर्थात जहन्नममध्ये, ज्यात हे सर्व जातील, ते फार वाईट ठिकाण आहे.

**३०.** आणि त्यांनी अल्लाहचे समकक्ष बनवून घेतले यासाठी की लोकांना अल्लाहच्या मार्गापासून विचलित करावे. (तुम्ही) सांगा की ठीक आहे, मौज-मस्ती करून घ्या. तुमचे ठिकाण तर शेवटी जहन्नम (नरक) च आहे.

**३१.** माझ्या ईमान राखणाऱ्या दासांना सांगा की त्यांनी नमाजला कायम राखावे आणि जे काही आम्ही त्यांना देऊन ठेवले आहे, त्यातून काही गुप्तपणे आणि उघडपणे खर्च करीत राहावे, यापूर्वी की तो दिवस यावा ज्यात ना कसली खरेदी-विक्री होईल, ना मैत्री ना प्रेम.

**३२.** अल्लाह तो आहे, ज्याने आकाशांना आणि धरतीला निर्माण केले आहे आणि आकाशातून पाऊस पाडून त्याद्वारे तुमच्या रोजी (अन्नसामुग्री) करिता फळे काढलीत आणि नौकांना तुमच्या अधीन केले की नद्यांमध्ये त्याच्या आदेशाने चालाव्यात. त्यानेच नद्या आणि कालव्यांना तुमच्या ताब्यात करून दिले आहे.

**३३.** त्यानेच तुमच्यासाठी सूर्य आणि चंद्राला अधीन केले आहे की ते सतत चालत (गतीशील) राहतात. आणि रात्र व दिवसाला तुमच्या कामी लावले आहे.

**३४.** आणि त्यानेच तुम्हाला तुम्ही मागितलेल्या सर्व वस्तूंपैकी देऊन ठेवल्या आहेत. जर तुम्ही अल्लाहच्या कृपा-देणग्यांची गणना करू इच्छित असाल तर पुरेपूर गणना करूच शकत नाही. निःसंशय मनुष्य मोठा अत्याचारी आणि कृतघ्न आहे.

**३५.** (इब्राहीमच्या या दुआ-प्रार्थनेचेही स्मरण करा) जेव्हा इब्राहीम म्हणाले, हे माझ्या पालनकर्त्या! या शहराला शांती-सलामतीचे स्थळ बनव. आणि मला आणि माझ्या संततीला मूर्तीपूजा करण्यापासून वाचव.

**३६.** हे माझ्या पालनकर्त्या! त्यांनी अनेक लोकांना सरळ मार्गापासून दूर केले आहे. आता जो माझे अनुसरण करील तो माझा आणि आणि जो अवज्ञा करील तर तू मोठा

माफ करणारा व दया करणारा आहे.

**३७.** हे माझ्या पालनकर्त्या! मी आपल्या काही संततीला या नापीक ओसाड जंगलात तुझ्या पवित्र घराच्या जवळ आबाद केले आहे. हे माझ्या पालनकर्त्या! हे अशासाठी की त्यांनी नमाज कायम करावी, यास्तव तू काही लोकांची मने त्यांच्याकडे आकर्षित कर आणि त्यांना फळांची रोजी (अन्नसामुग्री) प्रदान कर, यासाठी की त्यांनी कृतज्ञता व्यक्त करावी.

**३८.** हे आमच्या पालनकर्त्या! तू चांगल्या प्रकारे जाणतो, जे काही आम्ही लपवितो आणि जे जाहीर करतो. धरती आणि आकाशातील कोणतीही वस्तू अल्लाहपासून लपलेली नाही.

**३९.** अल्लाहची प्रशंसा आहे, ज्याने मला वृक्षावस्थेत इस्माईल आणि इसहाक प्रदान केले. निःसंशय माझा पालनकर्ता (अल्लाह) दुआ-प्रार्थना ऐकणारा आहे.

**४०.** हे माझ्या पालनकर्त्या! मला आणि माझ्या संततीला नमाज कायम राखणारा बनव. माझ्या पालनकर्त्या! माझी दुआ कबूल कर.

**४१.** हे आमच्या पालनकर्त्या! मला क्षमा प्रदान कर आणि माझ्या माता-पित्यासह माफ कर आणि इतर ईमान राखणाऱ्यांनाही माफ कर, ज्या दिवशी (कर्मांचा) हिशोब होईल.

**४२.** अत्याचारी लोकांच्या कर्मांपासून अल्लाहला बेखबर समजू नका त्याने तर त्यांना त्या दिवसापर्यंत संधी देऊन ठेवली आहे, ज्या दिवशी डोळे विस्फारलेले(फाटलेल) राहतील.

**४३.** ते आपले डोके वर काढून धावपळ करत असतील. स्वतः आपल्याकडेही त्यांची दृष्टी परतणार नाही आणि त्यांची मने उडत आणि पडत जात (शून्य) असतील.

**४४.** आणि लोकांना त्या दिवसापासून सावध करा जेव्हा त्यांच्याजवळ अज़ाब (शिक्षा-यातना) येऊन पोहोचेल आणि अत्याचारी लोक म्हणतील की हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला फार थोड्या जवळच्या वेळेपर्यंतच संधी प्रदान कर की आम्ही तुझे निमंत्रण (दावत) मान्य करावे आणि तुझ्या पैगंबरांच्या अनुसरणात मग्न व्हावे. काय तुम्ही याच्या पूर्वीही शपथ घेत नव्हते की तुम्हाला या जगातून टळायचेच नाही.

**४५.** आणि काय तुम्ही त्या लोकांच्या घरात राहत नव्हते, ज्यांनी आपल्या प्राणांवर

जुलूम केला आणि काय तुम्हाला तो मामला उघडपणे कळला नाही की आम्ही त्यांच्याशी कशा प्रकारचा व्यवहार केला? आम्ही तर तुम्हाला समजाविण्यासाठी अनेक उदाहरणे सादर केलीत.

**४६.** आणि हे आपले डावपेच खेळत आहेत आणि अल्लाहला त्यांच्या सर्व डावपेचांचे ज्ञान आहे. त्यांचे डाव पेच असे नव्हते की त्यांच्यामुळे पर्वतांनी आपली जागा सोडली असती.

**४७.** तुम्ही असा विचार कधीही करू नका की अल्लाह आपल्या पैगंबरांशी केलेल्या वायद्याविरूद्ध जाईल. अल्लाह मोठा जबरदस्त आणि सूड घेणारा आहे.

**४८.** ज्या दिवशी ही जमीन एका दुसऱ्या जमिनीच्या स्वरूपात बदलून टाकली जाईल आणि आकाशांनाही आणि सर्वच्या सर्व जबरदस्त अशा अल्लाहच्या समोर असतील.

**४९.** आणि तुम्ही त्या दिवशी अपराधी लोकांना पाहाल की साखळ्यांमध्ये एकत्रपणे एका ठिकाणी जखडलेले असतील.

**५०.** त्यांचे कपडे गंधकाचे असतील आणि त्यांच्या तोंडावर आग पाखडलेली असेल.

**५१.** हे अशासाठी की, सर्वश्रेष्ठ अल्लाहने प्रत्येक माणसाला त्याने केलेल्या कर्माचा मोबदला द्यावा. निःसंशय, हिशोब घेण्यात अल्लाहला उशीर लागणार नाही.

**५२.** हा कुरआन, समस्त लोकांकरिता सूचनापत्र आहे की याच्याद्वारे लोकांना सचेत केले जावे आणि त्यांनी पूर्णपणे हे जाणून घ्यावे की अल्लाह एकमेव उपासनेस पात्र आहे आणि यासाठी की बुद्धिमान लोकांनी विचार चिंतन करावे.

# सूरह हिज्र - १५

सूरह मक्का येथे अवतरली आणि यात नौव्यान्नव आयती आणि सहा रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** अलिफ. लाम. रॉ या (अल्लाहच्या) ग्रंथाच्या आयती आहेत आणि स्पष्ट अशा कुरआनाच्या.

**२.** अशीही वेळ येईल जेव्हा इन्कार करणारे आपल्या ईमानधारक होण्याची इच्छा करतील.

**३.** तुम्ही त्यांना खाण्यात, लाभ उचलण्यात आणि (खोट्या) अपेक्षा बाळगण्यात मग्न असलेले सोडा. ते स्वतः लवकरच जाणून घेतील.

**४.** आणि कोणत्याही वस्तीला आम्ही नष्ट केले नाही, परंतु हे की तिच्याकरिता निश्चित असे लिखित होते.

**५.** कोणताही जनसमूह आपल्या मृत्युपासून ना पुढे जाऊ शकतो, ना मागे राहू शकतो.[१]

**६.** आणि ते म्हणाले, हे माणसा! ज्यावर कुरआन अवतरित केले गेले आहे निश्चितच तू एखादा वेडा आहे.

**७.** जर तू अगदी सच्चा आहे तर मग आमच्याजवळ फरिश्त्यांना का नाही आणत?

**८.** आम्ही फरिश्त्यांना सत्यासहच अवतरित करतो. आणि अशा वेळी त्यांना सवड दिली जात नाही.

**९.** निःसंशय आम्हीच या कुरआनाला अवतरित केले आहे आणि आम्हीच त्याचे संरक्षक आहोत.

**१०.** आणि आम्ही तुमच्यापूर्वी होऊन गेलेल्या जनसमूहांमध्येही आपले पैगंबर पाठवित राहिलो.

**११.** आणि (तथापि) जो पैगंबरदेखील त्यांच्याजवळ आला, त्याची ते थट्टाच उडवित

(१) ज्या वस्तीलादेखील आम्ही अवज्ञेपायी नष्ट करतो, तेव्हा घाई करीत नाही किंबहुना आम्ही एक वेळ निर्धारीत केलेली आहे, त्यावेळेपर्यंत आम्ही त्या वस्तीला संधी देतो. परंतु ठरलेली वेळ येताच त्यांना नष्ट केले जाते, मग त्या विनाशापासून ते ना पुढे जाऊ शकतात, ना मागे राहू शकतात.

राहिले.

**१२.** अपराधी लोकांच्या मनात आम्ही अशाच प्रकारे हेच रचत असतो.

**१३.** ते याच्यावर ईमान राखत नाही आणि निःसंशय पूर्वीच्या लोकांची हीच पद्धत राहिली आहे.

**१४.** आणि जर आम्ही त्यांच्यासाठी आकाशात (जाण्याचा) दरवाजाही उघडून दिला आणि ते तिथे चढूही लागले.

**१५.** तरीही हेच म्हणतील की आमची नजरबंदी केली गेली आहे, किंबहुना आमच्यावर जादूटोणा केला गेला आहे.

**१६.** आणि निःसंशय, आम्ही आकाशात बुरुज (राशी) बनविले आहेत आणि पाहणाऱ्यांकरिता याला सुशोभित केले आहे.

**१७.** आणि धिःक्कारलेल्या प्रत्येक सैतानापासून याला सुरक्षित ठेवले आहे.

**१८.** तथापि, जो लपून छपून ऐकण्याचा प्रयत्न करतो, भडकत्या आगीचा निखारा त्याच्या पाठीशी लागतो.

**१९.** आणि जमिनीला आम्ही पसरवून दिले आहे आणि तिच्यावर पर्वत ठेवले आहेत आणि तिच्यात प्रत्येक वस्तू आम्ही निश्चित प्रमाणात उगविली आहे.

**२०.** आणि तिच्यातच आम्ही तुमच्या अन्न सामुग्रीची व्यवस्था केली आहे आणि (त्यांच्यासाठीही) ज्यांना रोजी देणारे तुम्ही नाहीत.

**२१.** आणि जेवढ्या म्हणून चीज-वस्तू आहेत, त्या सर्वांचा खजिना आमच्याजवळ आहे, आणि आम्ही प्रत्येक वस्तू तिच्या निर्धारित प्रमाणात उतरवितो.

**२२.** आणि आम्ही वजनदार वाऱ्यांना पाठिवतो, मग आकाशातून पर्जन्य वृष्टी करून तुम्हाला तृप्त करतो आणि तुम्ही त्याचा संग्रह करून ठेवणारे नाहीत.

**२३.** आणि आम्हीच जीवन देतो आणि मृत्युही देतो आणि (शेवटी) आम्हीच वारस आहोत.

**२४.** आणि तुमच्यापैकी पुढे जाणाऱ्यांना आणि मागे राहणाऱ्यांनाही आम्ही चांगल्या प्रकारे जाणतो.

**२५.** आणि तुमचा पालनकर्ता समस्त लोकांना एकत्रित करेल. निःसंशय तो मोठा

तत्त्वदर्शी, मोठा ज्ञानी आहे.

**२६.** आणि निःसंशय, आम्ही मानवाला खनकणाऱ्या (कोरड्या) मातीपासून, जी सडलेल्या गाऱ्याची होती, निर्माण केले आहे.

**२७.** आणि त्याच्यापूर्वी जिन्नांना आम्ही अग्निशिखेपासून निर्माण केले.

**२८.** आणि जेव्हा तुमच्या पालनकर्त्याने फरिश्त्यांना फर्माविले की मी एक मानव, काळ्या सडलेल्या, खनकणाऱ्या मातीपासून निर्माण करणार आहे.

**२९.** तर जेव्हा मी त्याला पूर्ण बनवून घेईन आणि त्यात आपला आत्मा फुंकेन तेव्हा तुम्ही सर्व त्याला सजदा करा (त्याच्यापुढे माथा टेका)

**३०.** यास्तव सर्वच्या सर्व फरिश्त्यांनी आपला माथा टेकला.

**३१.** परंतु इब्लिसने सजदा करणाऱ्यांमध्ये सामील होण्यास इन्कार केला.

**३२.** (अल्लाहने) फर्माविले, हे इब्लिस! तुला झाले तरी काय की तू सजदा करणाऱ्यांमध्ये सामील झाला नाही?

**३३.** तो म्हणाला, मी असा नाही की या मानवाला सजदा करावा, ज्याला तू काळ्या आणि सडलेल्या खणखणणाऱ्या मातीपासून निर्माण केले आहे.

**३४.** (अल्लाहने) फर्माविले, आता तू जन्नतमधून चालता हो कारण तू धिःक्कारलेला आहेस.

**३५.** आणि तुझ्यावर कयामतच्या दिवसापर्यंत माझ्यातर्फे धिःक्कार आहे.

**३६.** तो म्हणाला, हे माझ्या पालनकर्त्या! मला त्या दिवसापर्यंत संधी प्रदान कर की लोकांना दुसऱ्यांदा (जिवंत करून) उठविले जाईल.

**३७.** फर्माविले, (ठीक आहे) तू त्यांच्यापैकी आहेस, ज्यांना संधी दिली गेली आहे.

**३८.** ठरलेल्या दिवसाच्या वेळेपर्यंतची.

**३९.** (सैतान) म्हणाला, हे माझ्या पालनकर्त्या! तू मला मार्गभ्रष्ट केलेस तर मीदेखील शपथ घेतो की मी सुद्धा धरतीत त्यांच्यासाठी मोह माया निर्माण करीन आणि त्या सर्वांना बहकवून मार्गभ्रष्ट करीन.

**४०.** मात्र तुझ्या त्या दासांखेरीज, ज्यांना तू निवडून घेतले आहे.

**४१.** फर्माविले, हो. हाच माझ्यापर्यंत पोहचण्याचा सरळ मार्ग आहे.

**४२.** माझ्या (निवडक) दासांवर तुझा कोणताही प्रभाव पडणार नाही, मात्र जे वाट चुकलेले लोक आहेत, तेच तुझे अनुसरण करतील.

**४३.** आणि निःसंशय, त्या सर्वांच्या वायद्याचे स्थान जहन्नम आहे.

**४४.** ज्याला सात दरवाजे आहेत. प्रत्येक दारासाठी त्यांचा एक हिस्सा विभाजित आहे.

**४५.** निःसंशय, अल्लाहचे भय राखून दुराचारापासून दूर राहणारे लोक बागांमध्ये आणि झऱ्यां (प्रवाहां) मध्ये असतील.

**४६.** (त्यांना सांगितले जाईल) सलामती आणि शांतीपूर्वक यात दाखल व्हा.

**४७.** आणि त्यांच्या मनात जी काही वैर- द्वेष भावना होती आम्ही ती सर्व दूर करू. ते भाऊ-भाऊ बनून एकमेकांसमोर सिंहासनावर बसलेले असतील.

**४८.** त्यांना तिथे ना एखादे दुःख स्पर्श करू शकते आणि ना ते तिथून कधी काढले जातील.

**४९.** माझ्या दासांना सांगा की मी मोठा माफ करणारा आणि खूप खूप दया करणारा आहे.

**५०.** आणि त्याचबरोबर माझी शिक्षा यातनाही मोठी दुःखदायक आहे.

**५१.** आणि त्यांना इब्राहीमच्या अतिथींचा वृत्तांत ऐकवा.

**५२.** की जेव्हा त्यांनी इब्राहीमजवळ येऊन सलाम केला, तेव्हा ते म्हणाले की आम्हाला तुमचे भय वाटते.[१]

**५३.** फरिश्ते म्हणाले, भिऊ नका, आम्ही तुम्हाला एका ज्ञानी पुत्राची शुभ वार्ता देतो.

**५४.** इब्राहीम म्हणाले, काय या वृद्धावस्थेने स्पर्श केल्यानंतर तुम्ही मला ही शुभ वार्ता

(१) हजरत इब्राहीम (अलै.) यांना फरिश्त्यांचे भय अशामुळे वाटले की त्यांनी हजरत इब्राहीमचे तयार केलेले, भाजलेल्या वासरुचे मांस खाल्ले नाही. याचे वर्णन सूरह हूद मध्ये आहे. तात्पर्य अल्लाहच्या महान पैगंबरानाही परोक्ष (ग़ैबच्या) गोष्टींचे ज्ञान नव्हते जर त्यांना हे ज्ञान असते तर हजरत इब्राहीम यांनी जाणले असते की आलेले अतिथी फरिश्ते आहेत आणि त्यांच्या भोजनाची व्यवस्था करणे आवश्यक नाही. कारण फरिश्ते मानवांप्रमाणे खात-पित नाहीत.

देता! ही आनंदाची बातमी तुम्ही कशी काय देत आहात?

**५५.** फरिश्ते म्हणाले, आम्ही तुम्हाला अगदी खरी शुभवार्ता ऐकवित आहोत. तुम्ही निराश लोकांमध्ये सामील होऊ नका.

**५६.** म्हणाले, आपल्या पालनकर्त्याच्या दया कृपेपासून केवळ ते (मार्गभ्रष्ट आणि) बहकलेले लोकच निराश होतात.

**५७.** (इब्राहीम यांनी) विचारले, हे अल्लाहतर्फे पाठविण्यात आलेल्या (फरिश्त्यां) नो! तुमचे असे काय खास काम आहे?

**५८.** फरिश्त्यांनी उत्तर दिले, आम्हाला अपराधी लोकांकडे पाठविले गेले आहे.

**५९.** परंतु लूतचे कुटुंब की आम्ही त्या सर्वांना अवश्य वाचवू.

**६०.** मात्र लूतच्या पत्नीखेरीज की आम्ही तिला थांबणाऱ्या व मागे राहणाऱ्यांमध्ये निश्चित केले आहे.

**६१.** जेव्हा पाठविलेले फरिश्ते लूतच्या कुटुंबाजवळ पोहोचले.

**६२.** तेव्हा लूत म्हणाले, तुम्ही लोक तर काहीसे अनोळखी वाटतात.

**६३.** ते म्हणाले, (नाही) किंबहुना आम्ही तुमच्याजवळ ती वस्तू घेऊन आलो आहोत, जिच्या बाबतीत हे लोक संशय करीत आहेत.

**६४.** आणि आम्ही तर तुझ्याजवळ (उघड) सत्य घेऊन आलो आहोत, आणि आम्ही आहोतही पुरेपुरे सच्चे!

**६५.** आता तुम्ही आपल्या कुटुंबासह या रात्रीच्या एखाद्या भागात निघून जा. तुम्ही स्वतः त्यांच्या मागे राहा (आणि सावधान!) तुमच्यापैकी कोणीही मागे वळून पाहू नये आणि ज्या ठिकाणी जायचा तुम्हाला आदेश दिला जात आहे, तिथे चालत जा.

**६६.** आणि आम्ही त्याच्याकडे या गोष्टीचा फैसला केला की सकाळ होता होताच त्या सर्वांची मुळे कापली जातील.

**६७.** आणि शहरी लोक मोठा आनंद साजरा करीत आले.

**६८.** (लूत) म्हणाले, हे लोक माझे अतिथी आहेत, तेव्हा तुम्ही मला अपमानित करू

नका.

**६९.** आणि सर्वश्रेष्ठ अल्लाहचे भय राखा आणि मला अपमानित करू नका.

**७०.** ते म्हणाले, काय आम्ही तुम्हाला साऱ्या जगाचा ठेका घेण्यापासून मनाई केली नव्हती?

**७१.** (लूत) म्हणाले, जर तुम्हाला काही करायचेच आहे तर या माझ्या मुली हजर आहेत[१]

**७२.** तुमच्या आयुष्याची शपथ! ते तर आपल्या नशेत धुंद फिरत होते.

**७३.** मग सूर्योदय होता होता त्यांना एका भयंकर स्फोटाच्या आवाजाने येऊन धरले.

**७४.** शेवटी आम्ही त्या (शहरा) ला उलथेपालथे करून टाकले आणि त्या लोकांवर कंकर पाषाणांचा वर्षाव केला.

**७५.** नि:संशय, प्रत्येक बोध प्राप्त करणाऱ्याकरिता यात अनेक निशाण्या आहेत.

**७६.** आणि ही वस्ती अशा मार्गावर आहे, ज्यावर सतत ये-जा होत असते.

**७७.** आणि यात ईमान राखणाऱ्यांसाठी मोठी निशाणी आहे.

**७८.** आणि अयका वस्तीचे राहणारे लोकही मोठे अत्याचारी होते.

**७९.** ज्यांच्याशी शेवटी आम्ही सूड घेतलाच. ही दोन्ही शहरे खुल्या मार्गावर आहेत.

**८०.** आणि हिज्रवाल्यांनीही पैगंबरांना खोटे ठरविले.

**८१.** आणि त्यांना आम्ही आपल्या निशाण्या प्रदान केल्या होत्या, परंतु तरी देखील ते त्या निशाण्यांपासून माना फिरवितच राहिले.

**८२.** आणि हे लोक आपली घरे पर्वतांना कोरून बनवित असत, भय न राखता.

**८३.** शेवटी त्यांनाही सकाळ होता होता भयंकर चित्काराने येऊन गाठले.

---

(१) अर्थात तुम्ही त्यांच्याशी विवाह करून घ्या, अथवा आपल्या जनसमूहाच्या स्त्रियांना आपल्या मुली म्हटले, म्हणजे तुम्ही समाजातील अविवाहीत मुलींशी विवाह करून घ्या आणि आपली इच्छापूर्ती आपल्या पत्नींकडून करुन घ्या.

**८४.** यास्तव त्यांच्या कोणत्याही युक्ती कौशल्याने आणि कामगिरीने त्यांना कसलाही लाभ पोहचविला नाही.

**८५.** आणि आम्ही आकाशांना आणि धरतीला आणि त्यांच्या दरम्यानच्या समस्त वस्तूंना सत्यासहच बनविले आहे आणि कयामत अवश्य येणार आहे, तेव्हा तुम्ही भल्या रीतीने सहन करून घ्या.

**८६.** निःसंशय, तुमचा पालनकर्ताच निर्माण करणारा आणि जाणणारा आहे.

**८७.** निःसंशय आम्ही तुम्हाला सात आयती प्रदान केल्या आहेत ज्यांची पुनरावृत्ती केली जाते, आणि महान कुरआन देखील प्रदान केला आहे.

**८८.** तुम्ही कधीही आपली नजर त्या गोष्टीवर टाकू नका, जिला आम्ही, त्यांच्यापैकी अनेक प्रकारच्या लोकांना प्रदान केले आहे. त्यांच्याबद्दल तुम्ही दुःखही करू नका आणि ईमान राखणाऱ्यांसाठी आपल्या बाजू झुकवा (त्यांना मोठ्या स्नेहाची वागणूक द्या).

**८९.** आणि सांगा की मी उघडपणे भय दाखविणारा आहे.

**९०.** ज्याप्रमाणे आम्ही त्या विभाजन करणाऱ्यांवर उतरविला.

**९१.** ज्यांनी या कुरआनचे तुकडे तुकडे करून टाकले.

**९२.** शपथ आहे तुमच्या पालनकर्त्याची! आम्ही त्या सर्वांना अवश्य विचारू.

**९३.** त्या प्रत्येक गोष्टीबाबत जी ते करीत होते.

**९४.** तेव्हा तुम्ही हा आदेश, जो तुम्हाला दिला जात आहे, स्पष्टतः ऐकवा, आणि अनेकेश्वरवाद्यांपासून तोंड फिरवून घ्या.

**९५.** तुमच्याशी ते लोक थट्टा मस्करी करतात त्यांच्या (शिक्षे) करिता आम्ही पर्याप्त आहोत.

**९६.** जे लोक अल्लाहच्या सोबत आणखी इतर उपास्ये बनवितात, त्यांना लवकरच माहीत पडेल.

**९७.** आणि आम्हाला चांगल्या प्रकारे माहीत आहे की त्यांच्या बोलण्याने तुमच्या मनाला ठेच पोहचते.

**९८.** तुम्ही आपल्या पालनकर्त्याची महानता आणि स्तुती प्रशंसाचे वर्णन करीत राहा आणि नतमस्तक होणाऱ्यांमध्ये सामील व्हा.

**९९.** आणि आपल्या पालनकर्त्याची उपासना करीत राहा, येथेपर्यंत की तुम्हाला मरण यावे.

—-

## सूरह नहल - १६

सूरह नहल मक्का येथे अवतरली आणि यात एकशे अठ्ठावीस आयती आणि सोळा रूकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** सर्वश्रेष्ठ अल्लाहचा आदेश येऊन पोहोचला, आता याची घाई माजवू नका समस्त पवित्रता त्याच्यासाठी आहे, तो सर्वांत महान आहे, त्या सर्वांपेक्षा ज्यांना हे अल्लाहच्या जवळ भागीदार असल्याचे सांगतात.

**२.** तोच फरिश्त्यांना आपली वहयी (प्रकाशना) देऊन आपल्या आदेशाद्वारे आपल्या दासांपैकी, ज्याच्यावर इच्छितो उतरवितो, यासाठी की, तुम्ही, लोकांना सचेत करावे की माझ्याशिवाय दुसरा कोणीही उपासनेस पात्र नाही, यास्तव तुम्ही माझे भय राखा.

**३.** त्यानेच आकाशांना आणि धरतीला सत्यासह निर्माण केले. तो तर त्याहून उच्चतम आहे जे अनेकेश्वरवादी करतात.

**४.** त्याने मानवांना वीर्यापासून निर्माण केले, मग तो उघड भांडखोर बनला.

**५.** त्यानेच जनावरे निर्माण केलीत, ज्यात तुमच्यासाठी उष्णता देणारे कपडे आहेत. इतरही अनेक फायदे आहेत आणि काही तुमच्या खाण्यासाठी उपयोगी पडतात.

**६.** आणि त्यांच्यात तुमच्यासाठी शोभाही आहे जेव्हा त्यांना चारून आणाल तेव्हाही आणि जेव्हा चारण्यासाठी न्याल तेव्हाही.

**७.** आणि ते तुमचे ओझे त्या शहरांपर्यंत उचलून नेतात, जिथे तुम्ही जीव अर्धा केल्याविना पोहचू शकत नव्हते. निःसंशय, तुमचा पालनकर्ता अतिशय स्नेहशील आणि

खूप खूप दया करणारा आहे.

**८.** आणि घोड्यांना, खच्चरांना, गाढवांना (त्यानेच निर्माण केले) यासाठी की तुम्ही त्यांना वाहनाच्या स्वरूपात वापरात आणावे आणि ते शोभा सजावटीचे साधनही आहेत. इतरही तो अशा वस्तू निर्माण करतो, ज्या तुम्ही जाणत नाहीत.

**९.** आणि अल्लाहपर्यंत पोहचण्याचा मार्ग सरळ मार्ग आहे आणि काही वाकडे मार्गही आहेत आणि त्याने इच्छिले असते तर तुम्हा सर्वांना सरळ मार्गास लावले असते.

**१०.** तोच तुमच्या फायद्याकरिता आकाशातून पर्जन्य वृष्टी करतो जे तुम्ही पीता ही आणि त्याद्वारे उगवलेल्या झाडांना तुम्ही आपल्या जनावरांनना चारतात.

**११.** याच्याचद्वारे तो तुमच्यासाठी शेती आणि जैतून आणि खजूर आणि द्राक्ष व सर्व प्रकारची फळे उगवितो. निःसंशय, चिंतन करणाऱ्या लोकांसाठी यात मोठ्या निशाण्या आहेत.

**१२.** आणि त्यानेच रात्र आणि दिवसाला आणि सूर्य व चंद्राला तुमच्या सेवेत लावले आहे आणि तारे देखील त्याच्याच हुकुमाच्या अधीन आहेत. निःसंशय, यात बुद्धिमानांकरिता अनेक प्रकारच्या निशाण्या आहेत.

**१३.** आणि इतरही (विविध प्रकारच्या) अनेक रंग रूप असलेल्या वस्तू त्याने तुमच्यासाठी धरतीत पसरवून ठेवल्या आहेत. निःसंशय, बोध प्राप्त करणाऱ्यांकरिता यात मोठ्या जबरदस्त निशाण्या आहेत.

**१४.** आणि समुद्रांनाही तुमच्या अधीन करून ठेवले आहे की तुम्ही यातून निघालेले ताजे मांस खावे आणि यातून आपल्या अंगावर घालण्याकरिता दागिने काढू शकावे, आणि तुम्ही पाहाल की नावा यात पाण्याला चिरत चालतात आणि यासाठीही की तुम्ही त्याच्या कृपेचा शोध घ्यावा आणि संभवतः तुम्ही कृतज्ञताही व्यक्त करावी.

**१५.** आणि त्याने धरतीवर पर्वत गाडले आहेत, यासाठी की तिने तुमच्यासह हलू नये आणि नद्या व मार्ग बनविले, यासाठी की तुम्ही उद्दिष्टाप्रत पोहचावे.

**१६.** दुसऱ्याही अनेक निशाण्या (निर्धारीत केल्या) आणि ताऱ्यांद्वारेही लोक मार्ग प्राप्त करून घेतात.

**१७.** तर काय तो, जो निर्माण करतो, त्याच्या समान आहे, जो निर्माण करू शकत

नाही ? काय तुम्ही कधीच विचार करीत नाही ?

**१८.** आणि जर तुम्ही अल्लाहच्या देणग्यांचा हिशोब (गणना) करू पाहाल तर तुम्ही तो कधीच करू शकत नाही. निःसंशय, अल्लाह मोफा माफ करणारा दया करणारा आहे.

**१९.** आणि जे काही तुम्ही लपवाल किंवा उघड कराल, अल्लाह सर्व काही जाणतो.

**२०.** आणि सर्वश्रेष्ठ अल्लाहखेरीज ज्यांना हे लोक पुकारतात ते कोणतीही वस्तू निर्माण करू शकत नाही, उलट हे स्वतः निर्माण केले गेले आहेत.

**२१.** मेलेले आहेत, जिवंत नाहीत. त्यांना तर हेही माहीत नाही की केव्हा (जिवंत करून) उठवले जातील.

**२२.** तुम्हा सर्वांचा माबूद (उपास्य) केवळ अल्लाह एकटा आहे, आणि आखिरतवर ईमान न राखणाऱ्यांची मने भ्रष्ट आहेत. आणि ते स्वतः गर्विष्ठ आहेत.

**२३.** निःसंशय, सर्वश्रेष्ठ अल्लाह, त्या प्रत्येक गोष्टीला, जिला ते लपवितात आणि जिला जाहीर करतात, चांगल्या प्रकारे जाणतो. अल्लाह घमेंडी लोकांना पसंत करीत नाही.

**२४.** आणि त्यांना जेव्हा विचारले जाते की तुमच्या पालनकर्त्याने काय अवतरीत केले आहे, तेव्हा उत्तर देतात की पूर्वीच्या लोकांच्या कथा कहाण्या आहेत.

**२५.** (याचाच परिणाम असेल) की कयामतच्या दिवशी हे लोक आपल्या पूर्ण ओझ्यासह, त्यांच्या ओझ्याचेही भागीदार ठरतील, ज्यांना ज्ञानाविना पथभ्रष्ट करीत राहिले, पाहा तर किती वीट ओझे उचलत आहेत.

**२६.** त्यांच्या पूर्वीच्या लोकांनीही कावेबाजपणा केला. (शेवटी) अल्लाहने त्यांच्या (कट-कारस्थानाच्या) घरांना मुळा (पाया) पासून उखडून टाकले आणि त्यांच्या (डोक्यांवर) छत वरून कोसळले आणि त्यांच्याजव अज़ाब (शिक्षा-यातना) अशा ठिकाणाहून आला, जे ठिकाण त्यांच्या ध्यानीमनीही नव्हते.

**२७.** मग कयामतच्या दिवशीही सर्वश्रेष्ठ अल्लाह त्यांना अपमानित करील आणि फर्माविल की माझे ते भागीदार कोठे आहेत, ज्यांच्याविषयी तुम्ही लढत झगडत होते. ज्यांना ज्ञान दिले गेले होते, ते उत्तर देतील की आज तर इन्कार करणाऱ्यांना अपमान आणि वाईटपणाने चांगली मिठी मारली.

**२८.** ते लोक, जे आपल्या प्राणांवर जुलूम अत्याचार करतात, फरिश्ते जेव्हा त्यांचा

प्राण काढू लागतात तेव्हा त्या वेळी ते झुकतात की आम्ही वाईट आचरण करीत नव्हतो, का नाही? अल्लाह चांगल्या प्रकारे जाणतो, जे काही तुम्ही करीत होते.

**२९.** तेव्हा आता तुम्ही नेहमी करीत जहन्नमच्या दरवाजातून (जहन्नममध्ये) प्रवेश करा. तर किती वाईट ठिकाण आहे घमेंड करणाऱ्यांचे.

**३०.** आणि अल्लाहचे भय राखणाऱ्यांना विचारले जाते की तुमच्या पालनकर्त्याने काय अवतरित केले आहे, तेव्हा ते उत्तर देतात की उत्तमात उत्तम. ज्या लोकांनी सत्कर्मे केलीत, त्यांच्यासाठी या जगात भलाई आहे, आणि निःसंशय आखिरतचे घर तर फार उत्तम आहे. आणि किती चांगले घर आहे, अल्लाहचे भय राखणाऱ्यांचे.

**३१.** सदैव काळ राहणाऱ्या बागांमध्ये जातील, ज्यांच्या खाली प्रवाह वाहत आहेत. ते जे मागतील ते तिथे त्यांच्यासाठी हजर असेल. अल्लाहचे भय राखून दुराचारापासून दूर राहणाऱ्यांना अल्लाह असाच मोबदला प्रदान करतो.

**३२.** ते लोक, ज्याचा प्राण फरिश्ते अशा अवस्थेत काढतात की ते स्वच्छ पवित्र असावेत, म्हणतात की तुमच्यासाठी सलामतीच सलामती आहे. आपल्या त्या कर्मांच्या मोबदल्यात जन्नतमध्ये जा, जे तुम्ही करीत होते.

**३३.** काय हे याच गोष्टीची वाट पाहात आहेत की त्यांच्याजवळ फरिश्ते यावेत किंवा तुमच्या पालनकर्त्याचा आदेश यावा? त्या लोकांनीही असेच केले, जे यांच्यापूर्वी होऊन गेलेत. अल्लाहने त्यांच्यावर कोणताही अत्याचार केला नाही, उलट ते स्वतःच आपल्या प्राणांवर अत्याचार करीत राहिले.

**३४.** तेव्हा त्यांच्या दुष्कर्मांचा मोबदला त्यांना मिळाला आणि ज्या गोष्टीची ते थट्टा उडवित होते, तिने त्यांना येऊन घेरले.

**३५.** आणि अनेकेश्वरवादी म्हणाले, जर अल्लाहने इच्छिले असते तर आम्ही आणि आमचे वाडवडील त्याच्याखेरीज दुसऱ्याचे उपासक झाले नसते, ना त्याच्या हुकुमाविना एखाद्या वस्तूला हराम (अवैध) ठरविले असते. हेच आचरण त्यांच्या पूर्वीच्या लोकांचेही राहिले, तेव्हा पैगंबरांची जबाबदारी केवळ स्पष्ट संदेश पोहचविण्याची आहे.

**३६.** आणि आम्ही प्रत्येक जनसमूहात पैगंबर पाठविले की (लोक हो!) केवळ अल्लाहची उपासना करा आणि तागूत (अल्लाहखेरीजची सर्व असत्य उपास्ये) पासून

दूर राहा, तर काही लोकांना अल्लाहने मार्गदर्शन प्रदान केले आणि काहींवर मार्गभ्रष्टता सिद्ध झाली. आता तुम्ही स्वतः धरतीवर हिंडून फिरून पाहा की खोटे ठरविणाऱ्यांचा शेवट कसा झाला!

**३७.** तरीही तुम्ही त्यांना मार्गदर्शन लाभावे अशी इच्छा बाळगत राहिले परंतु अल्लाह ज्याला मार्गभ्रष्ट करतो, त्याला सन्मार्ग दाखवित नाही, आणि ना त्यांचा कोणी मदतकर्ता असतो.

**३८.** आणि ते लोक मोठमोठ्या शपथा घेऊन सांगतात की मेलेल्या लोकांना अल्लाह जिवंत करणार नाही. का नाही, (अवश्य जिवंत करेल) हा तर त्याचा अगदी सच्चा आणि पक्का वायदा आहे, परंतु अधिकांश लोक जाणत नाहीत.

**३९.** अशासाठीही की, हे लोक ज्या गोष्टीत मतभेद करीत होते, तिला अल्लाहने स्पष्ट करून सांगावे आणि यासाठीही इन्कार करणाऱ्यांनी स्वतः आपण खोटे असल्याचे जाणून घ्यावे.

**४०.** आम्ही जेव्हा एखाद्या गोष्टीचा इरादा करतो, तेव्हा आम्हाला केवळ इतकेच सांगावे लागते की घडून ये आणि ती गोष्ट घडून येते.

**४१.** आणि ज्या लोकांनी अत्याचार सहन केल्यानंतर, अल्लाहच्या मार्गात देशत्याग केला, आम्ही त्यांना सर्वांत उत्तम जागा या जगात प्रदान करू आणि आखिरतचा मोबदला तर अतिशय मोठा आहे. लोकांनी हे जाणून घेतले असते तर किती बरे झाले असते!

**४२.** ज्या लोकांनी धीर संयम राखला, आणि आपल्या पालनकर्त्यावर भरोसा करीत राहिले.

**४३.** आणि तुमच्या पूर्वीही आम्ही पुरुषांनाच (पैगंबर म्हणून) पाठवित राहिलो, ज्यांच्याकडे वहयी (प्रकाशना) अवतरित करीत होतो. जर तुम्ही जाणत नसाल तर ज्ञानी लोकांना विचारा.[१]

---

(१) मूळ शब्द 'अहलज्जिक्री' यास अभिप्रेत ग्रंथधारक होत जे पूर्वीच्या पैगंबरांना आणि त्यांच्या इतिहासाला जाणून होते अर्थात हे की आम्ही जेवढे पैगंबर पाठविले, ते मानवच होते. यास्तव मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम देखील जर मानव आहेत तर ही नवीन गोष्ट नाही की त्यामुळे तुम्ही त्यांच्या पैगंबर असण्याचा इन्कार करावा. शंका असेल तर ग्रंथधारकांना विचारा की पूर्वीच्या

**४४.** निशाण्या आणि ग्रंथांसह. हे स्मरण (ग्रंथ) आम्ही तुमच्याकडे अवतरित केला आहे की लोकांकडे जे उतरविले गेले आहे, तुम्ही त्यांना ते स्पष्टपणे सांगावे, कदाचित त्यांनी विचारा चिंतन करावे.

**४५.** वाईट कावेबाज करणारे, काय या गोष्टीपासून निर्भय झाले आहेत की अल्लाह त्यांना जमिनीत धसवून टाकील किंवा त्यांच्याजवळ अशा ठिकाणाहून अज़ाब (शिक्षा-यातना) यावी, ज्या ठिकाणाची त्यांना शंका आणि कल्पनाही नसावी.

**४६.** किंवा त्यांना चालता फिरता धरून घ्यावे, हे कोणत्याही प्रकारे अल्लाहला विवश (लाचार) करू शकत नाही.

**४७.** किंवा त्यांना भय दाखवून पकडीत घ्यावे, निःसंशय तुमचा पालनकर्ता मोठा करुणाशील आणि मोठा दयाशील आहे.

**४८.** काय त्यांनी अल्लाहच्या निर्मितीपैकी कोणालाही पाहिले नाही की त्याची सावली उजव्या-डाव्या बाजूकडे झुकून अल्लाहसमोर सजदा करते, आणि आपली लाचारी व्यक्त करते.

**४९.** आणि निःसंशय, आकाशांमधील आणि धरतीचे समस्त सजीव आणि फरिश्ते, सर्वश्रेष्ठ अल्लाहसमोर सजदा करतात आणि किंचितही घमेंड करीत नाही.

**५०.** आणि आपल्या पालनकर्त्याशी, जो त्यांच्यावरती आहे, थरथर कापत राहतात आणि जो आदेश मिळेल, त्याचे पालन करण्यात मग्न राहतात.

**५१.** आणि सर्वश्रेष्ठ अल्लाहने सांगून टाकले आहे की दोन माबूद (उपास्ये) बनवू नका. माबूद तर तोच फक्त एकटा आहे, तेव्हा तुम्ही सर्व केवळ माझेच भय राखा.

**५२.** आणि आकाशांमध्ये आणि धरतीत जे काही आहे, सर्व त्याचेच आहे, आणि त्याचीच उपासना नेहमी अनिवार्य आहे. काय तरीही तुम्ही त्याच्याखेरीज दुसऱ्यांचे भय बाळगता?

**५३.** आणि तुमच्याजवळ जेवढ्या देखील अल्लाहच्या कृपा देणग्या आहेत सर्व त्यानेच प्रदान केलेल्या आहेत. आता जेव्हा देखील तुम्हाला एखादी कष्ट-यातना आल्यास त्याच्याचकडे दुआ-प्रार्थना करता.

---

काळातील सर्व पैगंबर मानव होते की फरिश्ते? जर ते फरिश्ते होते तर अवश्य इन्कार करा आणि जर ते सर्व मानव होते तर मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्या पैगंबरपदाचा इन्कार कोणत्या सबबीवर?

----------------------------

**५४.** आणि जेव्हा मात्र त्याने ती कष्ट-यातना तुमच्यापासून दूर केली तेव्हा तुमच्यापैकी काही लोक आपल्या पालनकर्त्यासोबत भागीदार बनवू लागतात.

**५५.** यासाठी की आम्ही प्रदान केलेल्या देणग्यांशी कृतघ्नता दाखवावी (ठीक आहे) थोडा लाभ प्राप्त करून घ्या. शेवटी तुम्हाला माहीतच पडेल.

**५६.** आणि ज्याला ते जाणतही नाही, त्याचा हिस्सा आम्ही दिलेल्या वस्तूंमध्ये निश्चित करतात, अल्लाहची शपथ! तुमच्या या आरोपाबद्दल तुम्हाला अवश्य विचारणा होईल.

**५७.** आणि ते पवित्र अल्लाहकरीता मुली निर्धारीत करतात, आणि स्वतःसाठी ते, जे त्यांच्या इच्छेनुसार असेल.

**५८.** आणि त्यांच्यापैकी जेव्हा एखाद्याला मुलगी झाल्याची खबर दिली जाते तेव्हा त्याचे तोंड काळवंडते आणि तो मनातल्या मनात कुढू लागतो.

**५९.** या वाईट बातमीमुळे, लोकांपासून तोंड लपवित फिरतो विचार करतो काय या अपमानाला सोबतच राहू द्यावी की हिला मातीत गाडून टाकावे किती वाईट निर्णय घेतात हे!

**६०.** आखिरतवर ईमान न राखणाऱ्यांचेच वाईट उदाहरण आहे. अल्लाहकरिता तर अतिशय उच्च उदाहरण आहे. तो मोठा वर्चस्वशाली आणि हिकमत बाळगणारा आहे.

**६१.** आणि जर लोकांच्या दुराचाराबद्दल अल्लाहने त्यांना पकडीत घेणे सुरू केले असते तर धरतीवर एक देखील जीव वाचला नसता, परंतु तो तर त्यांना एका निर्धारीत अवधीपर्यंत ढील (सवड) देतो, मग जेव्हा त्यांची ती वेळ येते तेव्हा ते एक क्षण ना मागे राहू शकतात आणि ना पुढे जाऊ शकतात.

**६२.** आणि ते स्वतःसाठी जे अप्रिय समजतात, ते अल्लाहसाठी सिद्ध करतात आणि त्यांच्या जीभा खोट्या गोष्टींचे वर्णन करतात की त्यांच्यासाठी भलाई आहे?(मुळीच नाही), वास्तविक त्यांच्यासाठी आग आहे आणि हे लोक, जहन्नमी लोकांच्या पुढे पुढे जाणारे आहेत.

**६३.** अल्लाहची शपथ! आम्ही तुमच्या पूर्वीच्या जनसमूहांकडेही आपले पैगंबर

पाठविले, परंतु सैतानाने त्यांच्या दुष्कर्मांना त्यांच्या नजरेत चांगले ठरविले. तो सैतान आज देखील त्यांचा दोस्त बनलेला आहे आणि त्यांच्यासाठी दु:खदायक अज़ाब आहे.

**६४.** आणि हा ग्रंथ आम्ही तुमच्यावर अशासाठी अवतरित केला आहे की तुम्ही ती प्रत्येक गोष्ट उघड करावी, ज्याबाबत ते मतभेद करीत आहेत आणि हा ग्रंथ ईमान राखणाऱ्यांकरिता मार्गदर्शन आणि दया आहे.

**६५.** आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह आकाशातून पर्जन्य वृष्टी करून, त्याद्वआरे धरतीला तिच्या मृत्युनंतर जिवंत करतो. निःसंशय यात त्या लोकांकरिता निशाण्या आहेत, जे ऐकतील.

**६६.** आणि तुमच्यासाठी तर जनावरांमध्येही मोठा बोध आहे की आम्ही तुम्हाला त्याच्या पोटात जे काही आहे, त्याच्यातूनच शेण आणि रक्ताच्या मधून शुद्ध निर्भेळ दूध पाजतो, जे पिणाऱ्यांसाठी सहजपणे पचवले जाते.

**६७.** आणि खजुरीच्या व द्राक्षांच्या वृक्षांच्या फळांपासून तुम्ही मद्य तयार करता आणि उत्तम अन्न-सामुग्रीही. निःसंशय अक्कल राखणाऱ्या लोकांकरिता यातही फार मोठी निशाणी आहे.

**६८.** आणि तुमच्या पालनकर्त्याने मधमाशीलाही प्रेरणा दिली की पर्वतांवर, झाडांवर आणि लोकांनी बनविलेल्या उंच उंच इमारतींवर आपले घर (पोळे) बनव.

**६९.** आणि प्रत्येक प्रकारचे फळ खा आणि आपल्या (पालनकर्त्याच्या) सहज सुलभ मार्गांवर चालत फिरत राहा. त्यांच्या पोटातून पेयद्रव बाहेर पडतो, ज्याचे अनेक रंग आहेत, आणि ज्यात लोकांसाठी स्वास्थ्य आहे. विचार-चिंतन करणाऱ्यांसाठी यातही फार मोठी निशाणी आहे.

**७०.** आणि सर्वश्रेष्ठ अल्लाहनेच तुम्हा सर्वांना निर्माण केले आहे. तोच नंतर तुम्हाला मृत्यु देईल, आणि तुमच्यात काही असेही आहेत जे अतिशय वाईट वया (खूप म्हातारवया) कडे परतविले जातात, की खूप काही जाणून घेतल्यानंतरही न जाणावे. निःसंशय सर्वश्रेष्ठ अल्लाह सर्व काही जाणणारा आणि सामर्थ्य राखणारा आहे.

**७१.** आणि अल्लाहनेच तुमच्यापैकी एकाला दुसऱ्यावर रोजी (अन्न सामुग्री) मध्ये वृद्धी प्रदान केली आहे, तथापि त्यांना जास्त प्रदान केले गेले आहे ते आपली आजिविका,

आपल्या अधीन असलेल्या दासां (नोकरा) ना देत नाहीत की ते आणि हे त्यात सम समान होतील. काय हे लोक अल्लाहच्या उपकारांचा इन्कार करीत आहेत?

**७२.** आणि अल्लाहने तुमच्यासाठी तुमच्यामधूनच तुमच्या पत्न्या निर्माण केल्या आणि तुमच्या पत्न्यांपासून तुमचे पुत्र आणि नातू निर्माण केले आणि तुम्हाला उत्तमोत्तम वस्तू खायला दिल्या, तर काय, असे असतानाही लोक असत्यावर ईमान राखतील? आणि सर्वश्रेष्ठ अल्लाहच्या कृपा देणग्यांशी कृतघ्नता दाखवतील?

**७३.** आणि ते अल्लाहशिवाय त्यांची उपासना करतात, जे आकाशांमधून आणि जमिनीतून त्यांना किंचितही रोजी देऊ शकत नाही आणि कसलेही सामर्थ्य बाळगत नाही.

**७४.** तेव्हा, सर्वश्रेष्ठ अल्लाहकरिता उदाहरण बनवू नका, अल्लाह चांगल्या प्रकारे जाणतो आणि तुम्ही नाही जाणत.

**७५.** अल्लाह एक उदाहरण सांगत आहे की एक गुलाम आहे दुसऱ्याच्या मालकीचा, जो कसलाही अधिकार राखत नाही आणि एक दुसरा मनुष्य आहे, ज्याला आम्ही आपल्या जवळून फार उत्तम धन देऊन ठेवले आहे. ज्यातून तो लपवून आणि उघडपणे खर्च करतो, काय हे दोन्ही जण समान ठरू शकतात? अल्लाहकरिताच समस्त स्तुती- प्रशंसा आहे. परंतु त्यांच्यापैकी बहुतेक जाणत नाहीत.

**७६.** आणि अल्लाह एक दुसरे उदाहरण सांगतो दोन माणसांचे, ज्यांच्यापैकी एक मुका आहे आणि कोणत्याही गोष्टीचा अधिकार बाळगत नाही, किंबहुना तो आपल्या मालकावर ओझे आहे, मालक त्याला कोठेही पाठविल पण तो कसलाही भलेपणा आणत नाही. काय हा आणि तो, जो न्यायाचा आदेश देतो आणि सरळ मार्गावरही चालतो, समान असू शकतात?

**७७.** आणि आकाशांच्या व धरतीच्या (सर्व) लपलेल्या वस्तूंचे ज्ञान केवळ अल्लाहलाच आहे, आणि कयामतची बाब देखील अशीच आहे, जणू पापणीचे झपकणे, किंबहुना याहूनही अधिक जवळ. नि:संशय अल्लाह प्रत्येक गोष्ट करण्याचे सामर्थ्य राखतो.

**७८.** आणि अल्लाहने तुम्हाला तुमच्या मातांच्या उदरातून बाहेर काढले की त्या वेळी

तुम्ही काहीच जाणत नव्हते. त्यानेच तुमचे कान आणि डोळे आणि हृदय बनविले, यासाठी की तुम्ही कृतज्ञता व्यक्त करू शकावे.

**७९.** काय त्या लोकांनी पक्ष्यांना नाही पाहिले, जे आदेशआनुसार आकाशात नियंत्रित आहेत, ज्यांना अल्लाहखेरीज दुसऱ्या कुणी धरून ठेवले नाही. निःसंशय, यात ईमान राखणाऱ्यांकरिता मोठ्या निशाण्या आहेत.

**८०.** आणि अल्लाहने तुमच्यासाठी तुमच्या घरांमध्ये निवासाचे स्थान बनविले आहे आणि त्यानेच तुमच्यासाठी जनावरांच्या कातडीची घरे (तंबू) बनविले, जी तुम्हाला हलकी दिसून येतात, आपल्या प्रस्थानाच्या दिवशी आणि आपल्या पडाव टाकण्याच्या दिवशीही आणि त्यांची लोकर, लव (रोये) आणि केसांपासूनही त्याने अनेकविध वस्तू आणि एका निर्धारीत वेळेपर्यंत लाभदायक वस्तू आणि बनविल्या.

**८१.** आणि अल्लाहनेच तुमच्यासाठी आपल्या निर्माण केलेल्या वस्तूंमधून सावली बनविली आहे, आणि त्यानेच तुमच्यासाठी पर्वतांमध्ये गुहा बनविली आणि त्यानेच तुमच्यासाठी कपडे बनविले आहेत, जे तुम्हाला उष्णतेपासून सुरक्षित राखतील आणि अशी चिलखते देखील जी तुम्हाला युद्ध-प्रसंगी उपयोगी पडतील. तो अशा प्रकारे आपली कृपा देणगी पुरेपूर प्रदान करीत आहे, यासाठी की तुम्ही त्याचे आज्ञाधारक व्हावे.

**८२.** तरीही जर हे तोंड फिरवूनच राहतील तर तुमची जबाबदारी केवळ साफ आणि स्पष्टपणे पोहचवून देणे एवढीच आहे.

**८३.** अल्लाहच्या कृपा देणगींना हे जाणत व ओळखत असतानाही त्यांच्या इन्कार करीत आहेत, किंबहुना त्यांच्यातले बहुतेक जण तर कृतघ्न आहेत.

**८४.** आणि ज्या दिवशी आम्ही प्रत्येक जनसमूहातून साक्षी उभा करू, मग इन्कारी लोकांना ना अनुमती दिली जाईल आणि ना त्यांना क्षमा-याचना करण्यास सांगितले जाईल.

**८५.** आणि जेव्हा हे अत्याचारी लोक अज़ाब (शिक्षा-यातना) पाहून घेतील, मग ना तो त्याच्यावरून सौम्य केला जाईल आणि ना त्यांना ढील (सवड) दिली जाईल.

**८६.** आणि जेव्हा अल्लाहचा सहभागी ठरविणारे आपल्या सहभागींना पाहतील तेव्हा

म्हणतील, हे आमच्या पालनकर्त्या! हेच ते आमचे सहभागी, ज्यांना आम्ही तुला सोडून पुकारत असू, मग ते त्यांना उत्तर देतील की तुम्ही पूर्णतः खोटारडे आहात.

**८७.** आणि त्या दिवशी ते सर्व (लाचार होऊन) अल्लाहसमोर आज्ञाधारक होणे मान्य करतील आणि यापूर्वी, ज्या खोट्या गोष्टी ते रचत होते, त्या सर्व त्यांच्यापासून हरवतील.

**८८.** ज्या लोकांनी इन्कार केला आणि अल्लाहच्या मार्गापासून रोखले, आम्ही त्यांना अज़ाबवर अज़ाब वाढवित जाऊ. हा मोबदला असेल त्यांच्या उपद्रवकारितेचा!

**८९.** आणि ज्या दिवशी आम्ही प्रत्येक जनसमूहात त्यांच्यातूनच त्यांच्यावर साक्ष देणारा बनवून आणू आणि आम्ही तुमच्यावर हा ग्रंथ अवतरित केला आहे ज्यात प्रत्येक गोष्टीचे स्पष्ट वर्णन आहे आणि मुसलमानांकरिता मार्गदर्शन, दया आणि खूशखबर आहे.

**९०.** निःसंशय, अल्लाह न्यायाचा, भलेपणाचा आणि जवळच्या नातेवाईकांशी चांगले वर्तन करण्याचा आदेश देतो, आणि निर्लज्जतेच्या कामांपासून आणि वाईट गोष्टींपासून आणि अत्याचारापासून रोखतो. तो स्वतः तुम्हाला उपदेश करीत आहे, यासाठी की तुम्ही बोध प्राप्त करावा.

**९१.** आणि अल्लाहशी केलेला वायदा पूर्ण करा, जेव्हा तुम्ही आपसात वायदे आणि वचन-करार कराल आणि शपथांना, त्यांच्या मजबूतीनंतर तोडू नका, ज्याअर्थी तुम्ही अल्लाहला आपला जामीन ठरवून घेतले आहे. निःसंशय, तुम्ही जे काही करता, अल्लाह ते चांगल्या प्रकारे जाणतो.

**९२.** आणि त्या (स्त्री) सारखे होऊ नका, जिने आपले सूत मजबूत कातल्यानंतर तुकडे तुकडे करून टाकले की तुम्ही आपल्या शपथांना आपसात छळ-कपटाचे निमित्त बनवावे, यासाठी की एक गट दुसऱ्या गटापेक्षा उच्च ठरावा. खरी गोष्ट हीच की या वायद्याद्वारे अल्लाह तुमची परीक्षा घेत आहे. निःसंशय, सर्वश्रेष्ठ अल्लाह तुमच्यासाठी कयामतच्या दिवशी तुम्हाला प्रत्येक गोष्टीला स्पष्ट करून सांगेल, जिच्याबाबत तुम्ही मतभेद करीत होते.

**९३.** आणि अल्लाहने इच्छिले असते तर तुम्हा सर्वांना एकाच मताचे बनविले असते, परंतु तो ज्याला इच्छितो मार्गभ्रष्ट करतो, आणि ज्याला इच्छितो सन्मार्ग दाखवितो.

निःसंशय, तुम्ही जे काही करीत आहात, त्याबाबत विचारणा केली जाणार आहे.

**९४.** आणि तुम्ही आपल्या शपथांना आपसातील वैर-द्वेषाचे साधन बनवू नका, अन्यथा तुमची पावले आपल्या मजबुती (स्थिरते) नंतर डळमळू लागतील आणि तुम्हाला सक्त शिक्षा-यातना चाखावी लागेल, कारण की तुम्ही अल्लाहच्या मार्गापासून रोखले आणि तुम्हाला जास्त कठोर शिक्षा-यातना होईल.

**९५.** आणि तुम्ही अल्लाहच्या वायद्यास थोड्याशा किंमतीवर विकत जाऊ नका. लक्षात ठेवा, अल्लाहच्या जवळची वस्तूच तुमच्यासाठी उत्तम आहे जर तुम्ही जाणत असाल.

**९६.** तुमच्याजवळ जे काही आहे, ते सर्व नाश पावणारे आहे आणि अल्लाहजवळ जे काही आहे नेहमी राहणारे आहे आणि सबुरी राखणाऱ्यांना आम्ही चांगल्या कर्माचा चांगला मोबदला अवश्य प्रदान करू.

**९७.** जो मनुष्य सत्कर्म करील, पुरुष असो किंवा स्त्री, आणि ईमान राखणाराही असेल, तर आम्ही त्याला निःसंशय उत्तम जीवन प्रदान करू आणि त्यांच्या नेकीच्या कर्मांचा उत्तम मोबदलाही त्यांना अवश्य प्रदान करू.

**९८.** कुरआन पठण करताना, धिःक्कारलेल्या सैतानापासून अल्लाहचे शरण मागत जा.

**९९.** (निश्चितच) त्याचा जोर अशा लोकांवर कधीही चालत नाही, जे ईमान राखतात, आणि आपल्या पालनकर्त्यावर भरोसा ठेवतात.

**१००.** मात्र, अशा लोकांवर त्याचा प्रभाव जरूर आहे, जे त्याच्याशी मैत्री ठेवतात आणि त्याला अल्लाहचा भागीदार बनवितात.

**१०१.** आणि जेव्हा आम्ही एखाद्या आयतीच्या जागी दुसरी आयत बदलतो आणि जे काही अल्लाह अवतरित करतो, ते तो चांगल्या प्रकारे जाणतो तेव्हा ते म्हणतात की तुम्ही तर हे स्वतः रचून आणता, वास्तविक त्यांच्यापैकी बहुतेक लोक जाणतच नाहीत.

**१०२.** तुम्ही सांगा की त्यास तुमच्या पालनकर्त्यातर्फे जिब्रील सत्यासह घेऊन आले आहेत, यासाठी की ईमान राखणाऱ्यांना अल्लाहने स्थैर्य प्रदान करावे आणि मुसलमानांकरिता मार्गदर्शन आणि खूशखबर ठरावी.

**१०३.** आणि आम्हाला चांगले माहीत आहे, जे इन्कारी म्हणतात की त्यांना तर एक माणूस शिकवितो ज्या माणसाकडे यांचा इशारा आहे तो तर ग़ैरअरबी (अजमी) आहे आणि हा कुरआन तर स्पष्ट अरबी भाषेत आहे.

**१०४.** जे लोक अल्लाहच्या आयतींवर ईमान राखत नाही, त्यांना अल्लाहतर्फेही मार्गदर्शन लाभत नाही आणि त्यांच्यासाठी दु:खदायक अज़ाब आहे.

**१०५.** खोटा आरोप तर तेच ठेवतात, ज्यांचे अल्लाहच्या आयतींवर ईमान नसते आणि हेच लोक खोटे आहेत.

**१०६.** जो मनुष्य आपल्या ईमानानंतर अल्लाहशी इन्कार करील, त्याच्याखेरीज, ज्याला तसे करण्यास भाग पाडले जावे आणि त्याचे मन मात्र ईमानावर कायम असावे, परंतु जे लोक अगदी मोकळ्या मनाने कुफ्र (इन्कार) करतील तर अशा लोकांवर अल्लाहचा प्रकोप आहे आणि अशाच लोकांसाठी भयंकर शिक्षा यातना आहे.

**१०७.** हे अशासाठी की त्यांनी ऐहिक जीवनाला मरणोत्तर जीवनापेक्षा अधिक चांगले समजून घेतले. नि:संशय, सर्वश्रेष्ठ अल्लाह इन्कार करणाऱ्या लोकांना मार्ग दाखवित नाही.

**१०८.** हे असे लोक होते, ज्यांच्या हृदयांवर आणि ज्यांच्या कानांवर आणि डोळ्यांवर अल्लाहने मोहर लावली आहे आणि हेच लोक गाफील आहेत.

**१०९.** नि:संशय, हेच लोक आखिरत (मरणोत्तर जीवना) मध्ये फार मोठे नुकसान उचलणार आहेत.

**११०.** मग ज्या लोकांनी कसोटीत टाकले गेल्यानंतर (धार्मिक कारणांनी) देशत्याग केला, मग जिहाद केला आणि धीर-संयम दाखविला, नि:संशय, तुमचा पालनकर्ता, या गोष्टीनंतर त्यांना माफ करणारा आणि दया करणारा आहे.

**१११.** ज्या दिवशी प्रत्येक मनुष्य स्वत:साठी वादविवाद घालत येईल आणि प्रत्येकाला त्याच्या कृत कर्माचा पुरेपूर मोबदला दिला जाईल आणि लोकांवर किंचितही अत्याचार केला जाणार नाही.

**११२.** आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह त्या वस्तीचे उदाहरण सादर करतो, जी सुख-शांतीपूर्वक होती. तिची रोजी (आजिविवका) तिच्याजवळ सुसंपन्नतेसह सर्व मार्गांनी

चालून येत होती, मग त्या वस्तीने अल्लाहच्या कृपा देणग्यांचा इन्कार केला, तेव्हा सर्वश्रेष्ठ अल्लाहने तिला भूक आणि भयाचा स्वाद चाखविला. हा मोबदला होता त्यांच्या वाईट कर्मांचा.

**११३.** आणि त्यांच्याजवळ, त्यांच्यामधूनच पैगंबर येऊन पोहोचला, तरीही त्यांनी त्याला खोटे ठरविले, तेव्हा अज़ाब (शिक्षा-यातना) ने त्यांना येऊन धरले आणि ते होतेच अत्याचारी.

**११४.** आणि जी काही हलाल (उचित) आणि पाक रोजी (आजिविका) अल्लाहने तुम्हाला देऊन ठेवली आहे, ती खा आणि अल्लाहच्या देणगी (नेमत) बद्दल कृतज्ञता व्यक्त करा, जर तुम्ही त्याचीच उपासना करत असाल.

**११५.** तुमच्याकरिता केवळ मेलेले आणि रक्त आणि डुकराचे मांस आणि ज्या वस्तूवर अल्लाहशिवाय दुसऱ्याचे नाव घेतले जाईल, हराम आहे. तरीही जर एखादा मनुष्य लाचार केला जावा आणि तो अत्याचारी नसावा आणि ना मर्यादेचे उल्लंघन करणारा असावा तर निःसंशय अल्लाह माफ करणारा आणि खूप दया करणारा आहे.

**११६.** आणि एखाद्या वस्तूला आपल्या तोंडाने खोटेच सांगत जाऊ नका की ही हलाल आहे आणि ही हराम आहे की (अशाने) अल्लाहवर खोटा आरोप लावाल. निःसंशय सर्वश्रेष्ठ अल्लाहवर खोटा आरोप रचणारे सफलतेपासून वंचितच राहतात.

**११७.** त्यांना फार कमी लाभ प्राप्त होतो आणि त्यांच्यासाठी दुःखदायक अज़ाब (शिक्ष-यातना) आहे.

**११८.** आणि यहूदी लोकांवर आम्ही जे काही हराम केले होते, ते आम्ही यापूर्वीच तुम्हाला ऐकविले आहे. आम्ही त्यांच्यावर अत्याचार केला नाही किंबहुना ते स्वतःच आपल्या प्राणांवर जुलूम करीत राहिले.

**११९.** की जो कोणी अज्ञानाने वाईट कर्म करील, मग त्यानंतर तौबा (क्षमा-याचना) करील आणि (आपल्या आचरणात) सुधारणाही करून घेईल तर मग तुमचा पालनकर्ता निश्चितच मोठा माफ करणारा आणि अतिशय दया करणारा आहे.

**१२०.** निःसंशय, इब्राहीम (मुस्लिम जनसमूहाचे) प्रमुख आणि सर्वश्रेष्ठ अल्लाहचे मोठे आज्ञाधारक, सगळीकडून अलग होऊन फक्त एक अल्लाहचे झाले होते आणि अनेक

ईश्वरांची उपासना करणाऱ्यांपैकी नव्हते.

**१२१.** सर्वश्रेष्ठ अल्लाहने प्रदान केलेल्या कृपा देणग्यांबद्दल कृतज्ञशील होते. अल्लाहने त्यांना निवडून घेतले होते आणि त्यांना सरळ मार्ग दाखविला होता.

**१२२.** आणि आम्ही त्यांना या जगातही भलाई प्रदान केली आणि निःसंशय आखिरतमध्येही ते नेक सदाचारी लोकांपैकी आहेत.

**१२३.** मग आम्ही तुमच्याकडे वहयी (प्रकाशना) पाठविली की तुम्ही इब्राहीमच्याच मार्गाचे अनुसरण करा, जे सर्वांपासून अलग होऊन एक अल्लाहचे झाले होते आणि ते अनेक ईश्वरांची उपासना करणाऱ्यांपैकी नव्हते.

**१२४.** शनिवारच्या दिवसाचे महत्त्व तर फक्त त्या लोकांकरिता अत्यावश्य ठरविले गेले होते, ज्यांनी त्यात मतभेद केला होता. वास्तविक तुमचा पालनकर्ता स्वतःच त्यांच्यात त्यांच्या मतभेदाचा फैसला कयामतच्या दिवशी करेल.

**१२५.** आपल्या पालनकर्त्याकडे लोकांना हिकमतीने आणि उत्तम अशा शिकवणीसह बोलवा आणि त्यांच्याशी खूप चांगल्या प्रकारे बोला. निःसंशय तुमचा पालनकर्ता, आपल्या मार्गापासून भटकलेल्या लोकांना चांगल्या प्रकारे जाणतो आणि सन्मार्गावर चालणाऱ्यांनाही तो पूर्णतः जाणून आहे.

**१२६.** आणि (एखाद्याशी) सूड घ्यायचाच असेल तर अगदी तेवढाच घ्या जेवढे दुःख तुम्हाला पोहचविले गेले असेल आणि जर सबुरी राखाला तर निःसंशय सबुरी राखणाऱ्यांसाठी हेच उत्तम आहे.

**१२७.** तुम्ही धीर-संयम राखा. अल्लाहच्या दयेविना तुम्ही धीर-संयम राखूच शकत नाही आणि त्यांच्या अवस्थेने दुःखी कष्टी होऊ नका आणि जो कावेबाजपणा हे करतात, त्यामुळे मन संकुचित करू नका.

**१२८.** निःसंशय, जे लोक अल्लाहचे भय राखून, दुराचारापासून दूर राहतात आणि सत्कर्म करीत राहतात, अल्लाह त्यांच्या पाठीशी आहे.

# सूरह बनी इस्राईल - १७

सूरह बनी इस्राईल मक्का येथे अवतरली आणि यात एकशे अकरा आयती आणि बारा रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** पवित्र आहे तो (अल्लाह), जो आपल्या दासाला एका रात्रीतून आदरणीय मस्जिदीपासून, अक्सा मस्जिदपर्यंत घेऊन गेला, जिच्या भोवती आम्ही बरकती प्रदान करून ठेवल्या आहेत. यासाठी की आम्ही त्याला आपल्या सामर्थ्याच्या काही मोठ्या निशाण्या दाखवून द्याव्यात. निःसंशय सर्वश्रेष्ठ अल्लाहच चांगल्या प्रकारे ऐकणारा, पाहणारा आहे.

**२.** आणि आम्ही मूसाला ग्रंथ प्रदान केला आणि त्याला इस्राईलच्या संततीकरिता मार्गदर्शक बनविले की तुम्ही माझ्याशिवाय दुसऱ्या कोणालाही काम बनविणारा बनवू नका.

**३.** हे त्या लोकांपासून जन्मास आलेल्यांनो! ज्यांना आम्ही नूहच्या सोबत नौकेत चढविले होते. तो आमचा मोठा कृतज्ञशील दास होता.

**४.** आणि आम्ही इस्राईलच्या संततीकरिता त्यांच्या ग्रंथात स्पष्टतः निर्णय दिला होता की तुम्ही धरतीवर दोन वेळा उपद्रव निर्माण कराल, आणि तुम्ही फार जास्त अत्याचार कराल.

**५.** या दोन्ही वायद्यांपैकी पहिल्या वायद्याची वेळ येताच आम्ही तुमच्यासमोर आपल्या त्या दासांना उठवून उभे केले जे मोठे लढवय्ये होते, मग ते तुमच्या घरांमध्ये अगदी आतापर्यंत पसरले आणि अल्लाहचा वायदा पूर्ण होणारच होता.

**६.** मग आम्ही तुम्हाला त्यांच्यावर वर्चस्व देऊन (तुमचे दिवस) पालटले आणि विपुल धन संपत्ती आणि संततीने तुमची मदत केली आणि तुमचे समूह बळ वाढविले.

**७.** जर तुम्ही सत्कर्म कराल तर स्वतः आपल्या फायद्याकरिता कराल आणि जर तुम्ही

वाईट कर्मे कराल तर ते देखील स्वतःसाठीच. मग जेव्हा दुसऱ्या वायद्याची वेळ आली, तेव्हा (आम्ही दुसऱ्या दासांना पाठविले) यासाठी की त्यांनी तुमचा चेहरा बिघडवून टाकावा आणि पहिल्या खेपेप्रमाणे पुन्हा त्याच मस्जिदीत घुसावे आणि जी काही वस्तू ताब्यात येईल, तोडफोड करून मुळासकट उपटून टाकावी.

**८.** आशा आहे की तुमचा पालनकर्ता तुमच्यावर दया करील. परंतु जर तुम्ही पुन्हा तेच करू लागाल तर आम्ही देखील पुन्हा तसेच करू, आणि आम्ही इन्कार करणाऱ्यांसाठी जहन्नमला कैदखाना बनवून ठेवले आहे.

**९.** निःसंशय, हा कुरआन तो मार्ग दाखवितो, जो सर्वांत सरळ आहे, आणि सत्कर्म करणाऱ्या ईमानधारकांना ही खूशखबर देतो की त्यांच्यासाठी अतिशय चांगला मोबदला (प्रतिफळ) आहे.

**१०.** आणि ते लोक, जे आखिरतवर विश्वास राखत नाही, त्यांच्यासाठी आम्ही दुःखदायक अज़ाब तयार करून ठेवला आहे.

**११.** आणि मनुष्य वाईट गोष्टींची दुआ प्रार्थना करू लागतो, अगदी त्याच्या स्वतःच्या भलाईच्या दुआ- प्रार्थनेसारखी, मनुष्य मोठा उतावळा आहे.

**१२.** आणि आम्ही रात्र आणि दिवसाला (आपल्या सामर्थ्याची) निशाणी बनविले आहे. रात्रीच्या निशाणीला आम्ही प्रकाशहीन (निस्तेज) केले आणि दिवसाच्या निशाणीला प्रकाशमान दाखविणारी बनविले आहे. यासाठी की तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कृपेचा शोध घेऊ शकावे. आणि यासाठीही की वर्षाची गणना आणि हिशोब जाणू शकावे. आणि प्रत्येक विषयाचे आम्ही सविस्तर निवेदन केले आहे.

**१३.** आणि आम्ही माणसाचे चांगले-वाईट त्याच्या गळ्यात टाकले आहे, आणि कयामतच्या दिवशी आम्ही त्याचा कर्म-लेख बाहेर काढू, जो त्याला आपल्यावर खुला असलेला आढळेल.

**१४.** आता स्वतःच आपले कर्मपत्र वाचून घ्या. आज तर तू स्वतःच आपला फैसला करण्यास पुरेसा आहे.

**१५.** जो मनुष्य मार्गदर्शन प्राप्त करतो, तो स्वतः आपल्या भल्यासाठी मार्गदर्शन प्राप्त

करतो आणि जो मार्गभ्रष्ट होईल तर त्याचे ओझे त्याच्यावरच आहे. कोणीही ओझे बाळगणारा दुसऱ्या कुणाचे ओझे आपल्यावर लादून घेणार नाही आणि आमचा हा नियम नाही की पैगंबर पाठविण्यापूर्वीच अज़ाब (शिक्षा-यातना) पाठवावा.

**१६.** आणि जेव्हा आम्ही एखाद्या वस्तीचा सर्वनाश करण्याचा इरादा करून घेतो तेव्हा तिथल्या सुखवस्तू (सुसंपन्न) लोकांना काही आदेश देतो आणि ते त्या वस्तीत उघडपणे अवज्ञा करू लागतात, तेव्हा त्यांच्यावर (शिक्षा-यातनेचा) फैसला लागू होतो आणि मग आम्ही त्या वस्तीची उलथापालथ करून टाकतो.

**१७.** आणि आम्ही नूहनंतरही अनेक समुदाय नष्ट करून टाकले आणि तुमचा पालनकर्ता आपल्या दासांच्या अपराधांना चांगल्या प्रकारे जाणून आहे आणि चांगल्या प्रकारे पाहणारा आहे.

**१८.** ज्याची इच्छा फक्त या शीघ्रतापूर्ण जगापुरतीच असेल तर त्याला आम्ही इथे, जेवढे देऊ इच्छितो लवकर प्रदान करतो. शेवटी मात्र त्याच्यासाठी आम्ही जहन्नम निश्चित करतो, जिथे तो मोठ्या वाईट अवस्थेत, धिःक्कारला गेलेला दाखल होईल.

**१९.** आणि जो आखिरतची इच्छा बाळगेल, आणि त्यासाठी जसा प्रयत्न करायला हवा, तसा तो करतही असेल आणि तो ईमान राखणाराही असेल तर मग हेच ते लोक होत, ज्याच्या प्रयत्नाला अल्लाहच्या ठायी पुरेपूर सन्मान दिला जाईल.

**२०.** प्रत्येकाला आम्ही प्रदान करीत असतो यांनाही आणि त्यांनाही, तुमच्या पालनकर्त्याच्या देणग्यांमधून, आणि तुमच्या पालनकर्त्याचा अनुग्रह थांबलेला नाही.

**२१.** पाहा, त्यांच्यात एकाला एकावर कशा प्रकारे श्रेष्ठता प्रदान केली आहे आणि आखिरत (मरणोत्तर जीवन) तर दर्जाच्या दृष्टीने अतिशय उत्तम आहे आणि श्रेष्ठतेच्या दृष्टीनेही फारच उत्तम आहे.

**२२.** अल्लाहसोबत दुसऱ्या कुणाला उपास्य बनवू नका की शेवटी तुम्ही अपमानित, असहाय्य होऊन बसाल.

**२३.** आणि तुमच्या पालनकर्त्याने उघड आदेश दिलेला आहे की तुम्ही त्याच्याशिवाय दुसऱ्या कोणाचीही उपासना करू नका आणि माता-पित्याशी सद्व्यवहार करा, जर

तुमच्या उपस्थितीत (हयातीत) यांच्यापैकी एक किंवा हे दोघे वृद्धावस्थेस पोहोचतील तर त्यांना 'अरे' सुद्धा बोलू नका, त्यांना दाटवू नका, उलट त्यांच्याशी आदर-सन्मानाने बोलत जा.

**२४.** आणि नरमी व प्रेमासह त्यांच्यासमोर विनम्रतापूर्वक हात पसरवून ठेवा[१] आणि दुआ-प्रार्थना करीत राहा, हे माझ्या पालनकर्त्या! यांच्यावर अशीच दया कर जशी यांनी माझ्या बालपणात माझे पालनपोषण करण्यात केली आहे.

**२५.** जे काही तुमच्या हृदयात आहे ते तुमचा पालनकर्ता चांगल्या प्रकारे जाणतो. जर तुम्ही नेक सदाचारी असाल तर तो क्षमा-याचना करणाऱ्यांना माफ करणारा आहे.

**२६.** आणि नातेवाईकांचा, आणि दीन-दुबळ्यांचा आणि प्रवाशांचा हक्क अदा करीत राहा, आणि अपव्यय करण्यापासून दूर राहा.

**२७.** निश्चितच, अपव्यय (उधळपट्टी) करणारे सैतानाचे बांधव आहेत, आणि सैतान आपल्या पालनकर्त्याशी मोठा कृतघ्न आहे.

**२८.** आणि आपल्या पालनकर्त्याच्या त्या दया-कृपेचा शोध घेण्यात, जिची तू आशा बाळगतो, जर तुला त्यांच्यापासून तोंड फिरवावे लागेल तर अशाही स्थितीत तू त्यांना चांगल्या प्रकारे आणि नरमीने समजाविले पाहिजे.

**२९.** आणि आपला हात आपल्या गळ्याशी बांधून ठेवू नका आणि ना तो पूर्णपणे मोकळा सोडा, मग धिःक्कारलेला आणि पश्चात्तापित होऊन बसावे.

**३०.** निःसंशय, तुमचा पालनकर्ता, ज्याला इच्छितो रोजी (आजिविका) विस्तृत करतो आणि ज्याच्यासाठी इच्छितो संकुचित (तंग) करतो. निःसंशय, तो आपल्या दासांची पुरेपूर खबर राखतो आणि खूप चांगल्या प्रकारे पाहणारा आहे.

**३१.** आणि दारिद्र्याच्या भयाने आपल्या संततीला मारून टाकू नका. त्यांना आणि तुम्हाला आम्हीच रोजी (आजिविका) प्रदान करतो. निःसंशय, त्यांची हत्या करणे फार

---

(१) पक्षिणी जेव्हा आपल्या पिलांना आपल्या प्रेम-छत्रात घेते, तेव्हा त्यांच्यासाठी आपले पंख खाली सोडते, तद्वतच तू देखील आपल्या माता-पित्याशी अशाच प्रकारे चांगला व प्रेमपूर्ण व्यवहार कर आणि त्यांचा अशा प्रकारे सांभाळ कर, ज्या प्रकारे त्यांनी बालपणी तुझा सांभाळ केला.

मोठा अपराध आहे.

**३२.** आणि खबरदार! व्यभिचाराच्या जवळही जाऊ नका, कारण ती मोठी निर्लज्जता आहे, आणि अतिशय वाईट मार्ग आहे.

**३३.** आणि एखाद्या जीवाला, ज्याला मारणे अल्लाहने हराम केले आहे, कधीही अवैधरित्या मारू नका (त्याची हत्या करू नका) आणि जो मनुष्य निरपराध अवस्थेत ठार मारला जाईल तर आम्ही त्याच्या वारसाला हक्क देऊन ठेवला आहे. परंतु त्याने (प्रतिशोध म्हणून) ठार मारण्यात घाई करू नये. निःसंशय त्याची मदत केली गेली आहे.

**३४.** आणि अनाथाच्या धन-संपत्तीच्या जवळही जाऊ नका, त्या पद्धतीशिवाय, जी अधिक चांगली असे, येथपर्यंत की ते आपल्या सज्ञान होण्याच्या वयास पोहचावेत आणि वायदा पूर्ण करीत जा कारण की वायद्याविषयी विचारणा होईल.

**३५.** आणि जेव्हा मापून द्याल तेव्हा पूर्ण माप भरून द्या आणि सरळ तराजूने तोलून द्या. हेच चांगले आहे आणि याचा परिणामही फार चांगला आहे.

**३६.** आणि ज्या गोष्टीची तुम्हाला खबरही नसेल, अशा गोष्टीच्या मागे लागू नका, कारण कान आणि डोळे आणि हृदय यांच्यापैकी प्रत्येकाला विचारणा केली जाणार आहे.

**३७.** आणि जमिनीवर मोठ्या दिमाखाने व गर्वाने चालू नका, कारण (अशाने) ना तुम्ही जमिनीला फाडू शकता आणि ना पर्वतांच्या उंचीपर्यंत पोहोचू शकता.

**३८.** या सर्व कामांचा वाईटपणा तुमच्या पालनकर्त्याजवळ अतिशय अप्रिय आहे.

**३९.** हे देखील त्या वहयी (प्रकाशना) पैकी आहे, जिला तुमच्या पालनकर्त्याने तुमच्याकडे हिकमतीने उतरविले आहे, यास्तव अल्लाहसोबत दुसऱ्या कोणत्याही उपास्य बनवू नका अन्यथा धिःक्कार करून आणि अपमानित करून जहन्नममध्ये टाकले जाल.

**४०.** काय पुत्रांकरिता अल्लाहने तुम्हाला निवडून घेतले आहे आणि स्वतः आपल्याकरिता फरिश्त्यांना मुली बनवून घेतले? खात्रीने तुम्ही फार मोठे बोल बोलत आहात.

**४१.** आणि आम्ही तर या कुरआनात सर्व प्रकारे सांगितले आहे की लोकांच्या ध्यानी यावे, परंतु यावरही त्यांचा तिरस्कारच वाढतो.

**४२.** तुम्ही सांगा, जर अल्लाहसोबत आणखी दुसरे उपास्य असते, जसे की हे लोक सांगतात, तर अवश्य त्यांनी आतापर्यंत अर्शच्या स्वामीकडे मार्ग शोधला असता.

**४३.** जे काही हे सांगतात, त्याहून तो पवित्र आणि महान, अतिशय दूर, आणि अतिशय उच्चतम आहे.

**४४.** सप्त आकाश आणि धरती, आणि जे काही त्यांच्यात आहे, सर्व त्याचेच स्तुति-गान करतात. अशी एकही वस्तू नाही, जी पवित्रता आणि महानतेसह त्याचे स्मरण करीत नसेल. मात्र हे खरे आहे की तुम्ही तिचे महिमागान समजू शकत नाही. निःसंशय अल्लाह मोठा सहनशील आणि माफ करणारा आहे.

**४५.** आणि जेव्हा तुम्ही कुरआन पठण करता, तेव्हा आम्ही तुमच्या आणि त्या लोकांच्या दरम्यान, जे आखिरतवर विश्वास ठेवत नाही, एक गुप्त पडदा टाकतो.

**४६.** आणि त्यांच्या हृदयांवर पडदे टाकले आहेत की त्यांनी त्याला समजावे आणि त्यांच्या कानात बधीरता आणि जेव्हा तुम्ही केवळ अल्लाहचेच वर्णन त्याच्या एकमेवतेसह या कुरआनात करता तेव्हा ते तोंड फिरवून पळ काढतात.

**४७.** ज्या हेतुने ते कुरआन ऐकतात, त्यांचे इरादे आम्ही चांगल्या प्रकारे जाणतो. जेव्हा हे तुमच्याकडे कान लावून असतात. तेव्हा देखील, आणि जेव्हा हे सल्लामसलत करतात तेव्हाही वास्तविक हे अत्याचारी लोक म्हणतात की तुम्ही अशा व्यक्तीचे अनुसरण करण्यात मग्न आहात, ज्याच्यावर जादूटोणा केला गेला आहे.

**४८**. जरा पहा तरी तुमच्या साठी ते कस कशी उदाहरणे देतात यास्तव ते चुकीच्या मार्गाकडे जात आहेत आता तर सरळ मार्ग प्राप्त करणे त्यांना शक्य नाही

**४९.** ते म्हणाले, काय जेव्हा आम्ही हाडे आणि धूळ माती होऊन जाऊ तर काय आम्ही नव्याने जन्मास येऊन दुसऱ्यांदा उठवून उभे केले जाऊ ?

**५०.** उत्तर द्या की तुम्ही दगड बना किंवा लोखंड.

**५१.** किंवा एखादी अशी वस्तू, जी तुमच्या मनात अतिशय महान वाटत असेल. मग त्यांनी

विचारावे की असा कोण आहे, जो दुसऱ्यांदा आमचे जीवन परत करेल? तुम्ही उत्तर द्या की तोच (अल्लाह) ज्याने तुम्हाला पहिल्या खेपेस निर्माण केले. यावर ते आपले डोके हलवून तुम्हाला विचारतील की, बरे हे केव्हा घडून येईल? तर तुम्ही उत्तर द्या की नवल नव्हे की ते लवकरच घडून येईल.

**५२.** ज्या दिवशी तो तुम्हाला बोलावील, तुम्ही त्याची प्रशंसा करत आज्ञापालन कराल आणि अनुमान लावाल की तुम्ही फार कमी काळ राहिलात.

**५३.** आणि माझ्या दासांना सांगा की त्यांनी फार उत्तम गोष्ट आपल्या मुखातून काढत जावी, कारण सैतान आपसात फूट पाडतो. निश्चितच सैतान माणसाचा उघड शत्रू आहे.

**५४.** तुमचा पालनकर्ता तुमची अवस्था तुमच्यापेक्षा अधिक जाणणारा आहे. तो जर इच्छिल तर तुमच्यावर दया करेल, इच्छिल तर तुम्हाला शिक्षा देईल. आम्ही तुम्हाला त्यांच्यावर देखरेख ठेवणारा बनवून पाठविले नाही.

**५५.** आणि आकाशांमध्ये आणि धरतीत जे काही आहे, ते सर्व तुमचा पालनकर्ता चांगल्या प्रकारे जाणतो, आम्ही काही पैगंबरांना काहींवर श्रेष्ठता प्रदान केली आहे आणि दाऊदला जबूर आम्हीच प्रदान केले.

**५६.** तुम्ही सांगा, (अल्लाह) शिवाय ज्यांना तुम्ही (उपास्य) समजत आहात, त्यांना दुआ-प्रार्थना करा, परंतु ते ना तुमचे एखादे दुःख दूर करू शकतात आणि ना बदलू शकतात.[१]

---

(१) या आयतीत 'मिन्दूनीही'शी अभिप्रेत फरिश्ते आणि बुजूर्गांची चित्रे आणि मूर्त्या होत ज्यांची ते पूजा करीत असत किंवा हजरत उजैर आणि ईसा मसिह होत, ज्यांना यहूदी आणि ख्रिश्चन अल्लाहचा पुत्र म्हणत, त्यांना ईशगुणसंपन्न मानत अथवा ते जिन्न होत, ज्यांनी ईमान राखले होते आणि मूर्तिपूजक त्यांची पूजा करीत. अतः या आयतीत सांगितले जात आहे की ते स्वतःही अल्लाहचे सामिप्य प्राप्त करण्याचा प्रयत्न करीत व त्याच्या दया-कृपेची आस बाळगत व त्याच्या शिक्षेचे भय राखत अर्थात हा गुणधर्म निर्जीव (पाषाणां) मध्ये असू शकत नाही. तेव्हा हे स्पष्ट होते की, 'अल्लाहशिवाय ज्यांची उपासना केली जात राहिली' त्या केवळ पाषाणाच्या मूर्त्याच नव्हत्या, तर अल्लाहचे दासही होते, ज्यात काही फरिश्ते, काही औलिया, काही पैगंबर व काही जिन्न होते. अल्लाहने या सर्वांविषयी फर्माविले की ते काहीच करू शकत नाहीत. ते ना एखाद्याचे दुःख दूर करू शकतात, ना कोणाच्या अवस्थेत बदल घडवू शकतात.

**५७.** ज्यांना हे लोक दुआ प्रार्थना करतात, ते स्वतः आपल्या पालनकर्त्याची निकटता शोधत असतात की त्यांच्यापैकी कोण अधिक निकट होईल, ते तर स्वतः त्याच्या दया-कृपेची आशा बाळगतात आणि त्याच्या शिक्षा-यातनेपासून भयभीत राहतात. निःसंशय तुमच्या पालनकर्त्याचा अज़ाब (शिक्षा-यातना) भय राखण्याची गोष्ट आहे.

**५८.** आणि जेवढ्या देखील वस्त्या आहेत, आम्ही त्यांना कयामतचा दिवस येण्यापूर्वी एकतर उद्ध्वस्त करून टाकू किंवा अतिशय सक्त शिक्षा देऊ. हे तर ग्रंथात लिहिले गेले आहे.

**५९.** आणि आम्हाला निशाण्या (चमत्कार) उतरविण्यापासून अडसर केवळ याच गोष्टीचा आहे की पूर्वीच्या लोकांनी या निशाण्यांना खोटे ठरविले आहे. आम्ही समूदला चमत्काराच्या स्वरूपात सांडणी दिली परंतु त्यांनी तिच्यावर अत्याचार केला आम्ही तर लोकांना केवळ धाक दाखविण्याकरिता निशाण्या पाठवितो.

**६०.** आणि स्मरण करा, जेव्हा आम्ही तुम्हाला सांगितले की तुमच्या पालनकर्त्याने लोकांना घेरले आहे. आम्ही जे तुम्हाला दाखविले होते, ती लोकांकरिता स्पष्ट परीक्षाच होती आणि त्याचप्रमाणे ते झाड देखील ज्याविषयी कुरआनात तिरस्कार व्यक्त केला गेला आहे. आम्ही त्यांना सचेत करीत आहोत, परंतु अशाने त्यांचे वैर आणखी जास्त वाढत जात आहे.

**६१.** आणि जेव्हा आम्ही फरिश्त्यांना आदेश दिला की आदमला सजदा करा, तेव्हा इब्लिसखेरीज सर्वांनी सजदा केला. तो म्हणाला, काय मी त्याला सजदा करू, ज्याला तू मातीपासून बनविले आहे.

**६२.** ठीक आहे, पण पाहा तू त्याला माझ्यावर श्रेष्ठता तर प्रदान केली आहे, परंतु जर तू मला कयामतपर्यंत संधी देशील तर मी याच्या संततीला, फार कमी लोकांशिवाय आपल्या काबूत करेन.

**६३.** (अल्लाहने) आदेश दिला, जा, त्यांच्यापैकी जो कोणी तुझा अनुयायी होईल तर तुम्हा सर्वांची शिक्षा जहन्नम आहे, जो पुरेपूर मोबदला आहे.

**६४.** त्यांच्यापैकी तू ज्याला देखील आपल्या बोलण्याने बहकवू शकशील बहकव आणि त्यांच्यावर आपले स्वार आणि प्यादे चढवून आण, आणि त्यांच्या धन आणि संततीमधून

आपलाही हिस्सा लाव, आणि त्यांना (खोटे) वचन दे. त्यांच्याशी जेवढी देखील वचने (वायदे) सैतानाचे असतात, सर्वच्या सर्व पूर्ण दगाबाजी आहे.

**६५.** माझ्या सच्चा दासांवर तुझा कोणताही प्रभाव आणि काबू नाही आणि तुमचा पालनकर्ता मोठा काम बनविणारा पुरेसा आहे.

**६६.** तुमचा पालनकर्ता तो आहे, जो तुमच्यासाठी नदीत नावा चालवितो, यासाठी की तुम्ही त्याच्या कृपेचा शोध घ्यावा. निःसंशय तो तुमच्यावर मोठा दया करणारा आहे.

**६७.** आणि समुद्रात संकट कोसळताच, ज्यांना तुम्ही दुआ-प्रार्थना करीत होते, ते सर्व विसरतात, केवळ तोच (अल्लाह) बाकी राहतो, मग जेव्हा तो तुम्हाला खुश्कीकडे सुरक्षित घेऊन येतो, तेव्हा तुम्ही तोंड फिरवून घेता. मनुष्य मोठा कृतघ्न आहे.

**६८.** तर काय तुम्ही या गोष्टीपासून निर्धास्त झालात की तुम्हाला खुश्कीच्या एखाद्या भूभागात (नेऊन जमिनीत) धसवून टाकावे किंवा तुमच्यावर दगडांचा वर्षाव करणारे भयंकर वादळ पाठवावे, मग स्वतःसाठी तुम्हाला कोणी मित्र व सहाय्यकर्ता आढळणार नाही.

**६९.** काय तुम्ही या गोष्टीपासून निर्भय झाला आहात की (अल्लाहने) दुसऱ्यांदा तुम्हाला नदीच्या प्रवासात आणावे आणि तुमच्यावर वेगवान वादळवारे पाठवावेत आणि तुमच्या इन्कारापायी तुम्हाला बुडवावे, मग तुम्हाला स्वतःकरिता, आमच्यावर त्याचा दावा (पाठलाग) करणारा कोणीही आढळणार नाही.

**७०.** आणि निःसंशय, आम्ही आदमच्या संततीला मोठी प्रतिष्ठा दिली आणि त्यांना खुश्की आणि पाण्यावर चालणारी वाहने दिली आणि त्यांना पाक साफ वस्तूंपासून आजिविका (अन्न-सामुग्री) प्रदान केली आणि आपल्या बहुतेक निर्मितीवर त्यांना श्रेष्ठता प्रदान केली.

**७१.** ज्या दिवशी आम्ही प्रत्येक उम्मत (समुदाया) ला त्याच्या पेशव्यांसह बोलावू, मग ज्यांना त्यांचा कर्मलेख उजव्या हातात दिला जाईल ते मोठ्या आनंदाने आपला कर्मलेख वाचू लागतील आणि धाग्याइतका (तीळमात्र) ही अत्याचार त्यांच्यावर केला जाणार नाही.

**७२.** आणि जो कोणी या जगात आंधळा राहिला तो आखिरतमध्येही आंधळा आणि

सरळ मार्गापासून दूर भटकलेला राहील.

**७३.** आणि हे लोक तुम्हाला त्या वहयी (प्रकाशना) पासून, जी आम्ही तुमच्यावर अवतरित केली आहे, हटवू इच्छित होते की तुम्ही तिच्याखेरीज काही इतर गोष्टी आमच्या नावाने रचून घ्याव्यात, मग तर यांनी तुम्हाला आपला दोस्त बनविले असते.

**७४.** आणि जर आम्ही तुम्हाला अटळ राखले नसते तर फार शक्य होते की तुम्ही त्यांच्याकडे काही न काही (प्रमाणात) झुकलेच असते.

**७५.** मग तर आम्हीही तुम्हाला या जगात दुहेरी सजा दिली असती. आणि दुहेरी मृत्युचीही, या स्थितीत तुम्हाला स्वतःसाठी आमच्या विरोधात कोणताही मदत करणारा आढळला नसता.

**७६.** आणि हे तर तुमचे पाय या भूमीतून डगमगविण्याच्या तयारीला लागलेच होते की तुम्हाला देशाबाहेर घालवावे, मग हे सुद्धा तुमच्यानंतर फार कमी काळ राहू शकले असते.

**७७.** असाच नियम त्यांचा होता, जे तुमच्यापूर्वी पैगंबर आम्ही पाठविले, आणि तुम्हाला आमच्या नियमांमध्ये कधीही बदल दिसून येणार नाही.

**७८.** सूर्यास्तापासून रात्रीचा अंधार होईपर्यंत नमाज कायम राखा आणि प्रातःकाळी (फज्रच्या वेळी) कुरआनचे पठणही, निःसंशय प्रातःकाळी कुरआन पठण करणे हजर केले गेले आहे.

**७९.** आणि रात्रीच्या काही भागात तहज्जूद (च्या नमाजमध्ये कुरआन) पढत जात. ही अधिकता तुमच्यासाठी आहे. लवकरच तुमचा पालनकर्ता तुम्हाला महमूद नावाच्या (प्रशंसापूर्ण) स्थानावर उभा करेल.

**८०.** आणि दुआ-प्रार्थना करीत राहा की हे माझ्या पालनकर्त्या! मला जिथेही न्यायचे असेल, चांगल्या प्रकारे ने आणि जिथूनही बाहेर काढायचे असेल चांगल्या प्रकारे काढआणि माझ्यासाठी आपल्या जवळून वर्चस्व आणि मदत निश्चित कर.

**८१.** आणि या गोष्टीचे ऐलान करा की, सत्य येऊन पोहोचले आणि असत्य मिटले. निःसंशय असत्य मिटण्याच्याच योग्य होते.

**८२.** आणि हा कुरआन जो आम्ही अवतरित करीत आहोत, ईमान राखणाऱ्यांसाठी रोगमुक्ती, स्वास्थ्य आणि दया-कृपा आहे, परंतु अत्याचारींसाठी नुकसानाशिवाय कसलीही वाढ होत नाही.

**८३.** आणि जेव्हा देखील माणसाला आम्ही आपली कृपा-देणगी प्रदान करतो, तेव्हा तो तोंड फिरवितो आणि कुशी बदलतो आणि जेव्हा देखील त्याला दुःख पोहोचते तेव्हा तो निराश होतो.

**८४.** सांगा की प्रत्येक मनुष्य आपल्या पद्धतीनुसार कार्य करतो. जे पूर्णतः मार्गदर्शनावर आहेत, त्यांना तुमचा पालनकर्ताच चांगल्या प्रकारे जाणतो.

**८५.** आणि हे लोक तुम्हाला आत्म्याविषयी विचारतात. (तुम्ही त्यांना) उत्तर द्या की आत्मा माझ्या पालनकर्त्या (अल्लाह) च्या हुकूमाने आहे. आणि तुम्हाला जे ज्ञान दिले गेले आहे ते फारच कमी आहे.[१]

**८६.** आणि जर आम्ही इच्छिले तर जी वहयी (प्रकाशना) तुमच्याकडे आम्ही अवतरित केली आहे, सर्व परत घेऊ, मग तुम्हाला त्याच्यासाठी आमच्यासमोर कोणीही हिमायत करणारा लाभू शकणार नाही.

**८७.** तुमच्या पालनकर्त्याच्या दयेखेरीज. निःसंशय तुमच्यावर त्याची मोठी कृपा आहे.

**८८.** सांगा की जर समस्त मानव आणि जिन्न मिळून या कुरआनासारखा (ग्रंथ) आणू इच्छितील तर त्या सर्वांच्याकडून याचे उदाहरण आणणे अशक्य आहे, मग ते आपसात एकमेकांचे सहाय्यक बनले तरीही.

**८९.** आणि आम्ही तर या कुरआनात लोकांच्या समजण्याकरिता अशा प्रकारे सर्व

---

(१) मूळ शब्द 'रुह' अर्थात आत्मा एक सूक्ष्म वस्तू आहे, जी कोणालाही दिसत नाही, तथापि प्रत्येक सजीवाचे शक्तीसामर्थ्य त्या आत्म्यातच सुप्त आहे याची हकीगत आणि वास्तविकता काय आहे? हे कोणीही जाणत नाही. यहूदी (ज्यू) लोकांनी एकदा पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांना याबाबत विचारले, तेव्हा ही आयत अवतरली. (सहीह बुखारी) आयतीचा अर्थ हाच की तुमचे ज्ञान, अल्लाहच्या ज्ञानापुढे काहीच नाही आणि ज्या आत्म्याविषयी तुम्ही विचारत आहात, त्याचे ज्ञान तर अल्लाहच्या पैगंबरांनाही दिले गेले नाही, फक्त एवढेच समजा की हा माझ्या पालनकर्त्याचा आदेश आहे, आणि माझ्या पालनकर्त्याच्या महानतेपैकी आहे, ज्याची खरी हकीगत, वस्तुस्थिती केवळ अल्लाहच जाणतो.

उदाहरणे सांगितली आहेत, परंतु बहुतेक लोक कृतघ्नपणा दाखविणे थांबवत नाहीत.

**९०.** आणि ते म्हणाले, आम्ही तुमच्यावर कधीही ईमान राखणार नाही, जोपर्यंत तुम्ही आमच्यासाठी जमिनीतून पाण्याचा झरा काढून दाखवत नाही.

**९१.** अथवा स्वतः तुमच्यासाठी एखादा बाग असावा खजुरांचा आणि द्राक्षांचा आणि त्यांच्या दरम्यान तुम्ही अनेक वाहते जलप्रवाह काढून दाखवावेत.

**९२.** किंवा तुम्ही आकाशाला आमच्यावर तुकडे तुकडे करून पाडावे, जसा तुमचा विचार आहे अथवा तुम्ही स्वतः अल्लाहला आणि फरिश्त्यांना आमच्यासमोर आणून उभे करावे.

**९३.** अथवा स्वतः तुमच्यासाठी एखादे सोन्याचे घर असावे किंवा तुम्ही आकाशात चढून जावे आणि आम्ही तर तुमच्या चढून जाण्याचाही तोपर्यंत विश्वास करणार नाही, जोपर्यंत तुम्ही आमच्यावर एखादा ग्रंथ अवतरित करत नाही, जो आम्ही स्वतः वाचून घ्यावा. तुम्ही उत्तर द्या की माझा पालनकर्ता मोठा पवित्र आहे. मी तर एक मानव आहे, जो रसूल (पैगंबर) बनवून पाठविला गेलो आहे.

**९४.** आणि लोकांजवळ मार्गदर्शन येऊन पोहोचल्यानंतर ईमान राखण्यापासून रोखणारी केवळ हीच गोष्ट राहिली की ते म्हणाले, काय अल्लाहने एका माणसालाच रसूल (पैगंबर) बनवून पाठविले ?

**९५.** (तुम्ही) सांगा, जर धरतीवर फरिश्ते चालत फिरत असते आणि इथे वास्तव्य करणारे राहिले असते तर मग आम्हीही त्यांच्याजवळ एखाद्या आस्मानी फरिश्त्यालाच रसूल बनवून पाठविले असते.

**९६.** सांगा, माझ्या आणि तुमच्या दरम्यान अल्लाहचे साक्षी असणे पुरेसे आहे तो आपल्या दासांना चांगल्या प्रकारे जाणून आहे आणि चांगल्या प्रकारे पाहणारा आहे.

**९७.** आणि अल्लाह ज्याला मार्ग दाखविल, तो मार्गदर्शन लाभलेला आहे आणि ज्याला तो पथभ्रष्ट करील तर असंभव आहे की तुम्हाला त्याचा मित्र, त्याच्याखेरीज दुसरा कोणी आढळेल, अशा लोकांना आम्ही कयामतच्या दिवशी तोंडघशी पाडून अशा अवस्थेत जमा करू की ते आंधळे, मुके आणि बहिरे असतील. त्यांचे ठिकाण जहन्नम असेल, जेव्हा ती (आग) थोडी सुद्धा मंद पडू लागेल तर तिला आम्ही त्यांच्यासाठी

आणखी भडकावून देऊ.

**९८.** हा सर्व आमच्या निशाण्यांचा इन्कार करण्याचा आणि हे सांगण्याचा परिणाम आहे की काय जेव्हा आम्ही राख आणि कण कण होऊन जाऊ, मग आम्हाला नव्याने निर्माण करून उठवून उभे केले जाईल?

**९९.** काय त्यांनी या गोष्टीकडे लक्ष दिले नाही की ज्या अल्लाहने आकाश आणि धरतीला निर्माण केले, तो त्यांच्यासारख्यांना निर्माण करण्याचे पूर्ण सामर्थ्य बाळगतो, त्यानेच त्यांच्यासाठी एक अशी वेळ निश्चित केली आहे, जिच्याबाबत काही शंका नाही, परंतु अत्याचारी लोक कृतघ्न बनल्याविना राहत नाही.

**१००.** त्यांना सांगा की (जर समजा) जर तुम्ही माझ्या पालनकर्त्याच्या दया कृपेच्या खजिन्याचे मालक बनले असते तर तुम्ही त्या वेळीही तो खर्च होईल या भीतीने त्यात कंजूसपणा केला असता आणि मनुष्य आहेच मोठा कोत्या मनाचा!

**१०१.** आणि आम्ही मूसाला नऊ मोजिजे (अल्लाहप्रदत्त चमत्कार) अगदी साफ साफ प्रदान केले, तू स्वतः इस्राईलच्या संततीला विचार, जेव्हा ते त्यांच्याजवळ तेव्हा पोहोचले फिरऔन म्हणाला, हे मूसा! माझ्या मते तुझ्यावर जादूटोणा केला गेला आहे.

**१०२.** (मूसाने) उत्तर दिले, हे मला माहीत झाले आहे की आकाशांच्या आणि धरतीच्या पालनकर्त्यानेच हे चमत्कार दाखविण्यासाठी व समजाविण्यासाठी अवतरित केले आहेत, हे फिरऔन! मला तर वाटते की तू नक्कीच नष्ट केला गेला आहे.

**१०३.** शेवटी फिरऔनने पक्का इरादा केला की त्यांना भूमीतूनच काढून फेकावे, तेव्हा आम्ही स्वतः त्याला आणि त्याच्या सर्व साथीदारांना बुडवून टाकले.

**१०४.** आणि त्यानंतर आम्ही इस्राईलच्या पुत्रांना फर्माविले की त्या भूमीवर वास्तव्य करा, मात्र जेव्हा आखिरतचा वायदा येईल तेव्हा आम्ही तुम्हा सर्वांना एकत्रित करून नेऊ.

**१०५.** आणि आम्ही या (कुरआना) ला सत्यासह अवतरित केले आणि हा देखील सत्यासह अवतरित झाला आणि आम्ही तुम्हाला केवळ खूशखबर देणारा आणि सचेत करणारा बनवून पाठविले आहे.

**१०६.** आणि कुरआनाला आम्ही थोडे थोडे करून अशासाठी उतरविले आहे की तुम्ही

वेळ मिळेल त्यानुसार लोकांना ऐकवावे आणि आम्ही स्वत:देखील याला थोडे थोडे करून उतरविले.

**१०७.** तुम्ही सांगा, तुम्ही यावर ईमान राखा किंवा न राखा, ज्यांना याच्यापूर्वी ज्ञान दिले गेले आहे, त्यांच्याजवळ जेव्हा देखील याचे पठण केले जाते, तेव्हा ते माथा टेकून सजदा करू लागतात.

**१०८.** आणि म्हणतात की आमचा पालनकर्ता पवित्र आहे, आमच्या पालनकर्त्याचा वायदा निश्चितच पूर्ण होणार आहे.

**१०९.** आणि ते माथा टेकून रडत रडत सजद्याच्या अवस्थेत खाली पडतात आणि हा कुरआन त्यांची नरमी आणि नम्रता आणखी जास्त वाढवितो.

**११०.** तुम्ही सांगा की अल्लाहला अल्लाह म्हणून पुकारा आणि रहमान म्हणून, ज्या नावाने देखील पुकारा सर्व शुभ नामे त्याचीच आहेत. ना तुम्ही आपली नमाज फार उंच स्वरात पढत जा आणि ना अगदी हळू स्वरात किंबहुना यांच्या मधला मार्ग शोधा.

**१११.** आणि सांगा, समस्त स्तुती- प्रशंसा अल्लाहकरिताच आहे, जो ना संतती बाळगतो आणि ना आपल्या राज्यसत्तेत दुसऱ्या कोणाला भागीदार ठेवतो, ना तो असा कमजोर आहे की त्याचा कोणी सहाय्यक असावा आणि तुम्ही त्याची परिपूर्ण महिमा वर्णन करण्यात मग्न राहा.

---

## सूरह कहफ - १८

सूरह कहफ मक्का येथे अवतरली आणि यात एकशे दहा आयती आणि बारा रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** सर्व स्तुती-प्रशंसा त्या अल्लाहकरिताच आहे, ज्याने आपल्या दासावर हा कुरआन अवतरित केला आणि त्यात कसलीही उणीव बाकी राहू दिली नाही.

**२.** किंबहुना सर्व काही यथायोग्य राखले यासाठी की आपल्याजवळच्या सक्त शिक्षेपासून सचेत करावे आणि ईमान राखणाऱ्यांना आणि सत्कर्म करणाऱ्यांना

खूशखबरी ऐकवावी की त्यांच्याकरिता उत्तम मोबदला आहे.

**३.** ज्यात ते नेहमी नेहमी राहतील.

**४.** आणि त्या लोकांनाही भय दाखवावे जे म्हणतात की अल्लाह संतती बाळगतो.

**५.** वास्तविकत ना त्यांना स्वतःला याचे ज्ञान आहे, ना त्यांच्या थोर बुजूर्ग लोकांना. हा आरोप मोठा वाईट आहे, जो त्यांच्या तोंडून निघत आहे, ते केवळ खोटे बोलत आहेत.

**६.** मग जर या लोकांनी या गोष्टीवर ईमान राखले नाही तर काय तुम्ही त्यांच्या मागे याच दुःखात आपल्या जीवाचा नाश करून घ्याल?

**७.** धरतीवर जे काही आहे, ते आम्ही धरतीच्या शोभा-सजावटीसाठी बनविले आहे की आम्ही त्यांची कसोटी घ्यावी की त्यांच्यापैकी कोण सत्कर्म करणारा आहे.

**८.** आणि या धरतीवर जे काही आहे, आम्ही त्याला एक सपाट मैदान करून टाकणार आहोत.

**९.** काय तुम्ही आपल्या मते गुफा आणि शिलालेखवाल्यांना आमच्या निशाण्यांपैकी एखादी मोठी नवलपूर्ण निशाणी समजत आहात?

**१०.** त्या तरुणांनी जेव्हा गुफेत आश्रय घेतला तेव्हा दुआ-प्रार्थना केली की, हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला आपल्या जवळून दया- कृपा प्रदान कर आणि आमच्या कार्यात आमच्यासाठी मार्ग सोपा कर.

**११.** मग आम्ही त्यांच्या कानांवर अनेक वर्षांपर्यंत त्याच गुफेत पडदे टाकले.

**१२.** मग आम्ही त्यांना उठवून उभे केले की आम्ही हे जाणून घ्यावे की दोन्ही गटांपैकी या मोठ्या मुदतीला, जी त्यांनी पार पाडली, कोणी जास्त स्मरणात राखले?

**१३.** आम्ही त्यांची खरी कहाणी तुमच्यासमोर वर्णन करीत आहोत, या काही तरुणांनी[१] आपल्या पालनकर्त्यावर ईमान राखले आणि आम्ही त्यांच्या मार्गदर्शनात

---

(१) काही धर्मज्ञानी लोकांच्या मते हे तरुण ख्रिश्चन धर्माचे अनुयायी होते, काहींच्या मते त्याचा काळ येशू ख्रिस्तापूर्वीचा होता. हाफीज इब्ने कसीर यांनी याच कथनाला प्राधान्य दिले. असे म्हणतात की एक राजा होता, जो लोकांना मूर्तीपूजा करण्याची व त्यांच्या नावाने भोग प्रसाद चढविण्याची शिकवण देत असे. अल्लाहने या काही तरुणांच्या मनात हा विचार आणला की उपासनायोग्य केवळ अल्लाहच

प्रगती प्रदान केली.

**१४.** आणि आम्ही त्यांची मने मजबूत केली होती जेव्हा ते उठून उभे राहिले आणि म्हणू लागले की आमचा पालनकर्ता तोच आहे, जो आकाशांचा आणि धरतीचा पालनकर्ता आहे, हे असंभव आहे की आम्ही त्याच्याशिवाय दुसऱ्या उपास्याला पुकारावे जर असे केले तर आम्ही मोठी अनुचित गोष्ट बोललो.

**१५.** हा आहे आमचा जनसमूह, ज्याने अल्लाहखेरीज दुसरी उपास्ये बनवून ठेवली आहेत त्यांच्या वर्चस्वाचा एखादा स्पष्ट पुरावा का नाही सादर करत? अल्लाहशी खोट्या गोष्टीचा संबंध जोडणाऱ्यापेक्षा अधिक अत्याचारी कोण आहे?

**१६.** आणि ज्याअर्थी तुम्ही त्यांच्यापासून आणि अल्लाहखेरीज त्यांच्या इतर उपास्यांपासून वेगळे झाला आहात तर आता एखाद्या गुफेत जाऊन बसा, तुमचा पालनकर्ता (अल्लाह) तुमच्यावर आपली दया-कृपा करेल आणि तुमच्या कार्यात सहज सुलभता निर्माण करील.

**१७.** आणि तुम्ही पाहाल की सूर्योदय होताना सूर्य त्यांच्या गुफेच्या उजव्या बाजूला झुकतो आणि अस्तास जाताना त्यांच्या डाव्या बाजूला गुफेचा भाग सोडून मावळतो आणि ते त्या गुफेच्या प्रशस्त स्थानात आहेत. हे अल्लाहच्या निशाण्यांपैकी आहे, अल्लाह ज्याला मार्गदर्शन करील, तो सत्य मार्गावर आहे आणि ज्याला पथभ्रष्ट करील तर अशक्य आहे की तुम्हाला त्याचा कोणी मित्र आणि मार्ग दाखविणारा दिसून यावा.

**१८.** आणि तुम्ही विचार कराल की ते जागत आहेत वस्तुतः ते झोपत होते, आणि आम्ही स्वतः त्याची उजवी डावी कुशी बदलत राहिलो. त्यांचा कुत्रादेखील गुफेच्या तोंडाशी हात पसरलेल्या अवस्थेत होता. जर तुम्ही आत डोकावून पाहू इच्छिले असते तर नक्कीच उलट पावलांनी पळ काढला असता आणि त्यांच्या भय-दहशतीने तुम्ही

---

आहे, जो आकाश व धरतीचा निर्माणकर्ता आहे, साऱ्या जगाचा पालनहार आहे. 'फित्युतुन्' अनेक वचन आहे, तेव्हा त्यांची संख्या नऊपेक्षा कमी नव्हती, हे वेगळे होऊन एका ठिकाणी एकमेव अल्लाहची उपासना करत. हळूहळू लोकांमध्ये त्यांच्या एकेश्वरवादावरील विश्वासाची चर्चा होऊ लागली. हे राजालाही कळाले तेव्हा त्याने, त्यांना दरबारात बोलावून विचारले. त्यांनी निर्भयपणे एकेश्वरवादाविषयी सांगितले. शेवटी राजा आणि आपल्या जमातीच्या मूर्तीपूजकांच्या भयाने आपल्या धर्म व ईमानाच्या रक्षणार्थ, वस्तीपासून दूर एका पर्वताच्या गुफेत लपले. जिथे अल्लाहने त्यांना गाढनिद्रेत झोपविले आणि ते सतत तीनशे वर्षांपर्यंत झोपत राहिले.

भारुन गेले असते.

**१९.** आणि त्याच प्रकारे आम्ही त्यांना जागे करून उठविले की आपसात विचारपूस करावी. त्यांच्यापैकी एका बोलणाऱ्याने विचारले की तुम्ही (इथे) किती काळ राहातील त्यांनी उत्तर दिले, एक दिवस किंवा एका दिवसापेक्षाही कमी. म्हणू लागले, की तुमच्या वास्तव्याचे पूर्ण ज्ञान अल्लाहलाच आहे. आता तुम्ही आपल्यापैकी एखाद्यालाही चांदीची (नाणी) देऊन शहरात पाठवा. त्याने चांगल्याप्रकारे पाहून घ्यावे की शहरात कोणते भोजन स्वच्छ शुद्ध आहे, मग त्यातूनच तुमच्या भोजनासाठी आणावे आणि त्याने खूप सावधगिरी आणि नरमीने वागावे आणि कोणालाही तुमची खबर होऊ देऊ नये.

**२०.** जर हे (काफिर) तुमच्यावर वर्चस्व प्राप्त करून घेतील तर तुम्हाला दगडांनी मारून टाकतील किंवा पुन्हा तुम्हाला आपल्या धर्मात परत घेतील, तर मग तुम्ही कधीही सफल होऊ शकणार नाहीत.

**२१.** आणि आम्ही अशा प्रकारे लोकांना त्यांच्या अवस्थेशी अवगत केले की त्यांनी हे जाणून घ्यावे की अल्लाहचा वायदा पूर्णतः सच्चा आहे. आणि कयामत येण्याबाबत काहीच शंका नाही जेव्हा ते आपल्या बोलण्यात आपसात मतभेद करीत होते, म्हणू लागले की गुफेवर एक इमारत बनवून घ्या. त्यांचा पालनकर्ताच त्यांच्या अवस्थेला अधिक जाणणारा आहे, ज्या लोकांनी त्यांच्या बाबतीत वर्चस्व प्राप्त केले, ते म्हणू लागले की आम्ही तर यांच्याजवळ पास मस्जिद बनवू.

**२२.** काही लोक म्हणतील की गुफेत तीन जण होते आणि चौथा त्यांचा कुत्रा होता, काही म्हणतील की ते पाच होते, सहावा त्यांचा कुत्रा होता. अपरोक्ष (ग़ैब) विषयी (चिन्ह पाहिल्याविना) अनुमानाने दगड मारणे. काही म्हणतील की ते सात आहेत आठवा त्यांचा कुत्रा आहे. (तुम्ही) सांगा की माझा पालनकर्ता, त्यांची संख्या चांगल्या प्रकारे जाणणारा आहे. त्यांना फार थोडेच लोक जाणतात, मग तुम्हीही त्या लोकांविषयी केवळ संक्षिप्त बोलत जा, आणि त्यांच्यापैकी कोणाशी त्यांच्याविषयी विचारपूसही करू नका.

**२३.** आणि कधीही एखाद्या कामाबद्दल असे बोलू नका की मी हे काम उद्या करेन.

**२४.** परंतु त्यासोबतच 'इन्शा अल्लाह' (अल्लाहने इच्छिले तर) जरूर म्हणा आणि जेव्हा देखील विसर पडेल आपल्या पालनकर्त्या (अल्लाह) चे स्मरण करत जा आणि हे

म्हणत राहा की मला पूर्ण आशा आहे की माझा पालनकर्ता याहून जास्त मार्गदर्शनाच्या जवळच्या गोष्टीचे मार्गदर्शन करेल.

**२५.** आणि ते लोक आपल्या गुफेत तीनशे वर्षापर्यंत राहिले, आणि नऊ वर्षे त्यांनी अधिक काढली.

**२६.** तुम्ही सांगा, अल्लाहलाच त्यांच्या वास्तव्यकाळाचे चांगल्या प्रकारे ज्ञान आहे. आकाशांचे आणि धरतीचे परोक्ष ज्ञान केवळ त्यालाच आहे. तो किती चांगला पाहणारा ऐकणारा आहे! अल्लाहखेरीज कोणीही त्यांची मदत करणारा नाही आणि अल्लाह आपला आदेश लागू करण्यात कोणालाही सहभागी बनवित नाही.

**२७.** आणि तुमच्याकडे, तुमच्या पालनकर्त्यातर्फे जो ग्रंथ अवतरित केला गेला आहे, त्याचे पठण करीत राहा. त्याचे फर्मान कोणीही बदलू शकत नाही. तुम्हाला त्याच्याखेरीज कदापि एखादे आश्रयस्थान लाभणार नाही.

**२८.** आणि स्वतःला अशाच लोकांच्या सोबत राखत जा, जे आपल्या पालनकर्त्याला सकाळ संध्याकाळ पुकारतात आणि त्याच्याच मुखा (अनुग्रहा) ची अभिलाषा करतात. खबरदार! तुमची दृष्टी त्यांच्यावरून हटता कामा नये की ऐहिक जीवनाच्या शोभा-सजावटीच्या प्रयत्नात मग्न व्हावे (पाहा) त्याचे म्हणणे मान्य करू नका, ज्याच्या हृदयाला आम्ही आपल्या आठवणीपासून गाफील ठेवले आहे आणि जो इच्छा-आकांक्षांच्या मागे धावत आहे आणि ज्याच्या कर्माने मर्यादा पार केली आहे.

**२९.** आणि ऐलान करा की हे परिपूर्ण सत्य (कुरआन) तुमच्या पालनकर्त्यातर्फे आहे. आता ज्याची इच्छा होईल त्याने ईमान राखावे आणि ज्याची इच्छा होईल त्याने इन्कार करावा. अत्याचारी लोकांकरिता आम्ही ती आग तयार करून ठेवली आहे, जिच्या (आगीच्या) कनाती त्यांना घेरून टाकतील. जर ते गाऱ्हाणे मांडतील तर त्यांची मदत त्या पाण्याने केली जाईल, जे तेलाच्या गाळासारखे असेल, जे चेहरा भाजून टाकील मोठे वाईट पाणी आहे आणि मोठे वाईट विश्रांतीस्थान (जहन्नम) आहे.

**३०.** निःसंशय ज्या लोकांनी ईमान राखले आणि सत्कर्म करीत राहिले तर आम्ही एखाद्या सत्र्म करणाऱ्याचा मोबदला वाया जाऊ देत नाही.

**३१.** त्यांच्यासाठी नेहमी नेहमी असणारी जन्नत आहे. तिच्याखाली नद्या वाहत असतील. तिथे यांना सुवर्ण कांकण घातले जाईल. आणि हिरव्या रंगाचे तलम व जाड

रेशमाचे कपडे घालतील त्या ठिकाणी सिंहासनावर तक्के लावून बसतील. किती चांगला मोबदला आहे आणि किती चांगले आराम करण्याचे घर आहे.

**३२.** आणि त्यांना त्या दोन माणसांचे उदाहरणही ऐकवा ज्यांच्यापैकी एकाला आम्ही द्राक्षांच्या दोन बागा देऊन ठेवल्या होत्या, ज्यांना खजुरीच्या वृक्षांनी आम्ही घेरून ठेवले होते आणि दोघांच्या दरम्यान शेती निर्माण केली होती.

**३३.** दोन्ही बागांनी आपली फळे भरपूर दिलीत आणि त्या काहीच कमतरता केली नाही आणि आम्ही त्या बागांच्या दरम्यान प्रवाह जारी केला होता.

**३४.** आणि (अशा प्रकारे) त्याच्याजवळ फळे होती. एक दिवस बोलता बोलता तो आपल्या साथीदाराला म्हणाला की मी तुझ्यापेक्षा जास्त श्रीमंत आहे आणि जत्थ्यातही अधिक प्रतिष्ठीत आहे.

**३५.** आणि तो आपल्या बागेत गेला आणि आपल्या जीवावर जुलूम करणारा होता, म्हणाला, मला नाही वाटत ही बाग कधी बरबाद होऊ शकेल.

**३६.** आणि ना मी कयामतचे प्रस्थापित होण्यास मानतो आणि जर हे मानूनही घेतली की मी आपल्या पालनकर्त्याकडे परतविलो गेलो तर खात्रीने (ते परतीचे ठिकाण) मला याहून जास्त चांगले आढळेल.

**३७.** त्याचा साथीदार त्याच्याशी बोलताना म्हणाला, काय तू त्या (अल्लाह) ला नाही मानत, ज्याने तुला मातीपासून निर्माण केले, नंतर वीर्यापासून, मग तुला पूर्ण मानव (पुरुष) घडविले.

**३८.** परंतु मी (तर पूर्ण श्रद्धा राखतो की) तोच अल्लाह माझा स्वामी व पालनकर्ता आहे, मी आपल्या पालनकर्त्यासोबत कोणालाही सहभागी ठरविणार नाही.

**३९.** आणि तू आपल्या बागेत जाण्याच्या वेळी असे का नाही म्हणाला की अल्लाहने जे इच्छिले ते होईल. कोणतेही शक्ती-सामर्थ्य नाही परंतु अल्लाहच्या मदतीने, जरी तू मला धन आणि संततीत कमतरता असलेला पाहात आहेस.

**४०.** परंतु फार शक्य आहे की माझा पालनकर्ता मला तुझ्या या बागेपेक्षा उत्तम प्रदान करील आणि या (तुझ्या बागे) वर आसमानी संकट पाठविल तर ही सपाट आणि निसटणारे मैदान बनेल.

**४१.** किंवाच हिचे पाणी खाली उतरले आणि तुझ्या आवाक्यात न राहावे की तू ते शोधून आणावे.

**४२.** आणि त्याची (सर्व) फळे घेरली गेलीत मग तो आपल्या या खर्चाबद्दल, जो त्याने बागेवर केला होता, आपले हात मळू लागला, आणि ती बाग छप्परासमेत तोंडघशी पडली होती आणि (तो मनुष्य) म्हणत होता की अरेरे! मी आपल्या पालनकर्त्यासोबत दुसऱ्या कुणाला भागीदार बनविले नसते.

**४३.** त्याच्या हक्कात कोणताही समूह उठून उभा राहिला नाही की अल्लाहपासून त्याचा काही बचाव करू शकला असता आणि ना तो स्वतःही सूड घेणारा बनू शकला.

**४४.** इथूनच (सिद्ध होते) की समस्त अधिकार त्याच अल्लाहकरिता आहेत. तो मोबदला प्रदान करण्याच्या व परिणामाच्या दृष्टीने अतिशय उत्तम आहे.

**४५.** आणि त्यांना या जगाच्या जीवनाचे उदाहरणही सांगा, जणू पाणी जे आम्ही आकाशातून अवतरित करतो त्याद्वआरे जमिनीची पैदावार मिळतीजुळती असते, मग शेवटी ती चूरेचूर होते, जिला वारे उडवित नेत फिरतात आणि अल्लाह प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्य बाळगतो.

**४६.** धन-संपत्ती आणि संतती तर या जगाच्या जीवनाची शोभा आहे परंतु सदैव टिकून राहणारे सत्कर्म (नेकी) तुमच्या पालनकर्त्याजवळ मोबदल्याच्या दृष्टीने आणि (भविष्याच्या) चांगल्या आशेसाठी फार उत्तम आहे.

**४७.** आणि ज्या दिवशी आम्ही पर्वतांना चालवू आणि जमिनीला तुम्ही आवरण नसलेल्या स्थितीत पाहाल, आणि समस्त लोकांना आम्ही एकत्र करू तेव्हा त्यांच्यापैकी कोणालाही बाकी सोडणार नाही.

**४८.** आणि सर्वच्या सर्व तुमच्या पालनकर्त्यासमोर रांगारांगांनी हजर केले जातील. निःसंशय तुम्ही आमच्यासमोर त्याच प्रकारे आले, ज्या प्रकारे आम्ही तुम्हाला पहिल्या खेपेस निर्माण केले होते. परंतु तुम्ही मात्र आशा भ्रमात राहिले की आम्ही कधी तुमच्यासाठी एखादा वायद्याचा दिवस निश्चित करणार नाही.

**४९.** आणि कर्म-लेख समोर ठेवले जातील, मग तुम्ही पाहाल की अपराधी त्यांच्या कर्मलेखापासून भयभीत होतील आणि म्हणतही असतील की अरेरे! आमचा विनाश! हा

कसा लेख आहे, ज्याने कोणताही लहान-मोठा (गुन्हा) घेरल्याविना सोडले नाही, आणि त्यांनी जे कर्म केले होते, ते सर्व काही त्यांना दिसून येईल आणि तुमचा पालनकर्ता कोणावरही अत्याचार व अन्याय करणार नाही.

**५०.** आणि जेव्हा आम्ही फरिश्त्यांना आदेश दिला की आदमच्या पुढे सजदा करा, तेव्हा इब्लिस (सैताना) खेरीज सर्वांनी सजदा केला तो जिन्नांपैकी होता. त्याने आपल्या पालनकर्त्याच्या आदेशाची अवज्ञा केली. काय तरीही तुम्ही त्याला आणि त्याच्या संततीला, मला सोडून आपला मित्र बनवित आहात? वास्तविक तो तुम्हा सर्वांचा शत्रू आहे. अशा जुलमी लोकांचा किती वाईट मोबदला आहे.

**५१.** मी त्यांना आकाशांच्या आणि जमिनीच्या निर्मितीप्रसंगी हजर ठेवले नव्हते आणि ना स्वतः त्याच्या निर्मितीत आणि मी मार्गभ्रष्ट करणाऱ्यांना आपला सहाय्यक बनविणाराही नाही.

**५२.** आणि ज्या दिवशी तो म्हणेल की तुमच्या मते माझे जे साथीदार होते त्यांना हाक मारा, हे हाक मारतील, परंतु त्यांच्यापैकी कोणीही उत्तर देणार नाही आणि आम्ही त्यांच्या दरम्यान विनाशाचे साधन निर्माण करू.

**५३.** आणि अपराधी लोक जहन्नमला पाहून समजून घेतील की ते यातच जाणार आहेत, परंतु तिच्यापासून बचावाचे स्थान त्यांना कोठेही आढळणार नाही.

**५४.** आणि आम्ही या कुरआनात प्रत्येक प्रकारची सर्व उदाहरणे लोकांसाठी सांगितली आहेत, परंतु समस्त वस्तूंपेक्षा जास्त भांडखोर मनुष्य आहे.

**५५.** आणि लोकांजवळ मार्गदर्शन येऊन पोहोचल्यानंतर, त्यांना ईमान राखण्यापासून आणि आपल्या पालनकर्त्याजवळ क्षमा-याचना करण्यापासून केवळ याच गोष्टीने रोखले की पूर्वी होऊन गेलेल्या लोकांसारखा व्यवहार त्यांच्याशीही केला जावा किंवा त्यांच्यासमोर शिक्षा –यातना (अज़ाब) उघड स्वरूपात यावी.

**५६.** आणि आम्ही तर आपल्या पैगंबरांना केवळ अशासाठी पाठवितो की त्यांनी शुभ-समाचार द्यावा आणि लोकांना सचेत करावे. इन्कारी लोक असत्याला पुरावा बनवून विवाद घालू इच्छितात की याद्वारे सत्य डळमळीत करावे. ते माझ्या आयतींची आणि ज्या गोष्टीचे भय दाखविले जावे तिची थट्टा उडवितात.

**५७.** आणि त्याहून अधिक अत्याचारी कोण आहे, ज्याला त्याच्या पालनकर्त्याच्या आयतींद्वारे उपदेश केला जावा तरीही त्याने तोंड फिरवून राहावे आणि जे काही त्याच्या हातांनी पुढे पाठविले आहे, ते विसरून जावे. निःसंशय, आम्ही त्यांच्या ह्रदयांवर ते समजण्यापासून पडदे टाकून ठेवले आहेत, आणि त्यांच्या कानात बधीरता. तुम्ही त्यांना मार्गदर्शनाकडे कितीही बोलवा, परंतु मार्गदर्शन त्यांना कधीही लाभणार नाही.

**५८.** आणि तुमचा पालनकर्ता मोठा माफ करणारा आणि दया करणारा आहे. तो जर त्यांना त्यांच्या कर्मांची शिक्षा देण्यासाठी धरू इच्छिल तर निश्चितच त्यांना त्वरित शिक्षा देईल, परंतु त्यांच्यासाठी एक वायद्याची वेळ निर्धारीत आहे, ज्यापासून पळ काढण्याचे स्थान त्यांना कधीही लाभणार नाही.

**५९.** आणि या त्या वस्त्या आहेत, ज्यांना आम्ही त्यांच्या अत्याचारापायी नष्ट करून टाकले आणि त्यांच्या विनाशाची एक वेळ आम्ही निश्चित करून ठेवली होती.

**६०.** आणि जेव्हा मूसा आपल्या तरुणाला म्हणाले की मी तर चालतच राहीन येथेपर्यंत की दोन नद्यांच्या संगमाच्या ठिकाणी पोहोचेन, मग त्यासाठी मला वर्षानुवर्षे का चालावे लागेना.

**६१.** जेव्हा ते दोघे त्या ठिकाणी पोहोचले, जे दोन नद्यांचे संगमस्थान होते, तिथे आपली मासळी विसरले, जिने नदीत भुयारासारखा आपला मार्ग बनवून घेतला.

**६२.** जेव्हा ते दोघे तिथून निघून पुढे गेले तेव्हा मूसा आपल्या तरुणाला म्हणाले, आणा आमचा नाश्ता द्या. आम्हाला तर या प्रवासात खूपच त्रास घ्यावा लागला.

**६३.** (त्याने) उत्तर दिले की, काय तुम्ही पाहिले नाही ? जेव्हा आम्ही दगडाला टेका लावून आराम करीत होतो, तिथेच मी ती मासळी विसरलो, वस्तुतः सैतानाने मला विसर पाडला की तुमच्याजवळ या गोष्टीची चर्चा करावी. त्या मासळीने मोठ्या चमत्कारिकरित्या नदीत आपला मार्ग बनवून घेतला.

**६४.** (मूसा) म्हणाले, हेच ते ठिकाण होते, ज्याच्या शोधात आम्ही होतो तेव्हा ते तिथूनच आपल्या पद-चिन्हांना शोधत परत फिरले.

**६५.** मग त्यांना आमच्या दासांपैकी एक दास भेटला, ज्याला आम्ही आपल्या जवळून विशेष दया-कृपा प्रदान केली होती आणि त्याला आपल्या जवळून खास ज्ञानही

शिकविले होते.

**६६.** मूसा त्याला म्हणाले, आपण मला आज्ञा पाळेल की आपण मला ते सत्य ज्ञान शिकवावे, जे आपणास शिकविले गेले आहे.

**६७.** तो म्हणाला, तुम्ही माझ्यासोबत धीर-संयम राखू शकत नाही.

**६८.** आणि ज्या गोष्टीला तुम्ही आपल्या ज्ञानकक्षेत घेतले नसेल त्यावर धीर-संयम कसे राखू शकता?

**६९.** मूसाने उत्तर दिले की अल्लाहने इच्छिल्यास मी तुम्हाला धीर-संयम राखणाऱ्यांपैकी आढळून येईल आणि कोणत्याही बाबतीत तुमची अवज्ञा करणार नाही.

**७०.** (तो) म्हणाला, जर तुम्ही माझ्यासोबतच चालण्याचा आग्रह धरता तर लक्षात ठेवा की कोणत्याही गोष्टीबाबत मला काही विचारु नका जोपर्यंत मी स्वतः त्याबाबत न सांगावे.

**७१.** मग ते दोघे तेथून निघाले, येथेपर्यंत की एका नौकेत बसले (खिज्रने) नौकेच्या फळ्या तोडल्या. (मूसा) म्हणाले, काय तुम्ही नौका तोडत आहात की नौकेत बसलेल्यांना बुडवून टाकावे? तुम्ही तर हे मोठे अनुचित काम केले.

**७२.** (ख्रिजने) उत्तर दिले की मी आधीच तुम्हाला बोललो होतो की तुम्ही माझ्यासोबत राहून धीर-संयम राखू शकणार नाही.

**७३.** (मूसा) म्हणाले की माझ्या या चुकीबद्दल मला धरू नका आणि माझ्या बाबतीत सक्तीने वागू नका.

**७४.** मग दोघे निघाले, येथेपर्यंत की त्यांना एक बालक दिसले, (खिज्रने) त्या बालकाला मारून टाकले. (मूसा) म्हणाले की, तुम्ही तर एका निरपराधाचा जीव घेतला. वास्तविक त्याने कोणाची हत्या केली नव्हती. निःसंशय, तुम्ही हे मोठे वाईट कृत्य केले.

**७५.** ते म्हणाले, काय मी तुम्हाला सांगितले नव्हते की तुम्ही माझ्यासोबत राहून कधीही धीर-संयम राखू शकत नाही.

**७६.** (मूसा यांनी) उत्तर दिले, आता जर यानंतर मी तुम्हाला एखाद्या गोष्टीबाबत काही विचारले तर बेलाशक तुम्ही मला आपल्यासोबत ठेवू नका, निःसंशय, माझ्यातर्फे तुम्ही सबबीस पोहचला आहात.

**७७.** पुन्हा दोघे निघाले, एका गावाच्या लोकांपर्यंत पोहोचले आणि त्यांच्याजवळ जेवण मागितले. त्यांनी त्यांचा पाहुणचार करण्यास नकार दिला. दोघांना त्या ठिकाणी एक भिंत आढळली, जी कोसळण्याच्या बेतात होती, त्याने तिला सरळ केले (मूसा) म्हणाले, जर तुम्ही इच्छिले असते तर या (कामा) बद्दल मजुरी घेतली असती.

**७८.** तो म्हणाला, आता मात्र माझ्या आणि तुझ्या दरम्यान वेगळे होण्याची वेळ आली आहे, तेव्हा मी तुला त्या गोष्टींची हकीकत सांगतो, ज्यावर तुम्ही धीर-संयम राखू शकले नाही.

**७९.** ती नौका काही काही गरीब लोकांची होती, जे नदीत काम करीत असत. मी तिच्यात काही तोडफोड करण्याचे ठरविले कारण पुढच्या इलाक्यात एक राजा होता, जो प्रत्येक चांगली नौका जबरदस्तीने (आपल्या ताब्यात) घेत असे.

**८०.** आणि त्या तरुणाचे आई-बाप ईमान राखणारे होते. आम्हाला ही भीती वाटली की कदाचित हा त्यांना आपल्या बंडखोरी आणि अधार्मिकतेने लाचार व व्याकूळ न करून टाको.

**८१.** म्हणून आम्ही इच्छिले की त्यांना त्यांचा पालनकर्ता (अल्लाह) त्याच्याऐवजी त्याहून उत्तम पवित्र आणि त्याच्यापेक्षा अधिक प्रिय आणि आवडता पुत्र प्रदान करो.

**८२.** आणि भिंतीचा किस्सा असा की त्या शहरात दोन अनाथ मुले आहेत, ज्यांचा खजिना (धन) त्यांच्या त्या भिंतीखाली गाडलेला आहे. त्यांचे पिता मोठे नेक सदाचारी होते. तेव्हा तुमचा पालनकर्ता इच्छित होता की या दोन्ही अनाथ मुलांनी आपल्या तरुण वयास पोहोचून आपला हा खजिना, तुमच्या पालनकर्त्याच्या दया-कृपेने आणि मेहरबानीने काढून घ्यावा. मी स्वतःच्या इराद्याने (आणि इच्छेने) कोणतेही काम केले नाही. ही हकीकत होती त्या घटनांची ज्यांच्याबाबत तुम्ही धीर-संयम राखू शकले

नाहीत.

**८३.** आणि तुम्हाला जुल्करनैनच्या घटनेविषयी हे लोक विचारतात, (तुम्ही) सांगा की मी त्यांचा थोडासा वृत्तांत तुम्हाला वाचून ऐकवितो.

**८४.** आम्ही धरतीवर त्याला शक्ती-सामर्थ्य प्रदान केले होते, आणि त्याला प्रत्येक गोष्टीची साधनेही प्रदान केली होती.

**८५.** तो एका मार्गामागे लागला.

**८६.** येथेपर्यंत की सूर्यास्ताच्या ठिकाणापर्यंत पोहोचला आणि त्याला (सूर्याला) एका दलदलीच्या प्रवाहात बुडताना पाहिले आणि त्या प्रवाहाच्या ठिकाणावर एक जनसमूहही आढळला. आम्ही सांगितले, हे जुल्करनैन! तू त्यांना शिक्षा दे किंवा त्यांच्या बाबतीत एखादा चांगला मार्ग काढ.

**८७.** तो म्हणाला, जो अत्याचार करेल, त्याला तर आम्हीही आता शिक्षा देऊ. मग तो आपल्या पालनकर्त्याकडे परतविला जाईल आणि तो त्याला सक्त सजा-यातना देईल.

**८८.** परंतु जो ईमान राखेल आणि सत्कर्म करेल तर त्याच्याकरिता मोबदल्यात भलाई आहे आणि त्याला आपल्या कामातही सोपेपणाचा आदेश देऊ.

**८९.** मग तो दुसऱ्या एका मार्गास लागला.

**९०.** येथेपर्यंत की जेव्हा तो सूर्योदयाच्या ठिकाणापर्यंत पोहोचला तेव्हा सूर्याला एका अशा जनसमूहावर उगवताना पाहिले की त्यांच्याकरिता आम्ही त्यापासून कोणताही आडपडदा राखला नाही.

**९१.** घटना अशीच आहे, आम्ही त्याच्या जवळपासच्या समस्त खबरी घेरून ठेवल्या आहेत.[१]

**९२.** मग तो दुसऱ्या एका मार्गाकडे निघाला.

---

(१) अर्थात जुल्करनैनविषयी आम्ही जे सांगितले आहे ते अशाच प्रकारे आहे की प्रथम तो पश्चिमेच्या अंतिम सीमेपर्यंत, मग पूर्वेच्या अंतिम सीमेपर्यंत पोहोचले आणि आम्हाला त्याच्या सर्व प्रकारची पात्रता, साधन-सामुग्री आणि इतर गोष्टींचे पूर्ण ज्ञान आहे.

**९३.** येथेपर्यंत की जेव्हा दोन भिंतींच्या दरम्यान पोहोचला, त्या दोघींच्या पलीकडे अशी जमात आढळली, जी गोष्ट समजून घेण्याच्या जवळही नव्हती.

**९४.** (त्यांनी) सांगितले हे जुल्करनैन! याजूज आणि माजूज या देशात मोठा उपद्रव व उत्पात पसरवित आहे. तर काय आम्ही तुमच्याकरिता काही धन जमा करून द्यावे (या अटीवर की) तुम्ही आमच्या आणि त्यांच्या दरम्यान एखादी भिंत बनवावी.

**९५.** त्याने उत्तर दिले की माझ्याजवळ, माझ्या पालनकर्त्याने जे प्रदान केले आहे, तेच उत्तम आहे. तुम्ही फक्त आपली शक्ती आणि सामर्थ्याने माझी मदत करा. तुमच्या आणि त्यांच्या दरम्यान मी भक्कम भिंत बनवून देतो.

**९६.** मला लोखंडाची चादर आणून द्या, येथेपर्यंत की जेव्हा त्या दोन पर्वतांच्या दरम्यान भिंत उभारून दिली तेव्हा आदेश दिला की फूंक मारा (अर्थात प्रखर आग प्रज्वलित करा) त्या वेळेपर्यंत की लोखंडाच्या या चादरींना अगदी आग करून टाकले, तेव्हा सांगितले, माझ्याजवळ आणा, याच्यावर वितळलेले तांबे टाकतो.

**९७.** मग ना तर त्यांच्यात त्या भिंतीवर चढण्यचाची शक्ती होती आणि ना तिच्यात एखादे छिद्र करू शकत होते.

**९८.** सांगितले की ही केवळ माझ्या पालनकर्त्याची दया-कृपा आहे, परंतु जेव्हा माझ्या पालनकर्त्याचा वायदा (आदेश) येईल तेव्हा त्याचे तुकडे तुकडे करून टाकेल. निःसंशय, माझ्या पालनकर्त्याचा वायदा सच्चा आहे.

**९९.** आणि त्या दिवशी आम्ही त्यांना आपसात एकमेकांशी मिसळत असताना सोडून देऊ आणि सूर (शंख) फूंकला जाईल, मग सर्वांना आम्ही एकाच वेळी जमा करू.

**१००.** आणि त्या दिवशी आम्ही जहन्नमला (देखील) काफिरांच्या समोर आणून उभी करू.

**१०१.** ज्यांचे डोळे माझ्या स्मरणापासून पडद्यात होते आणि (सत्य) ऐकूही शकत नव्हते.

**१०२.** काय काफिर हा विचार करून बसले आहेत की माझ्याशिवाय ते माझ्या दासांना आपला समर्थक बनवून घेतील? (ऐका) आम्ही तर त्या काफिरांच्या पाहुणचारासाठी

जहन्नम तयार करून ठेवली आहे.

**१०३.** सांगा की (तुम्ही सांगत असाल) तर मी सांगतो की आपल्या कर्मांमुळे सर्वांत जास्त नुकसान उचलणारा कोण आहे?

**१०४.** ते लोक आहेत, ज्यांचे ऐहिक जीवनाचे सर्व प्रयत्न व्यर्थ ठरले, आणि ते याच भ्रमात राहिले की ते फार चांगले काम करीत आहेत.

**१०५.** हेच ते लोक होते, ज्यांनी आपल्या पालनकर्त्या (अल्लाह) च्या आयतींशी आणि त्याच्याशी भेट होण्याचा इन्कार केला, यास्तव त्यांची सर्व कर्मे वाया गेलीत. मग कयामतच्या दिवशी आम्ही त्यांचा कसलाही भार निश्चित करणार नाही.

**१०६.** वस्तुतः त्यांचा मोबदला जहन्नम आहे, कारण त्यांनी इन्कार केला आणि माझ्या आयतींची आणि माझ्या पैगंबरांची थट्टा उडविली.

**१०७.** ज्या लोकांनी ईमान राखले आणि सत्कर्म करीत राहिले, निश्चितच त्यांच्यासाठी फिर्दोस[१] (जन्नतमधील सर्वोच्च स्थान) च्या बागांमध्ये स्वागत आहे.

**१०८.** जिथे ते नेहमी राहतील, जे स्थान बदलण्याचा कधीही त्यांचा इरादा होणार नाही.

**१०९.** सांगा की जर माझ्या पालनकर्त्याच्या गोष्टी (प्रशंसा व गुणगान) लिहिण्याकरिता समुद्र शाई बनला तर तोही माझ्या पालनकर्त्याच्या गोष्टी संपण्यापूर्वीच संपून जाईल, मग वाटल्यास आम्ही त्यासारखाच दुसरा (समुद्र) त्याच्या मदतीकरिता घेऊन यावे.

**११०.** तुम्ही सांगा की मी तर तुमच्यासारखाच एक मनुष्य आहे (होय)माझ्याकडे वह्यी(प्रकाशना)केली जाते की सर्वांचा उपास्य केवळ एकच उपास्य आहे, तर ज्याला देखील आपल्या पालनकर्त्याशी भेटण्याची आशा असेल, त्याने सत्कर्म करीत राहिले

---

(१) 'जन्नतुल फिरदौस' जन्नतचा सर्वोच्च दर्जा आहे. यास्तव पैगंबर (स.) यांनी फर्माविले की जेव्हा देखील तुम्ही अल्लाहजवळ जन्नतची याचना कराल, तेव्हा अल फिर्दोसची याचना करा, कारण ते जन्नतचे सर्वोच्च स्थान आहे आणि तिथूनच जन्नतच्या नद्यांचा उगम आहे. (सहीह बुखारी, किताबुत्तौहिद, बाबुल व कान अर्शुहु अलल माए)

पाहिजे, आणि आपल्या पालनकर्त्याच्या भक्ती-उपासनेत[1] दुसऱ्या कोणालाही सहभागी करू नये.

---

## सूरह मरियम - १९

सूरह मरियम मक्का येथे अवतरली आमि यात अठ्ठ्याण्णव आयती आणि सहा रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहरबान, अतिशय दयावान आहे.

**१.** काफ. हा. या. ऐन. श्वाद.

**२.** हा उल्लेख आहे तुमच्या पालनकर्त्याच्या त्या कृपेचा, जी त्याने आपले दास जकरियावर केली होती.

**३.** जेव्हा त्यांनी आपल्या पालनकर्त्याजवळ गुपचुप रित्या प्रार्थना केली

**४.** म्हणाले हे माझ्या पालनकर्त्या माझी हाडे कमकुवत झाली आहेत आणि डोके म्हातारपणामुळे भडकले आहे, परंतु मी कधीही तुझ्याजवळ दुआ (प्रार्थना) करून वंचित राहिलो नाही.

**५.** आणि मला आपल्या (मृत्यु) नंतर, आपल्या जवळच्या नातेवाईकांचे भय आहे. माझी पत्नी देखील वांझ आहे, पण तरीही तू मला आपल्यातर्फे वारस प्रदान कर.

**६.** जो माझाही वारस असेल आणि याकूबच्या वंशाचाही वारस, आणि हे माझ्या पालनकर्त्या! तू त्याला आपला आवडता दास बनव.

**७.** हे जकरिया! आम्ही तुम्हाला एका पुत्रा (च्या प्राप्ती) ची खूशखबर देतो, ज्याचे

---

(१) सत्कर्म ते होय, जे पैगंबरांच्या आचरणशैलीनुसार असावे, अर्थात जो कोणी आपल्या पालनकर्त्या(अल्लाह) च्या भेटीचा पुरेपूर विश्वास बाळगत असेल त्याने प्रत्येक कर्म पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्या आचरणशैलीनुसार करावे, आणि दुसरे असे की अल्लाहच्या उपासनेत दुसऱ्या कोणालाही सहभागी ठरवू नये, यासाठी की धर्मात नवीन गोष्टी सामील करणे आणि मूर्तीपूजा करणे या दोन्ही गोष्टी कर्म वाया जाण्यास कारक ठरतात. सर्वश्रेष्ठ अल्लाह, या दोन्ही गोष्टींपासून प्रत्येक मुसलमानाचे रक्षण करो.

नाव यहया आहे. आम्ही त्यांच्यापूर्वी या नावासारखे नाव कोणालाही दिले नाही.

**८.** (जकरिया) म्हणाले, हे माझ्या पालनकर्त्या! मला पुत्र कसा बरे होईल, माझी पत्नी वांझ आणि मी स्वतः म्हातारपणाच्या अतिशय कमकुवत अवस्थेस पोहोचलो आहे.

**९.** आदेश झाला की (वायदा) अशाच प्रकारे पूर्ण झाला. तुमच्या पालनकर्त्याने फर्माविले आहे की माझ्याकरिता तर हे अगदी सोपे आहे आणि तुम्ही स्वतः जेव्हा काहीच नव्हता, मी तुम्हाला निर्माण केले आहे.

**१०.** (जकरिया) म्हणाले, हे माझ्या पालनकर्त्या! माझ्यासाठी एखादी निशाणी निर्धारीत कर, आदेश दिला की तुमच्यासाठी निशाणी ही की प्रकृती धडधाकट असतानाही तुम्ही तीन रात्री पर्यंत कोणत्याही माणसाशी बोलू शकणार नाहीत.

**११.** आता जकरिया आपल्या खोली (हुजऱ्या) च्या बाहेर येऊन आपल्या जनसमूहाजवळ येऊन त्यांना इशारा करतात की तुम्ही सकाळ-संध्याकाळ अल्लाहची पवित्रता वर्णन करा.

**१२.** हे यहया! (माझ्या) ग्रंथावर आपली पकड मजबूत राखा आणि आम्ही यहयाला बालपणापासूनच ज्ञान प्रदान केले.

**१३.** आणि आपल्याकडून दया-कृपा आणि पवित्रता देखील, तो अल्लाहचे भय राखून वागणारा मनुष्य होता.

**१४.** आणि आपल्या माता-पित्याशी नेक-सदाचारी होता, तो कठोर आणि गुन्हेगार नव्हता.

**१५.** त्याच्यावर सलामती आहे, ज्या दिवशी त्याने जन्म घेतला आणि ज्या दिवशी तो मरण पावेल, आणि ज्या दिवशी तो जिवंत करून उठविला जाईल.

**१६.** या ग्रंथात मरियमच्या वृत्तांताचाही उल्लेख करा, जेव्हा त्यांनी आपल्या कुटुंबाच्या लोकांपासून वेगळे होऊन पूर्वेकडे एकांतवास पत्करला.

**१७.** आणि त्या लोकांपासून आड-पडदा केला, मग आम्ही तिच्याजवळ आपला आत्मा (जिब्रील अले.) पाठविला, तर तो तिच्यासमोर संपूर्ण मानव रूपात प्रकट झाला.

**१८.** ती म्हणाली, मी तुझ्यापासून रहमान (दयावान अल्लाह) चे शरण मागते, जर तू

थोडासाही अल्लाहचे भय राखणारा आहेस.

**१९.** तो म्हणाला, मी अल्लाहतर्फे पाठविला गेलेला रसूल (प्रेषित) आहे, तुला एक पवित्र पुत्र देण्यासाठी आलो आहे.

**२०.** ती म्हणाली, मला पुत्र कसा बरे होऊ शकतो? मला तर एखाद्या पुरुषाचा हात देखील लागला नाही, आणि ना मी दुराचारी आहे.

**२१.** तो म्हणाला, फर्मान तर हेच आहे. (परंतु) तुमच्या पालनकर्त्याचा आदेश आहे की ते माझ्यासाठी फारच सोपे आहे. आम्ही तर त्याला लोकांसाठी एक निशाणी[1] बनवू आणि आपली खास दया ही तर एक निश्चित अशी गोष्ट आहे.

**२२.** मग ती गर्भवती झाली आणि याच कारणास्तव ती एकाग्रचित्त होऊन एका दूरच्या ठिकाणी निघून गेली.

**२३.** मग प्रसव-पीडा तिला एका खजूरीच्या झाडाखाली घेऊन आली आणि तिच्या तोंडून निघाले, अरेरे! मी यापूर्वी मेली असती आणि लोकांना माझा अगदी विसर पडला असता.

**२४.** तेवढ्यात तिला उताराकडून हाक ऐकू आली की, निराश होऊ नकोस, तुझ्या पालनकर्त्याने तुझ्या पायाखाली एक झरा प्रवाहीत केला आहे.

**२५.** आणि त्या खजुरीच्या झाडाच्या फांदीला आपल्याकडे हलव. ती तुझ्यासमोर ताज्या पिकलेल्या खजुरी पाडील.

**२६.** आता निर्धास्त होऊन खा आणि पी आणि डोळे थंड राख, जर तुला एखादा मनुष्य दिसला तर सांग की मी दयावान अल्लाहच्या नावाने रोजा (उपवास) ठेवला आहे. आज मी कोणत्याही माणसाशी बोलणार नाही.

**२७.** आता (हजरत ईसा) यांना घेऊन ती आपल्या लोकांमध्ये आली. सर्वजण म्हणाले, मरियम, तू मोठे वाईट कृत्य केलेस.

---

(१) अर्थात मला साधनांची गरज नाही. माझ्यासाठी हे अगदी सोपे आहे आणि आम्ही त्याला आपल्या सामर्थ्याचे एक चिन्ह बनवू इच्छितो यापूर्वी आम्ही तुमचे आद्यपिता आदमला, स्त्री-पुरुषाविना निर्माण केले. माता हव्वाला स्त्रीविना केवळ पुरुषापासून, आता ईसाला जन्मास घालून आपल्या सामर्थ्यास जाहीर करू इच्छितो.

**२८.** हे हारुनच्या बहिणी! ना तर तुझा पिता वाईट माणूस होता, आणि ना तुझी आई दुराचारी होती.

**२९.** (मरियमने) आपल्या बाळाकडे इशारा केला, सर्व म्हणू लागले, आता कुशीत असलेल्या बाळाशी आम्ही बोलणार तरी कसे.

**३०.** (बाळ) उद्‌गारले, मी सर्वश्रेष्ठ अल्लाहचा दास आहे. त्याने मला ग्रंथ प्रदान केला आहे आणि मला आपला पैगंबर (दूत) बनविले आहे.

**३१.** आणि त्याने मला शुभ मंगलदायी बनविले आहे, जिथे देखील मी राहीन आणि जोपर्यंत मी जिवंत राहीन तोपर्यंत त्याने मला नमाज आणि जकातचा आदेश दिला आहे.

**३२.** आणि त्याने मला आपल्या मातेचा सेवक बनविले आहे आणि मला कठोर आणि दुर्दैवी केले नाही.

**३३.** आणि माझ्यावर माझ्या जन्माच्या दिवशी आणि माझ्या मृत्युच्या दिवशी आणि ज्या दिवशी मी दुसऱ्यांदा उभा केला जाईन, माझ्यावर शांती-सलामती आहे.

**३४.** ही आहे सच्ची कहाणी मरियमचा पुत्र ईसाची. हीच ती सत्य गोष्टहोय, ज्याबाबत लोक संशयात पडले आहेत.

**३५.** अल्लाहकरिता संतती असणे उचित नाही तो तर अतिशय पवित्र आहे तो जेव्हा एखाद्या कामाचा संकल्प करतो तेव्हा त्यासाठी म्हणतो होऊन जा आणि त्या क्षणी ते घडून येते.

**३६.** आणि माझा आणि तुम्हा सर्वांचा पालनकर्ता अल्लाहच आहे. तेव्हा तुम्ही सर्व त्याचीच उपासना करा, हाच सरळ मार्ग आहे.

**३७.** मग (हे) गट आपसात मतभेद करू लागले. तथापि काफिरांसाठी दुःख आहे एका भयंकर दिवसाच्या येण्याने.

**३८.** किती चांगले पाहणारे ऐकणारे असतील त्या दिवशी, जेव्हा आमच्यासमोर हजर होतील, परंतु आज तर हे अत्याचारी लोक उघड अशा मार्गभ्रष्टतेत पडले आहेत.

**३९.** आणि तुम्ही त्यांना या दुःख आणि निराशेच्या दिवसाचे भय ऐकवा जेव्हा कार्य पूर्णत्वास पोहचविले जाईल आणि हे लोक गफलतीत आणि बेईमानीतच पडून राहतील.

**४०.** निःसंशय, धरतीचे आणि धरतीवर राहणाऱ्यांचे वारस आम्हीच असणार आणि समस्त लोक आमच्याचकडे परतवून आणले जातील.

**४१.** या ग्रंथात इब्राहीम (च्या वृत्तांता) चा उल्लेख करा. निःसंशय ते मोठे सच्चे पैगंबर (ईशदूत) होते.

**४२.** जेव्हा ते आपल्या पित्यास म्हणाले, हे पिता! तुम्ही अशांची उपासना का करीत आहात जे ना ऐकू शकतील, ना पाहू शकतील आणि ना तुम्हाला कसलाही लाभ पोहचवू शकतील.

**४३.** हे (माझ्या प्रिय) पिता! (तुम्ही पाहा) माझ्याजवळ ते ज्ञान आले आहे जे तुमच्याजवळ आलेच नाही, तेव्हा तुम्ही माझेच म्हणणे मान्य करा मी अगदी सरळ मार्गाकडे तुमचे मार्गदर्शन करीन.

**४४.** हे माझ्या पित्या! तुम्ही सैतानाची उपासना करण्यापासून थांबा सैतान तर दयाळू आणि कृपाळू अल्लाहची खूप अवज्ञा करणारा आहे.

**४५.** हे पिता! मला भय वाटते की कदाचित तुमच्यावर अल्लाहची एखादी शिक्षा यातना न येऊन कोसळावी की (ज्यामुळे) तुम्ही सैतानाचे मित्र बनावे.

**४६.** (पित्याने) उत्तर दिले, हे इब्राहीम! काय तू आमच्या उपास्यांपासून तोंड फिरवित आहेस? (ऐक) जर तू असे करणे थांबविले नाही तर मी तुला दगडांनी (ठेचून) मारुन टाकीन, जा एका दीर्घ मुदतापर्यंत माझ्यापासून वेगळाच राहा.

**४७.** (इब्राहीम) म्हणाले, ठीक आहे. सलाम असो तुमच्यावर मी तर आपल्या पालनकर्त्याजवळ तुमच्यासाठी माफीची दुआ (प्रार्थना) करीत राहीन. तो माझ्यावर अतिशय जास्त मेहरबानी करीत आहे.

**४८.** आणि मी तर तुम्हालाही आणि ज्यांना ज्यांना तुम्ही अल्लाहशिवाय पुकारता त्यांना (सर्वांना) ही सोडत आहे. मी फक्त आपल्या पालनकर्त्याला पुकारित राहीन. मला पूर्ण विश्वास आहे की मी आपल्या पालनकर्त्याजवळ दुआ (प्रार्थना) करण्यात असफल राहणार नाही.

**४९.** जेव्हा (इब्राहीम यांनी) त्या सर्वांचा आणि अल्लाहशिवाय त्यांच्या सर्व उपास्यांचा

त्याग केला, तेव्हा आम्ही त्यांना इसहाक आणि याकूब प्रदान केले आणि प्रत्येकाला पैगंबर बनविले.

**५०.** आणि त्या सर्वांना आम्ही आपली भरपूर दया-कृपा प्रदान केली आणि आम्ही त्यांच्या सच्चा वायद्याला बुलंद दर्जा दिला.

**५१.** या ग्रंथात मूसाचाही उल्लेख करा, जो निवडलेला आणि रसूल आणि नबी (पैगंबर) होता.

**५२.** आम्ही त्यांना (मूसाला) तूर पर्वताच्या उजव्या किनाऱ्याकडून पुकारले आणि कानगोष्टी करीत त्यांना जवळ केले.

**५३.** आणि आपल्या विशेष दया-कृपेने त्यांचा भाऊ हारुन यांनाही पैगंबर पद प्रदान केले.

**५४.** आणि या ग्रंथात इस्माईल (च्या वृत्तांता) चाही उल्लेख करा. ते वायद्याचे मोठे पक्के होते आणि ते देखील रसूल आणि नबी होते.

**५५.** आणि ते आपल्या कुटुंबियांना सतत नमाज आणि जकात (धर्मदाना) चा आदेश देत असत आणि ते आपल्या पालनकर्त्याच्या दरबारात प्रिय आणि पसंत केले गेलेले होते.

**५६.** आणि या ग्रंथात इदरीसचाही उल्लेख करा ते देखील एक सच्चे पैगंबर होते.

**५७.** आम्ही त्यांना मोठे उच्च स्थान प्रदान केले.

**५८.** हेच ते पैगंबर होते, ज्यांच्यावर सर्वश्रेष्ठ अल्लाहने दया आणि कृपा केली, जे आदमच्या संततीपैकी आहेत आणि त्या लोकांचे वंशज आहेत, ज्यांना आम्ही नूह यांच्यासोबत नौकेत स्वार केले होते आणि इब्राहीम आणि याकूबच्या संततीपैकी आणि आमच्यातर्फे मार्गदर्शन लाभलेले आणि आमच्या प्रिय लोकांपैकी. यांच्यासमोर जेव्हा अतिशय दयावान अल्लाहच्या आयतींचे पठण केले जात असे, ते सजदा करीत आणि खूप रडत व गयावया करीत खाली पडत असत.

**५९.** पुढे त्यांच्यानंतर असे कुपुत्र जन्मास आले की त्यांनी नमाज बरबाद केली आणि मनाच्या इच्छा-आकांक्षांच्या मागे लागले. यास्तव त्यांचे नुकसान त्यांच्यासमोर येईल.

**६०.** मात्र त्यांच्याखेरीज, जे माफी मागतील आणि ईमान राखतील आणि सत्कर्मे करतील असे लोक जन्नतमध्ये दाखल होतील आणि त्यांच्या हक्कांना किंचितही नुकसान पोहचविले जाणार नाही.

**६१.** नेहमी कायम राहणाऱ्या जन्नतींमध्ये ज्यांच्या अपरोक्ष वायदा दयावान अल्लाहने आपल्या दासांना दिला आहे. निःसंशय, त्याचा वायदा पूर्ण झाल्याविना राहणार नाही.

**६२.** त्यांना तिथे कोणतीही व्यर्थ गोष्ट ऐकायला मिळणार नाही, ते फक्त सलामच, सलाम ऐकतील त्यांच्यासाठी सकाळ-संध्याकाळ त्यांची रोजी (अन्न-सामुग्री) असेल.[१]

**६३.** ही आहे ती जन्नत जिचा वारस आम्ही आपल्या दासांपैकी अशांना बनवितो, जे अल्लाहचे भय बाळगतात.

**६४.** आम्ही तुमच्या पालनकर्त्याच्या आदेशाविना उतरुच शकत नाही, आमच्या पुढे-मागे आणि त्या दरम्यानच्या समस्त वस्तू त्याच्याच अधिकारात आहेत आणि तुमचा पालनकर्ता विसरणारा नाही.

**६५.** आकाशांचा आणि जमिनीचा आणि जे काही त्यांच्या दरम्यान आहे त्या सर्वांचा तोच स्वामी आणि पानलहार आहे. तुम्ही त्याचीच उपासना करा आणि त्याच्या उपासनेवर दृढ-मजबूत व्हा. काय तुमच्या माहितीत त्याच्यासारखे नाव असलेला (आणि बरोबरीचा) आणखी कोणी आहे ?

**६६.** आणि मनुष्य म्हणतो की जेव्हा मी मरण पावेल, तर काय पुन्हा जिवंत करून बाहेर काढला जाईन ?

---

(१) इमाम अहमद यांनी यावर भाष्य करताना म्हटले आहे की जन्नतमध्ये रात्र आणि दिवस नसतील, केवळ प्रकाशच प्रकाश असेल. हदीसमधील उल्लेखानुसार जन्नतमध्ये प्रवेश करणाऱ्या पहिल्या गटाचे चेहरे पौर्णिमेच्या चंद्रासमान तेजस्वी असतील. त्यांना तिथे न थूंक येईल, ना नाक वाहेल आणि ना मल मूत्र विसर्जनाची पाळी येईल. तिचे त्यांची भांडी आणि कंगवे सोन्याचे असतील. त्यांचे शरीर सुगंधित आणि घाम केशरासमान सुगंधित असतील. जन्नतमध्ये जाणाऱ्या प्रत्येकाच्या दोन पत्न्या असतील. त्यांच्या पोटरींचा गाभा त्यांच्या मांसाच्या मागून दिसून येईल, त्याच्या अनुपम सौंदर्यामुळे त्यांच्यात आपसात द्वेष मत्सर भावना नसेल. सकाळ संध्याकाळ अल्लाहची प्रशंसा व त्याचे गुणगान करतील. (सहीह बुखारी, बदऊल खलक बाब माजाअ फी सिफातिल जन्नः व इन्नहा मखलूकतून आणि सहीह मुस्लिम किताबुल जन्नः बाब फी सिफातिल जन्नः व अहलेहा)

**६७.** काय हा मनुष्य एवढेही स्मरणात राखत नाही की आम्ही त्याला याच्यापूर्वी निर्माण केले, वास्तविक तो काहीच नव्हता.

**६८.** तुमच्या पालनकर्त्याची शपथ! आम्ही त्यांना आणि सैतानांना एकत्रित करून निश्चितच जहन्नमच्या चोहीबाजूला गुडघे टेकलेल्या अवस्थेत हजर करू.

**६९.** मग आम्ही प्रत्येक समूहापासून त्यांना वेगळे काढून उभे करू, जे अतिशय दयावान अल्लाहपासून मोठी अकड दाखवित फिरत होते.

**७०.** मग आम्ही त्यांनाही चांगल्या प्रकारे जाणतो, जे जहन्नममध्ये दाखल होण्यास जास्त पात्र आहेत.

**७१.** आणि तुमच्यापैकी प्रत्येकजण तिथे निश्चित हजर होणार आहे. हा तुमच्या पालनकर्त्याचा अगदी अटळ फैसला आहे.

**७२.** मग आम्ही, आमचे भय राखून दुराचारापासून दूर राहणाऱ्यांना वाचवून घेऊ आणि जुलूम अत्याचार करणाऱ्यांना त्यातच गुडघे टेकलेल्या अवस्थेत खाली पडलेले सोडू.[१]

**७३.** आणि जेव्हा त्यांच्यासमोर आमच्या साफ आणि स्पष्ट आयतींचे पठण केले जाते, तेव्हा काफिर लोक मुसलमानांना म्हणतात, (सांगा) आमच्या-तुमच्यात कोणाचा मान-मर्तबा मोठा आहे आणि कोणाची सभा शानदार आहे?

**७४.** आणि आम्ही तर त्यांच्यापूर्वी अनेक जनसमूहांना नष्ट केले आहे जे साधनसामुग्री आणि नावलौकिकात यांच्याहून खूप मोठे होते.

**७५.** सांगा, जो मार्गभ्रष्टतेत असतो, दयावान अल्लाह त्याला खूप दीर्घ संधी देतो, येथपर्यंत की त्याने त्या गोष्टी पाहून घ्याव्यात, ज्यांच्याविषयी वायदे केले जात आहेत, अर्थात अल्लाहतर्फे शिक्षा-यातना किंवा कयामतला त्या वेळी त्यांना चांगल्या प्रकारे कळून येईल की कोण वाईट पदाचा आहे आणि कोणाचा जथा(समूह) कमकुवत आहे.

---

(१) याचे स्पष्टीकरण सहीह हदीस वचनांमध्ये अशा प्रकारे सांगितले गेले आहे की जहन्नमवर एक पूल बनविला जाईल, ज्याच्या वरून प्रत्येक ईमानधारकाला व काफिर व्यक्तीला जावे लागले. ईमान राखणारे आपापल्या कर्मानुसार वेगाने किंवा हळू हळू पूल पार करतील, परंतु काफिर लोक पूल पार करण्यात असफल ठरतील आणि पुलावरून खाली जहन्नममध्ये कोसळतील.

**७६.** आणि मार्गदर्शन लाभलेल्या लोकांच्या मार्गदर्शनात अल्लाह आणखी भर टाकतो, आणि बाकी राहणारी नेकी (सत्कर्म) तुमच्या पालनकर्त्याजवळ मोबदल्याच्या दृष्टीने आणि परिणामाच्या दृष्टीने फारच चांगली आहे.

**७७.** काय तुम्ही त्यालाही पाहिले, ज्याने आमच्या आयतींशी कुफ्र (इन्कार) केला आणि म्हणाला की मला तर धन आणि संतती अवश्य दिली जाईल.

**७८.** काय तो अपरोक्ष ज्ञान राखतो किंवा अल्लाहकडून त्याने एखादे वचन घेतले आहे ?

**७९.** मुळीच नाही हा जे काही बोलत आहे, ते आम्ही अवश्य लिहून घेऊ आणि त्यांच्यासाठी अज़ाब (शिक्षा-यातना) वाढवत जाऊ.

**८०.** आणि हा ज्या वस्तूंबाबत बोलत आहे, त्या आम्ही त्याच्या पश्चात घेऊन टाकू आणि हा एकटाच आमच्या समोर हजर होईल.

**८१.** त्यांनी अल्लाहखेरीज इतर देवता (उपास्ये) बनवून ठेवली आहेत की ते त्यांच्यासाठी सन्मानाचे कारण ठरोत.

**८२.** असे कदापि होणार नाही. ते तर यांच्या उपासनेचाच इन्कार करतील आणि उलट यांचे शत्रू बनतील.

**८३.** काय तुम्ही नाही पाहिले की आम्ही काफिरांजवळ सैतानांना पाठवितो जे त्यांना खूप प्रेरित करतात.

**८४.** तुम्ही त्यांच्या बाबतीत घाई करू नका. आम्ही तर स्वतःच त्यांची कालगणना करीत आहोत.

**८५.** ज्या दिवशी आम्ही, अल्लाहचे भय राखून दुराचारापासून अलिप्त राहणाऱ्यांना, दयावान अल्लाहचा अतिथी बनवून एकत्र करू.

**८६.** आणि अपराधी लोकांना (अतिशय तहान लागलेल्या अवस्थेत) जहन्नमकडे हाकलत घेऊन जाऊ.

**८७.** कोणालाही शिफारस करण्याचा अधिकार नसेल, मात्र त्या लोकांखेरीज, ज्यांनी सर्वश्रेष्ठ अल्लाहकडून एखादे वचन घेऊन ठेवले आहे.

**८८.** आणि त्यांचे म्हणणे तर असे आहे की दयावान अल्लाहने देखील संतती करून ठेवली आहे.

**८९.** निःसंशय तुम्ही मोठी (वाईट आणि) भयंकर गोष्ट आणली आहे.

**९०.** शक्य आहे की या कथनामुळे आकाश फाटून जाईल आणि धरती दुभंगून जाईल आणि पर्वताचे कण कण होतील.

**९१.** की ते रहमान (अल्लाह) ची संतती साबीत करण्यास बसले आहेत.

**९२.** आणि रहमान (अल्लाह) साठी हे योग्य नाही की त्याने संतती राखावी.

**९३.** आकाशांमध्ये आणि जमिनीवर जे काही आहे, सर्व अल्लाहचे दास बनूनच येणार आहेत.

**९४.** त्या सर्वांना त्याने घेरून ठेवले आहे आणि सर्वांची पूर्णतः गणनाही करून ठेवली आहे.

**९५.** हे सर्वच्या सर्व कयामतच्या दिवशी एकटे त्याच्यासमोर हजर होणार आहेत.

**९६.** निःसंशय, ज्या लोकांनी ईमान राखले आहे आणि ज्यांनी सत्कर्मे केली आहेत, त्यांच्याकरिता दयावान अल्लाह प्रेम निर्माण करील.

**९७.** आणि (कुरआनाला) तुमच्या भाषेत फार सोपे केले आहे की तुम्ही त्याच्याद्वारे नेक- सदाचारी लोकांना खूशखबर द्यावी आणि भांडखोर लोकांना खबरदार करावे.

**९८.** आणि आम्ही याच्यापूर्वी अनेक जमातींना नष्ट केले आहे, काय त्यांच्यापैकी कोणा एकाचाही चाहूल तुम्हाला ऐकू येते किंवा त्यांचा किंचित आवाजही तुमच्या कानी पडतो ?

---

## सूरह ताहा - २०

सूरह ताहा मक्का येथे अवतरली आणि यात एकशे पस्तीस आयती आणि आठ रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहरबान, अतिशय दयावान आहे.

**१.** ता.हा.

**२.** आम्ही या कुरआनाचे अवतरण तुमच्यावर अशासाठी केले नाही की तुम्ही कष्ट-यातनाग्रस्त व्हावे.

**३.** किंबहुना त्याच्या बोध- उपदेशाकरिता, जो अल्लाहचे भय राखतो.

**४.** याचे अवरण त्याच्याचतर्फे आहे, ज्याने जमिनीला आणि उंच उंच आकाशांना निर्माण केले आहे.

**५.** जो अतिशय दयावान आहे, अर्श (ईशसिंहासना) वर विराजमान आहे.

**६.** आकाशांमध्ये आणि धरतीवर आणि यांच्या दरम्यान आणि जमिनीच्या पातळीखाली प्रत्येक ठिकाणी त्याची राज्यसत्ता आहे. (अर्थात या सर्वांचा एकमेव बादशहा तोच आहे.)

**७.** तुम्ही आपले म्हणणे उंच स्वरात सांगा किंवा हळू आवाजात, तो तर लपलेली आणि गुप्त स्वरुपाची गोष्टही चांगल्या प्रकारे जाणतो.

**८.** तोच अल्लाह होय, ज्याच्याखेरीज कोणीही सच्चा (खराखुरा) उपास्य नाही. सर्व उत्तमोत्तम नावे त्याचीच आहेत.

**९.** तुम्हाला मूसाचा वृत्तांत तर माहीतच आहे.

**१०.** जेव्हा त्यांनी आग पाहून आपल्या कुटुंबीयांना म्हटले की थोडा वेळ इथे थांबा, मला आग दिसत आहे. खूप शक्य आहे की मी त्या आगीचा निखारा तुमच्याजवळ आणावा किंवा आगीजवळून उचित रस्त्याची बातमी प्राप्त करून घ्यावी.

**११.** जेव्हा ते त्या ठिकाणी पोहोचले, तेव्हा आवाज ऐकू आला की, हे मूसा!

**१२.** निःसंशय, मीच तुमचा स्वामी व पालनकर्ता आहे. तुम्ही आपल्या पायातले जोडे उतरवा कारण तुम्ही 'तोवा'च्या पवित्र मैदानात आहात.

**१३.** आणि मी तुमची निवड केली आहे. आता जी वहयी (प्रकाशना) केली जाईल तिला लक्षपूर्वक ऐका.

**१४.** निःसंशय, मीच अल्लाह आहे. माझ्याखेरीज उपासना करण्यायोग्य दुसरा कोणीही नाही, यास्तव तुम्ही माझीच उपासना करा आणि माझ्या स्मरणार्थ नमाज कायम करा.

**१५.** कयामत हमखास येणार आहे, जिला मी गुप्त ठेवू इच्छितो यासाठी की प्रत्येक माणसाला तो मोबदला प्रदान केला जावा, जो त्याने प्रयत्न केला असेल.

**१६.** तेव्हा आता यावर ईमान राखण्यापासून तुम्हाला अशा माणसाने रोखू नये, जो यावर ईमान राखत नसेल आणि आपल्या इच्छा आकांक्षांच्या मागे धावत असेल, अन्यथा तुम्ही नाश पावाल.

**१७.** आणि हे मूसा! तुमच्या उजव्या हातात काय आहे?

**१८.** उत्तर दिले, ही माझी लाठी आहे, जिच्यावर मी टेका (आधार) घेतो आणि जिच्याद्वारे मी आपल्या शेळ्यांकरिता झाडाची पाने खाली पाडून घेतो आणि तिच्यापासून मला दुसरेही अनेक फायदे आहेत.

**१९.** (अल्लाहने) फर्माविले, हे मूसा, तिला (हातातून) खाली टाका.

**२०.** तेव्हा खाली टाकताच साप बनून धावू लागली.

**२१.** फर्माविले निर्भय होऊन तिला धरा, आम्ही तिला त्याच पहिल्या अवस्थेत पुन्हा आणू.

**२२.** आणि आपला हात आपल्या काखेत (बगलेत) घाला, तेव्हा तो सफेद, प्रकाशमान होताना बाहेर निघेल, मात्र कसल्याही व्यंग-दोष आणि आजाराविना. हा दुसरा ईश-चमत्कार आहे.

**२३.** हे अशासाठी की आम्ही तुम्हाला आपल्या मोठमोठ्या निशाण्या दाखवू इच्छितो.

**२४.** आता, तुम्ही फिरऔनकडे जा, त्याने मोठा उत्पात माजविला आहे.

**२५.** (मूसा) म्हणाले, हे माझ्या पालनकर्त्या! माझी छाती माझ्याकरिता उघड (मोकळी) कर.

**२६.** आणि माझे कार्य माझ्यासाठी सोपे कर.

**२७.** आणि माझ्या जीभेची गाठ सोडव.

**२८.** यासाठी की लोकांनी माझे म्हणणे चांगल्या प्रकारे समजू शकावे.

**२९.** आणि माझा वजीर माझ्या कुटुंबीयांपैकी बनव.

**३०.** (अर्थात) माझा भाऊ हारूनला.

**३१.** तू त्याच्याद्वारे माझी कंबर मजबूत कर.

**३२.** आणि त्याला माझ्या कार्यात सहाय्यक बनव.

**३३.** यासाठी की आम्ही दोघांनी तुझी खूप खूप स्तुती-प्रशंसा वर्णन करावी.

**३४.** आणि तुझे अधिकाधिक स्मरण करावे.

**३५.** निःसंशय, तू आमची चांगल्या प्रकारे देखभाल करणारा आहेस.

**३६.** (अल्लाहने) फर्माविले, हे मूसा! तुमच्या सर्व मागण्या पूर्ण केल्या गेल्या.

**३७.** आणि आम्ही तर तुमच्यावर आणखी एकदा याहून मोठा उपकार केला आहे.

**३८.** जेव्हा आम्ही तुमच्या मातेच्या मनात ते अवतरित केले, ज्याचे वर्णन या वेळी केले जाते आहे.

**३९.** की तुम्ही, या (बाळा) ला लाकडी पेटीत ठेवून तिला बंद करून नदीत सोडून द्या, मग नदी त्या पेटीला किनाऱ्यावर नेईल आणि माझा व त्याचा स्वतःचा शत्रू तिला घेईल आणि मी आपल्यातर्फे विशेष प्रेम आणि पसंतीचा तुमच्यावर वर्षाव केला यासाठी की तुमचे पालनपोषण माझ्या डोळ्यादेखत केले जावे.[१]

**४०.** (स्मरण करा) जेव्हा तुमची बहीण जात होती आणि सांगत होती की, तुम्ही म्हणत असाल तर मी त्याचा पत्ता सांगू जो या (बाळा) ची देखरेख ठेवणारा बनू शकेल. अशा

(१) यास्तव अल्लाहने असीम सामर्थ्य आणि त्याचे संरक्षण व कमालीच्या देखरेखीचा चमत्कार पाहा की ज्या बालकापायी फिरऔनने असंख्य बालकांची हत्या केली, की तो बालक जिवंत राहू नये. त्याच बालकाला अल्लाह त्यालाच सोपवून त्याच्याचद्वारे पालनपोषण करवित आहे आणि माता आपल्या बाळाला दूध पाजत आहे, पण त्याचा मेहनताना देखील त्याच बाळा (मूसा) च्या शत्रूकडून वसूल करीत आहे.

प्रकारे आम्ही तुम्हाला पुन्हा तुमच्या मातेजवळ पाठविले, यासाठी की तिचे नेत्र शितल राहावेत आणि ती दु:खी होऊ नये आणि तुम्ही एका माणसाचा वध केला होता, त्या उपरान्त आम्ही तुम्हाला दु:खापासून वाचविले, अर्थात आम्ही तुमची चांगल्या प्रकारे कसोटी घेतली, मग तुम्ही अनेक वर्षापर्यंत मदयनच्या लोकांमध्ये निवास केला, मग अल्लाहच्या लिखित भाग्यानुसार हे मूसा तुम्ही आले.

**४१.** आणि मी तुम्हाला विशेषतः आपल्यासाठी पसंत केले.

**४२.** आता तुम्ही आपल्या भावासह माझ्या निशाण्यांसोबत घेऊन जा, खबरदार! तुम्ही दोघेही माझे स्मरण करण्यात सुस्ती करू नका.

**४३.** तुम्ही दोघे फिरऔनच्या जवळ जा. त्याने मोठा विद्रोह केला आहे.

**४४.** त्याला नरमीने समाजावून सांगा, कदाचित त्याने ध्यानी घ्यावे किंवा (अल्लाहचे) भय बाळगावे.

**४५.** दोन्ही म्हणाले, हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला भय वाटते की कदाचित फिरऔनने आमच्यावर एखादा अत्याचार न करावा, किंवा आपल्या बंडखोरीत आणखी वाढावा.

**४६.** उत्तर मिळाले की तुम्ही कधीही भय राखू नका, मी सदैव तुमच्या सोबतीला आहे आणि ऐकत व पाहत राहीन.

**४७.** तुम्ही त्याच्याजवळ जाऊन त्याला सांगा की आम्ही तुझ्या पानलकर्त्याचे पैगंबर (ईशदूत) आहोत. तू आमच्या सोबत इस्राईलच्या संततीला पाठव, त्यांच्या शिक्षा-यातना संपव. आम्ही तर तुझ्याजवळ, तुझ्या पालनकर्त्यातर्फे निशाण्या घेऊन आलो आहोत. शांती सलामती फक्त त्याच्याचकरिता आहे, जो मार्गदर्शनाचा मजबूतपणे अंगिकार करेल.

**४८.** आमच्याकडे वहयी (प्रकाशना) केली गेली आहे की जो खोटे ठरविल. आणि तोंड फिरविल, त्याच्याकरिता अज़ाब (शिक्षा-यातना) आहे.

**४९.** (फिरऔनने) विचारले की हे मूसा! तुम्हा दोघांचा पालनकर्ता कोण आहे?

**५०.** उत्तर दिले की आमचा पालनकर्ता तो आहे, ज्याने प्रत्येकाला त्याचे खास रूप

प्रदान केले, मग मार्गदर्शनही दिले.

**५१.** फिरऔन म्हणाला, (बरे हे सांगा) पूर्वी होऊन गेलेल्या लोकांची काय अवस्था झाली?

**५२.** उत्तर दिले, त्यांचे ज्ञान माझ्या पालनकर्त्याजवळ ग्रंथात आहे. माझा पालनकर्ता ना चूक करतो, ना विसरतो.

**५३.** त्यानेच तुमच्यासाठी जमिनीला अंथरुण (बिछाना) बनविले आहे आणि त्यात तुमच्या चालण्यासाठी रस्ते बनविले आहेत, आणि आकाशातून पर्जन्यवृष्टी देखील तोच करतो, मग त्या पावसाद्वारे अनेक प्रकारची पैदावारही आम्ही निर्माण करतो.

**५४.** तुम्ही स्वतः खा आणि आपल्या जनावरांनाही चारा. निःसंशय यात बुद्धिमानांकरिता अनेक निशाण्या आहेत.

**५५.** त्याच धरतीमधून आम्ही तुम्हाला निर्माण केले आणि तिच्यातच पुन्हा परत पाठवू आणि तिच्यातूनच तुम्हा सर्वांना बाहेर काढून उभे करू.

**५६.** आणि आम्ही त्याला सर्व निशाण्या दाखविल्या, परंतु तरीही त्याने खोटे ठरविले आणि इन्कार केला.

**५७.** तो म्हणाला, हे मूसा! काय तू आमच्याजवळ अशासाठी आला आहे की आम्हाला आपल्या जादूच्या सामर्थ्याने आमच्या देशातून बाहेर काढावे.

**५८.** ठीक आहे. मग आम्हीही तुमचा सामना करण्यासाठी अशीच जादू जरूर आणू. तेव्हा तुम्ही आमच्या आणि आपल्या दरम्यान वायद्याची वेळ निश्चित ठरवून घ्या की ना आम्ही त्याविरूद्ध करावे आणि ना तुम्ही. मोकळ्या मैदानात ही स्पर्धा व्हावी.

**५९.** (मूसा यांनी) उत्तर दिले, शोभा सजावट आणि समारंभाच्या दिवसाचा वायदा आहे, आणि हे की लोकांनी दिवस चढताच जमा व्हावे.

**६०.** नंतर फिरऔन परतला आणि त्याने आपले डावपेच गोळा केले मग आला.

**६१.** मूसा त्याला म्हणाले की तुमचा नाश होवो, अल्लाहवर खोटे नाटे आणि लांछन लावू नका की (ज्यामुळे) त्याने तुमचा शिक्षा-यातनेद्वारे सर्वनाश करून टाकावा. लक्षात ठेवा! ज्याने असत्य रचले, तो कधीही सफल होणार नाही.

**६२.** मग हे लोक आपसात सल्लामसलत करण्यात एकमेकांविरूद्ध मताचे झाले आणि लपून छपून कानगोष्टी करू लागले.

**६३.** म्हणाले, हे दोघे फक्त जादूगार आहेत आणि यांचा पक्का इरादा आहे की आपल्या जादूच्या शक्तीने तुम्हाला तुमच्या देशाबाहेर घालवावे आणि तुमच्या उत्तम धर्माचा सत्यानाश करून टाकावा.

**६४.** तेव्हा तुम्ही देखील आपले कोणतेही डावपेच बाकी ठेवू नका, मग पंक्तीबद्ध होऊन रांगेत या, आज जो वर्चस्वशाली होईल तोच बाजी जिंकेल.

**६५.** ते म्हणू लागले की हे मूसा! एक तर तुम्ही आधी टाका किंवा आम्ही प्रथम टाकणारे बनावे.

**६६.** उत्तर दिले, नाही तुम्हीच अगोदर टाका. आता तर मूसा यांना असे वाटू लागले की त्यांच्या त्या दोऱ्या आणि काठ्या त्यांच्या जादूच्या शक्तीने धावत जात आहेत.

**६७.** अशाने मूसा मनातल्या मनात भिऊ लागले.

**६८.** आम्ही फर्माविले, अजिबात भिऊ नका. नि:संशय तुम्हीच वर्चस्वशाली आणि उच्च राहाल.

**६९.** आणि तुमच्या उजव्या हातात जे आहे ते खाली टाका की त्यांच्या कारागिरीला याने गिळून टाकावे त्यांनी जे काही बनविले आहे ते केवळ जादूगारांचे कला कौशल्य आहे आणि जादूगार कोठूनही येवो, सफल होत नाही.

**७०.** आता तर सर्वच्या सर्व जादूगार सजद्यात पडले आणि अकस्मात उद्गारले की आम्ही तर हारुन आणि मूसाच्या पालनकर्त्यावर ईमान राखले.

**७१.** (फिरऔन) म्हणाला, काय माझा आदेश होण्यापूर्वीच तुम्ही त्याच्यावर ईमान राखले? नि:संशय हाच तुमचा तो मोठा गुरू आहे, ज्याने तुम्हा सर्वांना जादू शिकविली आहे (ऐका) मी तुमचे हात पाय विरूद्ध दिशेने कापवून तुम्हा सर्वांना खजूरीच्या फांद्यांवर फासावर लटकविन आणि तुम्हाला पूर्णत: माहीत पडेल की आमच्यापैकी कोणाची सजा अधिक सक्त आणि जास्त काळ टिकणारी आहे.

**७२.** (त्यांनी) उत्तर दिले की, असंभव आहे की आम्ही तुम्हाला प्राधान्य द्यावे त्या

प्रमाणांवर, जी आमच्या समोर येऊन पोहोचलीत आणि त्या अल्लाहवर, ज्याने आम्हाला निर्माण केले. आता, तू वाटेल ते कर. तू जो काही आदेश चालवू शकतो तो या जगाच्या जीवनातच आहे.

**७३.** आम्ही (या आशेने) आपल्या पालनकर्त्यावर ईमान राखले की त्याने आमचे अपराध माफ करावेत आणि प्रामुख्याने जादूगारी (चे पाप) जे काही तू आमच्याकडून विवशतेने करवून घेतले आहे. अल्लाहच सर्वांत उत्तम आणि सदैव काळ राहणारा (चिरस्थायी) आहे.

**७४.** तात्पर्य हेच की जो कोणी अपराधी बनून अल्लाहच्या ठिकाणी जाईल, त्याच्यासाठी जहन्नम आहे, जिथे न मृत्यु असेल, न जीवन!

**७५.** आणि जो कोणी त्याच्याजवळ ईमानधारक बनून जाईल आणि त्याने सत्कर्मेही केली असतील तर त्याच्यासाठी उच्च आणि चांगले दर्जे आहेत.

**७६.** कायमस्वरूपी जन्नत, ज्यांच्याखाली नद्या वाहत असतील, जिथे ते सदासर्वदा राहतील. हाच मोबदला आहे अशा त्या प्रत्येक माणसाचा जो पवित्र (पापमुक्त) आहे.

**७७.** आणि आम्ही मूसाकडे वहयी (प्रकाशना) अवतरित केली की तुम्ही रात्रीतूनच माझ्या दासांना घेऊन चला आणि त्यांच्यासाठी समुद्रात कोरडा मार्ग बनवून घ्या, मग ना तुम्हाला कोणाच्या येऊन धरण्याचे भय राहील ना धास्ती.

**७८.** फिरऔनने आपल्या सैन्यासह त्यांचा पाठलाग केला, मग तर समुद्र त्या सर्वांवर आच्छादित झाला जसे काही आच्छादित होणार होते.

**७९.** आणि फिरऔनने आपल्या जनसमूहाला मार्गभ्रष्टतेत टाकले आणि सरळ मार्ग दाखविला नाही.

**८०.** हे इस्त्राईलच्या पुत्रांनो! (पाहा) आम्ही तुम्हाला तुमच्या शत्रुच्या तावडीतून मुक्त केले आणि तुम्हाला तूर पर्वताच्या उजवीकडचे वचन दिले आणि तुमच्यावर मन्न आणि सलवा उतरविला.

**८१.** तुम्ही, आम्ही प्रदान केलेली स्वच्छ शुद्ध रोजी (आजिविका) खा आणि त्यात

मर्यादेचे उल्लंघन करू नका अन्यथा तुमच्यावर माझा प्रकोप उतरेल तो निश्चितच नाश पावेल.

**८२.** आणि निश्चितच मी त्यांना माफ करणार आहे जे माफी मागतील ईमान राखतील सत्कर्मे करतील आणि सरळ मार्गावरही राहतील.[१]

**८३.** आणि हे मूसा! तुम्हाला आपला जनसमूहाशी (गाफील करून) कोणत्या गोष्टीने लवकर आणले?

**८४.** सांगितले ते लोक माझ्या पाठोपाठच आहेत आणि मी, हे पालनकर्त्या घाई अशासाठी केली की तू प्रसन्न व्हावे.

**८५.** फर्माविले, आम्ही तुमच्या जनसमूहाला तुमच्या पश्चात कसोटीत टाकले आणि त्यांना सामरीने मार्गभ्रष्ट करून टाकले.

**८६.** तेव्हा मूसा अतिशय क्रोधित आणि दुःखी होऊन परतले आणि म्हणाले की हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! काय तुमच्याशी तुमच्या पालनकर्त्याने चांगला वायदा केला नव्हता? काय त्याची मुदत तुम्हाला दीर्घ स्वरूपाची वाटली? की तुमचा इरादाच हा आहे की तुमच्यावर तुमच्या पालनकर्त्याचा प्रकोप कोसळावा, म्हणून तुम्ही माझा वायदा तोडून टाकला.

**८७.** (लोकांनी) उत्तर दिले, आम्ही आपल्या अधिकाराने तुमच्याशी केलेला वायदा तोडला नाही, किंबहुना आमच्यावर जे दागिने, लोकांचे लादले गेले होते, ते आम्ही टाकून दिले आणि त्याचप्रमाणे सामरीने देखील टाकले.

**८८.** मग त्याने लोकांसाठी एक वासरू घडविले अर्थात वासराची मूर्ती ज्याचा गायीसारखा आवाज होता, मग म्हणाले की हाच तुमचाही माबूद (उपास्य) आहे आणि मूसाचा देखील, परंतु मूसाला विसर पडला.

---

(१) अर्थात अल्लाहच्या माफीस पात्र होण्यासाठी चार गोष्टी आवश्यक आहेत. कुफ्र आणि शिर्कपासून पश्चात्ताप (तौबा) ईमान, नेकीचेकाम आणि सत्य-मार्गावर चालत राहणे अर्थात सन्मार्गावर चालत असताना त्याला मरण यावे. अन्यथा उघड आहे की क्षमा याचना व ईमान नंतर त्याने शिर्क आणि कुफ्र मार्ग पत्करला, येथपावेतो की तो त्याच अवस्थेत मरण पावला तर अल्लाहची माफी लाभण्याऐवजी तो अल्लाहच्या प्रकोपास व शिक्षा यातनेस पात्र ठरेल.

**८९.** काय हे वाट चुकलेले लोक हेही पाहत नाही की ते तर त्यांच्या बोलण्याला उत्तरही देऊ शकत नाही आणि न त्यांच्या कसल्याही चांगल्या वाईटाचा अधिकार बाळगतो.

**९०.** आणि हारूनने यापूर्वीही त्यांना सांगितले होते की हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! या वासराद्वारे तर तुमची परीक्षा घेतली गेली आहे. तुमचा सच्चा पालनहार तर दयावान अल्लाहच आहे, तेव्हा तुम्ही सर्व माझे अनुसरण करा आणि माझे म्हणणे मानत जा.

**९१.** (त्यांनी) उत्तर दिले मूसाचे आगमन होईपर्यंत आम्ही तर याचेच पुजारी बनून राहू.

**९२.** (मूसा) म्हणाले, हे हारून! यांना मार्गभ्रष्ट होत असलेले पाहून (त्यांना रोखण्यात) तुम्हाला कोणत्या गोष्टीने रोखून ठेवले होते?

**९३.** की ज्यामुळे तू माझ्या पाठोपाठ आला नाही, काय तू देखील माझी अवज्ञा करणारा बनलास?

**९४.** (हारून) म्हणाले, हे माझ्या मातेच्या पुत्रा! माझी दाढी धरू नका, आणि डोक्याचे केस ओढू नका. माझ्या मनात तर केवळ हाच विचार आला आहे की कदाचित तुम्ही असे न म्हणावे की तू इस्राईलच्या संततीत फूट पाडलीस आणि माझ्या बोलण्याची (आदेशाची) वाट पाहिली नाही.

**९५.** (मूसा यांनी) विचारले, सामरी तुझा काय मामला आहे?

**९६.** (त्याने) उत्तर दिले, मला ते दिसले, जे त्यांना दिसले नाही, तेव्हा मी अल्लाहने पाठविलेल्या पाऊलखुणांतून एक मूठ भरून घेतली. तिला त्यात टाकले. अशा प्रकारे माझ्या मनाने माझ्यासाठी ही गोष्ट रचली.

**९७.** सांगितले, ठीक आहे. जा, या जगाच्या जीवनात तुझी शिक्षा हीच की तू म्हणत राहावे, मला स्पर्श करू नका आणि एक दुसरा वायदाही तुझ्याशी आहे, जो तुझ्यावरून कधीही टाळणार नाही आणि आता तू आपल्या या दैवतालाही पाहा, ज्याचा तू पुजारी बनला होता, आम्ही त्याला जाळून टाकू, मग त्याला नदीत चूरेचूर उडवून देऊ.[१]

---

(१) तात्पर्य मूर्तीपूजेचे चिन्ह किंवा प्रतीक नष्ट करणे, त्याचे अस्तित्व नाहीसे करणे, मग ते कसेही

**९८.** निःसंशय, तुम्हा सर्वांचा माबूद (उपास्य) केवळ अल्लाहच आहे. त्याच्याखेरीज दुसरा कोणीही उपास्य नाही. त्याचे ज्ञान समस्त वस्तूंवर प्रभावी आहे.

**९९.** अशा प्रकारे आम्ही तुमच्यासमोर पूर्वी होऊन गेलेल्या घटनांचे वर्णन करतो, आणि निःसंशय आम्ही तुम्हाला आपल्याकडून बोध- उपदेश प्रदान केलेला आहे.

**१००.** यापासून जो तोंड फिरवेल तो निश्चितच कयामतच्या दिवशी आपले अवजड ओझे लादलेल्या स्थितीत असेल.

**१०१.** ज्यात तो नेहमीच राहील आणि अशांकरिता कयामतच्या दिवशी (मोठे) भयंकर ओझे आहे.

**१०२.** ज्या दिवशी सूर (शंख) फुंकला जाईल आणि अपराधी लोकांना आम्ही त्या दिवशी (भीतीमुळे) निळ्या पिवळ्या डोळ्यांसह घेरून आणू.

**१०३.** ते आपसात हळू हळू बोलत असतील की आम्ही तर (जगात) केवळ दया दिवसच राहिलो.

**१०४.** जे काही ते बोलत आहेत, त्याची हकीगत आम्ही जाणतो. त्यांच्यातला सर्वांत चांगल्या मार्गाचा इसम म्हणत असेल, तुम्ही फक्त एकच दिवस राहिलेत.

**१०५.** ते तुम्हाला पर्वतांबद्दल विचारतात, तर (तुम्ही) सांगा की पर्वतांना माझा पालनकर्ता (अल्लाह) चूरेचूरे करून उडवून देईल.

**१०६.** आणि (जमिनी) ला समतल सपाट मैदान करून टाकील.

**१०७.** ज्यात ना कोठे वळण दिसेल, ना उंच सखल भाग.

**१०८.** ज्या दिवशी लोक पुकारणाऱ्याच्या मागे चालतील, ज्यात कसलीही कमी होणार

---

असो, अवमान नाही. जसे अहले बिदअत, कबरींची पूजा करणारे आणि ताजिया वगैरेचे भक्त सांगतात. किंबहुना तौहीद (एकेश्वरवादा) चा हाच उद्देश आहे जसे की या घटनेत 'असरिर्रसुली'ला पाहिले गेले नाही, ज्याद्वारे बाह्यतः अध्यात्मिक बरकतीचे अवलोकनही केले गेले, तरीही त्याची तमा बाळगली गेली नाही, कारण ते मूर्तीपूजेचे साधन बनले होते.

नाही आणि दयावान अल्लाहच्या समोर सर्वांचे आवाज दबलेले असतील, कुजबुजखेरीज तुम्हाला काहीच ऐकू येणार नाही.

**१०९.** त्या दिवशी कोणाची शिफारस काहीच कामी येणार नाही, तथापि ज्याला दयावान अल्लाह तसा आदेश देईल, आणि त्याचे म्हणणे पसंत करील.

**११०.** जे काही त्यांच्या पुढे आणि मागे आहे, ते (अल्लाहच) जाणतो. त्याच्या निर्मितीपैकी कोणीही त्याला आपल्या ज्ञानकक्षेत घेऊ शकत नाही.

**१११.** आणि सर्वांचे चेहरे त्या चिरसजीव आणि चिरस्थायी अल्लाहसमोर मोठ्या नम्रतेने झुकलेले असतील. निःसंशय, जो आपल्या पाठीवर अत्याचाराचे ओझे लावून येईल तो असफल ठरेल.

**११२.** आणि जो कोणी सत्कर्म करील, आणि ईमानधारकही असेल तर त्याला ना जुलूम अत्याचाराचे भय राहील, ना हक्क मारला जाण्याचे.

**११३.** आणि अशा प्रकारे आम्ही तुमच्यावर अरबी (भाषेत) कुरआन अवतरित केले आहे आणि अनेक प्रकारे त्यात शिक्षेची भीती सांगितली आहे, यासाठी की लोकांनी अल्लाहचे भय राखून दुराचारापासून अलिप्त राहणारे बनावे किंवा त्यांच्या मनात विचारचिंतन निर्माण व्हावे.

**११४.** अशा प्रकारे अल्लाह सर्वांत मोठा सच्चा आणि खराखुरा स्वामी आहे. तुम्ही कुरआन पठण करण्यात घाई करू नका, याआधी की तुमच्याकडे जी वहयी (प्रकाशना) केली जाते, ती पूर्ण केली जावी आणि असे म्हणा की, पालनकर्त्या! माझे ज्ञान आणखी वाढव.

**११५.** आणि आम्ही आदमला अगोदरच ताकीदपूर्ण आदेश दिला होता, परंतु त्यांना त्याचा विसर पडला आणि आम्हाला त्यांच्यात कोणताही दृढनिश्चय आढळला नाही.

**११६.** आणि जेव्हा आम्ही फरिश्त्यांना सांगितले की आदमला सजदा करा तेव्हा इब्लिसखेरीज सर्वांनी सजदा केला, त्याने साफ इन्कार केला.

**११७.** तेव्हा आम्ही सांगितले, हे आदम! हा तुमचा आणि तुमच्या पत्नीचा शत्रु आहे (लक्षात ठेवा) असे न व्हावे की त्याने तुम्हा दोघांना जन्नतमधून बाहेर घालवावे, ज्यामुळे

तुम्ही संकटात सापडावे.

**११८.** इथे तर तुम्हाला ही सवलत आहे की ना तुम्ही उपाशी राहता, ना नग्न.

**११९.** आणि इथे ना तुम्ही तहानलेले राहता, ना उन्हाने त्रस्त राहता.

**१२०.** परंतु सैतानाने आदमच्या मनात कुविचार टाकला, म्हणाला, हे आदम! काय मी तुम्हाला चिरस्थायी जीवनाचा वृक्ष आणि त्या राज्यसत्तेची खबर देऊ जी कधीही जुनी न व्हावी.

**१२१.** यास्तव त्या दोघांनी त्या झाडातून काही खाल्ले, मग त्यांची गुप्तांगे उघडी झालीत आणि ते जन्नतची पाने आपल्या अंगावर चिकटवू लागले. आदमने आपल्या पालनकर्त्याची अवज्ञा केली आणि बहकले.

**१२२.** मग त्यांच्या पालनकर्त्याने त्यांना उपकृत केले, आदमची तौबा कबूल केली आणि त्यांचे मार्गदर्शन केले.

**१२३.** (अल्लाहने) फर्माविले, तुम्ही दोघेही इथून खाली उतरा. तुम्ही आपसात एकमेकांचे शत्रू आहात. आता तुमच्याजवळ जेव्हा कधीही माझ्याकडून मार्गदर्शन पोहचेल, तर जो कोणी माझ्या मार्गदर्शनाचे पालन करील तर तो न बहकेल, ना कष्ट-यातनाग्रस्त होईल.

**१२४.** आणि जो कोणी माझ्या स्मरणापासून तोंड फिरविल, त्याचे जीवन तंगी-अडचणीचे राहील आणि कयामतच्या दिवशी आम्ही त्याला आंधळा करून उठवू.

**१२५.** (तो) म्हणेल, हे पालनकर्त्या! मला तू आंधळा बनवून का उठविले? वास्तविक मी चांगले बघू शकत होतो.

**१२६.** उत्तर मिळेल, असेच व्हायला पाहिजे होते. तू माझ्या (तर्फे) आलेल्या आयातींचा विसर पाडला, तद्वतच आज तुझाही विसर पाडला जात आहे.

**१२७.** आणि आम्ही असाच मोबदला प्रत्येक माणसाला देत असतो, जो मर्यादेचे उल्लंघन करील आणि आपल्या पालनकर्त्याच्या आयतींवर ईमान न राखेल आणि निःसंशय आखिरत (मरणोत्तर जीवना) चा अज़ाब मोठा सक्त आणि चिरस्थायी आहे.

**१२८.** काय त्यांना या गोष्टीनेही मार्गदर्शन केले नाही की आम्ही त्यांच्यापूर्वी अनेक वस्त्या नष्ट करून टाकल्या आहेत. ज्या राहणाऱ्यांच्या जागेवर हेच चालत फिरत आहे निःसंशय अक्कलवान लोकांसाठी यात अनेक निशाण्या आहेत.

**१२९.** आणि तुमच्या पालनकर्त्याचा फैसला पाहिल्यापासून निर्धारित आणि काळ ठरविला गेलेला नसता तर याच क्षणी विनाश येऊन बिलगला असता.

**१३०.** तेव्हा त्यांच्या बोलण्यावर धीर- संयम राखा आणि आपल्या पालनकर्त्याची पवित्रता आणि महानता वर्णन करीत राहा, सूर्योदयापूर्वी आणि सूर्यास्तापूर्वी आणि रात्रीच्या वेगवेगळ्या हिश्श्यांमध्येही आणि दिवसाच्या हिश्श्यांमध्येही अल्लाहचे गुणगान करीत राहा. (अशाने) फार शक्य आहे की तुम्ही आनंदित व्हाल.

**१३१.** आणि आपली नजर कधीही त्या वस्तूंवर टाकू नया, ज्या आम्ही त्यांच्यापैकी अनेक लोकांना ऐहिक शोभा- सजावटीसाठी देऊन ठेवल्या आहेत, यासाठी की याद्वारे त्यांची कसोटी घ्यावी. तुमच्या पालनकर्त्याने प्रदान केलेलेच (फार) उत्तम आणि बाकी राहणारे आहे.

**१३२.** आणि आपल्या कुटुंबीयांना नमाजचा आदेश द्या आणि स्वतःही त्यावर दृढतापूर्वक राहा. आम्ही तुमच्याकडून रोजी (आजिविका) मागत नाही, उलट आम्ही स्वतः तुम्हाला रोजी देतो, शेवटी चांगली परिणती नेक व सदाचारी लोकांचीच होते.

**१३३.** आणि (ते) म्हणाले की या (पैगंबरां) ने आमच्यासाठी आपल्या पालनकर्त्यातर्फे एखादी निशाणी का नाही आणली? काय त्यांच्याजवळ पूर्वीच्या ग्रंथांच्या स्पष्ट निशाण्या पोहचल्या नाहीत?

**१३४.** आणि जर आम्ही याच्या आधीच त्यांना अज़ाबद्वारे नष्ट करून टाकले असते, तर खात्रीने असे म्हणाले असते की हे आमच्या पालनकर्त्या! तू आमच्याजवळ आपला रसूल (ईशदूत) का नाही पाठविला की आम्ही तुझ्या आयतींचे पालन केले असते, यापूर्वी की आम्ही अपमानित झालो असतो आणि धिःक्कारले गेले असतो.

**१३५.** त्यांना सांगा, प्रत्येकजण परिणामाच्या प्रतिक्षेत आहे, तेव्हा तुम्ही सुद्धा प्रतिक्षेत राहा. लवकरच पूर्णतः जाणून घ्याल की सरळ मार्गावर असलेले कोण आहेत आणि मार्ग प्राप्त केलेले कोण आहेत?

—-

# सूरह अम्बिया - २१

सूरह अम्बिया मक्का येथे अवतरली आणि यात एकशे बारा आयती आणि सात रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** लोकांच्या हिशोबाची वेळ जवळ येऊन पोहोचली आहे. तरीही ते गफलती (च्या अवस्थे) त तोंड फिरवून आहेत.

**२.** त्यांच्याजवळ, त्यांच्या पालनकर्त्यातर्फे ज्या देखील नवनवीन शिकवणी येतात, त्यांना ते खेळण्या बागडण्यातच ऐकतात.

**३.** त्यांची मने पूर्णतः गाफील आहेत आणि त्या अत्याचारींनी हळू हळू कानगोष्टी केल्यात की तो तुमच्यासारखाच मनुष्य आहे, मग तुम्ही डोळ्यांदेखत जादूला बळी पडण्याचे कारण काय?

**४.** (पैगंबर) म्हणाले, माझा पालनकर्ता आकाशात व धरतीत असलेल्या प्रत्येक गोष्टीस चांगल्या प्रकारे जाणतो. तो खूप खूप ऐकणारा आणि जाणणारा आहे.

**५.** (एवढेच नव्हे तर) हे असेही म्हणतात की हा कुरआन गोंधळपूर्ण स्वप्नांचा संग्रह आहे, किंबहुना त्याने स्वतःच रचून घेतला आहे, किंबहुना तो कवी आहे अन्यथा त्याने आमच्यासमोर एखादी अशी निशाणी आणली असती, जसे पूर्वीच्या काळातील पैगंबर पाठविले गेले होते.

**६.** यांच्यापूर्वी जेवढ्या वस्त्या आम्ही नष्ट केल्या, त्या ईमानधारक नव्हत्या, तेव्हा आता काय हे ईमान राखतील?

**७.** तुमच्यापूर्वी जेवढे देखील पैगंबर आम्ही पाठविले, ते सर्व मानव होते, ज्यांच्याकडे आम्ही वहयी (प्रकाशना) अवतरित करीत असू तेव्हा तुम्ही ज्ञानी लोकांना विचारा, जर स्वतः तुम्हाला ज्ञान नसेल.

**८.** आणि आम्ही त्यांना असे शरीर दिले नव्हते की भोजन करीत नसावेत आणि ना ते सदैव जिवंत राहणारे होते.

**९.** मग आम्ही त्यांच्याशी केलेले सर्व वायदे खरे करून दाखविले, त्यांना आणि ज्यांना ज्यांना आम्ही इच्छिले मुक्ती दिली आणि मर्यादेचे उल्लंघन करणाऱ्यांना नष्ट करून टाकले.

**१०.** निःसंशय, आम्ही तुमच्याकडे ग्रंथ अवतरित केला आहे, ज्यात तुमच्यासाठी बोध- उपदेश आहे. मग काय तरीही तुम्ही अकलेचा वापर करीत नाही?

**११.** आणि अनेक अत्याचारी वस्तींना आम्ही नष्ट करून टाकले, मग त्यांच्यानंतर आम्ही दुसरा जनसमूह निर्माण केला.

**१२.** जेव्हा त्या लोकांनी आमच्या शिक्षा- यातनेची जाणीव करून घेतली तेव्हा त्याच्या प्रकोपापासून दूर पळू लागले.

**१३.** धावपळ करू नका आणि जिथे तुम्हाला सुख प्रदान केले गेले होते, तिथेच परत जा आणि आपल्या घरांकडे जा, यासाठी की तुम्हाला विचारणा केली जावी.

**१४.** ते म्हणाले, आमचे वाईट होवो, निःसंशय आम्ही अत्याचारी होतो.

**१५.** मग तर ते असेच म्हणत राहिले, येथपर्यंत की आम्ही त्यांना मुळासकट कापलेल्या शेतीसारखे आणि विझलेल्या आगीसारखे करून टाकले.

**१६.** आम्ही आकाश व धरती आणि त्यांच्या दरम्यानच्या वस्तूंना खेळ- तमाशाकरिता बनविले नाही.

**१७.** जर आम्ही अशाच प्रकारे खेळ- तमाशा इच्छिला असता तर तो आपल्या जवळूनच बनविला असता, जर आम्ही असे करणारे असतो.

**१८.** किंबहुना आम्ही सत्याला असत्यावर फेकून मारतो तेव्हा सत्य असत्याचा शिरच्छेद करते आणि ते त्याच क्षणी नाश पावते. तुम्ही ज्या गोष्टी रचता, त्या तुमच्यासाठी विनाशकारक आहेत.

**१९.** आणि आकाशांमध्ये आणि धरतीत जे काही आहे, त्या (अल्लाह) चेच आहे आणि जे त्याच्या निकट आहेत ते त्याच्या उपासनेपासून ना विद्रोह करतात आणि ना थकतात.

**२०.** ते दिवस-रात्र त्याच्या पावित्र्याचे वर्णन करतात आणि किंचितही सुस्ती करत नाहीत.

**२१.** त्या लोकांनी धरतीच्या (सृष्ट निर्मिती) मधून ज्यांना उपास्य बनवून ठेवले आहे, काय ते जिवंत करतात?

**२२.** जर आकाशात आणि धरतीत अल्लाहखेरीज दुसरीही उपास्ये असती तर या दोघांची उलटापालट झाली असती.[१] तेव्हा अल्लाह अर्श (ईसिंहासना) चा स्वामी, त्या गुणवैशिट्यांपासून पवित्र आहे ज्या हे मूर्तीपूजक बोलतात.

**२३.** आपल्या कामांकरिता तो (कोणासमोर) उत्तरयायी नाही, मात्र सर्वांना (त्याच्यासमोर) जाब द्यावा लागणार आहे.

**२४.** काय त्या लोकांनी अल्लाहखेरीज दुसरी उपास्ये बनवून घेतली आहेत, त्यांना सांगा, आणा, आपला पुरावा सादर करा. हा आहे माझ्यासोबत असलेल्यांचा ग्रंथ आणि माझ्यापूर्वीच्या लोकांचा पुरावा! परंतु त्यांच्यापैकी बहुतेक लोक सत्यापासून अनभिज्ञ आहेत, याच कारणास्तव तोंड फिरवून आहेत.

**२५.** आणि आम्ही तुमच्यापूर्वी जो देखील पैगंबर पाठविला, त्याच्याकडे हीच वहयी (ईशवाणी) अवतरित केली की माझ्याखेरीज कोणीही खराखुरा उपास्य नाही, तेव्हा तुम्ही सर्व माझीच उपासना करा.

**२६.** आणि अनेकेश्वरवादी म्हणतात, रहमान (दयावंत अल्लाह) ला संतती आहे. (मुळीच नाही.) तो पवित्र आहे. किंबहुना ते (ज्यांना हे त्याचे पुत्र समजतात) त्याचे प्रतिष्ठित दास आहेत.

---

(१) अर्थात जर खरोखर आकाश आणि धरतीचे दोन ईश्वर असते तर या जगाच्या स्वामीत्वावर दोन सामर्थ्य हक्कदार राहिली असती. दोघांचा संकल्प, बुद्धी आणि मर्जी कार्यरत राहिली असती. मग दोन मर्जी व फैसले असते तर सृष्टी-व्यवस्था कायम राहूच शकली नसती, जी सुरुवातीपासून अखंड चालत आली आहे. अर्थात दोघांच्या मर्जीत आपसात संघर्ष झाला असता आणि दोघांची आवड परस्पर विरोधी असती. परिणामी अस्ताव्यस्तता आणि विनाशाचा उद्रेक झाला असता. आतापावेतो असे घडले नाही. तेव्हा याचा अर्थ स्पष्ट आहे की या जगात केवळ एकच सामर्थ्य आहे, ज्याची मर्जी व आदेश चालतो. जे काही घडते केवळ त्याच्या आदेशानुसारच घडते. त्याने प्रदान केलेल्यास कोणी रोखू शकत नाही आणि ज्याच्यापासून तो आपली दया-कृपा रोखेल त्याला कोणी देऊही शकत नाही.

**२७.** त्याच्या (अल्लाहच्या) समोर पुढे होऊन बोलण्याचे साहस करीत नाही आणि त्याच्या आदेशाचे पालन करतात.

**२८.** तो (अल्लाह) त्यांच्यापूर्वीच्या आणि नंतरच्या सर्व अवस्था जाणून आहे. आणि ते कोणाचीही शिफारस करीत नाही, त्याच्याखेरीज, ज्याच्याशी तो (अल्लहा) प्रसन्न असेल, ते तर स्वतः भयकंपित राहतात.

**२९.** आणि त्यांच्यापैकी कोणी जर सांगेल की अल्लाहखेरीज मी इलाह (पूजनीय) आहे तर आम्ही त्याला जहन्नमची शिक्षा देऊ. जुलमी व अत्याचारींना आम्ही अशाच प्रकारे शिक्षा देतो.

**३०.** काय इन्कार करणाऱ्यांनी हे नाही पाहिले की (हे) आकाश व धर्ती (सर्व) आपसात जुळलेले होते, मग आम्ही त्यांना वेगळे वेगळे केले आणि प्रत्येक सजीवाला आम्ही पाण्यापासून निर्माण केले, मग काय हे लोक तरीही विश्वास करत नाहीत?

**३१.** आणि आम्ही जमिनीवर पर्वत रचले, यासाठी की तिने ईशनिर्मितीला हलवू न शकावे आणि आम्ही तिच्यात त्यांच्या दरम्यान रुंद रस्ते बनविले, यासाठी की लोकांना मार्ग लाभू शकावा.

**३२.** आणि आकाशाला आम्ही एक सुरक्षित छत बनविले आहे. परंतु हे लोक त्याच्या निशाण्यांवर लक्ष देत नाही.

**३३.** आणि तोच (अल्लाह) आहे, ज्याने रात्र व दिवसाला आणि सूर्य व चंद्राला बनविले. त्यांच्यापैकी प्रत्येक आपापल्या कक्षेत तरंगत आहे.[१]

**३४.** आणि तुमच्यापूर्वी आम्ही कोणत्याही माणसाला चिरसजीवता दिली नाही, मग काय, जर तुम्ही मरण पावला तर हे सदैव काळ इथे राहतील?[२]

---

(१) ज्या प्रकारे पोहणारा इसम पाण्यावर तरंगत असतो, तद्वतच चंद्र आणि सूर्य आपापल्या कक्षेत आपल्या निर्धारीत गतीने भ्रमण करतात.

(२) हे अविश्वासी लोकांच्या उत्तरादाखल आहे जे पैगंबर (स.) विषयी म्हणत की एक दिवस तुम्ही मरणारच आहात. त्यावर अल्लाहने फर्माविले की मृत्यु प्रत्येकाला येणार आहे. तेव्हा या नियमाला पैगंबर देखील अपवाद नाहीत, कारण तेही एक मानव आहेत आणि आम्ही कोणालाही सदैव काळ जिवंत राहण्यासाठी सोडले नाही, तेव्हा बोलणारेही नेहमीसाठी इथे राहणार नाहीत. याद्वारे मूर्तीपूजक आणि कबरींची पूजा करणाऱ्यांचेही खंडन झाले, जे देवता, पैगंबर आणि थोर बुजूर्गांच्या सदैव जिवंत

**३५.** प्रत्येक जीवाला मृत्युचा स्वाद चाखायचा आहे आणि आम्ही कसोटी घेण्याकरिता तुम्हाला चांगल्या- वाईट अवस्थेत टाकतो आणि तुम्ही सर्वच्या सर्व आमच्याचकडे परतून याल.

**३६.** आणि ज्या लोकांनी कुफ्र (अविश्वास) केला, ते जेव्हा तुम्हाला पाहतात तेव्हा तुमची थट्टा उडवितात (सांगतात) की, हाच काय तो, जो तुमच्या दैवतांची चर्चा वाईटरित्या करतो? मात्र ते स्वतःच रहमान (दयावान अल्लाह) चा उल्लेख (महिमागान) करण्यास इन्कार करतात.

**३७.** मानव जन्मजात उतावळा आहे. मी तुम्हाला आपल्या निशाण्या (चिन्हे) लवकरच दाखविन. तुम्ही माझ्याशी घाई करू नका.

**३८.** आणि म्हणतात की जर खरे असाल तर सांगा की तो वायदा (शिक्षा-यातनेचा) केव्हा पूर्ण होईल?

**३९.** जर या काफीर लोकांना जाणीव असती की त्या वेळी ना तर हे आगीला आपल्या चेहऱ्यांवरून हटवू शकतील आणि ना आपल्या पाठीवरून आणि ना यांची मदत केली जाईल.

**४०.** होय! वायद्याची वेळ (कयामतचा दिवस) त्यांच्याजवळ अचानक येऊन पोहोचेल आणि त्यांना आश्चर्यचकित करून सोडेल, मग ना तर हे ती वेळ टाळू शकतील आणि ना त्यांना किंचितही सवड दिली जाईल.

**४१.** आणि तुमच्या पूर्वीच्या पैगंबरांचीही थट्टा उडविली गेली तर ज्यांनी थट्टा उडवली, त्यांना त्याच गोष्टीने येऊन घेरले, जिची ते थट्टा उडवित होते.

**४२.** त्यांना विचारा की रहमान (दयाळू अल्लाह) पासून रात्रंदिवस तुमचे रक्षण कोण करू शकतो? किंबहुना हे आपल्या पालनकर्त्याचे स्मरण (महिमागान) करण्यापासून परावृत्त झाले आहेत.

---

असण्याचा भ्रम राखतात आणि या श्रद्धेच्या आधारावर त्यांना आपला दुःखनिवारक, संकटविमोचक, मुश्किलकुशा वगैरे समजतात. या चुकीच्या धारणेपासून सर्वश्रेष्ठ अल्लाह आमचे रक्षण करो.

**४३.** काय आमच्याखेरीज त्यांचा दुसरा कोणी उपास्य आहे, जो त्यांना संकटापासून वाचवित असेल. कोणीही स्वतः आपली मदत करण्याचे सामर्थ्य बाळगत नाही आणि ना कोणी आमच्या विरोधात साथ देऊ शकतो.

**४४.** किंबहुना आम्ही यांना आणि यांच्या बुजूर्ग लोकांना जीवनसामुग्री प्रदान केली, येथेपर्यंत की त्यांच्या आयुष्याची हद्द संपली. काय ते नाही पाहात की आम्ही जमिनीला तिच्या किनाऱ्याकडून घटवित चालत आलो आहोत? तर आता काय तेच वर्चस्वशाली आहेत?

**४५.** सांगा, मी तर केवळ तुम्हाला अल्लाहच्या वहयी (ईशवाणी) द्वारे सचेत करतो, परंतु बधीर माणसे हाक ऐकत नाहीत, जेव्हा त्यांना सावध केले जात असेल.

**४६.** आणि जर त्यांना तुमच्या पालनकर्त्याच्या शिक्षा- यातनेची नुसती वाफ जरी लागली तर उद्‌गारतील, अरेरे! आमचा विनाश! निःसंशय आम्ही अत्याचारी होतो.

**४७.** आणि आम्ही कयामतच्या दिवशी त्यांच्या दरम्यान यथायोग्य वजन करणारा तराजू आणून ठेवू, मग कोणावर कशाही प्रकारचा जुलूम केला जाणार नाही आणि जर एक राईच्या दाण्याइतकेही कर्म असेल तर तेही आम्ही समोर आणू, आणि आम्ही हिशोब घेण्यासाठी पुरेसे आहोत.

**४८.** आणि हे पूर्णतः सत्य आहे की आम्ही मूसा आणि हारून यांना निर्णय करणारा दिव्य आणि नेक सदाचारी लोकांकरिता बोध-उपदेशपूर्ण ग्रंथ प्रदान केला आहे.

**४९.** ते लोक, जे न पाहता आपल्या पालनकर्त्याचे भय बाळगतात आणि जे कयामत (च्या विचारा) ने भयकंपित राहतात.

**५०.** आणि हा बोध- उपदेश आणि बरकतपूर्ण कुरआन आम्हीच अवतरित केला आहे. मग काय तरीही तुम्ही याचा इन्कार करता?

**५१.** आणि निःसंशय, आम्ही याच्यापूर्वी इब्राहीमला सामंजस्य प्रदान केले होते, आणि त्याच्या अवस्थेशी चांगल्या प्रकारे परिचित होतो.

**५२.** जेव्हा ते आपल्या पित्यास आणि आपल्या जमातीच्या लोकांना म्हणाले की या मूर्त्या, ज्यांचे तुम्ही पुजारी बनून बसला आहात, हे काय आहे?

**५३.** ते म्हणाले, आम्हाला आमचे वाडवडील यांचीच उपासना करताना आढळले आहेत.[१]

**५४.** इब्राहीम म्हणाले, मग तर तुम्ही आणि तुमचे वाडवडील उघड अशा मार्गभ्रष्टतेत होते.

**५५.** लोक म्हणाले, काय तुम्ही खरोखर सत्य घेऊन आला आहात की उगाच थट्टा-मस्करी करत आहात?

**५६.** इब्राहीम म्हणाले, (नव्हे) किंबहुना, खरोखर तुमचा स्वामी व पालनकर्ता आकाशांचा आणि जमिनीचा स्वामी व पालनकर्ता आहे, ज्याने त्यां ना निर्माण केले आहे आणि मी तर याच गोष्टीचा साक्षी (आणि मानणारा) आहे.

**५७.** आणि अल्लाहची शपथ, मी तुमच्या या उपास्यांचा इलाज जरूर करेन जेव्हा तुम्ही पाठ फिरवून चालते व्हाल.

**५८.** तेव्हा त्यांनी त्या सर्वांचे तुकडे तुकडे करून टाकले, केवळ मोठ्या मूर्तीला सोडून दिले, तेही अशासाठी की, त्या लोकांनी त्याच्याकडे वळावे.

**५९.** ते म्हणाले की आमच्या दैवतांची ही दुर्दशा कोणी केली, असा मनुष्य खात्रीने अत्याचारी असेल.

**६०.** म्हणाले की आम्ही एका तरुणाला यांच्याविषयी बोलताना ऐकले होते ज्याला इब्राहीम म्हटले जाते.

---

(१) ज्याप्रमाणे आज देखील अज्ञान आणि अंधश्रद्धेत अडकलेल्या मुसलमानांना बिदअत (इस्लाम धर्मात नव्या गोष्टी निर्माण करणे, ज्यांचा इस्लाम धर्माच्या तत्त्वाशी, नियमांशी काहीच संबंध किंवा पुरावा उपलब्ध नसावा) आणि चुकीच्या प्रथांना रोखले जाते, तेव्हा म्हणतात, आम्ही हे रीतीरिवाज कसे बरे सोडावेत, वास्तविक आम्ही आपल्या पूर्वजांना असेच करताना पाहिले आहे, आणि हेच उत्तर ते लोक देखील देतात जे कुरआन आणि पैगंबर (रस.) यांच्या आचरणशैलीच्या आदेशांना सोडून धर्मज्ञानी (आलिम) आणि धर्मशास्त्राचे ज्ञानी (फिकह) यांच्याशी संबंधित राहणेच आवश्यक समजतात.

**६१.** ते म्हणाले, तर त्याला सर्वांच्या डोळ्यांसमोर घेऊन या, यासाठी की सर्वांनी त्याला पाहून घ्यावे.

**६२.** म्हणू लागले, हे इब्राहीम! काय तूच आमच्या दैवतांची ही दुर्दशा केली आहेस ?

**६३.** इब्राहीम यांनी उत्तर दिले, किंबहुना हे काम तर त्यांच्यातल्या मोठ्या दैवताने केले आहे. तुम्ही आपल्या दैवतांनाच विचारा, जर ते बोलत असतील.

**६४.** यास्तव त्यांनी आपल्या मनात मान्य केले आणि (मनातल्या मनात) म्हणाले, खरोखर, तुम्ही स्वतः अत्याचारी आहात.

**६५.** मग माना खाली घालून (काही विचार करून जरी त्यांनी मान्य केले होते, तरीही म्हणाले) तुम्ही चांगले जाणता की हे बोलत नाहीत.

**६६.** (इब्राहीम) त्याच क्षणी म्हणाले, अरेरे! काय तुम्ही अशांची उपासना करता, जे तुम्हाला ना काही लाभ पोहचवू शकतात आणि ना हानी!

**६७.** धिःक्कार असो तुमचा आणि त्यांचा, ज्यांची तुम्ही अल्लाहखेरीज उपासना करता, काय तुम्हाला एवढी सुद्धा अक्कल नाही ?

**६८.** ते म्हणाले, जर तुम्हाला काही करायचेच आहे तर याला जाळून टाका आणि आपल्या उपास्यांची मदत करा.

**६९.** आम्ही फर्माविले, हे अग्नी! तू इब्राहीमकरिता सलामतीपूर्वक थंड हो.

**७०.** त्या लोकांनी इब्राहीमचे वाईट इच्छिले असले तरी आम्ही त्यांनाच असफल केले.

**७१.** आणि आम्ही (इब्राहीम) आणि लूतला वाचवून त्या भूभागाकडे नेले, ज्यात आम्ही साऱ्या जगाकरिता सुख-समृद्धी ठेवली होती.

**७२.** आणि आम्ही त्यांना इसहाक प्रदान केला आणि त्यावर आणखी याकूब आणि प्रत्येकाला नेक सदाचारी बनविले.

**७३.** आणि आम्ही त्यांना इमाम (पेशवा) बनविले, यासाठी की आमच्या हुकुमानुसार लोकांना मार्गदर्शन करावे आणि आम्ही त्यांच्याकडे सत्कर्म करण्याची, नमाज कायम करण्याची आणि जकात अदा करण्याची वहयी (प्रकाशना) केली आणि ते सर्वच्या सर्व

आमचे उपासक होते.

**७४.** आणि आम्ही लूतलाही हिकमत आणि ज्ञान प्रदान केले आणि त्यांची त्या वस्तीपासून सुटका केली, जिथले लोक घाणेरड्या कामांमध्ये लिप्त होते आणि वस्तुतः ते मोठे वाईट अपराधी लोक होते.

**७५.** आणि आम्ही त्यांना (लूतला) आपल्या दया-कृपेत सामील करून घेतले. निःसंशय ते नेक- सदाचारी लोकांपैकी होते.

**७६.** आणि नूहचा तो काळ (आठवा) जेव्हा त्यांनी यापूर्वी दुआ (विनंती) केली. आम्ही त्यांची दुआ कबूल केली आणि आम्ही त्यांना आणि त्यांच्या कुटुंबाला फार मोठ्या दुःखातून सोडविले.

**७७.** आणि त्या जनसमूहाच्या विरोधात त्यांची मदत केली, ज्याने आमच्या आयतींना खोटे ठरविले होते. वास्तविक ते फार वाईट लोक होते, तेव्हा आम्ही त्या सर्वांना बुडवून टाकले.

**७८.** आणि दाऊद आणि सुलेमान यांचेही (स्मरण करा) जेव्हा ते शेताबाबत निर्णय करीत होते की काही लोकांच्या शेळ्या त्या शेतात घुसून चरल्या आणि त्यांच्या निर्णयात आम्ही हजर होतो.

**७९.** तेव्हा आम्ही त्याचा यथार्थ फैसला सुलेमानला समजावून दिला. निःसंशय आम्ही प्रत्येकाला हिकमत आणि ज्ञान प्रदान केले होते आणि पर्वतांना दाऊदच्या अधीन केले होते जे अल्लाहची तस्बीह (महिमागान) करीत असत, आणि पक्ष्यांनाही असेच आम्ही करणारे होतो.

**८०.** आणि आम्ही दाऊदला तुमच्यासाठी युद्धाचा पोषाख (चिलखत) बनविणे शिकविले, यासाठी की युद्धा (च्या हानी) पासून तुमचे रक्षण करू शकावे, मग काय तुम्ही आता कृतज्ञशील व्हाल?

**८१.** आणि आम्ही वेगवान हवेला सुलेमानच्या अधीन केले, जी त्यांच्या आदेशानुसार अशा जमिनीकडे वाहत असे, जिच्यात आम्ही समृद्धी (बरकत) राखली होती, आणि आम्ही प्रत्येक गोष्टीला जाणतो.

**८२.** आणि (अशाच प्रकारे) अनेक सैतानांना देखील (त्यांचे ताबेदार बनविले होते) जे सुलेमानच्या हुकुमानुसार (समुद्रात) बुडी घेत असत आणि याशिवाय इतर अनेक कामे करीत असत आणि त्यांचे रक्षणकर्ता आम्हीच होतो.

**८३.** आणि अय्यूब (च्या त्या अवस्थेची आठवण करा) जेव्हा त्यांनी आपल्या पालनकर्त्याला पुकारले की मला हा रोग लागला आहे आणि तू सर्व दया करणाऱ्यांपेक्षा जास्त दया करणारा आहेस.

**८४.** तेव्हा आम्ही त्यांची (प्रार्थना) ऐकली आणि जे दुःख त्यांना होते ते दूर केले आणि त्यांना त्यांचे कुटुंब प्रदान केले, किंबहुना, त्यांना आपल्या खास दया कृपेने[१] त्यासोबत तसेच आणखीही दिले, यासाठी की उपासना करणाऱ्यांकरिता उपदेशकारक ठरावे.

**८५.** आणि इस्माईल आणि इदरीस आणि जुलकिफ्ल हे सर्व धीर-संयम राखणारे होते.

**८६.** आम्ही त्यांना आपल्या दया-कृपेत दाखल करून घेतले, ते सर्व नेक- सदाचारी लोक होते.

**८७.** आणि मासळीवाल्या (यूनुस अलै.) ची (आठवण करा) जेव्हा ते नाराज होऊन निघून गेले आणि असे समजत होते की आम्ही त्यांना धरणार नाही. शेवटी त्यांनी त्या अंधारांमधून पुकारले, हे उपासनीय (अल्लाह)! तुझ्याखेरीज कोणीही उपास्य नाही. तू पवित्र आहेस. निश्चितच मी अत्याचारी लोकांपैकी आहे.

**८८.** तेव्हा आम्ही त्यांची पुकार (विनंती) मान्य केली आणि त्यांना दुःखातून मुक्त केले आणि आम्ही अशा प्रकारे ईमान राखणाऱ्यांना वाचवितो.

**८९.** आणि जकरियाचे (स्मरण करा) जेव्हा त्यांनी आपल्या पालनकर्त्याजवळ दुआ

---

(१) पवित्र कुरआनात पैगंबर हजरत अय्यूब यांना साबिर (धैर्यवान) म्हटले गेले आहे. (सूरह साद) अर्थात त्यांची कसोटी घेतली गेली, ज्यात त्यांनी कृतज्ञता, धीर-संयम कायम राखला. ती कसोटी आणि त्या कष्ट-यातना कशा होत्या याचे यथार्थ वर्णन उपलब्ध नाही, तरीही कुरआनाच्या माध्यमाने कळते की सर्वश्रेष्ठ अल्लाहने त्यांना धन, धान्य आणि पुत्र प्रदान केले होते. पुढे कसोटीकरिता अल्लाहने हे सर्व हिरावून घेतले येथपावेतो की, शारीरिक शक्तीही कमकुवत केली, यास्तव व्याधिग्रस्त झाले होते. शेवटी, असे म्हटले जाते की १८ वर्षांच्या कसोटीनंतर अल्लाहच्या समोर दुआ (प्रार्थना) केली. अल्लाहने दुआ कबूल केली आणि स्वास्थ्यलाभासोबतच धन-धान्य आणि पुत्र पहिल्यापेक्षा दुप्पट प्रदान केले. याचे काही वर्णन सहीह इब्ने हिब्बानच्या एका कथनात आढळते.

(प्रार्थना) केली की हे माझ्या पालनकर्त्या! मला तू एकटा सोडू नको. तू सर्वांत उत्तम वारस आहेस.

**९०.** तेव्हा आम्ही त्यांची दुआ (प्रार्थना) स्वीकारली आणि त्यांना यहया (नावाचा पुत्र) प्रदान केला, आणि त्यांच्या पत्नीला त्यांच्यासाठी यथायोग्य बनविले. हे नेक- सदाचारी लोक सत्कर्मांकडे लवकर धाव घेत, आणि आम्हाला मोठ्या आवडीने भय राखून पुकारत असत, आणि आमच्या समोर मोठ्या नम्रतेने राहात असत.

**९१.** आणि ती (सत्शील स्त्री) जिने आपल्या शील-अब्रुचे रक्षण केले, आम्ही तिच्यात आपला आत्मा फुंकला आणि स्वतः तिला आणि तिच्या पुत्राला साऱ्या जगाकरिता निशाणी (चिन्ह) बनविले.

**९२.** हा तुमचा समूह आहे, जो वास्तविक एकच समूह आहे आणि मी तुम्हा सर्वांचा पालनकर्ता आहे, यास्तव तुम्ही सर्व माझीच उपासना करा.

**९३.** परंतु लोकांनी आपसात आपल्या दीन (धर्मा) मध्ये गट बनवून घेतले (तथापि) सर्वांना आमच्याकडे परतून यायचे आहे.[१]

**९४.** मग जो कोणी सत्कर्म करेल आणि तो ईमानधारकही असेल तर त्याच्या प्रयत्नांची काहीच उपेक्षा होणार नाही. आम्ही तर त्याचे लिहिणारे आहोत.

**९५.** आणि ज्या वस्तीला आम्ही नष्ट करून टाकले, तिच्याकरिता अनिवार्य आहे की तिथले लोक परतून येणार नाहीत.

**९६.** येथेपर्यंत की याजूज आणि माजूज बंधनमुक्त केले जातील आणि ते प्रत्येक उताराकडून धावत येतील.

**९७.** आणि सच्चा वायदा जवळ येऊन ठेपेल, त्या वेळी काफिर लोकांचे डोळे विस्फारलेलेच राहतील की अरेरे! आम्ही या अवस्थेपासून गाफील होतो, किंबहुना खरे

(१) अर्थात तौहीद (अद्वैत) आणि अल्लाहची उपासना सोडून अनेक जमाती आणि समूहांमध्ये विभागले गेले. एक समूह अनेकेश्वरवादी आणि काफिर लोकांचा बनला आणि पैगंबरांना मानणारेही वेगवेगळे झाले. कोणी यहूदी बनला कोणी ख्रिश्चन बनला तर कोणी अन्य काही. दुर्दैवाने मुसलमानांनामध्ये देखील गटबाजी निर्माण झाली आणि ते सुद्धा अनेकानेक समूहांमध्ये विभागले गेले. या सर्वांचा न्याय, जेव्हा हे अल्लाहच्या समोर हजर केले जातील, तेव्हा तिथेच होईल.

पाहता आम्ही अत्याचारी होतो.

**९८.** तुम्ही आणि ते, ज्यांची अल्लाहखेरीज तुम्ही उपासना करता, सर्व जहन्नमचे इंधन बनाल, तुम्ही सर्व त्या (जहन्नम) मध्ये जाणार आहात.

**९९.** जर ते (सच्चे) उपास्य असते तर जहन्नममध्ये दाखल झाले नसते, आणि सर्वच्या सर्व त्यातच नेहमी राहणार आहेत.

**१००.** ते त्या ठिकाणी मोठमोठ्याने ओरडत असतील आणि तिथे काहीच ऐकू शकणार नाहीत.

**१०१.** परंतु ज्यांच्यासाठी आमच्यातर्फे पहिल्यापासूनच सत्कर्म निश्चित आहे, ते सर्व जहन्नमपासून दूरच ठेवले जातील.

**१०२.** ते तर, जहन्नमची चाहूलही ऐकू शकणार नाहीत आणि आपल्या मनोवांछित वस्तूंसह सदैव राहणारे असतील.

**१०३.** ती भयंकर दहशतही त्यांना उदास करू शकणार नाही आणि फरिश्ते त्यांचे उत्स्फूर्तपणे स्वागत करतील की हाच तुमचा तो दिवस आहे, ज्याचा तुम्हाला वायदा दिला जात राहिला.

**१०४.** ज्या दिवशी आम्ही आकाशाला अशा प्रकारे गुंडाळून टाकू, ज्या प्रकारे रोलचे कागद (पत्रिका) गुंडाळले जातात. ज्या प्रकारे पहिल्या खेपेस आम्ही निर्माण केले होते, त्याच प्रकारे दुसऱ्यांदा निर्माण करू. हा आमचा मजबूत वायदा आहे आणि हे आम्ही निश्चितच करू.

**१०५.** आणि आम्ही जबूर (ग्रंथा) मध्ये सावधगिरीचा इशारा आणि बोध- उपदेशानंतर हे लिहिले आहे की धरतीचे वारस माझे नेक-सदाचारी दास असतील.

**१०६.** उपासना करणाऱ्या दासांकरिता तर यात एक मोठी खबर आहे.

**१०७.** आणि आम्ही तुम्हाला समस्त विश्वाकरिता दया-कृपा बनवून पाठविले आहे.

**१०८.** सांगा की माझ्याकडे तर वहयी (ईशवाणी) केली जाते की तुम्हा सर्वांचा उपास्य (अल्लाह) एकच आहे. तर काय तुम्हीही त्याचे मानणारे आहात?

**१०९.** मग जर तो तोंड फिरविल तर सांगा की मी तुम्हाला समानरित्या सचेत केले आहे. आणि मला नाही माहीत की, ज्या गोष्टीचा वायदा तुमच्याशी केला जात आहे, ती जवळ आहे की लांब आहे.

**११०.** नि:संशय (अल्लाह) तुमच्या उघड गोष्टींनाही जाणतो, तसेच जे काही तुम्ही लपविता ते देखील जाणतो.

**१११.** आणि मला याचेही ज्ञान नाही. संभवतः ही तुमची कसोटी असेल आणि एका निर्धारित अवधीपर्यंतचा लाभ असेल.

**११२.** (पैगंबर) स्वतः म्हणाले, हे पालनकर्त्या! न्यायपूर्वक फैसला कर आणि आमचा पालनकर्ता अंतिशय दया करणारा आहे, ज्याच्याकडून मदत मागितली जाते त्या गोष्टीबद्दल, ज्या तुम्ही सांगत आहात.

—-

## सूरह हज्ज - २२

सूरह हज्ज मदीना येथे अवतरली आणि यात अठ्याहत्तर आयती आणि दहा रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** लोक हो! आपल्या पालनकर्त्याचे भय राखा, नि:संशय कयामतचा भूकंप फार जबरदस्त गोष्ट आहे.

**२.** ज्या दिवशी तुम्ही तो पाहाल, प्रत्येक दूध पाजणारी माता आपल्या दूध पिणाऱ्या बाळाला विसरेल आणि सर्व गर्भवती स्त्रियांचा गर्भपात होईल, आणि तुम्ही पाहाल की लोक मदहोश दिसून येतील, वास्तविक मदहोश नसतील, परंतु अल्लाहचा अज़ाब (शिक्षा- यातना) मोठा कठोर आहे.

**३.** आणि काही लोक अल्लाहविषयी अज्ञानपूर्ण गोष्टी बोलतात, आणि प्रत्येक उदंड सैतानाचे अनुसरण करतात.

**४.** ज्याच्याबद्दल अल्लाहचा फैसला लिहिला गेला आहे की जो कोणी त्याच्याशी दोस्ती करेल, तो त्याला मार्गभ्रष्ट करेल आणि त्याला आगीच्या शिक्षा-यातनेकडे नेईल.

**५.** लोकांनो! जर तुम्हाला मेल्यानंतर (पुन्हा) जिवंत होण्याबाबत शंका आहे, तर विचार करा, आम्ही तुम्हाला मातीपासून निर्माण केले, मग वीर्यापासून, मग जमलेल्या रक्तापासून, आणि मांसाच्या तुकड्यापासून जे रूप दिले गेले होते आणि विनारूपही होते. हे आम्ही तुमच्यावर स्पष्ट करतो आणि आम्ही ज्याला इच्छितो एका निर्धारित अवधीपर्यंत मातेच्या उदरात ठेवतो, मग तुम्हाला बाळाच्या रूपाने या जगात आणतो मग यासाठी की तुम्ही आपल्या पूर्ण तरुणपणास पोहचावे, तुमच्यापैकी काही असे आहेत जे मरण पावतात आणि काही जीर्ण वयाकडे पुन्हा परतविले जातात की ते एका गोष्टीशी परिचित झाल्यानंतर दुसऱ्यांदा अनभिज्ञ व्हावेत. तुम्ही पाहता की जमीन नापीक आणि कोरडी आहे, मग जेव्हा आम्ही तिच्यावर पाऊस पाडतो तेव्हा ती चेतनामय होते आणि फुगते आणि प्रत्येक प्रकारची सुंदर वनस्पती उगविते.

**६.** हे अशासाठी की अल्लाहच सत्य आहे आणि तोच मेलेल्यांना जिवंत करतो आणि तो प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्य बाळगतो.

**७.** आणि हे की कयामत निश्चितच येणार आहे, ज्याबाबत कसलीही शंका नाही आणि अगदी खात्रीने अल्लाह कबरीत असलेल्यांना दुसऱ्यांदा जिवंत करेल.

**८.** आणि काही लोक अल्लाहविषयी ज्ञानाविना, आणि मार्गदर्शनाविना आणि कोणत्याही दिव्य ग्रंथाविना वाद घालतात.

**९.** आपला पैलू वळवून घेणारा बनून (ताठरपणे) यासाठी की अल्लाहच्या मार्गापासून भ्रष्ट करावे तो या जगातही अपमानित होईल, आणि कयामतच्या दिवशीही आम्ही त्याला जहन्नमच्या आगीत जळण्याची शिक्षा - यातना चाखवू.

**१०.** हे त्या कर्मांपायी, जी तुझ्या हातांनी पुढे पाठविली होती, मात्र विश्वास राखा की अल्लाह आपल्या दासांवर अत्याचार करणारा नाही.

**११.** आणि काही लोक असेही आहेत, जे एका किनाऱ्याला राहून अल्लाहची उपासना करतात, जर काही लाभ झाला तर समाधानी होतात, आणि जर एखादे दुःख वाट्याला आले तर त्याच क्षणी माघारी फिरतात. त्यांनी इहलोक आणि परलोक दोघांचे नुकसान उचलले. वस्तुतः हेच उघड नुकसान आहे.

**१२.** ते अल्लाहखेरीज त्यांना पुकारतात जे ना नुकसान पोहचवू शकतात ना फायदा.

हीच ती दूरची मार्गभ्रष्टता आहे.

**१३.** अशाला पुकारतात ज्यांचे नुकसान, लाभापेक्षा अधिक जवळ आहे निःसंशय मोठे वाईट संरक्षक आहेत आणि वाईट दोस्त.

**१४.** निःसंशय, ईमान (राखून) सत्कर्म करणाऱ्यांना अल्लाह, अशा जन्नतमध्ये दाखल करील जिच्या खाली प्रवाह वाहत असतील. अल्लाह जे इच्छितो ते निश्चित करतो.

**१५.** ज्याला हे वाटत असेल की अल्लाह आपल्या पैगंबरांची मदत दोन्ही लोकात (इहलोक आणि परलोक) करणार नाही, तर त्याने उंच जागी एक दोर बांधून (आपल्या गळ्यात फास टाकून घ्यावा) आणि गळा घोटून घ्यावा, मग पाहावे की त्याच्या चतुराईने ती गोष्ट दूर होते जी त्याला कासाविस करीत आहे.

**१६.** आणि आम्ही अशआच प्रकारे या कुरआनाला स्पष्ट आयतींमध्ये अवतरित केले आहे आणि अल्लाह ज्याला इच्छितो, मार्गदर्शन करतो.

**१७.** ईमान राखणारे, आणि यहूदी (ज्यू) आणि विधर्मी आणि ख्रिश्चन आणि अग्नीपूजक आणि अनेकेश्वरवादी या सर्वांच्या दरम्यान अल्लाह स्वतः निर्णय करील. अल्लाह प्रत्येक गोष्टीस साक्षी आहे.

**१८.** काय तुम्ही नाही पाहात की अल्लाहच्या समोरच सजदा करतात जे आकाशात आहेत आणि जमिनीवर आहेत. त्याचप्रमाणे सूर्य, चंद्र, तारे, पर्वत, वृक्ष, पशू आणि सजीव[१] आणि अनेक मानव देखील. होय बहुतेक असेही आहेत, ज्यांना (अल्लाहची) शिक्षा- यातना लागू झाली आहे आणि ज्याला अल्लाह अपमानित करेल, त्याला मान-प्रतिष्ठा देणारा कोणी नाही, अल्लाह जे इच्छितो ते करतो.

**१९.** हे दोन्ही आपल्या पालनकर्त्याविषयी मतभेद राखणारे आहेत, तेव्हा इन्कारी लोकांकरिता आगीचे कपडे, माप घेऊन कापले जातील, आणि त्यांच्या डोक्यांवर

---

(१) काही भाष्यकारांच्या मते या सजद्याशी अभिप्रेत त्या सर्व वस्तूंचे अल्लाहच्या हुकुमा अधीन होणे आहे. कोणाची मजाल नाही की अल्लाहच्या आदेशाची अवज्ञा करू शकेल. त्यांच्या मते सजदा आणि उपासना आणि वंदनाच्या अर्थाने नाही, जो केवळ अक्कलवान जिवंत असलेल्यांकरिता खास आहे. वास्तविक काही भाष्यकारांनी यास कल्पनेऐवजी खऱ्या अर्थाने घेतले आहे की समस्त सृष्टीतील प्रत्येक सजीव निर्जीव वस्तू आपापल्या पद्धतीने सर्वश्रेष्ठ अल्लाहच्या समोर माथा टेकत आहे.

उकळत्या पाण्याची धार सोडली जाईल.

**२०.** ज्याद्वारे त्याच्या पोटातील सर्व वस्तू आणि चामडी वगैरे गळून पडेल.

**२१.** आणि त्यांना शिक्षा- यातना देण्यासाठी लोखंडी हातोडे आहेत.

**२२.** हे जेव्हा जेव्हा तिथल्या दु:ख-यातनेपासून पळ काढण्याचा इरादा करतील, तिथे (पुन्हा) परतविले जातील आणि (त्यांना सांगितले जाईल) जळण्याच्या शिक्षेची गोडी चाखा.

**२३.** नि:संशय, ईमान राखणाऱ्या आणि सत्कर्म करणाऱ्यांना अल्लाह अशा जन्नतमध्ये दाखल करील, ज्यांच्या खाली प्रवाह वाहत आहेत. जिथे त्यांना सोन्याची कांकणे घातली जातील आणि अस्सल मोतीही, त्या ठिकाणी त्यांचे वस्त्र निर्भेळ रेशमाचे असेल.

**२४.** आणि त्यांना पवित्र वचनाचा मार्ग दाखविला गेला आणि प्रशंसनीय (अल्लाहचे) मार्गदर्शन दिले गेले.

**२५.** ज्या लोकांनी कुफ्र (इन्कार) केला, आणि अल्लाहच्या मार्गापासून रोखू लागले आणि त्या आदरणीय मस्जिदीपासूनही, जिला आम्ही समस्त लोकांकरिता एकसमान केले आहे, मग तिथले रहिवाशी असोत किंवा बाहेरून आलेले असोत, जो देखील अत्याचारपूर्वक त्या ठिकाणी मार्गभ्रष्ट होण्याचा विचार करील, आम्ही त्याला दु:खदायक अज़ाब (शिक्षा-यातने) ची गोडी चाखवू.

**२६.** आणि जेव्हा आम्ही इब्राहीमकरिता काबागृहाचे स्थान निश्चित केले (या अटीवर) की माझ्यासोबत दुसऱ्या कोणाला सामील करू नका आणि माझ्या घराला तवाफ (प्रदक्षिणा) करणाऱ्या, उभे राहणाऱ्या, रुकूअ आणि सजदा करणाऱ्यांकरिता स्वच्छ-शुद्ध राखा.

**२७.** आणि लोकांमध्ये हजचे ऐलान करा, लोक तुमच्याजवळ पायी चालतही येतील आणि दुबळ्या रोडावलेल्या उंटावरही दूरदूरच्या सर्व मार्गांनी येतील.

**२८.** यासाठी की त्यांनी आपला लाभ प्राप्त करून घेण्यासाठी यावे आणि त्या निर्धारीत दिवसामध्ये अल्लाहचे नाम:स्मरण करावे त्या चार पायांच्या पाळीव पशूंवर, तेव्हा तुम्ही स्वत: देखील खा आणि उपाशीपोटी असलेल्या गरीबांनाही खाऊ घाला.

**२९.** मग त्यांनी आपला मळ- घाण दूर करावी आणि आपला नवस पूर्ण करावा आणि अल्लाहच्या जुन्या घराला प्रदक्षिणा करावी.

**३०.** हे आहेत (हजचे धार्मिक विधी) आणि जो, अल्लाहने निर्धारित केलेल्या प्रतिष्ठापूर्ण गोष्टींचा आदर राखेल तर हे त्याच्या पालनकर्त्याजवळ त्याच्याकरिता उत्तम आहे आणि तुमच्यासाठी गुरे-ढोरे हलाल (वैध) ठरविले गेले आहेत, मात्र त्यांच्याखेरीज, ज्यांचा आदेश तुम्हाला ऐकविला गेला आहे, यास्तव मूर्तींच्या मलीनतेपासून दूर राहा, आणि खोटे बोलण्यापासूनही अलिप्त राहा.

**३१.** अल्लाहच्या तौहीद (एकेश्वरवादा) ला मान्य करीत, त्याच्यासोबत दुसऱ्या कुणाला सहभागी न ठरवित. (ऐका) अल्लाहचा सहभागी ठरविणारा जणू आकाशातून खाली कोसळला, आता एक तर त्याला पक्षी उचलून नेतील किंवा हवा एखाद्या दूरच्या ठिकाणी फेकून देईल.

**३२.** (ही आहे वस्तुस्थिती) तेव्हा जो कोणी अल्लाहच्या निशाण्यांचा (प्रतीकांचा) आदर-सन्मान राखेल, तर त्याच्या मनातील अल्लाहच्या भयाचे हेच कारण आहे.

**३३.** त्यांच्यात तुमच्यासाठी एका निर्धारित अवधीपर्यंत लाभ आहे, मग त्यांच्या कुर्बानी (बळी चढविण्या) ची जागा काबागृहात आहे.

**३४.** आणि प्रत्येक जनसमूहाकरिता आम्ही कुर्बानीची एक पद्धत निश्चित केली आहे, यासाठी की त्यांनी त्या चतुष्पाद पशूंवर अल्लाहचे नाव घ्यावे, जे अल्लाहने त्यांना प्रदान करून ठेवले आहेत. (लक्षात घ्या) तुम्हा सर्वांचा खराखुरा उपास्य (आराध्य दैवत) फक्त एकच आहे, तुम्ही त्याच्या अधीन आणि आज्ञाधारक व्हा, विनम्रता अंगिकारणाऱ्यांना खूशखबरी द्या.

**३५.** त्यांची अवस्था अशी आहे की जेव्हा त्यांच्या समोर अल्लाहचे नामःस्मरण केले जाते, तेव्हा त्यांच्या हृदयाचा थरकाप होतो, जेव्हा त्याच्यावर संकट येते तेव्हा त्या संकटात धीर- संयम राखतात, ते नमाज कायम करणारे आहेत, आणि जे काही आम्ही त्यांना देऊन ठेवले आहे त्यातून देत ही राहतात .

**३६.** कुर्बानीच्या उंटाला आम्ही तुमच्यासाठी अल्लाहच्या निशाण्यांपैकी ठरविले आहे. त्यांच्यात तुमच्यासाठी लाभ आहे, तेव्हा त्यांना उभे करून त्यांच्यावर अल्लाहचे नाव

घ्या, मग जेव्हा त्यांचे अंग जमिनीला लागेल तेव्हा ते तुम्हीही खा आणि गोरगरीब व याचकांना आणि जो याचक नसेल त्यालाही खाऊ घाला. अशा प्रकारे आम्ही चतुष्पाद (पाळीव) पशूंना तुमच्या अधीन केले आहे, यासाठी की तुम्ही कृतज्ञता व्यक्त करावी.

**३७.** अल्लाहला कुर्बानीच्या जनावरांचे ना मांस पोहचते ना त्यांचे रक्त किंबहुना त्याला तुमच्या मनात असलेले अल्लाहचे भय पोहोचते, त्याचप्रमाणे अल्लाहने त्या जनावरांना तुमचे आज्ञाधारक (ताबेदार) बनविले आहे, यासाठी की तुम्ही त्याच्या मार्गदर्शना (च्या आभारा) त त्याची महानता वर्णन करावी आणि सत्कर्म करणाऱ्यांना खूशखबरी ऐकवा.

**३८.** निःसंशय, सच्चा ईमानधारकांच्या शत्रूंना अल्लाह स्वतः हटवितो, कोणताही विश्वासघातकी कृतघ्न अल्लाहला पसत नाही.

**३९.** ज्या (मुसलमानां) शी (काफिर) लढाई करीत आहेत त्यांना देखील लढण्याची अनुमती दिली कारण ते अत्याचारपीडित आहेत. निःसंशय त्यांच्या मदतीकरिता अल्लाह परिपूर्ण सामर्थ्य राखतो.

**४०.** हे असे लोक आहेत, ज्यांना विनाकारण आपल्या घराबाहेर काढले गेले केवळ त्यांच्या या बोलण्यावर की आमचा स्वामी व पालनकर्ता अल्लाह आहे. जर अल्लाह लोकांना आपसात एकमेकांद्वारे हटवित राहिला नसता तर उपासनास्थळ आणि चर्च आणि मशीदी, आणि यहूदी लोकांची प्रार्थनास्थळे आणि त्या मशीदी देखील केव्हाच पाडल्या गेल्या असत्या जिथे फार मोठ्या प्रमाणात अल्लाहचे नामःस्मरण केले जाते. जो अल्लाहची मदत करेल अल्लाह देखील त्याची मदत अवश्य करेल. नें:संशय अल्लाह मोठा शक्तिशाली आणि वर्चस्वशाली आहे.

**४१.** हे लोक आहेत की जर आम्ही यांचे पाय जमिनीवर मजबूत केले (अर्थात चांगले स्थैर्य प्रदान केले) तर हे नित्यनेमाने नमाज अदा करतील आणि जकात देतील आणि चांगल्या कामांचा आदेश देतील आणि वाईट कामांची मनाई करतील आणि सर्व कामांचा परिणाम अल्लाहच्या अधिकारकक्षेत आहे.

**४२.** आणि जर हे लोक तुम्हाला खोटे ठरवतील (तर आश्चर्याची बाब नव्हे) तर यांच्यापूर्वी नूहचा जनसमूह आणि आद व समूद

**४३.** आणि इब्राहीमचा जनसमूह आणि लूतचा जनसमूह.

**४४.** आणि मदयनच्या लोकांनीही आपल्या आपल्या पैगंबरांना खोटे ठरविले आहे. मूसा यांनाही खोटे ठरविले गेले आहे, तेव्हा मी इन्कारी लोकांना थोडी संधी दिली, मग त्यांना पकडले. मग पाहा कशी होती माझी शिक्षा- यातना!

**४५.** अशा अनेक वस्त्या आहेत, ज्यांना आम्ही नष्ट करून टाकले यासाठी की त्या अत्याचारी होत्या, तेव्हा त्या आपल्या छतांसह पालथ्या पडल्या आहेत आणि बहुतेक आबाद विहीरी निकामी पडल्या आहेत आणि कितीतरी पक्के उंच किल्ले ओसाड पडले आहेत.

**४६.** काय त्यांनी धरतीवर हिंडून फिरून पाहिले नाही की त्यांच्या हृदयांनी या गोष्टी समजून घेतल्या असत्या किंवा कानांनी या (घटना) ऐकल्या असत्या. खरी गोष्ट अशी की केवळ डोळेच आंधळे नसतात किंबहुना ती हृदये (सुद्धा) आंधळी असतात, जी उरात आहेत.

**४७.** आणि ते तुमच्याजवळ अल्लाहच्या शिक्षा- यातनेची घाई करीत आहेत. अल्लाह आपले वचन कदापि टाळणार नाही. निःसंशय, तुमच्या पालनकर्त्याजवळ एक दिवस, तुमच्या (काल) गणनेनुसार एक हजार वर्षांचा आहे.

**४८.** आणि कित्येक अत्याचारी वस्तींना आम्ही ढील (सूट) दिली मग शेवटी त्यांना पकडीत घेतले आणि माझ्याचकडे परतून यायचे आहे.

**४९.** ऐलान करा की, लोक हो! मी तुम्हाला उघडरित्या सावधान करणारा आहे.

**५०.** तेव्हा ज्या लोकांनी ईमान राखले आहे आणि सत्कर्मे केली आहेत त्यांच्यासाठी मोक्षप्राप्ती आहे आणि मान-सन्मानपूर्ण आजिविका.

**५१.** आणि जे लोक आमच्या आयतींचा अवमान करण्यामागे लागेले आहेत, तेच जहन्नमी आहेत.

**५२.** आणि आम्ही तुमच्यापूर्वी जो रसूल आणि नबी पाठविला (त्याच्यासोबत हे हमखास घडले की) जेव्हा तो आपल्या मनात एखादी इच्छा धरू लागला, सैतानाने त्याच्या मनोकामनेत काही मिसळून दिले तेव्हा सैतानाच्या भेसळीला अल्लाह दूर

करतो, मग आपल्या वचनांना मजबूत करतो. सर्वश्रेष्ठ अल्लाह सर्व काही जाणणारा, किमत बाळगणारा आहे.

**५३.** हे यासाठी की सैतानाच्या भेसळीला अल्लाहने त्या लोकांच्या कसोटीची सामुग्री बनवावे, ज्यांच्या मनात रोग आहे आणि ज्यांची मने कठोर आहेत. निःसंशय अत्याचारी लोक सक्त विरोधात आहेत.

**५४.** आणि यासाठीही की ज्यांना ज्ञान प्रदान केले गेले आहे, त्यांनी विश्वास करून घ्यावा की हे तुमच्या पालनकर्त्याच्याच तर्फे पूर्ण सत्य आहे, मग त्यांनी त्यावर ईमान राखावे आणि त्यांची हृदये त्याकडे झुकावित. निःसंशय अल्लाह ईमान राखणाऱ्यांना सत्य मार्गाकडे मार्गदर्शन करणारच आहे.

**५५.** आणि इन्कारी (काफिर) लोक अल्लाहच्या वहयीबाबत नेहमी संशयग्रस्तच राहतील, येथपर्यंत की अचानक त्यांच्या डोक्यावर कयामत येऊन पोहचावी किंवा त्यांच्याजवळ त्या दिवसाची शिक्षा- यातना येऊन पोहचावी, ज्यात किंचितही भलाई नाही.

**५६.** त्या दिवशी केवळ अल्लाहचीच राज्यसत्ता असेल, तोच त्यांच्या दरम्यान फैसला करेल. ईमान राखणारे आणि नेक-सदाचारी लोक तर अल्लाहच्या देण्यांनी युक्त अशा जन्नतमध्ये असतील.

**५७.** आणि ज्या लोकांनी कुफ्र (इन्कार) केला आणि आमच्या आयतींना खोटे ठरविले, त्यांच्यासाठी अपमानदायक शिक्षा यातना आहे.

**५८.** आणि ज्यांनी अल्लाहच्या मार्गात देशत्याग केला, मग ते शहीद केले गेले किंवा मरण पावले, अल्लाह त्यांना उत्तम रोजी (आजिविका) प्रदान करेल आणि निःसंशय अल्लाह सर्वोत्तम रोजी प्रदान करणारा आहे.

**५९.** अल्लाहा त्यांना अशा ठिकाणी पोहचविल की ते त्या ठिकाणाने आनंदित होतील. निःसंशय अल्लाह सर्व काही जाणणारा आणि सहनशील आहे.

**६०.** हा आहे (त्या लोकांचा मोबदला) आणि एखाद्याने त्याच प्रकारे बदला घ्यावा, ज्या प्रकारे त्याच्याशी केले गेले, मात्र जर त्याच्यावर अतिरेक झाला असेल तर निःसंशय अल्लाह स्वतः त्याची मदत करेल. निश्चितच अल्लाह माफ करणारा आणि क्षमाशील

आहे.

**६१.** हे अशासाठी की अल्लाह रात्रीला दिवसात दाखल करतो, आणि दिवसाला रात्रीत नेतो आणि निःसंशय अल्लाह ऐकणारा, पाहणारा आहे.

**६२.** हे सर्व यासाठी की अल्लाहच सत्य आहे आणि त्याच्याखेरीज ज्याला देखील हे पुकारतात ते असत्य (मिथ्या) आहे आणि निःसंशय, अल्लाह अतिउच्च महानता बाळगणारा आहे.

**६३.** काय तुम्ही नाही पाहिले की अल्लाह आकाशातून पाणी वर्षवितो तेव्हा धरती हिरवी टवटवीत होते. निःसंशय अल्लाह मोठा मेहेरबान आणि जाणणारा आहे.

**६४.** आकाशांमध्ये व धरतीत जे काही आहे सर्व त्याचेच आहे आणि निःसंशय अल्लाह अगदी निःस्पृह, गुणवैशिट्यांनी युक्त, आणि प्रशंसनीय आहे.

**६५.** काही तुम्ही नाही पाहिले की अल्लाहनेच धरतीच्या समस्त वस्तू तुमच्या अधीन केल्या आहेत आणि त्याच्या आदेशाने समुद्रात चालणाऱ्या नौका देखील. त्यानेच आकाशाला सावरून ठेवले आहे की धरतीवर त्याच्या हुकुमाविना कोसळून न पडावे. निःसंशय अल्लाह, लोकांसाठी मोठा स्नेहशील, दया करणारा आहे.

**६६.** आणि त्यानेच तुम्हाला जिवंत केले, मग तोच तुम्हाला मृत्यु देईल, मग तोच तुम्हाला (पुन्हा) जिवंत करील. यात शंका नाही की मनुष्य मोठा कृतघ्न आहे.

**६७.** प्रत्येक जनसमूहाकरिता आम्ही उपासनेची एक पद्धत निर्धारित केली आहे, जिचे ते पालन करणारे आहेत, तेव्हा त्यांनी तुमच्याशी या संदर्भात वाद घालू नये. तुम्ही आपल्या पालनकर्त्याकडे लोकांना बोलवा. निःसंशय, तुम्ही सरळ, सत्य मार्गावर आहात.

**६८.** आणि तरीही जर हे लोक तुमच्याशी वाद घालू लागतील तर तुम्ही सांगा की तुमच्या कर्मांना अल्लाह चांगल्या प्रकारे जाणून आहे.

**६९.** तुमच्या समस्त मतभेदांचा फैसला कयामतच्या दिवशी अल्लाह स्वतः करेल.

**७०.** काय तुम्ही नाही जाणले की आकाश आणि धरतीच्या प्रत्येक वस्तूचे अल्लाहला ज्ञान आहे, हे सर्व एका लिखित ग्रंथात सुरक्षित आहे. सर्वश्रेष्ठ अल्लाहकरिता हे काम

फार सोपे आहे.

**७१.** आणि हे अल्लाहखेरीज अशांची उपासना करीत आहेत, ज्यांच्याकरिता अल्लाहने कोणतेही प्रमाण अवतरित केले नाही आणि ना ते स्वतः याचे काही ज्ञान बाळगतात, अत्याचारींचा कोणी सहाय्यक नाही.

**७२.** आणि जेव्हा त्यांच्यासमोर आमच्या वाणीच्या स्पष्ट आयतींचे पठण केले जाते, तेव्हा तुम्ही त्यांच्या चेहऱ्यावर नाराजीची लक्षणे स्पष्टपणे पाहता. ते तर आमच्या आयती ऐकणाऱ्यांवर हल्ला करण्याच्या बेतात असतात. सांगा, काय मी तुम्हाला याहून वाईट बातमी सांगू. ती आग आहे, जिचा वायदा अल्लाहने इन्कारी लोकांशी करून ठेवला आहे आणि ते मोठे वाईट ठिकाण आहे.

**७३.** लोक हो! एक उदाहरण दिले जात आहे, जरा लक्षपूर्वक ऐका. अल्लाहखेरीज तुम्ही ज्यांना ज्यांना (उपास्य समजून) पुकारत राहिला आहात, ते एक माशी देखील निर्माण करू शकत नाही. जर सर्वच्या सर्व एकत्र होतील, किंबहुना जर माशी यांच्याकडून एखादी वस्तू घेऊन पळेल तर हे त्या वस्तूला तिच्याकडून हिरावून घेऊ शकत नाही. मोठा कमकुवत आहे मागणारा आणि खूप दुबळा आहे तो ज्याच्याकडे मागितले जात आहे.

**७४.** त्यांनी अल्लाहच्या महानतेनुसार त्याचे महत्त्व जाणलेच नाही, निःसंशय अल्लाह मोठा जबरदस्त आणि वर्चस्वशाली आहे.

**७५.** फरिश्त्यांमधून आणि मानवांमधून रसूल (संदेशवाहक) अल्लाहच निवडतो. निःसंशय अल्लाह ऐकणारा, पाहणारा आहे.

**७६.** तो चांगल्या प्रकारे जाणतो जे काही त्यांच्या पुढे आहे आणि जे काही त्यांच्या मागे आहे आणि अल्लाहच्याचकडे सर्व व्यवहार परतविले जातात.

**७७.** हे ईमान राखणाऱ्यांनो! रुकुअ, सजदा करीत राहा आणि आपल्या पालनकर्त्याची उपासना करीत राहा आणि सत्कर्म करीत राहा, यासाठी की तुम्ही सफल व्हावे.

**७८.** आणि अल्लाहच्या मार्गात तसेच जिहाद (धर्मयुद्ध) करा, जसा जिहादचा हक्क आहे. त्याने तुम्हाला निवडले आहे आणि तुमच्यावर दीन (धर्मा) संदर्भात कसलीही

कमतरता राखली नाही. तुमचे पिता इब्राहीमचा दीन (धर्म कायम राखा) त्याच (अल्लाहने) ने तुमचे नाव मुस्लिम ठेवले आहे. या (कुरआना) पूर्वी आणि याच्यातही, यासाठी की पैगंबर तुमच्यावर साक्षी असावा आणि तुम्ही लोकांवर साक्षी व्हावे. तेव्हा तुमचे हे कर्तव्य ठरते की नमाज कायम करा आणि जकात (धर्मदान) अदा करीत राहा आणि अल्लाहला दृढतापूर्वक धरा, तोच तुमचा संरक्षक आणि स्वामी आहे, तेव्हा किती चांगला स्वामी आणि किती चांगला सहाय्य करणारा.

# सूरह मोमीनून - २३

सूरह मोमीनून मक्का येथे अवतरली आणि यात एकशे अठरा आयती आणि सहा रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** निःसंशय, ईमान राखणाऱ्यांनी सफलता प्राप्त केली.

**२.** जे आपल्या नमाजमध्ये विनम्रता अंगिकारतात.

**३.** जे निरर्थक गोष्टींपासून तोंड फिरवतात.

**४.** जे जकात (धर्मदान) अदा करणारे आहेत.

**५.** जे अपल्या लज्जास्थानांचे (गुप्तांगांचे) संरक्षण करणारे आहेत.

**६.** आपल्या पत्न्या आणि स्वामित्वात असलेल्या दासींखेरीज. निःसंशय यांच्याबाबतीत त्यांच्यावर कसलाही दोष नाही.

**७.** मात्र याच्याखेरीज जो इतर शोधील तर तेच मर्यादेचे उल्लंघन करणारे आहेत.

**८.** जे आपल्या अमानतीची आणि वायद्याची रक्षा करणारे आहेत.

**९.** जे आपल्या नामाजांचे संरक्षण करतात.

**१०.** हेच लोक उत्तराधिकारी आहेत.

**११.** जे फिर्दोस (जन्नतच्या सर्वोच्च दर्जा) चे वारस होतील, जिथे सदैव राहतील.

**१२.** आणि निःसंशय आम्ही मानवाला खणखणणाऱ्या मातीच्या सत्वापासून निर्माण

केले.

**१३.** मग त्याला वीर्य बनवून सुरिक्षत स्थानी ठेवले.

**१४.** मग वीर्याला आम्ही जमलेल्या रक्ताचे स्वरूप दिले, मग त्या रक्ताच्या गोळ्याला मांसाचा तुकडा बनिवले, मग मांसाच्या तुकड्यात हाडे बनिवली, मग हाडांवर मांस जढविले, मग एका दुसऱ्या स्वरूपात त्याला निर्माण केले. तेव्हा मोठा समृद्धशाली आहे तो अल्लाह जो सर्वोत्तम निर्मिती करणारा आहे.

**१५.** यानंतर तुम्ही सर्वच्या सर्व निश्चित मरण पावणार आहात.

**१६.** मग कयामतच्या दिवशी, अवश्य तुम्ही सर्व उठविले जाल.

**१७.** आणि आम्ही तुमच्यावर सात आकाश बनविले आहेत आणि आम्ही आपल्या निर्मितीपासून गाफील नाहीत.

**१८.** आणि आम्ही एका उचित प्रमाणात आकाशातून पाणी वर्षवितो, मग त्याला जमिनीवर संचयित करतो आणि आम्ही ते घेऊन जाण्यास खात्रीने समर्थ आहोत.

**१९.** याच पाण्याद्वारे आम्ही तुमच्यासाठी खजूर आणि द्राक्षांच्या बागा निर्माण करतो. त्यात तुमच्याकरिता अनेक फळे आहेत, त्यातून तुम्ही खाता.

**२०.** आणि ते झाड जे सैना नावाच्या पर्वतावर उगते, ज्यातून तेल निघते, आणि खाणाऱ्यांसाठी रस्सा (कालवण).

**२१.** तुमच्यासाठी चार पायांच्या गुरांमध्येही मोठा बोध आहे. त्यांच्या उदरांपासून आम्ही तुम्हाला (दूध) पाजतो आणि इतरही अनेक फायदे तुमच्यासाठी त्यांच्यात आहेत, त्यांच्यापैकी काहींना तुम्ही खातादेखील.

**२२.** आणि त्यांच्यावर आणि नौकांवर स्वार केले जातात.

**२३.** निःसंशय आम्ही नूहला त्याच्या जनसमूहाकडे (रसूल बनवून) पाठविले. नूह म्हणाले, हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! अल्लाहची उपासना करा आणि त्याच्याखेरीज तुमचा कोणीही उपास्य नाही. काय तुम्ही अल्लाहचे भय नाही बाळगत?

**२४.** त्यांच्या समाजाच्या काफीर सरदारांनी स्पष्ट सांगितले की हा तर

तुमच्यासारखाच मनुष्य आहे. हा तुमच्यावर श्रेष्ठत्व (आणि वर्चस्व) प्राप्त करू इच्छितो. जर अल्लाहनेच इच्छिले असते तर एखाद्या फरिश्त्याला अवतरित केले असते. आम्ही तर याबाबत आपल्या पूर्वजांच्या काळात ऐकलेही नाही.

**२५.** निःसंशय, या माणसाला वेड लागले आहे, तेव्हा तुम्ही त्याला एका निर्धारित वेळपर्यंत सूट (ढील) द्या.

**२६.** नूह यांनी दुआ (प्रार्थना) केली, हे माझ्या पालनकर्त्या! यांनी मला खोटे ठरविले आहे, तेव्हा तू माझी मदत कर.

**२७.** मग आम्ही त्यांच्याकडे वहयी पाठविली की तुम्ही आमच्या डोळ्यांसमोर आमच्या वहयीनुसार एक नौका तयार करा, जेव्हा आमचा आदेश येऊन पोहोचेल, आणि तंदूर उतू लागेल, तेव्हा तुम्ही प्रत्येक प्रकारचा एक एक जोडा त्यात ठेवून घ्या, आणि आपल्या कुटुंबियांनाही, मात्र त्यांच्याखेरीज, ज्यांच्याबाबत आधीच फैसला केला गेला आहे. खबरदार! ज्या लोकांनी जुलूम- अत्याचार केला आहे, त्यांच्याविषयी माझ्याशी काही बोलू नका. ते तर सर्व बुडविले जातील.

**२८.** जेव्हा तुम्ही आणि तुमचे साथीदार नौकेत चांगल्या प्रकारे स्वार व्हाल तेव्हा म्हणा, समस्त स्तुती-प्रशंसा अल्लाहकरिता आहे ज्याने आम्हा लोकांना अत्याचारी जनसमूहापासून मुक्ती दिली.

**२९.** आणि दुआ (प्रार्थना) करा, हे माझ्या पालनकर्त्या! मला सुरक्षितपणे उतरव आणि तूच उत्तम रीतीने उतरविणारा आहेस.

**३०.** निःसंशय, या (घटने) त मोठमोठी बोधचिन्हे आहेत आणि निश्चितच आम्ही कसोटी घेणारे आहोत.

**३१.** मग त्यांच्यानंतर आम्ही दुसरे समुदाय देखील निर्माण केले.

**३२.** मग त्यांच्यात, त्यांच्यामधून पैगंबरही पाठविला (या आवाहनासह) की तुम्ही सर्व अल्लाहची उपासना करा, त्याच्याखेरीज तुमचा दुसरा कोणी उपास्य नाही, तेव्हा तुम्ही भय का नाही बाळगत?

**३३.** आणि जनसमूहाच्या सरदारांनी उत्तर दिले, जे कुफ्र (इन्कार) करीत असत आणि आखिरतच्या भेटीस खोटे ठरवित असत आणि आम्ही त्यांना ऐहिक जीवनात

सुखी ठेवले होते, म्हणू लागले, हा तर तुमच्यासारखाच एक मनुष्य आहे. जे तुम्ही खाता तेच तो खातो आणि जे पाणी तुम्ही पिता, तेच तो देखील पितो.

**३४.** आणि जर तुम्ही आपल्यासारख्याच माणसाचे आज्ञापालन मान्य करून घेतले तर निश्चितच तुम्ही मोठ्या तोट्यात आहात.

**३५.** काय हा तुम्हाला या गोष्टीचे वचन देतो की जेव्हा तुम्ही मेल्यावर केवळ माती आणि हाडे बनून राहाल, तर तुम्ही पुन्हा जिवंत केले जाल?

**३६.** नव्हे. दूर आणि अतिशय दूर आहे ती गोष्ट, जिचे वचन तुम्हाला दिले जात आहे.

**३७.** जीवन तर केवळ याच जगाचे जीवन आहे, ज्यात आम्ही मरत जगत असतो हे नव्हे की आम्हाला (मेल्यानंतर) पुन्हा उठविले जाईल.

**३८.** हा तर तो मनुष्य आहे, ज्याने अल्लाहवर असत्य रचले आहे. आम्ही तर याच्यावर ईमान राखणार नाही.

**३९.** पैगंबराने दुआ (प्रार्थना) केली, हे पालनकर्त्या! यांनी मला खोटे ठरविले आहे, तेव्हा तू माझी मदत कर.

**४०.** उत्तर मिळाले की, लवकरच हे आपल्या कृतकर्मांवर पश्चात्ताप करतील.

**४१.** शेवटी न्यायाच्या नियमानुसार एका भयंकर आवाजाने त्यांना येऊन धरले आणि आम्ही त्यांना केरकचरा करून टाकले. तेव्हा अशा अत्याचारी लोकांकरिता लांबचे अंतर असो.

**४२.** मग त्यांच्यानंतर आम्ही दुसरेही जनसमूह निर्माण केले.

**४३.** कोणताही जनसमूह आपल्या मुदतीपूर्वी नाश पावला आणि ना मागे राहिला.

**४४.** त्यानंतर आम्ही सातत्याने रसूल (पैगंबर) पाठविले. ज्या जनसमूहाजवळ ज्या ज्या वेळेस त्याचा पैगंबर आला, त्याने त्यास खोटे ठरविले तेव्हा एका पाठोपाठ एक जनसमूह नष्ट करीत राहिलो आणि त्यांना किस्सा- कहाणी बनवून सोडले. धिःक्कार असो त्या लोकांचा जे ईमान स्वीकारत नाहीत.

**४५.** मग आम्ही मूसाला आणि त्यांचा भाऊ हारुनला आपल्या निशाण्या आणि स्पष्ट

प्रमाणांसह पाठविले.

**४६.** फिरऔन आणि त्याच्या सैन्याकडे, परंतु त्यांनी गर्व केला आणि ते होतेच घमेंड करणारे लोक!

**४७.** ते म्हणाले, काय आम्ही आपल्यासारख्या दोन माणसांवर ईमान राखावे वास्तविक त्यांचा स्वतःचा जनसमूह आमची गुलामी करीत आहे.

**४८.** तेव्हा त्यांनी त्या दोघांना खोटे ठरविले. शेवटी ते लोकही नाश पावलेल्या लोकांत सामील झाले.

**४९.** आणि आम्ही तर मूसाला ग्रंथही प्रदान केला, यासाठी की लोकांनी सत्य मार्गावर यावे.

**५०.** आणि आम्ही मरियमचा पुत्र आणि त्याच्या मातेला एक निशाणी बनविले[१] आणि त्या दोघांना उंच, आरामदायी आणि वाहते पाणी असलेल्या ठिकाणी आश्रय दिला.

**५१.** पैगंबरांनो! हलाल (वैध) वस्तू खा आणि सत्कर्म करा. तुम्ही जे काही करीत आहात, ते मी चांगल्या प्रकारे जाणतो.

**५२.** आणि निःसंशय तुमचा हा दीन (धर्म) एकच दीन (धर्म) आहे[२] आणि मी तुम्हा सर्वांचा पालनकर्ता आहे, तेव्हा माझेच भय बाळगून राहा.

**५३.** मग त्यांनी स्वतःच आपल्या धर्मांचे आपसात तुकडे तुकडे करून टाकले. प्रत्येक संप्रदाय, त्याच्याजवळ जे काही आहे, त्यावरच घमेंड करीत आहे.

**५४.** तेव्हा तुम्ही देखील त्यांना त्यांच्या गफलतीत काही काळ पडून राहू द्या.

**५५.** काय यांनी असे समजून घेतले आहे की आम्ही जी काही यांची धन-संपत्ती आणि

(१) कारण पैगंबर हजरत ईसा यांचा जन्म पित्याविना झाला, जे अल्लाहच्या सामर्थ्याचे प्रतीक होय. ज्याप्रमाणे आदमला माता-पित्याविना आणि हव्वाला मातेविना हजरत आदमपासून आणि इतर सर्व मानवांना माता-पित्याच्या माध्यमाने निर्माण करणे त्याच्या निशाण्यांपैकी आहे.

(२) 'उम्मत'शी अभिप्रेत दीन (धर्म) होय आणि एकच असण्याचा अर्थ हा की समस्त पैगंबरांनी एक अल्लाहच्या उपासनेचे आवाहन केले आहे, परंतु लोक तौहिद (एकेश्वरवाद) सोडून वेगवेगळ्या पंथ-संप्रदायांमध्ये विभाजित झाले आणि प्रत्येक गट आपल्या निष्ठा व आचरणावर खूश आहे, मग ते सत्यापासून कितीही दूर असो.

संतती वाढवित आहोत.

**५६.** ते त्याच्यासाठी शुभ-मांगल्यात घाई करीत आहोत? नव्हे, किंबहुना यांना समजतच नाही.

**५७.** निःसंशय, जे लोक आपल्या पालनकर्त्या (अल्लाहचे) भय बाळगतात.

**५८.** आणि जे आपल्या पालनकर्त्याच्या आयतींवर ईमान राखतात.

**५९.** आणि जे आपल्या पालनकर्त्यासोबत दुसऱ्या कुणाला सहभागी ठरवित नाही.

**६०.** आणि जे लोक देतात, जे काही देतात, अशा स्थितीत की त्यांची हृदये भयाने थरथर कांपत असतात की ते आपल्या पालनकर्त्याकडे परतणार आहेत.

**६१.** हेच आहेत जे तत्परतेने नेकी (सत्कर्म) प्राप्ता करीत आहेत आणि हेच आहेत जे त्यांच्याकडे धाव घेणारे आहेत.

**६२.** आम्ही कोणत्याही जीवावर त्याच्या कुवतीपेक्षा जास्त भार टाकत नाही. आमच्याजवळ एक ग्रंथ आहे, जो सत्य तेच सांगतो आणि त्यांच्यावर किंचितही अत्याचार केला जाणार नाही.

**६३.** परंतु त्यांची हृदये या गोष्टीकडून गाफील (असावध) आहेत आणि त्यांच्यासाठी याखेरीजही अनेक कर्म आहेत, जी ते करणार आहेत.

**६४.** येथेपर्यंत की जेव्हा आम्ही त्यांच्यातल्या सुख-संपन्न अवस्थेच्या लोकांना शिक्षा-यातनेत धरले तेव्हा ते किंचाळू लागले.

**६५.** आज गयावया करू नका. निःसंशय आमच्याकडून तुम्हाला मदत मिळणार नाही.

**६६.** माझ्या आयती तर तुमच्यासमोर वाचून ऐकविल्या जात होत्या, तरीही तुम्ही आपल्या टाचांवर उलटपावली पळ काढत होते.

**६७.** घमेंड करीत, ताठरता दाखवित, कथा- कहाणी बनवून त्यास सोडून देत.

**६८.** काय त्यांनी या गोष्टीवर विचार- चिंतन नाही केले? किंवा त्यांच्याजवळ ती गोष्ट आली, जी यांच्या पूर्वजांजवळ आली नव्हती?

**६९.** किंवा यांनी आपल्या पैगंबराला ओळखले नाही, म्हणून त्याचा इन्कार करणारे

झालेत.

**७०.** किंवा हे म्हणतात की याचे डोके फिरले आहे. किंबहुना तो तर त्यांच्याजवळ सत्य घेऊन आला आहे. होय त्यांच्यापैकी अधिकांश लोक सत्यापासून चिडणारे आहेत.

**७१.** जर सत्यच त्यांच्या इच्छा-आकांक्षांचे अनुयायी झाले तर धरती आणि आकाश आणि त्यांच्या दरम्यान जेवढ्या वस्तू आहेत सर्व अस्ताव्यस्त होतील. खरी गोष्ट अशी की आम्ही त्यांना त्यांचा बोध- उपदेश पोहचविला आहे, परंतु ते आपल्या बोध-उपदेशापासून तोंड फिरविणारे आहेत.

**७२.** काय तुम्ही त्यांच्याकडून काही पारिश्रमिक मागता? लक्षात ठेवा, तुमच्या पालनकर्त्याने दिलेले पारिश्रमिक अधिक उत्तम आहे आणि तो सर्वांत उत्तम रोजी (आजिविका) पोहचविणारा आहे.

**७३.** नि:संशय, तुम्ही तर त्यांना सरळ मार्गाकडे बोलावित आहात.

**७४.** आणि नि:संशय, जे लोक आखिरतवर ईमान राखत नाहीत ते सरळ मार्गापासून विचलित होणारे आहेत.

**७५.** आणि जर आम्ही त्यांच्यावर दया- कृपा केली आणि त्यांची कष्ट- यातना दूर केली तर ते आपल्या विद्रोहात अधिक मजबूत होऊन भटकत राहतील.

**७६.** आणि आम्ही त्यांना शिक्षा- यातनाग्रस्तही केले तरीही हे लोक ना तर आपल्या पालनकर्त्यासमोर झुकले आणि ना विनम्रतेचा मार्ग पत्करला.

**७७.** येथेपर्यंत की जेव्हा आम्ही त्यांच्यावर कठोर शिक्षा- यातनेचे द्वार खुले केले तेव्हा त्याच वेळी त्वरित निराश झाले.

**७८.** तोच (अल्लाह) आहे, ज्याने तुमच्यासाठी कान, डोळे आणि हृदय बनविले, परंतु तुम्ही फार कमी आभार मानता.

**७९.** आणि तोच आहे, ज्याने तुम्हाला (निर्माण करून) जमिनीवर पसरविले आणि त्याच्याचकडे तुम्ही एकत्रित केले जाल.

**८०.** आणि तोच होय जो जिवंत राखतो आणि मृत्यु देतो आणि रात्र व दिवसाचा

फेरबदल करण्याचा अधिकारही तोच राखतो. काय तुम्ही अकलेचा वापर करीत नाही?

**८१.** किंबहुना त्या लोकांनी देखील तेच सांगितले, जे पूर्वीचे लोक सांगत आले आहेत.

**८२.** म्हणतात की जेव्हा मेल्यानंतर आम्ही माती आणि हाडे होऊन जाऊ, काय तरीही आम्ही अवश्य उभे केले जाऊ?

**८३.** आमच्याशी आणि आमच्या पूर्वजां (बुजूर्ग लोकां) शी पूर्वीपासूनच हा वायदा होत आला आहे. काही नाही, या केवळ पूर्वी होऊन गेलेल्या लोकांच्या कथा- कहाण्या आहेत.

**८४.** यांना विचारा, जर जाणत असाल तर सांगा की धरती आणि तिच्या समस्त वस्तू कोणाच्या मालकीच्या आहेत?

**८५.** ते त्वरित उत्तर देतील की अल्लाहच्या, सांगा तर मग तुम्ही बोध प्राप्त का नाही करीत?

**८६.** त्यांना विचारा, आकाशांचा आणि अतिशय महान ईशसिंहासना (अर्श) चा स्वामी कोण आहे?

**८७.** ते लोक उत्तर देतील, अल्लाहच आहे. सांगा, मग तुम्ही भय का नाही राखत?

**८८.** यांना विचारा की सर्व गोष्टींचा अधिकार कोणाच्या हाती आहे, जो आश्रय देतो आणि ज्याच्या तुलनेत (विरोधात) कोणी आश्रय देऊ शकत नाही. तुम्ही जाणत असाल तर सांगा.

**८९.** हेच उत्तर देतील की, अल्लाहच आहे. सांगा, मग तुमच्यावर कोणीकडून जादूटोणा होतो?

**९०.** खरी गोष्ट अशी की आम्ही त्यांच्यापर्यंत सत्य पोहचविले आहे, आणि निःसंशय हे अगदी खोटारडे आहेत.

**९१.** ना तर अल्लाहने कोणाला पुत्र बनविले आहे आणि ना त्याच्यासोबत दुसरा कोणी उपास्य आहे, अन्यथा प्रत्येक ईश्वर आपल्या निर्मितीला घेऊन फिरत राहिला असता आणि प्रत्येकजण एकमेकावर श्रेष्ठतम होण्याचा प्रयत्न करीत राहिला असता. जी गुणवैशिट्ये हे सांगतात अल्लाह त्यापासून पवित्र आहे.

**९२.** तो गुप्त - उघड जाणणारा आहे आणि जो शिर्क (अनेकेश्वरवादी गोष्टी) हे करतात, अल्लाह त्याहून अतिशय उच्चतम आहे.

**९३.** (तुम्ही) दुआ (प्रार्थना) करा की हे माझ्या पालनकर्त्या! जर तू मला ते दाखवशील, ज्याचा वायदा या लोकंना दिला जात आहे.

**९४.** तेव्हा हे माझ्या पालनकर्त्या! तू मला या अत्याचारी समूहात समील करू नकोस.

**९५.** आणि आम्ही जे काही वायदे- वचन त्यांना देत आहोत, ते सर्व तुम्हाला दाखवून देण्याचे सामर्थ्य बाळगतो.

**९६.** वाईट गोष्टीला अशा रीतीने दूर करा जी पूर्णतः भलेपणाची असावी. हे जे काही सांगतात ते आम्ही चांगल्या प्रकारे जाणतो.

**९७.** आणि दुआ (प्रार्थना) करा की हे माझ्या पालनकत्या! सैतानांद्वारे (मनात येणाऱ्या) शंका-कुशंकांपासून मी तुझे शरण मागतो.

**९८.** आणि हे माझ्या पालनकर्त्या! मी या गोष्टीपासूनही तुझे शरण मागतो की त्यांनी माझ्याजवळ यावे.

**९९.** येथेपर्यंत की त्यांच्यापैकी एखाद्याचे मरण येऊन ठेपले तेव्हा तो म्हणतो की हे माझ्या पालनकर्त्या! मला परत पाठव.

**१००.** अशासाठी की आपल्या सोडून आलेल्या जगात जाऊन सत्कर्म करावे, असे कदापि होणार नाही. हे केवळ एक कथन आहे, जे सांगणारा हा आहे त्यांच्या पाठीमागे एक पट आहे. त्यांचे दुसऱ्यांदा जिवंत होण्याच्या दिवसापर्यंत.[१]

---

(१) दोन वस्तूंच्या दरम्यान पडदा किंवा आडोशाला 'बर्जख' म्हटले जाते. या जगाचे जीवन आणि आखिरतचे जीवन यांच्या दरम्यानची जी मुदत आहे, तिला इथे 'बर्जख' म्हटले गेले आहे, कारण मेल्यानंतर माणसाचे या जगाशी असलेले नाते संपुष्टात येते, आणि आखिरच्या जीवनाचा आरंभ त्या वेळी होईल, जेव्हा सर्व लोकांना दुसऱ्यांदा जिवंत केले जाईल. तेव्हा दरम्यानचे हे जीवन, जे कबरीत किंवा पशू-पक्ष्यांच्या पोटात किंवा जाळून टाकण्याच्या स्थितीत मातीच्या कणात व्यतीत होते, ते 'बर्जख'चे जीवन होय. माणसाचे हे अस्तित्व ज्या ज्या ठिकाणी, ज्या ज्या स्वरूपात असेल, स्पष्टतः तो माती बनला असेल, किंवा राख बनवून हवेत उडविला गेला असेल, किंवा नदीच्या पात्रात वाहविला गेला असेल, किंवा एखाद्या जनावराचे भक्ष्य ठरला असेल, परंतु सर्वश्रेष्ठ अल्लाह सर्वांना एक नवे रूप प्रदान करून 'हश्र' (हिशोबा) च्या मैदानात एकत्र करील.

**१०१.** मग जेव्हा सूर (शंख) फुंकला जाईल, त्या दिवशी ना तर आपसातील संबंध राहतील ना एकमेकांची विचारपूस.

**१०२.** तेव्हा ज्यांच्या तराजूचे पारडे वजनदार असेल, ते तर सफलता प्राप्त करणारे ठरतील.

**१०३.** आणि ज्यांच्या तराजूचे पारडे वजनात हलके राहील तर हे असे लोक आहेत, ज्यांनी आपले नुकसान स्वतः करून घेतले, जे नेहमीकरिता जहन्नममध्ये दाखल झाले.

**१०४.** त्यांच्या चेहऱ्यांना आग होरपळत राहील. ते तिथे विद्रुप आणि भयानक बनलेले असतील.

**१०५.** काय माझ्या आयतींचे पठण तुमच्यासमोर केले जात नव्हते? तरीही तुम्ही त्यांना खोटे ठरवित होते?

**१०६.** ते म्हणतील, हे आमच्या पालनकर्त्या! आमचे दुर्दैव आमच्यावर प्रभावशाली झाले. खरोखर आम्ही मार्गभ्रष्ट लोक होतो.

**१०७.** हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला येथून बाहेर काढ. जर आम्ही पुन्हा असे केले तर निश्चितच आम्ही अत्याचारी ठरू.

**१०८.** (अल्लाह) फर्माविल, धिःक्कार असो तुमचा, यातच पडून राहा, आणि माझ्याशी बोलू नका.

**१०९.** माझ्या दासांचा एक समूह असा होता, जो सतत हेच म्हणत राहिला की हे आमच्या पालनकर्त्या! आम्ही ईमान राखले आहे. तू आम्हाला माफ कर आणि आमच्यावर दया कर. तू सर्व दया करणाऱ्यांपेक्षा जास्त दया करणारा आहेस.

**११०.** (परंतु) तुम्ही त्यांची थट्टाच उडवित राहिले, येथे पर्यंत की (त्यांच्या मागे लागून) तुम्ही माझे स्मरण देखील विसरले आणि त्यांना हसण्यावारी घेत राहिले.

**१११.** आज मी त्यांच्या सहनशीलता (आणि सदाचारा) चा असा मोबदला दिला की ते सफलता प्राप्त करणारे ठरले.

**११२.** (सर्वश्रेष्ठ अल्लाह) विचारील, तुम्ही धरतीवर वर्षांच्या गणनेनुसार किती दिवस राहिलात?

**११३.** (ते) म्हणतील, एक दिवस किंवा एका दिवसापेक्षाही कमी. गणना करणाऱ्यांनाही विचारा.

**११४.** (सर्वश्रेष्ठ अल्लाह) फर्माविल, खरी गोष्ट अशी की तुम्ही तिथे फार कमी काळ राहिलात. हे तुम्ही पहिल्यापासून जाणून घेतले असते तर!

**११५.** काय तुम्ही असे समजून बसला आहात की आम्ही तुम्हाला व्यर्थच निर्माण केले आहे, आणि हे की तुम्ही आमच्याकडे परतविले जाणार नाहीत?

**११६.** सर्वश्रेष्ठ अल्लाह खराखुरा बादशहा आहे, तो अतिउच्च आहे, त्याच्याखेरीज कोणीही उपासनीय नाही. तोच सन्मानित सिंहासना (अर्श) चा स्वामी आहे.

**११७.** आणि जो मनुष्य, अल्लाहसोबत अन्य एखाद्या ईश्वराला पुकारेल ज्याचे त्याच्याजवळ कोणतेही प्रमाण (पुरावा) नाही तर त्याचा हिशोब त्याच्या पालनकर्त्याजवळ आहे. निःसंशय काफिर (अविश्वाशी) लोक सफलतेपासून वंचित आहेत.

**११८.** आणि म्हणा की हे माझ्या पालनकर्त्या! तू माफ कर आणि दया कृपा कर, आणि तू सर्व दया करणाऱ्यांपेक्षा उत्तम दया करणारा आहेस.

---

# सूरह नूर - २४

सूरह नूर मदीना येथे अवतरली आणि यात चौसष्ठ आयती आणि नऊ रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** ही आहे ती सूरह (अध्याय) जी आम्ही अवतरित केली आहे आणि निर्धारित केली आहे आणि ज्यात आम्ही स्पष्ट आदेश अवतरित केले आहेत, यासाठी की तुम्ही स्मरणात राखावे.

**२.** व्यभिचार करणाऱ्या स्त्री-पुरुषांपैकी प्रत्येकाला शंभर कोडे मारा. त्यांना अल्लाहच्या (दंड) नियमानुसार शिक्षा देताना तुम्हाला कदापी कीव वाटू नये, जर तुम्ही अल्लाहवर आणि कयामतच्या दिवसावर ईमान राखत असाल. त्यांना शिक्षा देतेवेळी ईमान

राखणाऱ्यांचा एक समूह हजर असला पाहिजे.

**३.** व्यभिचारी पुरुष, व्यभिचारी स्त्री किंवा अनेकेश्वरवादी स्त्रीशिवाय दुसऱ्या स्त्रीशी विवाह करीत नाही आणि व्यभिचार करणारी स्त्री देखील, व्यभिचारी पुरुष किंवा अनेकेश्वरवादी पुरुषाखेरीज दुसऱ्याशी विवाह करीत नाही आणि ईमान राखणाऱ्यांवर हे हराम (अवैध) केले गेले आहे.

**४.** आणि जे लोक पावित्र्यशील स्त्रीवर व्यभिचाराचा आरोप ठेवतील, मग चार साक्षी सादर करू शकत नसतील तर त्यांना ऐंशी कोडे मारा आणि त्यांची साक्ष कधीही मान्य करू नका, हे दुराचारी लोक आहेत.

**५.** परंतु जे लोक यानंतर माफी मागून आपला सुधार करून घेतील, तर सर्वश्रेष्ठ अल्लाह माफ करणारा आणि दया- कृपा करणारा आहे.

**६.** आणि जे लोक आपल्या पत्नीवर व्यभिचाराचा आरोप ठेवतील आणि त्यांचा साक्षी त्यांच्याखेरीज दुसरा कोणी नसेल तर अशा लोकांपैकी प्रत्येकाचा पुरावा हा आहे की त्यांनी चार वेळा अल्लाहची शपथ घेऊन सांगावे की ते सच्चा लोकांपैकी आहेत.

**७.** आणि पाचव्या खेपेस हे की अल्लाहतर्फे धिःक्कार असो त्याचा, जर तो खोट्यांपैकी असेल.

**८.** आणि त्या (स्त्री) वरून शिक्षा अशा प्रकारे टाळली जाऊ शकते की तिने चार वेळा अल्लाहची शपथ घेऊन म्हणावे की निःसंशय तिचा पती खोटे बोलणाऱ्यांपैकी आहे.

**९.** आणि पाचव्या खेपेस म्हणावे की तिच्यावर अल्लाहचा प्रकोप होवो जर तिचा पती सत्य बोलणाऱ्यांपैकी असेल.

**१०.** आणि जर अल्लाहची दया- कृपा तुमच्यावर नसती (तर तुमच्यावर दुःख कोसळले असते) आणि अल्लाह क्षमा-याचना कबूल करणारा हिकमतशाली आहे.

**११.** जे लोक हा फार मोठा आक्षेप रचून आले आहेत. हा देखील तुमच्यातला एक समूह आहे. तुम्ही त्याला आपल्याकरिता वाईट समजू नका किंबहुना हा तुमच्यासाठी चांगला आहे. मात्र त्यांच्यापैकी प्रत्येकावर तेवढा अपराध आहे, जेवढा त्याने कमविला आहे आणि त्यांच्यापैकी ज्याने त्यात मोठ्या प्रमाणात भाग घेतला आहे, त्याची शिक्षाही फार मोठी आहे.

**१२.** ते ऐकताच ईमान राखणाऱ्या पुरुषांनी आणि स्त्रियांनी एकमेकांबद्दल सद्भावना का नाही केली आणि असे का नाही म्हटले की हा तर उघड आरोप आहे.

**१३.** त्यांनी यावर चार साक्षी का नाही आणले? आणि ज्याअर्थी त्यांनी साक्षी आणले नाहीत तर हा आरोप ठेवणारे लोक निश्चितच अल्लाहजवळ केवळ खोटारडे आहेत.

**१४.** आणि जर तुमच्यावर अल्लाहची कृपा आणि दया, या जगात आणि आखिरतमध्ये नसती तर निःसंशय, ज्या गोष्टीची चर्चा तुम्ही सुरू केली होती, तिच्यापायी तुम्हाला फार मोठी शिक्षा पोहचली असती.

**१५.** जेव्हा तुम्ही आपल्या मुखाने याची चर्चा सतत करू लागले आणि आपल्या तोंडाने ती गोष्टही बोलू लागले, जिच्याविषयी तुम्हाला काहीच ज्ञान नव्हते. तुम्ही तिला साधारण गोष्ट समजत राहिले असले तरी अल्लाहच्या दृष्टीने ती मोठी भयंकर बाब होती.

**१६.** आणि तुम्ही ती गोष्ट ऐकताच असे का नाही म्हटले की आम्ही अशी गोष्ट तोंडाने काढणेही चांगले नाही. हे अल्लाह तू पवित्र आहेस हा तर फार मोठा मिथ्यारोप आहे.

**१७.** अल्लाह तुम्हाला उपदेश करतो की पुन्हा कधी असे काम करू नका, जर तुम्ही सच्चे ईमानधारक असाल.

**१८.** आणि अल्लाह तुमच्यासमोर आपल्या आयती निवेदन करीत आहे, आणि अल्लाह जाणणारा, बुद्धीकौशल्य बाळगणारा आहे.

**१९.** जे लोक, ईमान राखणाऱ्यांमध्ये निर्लज्जता पसरविण्याची इच्छा बाळगतात, त्यांच्यासाठी या जगात आणि आखिरतमध्ये दुःखदायक अज़ाब (शिक्षा- यातना) आहे,[१]

---

(१) 'फाहिशत'चा अर्थ आहे निर्लज्जता आणि पवित्र कुरआनने व्यभिचार कृत्याला निर्लज्जता म्हटले आहे. (बनी इस्त्राईल) आणि इथे व्यभिचाराच्या एका खोट्या बातमीच्या प्रचारालाही अल्लाहने निर्लज्जता म्हटले आहे आणि यास इहलोक आणि परलोकाच्या दुःखदायक शिक्षेचे कारण सांगितले आहे. ज्याद्वारे असभ्यता (निर्लज्जता) विषयी इस्लामचा स्वभाव आणि अल्लाहच्या मर्जीचे अनुमान होते की केवळ असभ्य गोष्टीची खोटी बातमी पसरविणे अल्लाहच्या दृष्टीने किती मोठा अपराध आहे. तेव्हा जे लोक रात्रंदिवस एका इस्लामी समाजात वृत्तपत्रे, रेडिओ, टीव्ही आणि चित्रपटाच्या प्रदर्शनाद्वारे असभ्यतेचा, निर्लज्जतेचा सर्रास प्रचार करीत आहेत आणि घरोघरी ते पोहोचवित आहेत, तर अल्लाहच्या येथे हे लोक केवढे मोठे अपराधी ठरतील?

आणि अल्लाह सर्व काही जाणतो, आणि तुम्ही काहीच जाणत नाही.

**२०.** आणि जर तुमच्यावर अल्लाहची दया- कृपा राहिली नसती आणि हेही की अल्लाह अतिशय स्नेहशील दया करणारा आहे (अन्यथा तुमच्यावर प्रकोप आला असता).

**२१.** हे ईमान राखणाऱ्यांनो! सैतानाच्या पाऊलखुणांवर चालू नका, जो मनुष्य सैतानाच्या पाऊलखुणांवर चालेल, तर तो निर्लज्जता आणि वाईट कामांचाच आदेश देईल आणि जर अल्लाहची दया- कृपा तुमच्यावर नसती तर तुमच्यापैकी कोणीही, कधीही स्वच्छ- शुद्ध झाला नसता. परंतु अल्लाह ज्याला पाक (स्वच्छ-शुद्ध) करू इच्छितो, करतो. आणि अल्लाह सर्व काही ऐकणारा आणि सर्व काही जाणणारा आहे.

**२२.** आणि तुमच्यापैकी जे लोक मोठे आणि संपन्न अवस्था राखणारे आहेत त्यांनी अशी शपथ घेऊ नये की आपल्या जवळच्या नातेवाईकांची आणि गोरगरिबांची आणि अल्लाहच्या मार्गात देशत्याग करणाऱ्यांची मदत करणार नाही, किंबहुना माफ केले पाहिजे आणि तहे दिल पाहिजे. काय तुम्ही नाही इच्छित की अल्लाहने तुमचे अपराध (चुका) माफ करावेत. आणि अल्लाह माफ करणारा, दया करणारा आहे.

**२३.** जे लोक सत्शील भोळ्या-भाबड्या ईमानधारक स्त्रियांवर आरोप ठेवतात, ते या जगात आणि आखिरतमध्ये धिःक्कारले जाणारे लोक आहेत आणि त्यांच्यासाठी अतिशय कठोर शिक्षा-यातना आहे.

**२४.** जेव्हा त्यांच्या समक्ष त्यांच्या जीभा आणि त्यांचे हात-पाय, त्यांनी केलेल्या कर्मांची साक्ष देतील.

**२५.** त्या दिवशी अल्लाह त्यांना पुरेपूर मोबदला सत्य आणि न्यायासह प्रदान करेल आणि ते जाणून घेतील की अल्लाहच सत्य आहे, तोच जाहीर करणारा आहे.

**२६.** अशुद्ध घाणेरड्या स्त्रिया अशुद्ध घाणेरड्या पुरुषांच्या योग्य आहेत, आणि अशुद्ध घाणेरडे पुरुष अशुद्ध घाणेरड्या स्त्रियांच्या योग्य आहेत, आणि स्वच्छ- शुद्ध स्त्रिया, स्वच्छ- शुद्ध पुरुषांच्या लायक आहेत आणि स्वच्छ- शुद्ध पुरुष स्वच्छ- शुद्ध स्त्रियांच्या योग्य आहेत. अशा पवित्र, स्वच्छ- शुद्ध लोकांविषयी जी काही वाह्यात बडबड हे (आरोप ठेवणारे) करीत आहेत, ते त्यापासून निर्दोष आहेत. त्यांच्यासाठी क्षमा आहे,

आणि मोठी सन्मानपूर्ण आजिविका आहे.

**२७.** हे ईमान राखणाऱ्यांनो आपल्या घरांखेरीज दुसऱ्यांच्या घरात जाऊ नका, जोपर्यंत (आत येण्याची) परवानगी न घ्याल आणि तिथल्या राहणाऱ्यांना सलाम न कराल. हेच तुमच्यासाठी उत्तम आहे, यासाठी की तुम्ही बोध प्राप्त करावा.

**२८.** जर तिथे तुम्हाला कोणी भेटला नाही तर मग अनुमती घेतल्याविना आत जाऊ नका, आणि जर तुम्हाला परत जायला सांगितले गेले तर तुम्ही परतच जा. हेच तुमच्यासाठी अधिक निर्मळ, निष्पाप आहे. जे काही तुम्ही करीत आहात, अल्लाह ते चांगल्या प्रकारे जाणतो.

**२९.** परंतु ज्यात लोक राहत नसतील, अशा घरांमध्ये, जिथे तुमचा काही लाभ किंवा सामुग्री असेल (त्यात) प्रवेश करण्यात काही अपराध नाही. तुम्ही जे काही जाहीर करता आणि जे काही लपविता अल्लाह ते सर्व काही जाणतो.

**३०.** ईमान राखणाऱ्या पुरुषांना सांगा की आपली नजर खाली राखावी आणि आपल्या लज्जास्थाना (गुप्तांगा) चे रक्षण करावे. यातच त्यांच्याकरिता पावित्र्य आहे. लोक जे काही करीत आहेत, अल्लाह ते सर्व काही जाणतो.

**३१.** आणि ईमान राखणाऱ्या स्त्रियांना सांगा की त्यांनीही आपली नजर झुकलेली ठेवावी आणि आपल्या शील-अब्रुचे रक्षण करावे. आणि आपल्या शोभा- सजावटी (शृंगारा) ला उघड करू नये. त्याच्याखेरीज जे उघड आहे, आणि आपल्या छातीवर आपल्या ओढण्या- दुपट्टे पूर्णतः पसरवून राखावेत आणि आपला शृंगार कोणाच्याही समोर जाहीर करू नये खेरीज आपल्या पतीच्या किंवा आपल्या पित्याच्या किंवा आपल्या सासऱ्याच्या, किंवा आपल्या पुत्राच्या किंवा आपल्या पतीच्या पुत्रांच्या, किंवा आपल्या भावांच्या किंवा पुतण्यांच्या किंवा आपल्या भाच्यांच्या, किंवा आपल्या सखींच्या किंवा दासांच्या किंवा नोकरांपैकी अशा पुरुषांच्या ज्यांना कामवासना नसावी, किंवा अशा लहान मुलांच्या, जे स्त्रियांच्या गुप्त बाबींशी अद्याप परिचित झाले नसावेत, आणि अशा प्रकारे त्यांनी आपले पाय (जमिनीवर) जोरजोराने आपटत चालू नये की (तशाने) त्यांचा लपलेला शृंगार कळून यावा. आणि हे ईमान राखणाऱ्यांनो, तुम्ही सर्वच्या सर्व अल्लाहच्या दरबारात माफी मागा, यासाठी की तुम्ही सफलता प्राप्त करावी.

**३२.** आणि तुमच्यापैकी जे पुरुष-स्त्री तारुण्यास पोहोचले असतील तर त्यांचा विवाह करून द्या आणि आपल्या नेक सदाचारी दास-दासींचा देखील जर ते गरीबही असतील तर अल्लाह आपल्या दया कृपेने त्यांना धनवान बनविल. अल्लाह मोठी विशालता बाळगणारा आणि ज्ञान राखणारा आहे.

**३३.** आणि त्या लोकांनी सत्शील राहिले पाहिजे, जे आपला विवाह करण्याचे सामर्थ्य बाळगत नाही. येथेपर्यंत की अल्लाहने आपल्या कृपेने त्यांना धनवान करावे. तुमच्या दासांपैकी जो कोणी तुम्हाला (दास्यमुक्त होण्याकरिता) काही देऊन मुक्तीचा लेखी करार करू इच्छितील तर तुम्ही त्यांना तसा लेखी करार लिहून द्या. जर तुम्हाला त्यांच्यात काही भलेपणा दिसत असेल, आणि अल्लाहने जी धन-संपत्ती तुम्हाला देऊन ठेवली आहे, तिच्यातून त्यांनाही द्या. तुम्ही आपल्या त्या दासींना, ज्या सत्शील (पवित्र) राहू इच्छितात त्यांना ऐहिक जीवनाच्या फायद्यासाठी दुष्कर्म करण्यास विवश करू नका आणि जो त्यांना विवश करील तर त्यांना विवश केले गेल्यावर अल्लाह (त्यांच्यासाठी) क्षमाशील आणि दयाशील आहे.

**३४.** आणि आम्ही तुमच्याकडे स्पष्ट आयती अवतरित केल्या आहेत आणि त्या लोकांची उदाहरणे जे तुमच्यापूर्वी होऊन गेले आहेत. आणि अल्लाहचे भय राखणाऱ्यांकरिता बोध- उपदेश.

**३५.** अल्लाह आकाशांचा आणि जमिनीचा नूर (प्रकाश) आहे. त्याच्या नूरचे उदाहरण असे की जणू एखाद्या कोनाड्यात दिवा आहे आणि तो दिवा काचेच्या (कंदीलाच्या) आत असावा. काच चकाकताना, लख्ख चमकणाऱ्या ताऱ्यासमान असावा आणि तो दिवा पवित्र वृक्ष जैतूनच्या तेलाने प्रज्वलित केला जात असावा, जो वृक्ष ना पूर्वेकडचा आहे, ना पश्चिमेकडचा आणि ते तेल प्रकाशमान होण्याच्या बेतात असावे आगीने त्याला कधी स्पर्श केला नसला तरी. प्रकाशावर प्रकाश आहे. सर्वश्रेष्ठ अल्लाह आपल्या नूरच्या दिशेने ज्याला इच्छितो मार्गदर्शन करतो. लोकांना समजावण्याकरिता अल्लाह हे उदाहरण देत आहे आणि अल्लाह प्रत्येक गोष्टीची अवस्था चांगल्या प्रकारे जाणतो.

**३६.** त्या घरांमध्ये, ज्यांना उंचविण्याचा आणि तिथे आपले नाम:स्मरण करण्याचा अल्लाहने आदेश दिला आहे तिचे सकाळ-संध्याकाळ अल्लाहची तस्बीह (गुणगान) करीत असतात.

**३७.** असे लोक ज्यांना त्यांचा व्यापार आणि खरेदी-विक्री अल्लाहच्या स्मरणापासून आणि नमाज कायम करण्यापासून व जकात अदा करण्यापासून गाफील करीत नाही, त्या दिवसाचे भय बाळगतात, ज्या दिवशी अनेक हृदये आणि अनेक डोळे उलथे-पालथे होतील.

**३८.** या हेतुने की अल्लाहने त्यांना त्यांच्या कर्माचा चांगला मोबदला द्यावा आणि आपल्या कृपेने काही जास्तच प्रदान करावे आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह ज्याला इच्छितो अगणित रोजी (आजिविका) प्रदान करतो.

**३९.** आणि काफिर (इन्कारी) लोकांचे कर्म त्या चकाकणाऱ्या वाळूसारखे आहे जी खुल्या मैदानात असावी. जिला तहानलेला मनुष्य दुरून पाणी समजतो, परंतु जेव्हा तो त्याजवळ पोहचतो, तेव्हा त्याला काहीच आढळत नाही, तथापि अल्लाह आपल्या निकट असल्याचे आढळते, जो त्याचा हिशोब पुरेपूर चुकता करतो. आणि अल्लाह लवकरच हिशोब चुकता करणारा आहे.

**४०.** किंवा त्या अंधारांसारखे आहे जे खूप खोल समुद्रात असावेत, ज्याला लाटेवर लाट झाकत असावी, मग त्यावर ढग पसरले असावेत. अर्थात अंधारावर अंधार असावा. जर आपला हात बाहेर काढील तर तोही पाहणे त्याला शक्य नसावे, आणि (वस्तुतः) ज्याला अल्लाहनेच नूर न द्यावा त्याच्याजवळ कोणताही नूर (प्रकाश) नसतो.

**४१.** काय तुम्ही नाही पाहिले की आकाश आणि धरतीची समस्त ईशनिर्मिती आणि पंख पसरून उडणारे सर्व पक्षी अल्लाहीच तस्बीह (नामस्मरण )(गुणगान) करण्यात मग्न आहेत. प्रत्येकाची नमाज आणि तस्बीह (नामस्मरण) त्याला माहीत आहे आणि लोक जे काही करतात, अल्लाह ते चांगल्या प्रकारे जाणतो.[१]

**४२.** आकाशांची आणि धरतीची राज्यसत्ता अल्लाहचीच आहे आणि अल्लाहच्याचकडे

(१) अर्थात आकाश व जमिनीवर निवास करणारे, ज्या प्रकारे अल्लाहचे आज्ञापालन आणि प्रशंसा करतात, ते सर्व तो जाणतो. ही समस्त मानव आणि जिन्नांना चेतावणी आहे की अल्लाहने तुम्हाला बुद्धी आणि विवेकाचे स्वातंत्र्य दिले आहे, तेव्हा तुम्ही इतर निर्मितीच्या तुलनेत अधिक ईश-स्तुती व महिमागान केले पाहिजे. परंतु वस्तुस्थिती याच्या उलट आहे. अल्लाहची इतर निर्मिती तर अल्लाहचे गुणगान करण्यात मग्न आहे परंतु बुद्धी आणि प्रज्ञेने सुशोभित असलेली ही ईशनिर्मिती याबाबत सुस्त आहे ज्याबद्दल खात्रीने अल्लाहच्या पकडीस पात्र ठरतील.

परतून जायचे आहे.

**४३.** काय तुम्ही नाही पाहिले की अल्लाह ढगांना चालवितो, मग त्यांना आपसात मिळवतो, मग त्यांना थरावर थर करतो. मग तुम्ही पाहता की त्यांच्यामधून पाऊस पडतो. तोच आकाशाकडून गारांच्या पर्वतातून गारा वर्षवितो. मग ज्यांना इच्छितो त्यांना त्यांच्याजवळ वर्षवितो आणि ज्यांच्यापासून इच्छितो त्यांच्यापासून त्यांना हटवितो. ढगांमधूनच निघणाऱ्या विजेची चमक अशी असते की जणू आता डोळ्यांची नजर हिरावून घेईल.

**४४.** अल्लाहच दिवस-रात्रीचा उलटफेर करत राहतो. डोळे (दृष्टी) राखणाऱ्यांकरिता यात निश्चितच मोठा बोध आहे.

**४५.** समस्त चालणाऱ्या फिरणाऱ्या सजीवाला अल्लाहने पाण्याद्वारे निर्माण केले आहे. त्यातले काही आपल्या पोटाच्या आधारे (सरपटत) चालतात, काही दोन पायांवर चालतात, काही चार पायांवर चालतात. अल्लाह जे इच्छितो निर्माण करतो. निःसंशय अल्लाह प्रत्येक गोष्ट करण्याचे सामर्थ्य बाळगतो.

**४६.** निःसंशय, आम्ही स्पष्ट आयती अवतरित केल्या आहेत. अल्लाह ज्याला इच्छितो सरळ मार्ग दाखवितो.

**४७.** आणि जे म्हणतात की आम्ही अल्लाह आणि रसूल (स.) वर ईमान राखले आणि आज्ञाधारक झालोत, मग त्यांच्यातला एक समूह त्यानंतरही तोंड फिरवितो, हे ईमान राखणारे नाहीत.[१]

**४८.** आणि जेव्हा यांना या गोष्टीकडे बोलाविले जाते की अल्लाह आणि त्याच्या पैगंबराने (त्यांच्या तंट्याचा) फैसला करावा, तरी देखील त्यांचा एक समूह तोंड फिरविणारा बनतो.

**४९.** आणि जर हक्क त्यांनाच पोहचत असेल तर पैगंबराजवळ मोठे आज्ञाधारक बनून येतात.

---

(१) हे दांभिक (मुनाफिक) लोकांचे निवेदन आहे, जे तोंडाने इस्लाम जाहीर करीत, परंतु मनात अविश्वास आणि द्वेष- मत्सर राखत. अर्थात खऱ्या ईमानापासून वंचित होते. यास्तव तोंडाने ईमान व्यक्त केल्यानंतरही, त्यांच्या ईमानाचा इन्कार केला गेला आहे.

**५०.** काय त्यांच्या मनात रोग आहे? किंवा हे शंका-संशयात पडले आहेत? किंवा त्यांना या गोष्टीचे भय आहे की अल्लाह आणि त्याचा रसूल त्यांचा हक्क नष्ट न करून टाकावेत. वस्तुतः हे स्वतः मोठे अत्याचारी आहेत.

**५१.** ईमान राखणाऱ्यांचे म्हणणे तर असे आहे की जेव्हा त्यांना यासाठी बोलाविले जाते की अल्लाह आणि त्याच्या पैगंबराने त्यांच्या दरम्यान फैसला करून द्यावा तेव्हा ते म्हणतात की आम्ही ऐकले आणि मान्य केले. हेच लोक सफल होणारे आहेत.

**५२.** आणि जो अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या आदेशाचे अनुसरण करील, अल्लाहचे भय राखील, (त्यांच्या शिक्षा- यातनेचे) भय बाळगून राहील तर तेच लोक सफलता प्राप्त करणारे आहेत.

**५३.** आणि अगदी दृढतापूर्वक ते अल्लाहची शपथ घेऊन सांगतात की तुमचा आदेश होताच तत्पर निघण्यास सज्ज होऊ. त्यांना सांगा, पुरे, शपथ घेऊ नका. तुमच्या आज्ञापालना (ची हकीगत) माहीत आहे. जे काही तुम्ही करीत आहात, अल्लाह ते जाणतो.

**५४.** सांगा, अल्लाहच्या आदेशाचे पालन करा, पैगंबरांचे आज्ञापालन करा, तरीही जर तुम्ही तोंड फिरविले तर पैगंबराचे कर्तव्य तर तेच आहे, जे त्याच्यावर अनिवार्य केले गेले आहे आणि तुमच्यावर त्या गोष्टीची जबाबदारी आहे, जी तुमच्यावर टाकली गेली आहे. मार्गदर्शन तर तुम्हाला त्याच वेळी लाभेल, जेव्हा पैगंबरांचे आज्ञापालन स्वीकार कराल. (ऐका) पैगंबराचे कर्तव्य केवळ स्पष्टतः पोहचविणे आहे.

**५५.** तुमच्यापैकी ज्या लोकांनी ईमान राखले आहे आणि सत्कर्म केले आहे, अल्लाहने त्यांच्याशी वायदा केलेला आहे की तो त्यांना धरतीवर सत्ताधिकार प्रदान करील, ज्या प्रकारे त्या लोकांना प्रदान केला होता, जे यांच्यापूर्वी होऊन गेले आणि निःसंशय त्यांच्यासाठी त्यांच्या या धर्माला दृढतापूर्वक कायम करील ज्यास त्याने त्यांच्यासाठी पसंत केले आहे आणि त्यांच्या भय- दहशतीला, शांती सुबत्तेत बदलून टाकील. ते माझी उपासना करतील, माझ्यासोबत दुसऱ्या कोणाला सहभागी करणार नाहीत. त्यानंतरही जे लोक कृतघ्न बनतील आणि कुफ्र (इन्कार) करतील तर निश्चित ते अवज्ञाकारी आहेत.

**५६.** आणि नमाज कायम करा, जकात अदा करा आणि अल्लाहच्या पैगंबराचे आज्ञापालन करीत राहा, यासाठी की तुमच्यावर दया केली जावी.

**५७.** तुम्ही असे कधीही समजू नका की काफिर (इन्कारी) लोक धरतीवर (सर्वत्र पसरून) आम्हाला पराभूत करतील. त्यांचे मूळ ठिकाण तर जहन्नम आहे जे निःसंशय मोठे वाईट ठिकाण आहे.

**५८.** हे ईमान राखणाऱ्यांनो! तुमच्या ताब्यात असलेल्या दासांनी आणि त्यांनीही जे तुमच्यापैकी पूर्ण वयास पोहोचले नसतील (आपल्या येण्याच्या) तीन वेळांमध्ये तुमच्याकडून अनुमती घेणे आवष्यक आहे. फज्र (प्रातःकालीन) च्या नमाजपूर्वी आणि जोहर (मध्यान्ह) च्या वेळी जेव्हा तुम्ही आपले कपडे उतरवून ठेवता आणि ईशा (रात्री) च्या नमाजनंतर, या तिन्ही वेळा तुमच्या (एकांत) आणि पडद्याच्या आहेत. या वेळांखेरीज, ना तुमच्यावर काही दोष आहे, ना त्यांच्यावर. तुम्ही सर्व आपसात जास्त करून एकमेकांच्या जवळ येणे-जाणे करणारे आहेत. अशा प्रकारे अल्लाह आपले आदेश अगदी स्पष्ट करून सांगत आहे आणि अल्लाह जाणणारा आणि हिकमत बाळगणारा आहे.

**५९.** आणि तुमच्यापैकी जी मुले तरुण (जाणत्या) वयास पोहचतील तर ज्याप्रमाणे त्यांच्या पूर्वीचे (मोठे) लोक अनुमती मागतात, त्यांनी देखील अनुमती घेऊन आले पाहिजे. अल्लाह अशा प्रकारे तुम्हाला आपल्या आयती स्पष्टतः सांगतो. अल्लाहच जाणणारा आणि हिकमत बाळगणारा आहे.

**६०.** आणि मोठ्या म्हाताऱ्या स्त्रिया, ज्यांना आपल्या विवाहाची आशा (आणि इच्छा) च राहिली नसावी, त्या जर आपले कपडे (पडद्यासाठी वापरलेले) उतरवून ठेवतील तर त्यांच्यावर काही दोष नाही (मात्र या अटीवर) की त्या आपली शोभा- सजावट दाखविणाऱ्या नसाव्यात. तथापि त्यांच्यासाठी हेच अधिक चांगले आहे की त्यांनी यापासून अलिप्त राहावे. आणि अल्लाह सर्व काही ऐकणारा व जाणणारा आहे.

**६१.** आंधळ्याला, पांगळ्याला, रोग्याला आणि स्वतः तुम्हाला कधीही कसलीही हरकत नाही की तुम्ही आपल्या घरी, मावशा किंवा आपल्या पित्याच्या घरी किंवा आपल्या मातांच्या घरी किंवा आपल्या भावांच्या घरी किंवा आपल्या बहीणींच्या घरी किंवा आपल्या चुलत्यांच्या घरी किंवा आपल्या आत्यांच्या घरी किंवा आपल्या मामांच्या घरी किंवा आपल्या मावशींच्या घरी किंवा त्या घरांमध्ये, ज्यांच्या किल्ल्या तुमच्या मालकीच्या

असाव्यात किंवा आपल्या मित्रांच्या घरी, तुमच्यावर यातही काही गुन्हा नाही की तुम्ही सर्व एकत्र बसून जेवण घ्यावे किंवा वेगवेगळे बसून परंतु जेव्हा तुम्ही घरांमध्ये प्रवेश करू लागाल तेव्हा आपल्या घरच्या लोकांना सलाम करीत जा. शुभ कामना आहे, जी मंगलप्रद आणि पवित्र अल्लाहतर्फे अवतरित आहे. अशा प्रकारे अल्लाह, आपले आदेश तुम्हाला स्पष्ट करून सांगत आहे, यासाठी की तुम्ही समजून घ्यावे.

**६२.** ईमान राखणारे लोक तर तेच आहेत जे अल्लाहवर आणि त्याच्या पैगंबरावर ईमान राखतात, आणि जेव्हा अशा समस्येत, लोकांनी एकत्र होण्याची आवश्यकता असते पैगंबरांसोबत असतात, तेव्हा जोपर्यंत तुमच्याकडून अनुमती घेत नाहीत, कोठेही जात नाहीत. जे लोक (अशा प्रसंगी) तुमच्याकडून अनुमती घेतात, वास्तिवक ते हेच लोक होत, ज्यांनी अल्लाहवर आणि त्याच्या पैगंबरावर ईमान राखलेले आहे. तेव्हा असे लोक जेव्हा तुमच्याकडून आपल्या एखाद्या कामाकरिता अनुमती (परवनागी) मागतील तेव्हा तुम्ही त्यांच्यापैकी ज्याला इच्छित असाल अनुमती द्या आणि त्यांच्यासाठी अल्लाहजवळ माफीची प्रार्थना करा. निःसंशय, अल्लाह माफ करणारा, दया कृपा करणारा आहे.

**६३.** तुम्ही (अल्लाहच्या) पैगंबराच्या बोलिवण्यास असे सर्वसाधारण बोलिवणे समजू नका जसे आपसात एकमेकांचे असते. तुमच्यापैकी अल्लाह त्यांना चांगल्या प्रकारे जाणतो जे नजर टाळून गुपचूप निघून जातात. (ऐका) जे लोक पैगंबराच्या आदेशाचा विरोध करतात त्यांनी भय बाळगून राहावे की कदाचित त्यांच्यावर एखादा फार मोठा उपद्रव (फितना) येऊन न कोसळावा किंवा त्याच्यावर एखादा दुःखाचा आघात न व्हावा.[१]

(१) या संकटाशी अभिप्रेत हृदयांची ती वक्रता होय, जी माणसाला ईमानापासून वंचित ठेवते. हा पैगंबर (सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) यांच्या आदेशांची अवज्ञा आणि त्यांचा विरोध करण्याचा परिणाम आहे आणि ईमानापासून वंचित होऊन कुफ्र (इन्कार, अविश्वासा) वर जीवनाचा अंत, जहन्नमची निरंतर यातना इ. गोष्टींचे कारण बनते जसे आयतीच्या पुढील वाक्यात फर्माविले. यास्तव पैगंबर (सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) यांचे शुभ आचरण आणि सुन्नत (चरित्रा) ला प्रत्येक क्षणी दृष्टीपथात राखावे, यास्तव जे कथन आणि कर्म त्याला अनुसरून असेल तेच अल्लाहच्या दरबारात स्वीकृत आणि इतर सर्व अस्वीकृत ठरेल. पैगंबर (स.) यांनी फर्माविले, 'मनफइला फआला लमसा फलमीहिल कुरआना फहुदुद.' म्हणजे ''ज्याने असे कर्म केले जे आमच्या आदेशाला अनुसरून नाही ते व्यर्थ आहे.'' (अलबुखारी, किताबुस्सुलह बाब इज़ा स्तलहु अला सुलहे जौरीन आणि मुस्लिम, किताबुल अकिजया बाब नक़्जिल अहकामिल बातिला व रद्दि मुहदसातिल उमूर व सुन्नन)

**६४.** जाणून घ्या की आकाशांत आणि धरतीवर जे काही आहे सर्व अल्लाहचेच आहे, ज्या मार्गावर तुम्ही आहात, तो मार्ग अल्लाह चांगल्या प्रकारे जाणतो आणि ज्या दिवशी हे सर्व त्याच्याकडे परतविले जातील, त्या दिवशी त्यांना त्यांच्या कृतकर्मांशी अवगत करविल आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह सर्व काही जाणणारा आहे.

## सूरह फुरक़ान - २५

सूरह फुरक़ान मक्का येथे अवतरली आणि यात सत्याहत्तर आयती आणि सहा रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** मोठा बरकतशाली (समृद्धशाली) आहे तो अल्लाह ज्याने आपल्या दासावर फुरक़ान[१] अवतिरत केले. यासाठी की तो समस्त लोकांकरिता खबरदार करणारा ठरावा.

**२.** त्याच अल्लाहचे अधिराज्य आहे आकाशांवर आणि धरतीवर आणि तो कोणतीही संतती बाळगत नाही, ना त्याच्या राज्यसत्तेत त्याचा कोणी भागीदार आहे, आणि प्रत्येक वस्तूला निर्माण करून त्याने एक निर्धारित स्वरूप दिले आहे.

**३.** आणि त्या लोकांनी अल्लाहखेरीज ज्यांना आपले आराध्य दैवत बनवून ठेवले आहे, ते कोणतीही वस्तू निर्माण करू शकत नाही, किंबहुना ते स्वतः(एखाद्याकडून) निर्माण केले जातात ते स्वतः आपल्या लाभ-हानिचा अधिकार बाळगत नाहीत आणि ना जीवन-मृत्युचा आणि ना दुसऱ्यांदा जिवंत होऊन उठण्याचे ते मालक आहेत.

**४.** आणि काफिर (इन्कारी) लोक म्हणाले, हे तर केवळ त्याने स्वतः रचलेले असत्य आहे ज्या कामात दुसऱ्या लोकांनीही त्याला मदत केली आहे. वस्तुतः हे काफिर मोठे अत्याचारी आणि निव्वळ असत्य आणणारे बनलेत.

**५.** आणि ते असेही म्हणाले की या तर पूर्वी होऊन गेलेल्या लोकांच्या कथा-कहाण्या आहेत, ज्या त्याने लिहून ठेवल्या आहेत, आणि त्याच सकाळ-संध्याकाळ त्याच्यासमोर

(१) 'फुरक़ान'चा अर्थ आहे, सत्य आणि असत्य, एकेश्वरवाद आणि अनेकेश्वरवाद, आणि न्याय-अन्याय यांच्या दरम्यान फरक करणारा. या कुरआनने अगदी उघडपणे या गोष्टींना स्पष्ट केले आहे. यास्तव याला 'फुरक़ान' म्हटले आहे.

वाचल्या जातात.

**६.** सांगा, याला तर त्या अल्लाहने अवतरित केले आहे, जो आकाश व धरतीच्या सर्व लपलेल्या गोष्टी जाणतो. निःसंशय तो मोठा माफ करणारा आणि दया करणारा आहे.

**७.** आणि ते म्हणाले की हा कसा पैगंबर आहे की भोजन करतो आणि बाजारात चालतो फिरतो, त्याच्याजवळ एखादा फरिश्ता का नाही पाठविला जात की तो देखील त्याच्या सोबतीला राहून खबरदार करणारा बनला असता.

**८.** किंवा त्याच्याजवळ एखादा खजिनाच टाकला गेला असता किंवा त्याची एखादी बाग तरी असती, ज्यातून तो खात राहिला असता. आणि त्या अत्याचारी लोकांनी म्हटले की तुम्ही तर अशा माणसाच्या मागे चालू लागलात, ज्याच्यावर जादू-टोणा केला गेला आहे.

**९.** जरा विचार करा, हे लोक तुमच्याविषयी कसकशा गोष्टी बोलत आहेत की ज्यामुळे स्वतःच मार्गभ्रष्ट होत आहेत आणि कशाही प्रकारे मार्गावर येऊ शकत नाही.

**१०.** अल्लाह तर असा समृद्धशाली आहे की त्याने इच्छिल्यास तुम्हाला अशा अनेक बागा प्रदान करील, ज्या त्यांनी सांगितलेल्या बागांपेक्षा खूप चांगल्या असतील, ज्यांच्या खाली प्रवाह वाहत असावेत आणि तुम्हाला अनेक पक्के महाल देखील प्रदान करील.

**११.** खरी गोष्ट अशी की लोक कयामतला खोटे समजतात आणि कयामतला खोटे ठरविणाऱ्यांकरिता आम्ही धगधगणारी आग तयार करून ठेवली आहे.

**१२.** जेव्हा ती यांना दुरून पाहील तेव्हा हे तिचे क्रोधाने बेकाबू होणे आणि भयंकर गर्जना ऐकतील.

**१३.** आणि जेव्हा यांना जहन्नमच्या एखाद्या तंग (संकुचित) जागेत बांधून फेकून दिले जाईल तेव्हा तिथे आपल्यासाठी मरणाला पुकारतील.

**१४.** (त्यांना सांगितले जाईल) आज एकाच मरणाला पुकारू नका, किंबहुना अनेक मरणांना हाक मारा.

**१५.** तुम्ही सांगा, काय हे अधिक चांगले आहे[१] की ती कायमस्वरूपी जन्नत, जिचा

(१) ''हे....'' संकेत आहे जहन्नमच्या शिक्षा- यातनेच्या वर्णनाकडे ज्यात जहन्नमी लोक जखडलेले असतील, तेव्हा इन्कार आणि मूर्तीपूजेचा हा मोबदला चांगला की ती सदैवकालीन जन्नत जिचा वायदा

वायदा नेक- सदाचारी लोकांना दिला गेला आहे, जो त्यांचा मोबदला आहे आणि त्यांच्या परतीचे मूळ ठिकाण आहे.

**१६.** ते जे काही इच्छितील ते त्यांच्यासाठी तिथे हजर असेल, नेहमी राहणारे हा तर तुमच्या पालनकर्त्याचा वायदा आहे, ज्याची मागणी केली गेली पाहिजे.

**१७.** आणि ज्या दिवशी अल्लाह त्यांना आणि अल्लाहखेरीज ज्याची हे उपासना करीत राहिले त्या सर्वांना एकत्र करून विचारेल, काय माझ्या या दासांना तुम्ही मार्गभ्रष्ट केले की हे स्वतः मार्गापासून विचलित झाले ?[१]

**१८.** ते उत्तर देतील, पवित्र आहेस तू! स्वतः आमच्यासाठी हे योग्य नव्हते की तुझ्याखेरीज दुसऱ्यांना आपला मित्र- सहाय्यक बनविले असते. खरी गोष्ट अशी की तू यांना आणि यांच्या वाडवडिलांना सुख- संपन्नता प्रदान केली येथेपर्यंत की हे बोध- उपदेश विसरले. हे लोक विनाशास पात्रच होते.

**१९.** तेव्हा त्यांनी तुम्हाला तुमच्या सर्व गोष्टींमध्ये खोटे ठरविले. आता ना तर तुमच्यात आपली शिक्षा टाळण्याची ताकद आहे ना मदत करण्याची. तुमच्यापैकी ज्याने देखील अत्याचार केला, आम्ही त्याला सक्त शिक्षा- यातनेची गोडी चाखवू.

**२०.** आणि आम्ही तुमच्यापूर्वी जेवढे देखील पैगंबर पाठविले ते सर्व भोजनही करीत असत आणि बाजारातही हिंडत फिरत असत, आणि आम्ही तुमच्यापैकी प्रत्येकाला

---

अल्लाहने, आपले भय राखणाऱ्यांना त्यांचे भय राखण्याबद्दल आणि अल्लाहचे आज्ञापालन केल्याबद्दल दिला आहे. अर्थात हा प्रश्न जहन्नममध्ये विचारला जाईल. परंतु इथे या हेतुने उल्लेखिला गेला की कदाचित जहन्नमी लोकांच्या या परिणामाने बोध प्राप्त करून अल्लाहचे भय आणि त्याच्या आदेशांचे पालन करण्याचा मार्ग अंगीकारतील आणि या दुष्परिणतीपासून आपला बचाव करतील जिचा उल्लेख या ठिकाणी केला गेला आहे.

(१) या जगात अल्लाहखेरीज ज्यांची उपासना केली जात राहिली आणि पुढेही केली जात राहील त्यात निर्जीव पदार्थ (दगड, लाकूड आणि इतर धातूंच्या मूर्त्या) देखील आहेत. तसेच अल्लाहचे सदाचारी दासही आहेत जे सजीव आहेत. उदा. हजरत उजैर आणि हजरत मसीह (येशू) व इतर नेक लोक. त्याचप्रमाणे फरिश्त्यांचे व जिन्नांचेही पुजारी असतील. अल्लाह निर्जीव वस्तुंनाही अक्कल, सामंजस्य आणि वाचा प्रदान करील. मग त्या समस्त आराध्य दैवतांना विचारील की सांगा माझ्या या दासांना तुम्ही आपल्या उपासनेचा आदेश दिला होता की ते आपल्या मर्जीने तुमचे उपासक बनून पथभ्रष्ट झाले होते ?

दुसऱ्याच्या कसोटीचे माध्यम बनविले.[१] काय तुम्ही धीर- संयम राखाल? आणि तुमचा पालनकर्ता सर्व काही पाहणारा आहे.

**२१.** आणि ज्यांना आमच्या भेटीची आशा नाही, ते म्हणाले की आमच्यावर फरिश्ते का नाही अवतरित केले जात? किंवा आम्ही (आपल्या डोळ्यांनी) आपल्या पालनकर्त्यास पाहिले असते? त्या लोकांनी स्वतः आपल्यालाच खूप मोठे समजून घेतले आहे आणि फार अवज्ञा केली आहे.

**२२.** ज्या दिवशी हे फरिश्त्यांना पाहतील त्या दिवशी या अपराध्यांकरिता कोणताही आनंद नसेल आणि म्हणतील की वंचितच वंचित ठेवले गेलो.

**२३.** आणि त्यांनी जे जे कर्म केले होते आम्ही त्यांच्याकडे पुढे होऊन त्यांना कणांप्रमाणे क्षत-विक्षत करून टाकले.

**२४.** (परंतु) त्या दिवशी जन्नतमध्ये राहणाऱ्यांचे ठिकाण फार चांगले असेल, आणि विश्रामस्थानही सुखदायक असेल.

**२५.** आणि ज्या दिवशी आकाश ढगांसह फाटून जाईल आणि फरिश्ते सतत उतरविले जातील.

**२६.** त्या दिवशी योग्यरित्या राज्यसत्ता केवळ रहमानचीच(कृपाळु) असेल, आणि हा दिवस काफिरांकरिता मोठा सक्त असेल.

**२७.** आणि त्या दिवशी अत्याचारी, आपल्या हातांना चावा घेऊन म्हणेल, अरेरे! मी पैगंबराचा मार्ग अंगीकारला असता तर बरे झाले असते!

**२८.** अरेरे! मी अमुक एका इसमाला मित्र बनविले नसते तर बरे झाले असते!

**२९.** त्याने तर मला त्यानंतर मार्गभ्रष्ट केले, जेव्हा उपदेश माझ्याजवळ येऊन पोहोचला होता आणि सैतान तर मानवाला (वेळेवर) दगा देणारा आहे.

---

(१) हे अल्लाहचे कथन आहे जे मूर्तीपूजकांना संबोधून अल्लाह फर्माविल की तुम्ही ज्यांना आपले आराध्य दैवत समजत होते त्यांनी तुमचे म्हणणे खोटे ठरविले आहे आणि तुम्ही पाहिले की त्यांनी तुमच्यापासून विभक्त होण्याचे ऐलानही केले आहे. अर्थात ज्यांना तुम्ही आपले समजत होते ते सहाय्यक ठरले नाहीत. तेव्हा आता काय तुम्ही हे सामर्थ्य राखता की माझी शिक्षा आपल्यावरून टाळू शकावे आणि आपली काही मदत करू शकावे?

**३०.** आणि पैगंबर म्हणेल की हे माझ्या पालनकर्त्या! निःसंशय, माझ्या जनसमूहाने या कुरआनास सोडून दिले होते.

**३१.** आणि अशा प्रकारे आम्ही काही अपराध्यांना प्रत्येक पैगंबरांचे शत्रू बनविले आहे आणि तुमचा पालनकर्ताच मार्गदर्शन करणारा आणि मदत करणारा पुरेसा आहे.

**३२.** आणि काफिर म्हणाले की त्याच्यावर संपूर्ण कुरआन एकाच वेळी का नाही अवतरित केले गेले? अशा प्रकारे (आम्ही थोडे थोडे करून अवतरित केले) यासाठी की याद्वआरे आम्ही तुमच्या हृदयास मजबूती प्रदान करावी. आणि आम्ही त्यास थांबून थांबूनच वाचून ऐकविले आहे.

**३३.** आणि हे तुमच्याजवळ जे काही उदाहरण घेऊन येतील आम्ही त्याचे खरे उत्तर आणि योग्य स्पष्टीकरण सांगू.

**३४.** जे लोक तोंडघशी पाडून जहन्नमकडे एकत्र केले जातील, तर तेच मोठ्या वाईट ठिकाणाचे आणि भ्रष्ट मार्गाचे आहेत.

**३५.** आणि निःसंशय, आम्ही मूसाला ग्रंथ प्रदान केला आणि त्यांच्यासोबत त्यांचा भाऊ हारूनला त्यांचा सहाय्यक बनविले.

**३६.** आणि सांगितले की तुम्ही दोघे त्या लोकांकडे जा, जे आमच्या निशाण्यांना खोटे ठरवित आहेत. मग आम्ही त्यांचा अगदी सर्वनाश केला.

**३७.** आणि नूहच्या जनसमूहानेही जेव्हा पैगंबरांना खोटे ठरविले, तेव्हा आम्ही त्यांना बुडवून टाकले आणि लोकांकरिता त्यांना बोधप्राप्तीचे चिन्ह बनविले आणि आम्ही अत्याचारींकरिता मोठी कठोर शिक्षा तयार करून ठेवली आहे.

**३८.** आणि 'आद' जनसमूह आणि 'समूद' जनसमूह आणि विहीरवाल्यांना आणि त्यांच्या दरम्यानच्या अनेक संप्रदायांना नष्ट करून टाकले.

**३९.** आणि आम्ही प्रत्येकासमोर उदाहरणे प्रस्तुत केली, मग प्रत्येकाला पूर्णतः नष्ट केले.

**४०.** आणि हे लोक त्या वस्तीजवळूनही ये-जा करतात, जिच्यावर मोठा वाईट

प्रकारचा पाऊस पाडला गेला.[१] काय हे तरीही ते पाहत नाहीत? खरी गोष्ट अशी की त्यांना मेल्यानंतर दुसऱ्यांदा जिवंत होऊन उभे राहण्यावर विश्वासच नाही.

**४१.** आणि तुम्हाला जेव्हा कधी पाहतात, तेव्हा तुमची थट्टा उडवू लागतात, हाच काय तो माणूस ज्याला अल्लाहने रसूल बनवून पाठविला आहे?

**४२.** (एवढे बरे) की आम्ही अटळ राहिलो, अन्यथा याने तर आम्हाला आमच्या आराध्य दैवतांपासून विचलित करण्यात काहीच कसर सोडली नव्हती. आणि जेव्हा हे (अल्लाहच्या) शिक्षा- यातनांना पाहतील तेव्हा त्यांना स्पष्टतः कळून येईल की पूर्णपणे मार्गापासून भटकलेला कोण होता?

**४३.** काय तुम्ही त्यालाही पाहिले ज्याने आपल्या इच्छा-आकांक्षांना देवता (उपास्य) बनवून ठेवले आहे. काय तुम्ही त्याची जबाबदारी घेऊ शकता?

**४४.** काय तुम्ही याच विचारात आहात की त्यांच्यापैकी बहुतेक जण ऐकतात किंवा समजतात. ते तर अगदी जनावरांसारखे आहेत, किंबहुना त्यांच्यापेक्षाही अधिक वाट चुकलेले.

**४५.** काय तुम्ही नाही पाहिले की तुमच्या पालनकर्त्याने सावलीला कशा प्रकारे विस्तृत केले आहे. त्याने इच्छिले असते तर तिला स्थिर केले असते, मग सूर्याला आम्ही त्यावर प्रमाण ठरविले.

**४६.** मग आम्ही त्याला हळू हळू आपल्याकडे ओढून घेतले.

**४७.** आणि तोच आहे, ज्याने रात्रीला तुमच्यासाठी पोषाख बनविले, आणि झोपेला सुख शांतीमय बनविले आणि दिवसाला उठून उभे राहण्याची वेळ.

**४८.** आणि तोच आहे जो कृपास्वरूप पावसापूर्वी खूशखबर देणाऱ्या हवेला पाठवितो आणि आम्ही आकाशातून अतिशय स्वच्छ- शुद्ध (पाक) पाणी वर्षवितो.

**४९.** यासाठी की त्याच्याद्वारे मृत झालेल्या शहराला जिवंत करावे आणि ते आम्ही

(१) वस्तीशी अभिप्रेत लूत जनसमूहाच्या वस्त्या सदूम आणि अमूरा वगैरे अभिप्रेत आहेत आणि वाईट पावसाशी अभिप्रेत दगड धोंड्यांचा पाऊस होय. या वस्त्या पालथ्या पाडल्या गेल्या होत्या. त्यानंतर त्यांच्यावर दगडांचा पाऊस पाडला गेला. जसे सूरह हूद-८२ मध्ये सांगितले गेले आहे. या वस्त्या सीरिया आणि पॅलेस्टीनच्या मार्गात पडतात, ज्यांच्यावरून मक्कानिवासी ये-जा करीत असत.

आपल्या निर्मितीपैकी अधिकांश जनावरांना आणि माणसांना पाजतो.

**५०.** आणि निःसंशय, आम्ही यास त्यांच्या दरम्यान अनेक प्रकारे वर्णन केले यासाठी की त्यांनी बोध प्राप्त करावा, परंतु तरीही अधिकांश लोकांनी कृतघ्नतेखेरीज (आणखी काही) मानले नाही.

**५१.** आणि आम्ही जर इच्छिले असते तर प्रत्येक वस्तीत एक भय दाखविणारा पाठविला असता.

**५२.** तेव्हा तुम्ही काफिरांचे म्हणणे मान्य करू नका आणि कुरआनद्वारे पूर्ण शक्तीने त्यांच्याशी महाधर्मयुद्ध (जिहाद) करा.

**५३.** आणि तोच आहे ज्याने दोन समुद्रांना आपसात मिळवून ठेवले आहे. एक आहे गोड चवदार आणि दुसरा खारा कडू आणि आणि या दोघांच्या दरम्यान एक आड पडदा आणि भक्कम आड उभा केला.

**५४.** आणि तोच आहे ज्याने पाण्यापासून मानवाला निर्माण केले, मग त्याला वंश बाळगणारा आणि सासरवाडीचे नातेसंबंध राखणारा बनविले. निःसंशय, तुमचा पालनकर्ता प्रत्येक गोष्ट करण्यास समर्थ आहे.

**५५.** आणि हे अल्लाहऐवजी अशांची उपासना करतात जे ना त्यांना काही लाभ पोहचवू शकतात आणि ना काही हानि पोहचवू शकतात. काफिर तर आहेच आपल्या पालनकर्त्याविरूद्ध (सैताना) चा सहाय्यक.

**५६.** आणि आम्ही तुम्हाला खूशखबर देणारा आणि खबरदार करणारा (पैगंबर) बनवून पाठविले आहे.

**५७.** सांगा की मी (कुरआन पोहचविल्याबद्दल) तुमच्याकडून कसलेही पारिश्रमिक इच्छित नाही, परंतु हे की जो इच्छिल त्याने आपल्या पालनकर्त्याचा मार्ग अंगीकारावा.

**५८.** आणि त्या चिरकाल राहणाऱ्या अल्लाहवर पूर्ण विश्वास राखावा, ज्याला कधीही मृत्यु नाही त्याच्या प्रशंसेसह त्याची पवित्रता (तस्बीह) वर्णन करीत राहावे. तो आपल्या दासांचे अपराध चांगल्या प्रकारे जाणतो.

**५९.** तोच आहे ज्याने आकाशांना आणि जमिनीला आणि त्यांच्या दरम्यान असलेल्या

समस्त वस्तूंना सहा दिवसांत निर्माण केले, मग तो अर्श (ईश-सिंहासना) वर बुलंद झाला. तो रहमान आहे, तुम्ही त्याच्याविषयी एखाद्या जाणकाराला विचारा.

**६०.** आणि त्यांना जेव्हा देखील सांगितले जाते की रहमान (दयावान अल्लाह) ला सजदा करा (त्याच्यापुढे माथा टेका) तेव्हा ते म्हणतात की रहमान काय आहे? काय आम्ही त्याला सजदा करावा, ज्याचा आदेश तुम्ही आम्हाला देत आहात आणि (या आवाहनाने) त्यांच्या तिरस्कारात वाढच होते.

**६१.** मोठा शुभ- मंगलप्रद आहे तो ज्याने आकाशात बुरुज बनविले, आणि त्यात सूर्य बनविला आणि प्रकाशमान चंद्र देखील.

**६२.** आणि त्यानेच रात्र आणि दिवसाला एका पाठोपाठ ये-जा करणारा बनविले त्या माणसाच्या बोध- उपदेशाकरिता, जो बोध प्राप्त करण्याचा किंवा कृतज्ञशील होण्याचा इरादा राखत असेल.

**६३.** आणि रहमान (दयावान अल्लाह) चे सच्चे दास ते आहेत, जे जमिनीवर नरमीने चालतात आणि जेव्हा अज्ञानी लोक त्यांच्याशी बोलू लागतात, तेव्हा ते म्हणतात सलाम आहे.[१]

**६४.** आणि जे आपल्या पालनकर्त्यासमोर सजदा करतात आणि उभे राहून (नमाजच्या अवस्थेत) रात्र घालवितात.

**६५.** आणि जे दुआ (प्रार्थना) करतात की हे आमच्या पालनकर्त्या! जहन्नमच्या शिक्षा- यातनेला आमच्यापासून दूरच ठेव, कारण तिची शिक्षा अगदी चिकटून राहणारी आहे.[२]

---

(१) 'सलाम'शी अभिप्रेत इथे तोंड फिरवणे व वाद टाळणे होय. अर्थात ईमानधारक अज्ञानी लोकांशी व हुज्जत करणाऱ्यांशी वाद घालत नाही, किंबहुना अशा प्रसंगी टाळतात आणि अशा लोकांपासून अलिप्त राहण्याचा प्रयत्न करतात आणि निरर्थक वादविवाद करीत नाही.

(२) यावरून हे कळाले की दयावान अल्लाह (रहमान) चे दास खऱ्या अर्थाने ते आहेत, जे एकीकडे रात्री जागून अल्लाहची उपासना करतात आणि दुसरीकडे हे भयही बाळगतात की कदाचित एखादी चुकी किंवा सुस्तीमुळे अल्लाहच्या पकडीत न यावे. यास्तव ते जहन्नमच्या शिक्षा- यातनेपासून सुटका मागतात. अर्थात अल्लाहची उपासना आणि आज्ञापालनावर कशाही प्रकारचा गर्व आणि घमेंड केली जाऊ नये.

**६६.** ते कायमस्वरूपी ठिकाण आणि निवासाच्या दृष्टीने मोठी वाईट जागा आहे.

**६७.** आणि जे खर्च करतानाही ना उधळपट्टी करतात, ना कंजूसपणा, किंबहुना या दोघांमधील समतोल मार्ग असतो.

**६८.** आणि जे अल्लाहसोबत दुसऱ्या एखाद्या उपास्याला पुकारत नाही, आणि एखाद्या अशा माणसाला, ज्याची हत्या करणे अल्लाहने हराम (अवैध) केले असावे, त्याची नाहक हत्या करीत नाही, ना ते व्यभिचार करतात[1] आणि जो कोणी हे कर्म करील तर तो स्वत:वर कठोर शिक्षा ओढवून घेईल.

**६९.** त्याला कयामतच्या दिवशी दुप्पट अज़ाब (शिक्षा- यातना) दिला जाईल आणि तो अपमान आणि अनादरासह सदैव तेथेच राहील.

**७०.** त्या लोकांखेरीज, जे माफी मागतील आणि ईमान राखतील आणि नेकीचे कर्म करतील तर अशा लोकांचे अपराध, अल्लाह सत्कमर्मात बदलतो. अल्लाह मोठा माफ करणारा आणि दया करणारा आहे.

**७१.** आणि जो मनुष्य माफी मागेल आणि सत्कर्म करत राहील तर तो वास्तविकपणे अल्लाहकडे खरा झुकाव राखतो.

**७२.** आणि जे खोटी साक्ष देत नाहीत, आणि जेव्हा ते एखाद्या निरर्थक आणि व्यर्थ गोष्टीजवळून जातात, तेव्हा प्रतिष्ठापूर्वक जातात.

**७३.** आणि जेव्हा त्यांना त्यांच्या पालनकर्त्या (ची वचने आणि वायद्यांसंबंधी) च्या आयती ऐकविल्या जातात तेव्हा ते त्यावर आंधळे-बहीरे होऊन उडी घेत नाहीत.

---

(१) हदीसमध्ये पैगंबर (सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) यांना विचारले गेले, कोणता अपराध सर्वांत मोठा आहे. पैगंबर (सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) यांनी फर्माविले, हे की तू अल्लाहसोबत दुसऱ्याला सहभागी करावे, वास्तविक त्यानेच तुला निर्माण केले. त्याने विचारले, त्यानंतर कोणता गुन्हा सर्वांत मोठा आहे? फर्माविले, आपल्या संततीची या भयाने हत्या करणे की ती तुझ्यासोबत खाईल. त्याने विचारले त्यानंतर कोणता? पैगंबरांनी फर्माविले, हे की तू आपल्या शेजाऱ्याच्या पत्नीशी व्यभिचार करावा. मग पैगंबर (सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) यांनी फर्माविले की या गोष्टींची पुष्टी या आयतीद्वारे होते. नंतर पैगंबर (सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) यांनी याच आयतीचे पठण केले. (अलबुखारी, तफसीर सूरह अल बकरा, मुस्लिम किताबुल ईमान बाबु कौनिश-शिर्के अकबहुज जुनूब)

**७४.** आणि अशी दुआ (प्रार्थना) करतात की हे आमच्या पालनकर्त्या! तू आम्हाला आमच्या पत्न्या आणि संततीद्वारे नेत्रांना शितलता प्रदान कर आणि आम्हाला नेक-सदाचारी लोकांचा नेता बनव.

**७५.** हेच ते लोक होत, ज्यांना त्यांच्या सहनशीलतेच्या मोबदल्यात (जन्नतचे उंच) सज्जे प्रदान केले जातील, तिथे त्यांना आशीर्वाद आणि सलाम पोहचविला जाईल.

**७६.** तिथे ते नेहमी नेहमी राहतील, ती अतिशय चांगली जागा आणि आरामाचे ठिकाण आहे.

**७७.** सांगा, जर तुमची मृदु- कोमल दुआ (प्रार्थना) नसती, तर माझ्या पालनकर्त्याने तुमची कदापि पर्वा केली नसती. तुम्ही तर खोटे ठरविले आहे. आता लवकरच त्याची शिक्षा तुम्हाला येऊन धरेल.

---

## सूरह शुअरा - २६

सूरह शुअरा मक्का येथे अवतरली आणि यात दोनशे सत्तावीस आयती आणि अकरा रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** ता - सीन - मीम.

**२.** या दिव्य ग्रंथाच्या आयती आहेत.

**३.** त्यांनी ईमान न राखल्याबद्दल कदाचित तुम्ही आपला जीव सोडाल.

**४.** जर आम्ही इच्छिले असते तर त्यांच्यावर आकाशातून एखादी अशी निशाणी अवतरित केली असती की जिच्यासमोर त्यांच्या माना झुकल्या असत्या.

**५.** आणि त्यांच्याजवळ रहमान (दयावान अल्लाह) कडून जे देखील नवे बोध- उपदेश आले, त्याकडून तोंड फिरविणारे बनले.

**६.** त्या लोकांनी खोटे ठरविले आहे, आता लवकरच त्यांच्याजवळ, त्या गोष्टीची वार्ता

येऊन पोहचेल, जिची ते थट्टा उडवित आहेत.

**७.** काय त्यांनी जमिनीकडे नाही पाहिले की आम्ही तिच्यात प्रत्येक प्रकारच्या सुंदर जोड्या कितीतरी उगविल्या आहेत.

**८.** निःसंशय त्यात मोठी निशाणी आहे, तथापि त्यांच्यापैकी बहुतेक लोक ईमान राखणार नाहीत.

**९.** आणि निःसंशय तुमचा पालनकर्ता वर्चस्वशाली आणि दयावान आहे.

**१०.** आणि जेव्हा तुमच्या पालनकर्त्याने मूसाला पुकारले की तू अत्याचारी जनसमूहाजवळ जा.

**११.** फिरऔनच्या जनसमूहाजवळ. काय ते सदाचरण करणार नाहीत?

**१२.** मूसा म्हणाले, हे माझ्या पालनकर्त्या! मला तर भय वाटते की कदाचित त्यांनी मला खोटे (न) ठरवावे.

**१३.** आणि माझी छाती (हृदय) संकुचित होत आहे. माझी जीभ वळत नाही यास्तव तू हारूनकडेही वहयी (प्रकाशना) पाठव.

**१४.** आणि त्यांचा माझ्यावर, माझ्या एका चुकीचा (दावा) ही आहे. मला भय वाटते की कदाचित त्यांनी माझी हत्या न करून टाकावी.

**१५.** (अल्लाहने) फर्माविले, असे कदापि होणार नाही. थुम्ही दोघे आमच्या निशाण्यांसह जा. आम्ही स्वतः ऐकणारे तुमच्या सोबतीला आहोत.

**१६.** तुम्ही दोघे फिरऔनजवळ जाऊन सांगा की निःसंशय आम्ही साऱ्या जगाच्या पालनकर्त्यातर्फे पाठविलेले आहोत.

**१७.** की तू आमच्यासोबत इस्त्राईलच्या संततीला पाठव.

**१८.** (फिरऔन) म्हणाला, काय आम्ही तुझे, तुझ्या बालपणात आपल्या येथे पालनपोषण केले नव्हते? आणि तू आपल्या वयाची (आयूष्याची) अनेक वर्षे आमच्यात नाही काढलीत?

**१९.** आणि नंतर तू जे आपले काम केले ते केले आणि तू कृतघ्न लोकांपैकी आहेस.

**२०.** (मूसा) म्हणाले, मी हे काम अशा वेळी केले जेव्हा मी वाट चुकलेल्या लोकांपैकी होतो.

**२१.** नंतर मी तुमच्या दहशतीमुळे तुमच्यापासून पळालो, मग मला माझ्या पालनकर्त्याने आदेश व ज्ञान प्रदान केले आणि मला आपल्या पैगंबरांपैकी केले.

**२२.** आणि काय माझ्यावर तुझा हाच तो उपकार आहे? जो तू जाहीर करीत आहेस की तू इस्त्राईलच्या संततीला गुलाम बनवून ठेवले आहे.

**२३.** फिरऔन म्हणाला की सर्व विश्वांचा स्वामी व पालनकर्ता काय आहे?

**२४.** (हजरत मूसा) म्हणाले, तो आकाशांचा आणि धरतीचा आणि त्यांच्या दरम्यानच्या समस्त वस्तूंचा स्वामी व पालनकर्ता आहे, जर तुम्ही ईमान राखणारे असाल.

**२५.** (फिरऔन) आपल्या निकटच्या लोकांना म्हणाला, काय तुम्ही ऐकत नाही?

**२६.** (हजरत मूसा) म्हणाले, तो तुमचा आणि तुमच्या पूर्वजांचाही स्वामी व पालनकर्ता आहे.

**२७.** (फिरऔन) म्हणाला, (लोकांनो) तुमचा हा पैगंबर, जो तुमच्याकडे पाठविला गेला आहे, हा तर अगदीच वेडा आहे.

**२८.** (हजरत मूसा) म्हणाले, तोच पूर्व आणि पश्चिमेचा आणि त्याच्या दरम्यान असलेल्या समस्त वस्तूंचा पालनकर्ता आहे, जर तुम्ही अक्कल बाळगत असाल.

**२९.** (फिरऔन) म्हणाला, खबरदार जर तू माझ्याशिवाय दुसऱ्या कोणाला उपास्य बनविले तर मी तुला कैद करून टाकीन.

**३०.** (मूसा) म्हणाले, मी तुझ्याजवळ एखादी स्पष्ट वस्तू घेऊन आल्यावरही?

**३१.** (फिरऔन) म्हणाला, जर तू सच्चा लोकांपैकी आहेस तर ती सादर कर.

**३२.** त्यांनी (त्याच वेळी) आपली काठी खाली टाकली ती अचानक उघड उघड (फार मोठा) अजगर बनली.

**३३.** आणि आपला हात बाहेर काढला तर तो देखील त्याच क्षणी पाहणाऱ्यांना शुभ्र प्रकाशमय दिसू लागला.

**३४.** (फिरऔन) आपल्या जवळच्या सरदारांना म्हणू लागला की हा तर फार मोठा निष्णात जादूगार आहे.

**३५.** हा तर असे इच्छितो की आपल्या जादूच्या जोरावर तुम्हाला तुमच्या भूमीतून बाहेर काढावे. सांगा, आता तुम्ही काय सल्ला देता?

**३६.** ते सर्व म्हणाले, तुम्ही याला आणि याच्या भावाला सवड द्या आणि सर्व शहरांमध्ये (लोकांना) एकत्र करणारे पाठवा.

**३७.** ज्यांनी तुमच्याजवळ निष्णात जादूगारांना घेऊन यावे.

**३८.** मग एका निर्धारित दिवसाच्या वेळी सर्व जादूगार एकत्रित केले गेले.

**३९.** आणि सर्वसामान्य लोकांनाही सांगितले गेले की तुम्ही देखील जमा व्हाल.

**४०.** यासाठी की जर जादूगार प्रभावी ठरले तर आम्ही त्यांचेच अनुसरण करू.

**४१.** जादूगार येऊन फिरऔनला म्हणू लागले की जर आम्ही जिंकलो तर आम्हाला काही बक्षीस वगैरे मिळेल ना!

**४२.** (फिरऔन) म्हणाला, होय! (मोठ्या खुशीने) किंबहुना अशा परिस्थितीत तुम्ही माझे खास दरबारी व्हाल.

**४३.** (हजरत) मूसा जादूगारांना म्हणाले, जे काय तुम्हाला टाकायचे आहे, ते टाका.

**४४.** त्यांनी आपल्या दोऱ्या आणि काठ्या खाली टाकल्या आणि म्हणाले, फिरऔनच्या प्रतिष्ठेची शपथ, आम्ही अवश्य विजयी होऊ.

**४५.** आता (हजरत) मूसा यांनीही आपली काठी खाली टाकली, जिने त्याच क्षणी त्यांचा असत्याचा बनविलेला खेळ गिळायला सुरुवात केली.

**४६.** हे पाहताच ते जादूगार सजद्यात पडले.

**४७.** आणि त्यांनी स्पष्टपणे सांगितले की आम्ही तर सर्व विश्वाच्या पालनकर्त्यावर ईमान राखले.

**४८.** अर्थात मूसा आणि हारूनच्या पालनकर्त्यावर.

**४९.** (फिरऔन) म्हणाला, माझी परवानगी घेण्यापूर्वीच तुम्ही त्याच्यावर ईमान राखले, निश्चितच हा तुमचा सरदार (मोठा गुरू) आहे, ज्याने तुम्हा सर्वांना जादू शिकवली आहे. तेव्हा तुम्हाला अत्ताच माहीत पडेल. शपथ आहे. मी देखील तुमचे हात पाय विरूद्ध दिशांनी कापून टाकीन आणि तुम्हा सर्वांना फासावर लटकवीन.

**५०.** ते म्हणाले, काही हरकत नाही, आम्ही तर आपल्या पालनकर्त्याकडे परतून जाणारच आहोत.

**५१.** या कारणास्तव की आम्ही सर्वांत प्रथम ईमान राखणारे बनलो आहोत, आम्ही आशा बाळगतो की आमचा स्वामी व पालनकर्ता आमच्या सर्व चुका माफ करील.

**५२.** आणि आम्ही मूसावर वहयी (प्रकाशना) केली की रात्रीच्या रात्री माझ्या दासांना घेऊन निघा. तुम्हा सर्वांचा पाठलाग केला जाईल.

**५३.** फिरऔनने शहरांमध्ये जमा करणाऱ्यांना पाठविले.

**५४.** की निश्चितच हा समूह अतिशय कमी संख्येत आहे.

**५५.** आणि त्यावर हे आम्हाला फार क्रोधित करीत आहेत.

**५६.** आणि निःसंशय, आम्ही मोठ्या संख्येत आहोत, त्यांच्यापासून सावध राहणारे.

**५७.** शेवटी आम्ही त्यांना बागांमधून व झऱ्यांमधून बाहेर काढले.

**५८.** आणि खजिन्यांमधून आणि चांगल्या चांगल्या ठिकाणांमधून.

**५९.** अशा प्रकारे झाले, आणि आम्ही त्या (सर्व वस्तूं) चा वारस इस्त्राईलच्या संततीला बनविले.

**६०.** यास्तव फिरऔनचे अनुयायी सूर्य उगवताच त्यांचा पाठलाग करण्यास निघाले.

**६१.** यासाठी जेव्हा दोघांनी एकमेकांना पाहिले तेव्हा मूसाचे साथीदार म्हणाले, आम्ही तर खात्रीने पकडीत आलो.

**६२.** (हजरत मूसा) म्हणाले, कदापि नाही. विश्वास राखा, माझा रब (पालनकर्ता) माझ्या सोबतीला आहे. जो जरूर मला मार्ग दाखविल.

**६३.** आम्ही मूसाकडे वहयी (प्रकाशना) पाठविली की समुद्राच्या पाण्यावर आपल्या काठीचा प्रहार करा तेव्हा त्याच क्षणी समुद्र दुभंगला आणि प्रत्येक हिस्सा पाण्याच्या मोठ्या पर्वताइतका झाला.

**६४.** आणि आम्ही त्याच ठिकाणी दुसऱ्यांना जवळ आणून उभे केले.

**६५.** आणि मूसा आणि त्यांच्या सर्व साथीदारांना मुक्ती प्रदान केली.

**६६.** मग इतर सर्वांना बुडवून टाकले.

**६७.** निःसंशय, यात फार मोठा बोध आहे आणि त्यांच्यापैकी अधिकांश लोक ईमान राखणारे नाहीत.

**६८.** आणि निःसंशय तुमचा पालनकर्ता मोठा वर्चस्वशाली आणि दया करणारा आहे.

**६९.** आणि त्यांना इब्राहीमचा वृत्तांतही ऐकवा.

**७०.** जेव्हा त्यांनी आपल्या पित्यास आणि आपल्या जनसमूहाच्या लोकांना फर्माविले की तुम्ही कोणाची उपासना करता?

**७१.** त्यांनी उत्तर दिले की आम्ही मूर्तींची उपासना करतो. आम्ही तर सतत त्यांचे उपासक बनून बसलो आहोत.

**७२.** पैगंबर (इब्राहीम अलै.) यांनी विचारले, जेव्हा तुम्ही यांना पुकारता तेव्हा काय ते ऐकतातही?

**७३.** किंवा तुम्हाला नफा - नुकसानही पोहचवू शकतात?

**७४.** ते म्हणाले, हे (सर्व आम्ही नाही जाणत) आम्हाला तर आमचे पूर्वज असेच करताना आढळले आहेत.

**७५.** (इब्राहीम) म्हणाले, त्यांना काही जाणता, ज्यांची तुम्ही पूजा करीत आहात?

**७६.** तुम्ही आणि तुमच्या पूर्वीचे वाडवडील.

**७७.** ते सर्व माझे शत्रू आहेत, त्या सच्चा अल्लाहखेरीज, जो सर्व विश्वाचा पालनकर्ता

आहे.

**७८.** ज्याने मला निर्माण केले आणि तोच मला मार्गदर्शन करतो.

**७९.** तोच आहे जो मला खाऊ-पिऊ घालतो.

**८०.** तसेच जेव्हा मी आजारी पडतो तेव्हा तो मला स्वास्थ्य प्रदान करतो.

**८१.** आणि तोच मला मृत्यु देईल आणि मग पुन्हा जिवंत करील.

**८२.** आणि ज्याच्याकडून आशा बाळगतो की तो मोबदला दिला जाण्याच्या दिवशी माझे अपराध माफ करील.

**८३.** हे माझ्या पालनकर्त्या! मला हिकमत (बुद्धी कौशल्य) प्रदान कर आणि मला नेक- सदाचारी लोकांमध्ये सामील कर.

**८४.** आणि माझे पवित्र - स्मरण (भविष्यात) येणाऱ्या लोकांमध्येही बाकी ठेव.

**८५.** आणि मला सुखांनी भरलेल्या जन्नतच्या वारसांपैकी बनव.

**८६.** आणि माझ्या पित्यास क्षमा कर. निःसंशय तो मार्गभ्रष्ट लोकांपैकी होता.

**८७.** आणि ज्या दिवशी लोक दुसऱ्यांदा जिवंत केले जातील, मला अपमानित करू नकोस.

**८८.** ज्या दिवशी धन-संपत्ती आणि संतती काहीच उपयोगी पडणार नाही.

**८९.** परंतु (लाभान्वित तोच ठरेल) जो अल्लाहसमोर व्यंगविरहित हृदय नेईल.

**९०.** आणि नेक सदाचारी लोकांकरिता जन्नतला अगदी जवळ आणले जाईल.

**९१.** आणि मार्गभ्रष्ट लोकांकरिता जहन्नम उघड केली जाईल.

**९२.** आणि त्यांना विचारले जाईल की तुम्ही ज्यांची उपासना करीत राहिले, ते कोठे आहेत?

**९३.** जे सर्वश्रेष्ठ अल्लाहखेरीजचे होते. काय हे तुमची मदत करतात किंवा एखादा बदला घेऊ शकतात?

**९४.** यास्तव ते सर्व आणि समस्त मार्गभ्रष्ट लोक जहन्नममध्ये वर खाली फेकले जातील.

**९५.** आणि इब्लिस (सैताना) चे संपूर्ण सैन्यही.

**९६.** तिथे ते आपसात भांडण - तंटा करीत म्हणतील,

**९७.** अल्लाहची शपथ! निःसंशय, आम्ही तर उघट अशा चुकींवर होतो.

**९८.** वास्तविक तुम्हाला सर्व विश्वाच्या पालनकर्त्यासमान समजत होतो.

**९९.** आणि आम्हाला तर गुन्हेगारांखेरीज इतर कोणीही मार्गभ्रष्ट केले नव्हते.

**१००.** आता तर आमची कोणी शिफारस करणाराही नाही.

**१०१.** आणि ना एखादा (सच्चा) हितचिंतक मित्र.

**१०२.** जर आम्हाला एक वेळ दुसऱ्यांदा जाण्याची संधी लाभली असती तर आम्ही पक्के सच्चे ईमानधारक बनलो असतो.

**१०३.** निःसंशय, यात एक फार मोठी निशाणी आहे, परंतु त्यांच्यापैकी बहुतेक लोक ईमान राखणारे नाहीत.

**१०४.** आणि निःसंशय, तुमचा पालनकर्ताच वर्चस्वशाली, दयावान आहे.

**१०५.** नूहच्या जनसमूहानेही पैगंबरांना खोटे ठरविले.

**१०६.** जेव्हा त्यांचा भाऊ नूह यांनी सांगितले, काय तुम्ही अल्लाहचे भय नाही राखत?

**१०७.** (ऐका!) मी तुमच्याकडे अल्लाहचा विश्वस्त रसूल (पैगंबर) आहे.

**१०८.** तेव्हा तुम्ही अल्लाहचे भय बाळगले पाहिजे आणि माझे म्हणणे मान्य केले पाहिजे.

**१०९.** आणि मी तुमच्याकडून त्याबद्दल कोणताही मोबदला इच्छित नाही. माझा मोबदला तर केवळ सर्व विश्वांचा पालनकर्त्याजवळ आहे.

**११०.** यास्तव तुम्ही अल्लाहचे भय राखा आणि माझे आज्ञापालन करा.

**१११.** (जनसमूहाने) उत्तर दिले की काय आम्ही तुमच्यावर ईमान राखावे? तुमचे आज्ञापालन करणारे तर हलक्या प्रतीचे लोक आहेत.

**११२.** (नूह) म्हणाले, मला काय माहीत की पूर्वी ते काय करीत राहिलेत?

**११३.** त्यांच्या हिशोबाची जबाबदारी तर माझ्या पालनकर्त्यावर आहे. जर समज बाळगत असाल.

**११४.** आणि मी ईमान राखणाऱ्यांना धक्के देणारा (झिडकारणारा) नाही.

**११५.** मी तर स्पष्टतः खबरदार करणारा आहे.

**११६.** ते म्हणाले, हे नूह! जर तू हे थांबवले नाहीस तर अवश्य तुला दगडांचा मारा करून ठार केले जाईल.

**११७.** (नूह) म्हणाले, हे माझ्या पालनकर्त्या! माझ्या जनसमूहाच्या लोकांनी मला खोटे ठरविले.

**११८.** तेव्हा तू, माझ्या आणि त्यांच्या दरम्यान निश्चितच फैसला कर, आणि मला व माझ्या ईमानधारक साथीदारांना मुक्ती प्रदान कर.

**११९.** यास्तव आम्ही त्याला आणि त्याच्या साथीदारांना भरलेल्या नौकेत (स्वार करून) सुटका प्रदान केली.

**१२०.** मग त्यानंतर बाकीच्या सर्व लोकांना आम्ही बुडवून टाकले.

**१२१.** निःसंशय, यात मोठा बोध आहे परंतु त्यांच्यापैकी बहुसंख्य लोक ईमान राखणारे नव्हतेच.

**१२२.** आणि निःसंशय, तुमचा पालनकर्ता मोठा प्रभावशाली, दयावान आहे.

**१२३.** आद (जनसमूह) नेही पैगंबरांना खोटे ठरविले.

**१२४.** जेव्हा त्यांना त्याचा भाऊ हूदने सांगितले, काय तुम्ही अल्लाहचे भय नाही राखत.

**१२५.** मी तुमचा विश्वस्त पैगंबर (संदेशवाहक) आहे.

**१२६.** तेव्हा अल्लाहचे भय राखा आणि माझे म्हणणे मान्य करा.

**१२७.** आणि मी त्याबद्दल तुमच्याकडून कसलाही मोबदला मागत नाही, माझे पारिश्रमिक (मोबदला) तर सर्व विश्वांच्या पालनकर्त्याजवळ आहे.

**१२८.** काय तुम्ही प्रत्येक उंच स्थानावर खेळस्वरूप करमणुकीचे चिन्ह (स्मारक) बनवित आहात?

**१२९.** आणि मोठ्या उद्योगाचे (मजबूत महाल निर्माण) करीत आहात, जणू काही तुम्ही सदैवकाळ इथेच राहाल.

**१३०.** आणि जेव्हा एखाद्यावर हात टाकता, तेव्हा मोठ्या कठोरपणे पकडता.

**१३१.** तेव्हा अल्लाहचे भय राखा आणि माझे म्हणणे मान्य करा,

**१३२.** आणि त्याचे भय बाळगा, ज्याने त्या गोष्टीद्वारे तुमची मदत केली, ज्यांना तुम्ही जाणता.

**१३३.** त्याने तुमची मदत केली संपत्ती आणि संततीद्वारे.

**१३४.** आणि बागा आणि झऱ्यांद्वारे.

**१३५.** मला तर तुमच्याबाबत मोठ्या दिवसाच्या शिक्षा- यातनेचे भय वाटते.

**१३६.** (ते) म्हणाले की तुम्ही उपदेश करा किंवा उपदेश करणाऱ्यांपैकी राहू नका आमच्याकरिता सारखेच आहे.

**१३७.** हा तर प्राचीन काळाच्या लोकांचा दीन (धर्म) आहे.

**१३८.** आणि आम्ही कदापि शिक्षा- यातना प्राप्त करणाऱ्यांपैकी असणार नाही.

**१३९.** ज्याअर्थी 'आद' जनसमूहाच्या लोकांनी (हजरत) हूद यांना खोटे ठरविले यासाठी आम्ही त्यांना नष्ट केले. निःसंशय, यात मोठी निशाणी आहे, परंतु त्यांच्यापैकी बहुतेक लोक ईमान राखणारे नव्हते.

**१४०.** आणि निःसंशय तुमचा पालनकर्ताच वर्चस्वशाली, दयावान आहे.

**१४१.** ‘समूद’ समुदायाच्या लोकांनीही पैगंबरास खोटे ठरविले.

**१४२.** जेव्हा त्यांचे बंधु ‘स्वालेह’ने त्यांना सांगितले की काय तुम्ही अल्लाहचे भय बाळगत नाही ?

**१४३.** मी तुमच्याकडे अल्लाहचा विश्वस्त पैगंबर आहे.

**१४४.** तेव्हा तुम्ही अल्लाहचे भय राखा आणि माझे आज्ञापालन करा.

**१४५.** आणि मी त्याबद्दल तुमच्याकडून कसलाही मोबदला मागत नाही. माझा मोबदला तर सर्व विश्वांच्या पालनकर्त्याकडे आहे.

**१४६.** काय वस्तूं (देणग्यां) मध्ये, ज्या इथे आहेत, तुम्हाला शांतीपूर्वक सोडले जाईल ?

**१४७.** अर्थात त्या बागांमध्ये आणि त्या झऱ्यांमध्ये.

**१४८.** आणि त्या शेतांमध्ये आणि त्या खजुरींच्या बागांमध्ये ज्यांचे घोस (भार वाढल्याने) तुटून पडतात.

**१४९.** आणि तुम्ही पर्वतांना कोरून आकर्षक (सुंदर) इमारती निर्माण करता.

**१५०.** यास्तव अल्लाहचे भय राखा आणि माझे अनुसरण करा.

**१५१.** आणि मर्यादेचे उल्लंघन करणाऱ्यांचे अनुसरण करण्यापासुन थांबा .

**१५२.** जे धरतीत फसाद (उत्पात) पसरवित आहेत आणि सुधारणा करीत नाही.

**१५३.** ते म्हणाले, तू तर अशा लोकांपैकी आहेस, ज्यांच्यावर जादूटोणा केला गेला आहे.

**१५४.** तू तर आमच्यासारखाच एक मनुष्य आहे. जर तू सच्चा लोकांपैकी आहेस तर एखादा मोजिजा (ईशचमत्कार) घेऊन ये.

**१५५.** (स्वालेह) म्हणाले, ही सांडणी आहे. पाणी प्यायची एक पाळी हिची, आणि एका निर्धारित दिवशी पाणी पिण्याची पाळी तुमची.

**१५६.** (आणि खबरदार!) हिला वाईट हेतुने हात लावू नका, अन्यथा एका मोठ्या दिवसाची शिक्षा- यातना तुम्हाला येऊन धरेल.

**१५७.** तरीही त्यांनी तिचे हात पाय कापून टाकले, नंतर पश्चात्ताप करणारे झाले.

**१५८.** तेव्हा अज़ाब (अल्लाहच्या शिक्षा- यातने) ने त्यांना येऊन धरले. निःसंशय, यात मोठी शिकवण (बोध) आहे, परंतु त्यांच्यापैकी बहुसंख्य लोक ईमान राखणारे नव्हते.

**१५९.** आणि निःसंशय तुमचा पालनकर्ता मोठा प्रभावशाली, दयावान आहे.

**१६०.** लूतच्या जनसमूहानेही पैगंबरांना खोटे ठरविले.

**१६१.** जेव्हा त्यांचा भाऊ लूत यांनी त्यांना सांगितले की काय तुम्ही अल्लाहचे भय नाही बाळगत?

**१६२.** मी तुमच्याकडे विश्वस्त रसूल (पैगंबर) आहे.

**१६३.** तेव्हा तुम्ही अल्लाहचे भय राखा आणि माझे आज्ञापालन करा.

**१६४.** आणि मी तुमच्याकडून याबद्दल कोणताही मोबदला मागत नाही, माझ्या मोबदल्याची जबाबदारी केवळ सर्व विश्वांच्या पालनकर्त्यावर आहे.

**१६५.** काय तुम्ही जगातल्या लोकांपैकी पुरुषांजवळ जाता?

**१६६.** आणि तुमच्या ज्या स्त्रियांना अल्लाहने तुमची पत्नी बनविले आहे त्यांना सोडून देता, खरी गोष्ट अशी की तुम्ही आहातच मर्यादा ओलांडणारे.

**१६७.** (त्यांना) उत्तर दिले की हे लूत! जर तू हे थांबवले नाहीस तर अवश्य तुला बाहेर काढले जाईल.

**१६८.** (लूत) म्हणाले, मी तुमच्या आचरणाने अगदी अप्रसन्न आहे.

**१६९.** हे माझ्या पालनकर्त्या! मला आणि माझ्या कुटुंबाला या (कुकर्मा) पासून वाचव, जे हे करीत आहेत.

**१७०.** यास्तव आम्ही त्यांना आणि त्यांच्याशी संबंध (नाते) असलेल्या सर्वांना

वाचविले.

**१७१.** एका वृद्ध स्त्रीखेरीज की ती मागे राहणाऱ्यांपैकी झाली.

**१७२.** मग आम्ही इतर सर्वांना नष्ट करून टाकले.

**१७३.** आणि आम्ही त्यांच्यावर एक खास प्रकारचा पाऊस पाडला. तो मोठा वाईट पाऊस होता, जो खबरदार केल्या गेलेल्या लोकांवर पडला.

**१७४.** निःसंशय, यातही मोठी निशाणी आहे, परंतु त्यांच्यापैकी अधिकांश लोक ईमान राखणारे नव्हते.

**१७५.** निःसंशय, तुमचा पालनकर्ताच वर्चस्वशाली, दया करणारा आहे.

**१७६.** एयकावाल्यांनीही पैगंबरांना खोटे ठरविले.

**१७७.** जेव्हा (पैगंबर) शुऐब त्यांना म्हणाले, काय तुम्ही अल्लाहचे भय नाही राखत?

**१७८.** मी तुमच्याकडे विश्वस्त पैगंबर आहे.

**१७९.** तेव्हा तुम्ही अल्लाहचे भय राखा, आणि माझे आज्ञापालन करा.

**१८०.** आणि मी त्याबद्दल तुमच्याकडून कसल्याही मोबदल्याची अपेक्षा करीत नाही. माझ्या मोबदल्याची जबाबदारी तर सर्व विश्वांच्या पालनकर्त्यावर आहे.

**१८१.** माप - तोल पुरेपूर करा आणि कमी देणाऱ्यांमध्ये सामील होऊ नका.

**१८२.** आणि सरळ (उचित) तराजूने तोल करून द्या.

**१८३.** आणि लोकांना त्यांच्या वस्तू कमी करून देऊ नका आणि (निर्भय होऊन) धरतीवर उत्पात (फसाद) माजवित फिरू नका.

**१८४.** आणि त्या अल्लाहचे भय राखा, ज्याने स्वतः तुम्हाला आणि पूर्वीच्या निर्मितीला निर्माण केले.

**१८५.** (ते) म्हणाले, तू तर त्या लोकांपैकी आहेस, ज्यांच्यावर जादूटोणा केला जातो.

**१८६.** आणि तू तर आमच्यासारखाच एक मनुष्य आहे आणि आम्ही तर तुला खोटे

बोलणाऱ्यांपैकीच समजतो.

**१८७.** जर तुम्ही सच्चा लोकांपैकी असाल तर आमच्यावर आकाशाचा एखादा तुकडा कोसळवा.

**१८८.** पैगंबर म्हणाले की माझा पालनकर्ता चांगल्या प्रकारे जाणणारा आहे, जे काही तुम्ही करीत आहात.

**१८९.** यास्तव त्यांनी त्याला खोटे ठरविले, तेव्हा त्यांना सावलीवाल्या दिवसाच्या अज़ाब (शिक्षा- यातने) ने धरले. तो मोठ्या भयंकर दिवसाचा अज़ाब होता.

**१९०.** निःसंशय, त्यात मोठी निशाणी आहे, परंतु त्यांच्यापैकी बहुसंख्य लोक ईमान राखणारे नव्हते.

**१९१.** आणि निःसंशय, तुमचा पालनकर्ताच वर्चस्वशाली, दयावान आहे.

**१९२.** आणि निःसंशय हा (कुरआन) सर्व विश्वांच्या पालनकर्त्याने अवतरित केला आहे.

**१९३.** यास विश्वस्त फरिश्ता (जिब्रील) घेऊन आला आहे.

**१९४.** तुमच्या हृदयावर (अवतरला आहे) यासाठी की तुम्ही (लोकांना) खबरदार करणाऱ्यांपैकी व्हावे.

**१९५.** स्पष्ट अरबी भाषेत आहे.

**१९६.** आणि पूर्वी होऊन गेलेल्या पैगंबरांच्या ग्रंथांमध्येही या (कुरआन) ची चर्चा आहे.[१]

**१९७.** काय त्यांच्यासाठी ही निशाणी पुरेशी नाही की (कुरआनच्या सत्यतेला) इस्राईलच्या संततीचे विद्वानही जाणतात.

---

(१) अर्थात ज्याप्रमाणे अंतिम पैगंबर (मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) यांच्या आगमनाचे व त्यांच्या गुणविशेषांचे वर्णन अन्य ग्रंथांत आहे, तद्वतच या कुरआनाच्या अवतरणाची शुभवार्ता देखील त्या ग्रंथांमध्ये दिली गेली. एक दुसरा अर्थ ्सा घेतला गेला की हा कुरआन त्या आदेशानुसार ज्यावर सर्व शरियतीत एकता राहिली, पूर्वीच्या ग्रंथांमध्येही अस्तित्वात राहिला आहे.

**१९८.** आणि जर आम्ही याला (अरबी भाषेऐवजी) अन्य एखादया भाषेच्या व्यक्तीवर अवतरित केले असते.

**१९९.** तर त्याने त्यांच्यासमोर याचे वाचन केले असते, पण यांनी त्यास मानले नसते.

**२००.** अशा प्रकारे आम्ही दुराचारी लोकांच्या मनात (इन्कार) दाखल केला आहे.

**२०१.** ते जोपर्यंत दुःखदायक शिक्षा- यातना (स्वतः) पाहून घेत नाहीत. तो पर्यंत ईमान राखणार नाहीत.

**२०२.** यास्तव तो (अज़ाब) अचानक येऊन पोहोचेल आणि त्यांना त्यांची कल्पना (अनुमान) देखील नसेल.

**२०३.** त्या वेळी म्हणतील, काय आम्हाला थोडा अवसर (संधी) दिला जाईल?

**२०४.** तर काय हे आमच्या शिक्षा- यातनेकरिता घाई माजवित आहे?

**२०५.** बरे, हे सांगा की जर आम्ही त्यांना वर्षानुवर्षे फायदा उचलू दिला,

**२०६.** मग त्यांना तो (अज़ाब) येऊन पोहोचला, ज्या विषयी त्यांना भय दाखवले जात होते.

**२०७.** तर जे काही फायदे त्यांना पोहोचविले जात राहिले, त्यापैकी काहीही त्यांना उपयोग पडू शकणार नाही.

**२०८.** आणि आम्ही कोणत्याही वस्तीला नष्ट केले नाही, परंतु अशाच स्थितीत की तिच्यासाठी खबरदार करणारे होते.

**२०९.** बोध (उपदेशा) च्या स्वरूपात आणि आम्ही अत्याचार करणार नाही.[१]

**२१०.** आणि या (कुरआन) ला सैतान घेऊन आले नाहीत.

---

(१) अर्थात पैगंबर पाठविल्याविना आणि त्यांच्याद्वारे सावधान केल्याविना जर आम्ही एखाद्या जनसमूहाला नष्ट केले असते तर हा अत्याचार ठरला असता. आम्ही असे कधीही केले नाही किंबहुना न्याय - नियमानुसार प्रथम त्यांना खबरदार केले, त्यानंतर जेव्हा त्यांनी पैगंबराचे म्हणणे मानले नाही, तेव्हा आम्ही त्यांचा नाश केला. हाच विषय सूरह बनी इस्राईल - १८ आणि सूरह अल कसस - ५९ मध्येही उल्लेखिला गेला आहे.

**२११.** आणि ना ते याच्या योग्य आहेत, ना त्यांना याचे सामर्थ्य आहे.

**२१२.** किंबहुना ते तर ऐकण्यापासूनही वंचित केले गेले आहेत.

**२१३.** यास्तव तुम्ही अल्लाहच्या सोबत दुसऱ्या एखाद्या आराध्य दैवताला पुकारू नका अन्यथा तुम्हीही शिक्षा प्राप्त करणाऱ्यांपैकी व्हाल.

**२१४.** आणि आपल्या जवळच्या नातेवाईकांना (अल्लाहचे) भय दाखवा.

**२१५.** आणि त्यांच्याशी नरमीने वागा, जो कोणी ईमानधारक होऊन तुमच्या अधीन होईल.

**२१६.** जर हे लोक तुमची अवज्ञा करतील तर तुम्ही ऐलान करा की तुम्ही जे काही करीत आहात मी त्यापासून अलिप्त आहे.

**२१७.** आणि आपला पूर्ण भरोसा त्यावर राखा जो वर्चस्वशाली, दयावान आहे.

**२१८.** जो तुम्हाला पाहत असतो, जेव्हा तुम्ही (नमाजसाठी) उभे राहता.

**२१९.** आणि सजदा करणाऱ्यांमध्ये तुमचे हिंडणे फिरणेही.

**२२०.** निःसंशय तो (अल्लाह) मोठा ऐकणारा आणि मोठा जाणणारा आहे.

**२२१.** काय मी तुम्हाला सांगू की सैतान कोणावर उतरतात?

**२२२.** ते प्रत्येक खोट्या, दुराचारीवर उतरतात.

**२२३.** ते (वरवर) ऐकलेली गोष्ट पोहचवितात आणि त्यांच्यापैकी बहुतेक खोटे आहेत.

**२२४.** आणि कवींचे अनुसरण तेच लोक करतात, जे पथभ्रष्ट असावेत.

**२२५.** काय तुम्ही नाही पाहिले की कवी दरी - दरीत डोके आपटत फिरतात.

**२२६.** आणि ते जे म्हणतात ते करत नाहीत.

**२२७.** त्यांच्याखेरीज ज्यांनी ईमान राखले आणि सत्कर्मे केलीत आणि मोठ्या संख्येने अल्लाहची प्रशंसा (नामःस्मरण) करीत राहिले आणि आपण अत्याचारपीडित असल्यानंतर सूड घेतला, आणि ज्यांनी अत्याचार केला आहे ते देखील लवकरच

जाणून घेतील की कोणत्या कुशीवर उलटतात.

—-

## सूरह नमल - २७

सूरह नमल मक्का येथे अवतरली आणि यात त्र्यान्नव आयती आणि सात रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** ता - सीन या आयती आहेत कुरआनच्या (अर्थात स्पष्ट) आणि दिव्य ग्रंथाच्या.

**२.** मार्गदर्शन आणि खूशखबर, ईमान राखणाऱ्यांकरिता.

**३.** जे नमाज कायम करतात आणि जकात अदा करतात आणि आखिरतवर ईमान राखतात.

**४.** जे लोक कयामतवर ईमान राखत नाही, आम्ही त्यांच्यासाठी त्यांची कर्मे सुशोभित करून दाखविली आहेत, यास्तव ते भटकत फिरतात.

**५.** हेच ते लोक होत, ज्यांच्यासाठी मोठी वाईट शिक्षा- यातना आहे, आणि आखिरतमध्येही ते मोठे नुकसान उचलणारे आहेत.

**६.** आणि निःसंशय तुम्हाला कुरआन शिकविला जात आहे, हिकमतशाली आणि सर्वकाही जाणणाऱ्या अल्लाहतर्फे.

**७.** जेव्हा मूसा आपल्या कुटुंबियांना म्हणाले, मी आग पाहिली आहे. मी तेथून एक तर काही बातमी घेऊन येईन किंवा आगीचा एखादा धगधगता विस्तव घेऊन लगेच तुमच्याजवळ येईन, यासाठी की तुम्ही शेकून घ्यावे.

**८.** जेव्हा तिथे पोहोचले तेव्हा त्यांना हाक दिली गेली की शुभ आहे तो, जो त्या आगीत आहे आणि शुभ आहे तो जो तिच्याजवळ पास आहे आणि मोठा पवित्र आहे अल्लाह, सर्व विश्वांचा स्वामी व पालनकर्ता.

**९.** मूसा (ऐका) खरी गोष्ट ही की मीच अल्लाह आहे जबरदस्त आणि हिकमत (बुद्धीकौशल्य) बाळगणारा.

**१०.** आणि तुम्ही आपली काठी खाली टाका. (हजरत मूसा यांनी) जेव्हा तिला हालचाल करताना पाहिले अशा प्रकारे की जणू साप आहे, तेव्हा तोंड फिरवून पाठ वळवून पळाले आणि मागे वळूनही पाहिले नाही. हे मूसा! भिऊ नका. माझ्यासमोर पैगंबर भित नसतात.

**११.** परंतु जे लोक अत्याचार करतील, मग त्यास नेकी (सत्कर्मा) ने बदलतील त्या दुराचारानंतर तर मी देखील माफ करणारा, दया करणारा आहे.

**१२.** आणि आपला हात आपल्या गळपट्टीत टाका तो शुभ्र (आणि तेजस्वी) होऊन निघेल, कसल्याही व्याधीविना. (तुम्ही) नऊ निशाण्या घेऊन फिरऔन आणि त्याच्या अनुयायींजवळ (जा) निःसंशय तो दुराचारी लोकांचा समूह आहे.

**१३.** यास्तव, जेव्हा त्यांच्याजवळ डोळे उघडविणारे आमचे चमत्कार (मोजिजे) पोहोचले, तेव्हा ते म्हणू लागले की ही तर उघड जादू आहे.

**१४.** आणि त्यांनी इन्कार केला, वास्तिवक त्यांच्या मनात विश्वास बसला होता केवळ अत्याचार व घमेंडीमुळे (त्यांनी इन्कार केला) तर पाहा, त्या दुराचारी लोकांचा काय शेवट झाला!

**१५.** आणि निःसंशय, आम्ही दाऊद आणि सुलेमानला ज्ञान प्रदान केले होते आणि दोघे म्हणाले, सर्व प्रशंसा त्या अल्लाहकरिता आहे, ज्याने आम्हाला आपल्या अनेक ईमानधारक दासांवर श्रेष्ठत्व प्रदान केले आहे.

**१६.** आणि दाऊदचे वारस सुलेमान झाले आणि म्हणाले, लोकांनो! आम्हाला पक्ष्यांची बोली (भाषा) शिकविली गेली आहे. आणि आम्हाला सर्व काही दिले गेले आहे. निःसंशय हा (अल्लाहचा) मोठा उघड उपकार आहे.

**१७.** आणि सुलेमानच्या समोर त्यांचे सर्व सैन्य जिन्न आणि मनुष्य आणि पक्षी जमा केले गेले (प्रत्येक प्रकाराला) वेगवेगळे उभे केले गेले.

**१८.** जेव्हा ते मुंग्यांच्या मैदानात पोहोचले, तेव्हा एक मुंगी म्हणाली, हे मुंग्यानो! आपापल्या बिळात पटकन घुसा (असे न व्हावे की) असावधानीमुळे सुलेमान आणि त्यांच्या सैन्याने तुम्हाला पायाखाली तुडवावे.

**१९.** तिच्या या बोलण्यावर (हजरत सुलेमान) यांनी स्मितहास्य केले आणि दुआ (प्रार्थना) करू लागले की हे माझ्या पालनकर्त्या! तू मला तौफिक (सुबुद्धी) प्रदान कर की मी तुझ्या या देणग्यांबद्दल कृतज्ञता व्यक्त करावी, ज्या तू माझ्यावर केल्या आहेत आणि माझ्या माता-पित्यांवर आणि मी अशी सत्कर्मे करीत राहावे, ज्यामुळे तू प्रसन्न राहावे आणि मला आपल्या दया- कृपेने आपल्या नेक- सदाचारी दासांमध्ये सामील कर.

**२०.** आणि त्यांनी पक्ष्यांचे निरीक्षण केले व म्हणाले, काय गोष्ट आहे की मला हुद हुद दिसून येत नाही? काय खरोखर तो हजर नाही?

**२१.** निःसंशय मी त्याला कठोर दंड देईन किंवा त्याला कापून टाकीन किंवा त्याने माझ्यासमोर योग्य कारण सादर करावे.

**२२.** काही जास्त वेळ झाला नव्हता, तेवढ्यात तो (येऊन) म्हणाला, मी अशा गोष्टीची खबर आणली आहे की ज्याविषयी तुम्ही जाणतच नाही. मी 'सबा'ची अगदी विश्वसनीय बातमी घेऊन तुमच्याजवळ आलो आहे.

**२३.** मी पाहिले की एक स्त्री त्यांच्यावर राज्य करीत आहे, जिला सर्व प्रकारच्या वस्तूंपैकी काही न काही प्रदान केले गेले आहे आणि तिचे सिंहासन देखील मोठे भव्य आहे.

**२४.** मी तिला आणि तिच्या जनसमूहाच्या लोकांना अल्लाहऐवजी सूर्याला सजदा करताना पाहिले. सैतानाने त्याची कर्मे त्यांना भले चांगले असल्याचे दाखवून सत्य मार्गापासून त्यांना रोखले आहे, यास्तव त्यांना सन्मार्ग प्राप्त होत नाही.

**२५.** की केवळ त्याच अल्लाहला सजदा करावा, जो आकाशांच्या आणि धरतीच्या लपलेल्या वस्तूंना बाहेर काढतो, आणि जे काही तुम्ही लपवून ठेवता आणि जाहीर करता तो ते सर्व काही जाणतो.

**२६.** (अर्थात) अल्लाह! त्याच्याखेरीज कोणीही उपासनीय नाही. तोच महान अर्श (ईश-सिंहासनां) चा स्वामी आहे.

**२७.** (सुलेमान) म्हणाले, आता आम्ही पाहतो की तू खरे बोललास की तू खोटा आहे.

**२८.** माझे हे पत्र नेऊन त्यांना दे, मग त्यांच्यापासून दूर होऊन पाहा की ते काय उत्तर

देतात.

**२९.** ती म्हणाली, हे सरदारांनो! माझ्याजवळ एक महत्त्वपूर्ण पत्र टाकले गेले आहे.

**३०.** जे सुलेमानतर्फे आहे आणि ज्याचा आरंभ अतिशय दयावान, मोठ्या मेहरबान अल्लाहच्या नावाने आहे.

**३१.** हे की तुम्ही माझ्यासमोर विद्रोह करू नका आणि मुस्लिम होऊन माझ्याजवळ या.

**३२.** ती (राणी) म्हणाली, हे माझ्या दरबारी लोकांनो! तुम्ही माझ्या या समस्येबाबत मला सल्ला द्या. मी कोणत्याही गोष्टीचा अंतिम फैसला, जोपर्यंत तुमची उपस्थिती आणि मत नसेल, करत नसते.

**३३.** त्या सर्वांनी उत्तर दिले, आम्ही मोठे मजबूत आणि शक्तिशाली आणि खूप लढवय्ये आहोत. आता यापुढे तुमचा अधिकार आहे. तुम्ही स्वतःच विचार करा की तुम्ही आम्हाला कोणता आदेश देता.

**३४.** ती (राणी) म्हणाली, बादशाह (राजे-महाराजे) जेव्हा एखाद्या वस्तीत प्रवेश करतात, तेव्हा तिला ओसाड करून टाकतात आणि तिथल्या प्रतिष्ठित लोकांना अपमानित करतात तेव्हा लोक देखील असेच करतील.

**३५.** आणि मी त्यांना एक नजराणा पाठविणार आहे, मग पाहते की दूत काय उत्तर घेऊन परत येतात.

**३६.** यास्तव (राजदूत) जेव्हा (हजरत) सुलेमानजवळ पोहोचला, तेव्हा सुलेमान म्हणाले, काय तुम्ही लोक धन देऊन माझी मदत करू इच्छिता? मला तर माझ्या पालनकर्त्याने याहून खूप जास्त देऊन ठेवले आहे, जे त्याने तुम्हाला दिले आहे. तेव्हा आपल्या नजराण्याने तुम्हीच खूश राहा.

**३७.** जा, परत जा, त्यांच्याकडे आम्ही त्यांच्यावर असे सैन्य पाठवू की ज्याचा सामना करण्याची त्यांच्यात ताकत नाही आणि आम्ही त्यांना अपमानित व पराभूत करून तिथून बाहेर घालवू.

**३८.** (सुलेमान) म्हणाले, हे सरदारांनो! तुमच्यापैकी कोणी असा आहे, जो त्यांचे मुस्लिम होऊन पोहचण्यापूर्वीच, तिचे सिंहासन माझ्याजवळ आणून देईल.

**३९.** एक बलाढ्य जिन्न म्हणाला, तुम्ही आपल्या जागेवरून उठण्यापूर्वीच मी ते तुमच्याजवळ आणतो. विश्वास राखा, मी याचे सामर्थ्य राखतो. आणि मी अमानतदार (विस्वस्त) ही आहे.

**४०.** ज्याच्याजवळ ग्रंथाचे ज्ञान होते, तो म्हणाले, की तुमची पापणी लवण्यापूर्वीच मी त्यास तुमच्याजवळ पोहचवू शकतो. जेव्हा पैगंबर (सुलेमान) ने ते (सिंहासन) आपल्याजवळ हजर असलेले पाहिले, तेव्हा म्हणाले, हा माझ्या पालनकर्त्याचा उपकार आहे. यासाठी की त्याने माझी कसोटी घ्यावी की मी कृतज्ञता दर्शवितो की कृतघ्नता. कृतज्ञता व्यक्त करणारा आपल्या फायद्यासाठीच कृतज्ञता व्यक्त करतो. आणि जो कृतघ्नता दर्शवील तर माझा पालनकर्ता मोठा निःस्पृह आणि मोठा मेहेरबान आहे.

**४१.** (हजरत सुलेमानने) आदेश दिला की राणीच्या सिंहासनाचे स्वरूप काहीसे बदलून टाका. मग पाहू या, ती मार्गदर्शन प्राप्त करते की त्या लोकांपैकी ठरते जे मार्गदर्शन प्राप्त करीत नाही.

**४२.** मग जेव्हा ती हजर झाली तेव्हा तिला विचारले गेले की तुमचे सिंहासन असेच आहे? तिने उत्तर दिले, हे जणू तेच आहे आम्हाला याच्यापूर्वीच ज्ञान दिले गेले होते आणि आम्ही मुस्लिम होतो.

**४३.** आणि तिला त्यांनी रोखून ठेवले होते, ज्यांची ती अल्लाहखेरीज उपासना करीत राहिली, निःसंशय ती काफिर लोकांपैकी होती.

**४४.** तिला सांगितले गेले की महालात प्रवेश करा. जेव्हा तिने पाहिले तेव्हा तिला असे वाटले की हा जलाशय (हौद) आहे, तिने आपल्या पोटऱ्या उघड्या केल्या (सुलेमान) म्हणाले, हा तर काचेचा बनलेला आहे. ती म्हणाली, हे माझ्या पालनकर्त्या! मी आपल्या प्राणावर अत्याचार केला. आता मी सुलेमानसोबत, सर्व विश्वांच्या पालनकर्त्या अल्लाहची आज्ञाधारक बनते.

**४५.** आणि निःसंशय, आम्ही 'समूद'कडे त्यांचा भाऊ 'स्वालेह'ला पाठविले (या संदेशासह) की तुम्ही सर्व अल्लाहची उपासना करा. तरीही ते दोन गट बनून आपसात भांडणतंटा करू लागले.

**४६.** (पैगंबर स्वालेह) म्हणाले, हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! तुम्ही भलेपणाच्या

आदी वाईट गोष्टीची घाई का माजवित आहात. तुम्ही अल्लाहजवळ माफी का नाही मागत? यासाठी की तुमच्यावर दया केली जावी.

**४७.** (ते) म्हणाले की आम्ही तर तुम्हाला आणि तुमच्या साथीदारांना अपशकुनी समजतो (पैगंबरानी) उत्तर दिले, तुमचा अपशकून अल्लाहजवळ आहे. किंबहुना तुम्ही तर कसोटीत पडलेले लोक आहात.

**४८.** या शहरात नऊ (प्रमुख) माणसे होती, जे धरतीत उत्पात (फसाद) पसरवित होते आणि सुधारणेचे काम करीत नव्हते.

**४९.** त्यांनी आपसात अल्लाहची शपथ घेऊन प्रतिज्ञा केली की रात्रीतूनच 'स्वालेह' आणि त्यांच्या कुटुंबियांवर हल्ला चढवू आणि त्यांच्या वारसदाराला सांगू की आम्ही त्यांच्या कुटुंबाच्या हत्येच्या वेळी हजर नव्हतो आणि आम्ही खरे बोलत आहोत.

**५०.** आणि त्यांनी डाव खेळा आणि आम्ही देखील आणि ते त्यास समजतच नव्हते.

**५१.** आता पाहा, त्यांच्या कट-कारस्थानाचा काय परिणाम झाला? आम्ही त्यांना आणि त्यांच्या जनसमूहाला, सर्वांनाच नष्ट करून टाकले.

**५२.** ही त्यांची घरे आहेत, जी त्यांच्या अत्याचारामुळे ओसाड पडली आहेत. जे लोक ज्ञान बाळगतात, त्यांच्यासाठी त्यात मोठी निशाणी आहे.

**५३.** आणि आम्ही त्यांना, ज्यांनी ईमान राखले होते आणि जे सत्कर्म करीत होते, पूर्णपणे वाचविले.

**५४.** आणि लूतचा (उल्लेख करा) जेव्हा ते आपल्या जनसमूहाला म्हणाले, की जाणूनबुजूनही तुम्ही कुकर्म (पुरुष सहवास) करता?

**५५.** ही काय गोष्ट आहे? की तुम्ही स्त्रियांना सोडून पुरुषांजवळ कामवासनापूर्तीसाठी येता? खरी गोष्टी अशी की तुम्ही मोठे अज्ञान पूर्ण काम करीत आहात.

**५६.** त्यांच्या जनसमूहाचे उत्तर या बोलण्याव्यतिरिक्त दुसरे काही नव्हते की लूतच्या कुटुंबियांना आपल्या शहरातून बाहेर घालवा, हे लोक मोठी पवित्रतता (सत्शीलता) दाखवित आहेत.

**५७.** आणि आम्ही त्यांना आणि त्यांच्या कुटुंबाला, त्याच्या पत्नीखेरीज सर्वांना वाचिवले. याचे अनुमान(र्तक) तर मागे राहणाऱ्यांमध्ये आम्ही लावलेच होते.

**५८.** आणि त्यांच्यावर एक (विशेष प्रकारचा) पाऊस पाडला. यास्तव त्या खबरदार केल्या गेलेल्या लोकांवर वाईट पाऊस पडला.

**५९.** तेव्हा तुम्ही सांगा की समस्त प्रशंसा अल्लाहकरिताच आहे आणि त्याच्या निवडक दासांवर सलाम (शांति) आहे. काय अल्लाह अधिक चांगला आहे की ते, ज्यांना हे लोक (अल्लाहचा) सहभागी बनवत आहेत.

**६०.** (बरे हे सांगा) आकाशांना आणि जमिनीला कोणी निर्माण केले? कोणी आकाशातून पाऊस पाडला? मग त्याद्वारे हिरव्या टवटवीत सुंदर बागा कोणी उगविल्या ? या बागांचे वृक्ष तुम्ही कधीही उगवू शकत नाही. काय अल्लाहखेरीज दुसरा कोणी उपासना करण्यायोग्य आहे? किंबहुना हे लोक (सरळ मार्गापासून) दूर होतात.

**६१.** काय तो, ज्याने धरतीला निवासस्थान बनविले, तिच्या दरम्यान नद्या प्रवाहित केल्या, तिच्यासाठी पर्वत बनविले आणि दोन समुद्रांच्या दरम्यान आड पडदा घातला, काय अल्लाहसोबत दुसरा कोणी उपासना करण्यायोग्य आहे? किंबहुना त्यांच्यापैकी बहुतेक लोक जाणतच नाहीत.

**६२.** विवश आणि अगतिक व्यक्तीचे आर्जव, जेव्हा तो पुकारतो, कोण स्वीकारून

त्याच्या त्रास- यातनेस दूर करतो, आणि तुम्हाला धरतीचा खलीफ़ा (सत्ताधिकारी) बनवितो. काय अल्लाहसोबत दुसरा कोणी उपासना करण्यायोग्य आहे? तुम्ही लोक फार कमी बोध ग्रहण करतात.

**६३.** असा कोण आहे, जो तुम्हाला खुष्की आणि समुद्राच्या अंधारात मार्ग दाखवितो आणि जो आपल्या कृपेच्या (येण्या) पूर्वीच खूशखबर देणारी हवा (वारे) पाठवितो. काय अल्लाहसोबत दुसरे एखादे आराध्या दैवतही आहे? ज्यांना हे (अल्लाहचा) सहभागी ठरवितात, त्या सर्वांपेक्षा अल्लाह अति उच्च आहे.

**६४.** असा कोण आहे जो सृष्टीनिर्मितीला पहिल्यांदा निर्माण करतो, मग तिला पुन्हा निर्माण करील जो तुम्हाला आकाश आणि जमिनितून आजिविका प्रदान करीत आहे. काय अल्लाहसोबत दुसराही कोणी उपास्य आहे? सांगा, सच्चे असाल तर आपले प्रमाण (पुरावा) आणा.

**६५.** सांगा की आकाशवाल्यांपैकी आणि धरतीवाल्यांपैकी, अल्लाहखेरीज कोणीही परोक्ष ज्ञान बाळगत नाही[१] ते तर हे देखील जाणत नाहीत की त्यांना दुसऱ्यांदा केव्हा जिवंत केले जाईल?

**६६.** किंबहुना आखिरत (मरणोत्तर जीवना) विषयी त्यांचे ज्ञान संपुष्टात आले आहे, किंबहुना हे त्या संदर्भात संशयग्रस्त आहेत, एवढेच नव्हे तर हे त्यापासून आंधळे आहेत.

---

(१) अर्थात, ज्या प्रकारे उपरोक्त बाबींमध्ये अल्लाह अद्वितीय आहे, त्याचा कोणीही सहभागी नाही, तद्‌वतच परोक्ष - ज्ञानाबाबतही तो अद्वितीय आहे. त्याच्याखेरीज कोणालाही गैबी (अपरोक्ष) गोष्टींचे ज्ञान नाही. पैगंबरांना देखील तेवढेच ज्ञान असते जेवढे अल्लाह वहयी आणि आपल्या प्रेरणेद्वारे त्यांना देतो, आणि जे ज्ञान दुसऱ्याच्या सांगण्याने प्राप्त होत असेल तर ते जाणणाऱ्याला परोक्ष - ज्ञाता म्हटले जाऊ शकत नाही. परोक्षाचे ज्ञान तर ते होय, जे कसल्याही माध्यमाविना, स्वतःलाच असावे. ज्ञाता प्रत्येक गोष्टीस स्वतः जाणणारा असावा. सूक्ष्मातिसूक्ष्म व लपलेली गोष्टही त्याच्या ज्ञानकक्षेबाहेर नसावी. हे वैशिष्ट्य केवळ अल्लाहचेच आहे यास्तव तोच परोक्षज्ञाता आहे. त्याच्याखेरीज साऱ्या जगात परोक्ष ज्ञान राखणारा कोणीही नाही. हजरत आयशा (रजि.) फर्मावितात की जो मनुष्य असे समजतो की पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम भविष्यात होणाऱ्या घटनांचे ज्ञान राखतात, त्याने अल्लाहवर फार मोठे कुभांड रचले, यासाठी की तो (अल्लाह) फर्मावितो की ''आकाश व धरतीत गैबचे ज्ञान अल्लाहलाच आहे.'' (सहीह बुखारी नं. ४८५५, सहीह मुस्लिम नं. २८७, आणि अल तिर्मिजी नं. ३०६८)

**६७.** काफिर (सत्य-विरोधक) म्हणाले, काय जेव्हा आम्ही माती होऊन जाऊ आणि आमचे वाडवडीलही, काय आम्ही पुन्हा बाहेर काढले जाऊ?

**६८.** आम्हाला आणि आमच्या पूर्वजांना फार पूर्वीपासून हे वायदे दिले जात राहिले. काही नाही, या तर पूर्वी होऊन गेलेल्या लोकांच्या काल्पनिक कथा मात्र आहेत.

**६९.** सांगा की, जमिनीवर जरा हिंडून फिरून पाहा की अपराधी लोकांचा काय परिणाम झाला?

**७०.** आणि तुम्ही त्यांच्याविषयी चिंताग्रस्त होऊ नका आणि त्यांच्या कट-कारस्थानांमुळे मन संकुचित करू नका.

**७१.** आणि म्हणतात की हा वायदा केव्हा पूर्ण होईल, सच्चे असाल तर सांगा.

**७२.** त्यांना उत्तर द्या की कदाचित काही अशा गोष्टी, ज्यांची तुम्ही एवढी घाई माजवित आहात, तुमच्या खूप जवळ येऊन ठेपल्या आहेत.

**७३.** आणि निःसंशय, तुमचा पालनकर्ता समस्त लोकांवर मोठा कृपावान आहे, परंतु अधिकांश लोक कृतज्ञता दाखवित नाही.

**७४.** आणि निःसंशय, तुमचा पालनकर्ता, त्या गोष्टींनाही जाणतो, ज्यांना ते आपल्या मनात लपवित आहेत, आणि ज्यांना व्यक्त करीत आहेत.

**७५.** आकाश आणि धरतीची कोणतीही लपलेली गोष्ट अशी नाही, जी दिव्य स्पष्ट ग्रंथात सामील नसावी.

**७६.** निःसंशय हा कुरआन इस्राईलच्या संततीसमोर अधिक तर त्या गोष्टींचे निवेदन करीत आहे, ज्यात हे मतभेद करतात.[१]

---

(१) अहले किताब (अल्लाहचा ग्रंथ बाळगणारे) अर्थात यहूदी आणि ख्रिश्चन अनेक पंथ - संप्रदायांत विभागले गेले. त्यांचे विचारही परस्पर भिन्न होते. यहूदी लोक हजरत ईसा यांचा अनादर व अपमान करीत आणि ख्रिश्चन त्यांच्या आदर सन्मानात अतिशयोक्ती करीत. येथपावेतो की त्यांना अल्लाह किंवा अल्लाहचा पुत्र बनविले. पवित्र कुरआनने त्यांच्याच संदर्भात अशा गोष्टी सांगितल्या ज्याद्वारे सत्य स्पष्ट होते आणि जर ते कुरआनाने सांगितलेल्या सत्यतेला स्वीकारतील तर त्यांचा श्रद्धेशी संबंधित विरोध नाहीसा होईल आणि त्यांचा आपसातील मतभेद व फुटीरता कमी होईल.

**७७.** आणि हा (कुरआन) ईमान राखणाऱ्यांकरिता निश्चितच मार्गदर्शन आणि दया-कृपा आहे.

**७८.** तुमचा पालनकर्ता त्यांच्या दरम्यान आपल्या आदेशाने (सर्व) फैसला करील. तो मोठा वर्चस्वशाली आणि ज्ञान राखणारा आहे.

**७९.** तेव्हा, तुम्ही अल्लाहवरच भरवसा राखा. निःसंशय, तुम्ही सत्य आणि उघड अशा दीन (धर्मा) वर आहात.

**८०.** निःसंशय, तुम्ही ना मृतांना ऐकवू शकता आणि ना बहिऱ्यांना आपली पुकार (हाक) ऐकवू शकता, जेव्हा ते पाठ फिरवून विमुख होत असतील.

**८१.** आणि ना तुम्ही आंधळ्यांना त्यांच्या मार्गभ्रष्टतेपासून हटवून, सन्मार्गाला लावू शकता, तुम्ही तर केवळ त्यांना ऐकवू शकता, ज्यांनी आमच्या आयतींवर ईमान राखले आहे, मग ते आज्ञाधारक होतात.

**८२.** आणि जेव्हा त्यांच्यावर शिक्षा- यातने (अज़ाब) चा वायदा लागू होईल, आम्ही जमिनीतून त्यांच्यासाठी एक जनावर बाहेर काढू, जे त्यांच्याशी बोलत असेल की लोक आमच्या आयतींवर विश्वास ठेवत नव्हते.[१]

**८३.** आणि ज्या दिवशी आम्ही प्रत्येक जनसमूहामधून, अशा लोकांचे समूह, जे आमच्या आयतींना खोटे ठरवित होते, घेरून आणू, मग ते सर्वच्या सर्व वेगळे केले जातील.

**८४.** जेव्हा सर्वच्या सर्व येऊन पोहचतील तेव्हा अल्लाह फर्माविल की तुम्ही माझ्या आयतींना, यानंतरही की तुम्हाला त्यांचे पूर्ण ज्ञान नव्हते, का खोटे ठरविले ? आणि हेही सांगा की तुम्ही काय (कर्म) करीत राहिलात ?

---

(१) मूळ शब्दा दाब्बः (विचित्र जनावर) तेच होय, जे कयामत जवळ आल्याच्या निशाण्यांपैकी आहे. हदीसमधील उल्लेखानुसार पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांना फर्माविले, ''कयामत त्या वेळेपर्यंत येणार नाही, जोपर्यंत तुम्ही दहा निशाण्या पाहून घेत नाही. त्यापैकी एका जनावराचे जमिनीतून बाहेर पडणे होय.'' (सहीह मुस्लिम, किताबुल फेतन बाबु फी आयातिल-लती तकूनु कब्ल स्साअह) दुसऱ्या एका कथनानुसार, ''सर्वांत प्रथम जी निशाणी जाहीर होईल, ती म्हणजे सूर्याचे पूर्व दिशेऐवजी पश्चिमेकडून उगवणे आणि दुपार होण्याआधी जनावराचे बाहेर निघणे'' या दोघांपैकी जी निशाणी जाहीर होईल, दुसरी तिच्यानंतर लगेच जाहीर होईल. (सहीह मुस्लिम)

**८५.** आणि याचे कारण हे की त्यांनी अत्याचार केला होता, त्यामुळे आमचे फर्मान त्याच्यावर लागू होईल आणि ते काहीच बोलू शकणार नाहीत.

**८६.** काय ते पाहत नाहीत की आम्ही रात्र अशासाठी बनविली आहे की त्यांनी तिच्यात आराम करू शकावे आणि दिवसाला आम्ही दाखविणारा बनविले आहे. निःसंशय यात त्या लोकांकरिता निशाण्या आहेत, जे ईमान राखतात.

**८७.** आणि ज्या दिवशी सूर फुंकला जाईल तेव्हा ते सर्वच्या सर्व, जे आकाशांमध्ये आणि जमिनीवर आहेत घाबरून उठतील,[१] परंतु ज्याला अल्लाह इच्छिल (सुरक्षित ठेवील) आणि सर्वच्या सर्व विवश, लाचार होऊन त्याच्यासमोर हजर होतील.

**८८.** आणि तुम्ही पर्वतांना आपल्या जागी निश्चित व स्थिर समजता, परंतु ते देखील ढगासारखे उडत फिरतील. ही निर्मिती (कार्यकुशलता) आहे अल्लाहची, ज्याने प्रत्येक वस्तू मजबूत बनविली आहे. तुम्ही जे काही करता, अल्लाह ते चांगल्या प्रकारे जाणतो.

**८९.** जो मनुष्य सत्कर्म घेऊन येईल, त्याला त्याहून चांगला मोबदला मिळेल आणि असे लोक त्या दिवसाच्या दहशतीपासून निर्धास्त असतील.

**९०.** आणि जे लोक दुष्कर्म घेऊन येतील त्यांना अधोमुखी (जहन्नमच्या) आगीत झोकले जाईल. तुम्हाला केवळ त्याचाच मोबदला दिला जाईल, जे तुम्ही करीत राहिले.

**९१.** मला तर केवळ हाच आदेश दिला गेला आहे की मी या शहराच्या पालनकर्त्याची उपासना करीत राहावे, ज्याने यास आदर सन्मानपूर्ण बनविले आहे आणि जो प्रत्येक वस्तूचा स्वामी आहे आणि मला हा आदेशही दिला गेला आहे की मी मुस्लमान (आज्ञाधारकां) पैकी व्हावे.

---

(१) 'सुर'शी अभिप्रेत तो शंख होय, ज्यात इस्राफील (अलै.) अल्लाहच्या आदेशाने फुंक मारतील. ही फुंक दोन किंवा दोनपेक्षा जास्त असेल. पहिल्या फुंकीत सारे जग घाबरून जाऊन बेभान होईल, दुसऱ्या फुंकीत सर्व मरण पावतील आणि तिसऱ्या खेपेस सर्व लोक कबरींमधून जिवंत होऊन उभे राहतील आणि काहींच्या मते चौथी फुंक असेल ज्यात सर्व हश्र (हिशोबा) च्या मैदानात जमा होतील. या ठिकाणी कोणती फुंक अभिप्रेत आहे? इमाम इब्ने कसीर यांच्या मते ही पहिली फुंक आणि इमाम शौकानी यांच्या मते तिसरी फुंक होय, जेव्हा लोक कबरीमधून उठतील.

**१२.** आणि मी कुरआनाचे पठण करीत राहावे, तेव्हा जो मार्गदर्शन अंगीकारील, आणि जो मार्गभ्रष्ट होईल तर सांगा, मी केवळ सावधान करणाऱ्यांपैकी आहे.

**१३.** आणि सांगा, समस्त प्रशंसा अल्लाहकरिताच आहे. तो लवकरच तुम्हाला आपल्या निशाण्या दाखविल, ज्या तुम्ही स्वतः ओळखून घ्याल, आणि जे काही तुम्ही करीत आहात, तुमचा पालनकर्ता त्यापासून अनभिज्ञ (अजाण) नाही.

---

## शूरह कसस - २८

सूरह कसस* मक्का येथे अवतरली आणि यात अठ्ठ्याऐंशी आयती आणि नऊ रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहेरबान, अतिशय दयावान आहे.

**१.** ता-सीन-मीम.

**२.** या दिव्य ग्रंथाच्या आयती आहेत.

**३.** आम्ही तुमच्यासमोर मूसा आणि फिरऔनची सत्य घटना वर्णन करतो अशा लोकांकरिता, जे ईमान राखतात.

**४.** निःसंशय, फिरऔनने धरतीवर उत्पात (फसाद) माजिवला होता, आणि तिथल्या लोकांचा (एक एक) गट बनविला होता. त्यांच्या एका गटाला दुर्बल बनवून ठेवले होते. त्यांच्या लहान मुलांना तर मारून टाकत असे आणि मुलींना जिवंत सोडून देत असे. निःसंशय तो मोठा दुराचारी (व दुष्ट) होता.

**५.** आणि मग आम्ही इच्छिले की त्यांच्यावर दया करावी, ज्यांना धरतीवर अतिशय दुर्बल केले गेले होते आणि आम्ही त्यांनाच प्रमुख आणि (धरतीचा) वारस बनवावे.

---

* **सूरह अल कससचे भाष्य :** ही घटना या गोष्टीचे प्रमाण आहे की पैगंबर मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम अल्लाहचे सच्चे पैगंबर आहेत, कारण अल्लाहच्या वहयीविना शेकडो वर्षांपूर्वीच्या घटना, जशाच्या तशाच निवेदन करणे अशक्य आहे. तरीही यापासून लाभ केवळ ईमानधारकांनाच होईल, कारण ते पैगंबरांचे कथन मान्य करतील.

**६.** आणि हेही की त्यांन धरतीवर शक्ती-सामर्थ्य व सत्ताधिकार प्रदान करावा आणि फिरऔन आणि हामान व त्यांच्या सैन्यांना ते दाखवावे, ज्यापासून ते भयभीत आहेत.

**७.** आणि आम्ही मूसाच्या मातेला वहयी (प्रकाशना) केली की त्याला दूध पाजत राहा आणि जेव्हा तुला त्याच्याविषयी काही भय जाणवेल तेव्हा त्याला नदीत वाहवून दे आणि कसलेही भय, शोक व दुःख करू नकोस. आम्ही निःशंसय, त्याला तुझ्याकडे परतवू आणि त्याला आपल्या पैगंबरांपैकी बनविणार आहोत.

**८.** शेवटी फिरऔनच्या लोकांनी ते बालक उचलून घेतले, यासाठी की अखेरीस हेच बालक त्यांचे वैरी ठरले आणि त्यांच्या दुःखाचे कारण बनले. यात शंका नाही की फिरऔन आणि हामान व त्यांचे सैन्य मोठे अपराधी होते.

**९.** आणि फिरऔनची पत्नी म्हणाली की हा तर माझ्या आणि तुमच्या नेत्रांची शितलता आहे. याची हत्या करू नका. फार संभव आहे की हा आम्हाला काही लाभ पोहचविल किंवा आम्ही याला आपलाच पुत्र ठरवावे, आणि हे लोक अक्कलच बाळगत नव्हते.

**१०.** आणि मूसा (अलै.) च्या मातेचे ह्रदय व्याकुळ झाले,तर आम्ही तिच्या मनाला धीर दिला नसता.तर ती या गोष्टीची वास्तविकता अगदी स्पष्ट करण्याचा बेतात होती. हे अशासाठी की ती ईमान राखणाऱ्यांपैकी राहावी.

**११.** मूसा (अलै.) च्या मातेने त्या (बाळा) च्या बहिणीस सांगितले की तू याच्या पाठोपाठ जा, तेव्हा ती त्याला दुरुनच पाहत राहिली. आणि फिरऔनच्या लोकांना या गोष्टीची जाणीवही झाली नाही.

**१२.** आणि त्या (बाळा) च्या पोहचण्यापूर्वीच आम्ही मूसाकरिता दायांचे दूध हराम (निषिद्ध) केले होते. ती (बहीण) म्हणाली की, काय मी तुम्हाला असे कुटुंब दाखवू जे या बाळाचे पालनपोषण तुमच्यासाठी करील आणि या बाळाचे हितचिंतक असेल.

**१३.** अशा प्रकारे आम्ही त्या बाळाला त्याच्या मातेकडे परत पोहचविले यासाठी की तिचे नेत्र शीतल राहावेत आणि ती दुःखी होऊ नये. आणि तिने जाणून घ्यावे की अल्लाहचा वायदा सच्चा आहे. परंतु अधिकांश लोक जाणत नाही.

**१४.** आणि जेव्हा मूसा (अलै.) आपल्या तारुण्यावस्थेस पोहचले आणि पूर्णतः

शक्तिशाली झाले, आम्ही त्यांना बुद्धीकौशल्य आणि ज्ञान प्रदान केले. सत्कर्म करणाऱ्यांना आम्ही अशाच प्रकारचा मोबदला देत असतो.

**१५.** आणि (मूसा) अशा वेळी शहरात आले, जेव्हा शहरवासी झोपलेले होते. इथे दोन माणसे लढत असताना आढळले. हा एक तर त्यांच्या समूहापैकी होता आणि हा दुसरा त्यांच्या शत्रूंपैकी. जो त्यांच्या समूहापैकी होता त्याने त्या माणसाच्या विरोधात, त्या शत्रू पक्षाचा होता त्यांच्याकडे मदत मागितली. ज्यावर मूसाने त्याला ठोसा मारला. परिणामी तो मरण पावला. मूसा म्हणाले, हे तर सैतानी कृत्य आहे निःसंशय, सैतान शत्रू आणि उघडरित्या बहकविणारा आहे.

**१६.** मग मूसा दुआ (प्रार्थना) करू लागले की हे माझ्या पालनकर्त्या! मी तर स्वतःवरच अत्याचार करून घेतला. तू मला माफ कर. अल्लाहने त्यांना माफ केले. निःसंशय, अल्लाह मोठा माफ करणारा आणि मोठा दयावान आहे.

**१७.** (मूसा) म्हणाले, हे माझ्या पालनकर्त्या! जसा तू माझ्यावर हा उपकार केला, मी देखील आता यापुढे कोणत्याही अपराध्याचा सहाय्यक बनणार नाही.

**१८.** मग (दुसऱ्या दिवशी) सकाळी सकाळी भय राखत बातमी घेण्याच्या हेतूने शहरात गेले, तेवढ्यात तोच मनुष्य ज्याने काल त्यांच्याजवळ मदत मागितली होती, पुन्हा त्यांच्याजवळ विनंती करीत आहे. मूसा त्याला म्हणाले, निःसंशय, तू तर उघडरित्या पथभ्रष्ट आहेस.

**१९.** मग जेव्हा आपल्या आणि त्याच्या शत्रूला धरू इच्छिले, तो म्हणाला, हे मूसा! काय ज्या प्रकारे तुम्ही काल एका माणसाला ठार मारले, (आज) मलाही ठार करू इच्छिता? तुम्ही तर देशात जुलमी व उत्पात करणारे बनू इच्छिता आणि तुमचा हा इरादाच नाही की समजोता (समेट) करणाऱ्यांपैकी व्हावे.

**२०.** आणि शहराच्या दूरच्या किनाऱ्याकडून धावत धावत एक मनुष्य आला आणि म्हणू लागला की हे मूसा! इथले प्रमुख लोक तुमच्या वधाची सल्लामसलत करीत आहेत. यास्तव तुम्ही (फार लवकर) येथून निघून जा. मला आपला हितचिंतक माना.

**२१.** यास्तव मूसा भयभीत होऊन सावधपणे तेथून निघाले. म्हणाले, हे पालनकर्त्या! मला अत्याचारी समूहापासून वाचव.

**२२.** आणि जेव्हा मदयनकडे जाऊ लागले तेव्हा म्हणाले, माझा विश्वास आहे की माझा पालनकर्ता मला सरळ मार्ग दाखविल.

**२३.** आणि मदयन येथे जेव्हा पाण्याच्या ठिकाणी पोहचले तेव्हा पाहिले की लोकांचा एक समूह तिथे पाणी पाजत आहे आणि दोन स्त्रिया एका बाजूला (आपल्या जनावरांना) रोखून उभ्या असलेल्या दिसल्या. विचारले की तुमची काय समस्या आहे? त्या म्हणाल्या की जोपर्यंत हे गुराखी परतून जात नाहीत, आम्ही तोपर्यंत पाणी पाजू शकत नाही आणि आमचे पिता फार म्हातारे आहेत.

**२४.** यास्तव त्यांनी स्वतः(मुसा) त्या (जनावरां) ना पाणी पाजले, मग सावलीकडे चालत गेले आणि म्हणाले, हे माझ्या पालनकर्त्या! तू जे काही मांगल्या माझ्यावर अवतरित करशील, मी त्याचा गरजवंत आहे.

**२५.** इतक्यात त्या दोघींपैकी एक त्यांच्याकडे लाजत लाजत आली आणि म्हणाली की माझे पिता तुम्हाला बोलवित आहेत, यासाठी की तुम्ही जे आमच्या जनावरांना पाणी पाजले आहे, त्याचा मोबदला द्यावा. जेव्हा (हजरत मूसा) त्यांच्याजवळ पोहचले आणि त्यांना आपली सर्व कथा ऐकविली, तेव्हा ते (पिता) म्हणाले, आता भय बाळगू नका. तुम्ही अत्याचारी लोकांपासून मुक्ती प्राप्त केली.

**२६.** त्या दोघींपैकी एक म्हणाली, हे पिता! तुम्ही त्यांना मजुरीवर ठेवून घ्या, कारण त्यांना तुम्ही मजुरीवर राखाल त्यांच्यापैकी सर्वांत चांगला तो आहे जो बलवान आणि विश्वस्त असावा.

**२७.** त्या (वृद्ध पित्या) ने म्हटले की मी आपल्या या दोन मुलींपैकी एकीला तुमच्या विवाह (बंधना) मध्ये देऊ इच्छितो या (महर- स्त्रीधना) वर की तुम्ही आठ वर्षां पर्यंत माझे कामकाज करावे, मात्र जर तुम्ही दहा वर्षां पर्यंत कराल तर हे तुमच्यातर्फे उपकार म्हणून आहे. मी कधीही असे इच्छित नाही की तुमच्यावर कशाही प्रकारची कष्ट-यातना टाकावी. अल्लाहने इच्छिले तर भविष्यात तुम्ही मला एक भला माणूस पाहाल.

**२८.** (मूसा अलै.) म्हणाले, ठीक आहे. ही गोष्ट तर माझ्या आणि तुमच्या दरम्यान निश्चित ठरली. मी या दोन्हीं मुदतींपैकी जी मुदत पूर्ण करेन, माझ्यावर जोरजबरदस्ती होऊ नये. आम्ही हे जे काही (आपसात) बोलत आहोत, त्यावर अल्लाह (साक्षी आणि)

निरीक्षक आहे.

**२९.** जेव्हा (हजरत) मूसा (अलै.) यांनी मुदत पूर्ण केली आणि आपल्या कुटुंबियांना घेऊन निघाले, तेव्हा तूर नावाच्या पर्वताकडे आग पाहिली. आपल्या पत्नीला म्हणाले, थांबा! मी आग पाहिली आहे. फार संभव आहे की मी तेथून एखादी बातमी आणावी किंवा आगीचा निखारा (विस्तव) आणावा, यासाठी की तुम्ही शेकून घ्यावे.

**३०.** यास्तव, जेव्हा त्या ठिकाणी पोहचले तेव्हा त्या शुभ धरतीच्या मैदानाच्या उजवीकडील झाडामधून साद घातली गेली की, हे मूसा! निःसंशय, मीच अल्लाह आहे, सर्व विश्वांचा पालनकर्ता.

**३१.** आणि हे की आपली काठी खाली टाका. मग जेव्हा तिला पाहिले, ती सापासारखी वळवळ करीत आहे तेव्हा पाठ फिरवून परतले आणि मागे वळून तोंडही दाखवले नाही. आम्ही फर्माविले, हे मूसा! पुढे या. भयभीत होऊ नका. निःसंशय, तुम्ही सर्व प्रकारे अगदी सुरक्षित आहात.

**३२.** आपला हात आपल्या खिशात घाला, तो कसल्याही प्रकारच्या डागाविना पूर्ण शुभ्र चकाकणारा होऊन बाहेर निघेल आणि भय- दहशतीपासून आपला बचाव करण्याकरिता आपली भुजा आपल्याशी समेटून घ्या. हे दोन चमत्कार (मोजिजे) तुमच्या पालनकर्त्यातर्फे आहेत, फिरऔन आणि त्याच्या समूहाकडे (प्रस्तुत करण्यासाठी). निःसंशय, ते सर्वच्या सर्व अवज्ञा करणारे दुराचारी लोक आहेत.

**३३.** (मूसा अलै.) म्हणाले, हे पालनकर्त्या! मी त्यांच्या एका माणसाची हत्या केली होती. आता मला भय वाटते की तेही मला ठार करतील.

**३४.** आणि माझा भाऊ हारुन माझ्यापेक्षा अधिक साफ बोलणारा आहे. तू त्याला देखील माझा सहाय्यक बनवून माझ्यासोबत पाठव, यासाठी की त्याने मला खरे मानावे. मला तर भीती वाटते की ते सर्व मला खोटे ठरवतील.

**३५.** (अल्लाहने) फर्माविले, आम्ही तुमच्या बंधुद्वारे तुम्हाला मजबूत बाजू प्रदान करू आणि तुम्हा दोघांना वर्चस्वशाली करू, तेव्हा फिरऔनचे लोक तुमच्यापर्यंत पोहचूच शकणार नाहीत. आमच्या निशाण्यांमुळे तुम्ही दोघे आणि तुमचे अनुयायीच सफल ठरतील.

**३६.** वास्तव जेव्हा मूसा (अलै.) त्यांच्याजवळ आम्ही दिलेले उघड चमत्कार (मोजिजे) घेऊन पोहोचले, तेव्हा ते म्हणू लागले की ही तर केवळ बनावटी जादू आहे. आम्ही आपल्यापूर्वी होऊन गेलेल्यांच्या काळात असे कधी ऐकले नाही.

**३७.** आणि (हजरत) मूसा म्हणाले, माझा पालनकर्ता त्याला चांगल्या प्रकारे जाणतो, जो त्याच्याजवळचे मार्गदर्शन घेऊन येता। आणि ज्याच्यासाठी आखिरतचा चांगला परिणाम असतो. निःसंशय, अत्याचारी लोकांचे (कधीही) भले होणार नाही.

**३८.** आणि फिरऔन म्हणाला, हे दरबारी लोकांनो! मी तर आपल्याखेरीज दुसऱ्या कोणाला तुमचा उपास्य (माबूद) जाणत नाही. ऐक, हे हामान! तू माझ्यासाठी मातीला आगीत भाजव, मग माझ्यासाठी एक महाल तयार कर, यासाठी की मूसाच्या उपास्याला डोकावून पाहावे. मी तर त्याला खोट्या लोकांपैकीच समजत आहे.

**३९.** त्याने आणि त्याच्या सैन्याने नाहक देशात घमेंड केली, आणि असे समजून घेतले की आमच्याकडे परतविले जाणारच नाहीत.

**४०.** शेवटी आम्ही त्याला आणि त्याच्या सैन्याला धरले आणि समुद्रात बुडवून टाकले. आता पाहा की त्या अत्याचारींचा अंत कसा झाला!

**४१.** आणि आम्ही त्यांना असे पेशवे बनविले की लोकांना जहन्नमकडे आमंत्रित करतील आणि कयामतच्या दिवशीही त्यांना मदत केली जाणार नाही.

**४२.** आणि आम्ही या जगात देखील त्यांच्या मागे आपली लानत (निर्भर्त्सना) लावली, आणि कयामतच्या दिवशीही ते वाईट अवस्था असणाऱ्या लोकांपैकी असतील.

**४३.** आणि आम्ही पूर्वीच्या काळातील लोकांना नष्ट केल्यानंतर मूसाला असा ग्रंथ प्रदान केला, जो लोकांसाठी प्रमाण, आणि मार्गदर्शन व (अल्लाहची) कृपा होऊन आला होता, यासाठी की त्यांनी बोध ग्रहण करावा.

**४४.** आणि तूर पर्वताच्या पश्चिम दिशेकडे जेव्हा आम्ही मूसाला आदेशाची वहयी (प्रकाशना) पोहचविली होती, तेव्हा ना तुम्ही हजर होते, ना तुम्ही पाहणाऱ्यांपैकी होते.

**४५.** परंतु आम्ही अनेक वंश निर्माण केले, ज्यांच्यावर दीर्घ कालावधी लोटला, आणि ना तुम्ही मदयनचे रहिवाशी होते की त्यांच्यासमोर आमच्या आयतींचे पठण केले असते,

किंबहुना पैगंबरांना पाठविणारे आम्हीच राहिलो.

**४६.** आणि ना तुम्ही तूर पर्वताकडे हजर होते जेव्हा आम्ही (मूसाला) पुकारले होते. किंबहुना ही तुमच्या पालनकर्त्यातर्फे कृपा होय, यासाठी की तुम्ही अशा लोकांना खबरदार करावे, ज्यांच्याजवळ तुमच्यापूर्वी कोणी खबरदार करणारा पोहचला नाही. नवल नव्हे की त्यांनी बोध प्राप्त करून घ्यावा.

**४७.** आणि जर असे नसते की त्यांना, त्यांच्या आपल्या हातांनी पुढे पाठविलेल्या कर्मांपायी एखादी कष्ट-यातना पोहचली असती, तेव्हा हे उद्‌गारले असते की आमच्या पालनकर्त्या! तू आमच्याकडे एखादा रसूल (पैगंबर) का नाही पाठविला की आम्ही तुझ्या आयतींचे पालन केले असते आणि ईमान राखणाऱ्यांपैकी झालो असतो.

**४८.** मग जेव्हा त्यांच्याजवळ आमच्यातर्फे सत्य येऊन पोहचले, तेव्हा म्हणू लागले, का नाही दिली गेली याला तशी वस्तू जशी मूसाला दिली गेली होती. तर काय मूसाला यापूर्वी जे काही दिले गेले होते त्याचा लोकांनी इन्कार नव्हता केला? (उघडपणे) म्हणाले होते की हे दोघे जादूगार आहेत. जे एकमेकांचे सहाय्यक आहेत आणि आम्ही तर त्या सर्वांचा इन्कार करणारे आहोत.

**४९.** त्यांना सांगा की जर सच्चे असाल तर तुम्ही देखील अल्लाहकडून असा एखादा ग्रंथ घेऊन या, जो या दोघांपेक्षा जास्त मार्गदर्शन करणारा असावा. मी त्याचेच अनुसरण करेन.

**५०.** मग जर हे तुमचे म्हणणे मानत नसतील तर तुम्ही विश्वास करा की हे केवळ आपल्या इच्छा आकांक्षांचे अनुसरण करीत आहेत. आणि त्या माणसापेक्षा अधिक मार्गभ्रष्ट कोण आहे, जो आपल्या इच्छा आकांक्षांमागे धावत असेल, अल्लाहच्या मार्गदर्शनाविना? खात्रीने अल्लाह अत्याचारी लोकांना कदापि मार्ग दाखवित नाही.

**५१.** आणि आम्ही सातत्याने लोकांसाठी आपली वाणी पाठवित राहिलो यासाठी की त्यांनी बोध प्राप्त करावा.

**५२.** ज्या लोकांना आम्ही यापूर्वी ग्रंथ प्रदान केला होता, ते तर यावर ईमान राखतात.

**५३.** आणि जेव्हा (त्याच्या आयती) त्यांच्यासमोर वाचून ऐकविल्या जातात तेव्हा ते असे म्हणतात की आमच्या पालनकर्त्यातर्फे हे सत्य असण्यावर आमचे ईमान (पूर्ण

विश्वास) आहे. आम्ही तर याच्या पूर्वीपासून मुस्लिम आहोत.[१]

**५४.** हे असे लोक आहेत, ज्यांना आपल्या केलेल्या धीर-संयमाच्या बदल्यात दुप्पट मोबदला प्रदान केला जाईल. हे सत्कर्माद्वारे दुष्कर्माला दूर करतात आणि आम्ही जे यांना देऊन ठेवले आहे, त्यातून देत राहतात.

**५५.** जेव्हा व्यर्थ गोष्ट कानी पडते, तेव्हा तिच्यापासून अलिप्त होतात आणि म्हणतात की आमचे आचरण आमच्यासाठी आणि तुमचे आचरण तुमच्यासाठी, तुमच्यावर सलाम असो. आम्ही अडाणी लोकांशी वाद घालू इच्छित नाही.

**५६.** तुम्ही वाटेल त्याला ईश-मार्गदर्शन देऊ शकत नाही, किंबहुना अल्लाहच ज्याला इच्छिल त्याला मार्गदर्शन देतो. मार्गदर्शन प्राप्त लोकांना तोच चांगल्या प्रकारे जाणतो.

**५७.** आणि म्हणू लागले की जर आम्ही आपल्यासोबत मार्गदर्शनाचे अनुसरण करू लागलो तर आमचे, आमच्या भूमी (देशा) तून उच्चाटन केले जाईल. काय आम्ही त्यांना शांत व सुरिक्षत आणि आदर सन्मानपूर्ण हरममध्ये जागा नाही दिली, जिथे प्रत्येक प्रकारचे फळ आकर्षित होऊन चालत येते जे आमच्याकडून आजिविका स्वरूपात आहे? तथापि त्यांच्यापैकी अधिकांश लोक काही जाणत नाही.

**५८.** आणि आम्ही अशा अनेक वस्त्या नष्ट करून टाकल्या, ज्या आपल्या सुख विलासात उन्मत्त झाल्या होत्या. ही आहेत त्यांची निवासस्थाने जी त्यांच्यानंतर फारच कमी आबाद केली गेलीत. आणि अखेरीस आम्हीच सर्व काहीचे वारस आहोत.

**५९.** आणि तुमचा पालनकर्ता कधीही कोणा एका वस्तीलाही त्या वेळेपर्यंत नष्ट करीत नाही, जोपर्यंत त्यांच्या एखाद्या मोठ्या वस्तीत आपला एखादा पैगंबर पाठवित नाही, जो त्यांना आमच्या आयती वाचून ऐकविल आणि आम्ही वस्त्यांना अशा वेळी नष्ट करतो, जेव्हा तिथले रहिवाशी अत्याचारी व्हावेत.

---

(१) हा त्याच वस्तुस्थितीकडे इशारा आहे, जिचा पवित्र कुरआनात अनेक ठिकाणी उल्लेख केला गेला आहे की प्रत्येक काळात अल्लाहच्या पैगंबरांनी ज्या धर्माचा प्रचार केला तो इस्लाम धर्म होता आणि त्या पैगंबरांच्या आवाहनाने ईमान राखणारे मुस्लिमच म्हटले जात. यहूदी, ख्रिश्चन वगैरे शब्दप्रयोग लोकांनी स्वतः रचलेले आहेत, जे नंतरच्या काळात उदयास आले. याच आधारावर पैगंबर (स.) यांच्यावर ईमान राखणारे ग्रंथधारक (यहूदी किंवा ख्रिश्चन) म्हणाले की आम्ही तर आधीपासूनच 'मुस्लिम' चालत आलो आहोत. अर्थात पूर्वीच्या पैगंबरांचे अनुयायी आणि त्याच्यावर ईमान राखणारे.

**६०.** आणि तुम्हाला जे काही दिले गेले आहे, ती केवळ या जगाच्या जीवनाची सामुग्री आहे आणि त्याची शोभा सजावट आहे. मात्र अल्लाहजवळ जे आहे, ते सर्वांत उत्तम आणि बाकी राहणारे आहे. काय तुम्ही समजत नाहीत?

**६१.** काय तो मनुष्य, ज्याला आम्ही चांगला वायदा दिला आहे, ज्यास तो निश्चितपणे प्राप्त करणार आहे, त्या माणसासारखा असू शकतो, ज्याला आम्ही ऐहिक जीवनाची काही सुखे अशीच प्रदान केली, दुसऱ्यांदा शेवटी तो कयामतच्या दिवशी (जखडलेल्या अवस्थेत) हजर केला जाईल?

**६२.** आणि ज्या दिवशी अल्लाह त्यांना पुकारून सांगेल की तुम्ही ज्यांना आपल्या समजुतीनुसार माझा सहभागी ठरवित होते, ते कोठे आहेत?

**६३.** ज्यांच्यावर आमचे फर्मान लागू झाले, ते उत्तर देतील की, हे आमच्या पालनकर्त्या! हेच ते होत, ज्यांना आम्ही मार्गभ्रष्ट केले होते. आम्ही त्यांना अशाच प्रकारे पथभ्रष्ट केले, ज्या प्रकारे आम्ही पथभ्रष्ट झालो होतो. आम्ही तुझ्या सेवेत स्वतःला यांच्यापासून वेगळे करतो. हे आमची उपासना करीत नव्हते.

**६४.** आणि त्यांना सांगिले जाईल की आपल्या सहभागी (ईश्वरांना) बोलवा, तेव्हा ते बोलवतील, परंतु ते त्यांना उत्तर देखील देणार नाहीत. आणि सर्व अज़ाब (अल्लाहची शिक्षा- यातना) पाहतील. या लोकांनी मार्गदर्शन प्राप्त केले असते तर बरे झाले असते!

**६५.** आणि त्या दिवशी त्यांना बोलावून विचारेल की तुम्ही पैगंबरांना काय उत्तर दिले होते?[१]

---

(१) या आधीच्या आयतीमध्ये 'तौहीद'संबंधीचा प्रश्न होता. हे दुसरे ऐलान प्रेषित्वासंबंधी आहे. अर्थात तुमच्याकडे आम्ही रसूल पाठविले होते, तुम्ही त्यांच्याशी कसा व्यवहार केला, त्यांचे आवाहन स्वीकारले होते? ज्या प्रकारे कबरीत विचारले जाते की तुझा पैगंबर कोण? तुझा दीन (धर्म) कोणता? ईमानधारक तर उचित उत्तर देतात, परंतु काफिर म्हणतो, अरेरे! मला काहीच माहीत नाही. त्याच प्रकारे कयामतच्या दिवशीही त्यांना या प्रश्नाचे उत्त ध्यानी येईल. यास्तव पुढे फर्माविले, त्यांच्यावर सर्व समाचार आंधळे होतील, म्हणजे कोणताही पुरावा त्यांच्या ध्यानी येणार नाही, ज्यास ते सादर करू शकतील, इथे प्रमाणांना, समाचारांच्या अर्थाने घेऊन याकडे संकेत केला गेला आहे की त्यांच्या खोट्या ईमानासाठी वस्तूतः त्यांच्याजवळ कसलेही प्रमाण नाही, आहेत फक्त कथा कहाण्या. ज्या प्रकारे आज देखील कबरीची पूजा करणाऱ्यांजवळ मनाने रचलेल्या चमत्कारांच्या किश्श्यांखेरीज अन्य काही नाही.

**६६.** मग तर त्या दिवशी त्यांचे सगळे समाचार आंधळे होतील आणि ते एकमेकांना काही विचारणारही नाहीत.

**६७.** परंतु जो मनुष्य (अल्लाहजवळ) माफी मागून ईमान राखेल आणि सत्कर्म करीत राहील, निश्चितच तो सफलता प्राप्त करणाऱ्यांपैकी ठरेल.

**६८.** आणि तुमचा पालनकर्ता जे इच्छितो, निर्माण करतो, आणि ज्याला इच्छितो, त्यांच्यामधून निवडून घेतो, कोणाला कसलाही अधिकार नाही. अल्लाहकरिताच पाकी (पवित्रता) आहे. तो अतिशय उच्च आहे त्या प्रत्येक वस्तूपासून, ज्याला लोक (अल्लाहचा) सहभागी बनवितात.

**६९.** आणि तुमचा पालनकर्ता सर्व काही जाणतो, जे काही ते आपल्या छातीत (हृदयात) लपवितात, आणि जे काही व्यक्त करतात.

**७०.** आणि तोच अल्लाह आहे, त्याच्याखेरीज उपासना करण्यायोग्य असा दुसरा कोणीही नाही. या जगात आणि आखिरतमध्ये त्याचीच प्रशंसा आहे. त्याचाच आदेश आहे आणि त्याच्याचकडे तुम्ही सर्व परतविले जाल.

**७१.** सांगा की, जरा विचार करा, जर अल्लाह कयामतपर्यंत तुमच्यावर निरंतर रात्रच रात्र आच्छादित करील तर अल्लाहखेरीज ते कोणते आराध्य दैवत आहे, जे तुमच्यावर दिवसाचा प्रकाश आणील? काय तुम्ही ऐकत नाही?

**७२.** त्यांना विचारा, हाही विचार करा, जर अल्लाह कयामतपर्यंत तुमच्यावर निरंतर दिवसच दिवस ठेवील तर अशा स्थितीतही अल्लाहखेरीज ते कोणते दैवत (माबूद) आहे जे तुमच्याजवळ रात्र आणील, ज्यात तुम्ही आराम करू शकावे. काय तुम्ही पाहत नाहीत?

**७३.** आणि त्यानेच तुमच्यासाठी आपल्या दया कृपेने दिवस रात्र निर्धारित केले आहेत, यासाठी की रात्री तुम्ही आराम करू शकावे आणि दिवसा त्याच्या (पाठविलेल्या) आजिविकेचा शोध घ्यावा. हे अशासाठी की तुम्ही कृतज्ञता व्यक्त करावी.

**७४.** आणि ज्या दिवशी त्यांना हाक मारून अल्लाह फर्माविल की ज्यांना तुम्ही माझा

सहभागी समजत होते, ते आहेत कोठे ?

**७५.** आणि तुम्ही प्रत्येक जनसमुदायातून एक साक्षी वेगळा करू आणि सांगू की आपला पुरावा सादर करा, जेव्हा त्या वेळी जाणून घेतील की सत्य अल्लाहच्या बाजूने आहे आणि जे काही असत्य ते रचत राहिले ते सर्व त्यांच्या जवळून हरवले जाईल.

**७६.** कारुन मूसाच्या जनसमूहापैकी होता, परंतु तो त्याच्यावर अत्याचार करू लागला होता. आम्ही त्याला एवढा प्रचंड खजिना देऊन ठेवला होता की कित्येक शक्तिशाली लोक मोठ्या कष्टाने त्याच्या चाव्या उचलू शकत होते. एकदा त्याच्या जनसमूहाच्या लोकांनी त्याला म्हटले की दिमाख दाखवू नकोस. अल्लाह, दिमाख दाखविणाऱ्यांशी प्रेम करीत नाही.

**७७.** आणि जे काही अल्लाहने तुला प्रदान केले आहे, त्यातून आखिरतच्या घराचा शोधही ठेव आणि आपला ऐहिक हिस्साही विसरू नकोस आणि ज्या प्रकारे अल्लाहने तुझ्यावर उपकार केला आहे, तू देखील सद्वर्तन कर आणि देशात उत्पात (माजविण्या) ची इच्छा धरू नकोस. निश्चितच, अल्लाह उत्पात (फसाद) माजविणाऱ्यांशी प्रेम राखत नाही.

**७८.** कारुन म्हणाला, हे सर्व काही मला माझ्या स्वतःच्या ज्ञानामुळे दिले गेले आहे. काय आतापर्यंत त्याला हे माहीत झाले नाही की अल्लाहने त्याच्यापूर्वी कितीतरी वस्तीवाल्यांना नष्ट करून टाकले जे त्याच्यापेक्षा जास्त बलवान आणि जास्त धनवान होते, आणि अपराध्यांना त्यांच्या अपराधांविषयी अशा वेळी विचारले जात नाही.

**७९.** यास्तव (कारुन) संपूर्ण थाटामाटासह आपल्या जनसमूहाच्या जमावात निघाला, तेव्हा ऐहिक जीवनाची आसक्ती बाळगणारे म्हणाले, आम्हाला कशाही प्रकारे ते लाभले असते, जे कारुनला दिले गेले आहे, तर किती बरे झाले असते! हा तर मोठा भाग्यशाली आहे.

**८०.** आणि विद्वान (धर्मज्ञानी) लोक त्यांना समजावू लागले की मोठ्या खेदाची गोष्ट आहे! उत्तम गोष्ट तर ती आहे जी नेकी (सत्कर्मा) च्या रूपात त्यांना लाभेल, जे अल्लाहवर ईमान राखतील आणि सत्कर्म करीत राहतील. ही गोष्ट त्यांच्याच मनात टाकली (प्रेरित केली) जाते, जे धैर्यशील आणि सहनशील असावेत.

**८१.** (शेवटी) आम्ही त्याला त्याच्या महालासमवेत जमिनीत धसवले आणि अल्लाहखेरीज, कोणताही समूह त्याच्या मदतीकरिता तयार झाला नाही, ना तो स्वतःला वाचविणाऱ्यांपैकी होऊ शकला.

**८२.** आणि जे लोक कालपर्यंत त्याच्या पदापर्यंत पोहचण्याची आशा करीत होते, ते आज म्हणू लागले की, काय तुम्ही पाहत नाही की अल्लाह आपल्या दासांपैकी ज्याच्यासाठी इच्छितो आजिविका (रोजी) व्यापक करतो, आणि कमी देखील. जर अल्लाहने आमच्यावर उपकार केला नसता तर आम्हालाही धसविले असते. काय पाहत नाही की कृतघ्न लोकांना सफलता कदापि प्राप्त होत नाही.

**८३.** आखिरतचे हे (भले) घर आम्ही अशाच लोकांसाठी निश्चित करतो जे धरतीवर घमेंड आणि गर्व करीत नाही, आणि ना उत्पात (फसाद) करू इच्छितात आणि अल्लाहचे भय राखून आचरण करणाऱ्यांकरिता फार चांगला मोबदला आहे.

**८४.** जो मनुष्य नेकी (सत्कर्म) घेऊन येईल, त्याला त्याहून अधिक चांगले लाभेल आणि जो दुष्कर्म घेऊन येईल तर अशा दुराचारी लोकांना त्यांच्या त्याच आचरणाचा मोबदला दिला जाईल, जे ते करीत होते.

**८५.** ज्या (अल्लाह) ने तुमच्यावर कुरआन अवतरित केले आहे तो तुम्हाला दुसऱ्यांदा पहिल्या स्थानावर आणणार आहे. सांगा, माझा पालनकर्ता त्यालाही चांगल्या प्रकारे जाणतो, त्याने मार्गदर्शन प्राप्त केले आहे, आणि त्यालाही जो उघड मार्गभ्रष्टतेत पडला आहे.

**८६.** आणि तुम्ही कधीही विचारही केला नव्हता की तुमच्यावर ग्रंथ अवतरित केला जाईल, परंतु हा तुमच्या पालनकर्त्याच्या दया कृपेने (अवतरित झाला) आता तुम्ही कधीही काफिरांचे सहाय्यक होऊ नये.

**८७.** (लक्षात ठेवा) या काफिरांनी तुम्हाला, अल्लाहच्या आयतींचा प्रचार करण्यापासून रोखू नये, यानंतर की त्या तुमच्यावर अवतरित केल्या जाण्यात. तेव्हा आपल्या पालनकर्त्याकडे बोलवित राहा, आणि अनेकेश्वरवादी लोकांपैकी होऊ नका.

**८८.** आणि अल्लाहच्या सोबत दुसऱ्या एखाद्या दैवताला पुकारू नका.[१] अल्लाहखेरीज दुसरा कोणीही उपासना करण्या योग्य नाही. प्रत्येक वस्तू नाश पावणार आहे, परंतु त्याचे मुख,[२] त्याचेच शासन आहे आणि तुम्ही त्याच्याचकडे परतविले जाल.

-------

(१) अर्थात अन्य कोणाचीही भक्ती- आराधना करू नका. ना दुअ- प्रार्थनेद्वारे ना भोग- प्रसाद- नवस- नजराण्याने, ना कुर्बानीद्वारे, कारण हे सर्व उपासना प्रकार आहेत, जे केवळ एक अल्लाहकरिता खास आहे. पवित्र कुरआनात अनेक ठिकाणी अल्लाहखेरीज दुसऱ्या कोणाच्या उपासनेला 'पुकारणे' म्हटले गेले आहे, ज्याचा उद्देश याच गोष्टीला स्पष्ट करणे आहे की अल्लाहखेरीज दुसऱ्या कोणाला माध्यमांच्या पलीकडे मानून पुकारणे त्यांच्याकडे मदत मागणे, गाऱ्हाणे मांडणे, आर्जव आणि दुआ- प्रार्थना करणे हे सर्व त्यांची उपासना करणेच होय, ज्याद्वारे मनुष्य अनेकेश्वरवादी बनतो.

(२) 'त्याचे मुख'शी अभिप्रेत अल्लाह होय. अंश सांगून समग्र अभिप्रेत आहे. अर्थात अल्लाहखेरीज प्रत्येक वस्तू नाश पावणार आहे (सजीव असो की निर्जीव) 'कुल्लु मन् अलैहा फ़ानिव् व यब्क़ा वज्हु रब्बि-क जुल्जलालि वल-इक्राम.' ''धरतीवर जेवढे म्हणून आहेत, सर्व नाश पावणार आहेत. केवळ तुझ्या पालनकर्त्याचे मुख, जो मोठी महानता आणि प्रतिष्ठा बाळगणारा आहे, तोच बाकी राहील.''

# सूरह अनकबूत - २९

सूरह अनकबूत मक्का येथे अवतरली आणि यात एकोणसत्तर आयती आणि सात रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** अलिफ - लाम - मीम.

**२.** काय लोकांनी असे समजून घेतले आहे की त्यांच्या केवळ या बोलण्यावर की आम्ही ईमान राखले आहे, त्यांना परीक्षा घेतल्याविना असेच सोडून दिले जाईल ?[१]

**३.** त्यांच्या पूर्वी होऊन गेलेल्या लोकांचीही आम्ही चांगल्या प्रकारे कसोटी घेतली. निःसंशय, अल्लाह त्यांनाही जाणून घेईल, जे खरे बोलतात, आणि त्यांनाही जाणून घेईल जे खोटारडे आहेत.

**४.** काय जे लोक दुष्कर्म करीत आहेत, त्यांनी असे समजून घेतले आहेत की ते आमच्या काबूतून बाहेर जातील ? कसा वाईट विचार हे लोक करीत आहेत!

**५.** ज्याला अल्लाहच्या भेटीची अपेक्षा असेल, तर अल्लाहची निर्धारित केलेली वेळ निश्चितच येणार आहे. तो सर्व काही ऐकणारा, सर्व काही जाणणारा आहे.

**६.** आणि प्रत्येक प्रयत्न करणारा आपल्या स्वतःच्याच भल्याकरिता प्रयत्न करतो. निःसंशय अल्लाह समस्त जगवाल्यांपासून निःस्पृह आहे.[२]

---

**सूरह 'अल् अनकबूत'चे भाष्य :**

(१) अर्थात हा विचार की केवळ तोंडी बोलून ईमान राखल्यानंतर, कसोटी न घेताच सोडले जाईल, उचित नाही, किंबहुना त्यांना प्राण वित्ताची हानी आणि इतर कसोट्यांद्वारे पारखले जाईल, यासाठी की खऱ्या खोट्याची, सत्य असत्याची सच्चा ईमानधारकाची व दांभिक ईमान दर्शविणाऱ्याची माहिती व्हावी.

(२) याचा अर्थ तोच आहे जो 'मन् अमि-ल सालिहन् फ़लिनफ़सिही' (सूरह जासिया - १५) चा आहे. म्हणजे जो सत्कर्म करील, त्याचा फायदा त्यालाच मिळेल अन्यथा अल्लाहला माणसांच्या कर्माची काहीच आवश्यकता नाही. साऱ्या जगाचे लोक जरी अल्लाहचे भय बाळगणारे होतील, तरी त्याच्या राज्यात कसलीही वाढहोणार नाही आणि सर्वच्या सर्व त्याची अवज्ञा करणारे झाले तरीही त्याच्या राज्यात कणभर कमी होणार नाही. शब्दांच्या आधारे यात काफिरांशी जिहाद (धर्मयुद्ध) करण्याचाही आदेश आहे की ते सुद्धा एक प्रकारचे सत्कर्म होय.

**७.** आणि ज्यांनी ईमान बाळगले आणि (पैगंबर आचरणच्या दृष्टीने) सत्कर्म केले, आम्ही त्यांच्या सर्व अपराधांना त्यांच्यापासून दूर करू, आणि त्यांच्या नेक कामांचा चांगला मोबदला प्रदान करू.

**८.** आम्ही प्रत्येक माणसाला आपल्या माता-पित्याशी सद्‌वर्तन करण्याची शिकवण दिली आहे. तथापि जर ते हा प्रयत्न करतील की तुम्ही माझ्यासोबत त्याला सहभागी करून घ्यावे, ज्याचे तुम्हाला ज्ञान नाही तर त्यांचे म्हणणे मान्य करू नका. तुम्हा सर्वांना परतून माझ्याचकडे यायचे आहे, मग मी त्या प्रत्येक गोष्टीशी, जी तुम्ही करीत होते अवगत करवीन.

**९.** आणि ज्या लोकांनी ईमान कबूल केले, आणि सत्मर्क करीत राहिले त्यांना आम्ही आपल्या नेक (सदाचारी) दासांमध्ये सामील करू.

**१०.** आणि काही लोक असेही आहेत, जे तोंडाने म्हणतात की आम्ही ईमान राखले आहे. परंतु जेव्हा अल्लाहच्या मार्गात एखाद्या दुःखाचा सामना होतो, तेव्हा लोकांकडून दिला जाणाऱ्या कष्ट- यातनेला अल्लाहच्या शिक्षा- यातनेसमान ठरवितात, परंतु जर अल्लाहची मदत येऊन पोहचली तर तेव्हा म्हणू लागतात की आम्ही तर तुमच्याच साथीला आहोत, काय समस्त विश्वा (माणसांच्या) मनात जे काही आहे, ते अल्लाह जाणत नाही ?

**११.** आणि ज्या लोकांनी ईमान राखले, अल्लाह त्यांनाही जाणून घेतल्याविना राहणार नाही आणि ईमानधारक असण्याचे ढोंग रचणाऱ्यांनाही जाणून घेतल्याविना राहणार नाही.

**१२.** आणि काफिर (सत्य विरोधक) ईमान राखणाऱ्यांना म्हणाले, तुम्ही आमच्या मार्गाचे अनुसरण करा, तुमचे अपराध आम्ही आपल्या (शिरा) वर घेऊ, वास्तविक ते त्यांच्या अपराधांपैकी काही एक आपल्यावर घेणार नाहीत. ते तर अगदी खोटारडे आहेत.

**१३.** (एवढे निश्चित की) हे आपले ओझे उचलतील आणि आपल्या ओझ्यांसोबत इतर ओझे देखील, आणि ते जे काही असत्य रचत आहेत त्या सर्वांबाबत त्यांना विचारणा केली जाईल.

**१४.** आणि आम्ही नूह (अलै.) ला त्यांच्या जनसमूहाकडे पाठविले, ते त्यांच्या दरम्यान साडे नऊशे वर्षांपर्यंत राहिले, मग त्यांना वादळाने येऊन धरले आणि ते होतेच मोठे अत्याचारी.

**१५.** मग आम्ही त्यांना आणि नौकावाल्यांना मुक्ती दिली, आणि आम्ही या घटनेला संपूर्ण जगाकरिता बोधचिन्ह बनविले.

**१६.** आणि इब्राहीम (अलै.) देखील आपल्या जनसमूहास म्हणाले की अल्लाहची उपासना करा आणि त्याचे भय बाळगून राहा, जर तुम्ही अक्कलवान असाल तर, हेच तुमच्यासाठी अधिक चांगले आहे.

**१७.** तुम्ही तर अल्लाहला सोडून मूर्तीची पूजा करीत आहात, आणि खोट्या गोष्टी मनाने रचून घेता. (ऐका) तुम्ही अल्लाहऐवजी ज्यांची ज्यांची पूजा अर्चना करीत आहात, ते तर तुमच्या आजिविकेचे मालक नाहीत, तेव्हा तुम्ही अल्लाहकडेच रोजी (आजिविका) मागितली पाहिजे. आणि त्याचीच उपासना करा आणि त्याच्याशीच कृतज्ञशील राहा आणि त्याच्याचकडे तुम्ही परतविले जाल.

**१८.** आणि जर तुम्ही खोटे ठरवाल तर तुमच्यापूर्वी होऊन गेलेल्या लोकांनीही खोटे ठरविले आहे, आणि पैगंबराचे कर्तव्य तर केवळ स्पष्टरित्या पोहचवून देणेच आहे.

**१९.** काय त्यांनी नाही पाहिले की अल्लाहने सृष्टी-निर्मितीची उत्पत्ती कशा प्रकारे केली, मग अल्लाह तिची पुनरावृत्ती करील. हे तर अल्लाहकरिता फार सोपे आहे.

**२०.** सांगा, जमिनीवर हिंडून फिरून पाहा की कशा प्रकारे अल्लाहने सर्वांत प्रथम निर्मितीला उत्पन्न केले, मग अल्लाहच दुसरी नवी उत्पत्ती करेल. निःसंशय, अल्लाह प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्य बाळगतो.

**२१.** तो ज्याला इच्छिल अज़ाब देईल आणि ज्यावर इच्छिल दया करील, सर्व त्याच्याचकडे परतविले जाल.

**२२.** तुम्ही ना जमिनीवर अल्लाहला विवश (लाचार) करू शकता, ना आकाशात, अल्लाहखेरीज तुमचा कोणी ना संरक्षक आहे ना सहाय्यक.

**२३.** आणि जे लोक अल्लाहच्या आयतींना आणि त्याच्या भेटीला खोटे ठरवितात त्यांनी माझ्या दया- कृपेची आस राखू नये आणि त्याच्याकरिता दुःखदायक अज़ाब

(शिक्षा- यातना) आहे.

**२४.** त्याच्या जनसमूहाचे उत्तर याखेरीज दुसरे काही नव्हते की ते म्हणाले, याला मारून टाका किंवा याला जाळून टाका. शेवटी अल्लाहने त्यांना आगीपासून वाचविले. यात ईमान राखणाऱ्यांकरिता अनेक निशाण्या आहेत.

**२५.** (हजरत इब्राहीम अलै.) म्हणाले की तुम्ही अल्लाहऐवजी ज्या मूर्ती (दैवतां) ची पूजा अर्चना केली आहे त्यांना तुम्ही आपल्या ऐहिक मैत्रीचे कारण बनविले आहे. तुम्ही सर्व कयामतच्या दिवशी एकमेकांचा इन्कार करू लागाल आणि एकमेकांना धिःक्कारू लागाल आणि तुम्हा सर्वांचे ठिकाण जहन्नममध्ये असेल, आणि कोणी तुमची मदत करणाराही नसेल.

**२६.** तेव्हा त्याच्या (हजरत इब्राहीम अलै.) वर (हजरत) लूत (अलै.) यांनी ईमान राखले आणि म्हणाले, मी आपल्या पालनकर्त्याकडे हिजरत (स्थलांतर) करणारा आहे. तो मोठा वर्चस्वशाली आणि हिकमत (बुद्धी-कौशल्य) बाळगणारा आहे.

**२७.** आणि आम्ही त्याला (इब्राहीम अलै. यांना) इसहाक आणि याकूब प्रदान केले, आणि आम्ही प्रेषित्व आणि ग्रंथ त्यांच्या वंशात राखला, आणि आम्ही या जगातही त्यांना चांगला मोबदला दिला आणि आखिरतमध्ये तर ते सदाचारी लोकांपैकी आहेत.

**२८.** आणि (हजरत) लूत (अलै.) यांचाही (उल्लेख करा) जेव्हा ते आपल्या जनसमूहाला म्हणाले की तुम्ही तर असे निर्लज्जपणाचे काम करता जे तुमच्यापूर्वी संपूर्ण जगापैकी कोणीही केले नाही.

**२९.** काय तुम्ही (कामवासना पूर्तीकरिता) पुरुषांजवळ येता, आणि वाटमार करतात आणि आपल्या आम सभामध्ये निर्लज्जतेचे काम करता? तेव्हा त्याच्या उत्तरादाखल त्यांच्या जनसमूहाने याखेरीज दुसरे काही सांगितले नाही की पुरे कर, जर सच्चा आहेस तर आमच्यावर अल्लाहचा अज़ाब (शिक्षा) आणून दाखव.

**३०.** (हजरत) लूत (अलै.) यांनी दुआ (प्रार्थना) केली की, हे माझ्या पालनकर्त्या! या दुराचारी लोकांच्या विरोधात माझी मदत कर.

**३१.** आणि जेव्हा आम्ही पाठविलेले फरिश्ते (हजरत) इब्राहीम (अलै.) जवळ शुभ समाचार घेऊन पोहोचले तेव्हा म्हणाले, आम्ही या वस्तीच्या लोकांचा नाश करणार

आहोत. निःसंशय इथले रहिवाशी मोठे अत्याचारी आहेत.

**३२.** (हजरत) इब्राहीम) म्हणाले, त्या वस्तीत तर लूत (अलै.) आहेत. फरिश्ते म्हणाले, इथे जे आहेत, त्यांना आम्ही चांगल्या प्रकारे जाणतो लूत आणि त्यांच्या कुटुंबाला, त्यांच्या पत्नीखेरीज, आम्ही वाचवू. निःसंशय ती स्त्री मागे राहणाऱ्यांपैकी आहे.

**३३.** आणि मग जेव्हा आम्ही पाठविलेले फरिश्ते लूत (अलै.) जवळ पोहोचले, तेव्हा ते त्यांच्यामुळे दुःखी कष्टी झाले आणि मनातल्या मनात शोकाकुल झाले. संदेशवाहक म्हणाले, तुम्ही भिऊ नका आणि दुःखी होऊ नका, आम्ही तुम्हाला तुमच्या कुटुंबासहित सुरक्षित ठेवू तुमच्या पत्ीला सोडून, कारण ती अज़ाब (शिक्षे) साठी बाकी राहणाऱ्यांपैकी असेल.

**३४.** आम्ही या वस्तीच्या लोकांवर आकाशातून अज़ाब उतरविणार आहोत, या कारणास्तव की हे दुराचारी होत आहेत.

**३५.** आणि आम्ही या वस्तीला स्पष्ट बोध ग्रहण करण्यासाठी चिन्ह बनविले त्या लोकांकरिता जे बुद्धी बाळगतात.

**३६.** आणि मदयनकडे (आम्ही) त्यांचे भाऊ शुऐब (अलै.) यांना पाठविले. ते म्हणाले, हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! अल्लाहची उपासना करा, कयामतच्या दिवसाची आशा बाळगा आणि जमिनीवर उत्पात (फसाद) पसरवित फिरू नका.

**३७.** तरीही त्या लोकांनी त्यांना खोटे ठरविले, शेवटी भूकंपाने त्यांना धरले आणि ते आपल्या घरांमध्ये बसल्या बसल्या मृत झाले.

**३८.** आणि आम्ही 'आद' आणि 'समूद' (जनसमूहा) च्या लोकांनाही (नष्ट केले) ज्यांचे काही भग्न अवशेष तुमच्यासमोर हजर आहेत. आणि सैतानाने त्यांच्या दुष्कर्माला सुशोभित करून दाखविले होते आणि त्यांना सन्मार्गापासून रोखले होते. यानंतर की हे डोळे राखणारे आणि चलाख होते.

**३९.** आणि कारुन, फिरऔन आणि हामानला देखील. त्याच्याजवळ (हजरत) मूसा उघड स्वरूपाचे चमत्कार (मोजिजे) घेऊन आले होते तरीही त्यांनी धरतीवर घमेंड केली, तथापि आमच्या पुढे जाणारे होऊ शकले नाहीत.

**४०.** मग तर आम्ही प्रत्येकाला त्याच्या दुष्कर्माची शिक्षा देण्यासाठी धरले. त्यांच्यापैकी काहींवर आम्ही दगडांचा वर्षाव केला, त्यांच्यापैकी काहींना भयंकर चित्काराने घेरले, त्यांच्यापैकी काहींना आम्ही जमिनीत धसवले आणि त्याच्यापैकी काहींना आम्ही पाण्यात बुडविले. अल्लाह असा नाही की त्यांच्यावर अत्याचार करील, उलट तेच लोक आपल्या प्राणांवर जुलूम अत्याचार करीत होते.

**४१.** ज्या लोकांनी अल्लाहखेरीज दुसऱ्यांना वली (दैवत) ठरवून घेतले आहे, त्यांचे उदाहरण कोष्टी किटकासारखे आहे कारण तोही एक घर बनवितो, वास्तविक सर्व घरांपेक्षा जास्त कमजोर घर कोष्टी किटकाचे घर आहे. त्यांनी हे जाणून घेतले असते तर बरे झाले असते!

**४२.** अल्लाह समस्त वस्तूंना जाणतो, ज्यांना ते त्याच्याखेरीज पुकारत आहेत. आणि तो मोठा जबरदस्त आणि बुद्धी कौशल्य बाळगणारा आहे.

**४३.** आणि आम्ही ही उदाहरण लोकांकरिता निवेदन करीत आहोत आणि यांना केवळ तेच लोक समजतात जे ज्ञान राखतात.

**४४.** अल्लाहने आकाशांना आणि जमिनीला सत्यासह निर्माण केले आहे ईमान राखणाऱ्यांकरिता यात फार मोठी निशाणी आहे.

**४५.** जो ग्रंथ तुमच्याकडे वहयी (अवतरित) केला गेला आहे, त्याचे पठण करा[१] आणि नमाज कायम करा (नियमितपणे पढत राहा) निःसंशय नमाज, निर्लज्जता आणि दुष्कर्मापासून रोखते[२] आणि निःसंशय अल्लाहचे नामःस्मरण फार मोठी गोष्ट आहे. तुम्ही जे काही करीत आहात, अल्लाह ते जाणतो.

---

(सूरह रहमान-२६,२७)

(१) पवित्र कुरआनाच्या पठणाचे अनेक उद्देश आहेत. केवळ प्रतिफळ आणि पुण्यप्राप्तीकरिता, त्याच्या अर्थ व आशयावर विचार चिंतन करण्याकरिता बोध उपदेश व शिकवणप्राप्तीकरिता आणि स्पष्टीकरणाकरिता, पठणाच्या आदेशात ते सर्वच प्रकारे सामील आहेत.

(२) अर्थात निर्लज्जता आणि दुराचाराला रोखण्याचे माध्यम बनते. ज्या प्रकारे औषधांचे अनेक प्रभाव असतात आणि असे म्हटले जाते की अमुक एक औषध अमुक एका रोगावर उपाय आहे आणि वस्तुतः तसे घडते, परंतु केव्हा? जेव्हा दोन गोष्टी ध्यानात राखल्या जातील, एक तर औषधाला व्यवस्थित नियम व अटींसह वापरले जावे, ज्या वैद्य, हकीम किंवा डॉक्टरने सांगितल्या आहेत. दुसरे पथ्य म्हणजे अशा वस्तू वापरल्या न जाव्यात, ज्या औषधाचा प्रभाव कमी करतील किंवा नाहीसा करतील.

**४६.** आणि ग्रंथधारकांशी खूप चांगल्या रितीने वादविवाद करा, अशा लोकांखेरीज, जे त्यांच्यात अत्याचारी आहेत. आणि स्पष्ट ऐलान करा की आम्ही तर त्या ग्रंथावरही ईमान राखतो, जो आमच्यावर अवतरित केला गेला आहे आणि त्यावरही, जो तुमच्यावर अवतरित केला गेला. आमचा आणि तुमचा पालनकर्ता एकच आहे. आम्ही सर्व त्याचेच आज्ञाधारक आहोत.

**४७.** आणि आम्ही त्याच प्रकारे तुमच्याकडे आपला ग्रंथ अवतरित केला आहे, यास्तव ज्यांना आम्ही ग्रंथ प्रदान केला आहे, ते त्यावर ईमान राखतात आणि त्यांच्यापैकी काही त्यावर ईमान राखतात आणि आमच्या आयतींचा इन्कार केवळ काफिरच करतात.

**४८.** आणि यापूर्वी तर तुम्ही एखादा ग्रंथ वाचत होते आणि ना एखादा ग्रंथ आपल्या हाताने लिहित होते की (ज्यामुळे) असत्याचे पुजारी शंका संशयात पडले असते.

**४९.** वास्तविक या (कुरआनाच्या) दिव्य (स्पष्ट) आयती आहेत, ज्या विद्वानांच्या हृदयात सुरक्षित आहेत. आमच्या आयतींचा इन्कार करणारा, अत्याचारीखेरीज दुसरा कोणी नाही.

**५०.** आणि ते म्हणाले, याच्यावर काही निशाण्या याच्या पालनकर्त्यातर्फे का नाही अवतरित केल्या गेल्या? (तुम्ही) सांगा, निशाण्या तर सर्व अल्लाहजवळ आहेत. माझी योग्यता तर केवळ स्पष्टतः खबरदार (सावध) करणाऱ्याची आहे.

**५१.** काय त्यांच्यासाठी हे निशाण पुरेसे नाही की आम्ही तुमच्यावर आपला ग्रंथ अवतरित केला, जो त्यांना वाचून ऐकविला जात आहे. यात (अल्लाहची) दया-कृपाही आहे आणि बोध उपदेशही, त्या लोकांसाठी जे ईमान राखणारे आहेत.

**५२.** त्यांना सांगा, माझ्या आणि तुमच्या दरम्यान अल्लाहचे साक्षी असणे पुरेसे आहे. तो तर आकाश आणि जमिनीच्या प्रत्येक वस्तूला जाणणारा आहे. जे लोक असत्याला मानणारे आहेत आणि अल्लाहशी कुफ्र (इन्कार) करणारे आहेत, ते फार मोठ्या नुकसानात आहेत.

---

दुष्कृत्यांपासून रोखते, परंतु त्याच वेळी, जेव्हा नमाज पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्या आदर्श आचरणशैलीनुसार त्या पद्धती आणि अटींचे पालन करून अदा केली जाईल, ज्या तिच्या स्वीकृती आणि मान्यतेकरिता अनिवार्य आहेत.

**५३.** आणि हे लोक तुमच्याजवळ शिक्षा-यातनेची घाई माजवित आहेत. जर माझ्यातर्फे एक निश्चित वेळ ठरविली गेली नसती तर आतापर्यंत त्यांच्याजवळ शिक्षा-यातना येऊन पोहचली असती. एवढे मात्र निश्चित की अचानक त्यांच्या नकळत अज़ाब त्यांच्याजवळ येऊन पोहोचेल.

**५४.** हे लोक अज़ाब (शिक्षे) साठी घाई माजवित आहेत, आणि (समाधान राखा) जहन्नम काफिरांना घेरून टाकणार आहे.

**५५.** त्या दिवशी त्यांना, त्यांच्या वरून आणि खालून अज़ाब झाकत असेल आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह फर्माविल, आता आपल्या दुष्कर्मांची गोडी चाखा.

**५६.** हे माझ्या ईमान राखणाऱ्या दासांनो! माझी जमीन फार विस्तृत आहे. तेव्हा तुम्ही माझीच उपासना करा.

**५७.** प्रत्येक जीवाला मृत्युची गोडी चाखायची आहे आणि तुम्ही सर्व आमच्याचकडे परतविले जाल.

**५८.** आणि ज्या लोकांनी ईमान राखले आणि सत्कर्म करीत राहिले, त्यांना आम्ही निश्चितपणे जन्नतच्या उंच महालांमध्ये जागा देऊ, ज्यांच्या खालून नद्या वाहत आहे, जिथे ते सदैवकाळ राहतील. (चांगले) कर्म करणाऱ्यांचा किती चांगला मोबदला आहे!

**५९.** ते, ज्यांनी धीर - संयम राखला आणि जे आपल्या पालनकर्त्यावर भरवसा ठेवतात.

**६०.** आणि कित्येक प्राणी असे आहेत, जे आपली आजिविका उचलून फिरत नाही. त्या सर्वांना आणि तुम्हालाही अल्लाहच आजिविका प्रदान करतो. तो सर्व काही ऐकणारा, जाणणारा आहे.

**६१.** आणि जर तुम्ही त्यांना विचाराल की आकाश व जमिनीचा निर्माण करणारा आणि सूर्य व चंद्राला कामास लावणारा कोण आहे, तर ते हेच उत्तर देतील की अल्लाह! तेव्हा मग कोठे उलट जात आहात?

**६२.** अल्लाह आपल्या दासांपैकी ज्याला इच्छितो, अधिक आजिविका प्रदान करतो आणि ज्याला इच्छितो कमी. निःसंशय, अल्लाह प्रत्येक गोष्ट जाणणारा आहे.

**६३.** आणि जर तुम्ही त्यांना विचाराल की आकाशातून पाण्याचा वर्षाव करून, जमिनीला तिच्या मृत्युनंतर जिवंत करणारा कोण आहे, तेव्हा निश्चितच त्यांचे उत्तर हेच असेल की अल्लाह! तुम्ही सांगा की समस्त स्तुती- प्रशंसा अल्लाहकरिताच आहे, किंबहुना त्यांच्यात अधिकांश लोक निर्बोध आहेत. (आकलन अककल राखत नाही)

**६४.** आणि या जगाचे जीवन तर केवळ मनोरंजन आणि खेळ क्रीडा आहे परंतु खरे जीवन तर आखिरतचे घर आहे. या लोकांनी हे जाणले असते तर बरे झाले असते!

**६५.** जेव्हा हे लोक नौकेत स्वार होतात, तेव्हा अल्लाहलाच पुकारतात, त्याच्यासाठी उपासनेला खासकरून, मग जेव्हा तो त्यांना खुश्कीकडे सुरक्षित घेऊन येतो, तेव्हा लगेच शिर्क (अनेकईश्वरउपासना) करू लागतात.

**६६.** यासाठी की आम्ही केलेल्या उपकारांशी कृतघ्न व्हावे आणि लाभ घेत राहावा. आता लवकरच त्यांना कळून येईल.

**६७.** काय हे नाही पाहत की आम्ही हरमला शांतीचे स्तळ बनविले, वस्तुतः त्यांच्या जवळच्या इलाक्यातून लोक अपहृत केले जातात. काय हे असत्यावर तर विश्वास ठेवतात आणि अल्लाहच्या कृपा- देणग्यांवर कृतघ्नता दाखवितात?

**६८.** आणि त्याहून मोठा अत्याचारी कोण असेल, जो अल्लाहशी छोट्या गोष्टीचा संबंध जोडेल किंवा सत्य त्याच्याजवळ येऊन पोहचले असता, तो त्याला खोटे असल्याचे सांगेल. काय अशा काफिरांचे ठिकाण जहन्नममध्ये नसेल?

**६९.** आणि जे लोक आमच्या मार्गात दुःख सहन करतात, आम्ही त्यांना आपला मार्ग अवश्य दाखवू. निःसंशय, अल्लाह सत्कर्म करणाऱ्यांचा सोबती आहे.

---

# सूरह रुम - ३०

सूरह रुम मक्का येथे अवतरित झाली, यात साठ आयती व सहा रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** अलिफ. लाम. मीम

**२.** रोमन पराजित झाले.

**३.** जवळच्या प्रदेशात आणि ते पराजित झाल्यानंतर भविष्यात वर्चस्वशाली होतील.

**४.** काही वर्षांच्या आतच, याच्यापूर्वी आणि यानंतरही अधिकार फक्त अल्लाहचाच आहे, आणि त्या दिवशी ईमान राखणारे खूश होतील.

**५.** अल्लाहच्या मदतीने तो ज्याला इच्छितो मदत करतो, आणि खरा विजेता आणि वर्चस्वशाली आणि दयावान तोच आहे.

**६.** अल्लाहचा वायदा आहे. अल्लाह आपल्या वायद्यांचा भंग करीत नाही, परंतु बहुतेक लोक जाणत नाहीत.

**७.** ते तर (फक्त) ऐहिक जीवनाच्या बाह्य स्वरूपालाच जाणतात. आणि आखिरतपासून तर अगदी गाफील आहेत.

**८.** काय त्या लोकांनी आपल्या मनात यावर विचार नाही केला की अल्लाह ने आकाशांना व जमिनीला आणि त्यांच्या दरम्यान जे काही आहे त्या सर्वांना उत्तम अनुमानाने,[१] निर्धारित वेळेपर्यंत (च) निर्माण केले आहे, तथापि अधिकांश लोक

---

तद्वतच नमाजमध्येही अल्लाहने असा प्रभाव राखला आहे की तो माणसाला निर्लज्जता आणि

(१) किंवा एक उद्देश आणि सत्यासह निर्माण केले आहे, व्यर्थ नाही आणि तो उद्देश हा की नेक सदाचारी लोकांना सत्कर्मांचा मोबदला आणि दुराचारी लोकांना त्यांच्या दुष्कर्मांची शिक्षा दिली जावी, म्हणजे, काय ते आपल्या अस्तित्वावर विचार चिंतन करीत नाही की कशा प्रकारे त्याला तुच्छतेपासून उच्चता प्रदान केली आणि पाण्याच्या एका तुच्छ थेंबापासून त्याची रचना केली, मग आकाश व जमिनीला एका खास हेतुसाठी लांब रुंद केले. याखेरीज त्या सर्वांसाठी एक निर्धारित वेळ ठरवली, अर्थात कयामतचा दिवस, ज्या दिवशी हे सर्व काही समाप्त होईल. याचा अर्थ असा की जर यांनी या सर्व गोष्टींवर विचार केला असता तर निश्चितपणे अल्लाहचे अस्तित्व, तो रब (स्वामी व पालनकर्ता) असण्याची आणि उपासनायोग्य असण्याची आणि त्याच्या असीम सामर्थ्याची त्यांना जाणीव झाली

आपल्या पालनकर्त्याच्या भेटीचा इन्कार करतात.

**९.** काय त्यांनी जमिनीवर हिंडून फिरून पाहिले नाही की त्यांच्यापूर्वी होऊन गेलेल्या लोकांचा परिणाम (अंत) कसा (वाईट) झाला? ते यांच्यापेक्षा जास्त शक्तिशाली होते आणि त्यांनी देखील जमीन पेरली-नांगरली होती आणि यांच्यापेक्षा जास्त आबादी केली होती. आणि त्यांच्याजवळ त्यांचे रसूल (पैगंबर) ईश-चमत्कार (मोजिजे) घेऊन आले होते. हे तर अशक्य होते की अल्लाहने त्यांच्यावर जुलूम अत्याचार केला असता. परंतु (खरे पाहता) ते स्वतः आपल्या प्राणांवर अत्याचार करीत होते.

**१०.** मग शेवटी वाईट लोकांची परिणीती वाईट झाली, यासाठी की ते अल्लाहच्या आयतींना खोटे ठरवीत आणि त्यांची थट्टा उडवीत.

**११.** अल्लाहच सृष्टी-निर्मितीचा आरंभ करतो, मग तोच तिला दुसऱ्यांदा निर्माण करील, मग तुम्ही सर्व त्याच्याचकडे परतविले जाल.

**१२.** आणि ज्या दिवशी कयामत प्रस्थापित होईल, त्या दिवशी अपराधी आश्चर्यचकित होतील.

**१३.** आणि त्यांनी ठरविलेल्या सर्व सहभाग्यांपैकी एकही त्यांची शिफारस करणार नाही.[१] आणि स्वतः हेदेखील आपल्या आराध्य दैवतांचा (सहभागी ईश्वरांचा) इन्कार करतील.

**१४.** आणि ज्या दिवशी कयामत प्रस्थापित होईल, त्या दिवशी (सर्व समूह) विभागले जातील.

**१५.** मग जे ईमान बाळगून सत्कर्म करीत राहतील, त्यांना जन्नतमध्ये खूश केले जाईल.

**१६.** आणि ज्यांनी (कुफ्र) इन्कार केला होता, आणि आमच्या आयतींना व आखिरतच्या भेटीला खोटे ठरविले होते, त्या सर्वांना शिक्षा - यातनाग्रस्त करून हजर

---

(१) सहभाग्यांशी अभिप्रेत त्या काल्पनिक (मिथ्या) देवता होत, ज्यांची त्यांचे उपासक या श्रद्धाने पूजा करत होते की हे अल्लाहजवळ आमची शिफारस करतील आणि आम्हाला अल्लाहच्या अज़ाबपासून वाचवतील. परंतु इथे अल्लाहने हे स्पष्ट केले की अल्लाहसोबत दुसऱ्यांनाही ईश्वर ठरविणाऱ्यांकरिता, अल्लाहच्या ठिकाणी, कोणीही शिफारस करणार नसेल.

केले जाईल.

**१७.** तेव्हा अल्लाहची स्तुती-प्रशंसा करीत राहा, जेव्हा तुम्ही संध्याकाळ कराल आणि जेव्हा सकाळ कराल.

**१८.** आणि सर्व स्तुती- प्रशंसेस योग्य, आकाशात व जमिनीवर तोच आहे तिसऱ्या प्रहरी आणि दुपारच्या वेळीही त्याची पवित्रता वर्णन करा.

**१९.** तोच जिविताला मेलेल्यातून बाहेर काढतो आणि मेलेल्यास, जिवितातून बाहेर काढतो, आणि तोच जमिनीला तिच्या मृत्यूनंतर जिवंत करतो. अशाच प्रकारे तुम्ही (देखील) बाहेर काढले जाल.

**२०.** आणि अल्लाहच्या निशाण्यांपैकी आहे की तुम्हाला मातीपासून निर्माण केले, मग आता मनुष्य बनून (चालत फिरत) पसरत आहात.

**२१.** आणि त्याच्या निशाण्यांपैकी आहे की तुमच्याच (मानव) जातीमधून पत्न्या निर्माण केल्या, यासाठी की तुम्ही त्यांच्यापासून सुख शांती प्राप्त करावी. त्याने तुमच्या दरम्यान प्रेम आणि करुणा निर्माण केली. निःसंशय, विचार चिंतन करणाऱ्यांकरिता यात अनेक निशाण्या आहेत.

**२२.** आणि त्याच्या सामर्थ्याच्या निशाण्यांपैकी आकाशांची व जमिनीची निर्मिती, आणि तुमच्या भाषा आणि वर्णांची विभिन्नता (देखील) होय. बुद्धिमानांकरिता निश्चितच यात मोठ्या निशाण्या आहेत.

**२३.** आणि त्याच्या सामर्थ्याचा निशाण्यांपैकी तुमच्या रात्र आणि दिवसाच्या झोपेत आहे आणि त्याच्या कृपेला (अर्थात आजिविकेला) तुमचे शोधणे (ही) आहे. जे लोक कान लावून (लक्षपूर्वक) ऐकणारे आहेत, त्यांच्यासाठी यात मोठ्या निशाण्या आहेत.

**२४.** आणि त्याच्या निशाण्यांपैकी एक निशाणी ही देखील आहे की तो तुम्हाला भयभीत व आशावान बनविण्याकरिता विजेची चमक दाखवितो, आणि आकाशातून पाणी वर्षवितो आणि त्याद्वारे मृत जमिनीला जिवंत करतो. यात देखील बुद्धिमान लोकांकरिता मोठ्या निशाण्या आहेत.

**२५.** आणि त्याची एक निशाणी ही देखील आहे की आकाश आणि धरती त्याच्या आदेशाने कायम आहेत, मग जेव्हा तो तुम्हाला हाक मारेल, केवळ एक वेळच्या

पुकारण्यानेच तुम्ही सर्व जमिनीतून बाहेर पडाल.

**२६.** आणि आकाश व धरतीच्या समस्त वस्तूंचा तोच स्वामी (मालक) आहे आणि सर्वच्या सर्व त्याच्या हुकुमाच्या अधीन आहेत.

**२७.** आणि तोच आहे जो पहिल्यांदा सृष्टी निर्माण करतो, तोच पुन्हा दुसऱ्यांदा निर्माण करील आणि हे त्याच्याकरिता फारच सोपे आहे. त्याचीच उत्तम आणि उच्च गुणविशेषता आहे[१] आकाशांमध्ये आणि धरतीतही. तो मोठा जबरदस्त बुद्धिकौशल्य (हिकमत) बाळगणारा आहे.

**२८.** अल्लाहने एक उदाहरण स्वतः तुमचेच सांगितले. जे काही आम्ही तुम्हाला प्रदान केले आहे, काय त्यात तुमच्या दासांपैकी कोणी तुमचा भागीदार आहे की तुम्ही आणि तो यात समान पदाचे असावेत?[२] आणि तुम्ही त्याचे भय अशा प्रकारे राखता, जसे स्वतः आपल्या लोकांचे? आम्ही बुद्धिमानांकरिता अशाच प्रकारे स्पष्टतः आयती निवेदन करतो.

**२९.** खरी गोष्ट अशी की हे अत्याचारी ज्ञानाविना इच्छा-आकांक्षांचे भक्त आहेत, त्याला कोण मार्ग दाखविल ज्याला अल्लाह पथभ्रष्ट करील? त्यांना कोणी एकही मदत करणारा नाही.

**३०.** तेव्हा तुम्ही एकाग्रचित्त होऊन आपला चेहरा दीन (धर्मा) कडे केंद्रित करा. अल्लाहचा तो स्वाभाविक (धर्म) ज्यावर त्याने लोकांना निर्माण केले आहे. अल्लाहच्या रचनेत परिवर्तन नाही. हाच खरा दीन (धर्म) आहे. परंतु अधिकांश लोक समजत नाहीत.

---

(१) अर्थात एवढ्या गुणांनी व असीम सामर्थ्याने युक्त स्वामी, सर्व उपमांपेक्षा महान आणि उच्चतम आहे. तो अतुलनीय आहे. (सूरह शूरा-११)

(२) अर्थात ज्याअर्थी तुम्हाला हे पसंत नाही की तुमचे नोकर चाकर, जे तुमच्यासारखे माणूस आहेत ते तुमच्या संपत्तीचे भागीदार व तुमच्या समान व्हावेत, मग हे कसे असू शकते की अल्लाहचे दास, मग ते फरिश्ते असोत, पैगंबर असोत, औलिया असोत, किंवा दगड मातीचे बनविलेले देवता असोत, ते अल्लाहचे सहभागी व्हावेत, वस्तूतः तेही अल्लाहचे दास आहेत आणि त्याची निर्मिती आहे. यास्तव ज्याप्रमाणे पहिली गोष्ट अशक्य तर दुसरीही अशक्य. म्हणून अल्लाहसोबत दुसऱ्यांची उपासना करणे आणि त्यांनाही कष्टनिवारक व संकटविमोचक समजणे नितांत चुकीचे आहे.

**३१.** (लोकांनो!) अल्लाहकडे आकर्षित होऊन त्याचे भय बाळगत राहा आणि नमाज कायम राखा आणि अनेक ईश्वरांची भक्ती करणाऱ्यांपैकी होऊ नका.

**३२.** त्या लोकांपैकी ज्यांनी आपल्या दीन (धर्मा) ला क्षत-विक्षत करून टाकले आणि स्वतःही समूहा-समूहात विभाजित झाले. प्रत्येक समूह आपल्याजवळ जे आहे, त्यातच मग्न आहे.

**३३.** आणि लोकांना जेव्हा एखादे दुःख पोहचते, तेव्हा आपल्या पालनकर्त्याकडे रुजू होऊन दुआ- प्रार्थना करू लागतात आणि जेव्हा तो आपल्यातर्फे दया-कृपेची गोडी चाखवितो, तेव्हा त्यांच्यातला एक गट आपल्या पालनकर्त्यासोबत दुसऱ्याला त्याचा सहभागी ठरवू लागतो.

**३४.** यासाठी की, जे काही आम्ही त्यांना प्रदान केले आहे कृतघ्नता दाखवावी. ठीक आहे. तुम्ही लाभ उचलून घ्या. फार लवकर तुम्हाला माहीत पडेल.

**३५.** काय आम्ही यांच्यावर एखादी सनद अवतरित केली आहे, जी त्यास निवेदिते, ज्यास हे अल्लाहसोबत सहभागी ठरवीत आहेत.

**३६.** आणि जेव्हा आम्ही लोकांना रहमत (दया-कृपे)ची गोडी चाखिवतो तेव्हा ते खूप आनंदित होतात आणि जर त्यांना आपल्या हातांच्या दुष्कर्मामुळे एखादे दुःख पोहचते, तेव्हा अचानक ते निराश होतात.

**३७.** काय त्यांनी हे नाही पाहिले की अल्लाह ज्याला इच्छितो भरपूर आजिविका (रोजी) देतो आणि ज्याला इच्छितो कमी. यातही त्या लोकांकरिता निशाण्या आहेत, जे ईमान राखतात.

**३८.** यास्तव जवळच्या नातेवाईकाला, गरीबाला, प्रवाशाला, प्रत्येकाला त्याचा हक्क द्या. हे त्यांच्यासाठी अधिक चांगले आहे जे अल्लाहच्या मुखाचे दर्शन घेऊ इच्छितात. असेच लोक मुक्ती प्राप्त करणारे आहेत.

**३९.** आणि तुम्ही जे काही व्याजाने देता की लोकांचे धन वाढत राहावे ते अल्लाहच्या येथे वाढत नाही आणि जे काही (सदका-दान आणि) जकात (कर्तव्य दान) तुम्ही अल्लाहचे मुख पाहण्या (मर्जी संपादण्या) करिता द्याल तर असेच लोक आपले (धन) वाढविणारे आहेत.

**४०.** अल्लाह तो आहे, ज्याने तुम्हाला निर्माण केले, मग आजिविका प्रदान केली, मग मृत्यु देईल, पुन्हा दुसऱ्यांदा जिवंत करील. आता सांगा, तुम्ही ठरविलेल्या (अल्लाहच्या) सहभागींपैकी एक तरी असा आहे जो या गोष्टींपैकी काहीतरी करू शकत असेल. अल्लाहकरिता पवित्रता आणि श्रेष्ठता आहे अशा त्या प्रत्येक सहभागीपेक्षा, ज्याला हे लोक मनाने रचून घेतात.

**४१.** खुष्की आणि पाण्यात लोकांच्या दुष्कर्मांमुळे उत्पात (फसाद) पसरला, यासाठी की त्यांना, त्यांच्या काही दुष्कर्मांचे फळ अल्लाहने चाखवावे. (फार) संभव आहे की त्यांनी (दुष्कर्म करणे) थांबवावे.

**४२.** तुम्ही सांगा, जरा जमिनीवर हिंडून फिरून पाहा तरी की पूर्वी होऊन गेलेल्या लोकांचा शेवट कसा झाला, ज्यांच्यात अधिकांश लोक अनेक ईश्वरांची पूजा करणारे होते.

**४३.** तेव्हा तुम्ही तुमचे तोंड त्या सरळ आणि सच्चा दीन (धर्मा) कडेच राखा, याआधी की तो दिवस यावा, ज्याचे परतणे अल्लाहतर्फे नाहीच. त्या दिवशी सर्व वेगवेगळे होतील.

**४४.** (सत्याचा) इन्कार करणाऱ्यांवर त्यांचा इन्कार ओढवेल, आणि सत्कर्म करणारे आपल्याच विश्रामगृहाला सुंदर बनवित आहेत.

**४५.** यासाठी की अल्लाहने आपल्या कृपेने त्यांना फल प्रदान करावे. ज्याने ईमान राखले आणि सत्कर्म करीत राहिला तो काफिरांना दोस्त राखत नाही.

**४६.** आणि त्याच्या निशाण्यांपैकी शुभ समाचार देणाऱ्या वाऱ्यांना चालविणेही आहे, यासाठी की तुम्हाला आपल्या दया-कृपेची गोडी चाखवावी, आणि यासाठी की त्याच्या आदेशाने नौका चालवाव्यात आणि यासाठी की त्याच्या कृपेचा तुम्ही शोध घ्यावा, आणि यासाठी की तुम्ही कृतज्ञता व्यक्त करावी.

**४७.** आणि आम्ही तुमच्या पूर्वीही (आपल्या) पैगंबरांना त्यांच्या जनसमूहांकडे पाठविले, ते त्यांच्याजवळ प्रमाण (पुरावे) घेऊन आले, मग आम्ही तुमच्या अपराधांचा सूड (प्रतिशोध) घेतला. ईमान राखणाऱ्यांना मदत करणे आमच्यावर अनिवार्य आहे.

**४८.** तो अल्लाहच होय जो वारे वाहवितो, ते ढगांना उचलतात, मग अल्लाह आपल्या मर्जीने त्यांना आकाशात पसरवितो आणि त्यांचे तुकडे तुकडे करतो, मग तुम्ही पाहता की त्यांच्यातून (पाण्याचे) थेंब बाहेर पडतात आणि ज्यांना अल्लाह इच्छितो, त्या दासांवर तो पर्जन्यवृष्टी करतो तेव्हा ते खूप आनंदित होतात.

**४९.** आणि विश्वास करा की पाऊस त्यांच्यावर पडण्यापूर्वी ते निराश होत होते.

**५०.** तेव्हा तुम्ही अल्लाहच्या कृपा-चिन्हांना पाहा की जमिनीच्या मृत्युनंतर कशा प्रकारे अल्लाह तिला (पुन्हा) जिवंत करतो. निःसंशय, तोच मेलेल्यांना (पुनश्च) जिवंत करणारा आहे आणि तो प्रत्येक गोष्ट करण्यास समर्थ आहे.

**५१.** आणि जर आम्ही वेगवान वारा वाहवू आणि हे लोक आपल्या शेतीला (कोमेजलेली) पिवळी पडलेली पाहतील तर मग त्यानंतर ते कृतघ्नता दाखवू लागतील.

**५२.** निःसंशय, तुम्ही मृतांना ऐकवू शकत नाही आणि ना बहिऱ्यांना (आपली) पुकार ऐकवू शकता, जेव्हा ते पाठ फिरवून वळले असतील.

**५३.** आणि ना तुम्ही आंधळ्यांना त्यांच्या मार्गभ्रष्टतेतून काढून मार्गदर्शन करणारे आहात. तुम्ही तर केवळ अशाच लोकांना ऐकवू शकता जे आमच्या आयतींवर ईमान राखतात आणि ते आज्ञाधारकही आहेत.

**५४.** अल्लाह तो आहे, ज्याने तुम्हाला कमजोर अवस्थेत निर्माण केले, मग त्या दुर्बलतेनंतर शक्ती-सामर्थ्य प्रदान केले, मग त्या शक्तीनंतर कमजोरी आणि म्हातारपण दिले. तो जे इच्छितो निर्माण करतो, तो सर्वांना चांगल्या प्रकारे जाणतो आणि सर्वांवर पूर्ण सामर्थ्य राखतो.

**५५.** आणि ज्या दिवशी कयामत येईल, अपराधी लोक शपथपूर्वक सांगतील की (जगात) एक क्षणाशिवाय जास्त राहिलो नाहीत. अशाच प्रकारे बहकलेलेच राहिले.

**५६.** आणि ज्या लोकांना ज्ञान आणि ईमान प्रदान केले गेले, ते उत्तर देतील की, तुम्ही तर जसे की अल्लाहच्या ग्रंथात आहे, कयामतच्या दिवसापर्यंत राहिलात. आजचा हा दिवस कयामतचाच दिवस आहे. परंतु तुम्ही तर विश्वासच ठेवत नव्हते.

**५७.** तेव्हा त्या दिवशी अत्याचारी लोकांना त्यांचे प्रमाण-पुरावे काहीच उपयोगी

पडणार नाहीत आणि ना त्यांच्याकडून क्षमा-याचनेची मागणी केली जाईल, ना कर्म मागितले जाईल.

**५८.** आणि निःसंशय, आम्ही या कुरआनात लोकांसमोर सर्व उदाहरणे प्रस्तुत केली आहेत. तुम्ही त्यांच्याजवळ कोणतीही निशाणी आणाल तरी ते हेच म्हणतील की तुम्ही खोटे आहात.

**५९.** अल्लाह, त्या लोकांच्या हृदयांवर, जे समज बाळगत नाहीत, अशाच प्रकारे मोहर (सील) लावतो.

**६०.** यास्तव तुम्ही धीर-संयम राखा. निःसंशय, अल्लाहचा वायदा सच्चा आहे. तुम्हाला त्या लोकांनी हलके (अधीर) जाणू नये, जे विश्वास बाळगत नाहीत.

---

# सूरह लुकमान - ३१

सूरह लुकमान मक्का येथे अवतरली. यात चवतीस आयती आणि चार रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** अलिफ. लाम. मीम

**२.** या दिव्य ज्ञानयुक्त ग्रंथाच्या आयती आहेत.

**३.** जो अल्लाहचे भय राखणाऱ्यांकरिता मार्गदर्शन आणि (सर्वथा) दया-कृपा आहे.

**४.** जे लोक नेहमी वक्तशीरपणे नमाज पढतात आणि जकात (धर्मदान) देतात, आणि आखिरतवर (पूर्ण) विश्वास ठेवतात.

**५.** हेच ते लोक होत, जे आपल्या पालनकर्त्यातर्फे मार्गदर्शनावर आहेत आणि हेच लोक मुक्ती प्राप्त करणारे आहेत.

**६.** आणि काही लोक असेही आहेत जे निरर्थक, वाह्यात गोष्टी विकत घेतात की अज्ञानतेसह लोकांना अल्लाहच्या मार्गापासून दूर करावे आणि त्याला थट्टा-मस्करी बनवावे. हेच ते लोक होत, ज्यांच्यासाठी अपमानित करणारा अज़ाब (शिक्षा-यातना)

आहे.

**७.** आणि जेव्हा त्याच्यासमोर आमच्या आयती वाचून ऐकविल्या जातात तेव्हा घमेंडीने अशा प्रकारे तोंड फिरवितो की जणू त्याने ऐकलेच नाही, जणू काही त्याच्या दोन्ही कानात बधिरता आहे. तुम्ही त्याला दुःखदायक अज़ाब (शिक्षा-यातने) ची खबर द्या.

**८.** निःसंशय, ज्या लोकांनी ईमान स्वीकारले व जे सत्कर्म करीत राहिले त्याच्याकरिता सुखांनी युक्त अशी जन्नत आहे.

**९.** जिथे ते सदैव काळ राहतील, अल्लाहचा सच्चा वायदा आहे. तो मोठा प्रभुत्वशाली आणि पूर्णतः बुद्धिकौशल्य (हिकमत) बाळगणारा आहे.

**१०.** त्यानेच आकाशांना खांबांविना बनविले आहे. तुम्ही त्यांना पाहता आणि त्याने जमिनीवर पहाड रोवले, यासाठी की तिने तुम्हाला कंपित करू न शकावे आणि प्रत्येक प्रकारचे सजीव जमिनीत पसरविले आणि त्याने आकाशातून पाऊस पाडून प्रत्येक प्रकारच्या सुंदर जोड्या उगविल्या.

**११.** ही आहे अल्लाहची सृष्टी (मखलूक), आता तुम्ही मला याच्याखेरीज दुसऱ्या कोणाची सृष्टी तर दाखवा (काही नाही) हे अत्याचारी लोक उघड मार्गभ्रष्टतेत आहेत.

**१२.** आणि आम्ही निःसंशय लुकमानला बुद्धिकौशल्य प्रदान केले[१] की तुम्ही अल्लाहशी कृतज्ञशील राहा. प्रत्येक कृतज्ञशील मनुष्य आपल्याच फायद्याकरिता कृतज्ञता व्यक्त करतो, जो कोणी कृतघ्नता दर्शवील तर त्याने जाणून घ्यावे की अल्लाह निःस्पृह, प्रशंसनीय आहे.

**१३.** आणि जेव्हा लुकमान उपदेश करताना आपल्या पुत्रास म्हणाले, हे माझ्या प्रिय

---

(१) हजरत लुकमान अल्लाहचे सदाचारी दास होते. अल्लाहने त्यांना बुद्धी, हिकमत आणि धार्मिक बाबींमध्ये उच्च स्थान प्रदान केले होते. त्यांना एकाने विचारले, तुम्हाला हे ज्ञान ही बुद्धी कशी प्राप्त झाली, ते म्हणाले, सरळ मार्गावर राहिल्याने, ईमानदारी अंगीकारल्याने आणि व्यर्थ गोष्टींपासून अलिप्त राहिल्याने, गप्प राहिल्याने. ते गुलाम होते. त्यांचा मालक म्हणाला, बकरी कापून त्याचे सर्वांत चांगले दोन हिस्से आणा. शेवटी ते जीभ आणि हृदय घेऊन आले. दुसऱ्या एका प्रसंगी मालक म्हणाला, बकरी कापून तिचे सर्वांत वाईट दोन हिस्से आणा. त्यांनी पुन्हा जीभ आणि हृदय काढून आणले. यावर विचारले असता त्यांनी सांगितले की जीभ आणि हृदय जर ठीक असेल तर ते सर्वांत चांगले आहेत आणि ते बिघडले तर त्यांच्यापेक्षा वाईट काहीच नाही. (इब्ने कसीर)

पुत्रा! अल्लाहसोबत दुसऱ्या कोणाला सहभागी ठरवू नकोस. निःसंशय, अल्ला चा सहभागी ठरविणे फार मोठा अत्याचार आहे.

**१४.** आम्ही माणसाला माता-पित्याविषयी शिकवण दिली आहे. त्याच्या मातेने यातनांवर यातना सहन करून त्याला गर्भात ठेवले आणि त्याचे दूध सोडविण्यात दोन वर्षे लागली. तेव्हा तू माझे आणि आपल्या माता-पित्याचे आभार मान. शेवटी माझ्याचकडे परतून यायचे आहे.

**१५.** आणि जर ते दोघे (माता-पिता) तुझ्यावर या गोष्टीचा दबाव टाकतील की तू माझ्यासोबत (दुसऱ्याला) सहभागी ठरव, ज्याचे तुला ज्ञान नसावे, तेव्हा तू त्यांचे आज्ञापालन करू नकोस, परंतु या जगात त्यांच्याशी भलेपणाचा व्यवहार कर आणि त्याच्या मार्गावर चालत राहा, जो माझ्याकडे झुकलेला असेल. तुम्हा सर्वांचे परतणे माझ्याचकडे आहे. तुम्ही जे काही करता त्यासंबंधी मी त्या वेळी तुम्हाला माहीत करेन.

**१६.** प्रिय पुत्रा! जर एखादी वस्तू राईच्या दाण्याइतकी असेल, मग तोही एखाद्या दगडाखाली असेल किंवा आकाशांमध्ये असेल किंवा जमिनीत असेल, तर तिला अल्लाह अवश्य आणील. अल्लाह अतिशय सूक्ष्मदर्श आणि जाणणारा आहे.

**१७.** हे माझ्या प्रिय पुत्रा! तू नमाज कायम राख, सत्कर्मांचा आदेश दे आणि दुष्कर्मांपासून रोखत जा, आणि जर तुझ्यावर संकट आले तर धीर-संयम राख (विश्वास ठेव) ही सर्व ताकीदी कामांपैकी आहेत.

**१८.** आणि लोकांसमोर आपले गाल फुगवू नका आणि जमिनीवर ताठपणाने घमेंड दाखवत चालू नका. कोणत्याही गर्विष्ठ , घमेंडी माणसाला अल्लाह पसंत करीत नाही.

**१९.** आणि आपल्या चालण्यात मध्यमता राखा, आणि आपला आवाज (स्वर) सौम्य राख, निःसंशय, गाढवाचा आवाज अतिशय वाईट आवाज आहे.

**२०.** काय तुम्ही नाही पाहत की अल्लाहने जमीन आणि आकाशाच्या प्रत्येक वस्तूला आमच्या सेवेस लावून ठेवले आहे आणि आपल्या उघड आणि लपलेल्या देण्या तुमच्यावर पूर्ण केल्या आहेत, आणि काही लोक अल्लाहविषयी कसल्याही ज्ञानाविना, मार्गदर्शनाविना आणि दिव्य ग्रंथाविना वाद घालतात.

**२१.** आणि जेव्हा त्यांना सांगितले जाते की अल्लाहने अवतरित केलेल्या वहयी

(प्रकाशना) चे अनुसरण करा, तेव्हा म्हणतात की आम्ही तर ज्या मार्गावर आपल्या वाडवडिलांना पाहिले आहे, त्याच मार्गाचे अनुसरण करू. मग सैतान त्यांच्या वाडवडिलांना जहन्नमच्या शिक्षा-यातनेकडे बोलवित असला तरी!

**२२.** आणि जो मनुष्य आपल्या चेहऱ्याला (स्वतःला) अल्लाहच्या हवाली करील आणि ती नेक सदाचारीही असेल तर निश्चितच त्याने मजबूत आधार धरला. समस्त कर्मांची परिणीती अल्लाहकडे आहे.

**२३.** आणि काफिरांच्या कुफ्र (इन्कारा) ने तुम्ही दुःखी होऊ नका. शेवटी त्या सर्वांना आमच्याचकडे परतून यायचे आहे. त्या वेळी आम्ही त्यांना दाखवू जे काही ते करीत राहिले. निःसंशय, अल्लाह हृदयातील रहस्यभेदांनाही जाणतो.

**२४.** आम्ही त्यांना काहीसा फायदा असाच पोहचवित राहू, परंतु शेवटी आम्ही त्यांना अतिशय लाचारीच्या अवस्थेत सक्त शिक्षा-यातनेकडे हाकत नेऊ.

**२५.** आणि जर तुम्ही त्यांना विचाराल की आकाश आणि जमिनीचा निर्माण करणारा कोण आहे? तर हे अवश्य उत्तर देतील, अल्लाह! तेव्हा त्यांना सांगा की सर्व प्रशंसेस योग्य अल्लाहच आहे. परंतु त्यांच्यापैकी बहुतेक लोक जाणत नाहीत.

**२६.** आकाशांमध्ये आणि धरतीत जे काही आहे ते सर्व अल्लाहचेच आहे निःसंशय, अल्लाह मोठा निःस्पृह आणि स्तुती-प्रशंसेस पात्र आहे.

**२७.** आणि साऱ्या धरतीवरील वृक्षांच्या जर लेखण्या होतील आणि सारे समुद्र शाई बनतील आणि त्यांच्यानंतर सात समुद्र दुसरे असतील तरीही अल्लाहची प्रशंसा संपू शकत नाही. निःसंशय, अल्लाह मोठा वर्चस्वशाली आणि हिकमत (बुद्धिकुशलता) बाळगणारा आहे.

**२८.** तुम्ही सर्वांना निर्माण करणे आणि मेल्यानंतर पुन्हा जिवंत करणे असेच आहे जसे एका जीवाला. निःसंशय, अल्लाह ऐकणारा, पाहणारा आहे.

**२९.** किंवा तुम्ही नाही पाहत की अल्लाह रात्रीला, दिवसात आणि दिवसाला रात्रीत दाखल करतो. सूर्य आणि चंद्राला त्यानेच आज्ञाधारक बनवून ठेवले आहे की प्रत्येक निर्धारित वेळेपर्यंत चालत राहावा तुम्ही जे काही कर्म करता, अल्लाह ते प्रत्येक कर्म जाणतो.

**३०.** हे सर्व (व्यवस्था) या कारणास्तव आहे की अल्लाह सत्य आहे, आणि त्याच्याखेरीज ज्यांना लोक (उपास्य समजून) पुकारतात, सर्व खोटे (मिथ्या) आहेत, आणि निःसंशय अल्लाह अतिउच्च आणि मोठा महान आहे.

**३१.** काय तुम्ही या गोष्टीवर विचार नाही करीत की पाण्यात नौका अल्लाहच्या कृपा-देणगीने चालत आहेत, यासाठी की त्याने तुम्हाला आपल्या निशाण्या दाखवाव्यात. निश्चितच यात प्रत्येक सबुरी राखणाऱ्या आणि कृतज्ञशील असणाऱ्याकरिता अनेक निशाण्या आहेत.

**३२.** आणि जेव्हा त्यांच्यावर लाटा, त्या सावल्यांप्रमाणे आच्छादित होतात तेव्हा ते (मोठा) विश्वास बाळगून अल्लाहलाच पुकारतात, आणि जेव्हा अल्लाह त्यांना त्यातून सोडवून खुष्कीकडे पोहचवितो, तेव्हा त्यांच्यापैकी काही संतुलित राहतात, आणि आमच्या आयतींचा इन्कार केवळ तेच लोक करतात, जे वचन भंग करणारे आणि कृतघ्न असतील.

**३३.** लोकांनो! आपल्या पालनकर्त्याचे भय राखा आणि त्या दिवसाचे भय ठेवा, ज्या दिवशी पिता आपल्या पुत्राला कसलाही लाभ पोहचवू शकणार नाही आणि ना पुत्र आपल्या पित्यास किंचितही लाभ पोहचविणारा असेल. लक्षात ठेवा! अल्लाहचा वायदा सच्चा आहे. पाहा! तुम्हाला ऐहिक जीवनाने धोक्यात टाकू नये आणि ना धोकेबाज (सैताना) ने तुम्हाला धोक्यात टाकावे.

**३४.** निःसंशय, अल्लाहच्याच जवळ कयामतचे ज्ञान आहे. तोच पर्जन्यवृष्टी करतो, आणि मातेच्या गर्भात जे काही आहे ते जाणतो. कोणीही जाणत नाही की उद्या काय कमवील? ना कोणाला हे माहीत आहे की तो कोणत्या भूमीवर मरण पावेल.[१] लक्षात ठेवा, अल्लाहच संपूर्ण ज्ञान बाळगणारा आणि सत्य जाणणारा आहे.

---

(१) हदीसमधील उल्लेखानुसार पाच गोष्टी अपरोक्षा (गैब) च्या चाव्या आहेत. ज्यांना अल्लाहखेरीज कोणी जाणत नाही (सहीह बुखारी, तफसीर सूरह लुकमान आणि किताबुल इस्तिस्का)

१) कयामत जवळ असल्याची निशाणी तर पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांनी सांगितली आहे. परंतु कयामत येण्याचे निश्चित ज्ञान, अल्लाहशिवाय कोणालाही नाही, ना फरिश्त्याला, ना एखाद्या पैगंबराला.

# सूरह सजदा - ३२

सूरह सजदा* मक्का येथे अवतरली आणि यात तीस आयती व तीन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** अलिफ. लाम. मीम

**२.** निःसंशय, हा ग्रंथ सर्व विश्वांच्या पालनकर्त्यातर्फे अवतरित झाला आहे.

---

२) पावसाची बाबही अशीच आहे. निशाणी व संकेताद्वारे अनुमान तर लावले जाऊ शकते, परंतु ही गोष्ट प्रत्येकाच्या अनुभवात व अवलोकनात आहे की हे अनमान कधी खरे ठरते तर कधी चुकीचे. येथपावेतो की हवामान खात्याची घोषणाही खरी ठरत नाही. तात्पर्य पावसाचेही निश्चित ज्ञान अल्लाहखेरीज कोणालाही नाही.

३) मातेच्या गर्भात, यंत्राद्वारे लिंग परीक्षणाचे अर्धवट अनुमान बहुधा शक्य आहे, परंतु गर्भातले बाळ भाग्यशाली आहे की कमनशिबी आहे, पूर्ण आहे की अपूर्ण सुंदर आहे की कुरुप, काळे आहे की गोरे इ. गोष्टींचेही ज्ञान फक्त अल्लाहला आहे.

४) मनुष्य उद्या काय करील? ते धार्मिक कार्य असेल की ऐहिक? कोणालाही उद्याविषयीचे ज्ञान नाही की उद्याचा दिवस त्याच्या आयुष्यात उजाडेल किंवा नाही? आणि आलाच तर तो उद्या काय काम करील?

५) मृत्यु कोठे होईल घरात की घराबाहेर, आपल्या देशात की परदेशात, तारुण्यात मृत्यु येईल की म्हातारपणी, आपली मनोकांक्षा पूर्ण झाल्यानंतर की त्यापूर्वीच? कोणाला कसलेही ज्ञान नाही.

* सूरह अलिफ लाम मीम अस्सजदा हदीसमधील उल्लेखानुसार पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम शुक्रवारच्या दिवशी प्रातःकालीन (फज्र) नमाजमध्ये अलिफ-लाम-मीम अस्सजदा (आणि दुसऱ्या रकअतमध्ये) सूरह दहरचे पठण करीत असत. (सहीह बुखारी आणि मुस्लिम किताबुल जुमा) त्याचप्रमाणे हेदेखील योग्य प्रमाणाद्वारे सिद्ध आहे की पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम झोपण्यापूर्वी सूरह अलिफ-लाम-मीम अस्सजदा आणि सूरह मुल्कचे पठण करीत असत. (तिर्मिजी नं. ८१२ आणि मुसनद अहमद ३४०/३)

**३.** काय हे असे म्हणतात की याने हा ग्रंथ मनाने रचून घेतला आहे?[१] मुळीच नाही. किंबहुना हा तुमच्या पालनकर्त्यातर्फे सत्य आहे, यासाठी की तुम्ही त्यांना भय दाखवावे, ज्यांच्याजवळ तुमच्यापूर्वी कोणी भय दाखविणारा आला नाही. संभवतः ते सत्य मार्गावर यावेत.

**४.** अल्लाह तो आहे, ज्याने आकाशांना आणि धरतीला आणि जे काही त्यांच्या दरम्यान आहे, सर्व काही सहा दिवसांत निर्माण केले, मग अर्श (ईशसिंहासना) वर उच्च झाला. तुमच्याकरिता, त्याच्याखेरीज कोणीही मदत करणारा, शिफारस करणारा नाही, मग काय तरीही तुम्ही बोध ग्रहण करीत नाही?

**५.** तो आकाशापासून धरतीपर्यंत कार्य-व्यवस्था करतो, मग (ते कार्य) एका अशा दिवसात त्याच्या दिशेने वर चढते, ज्याचे अनुमान तुमच्या हिशोबाच्या एक हजार वर्षांइतके आहे.

**६.** तोच विद्यमान आणि अपरोक्षाचा जाणणारा आहे, जबरदस्त वर्चस्वशाली, मोठा मेहेरबान.

**७.** त्याने जी वस्तु देखील बनविली खूप सुंदर बनविली आणि मानवाची निर्मिती मातीपासून सुरू केली.

**८.** मग त्याचा वंश एका तुच्छ पाण्याच्या सार तत्त्वाने बनविला.

**९.** ज्याला यथायोग्य करून, त्यात आपला प्राण (रुह) फुंकला, आणि त्यानेच तुमचे कान, डोळे आणि हृदय बनविले (तरीदेखील) तुम्ही फारच कमी कृतज्ञता दाखविता.

**१०.** आणि ते म्हणाले की काय आम्ही जेव्हा जमिनीत मिसळून हरवले जाऊ, काय मग पुन्हा नव्या जीवनात येऊ? खरी गोष्ट अशी की या लोकांना आपल्या पालनकर्त्याच्या भेटीचा विश्वासच नाही.

**११.** त्यांना सांगा, तुम्हाला मृत्युचा फरिश्ता मरण देईल जो तुमच्यावर तैनात केला

(१) हे खडसावून सांगण्याच्या पद्धतीने आहे की काय समस्त विश्वांच्या पालनकर्त्यातर्फे अवतरित केल्या गेलेल्या या महत्त्वपूर्ण ग्रंथाविषयी असे म्हणतात की यास स्वतः (मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) यांनी रचले आहे.

गेला आहे, मग तुम्ही सर्व आपल्या पालनकर्त्याकडे परतविले जाल.

**१२.** आणि जर तुम्ही यांना (त्या वेळच्या अवस्थेत) पाहिले असते, जेव्हा दुराचारी लोक आपल्या पालनकर्त्यासमोर नतमस्तक असतील, म्हणतील की हे आमच्या पालनकर्त्या! आम्ही पाहिले आणि ऐकले, आता तू आम्हाला परत पाठवशील तर आम्ही सत्कर्म करू. आम्ही ईमान राखणारे आहोत.

**१३.** आणि आम्ही इच्छिले असते तर प्रत्येक माणसाला मार्गदर्शन प्रदान केले असते, परंतु माझी ही गोष्ट पूर्णतः खरी ठरली आहे की मी अवश्य जहन्नमला माणसांनी व जिन्नांनी भरून टाकीन.

**१४.** आता तुम्ही आपल्या त्या दिवसाच्या भेटीला विसरण्याची गोडी चाखा. आम्हीही तुम्हाला विसरलो, आपण केलेल्या कर्मांच्या (दुष्परिणती) द्वारे निरंतर शिक्षा- यातनेची गोडी चाखा.

**१५.** आमच्या आयतींवर केवळ तेच लोक ईमान राखतात, ज्यांना जेव्हा जेव्हा शिकवण दिली जाते तेव्हा सजद्यात जातात (माथा टेकतात) आणि आपल्या पालनकर्त्याची प्रशंसेसह तस्बीह (गुणगान) करतात आणि गर्वापासून अलिप्त राहतात.

**१६.** त्यांची कूस आपल्या बिछान्यांपासून अलग राहते. आपल्या पालनकर्त्याला भय आणि आशेसह पुकारतात आणि जे काही आम्ही त्यांना देऊन ठेवले आहे त्यातून खर्च करतात.

**१७.** कोणताही जीव जाणत नाही, जे काही आम्ही त्यांच्या डोळ्यांची शितलता त्यांच्यासाठी लपवून ठेवली आहे. ते जे काही करीत होते, हा त्याचा मोबदला आहे.

**१८.** काय तो, जो ईमान राखणारा असेल, त्या माणसासारखा आहे, जो दुराचारी असेल? दोन्ही कदापि समान ठरू शकत नाही.

**१९.** ज्या लोकांनी ईमान स्वीकारले आणि जे सत्कर्म करीत राहिले, त्यांच्यासाठी सदैवकाळ असणारी जन्नत आहे, अतिथ्य आहे त्यांच्या कर्मांच्या मोबदल्यात जे ते करीत होते.

**२०.** तथापि ज्यांनी अवज्ञा केली तर त्यांचे ठिकाण जहन्नम आहे, जेव्हा जेव्हा ते त्यातून बाहेर पडू इच्छितील, पुन्हा त्यातच परतविले जातील आणि त्यांना सांगितले जाईल, आपल्या खोटे ठरविण्यापायी आगीची गोडी चाखा.

**२१.** आणि निःसंशय, आम्ही त्यांना निकटच्या काही लहान शिक्षा - यातना,[१] त्या मोठ्या अज़ाबच्या व्यतिरिक्त चाखवू यासाठी की त्यांनी रुजू व्हावे.

**२२.** आणि त्याहून अधिक अत्याचारी कोण आहे, ज्याला अल्लाहच्या आयतींद्वारे प्रवचन दिले जावे तरीही त्याने त्यापासून तोंड फिरवावे. निश्चितच आम्हीही दुराचाऱ्यांशी सूड (बदला) घेणार आहोत.

**२३.** आणि वस्तुतः आम्ही मूसाला ग्रंथ प्रदान केला तेव्हा तुम्ही त्याच्या प्राप्तीसंबंधी कधीही संशय करू नये आणि आम्ही त्यास इस्त्राईलच्या संततीच्या मार्गदर्शनाचे साधन बनविले.

**२४.** आणि आम्ही त्यांच्यापैकी ज्याअर्थी त्या लोकांनी सहनशीलता राखली असे नेते (प्रमुख) बनविले, जे आमच्या आदेशाने लोकांना मार्गदर्शन करीत होते आणि आमच्या आयतींवर विश्वास ठेवत होते.

**२५.** निःसंशय, तुमचा पालनकर्ता त्या सर्वांच्या दरम्यान या सर्व गोष्टींचा फैसला कयामतच्या दिवशी करेल, ज्या गोष्टींमध्ये ते मतभेद करीत आहेत.

**२६.** काय या गोष्टीनेही त्यांना मार्गदर्शन प्रदान केले नाही की आम्ही त्यांच्या पूर्वीच्या अनेक जमातींना नष्ट करून टाकले, ज्यांच्या वस्त्यांमध्ये हे चालत फिरत आहेत. निश्चितच त्यात मोठे बोध आहेत. काय तरीही हे ऐकत नाही?

**२७.** काय हे पाहत नाही की आम्ही पाण्याला पडीक (नापीक) जमिनीकडे वाहवून नेतो, मग त्याद्वारे आम्ही शेतींना उगवितो, ज्यास त्यांची गुरे-ढोरे आणि ते स्वतःही

---

(१) निकटच्या काही शिक्षा - यातनांशी अभिप्रेत ऐहिक यातना किंवा ऐहिक जीवनातील दुःख आणि रोग वगैरे होत. काहींच्या मते यास अभिप्रेत हत्या होय. ज्याद्वारे बद्रच्या युद्धात काफिर पीडित झाले किंवा तो दुष्काळ होय जो मक्काच्या रहिवाशांवर पडला होता. इमाम शौकानी म्हणतात, या सर्व अवस्था आणि परिस्थितीचा यात समावेश होऊ शकतो.]

खातात. काय तरीही यांना दिसून येत नाही?

**२८.** आणि म्हणतात, हा फैसला केव्हा होईल? जर तुम्ही सच्चे असाल तर सांगा.

**२९.** त्यांना उत्तर द्या की फैसल्याच्या दिवशी ईमान राखणे कुफ्र (इन्कार) करणाऱ्यांच्या काहीच उपयोगी पडणार नाही आणि ना त्यांना ढील (सवड) दिली जाईल.

**३०.** आता तुम्ही त्यांचा विचारही सोडून द्या आणि प्रतीक्षा करीत राहा. हे देखील प्रतीक्षा करीत आहेत.

---

## सूरह अहज़ाब - ३३

सूरह अहज़ाब मदीना येथे अवतरली. यात त्र्याहत्तर आयती आणि नऊ रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो, जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** हे पैगंबर! अल्लाहचे भय बाळगून राहा आणि काफिर आणि मुनाफिक (दांभिक ईमानधारक) लोकांचे म्हणणे मानू नका. अल्लाह मोठा ज्ञान बाळगणारा, मोठा बुद्धिकौशल्य बाळगणारा आहे.

**२.** आणि जे काही तुमच्याकडे, तुमच्या पालनकर्त्यातर्फे वहयी (प्रकाशना) केली जाते, तिचे अनुसरण करा (विश्वास करा), कारण अल्लाह तुमच्या प्रत्येक कर्माशी परिचित आहे.

**३.** आणि तुम्ही अल्लाहवरच भरवसा राखा, अल्लाह काम बनविण्याकरिता पुरेसा आहे.

**४.** कोणत्याही माणसाच्या छातीत अल्लाहने दोन हृदय ठेवली नाहीत. आणि आपल्या ज्या पत्न्यांना तुम्ही माता म्हणून संबोधून बसता, त्यांना अल्लाहने तुमच्या (खऱ्याखुऱ्या) माता बनविले नाही आणि ना तुमच्या दत्तक घेतलेल्या बालकांना (वस्तुतः) तुमचे पुत्र बनविले आहे. या तर तुमच्या तोंडच्या गोष्टी आहेत. अल्लाह सत्य गोष्टी सांगतो आणि तोच सरळ मार्ग दाखवितो.

**५.** दत्तक घेतलेल्या मुलांना त्यांच्या (खऱ्या) पित्यांच्या संबंधाने हाक मारा. अल्लाहजवळ पूर्ण न्याय हाच आहे. मग जर तुम्हाला त्यांचे (खरे) पिता माहीत नसतील तर ते तुमचे धर्म-बांधव आणि मित्र आहेत.[१] तुमच्याकडून भूलचूक म्हणून काही घडल्यास त्याबाबत तुमच्यावर कसलाही गुन्हा नाही, परंतु गुन्हा तो आहे, ज्याचा तुम्ही इरादा कराल आणि इरादा मनापासून कराल. अल्लाह मोठा माफ करणारा, दया करणारा आहे.

**६.** पैगंबर, ईमान राखणाऱ्यांवर स्वतः त्यांच्यापेक्षाही अधिक हक्क राखणारे आहेत आणि पैगंबराच्या पत्न्या ईमानधारकांच्या माता आहेत आणि नातेवाईक, अल्लाहच्या ग्रंथाच्या आधारावर इतर ईमानधारक आणि स्वदेशत्याग केलेल्यांच्या तुलनेत जास्त हक्कदार आहेत. (तथापि) तुम्हाला आपल्या मित्रांशी सद्व्यवहार करण्याची अनुमती आहे. हा आदेश 'सुरिक्षत ग्रंथा' (लौहे महफूज) मध्ये लिहिलेला आहे.

**७.** आणि जेव्हा आम्ही समस्त पैगंबरांकडून वचन घेतले (विशेषतः) तुमच्याकडून आणि नूहकडून आणि इब्राहीमकडून आणि मूसाकडून आणि मरियमचे पुत्र ईसाकडून आणि आम्ही त्या सर्वांकडून पक्के वचन घेतले होते.

**८.** यासाठी की अल्लाहने सच्चा लोकांना त्यांच्या सच्चेपणाविषयी विचारणा करावी आणि न मानणाऱ्यांकरिता आम्ही दुःखदायक अज़ाब (शिक्षा-यातना) तयार करून ठेवला आहे.

**९.** हे ईमान राखणाऱ्यांनो! अल्लाहने जो उपकार तुमच्यावर केला आहे, त्याचे स्मरण करा जेव्हा तुमचा सामना करण्याकरिता सैन्यांवर सैन्ये आली मग आम्ही त्यांच्यावर वेगवान वादळ आणि असे सैन्य पाठविले, जे तुम्ही पाहिलेच नाही आणि तुम्ही जे काही करता अल्लाह ते सर्व पाहतो.

---

(१) या आदेशान्वये ती प्रथा हराम (निषिद्ध) केली गेली जी अज्ञानकाळापासून चालत आली होती आणि इस्लामच्या आरंभकाळात प्रचलित होती की दत्तक घेतलेल्या मुलाला स्वतःचा पुत्र समजले जात नसे. पैगंबरांच्या निकटतम अनुयायीं (सहाबां) चे कथन आहे की आम्ही जैद बिन हारिसला, ज्यांना पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांनी दास्यमुक्त करून पुत्र बनविले होते. जैद बिन मुहम्मद या नावाने हाक मारीत. येथपावेतो की कुरआनाची ही आयत अवतरली.

**१०.** जेव्हा (शत्रू) तुमच्या वरच्या बाजूने आणि खालच्या बाजूने चालून आले आणि जेव्हा डोळे निश्चल झाले आणि काळीज तोंडाशी आले, आणि तुम्ही अल्लाहविषयी विभिन्न विचार करू लागले.

**११.** इथेच ईमान राखणाऱ्यांची कसोटी घेतली गेली आणि पूर्णतः ते हलवून सोडले गेले.

**१२.** आणि त्या वेळी दांभिक (मुनाफिक) आणि मनात रोग बाळगणारे म्हणू लागले की अल्लाह आणि त्याच्या पैगंबराने आमच्याशी केवळ धोक्याचेच वायदे केले होते.

**१३.** आणि त्यांच्याच एका गटाने पुकारुन म्हटले, हे यासरिबच्या लोकानो! तुमच्या थांबण्याचे हे स्थान नाही, परत निघा आणि त्यांचा एक दुसरा गट, पैगंबराजवळ ही अनुमती मागू लागला की आमची घरे खाली (उघडी) आणि असुरक्षित आहेत. वास्तविक ती (उघडी) असुरक्षित नव्हती, (परंतु) त्यांनी पळ काढण्याचा पक्का इरादा केला होता.

**१४.** आणि जर मदीनेच्या चोहीबाजूंनी त्यांच्यावर (सैन्ये) दाखल केली गेली असती, मग त्यांच्याशी उत्पात (फसाद) ची मागणी केली गेली असती, तर त्यांनी उत्पात अवश्य माजविला असता. आणि काही लढलेही असते पण थोडेसे.

**१५.** आणि याच्यापूर्वी तर त्यांनी अल्लाहशी वायदा केला होता की पाठ फिरविणार नाही आणि अल्लाहशी केल्या गेलेल्या वायद्याची विचारपूस निश्चितच होईल.

**१६.** त्यांना सांगा, जर तुम्ही मृत्युच्या किंवा हत्येच्या भयाने पळ काढाल तर हे पळ काढणे तुमच्या काहीच उपयोगी पडणार नाही आणि त्या वेळी तुम्ही फार कमी लाभान्वित केले जाल.

**१७.** त्यांना विचारा की जर अल्लाह तुम्हाला काही हानि पोहचवू इच्छिल किंवा तुमच्यावर एखादी दया कृपा करू इच्छिल तर असा कोण आहे जो तुम्हाला वाचवू शकेल (किंवा तुमच्यापासून रोखू शकेल) (अल्लाहच्या विरोधात) आपल्याकरिता, अल्लाहखेरीज त्यांना ना कोणी मित्र आढळून येईल ना कोणी सहाय्यक.

**१८.** अल्लाह तुमच्यापैकी त्यांना (चांगल्या प्रकारे) जाणतो, जे दुसऱ्यांना रोखतात आणि आपल्या बांधवांना सांगतात की आमच्याजवळ या आणि कधीतरी युद्धात सहभाग

घेतात.

**१९.** तुमची मदत करण्यात (पूर्णपणे) कंजूस आहेत, मग जेव्हा भय - दहशतीचा प्रसंग येतो तेव्हा तुम्ही त्यांना पाहाल की ते तुमच्याकडे दृष्टी केंद्रित करतात आणि त्यांचे डोळे अशा प्रकारे गरगरा फिरू लागतात, त्या माणसासारखे, ज्याच्यावर मृत्युची मुर्छा आलेली असावी, मग जेव्हा भीती नाहीशी होते, तेव्हा तुमच्याशी आपल्या तीक्ष्ण जीभेने मोठमोठ्या गोष्टी बोलू लागतात. धनाचे मोठे लोभी आहेत. या लोकांनी ईमान राखलेच नाही. अल्लाहने त्यांची सर्व कर्मे वाया घालविली आहेत आणि असे करणे अल्लाहकरिता फार सोपे आहे.

**२०.** हे लोक समजतात की सैन्ये अद्याप गेली नाहीत आणि जर सैन्ये परत आली तर हे अशी इच्छा बाळगतात की ते वनात राहणाऱ्यांमध्ये वनवासी लोकांसोबत असते तर बरे झाले असते यासाठी की तुमची खबर बात घेत राहिले असते. जर ते तुमच्यात हजर असते (तरीदेखील ?) उगाच बोलण्याचा मान राखण्यासाठी थोडेसे लढले असते.

**२१.** निःसंशय, तुमच्यासाठी अल्लाहच्या पैगंबरामध्ये उत्तम नमुना आहे[१] त्या प्रत्येक माणसाकरिता जो अल्लाहची आणि कयामतच्या दिवसाची आशा बाळगतो आणि अल्लाहचे अत्याधिक स्मरण करतो.

**२२.** आणि जेव्हा ईमानधारकांनी (काफिरांची) सैन्ये पाहिली, तेव्हा (अचानक)

---

(१) अर्थात समस्त मुस्लिमांकरिता अल्लाहचे पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्या ठायी उत्तम नमुना आहे. तेव्हा तुम्ही जिहादमध्ये आणि सहनशीलता व ईशभयात त्यांचे अनुसरण करा. आमचे पैगंबर जिहादप्रसंगी उपाशी राहिले. येथपावेतो की पोटावर दगड बांधावे लागले, त्यांचे तोंड जखमी झाले, त्यांचा दात तुटला. खंदक आपल्या हातांनी खणला व एक महिनापावेतो शत्रूच्या समोर अटळ राहिले. ही आयत अहजाब युद्धासंदर्भात अवतरली असली, तरी ज्या युद्धप्रसंगी प्रामुख्याने पैगंबरांचे चरित्र समोर ठेवण्याचा व त्यांचे अनुसरण करण्याचा आदेश दिला गेला आहे, तरीदेखील हा आदेश सर्वसामान्य आहे. अर्थात पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांची सर्व कथने, कर्मे प्रत्येक स्थितीत सर्व मुसलमानांकरिता अनुसरणीय आहेत, अनिवार्य आहेत. मग त्यांचा संबंध उपासनेशी असो किंवा सामाजिक, अर्थव्यवस्था किंवा राजकारणाशी असो. तात्पर्य जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रात, प्रत्येक वळणावर पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्या मार्गदर्शनाचे अनुसरण करणे अनिवार्य कर्तव्य आहे.

उद्‌गारले की याचाच वायदा आम्हाला अल्लाहने आणि त्याच्या पैगंबराने दिला होता आणि अल्लाह आणि त्याचे पैगंबर सच्चे आहेत आणि त्या (गोष्टी) ने त्यांच्या ईमानात आणि आज्ञापालनात आणखी जास्त वाढ केली.

**२३.** ईमान राखणाऱ्यांमध्ये (असे) लोकही आहेत, ज्यांनी अल्लाहशी जो वायदा केला होता तो खरा करून दाखविला.[१] काहींनी तर आपला वायदा पूर्ण केला आणि काही (संधीची) प्रतीक्षा करीत आहेत. आणि त्यांनी कसलाही बदल केला नाही.

**२४.** यासाठी की अल्लाहने सच्चा लोकांना त्यांच्या खरेपणाचा मोबदला प्रदान करावा आणि इच्छिल्यास मुनाफिक (दांभिक) लोकांना शिक्षा-यातना द्यावी किंवा त्यांचीही क्षमा- याचना कबूल करावी. अल्लाह मोठा क्षमाशील आणि मोठा दयावान आहे.

**२५.** आणि अल्लाहने काफिरांना क्रोधाने भारावलेल्या अवस्थेतच (असफल) परतविले, ज्यामुळे त्यांची कोणतीही इच्छा पूर्ण झाली नाही आणि त्या युद्धात अल्लाह स्वतःच ईमान राखणाऱ्यांसाठी पुरेसा ठरला. अल्लाह मोठा शक्तिशाली आणि वर्चस्वशाली आहे.

**२६.** आणि ज्या ग्रंथधारकांनी, त्यांच्याशी लागेबांधे जुळवून घेतले होते त्यांनाही अल्लाहने त्यांच्या किल्ल्यांमधून बाहेर काढले आणि त्यांच्या मनात असा धाक बसविला की तुम्ही एका समूहास ठार करीत राहिले आणि एका समूहाला कैदी बनवित राहिले.

**२७.** आणि त्याने तुम्हाला त्यांच्या जमिनीचे आणि त्याच्या घरांचे आणि धन-संपत्तीचे मालक बनविले आणि त्या जमिनीचेही जिच्यावर तुम्ही अद्याप पाऊलही ठेवले नाही. अल्लाह सर्व काही करण्याचे सामर्थ्य राखतो.

**२८.** हे पैगंबर! आपल्या पत्नींना सांगा की ऐहिक जीवनाची आणि ऐहिक शोभा सजावटीची इच्छा बाळगत असाल तर या मी तुम्हाला काही देऊन सवरून चांगल्या

---

(१) ही आयत त्या सहाबांविषयी अवतरली आहे, ज्यांनी याप्रसंगी आपल्या प्राणांचे बलिदान देण्याचे आश्चर्यजनक कारनामे दाखविले होते आणि त्यांच्यात ते सहबादेखील होते जे बद्रच्या लढाईत सामील होऊ शकले नव्हते, परंतु त्यांनी ही प्रतिज्ञा केली होती पुन्हा जर एखादी संधी लाभली तर जिहाद (धर्मयुद्धा) मध्ये भरपूर भाग घेतील. उदा. नज़र बिन अनस वगैरे जे शेवटी लढता लढता ओहदच्या युद्धात शहीद झाले. त्यांच्या शरीरावर तलवार, भाले आणि बाणांचे ऐंशीच्या वर घाव होते. शहादतनंतर त्यांच्या बहिणीने त्यांना, त्यांच्या बोटावरून ओळखले. (मुसनद अहमद, हिस्सा ४, पृ. १९३)

रितीने सोडून द्यावे.

**२९.** आणि जर तुमची इच्छा अल्लाह आणि त्याचा रसूल (पैगंबर) आणि आखिरतचे घर आहे तर (विश्वास ठेवा की) तुमच्यापैकी सत्कर्म करणारींकरिता अल्लाहने फार चांगला मोबदला तयार करून ठेवला आहे.

**३०.** हे पैगंबरांच्या पत्नींनो! तुमच्यापैकी जी (पत्नी) देखील उघडपणे निर्लज्जतेचे कृत्य करील तर तिला दुप्पट अज़ाब दिला जाईल. अल्लाहकरिता ही फार सोपी गोष्ट आहे.

**३१.** आणि तुमच्यापैकी जो कोणी अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचे आज्ञापालन करील आणि सत्कर्म करील तर आम्ही तिला दुप्पट मोबदला प्रदान करू आणि तिच्यासाठी आम्ही अति उत्तम आजिविका तयार करून ठेवली आहे.

**३२.** हे पैगंबरांच्या पत्नींनो! तुम्ही सर्वसाधारण स्त्रियांसारख्या नाहीत. जर तुम्ही अल्लाहचे भय राखणाऱ्या असाल तर कोमल स्वरात बोलत जाऊ नका की (ज्यामुळे) ज्याच्या मनात रोग असेल त्याने एखादा वाईट इरादा करावा, तथापि नियमाला अनुसरून बोलत राहा.

**३३.** आणि आपल्या घरांमध्ये स्थैर्यपूर्वक राहा, आणि पूर्वीच्या अज्ञानकाळाप्रमाणे आपल्या शृंगारा (सौंदर्या) चे प्रदर्शन करू नका आणि नमाज नियमितपणे अदा करीत राहा आणि जकात (धर्मदान) देत राहा, आणि अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या आदेशाचे पालन करा. अल्लाह हेच इच्छितो की हे पैगंबरांच्या पत्नींनो! तुमच्यापासून त्याने प्रत्येक (प्रकारची) अपवित्रता दूर करावी, आणि तुम्हाला खूप पवित्र करावे.

**३४.** आणि तुमच्या घरांमध्ये अल्लाहच्या ज्या आयती आणि पैगंबरांची वचने (हदीस) वाचली जातात, त्या स्मरणात असू द्या. निःसंशय अल्लाह मोठा सूक्ष्मदर्शी, माहितगार आहे.

**३५.** निःसंशय, मुस्लिम पुरुष आणि मुस्लिम स्त्रिया, ईमान राखणारे पुरुष आणि ईमान राखणाऱ्या स्त्रिया, आज्ञापालन करणारे पुरुष आणि आज्ञापालन करणाऱ्या स्त्रिया, सत्यवचनी पुरुष आणि सत्यवचनी स्त्रिया, सहनशीलता राखणारे पुरुष आणि सहनशीलता राखणाऱ्या स्त्रिया (अल्लाहला) विनंती करणारे पुरुष आणि विनंती करणाऱ्या स्त्रिया, दान (सदका) करणारे पुरुष आणि दान करणाऱ्या स्त्रिया, रोजा

(उपवास-व्रत) करणारे पुरुष आणि रोजा राखणाऱ्या स्त्रिया, आपल्या लज्जास्थाना (गुप्तांगा) चे रक्षण करणारे पुरुष आणि आपल्या लज्जास्थानाचे रक्षण करणाऱ्या स्त्रिया, अल्लाहचे अत्याधिक स्मरण करणारे पुरुष आणि अत्याधिक स्मरण करणाऱ्या स्त्रिया, या सर्वांसाठी अल्लाहने मोठी क्षमा आणि महान मोबदला तयार करून ठेवला आहे.

**३६.** आणि (लक्षात ठेवा) कोणत्याही ईमान राखणाऱ्या पुरुषाला आणि स्त्रीला, अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या फैसल्यानंतर आपल्या एखाद्या गोष्टीचा कसलाही अधिकार बाकी राहत नाही (लक्षात ठेवा) अल्लाह आणि त्याच्या पैगंबराची जो कोणी अवज्ञा करील, तो उघड मार्गभ्रष्टतेत जाऊन पडेल.

**३७.** आणि (स्मरण करा) जेव्हा तुम्ही त्या माणसाला सांगत होते , ज्यावर अल्लाहने अनुग्रह केला आणि तुम्ही देखील की आपल्या पत्नीला आपल्या जवळ ठेवा, आणि अल्लाहचे भय बाळगा आणि तुम्ही आपल्या मनात ही गोष्ट लपवून ठेवली होती जिला अल्लाह उघड करणार होता, आणि तुम्ही लोकांचे भय बाळगत होता, वास्तिवक अल्लाह या गोष्टीचा अधिक हक्क राखत होता की तुम्ही त्याचे भय बाळगावे, मग जेव्हा जैदने त्या स्त्रीकडून आपली गरज पूर्ण करून घेतली, तेव्हा तिला आम्ही तुमच्या विवाहात दिले. यासाठी की ईमान राखणाऱ्या लोकांना, त्यांच्या दत्तक पुत्रांच्या पत्नींबाबत कसल्याही प्रकारचा संकोच राहू नये, जेव्हा ते त्यांच्याकडून आपली गरज पूर्ण करून घेतील, अल्लाहचा हा आदेश कार्यान्वित होणारच होता.

**३८.** ज्या गोष्टी अल्लाहने आपल्या पैगंबराकरिता उचित (मान्य) केल्या आहेत, त्यांच्या बाबतीत पैगंबरावर काही हरकत नाही. अल्लाहचा हाच नियम त्यां (पैगंबरां) च्याबाबतही राहिला जे पूर्वी होऊन गेले आणि अल्लाहची कामे अनुमानाने निर्धारित केलेले असतात.

**३९.** ते सर्व असे होते की अल्लाहचे आदेश पोहचवित नसत आणि अल्लाहचेच भय बाळगत आणि अल्लाहखेरीज कोणाचेही भय बाळगत नस, आणि अल्लाह हिशोब घेण्यासाठी पुरेसा आहे.

**४०.** लोकांनो! तुमच्या पुरुषांपैकी मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) कोणाचेही पिता नाहीत, तथापि ते अल्लाहचे रसूल (पैगंबर) आहेत आणि समस्त पैगंबरांमध्ये

अंतिम पैगंबर आहेत,[१] आणि अल्लाह प्रत्येक गोष्ट चांगल्या प्रकारे जाणणारा आहे.

**४१.** हे ईमान राखणाऱ्यांनो! अल्लाहचे अत्याधिक स्मरण करा.

**४२.** आणि सकाळ संध्याकाळ त्याची पवित्रता वर्णन करीत राहा.

**४३.** तोच आहे, जो तुमच्यावर आपली दया - कृपा पाठवितो आणि त्याचे फरिश्ते (तुमच्यासाठी दया याचनेची प्रार्थना करतात) यासाठी की त्याने तुम्हाला अंधारातून काढून प्रकाशाकडे न्यावे, आणि अल्लाह ईमान राखणाऱ्यांवर मोठा दया करणारा आहे.

**४४.** ज्या दिवशी हे अल्लाहला भेटतील, त्यांचे स्वागत सलामद्वारे होईल, त्यांच्यासाठी अल्लाहने मान-सन्मानपूर्ण मोबदला तयार करून ठेवला आहे.

**४५.** हे पैगंबर! निःसंशय, आम्हीच तुम्हाला (रसूल) साक्षी, खूशखबर देणारा आणि खबरदार करणारा बनवून पाठविले आहे.

**४६.** आणि अल्लाहच्या आदेशाने त्याच्याकडे बोलविणारा आणि उज्ज्वल (प्रकाशमान) दीप बनवून.

**४७.** आणि तुम्ही ईमान राखणाऱ्या लोकांना ही शुभवार्ता ऐकवा की त्यांच्याकरिता अल्लाहकडून फार मोठा अनुग्रह आहे.

**४८.** आणि काफिरांचे व ढोंगी मुसलमानांचे म्हणणे मानू नका, आणि जे दुःख (त्यांच्याकडून) पोहोचेल त्याची चिंता करू नका. अल्लाहवर भरवसा राखा, अल्लाह काम बनविण्यासाठी पुरेसा आहे.

**४९.** हे ईमान राखणाऱ्यांनो! जेव्हा तुम्ही ईमान राखणाऱ्या स्त्रियांशी विवाह कराल, मग त्यांना हात लावण्यापूर्वी तलाक (घटस्फोट) द्याल, तर त्यांच्यावर तुमचा कसलाही

---

(१) 'खातम' अरबी भाषेत मोहर (मुद्रा) ला म्हणतात आणि मोहर शेवटच्या कार्यास म्हटले जाते. पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्यावर प्रेषितत्वाची समाप्ती झाली. त्यांच्यानंतर जो कोणी पैगंबर असण्याचा दावा करील तो खोटारडा आणि दज्जाल ठरेल. हदीस वचनांमध्ये याविषयी सविस्तर सांगितले गेले आहे आणि यावर समस्त मुस्लिम समुदाया (उम्मत) चे एकमत आहे. कयामत जवळ येऊन पोहचली असता हजरत ईसा धरतीवर येतील, जे उचित आणि निरंतर हदीसद्वारे साबित आहे. ते पैगंबर या नात्याने येणार नाहीत किंबहुना पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांचे अनुयायी बनून येतील. यास्तव त्यांचे आगमन प्रेषितत्वाच्या समाप्तीविरूद्ध नाही.

(अधिकार) इद्दत (तलाकनंतर निर्धारित वेळेपर्यंतची प्रतिबंधित मुदती) चा नाही, जिची तुम्ही गणना करावी.[१] तेव्हा तुम्ही त्यांना काही न काही द्या आणि भल्या रितीने त्यांना निरोप द्या.

**५०.** हे पैगंबर (स.)! आम्ही तुमच्यासाठी तुमच्या त्या पत्न्या हलाल (वैध) केल्या आहेत, ज्यांना तुम्ही त्यांचे महर (स्त्रीधन) देऊन टाकले आहे आणि त्या दासी देखील, ज्यांना अल्लाहने युद्धात तुम्हाला प्रदान केल्या आहेत आणि तुमच्या काकाच्या कन्या, आत्याच्या कन्या, तुमच्या मामाच्या कन्या आणि तुमच्या मावशीच्या कन्या देखील, ज्यांनी तुमच्यासोबत हिजरत (स्वदेशत्याग) केली आहे आणि ती ईमानधारक स्त्री जी स्वतःला पैगंबरांना दान करील, हे त्या स्थितीत की स्वतः जर पैगंबरही तिच्याशी विवाह करू इच्छितील. हे विशेषतः तुमच्यासाठीच आहे आणि इतर ईमानधारकांसाठी नाही. आम्ही त्याला चांगल्या प्रकारे जाणतो जे आम्ही त्यांच्यावर त्यांच्या पत्न्या आणि दासींविषयी (चे आदेश) निर्धारित केले आहेत. हे यासाठी की तुमच्यावर एखादी अडचण उद्‌भवू नये. अल्लाह मोठा माफ करणारा आणि मोठा दया करणारा आहे.

**५१.** त्यांच्यापैकी जिला तुम्ही इच्छित असाल दूर राखा आणि जिला इच्छित असाल आपल्या जवळ ठेवा आणि जर तुम्ही त्यांच्यापैकी एखादीला आपल्या जवळ बोलावून घ्याल, ज्यांना तुम्ही वेगळे करून ठेवले होते, तर यात तुम्हाला काही हरकत नाही. याद्वारे या गोष्टीची अधिक आशा बाळगली जाऊ शकते की या (स्त्रियां) चे नेत्र शितल राहावेत आणि त्या दुःखी न व्हाव्यात आणि तुम्ही जे काही त्यांना द्याल त्यावर त्या सर्व राजी खुशी राहतील. तुमच्या मनात जे काही आहे ते अल्लाह चांगल्या प्रकारे जाणतो. अल्लाह मोठा ज्ञान बाळगणारा सहनशील आहे.

**५२.** यानंतर इतर स्त्रिया तुमच्याकरिता हलाल (वैध) नाहीत आणि ना हे (उचित आहे) की त्यांना सोडून दुसऱ्या स्त्रियांशी (विवाह करावा) जरी त्यांचे रूप (सौंदर्य)

---

(१) विवाहनंतर ज्या स्त्रियांशी सहवास (समागम) केला गेला असेल आणि त्या अजून तरुण असतील, अशा स्त्रियांना तलाक दिला गेल्यास त्यांची 'इद्दत' तीन मासिक पाळी होय. (अल बकरा-२२८) इथे त्या स्त्रियांचा नियम सांगितला जात आहे, ज्यांचा विवाह तर झाला परंतु पती-पत्नीच्या दरम्यान समागम झाला नाही, त्यांना तलाक मिळाल्यास कसलीही इद्दत नाही. अर्थात अशी समागम न झालेली तलाक दिली गेलेली स्त्री इद्दत अवधी पार न पाडता त्वरित कुठे विवाह करू इच्छिल तर करू शकते. परंतु समागमपूर्वच पती मरण पावल्यास तिला चार महिने दहा दिवसांचा इद्दत अवधी पार पाडावा लागेल.

कितीही चांगले वाटत असेल. परंतु तुमच्या दासीखेरीज, अल्लाह प्रत्येक गोष्टीवर देखरेख करणारा आहे.

**५३.** हे ईमान राखणाऱ्या लोकांनो! जोपर्यंत तुम्हाला (आत येण्याची) अनुमती दिली जात नाही, तोपर्यंत तुम्ही पैगंबराच्या घरात प्रवेश करू नका. भोजनाकरिता अशा वेळी की भोजन तयार होण्याची प्रतीक्षा करीत राहावे, किंबहुना जेव्हा बोलाविले जाईल, तेव्हा जा आणि जेव्हा भोजन करू घ्याल तेव्हा निघण्याची तयारी करा. तिथेच (बसून) गप्पा गोष्टीत मग्न होऊ नका. पैगंबराना तुमच्या या कामाचा त्रास होतो, परंतु ते तुमचा आदर (संकोच) करतात, आणि अल्लाह सत्य गोष्ट सांगण्यात कोणाचीही पर्वा करीत नाही, आणि जेव्हा तुम्ही पैगंबराच्या पत्नींकडून एखादी वस्तू मागाल तर पडद्याआडून मागा. तुमच्या आणि त्यांच्या हृदयांकरिता पुर्ण पवित्रता हीच आहे. तुमच्यासाठी हे योग्य नव्हे की तुम्ही अल्लाहच्या पैगंबरास त्रास द्यावा आणि ना तुमच्यासाठी हे उचित आहे की पैगंबर (स.) यांच्यानंतर त्यांच्या पत्नींशी विवाह करावा (लक्षात ठेवा) अल्लाहजवळ हे महाभयंकर (पाप) आहे.

**५४.** तुम्ही एखादी गोष्ट जाहीर करा किंवा लपवून ठेवा, अल्लाह प्रत्येक गोष्टीचे चांगल्या प्रकारे ज्ञान राखणारा आहे.

**५५.** त्या स्त्रियांवर कसलाही गुन्हा नाही त्या आपल्या पित्यांच्या, आपल्या पुत्रांच्या आणि भावांच्या, आपल्या पुतण्यांच्या, भाच्यांच्या आणि आपल्या (परिचित) स्त्रियांच्या आणि ज्यांच्या त्या मालक आहेत त्यां (दास दासीं) च्या समोर असाव्यात.[१] स्त्रियांनो! अल्लाहचे भय बाळगत राहा, अल्लाह निःसंशय, प्रत्येक गोष्टीवर साक्षी आहे.

**५६.** अल्लाह आणि त्याचे फरिश्ते या पैगंबरावर दरुद पाठवितात. हे ईमान राखणाऱ्यांनो! तुम्ही (देखील) यांच्यावर दरुद पाठवा आणि जास्त सलाम (ही) पाठवत राहा.[२]

**५७.** जे लोक अल्लाह आणि त्याच्या पैगंबराला दुःख- त्रास देतात, त्यांच्यावर या

(१) जेव्हा स्त्रियांसाठी पडद्याचा आदेश अवतरला तेव्हा घरात उपस्थित जवळचे किंवा नेहमी ये-जा करणाऱ्या नातेवाईकांबाबत विचारले गेले की त्यांच्यासमोर पडदा केला जावा किंवा नाही? या आयतीत त्या नातेवाईकांचे वर्णन आहे, ज्यांच्यासमोर पडदा करण्याची गरज नाही. याचे सविस्तर वर्णन 'सूरह नूर'च्या आयत क्र. ३१ मध्ये दिले गेले आहे. तेही पाहावे.

(२) या आयतीत पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्या उच्च दर्जाविषयीचे वर्णन आहे. जो

जगात व आखिरतमध्ये अल्लाहतर्फे धिःक्कार आहे आणि त्यांच्यासाठी मोठा अपमानित करणारा अज़ाब (शिक्षा-यातना) आहे.

**५८.** आणि जे लोक ईमान राखणाऱ्या पुरुष व स्त्रियांना अशा एखाद्या अपराधाबद्दल दुःख - त्रास देतात, जो त्यांच्याकडून घडला नसेल तर ते फार मोठा आरोप आणि खुल्या अपराधाचे ओझे उचलतात.

**५९.** हे पैगंबर! आपल्या पत्नींना आणि आपल्या कन्यांना आणि ईमान राखणाऱ्यांच्या स्त्रियांना सांगा की त्यांनी आपल्या अंगावर आपल्या चादरी टाकून घेत जावे. अशाने त्या त्वरित ओळखल्या जातील, मग त्यांना त्रास पोहचविला जाणार नाही, आणि अल्लाह मोठा माफ करणारा आणि दया करणारा आहे.

**६०.** जर (अजूनही) हे मुनाफिक (ईमानधारक असल्याचे ढोंग करणारे) आणि ते, ज्यांच्या मनात रोग आहे आणि मदीनाचे ते रहिवाशी जे खोट्या अफवा उडवितात, थांबले नाहीत तर आम्ही तुम्हाला त्यांच्या (नाशा) वर लावून देऊ, मग तर ते काही दिवसच तुमच्यासोबत या (शहरा) त राहू शकतील.

**६१.** त्यांच्यावर धिःक्काराचा वर्षाव केला गेला, ज्या ज्या ठिकाणी सापडावेत, धरले जावेत आणि खूप तुकडे तुकडे केले जावेत.

**६२.** त्यांच्यापूर्वी होऊन गेलेल्या लोकांसाठीही अल्लाहचा हाच नियम लागू राहिला आणि तुम्हाला अल्लाहच्या विधी-नियमात केव्हाही बदल आढळणार नाही.

**६३.** लोक तुम्हाला कयामत (च्या वेळे) विषयी विचारतात. (तुम्ही) सांगा, याचे ज्ञान तर केवळ अल्लाहलाच आहे, तुम्हाला काय माहीत, फार संभव आहे की कयामत अगदी जवळ येऊन ठेपली असेल.

**६४.** अल्लाहने काफिरांचा धिःक्कार केलेला आहे आणि त्यांच्यासाठी धगधगणारी आग तयार करून ठेवली आहे.

---

आकाशांमध्ये त्यांना लाभला आहे आणि तो असा की अल्लाह फरिश्त्यांमध्ये पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांची स्तुती आणि महिमा वर्णन करतो आणि त्यांच्यावर शांती पाठवितो आणि फरिश्ते देखील पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्याकरिता उच्च स्थानाची दुआ- प्रार्थना करतात. तसेच अल्लाहने धरतीवर राहणाऱ्यांना आदेश दिला की त्यांनीही पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्यावर दरुद व सलाम पाठवावा. यासाठी की पैगंबरांची प्रशंसा आकाश व धरतीतही व्हावी.

**६५.** जिच्यात ते सदैवकाळ राहतील, त्यांना ना कोणी पाठीराखा मित्र लाभेल आणि ना कोणी मदत करणारा.

**६६.** त्या दिवशी त्यांचे चेहरे आगीत उलट पालट केले जातील (ते मोठ्या पश्चात्तापाने आणि दुःखाने) म्हणतील की आम्ही अल्लाहचे आणि पैगंबरांचे आज्ञापालन केले असते तर बरे झाले असते!

**६७.** आणि ते म्हणतील, हे आमच्या पालनकर्त्या! आम्ही आपल्या प्रमुखांचे आणि थोरा-मोठ्यांचे म्हणणे ऐकले (मानले) ज्यांनी आम्हाला सरळ मार्गापासून विचलित केले.

**६८.** हे आमच्या पालनकर्त्या! तू त्यांना दुप्पट अज़ाब (शिक्षा-यातना) दे आणि त्यांच्यावर फार मोठा धिःक्कार (लानत) पाठव.

**६९.** हे ईमान राखणाऱ्यांनो! त्या लोकांसारखे होऊ नका, ज्यांनी मूसाला क्लेश - यातना दिली, तर जी गोष्ट त्यांनी सांगितली होती अल्लाहने त्यांना त्या गोष्टीपासून मुक्त केले आणि अल्लाहजवळ मूसा प्रतिष्ठित होते.

**७०.** हे ईमान राखणाऱ्यांनो! अल्लाहचे भय राखा आणि सरळ सरळ (सत्य) गोष्टी बोलत जा.

**७१.** यासाठी की अल्लाहने तुमच्या आचरणात सुधारणा करावी आणि तुमचे अपराध माफ करावेत आणि जो मनुष्य देखील अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या आदेशाचे पालन करील, त्याने फार मोठी सफलता प्राप्त करून घेतली.

**७२.** आम्ही आपल्या अमानतीला आकाशांच्या आणि जमिनीच्या आणि पर्वतांच्या समोर सादर केले (परंतु) सर्वांनी ती उचलण्याबाबत इन्कार केला आणि तिच्यापासून भयभित झाले (तथापि) मानवाने तिला उचलून घेतले, निःसंशय तो मोठा अत्याचारी आणि अडाणी आहे.

**७३.** (हे अशासाठी) की अल्लाहने मुनाफिक पुरुष आणि मुनाफिक स्त्रिया आणि अनेकेश्वरवादी पुरुष आणि अनेकेश्वरवादी स्त्रियांना सजा द्यावी आणि ईमान राखणाऱ्या पुरुषांची आणि ईमान राखणाऱ्या स्त्रियांची तौबा (क्षमा-याचना) कबूल करावी, आणि अल्लाह मोठा माफ करणारा आणि दया करणारा आहे.

---

# सूरह सबा - ३४

सूरह सबा मक्का येथे अवतरली, यात चोपन्न आयती आणि सहा रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** समस्त प्रशंसा अल्लाहकरिताच आहे, जो आकाशांच्या आणि जमिनीच्या समस्त वस्तूंचा स्वामी आहे आणि आखिरतमध्येही प्रशंसा त्याच्याचकरिता आहे. तो (मोठा) हिकमतशाली आणि (पूर्णतः) जाणकार आहे.

**२.** जे काही जमिनीत दाखल होते आणि जे काही तिच्यातून निघते आणि जे आकाशातून अवतरित होते आणि जे चढून त्यात जाते, ते सर्व काही तो जाणतो, आणि तो मोठा दया करणारा, मोठा माफ करणारा आहे.

**३.** आणि काफिर म्हणतात की आमच्यावर कयामत स्थापित होणार नाही. तुम्ही सांगा, मला माझ्या पालनकर्त्याची शपथ! जो अपरोक्ष जाणणारा आहे की ती निश्चितच तुमच्यावर कायम होईल. अल्लाहपासून एका कणाइतकीही वस्तू लपलेली नाही, ना आकाशांमध्ये आणि ना धरतीत, किंबहुना त्याहूनही लहान आणि मोठी सर्व वस्तू (व गोष्टी) एका खुल्या (स्पष्ट) ग्रंथा विद्यमान आहेत.

**४.** यासाठी की त्याने (अल्लाहने) ईमान राखणाऱ्या आणि सदाचारी लोकांना चांगला मोबदला प्रदान करावा. हेच ते लोक होत, ज्यांच्याकरिता क्षमा, सन्मानपूर्ण आजिविका आहे.

**५.** आणि आमच्या आयतींचा अवमान करण्यात ज्यांनी प्रयत्न केला आहे, तर ते असे लोक आहेत, ज्यांच्यासाठी अतिशय वाईट प्रकारचा सक्त अज़ाब आहे.

**६.** आणि ज्यांना ज्ञान आहे ते पाहतील की जे काही तुमच्याकडे, तुमच्या पालनकर्त्यातर्फे अवतरित झाले आहे ते (परिपूर्ण) सत्य आहे आणि ते अल्लाहचा मार्ग दाखविते जो मोठा वर्चस्वशाली, प्रशंसनीय आहे.

**७.** आणि काफिर (इन्कारी लोक) म्हणाले, या, आम्ही तुम्हाला एक असा मनुष्य दाखवावा, जो तुम्हाला ही खबर पोहचवित आहे की जेव्हा तुम्ही पूर्णपणे कण कण (चूर चूर) होऊन जाल, तेव्हा तुम्ही पुन्हा एका नव्या जीवनात याल.

**८.** (आम्ही नाही सांगत) की स्वतः त्यानेच अल्लाहवर असत्य रचले आहे किंवा त्याला वेड लागले आहे, किंबहुना (खरी गोष्ट अशी) की आखिरतवर ईमान न राखणारेच शिक्षा-यातनेत आणि दूरच्या मार्गभ्रष्टतेत पडले आहेत.

**९.** तेव्हा काय ते आपल्या पुढे मागे आकाश व धरतीला पाहत नाहीत? जर आम्ही इच्छिले तर त्यांना जमिनीत धसवून टाकू किंवा त्यांच्यावर आकाशाचे तुकडे कोसळवू. निःसंशय यात फार मोठे प्रमाण आहे त्या प्रत्येक दासाकरिता, जो (मनापासून) रुजू करणारा असावा.

**१०.** आणि आम्ही दाऊदवर आपली कृपा केली. हे पर्वतांनो! त्यांच्यासोबत (तुम्हीही) माझी तस्बीह (गुणगान) करीत जा आणि पक्ष्यांना देखील (हाच आदेश आहे) आणि आम्ही त्यांच्याकरिता लोखंडास नरम केले.

**११.** (यासाठी) की तुम्ही पूरे पूरे कवच (चिलखते) बनवा आणि त्यांच्या कड्या ठीक ठीक अनुमानाने राखा आणि तुम्ही सर्व नेकीची कामे करा (विश्वास राखा) मी तुमचे (प्रत्येक) कर्म पाहत आहे.

**१२.** आणि आम्ही हवेला सुलेमानच्या अधीन केले की सकाळची मजल तिची एक महिन्याची राहात असे आणि संध्याकाळची मजल देखील आणि आम्ही त्यांच्यासाठी तांब्याचा झरा प्रवाहित केला आणि त्यांच्या पालनकर्त्याच्या आदेशाने काही जिन्न देखील, जे त्यांच्या ताब्यात राहून त्यांच्याजवळ काम करीत असत आणि त्यांच्यापैकी जो कोणी आमच्या आदेशाची अवज्ञा करीत असे, आम्ही त्याला भडकत्या आगीच्या अज़ाब (शिक्षे) ची गोडी चाखवित असू.

**१३.** सुलेमान जे काही इच्छित असत ते (जिन्नात) तयार करून देत, जसे किल्ला, चित्र (स्मारक), तलावासारख्या पराती आणि चुलींवर कायम टिकून राहणाऱ्या डेगा (मोठे मोठे पातेले) हे दाऊदच्या वंशजांनो! त्याच्याशी कृतज्ञता व्यक्त करण्याकरिता सत्कर्मे करा, माझ्या दासांपैकी कृतज्ञशील दास फार कमीच असतात.

**१४.** मग जेव्हा आम्ही त्यांच्यावर मृत्युचा आदेश पाठविला, तेव्हा ती खबर (जिन्नांना) कोणीही दिली नाही, वाळवीच्या किड्याखेरीज, जो त्यांची लाठी खात होता. तर जेव्हा (सुलेमान) खाली कोसळले, त्या क्षणी जिन्नांनी जाणून घेतले की जर ते अपरोक्ष ज्ञान

बाळगत असते तर या अपमानाच्या शिक्षेत पडून राहिले नसते.[१]

**१५.** सबाच्या जनसमूहाकरिता, त्यांच्या वस्तींमध्येच (अल्लाहच्या सामर्थ्याची) निशाणी होती. त्यांच्या उजव्या डाव्या बाजूला दोन बागा होत्या. (आम्ही त्यांना आदेश दिला होता की) आपल्या पालनकर्त्याने प्रदान केलेली आजिविका खा आणि त्याचे आभार मानत राहा. ही स्वच्छ - शुद्ध भूमी आहे आणि पालनकर्ता क्षमाशील आहे.

**१६.** परंतु त्यांनी तोंड फिरविले, मग आम्ही त्यांच्यावर वेगवान महापुराचे (पाणी) पाठविले आणि त्यांच्या (हिरव्या टवटवीत) बागांऐवजी दोन (अशा) बागा दिल्या, ज्या स्वादात कडवट आणि अधिकांश झाडे-झुडपे आणि काही बोरींची झाडे असलेल्या होत्या.

**१७.** आम्ही त्यांच्या कृतघ्नतेचा हा मोबदला त्यांना दिला. आम्ही (अशी सक्त) सजा मोठमोठ्या कृतघ्न लोकांनाच देतो.

**१८.** आणि आम्ही त्याच्या व त्या वस्तींच्या दरम्यान, ज्यांच्यात आम्ही सुख-समृद्धी प्रदान करून ठेवली होती. काही वस्त्या दुसऱ्या ठेवल्या होत्या, ज्या, मार्गावर दिसून येत होत्या आणि त्यांच्यात चालण्याची (प्रवासाची) ठिकाणे निश्चित केली होती, त्यात रात्री आणि दिवसा शांती सुरक्षापूर्वक हिंडत फिरत राहा.

**१९.** परंतु त्यांनी दुसऱ्यांदा दुआ (प्रार्थना) केली की हे आमच्या पालनकर्त्या! आमचे प्रवास दूर दूरपर्यंत कर आणि ज्याअर्थी त्यांनी स्वतः आपल्या हातांनी आपले वाईट करून घेतले, यास्तव आम्ही त्यांना (जुन्या) कहाणीच्या रूपात करून टाकले[२] आणि त्यांचे तुकडे तुकडे करुन टाकलेत[३] निःसंशय, प्रत्येक सहनशील आणि कृतज्ञशील माणसाकरिता या (घटने) त अनेक निशाण्या आहेत.

---

(१) हजरत सुलेमान यांच्या काळात जिन्नांविषयी ही धारणा प्रसिद्ध होती की ते अपरोक्षाचे ज्ञान बाळगतात. अल्लाहने हजरत सुलेमानच्या माध्यमाने या भ्रमाचे पितळ उघडकीस आणले.

(२) अर्थात त्यांना असे समूळ नष्ट केले की त्यांच्या विनाशाची कहाणी प्रत्येक जीभेवर बसली आणि ते सभा - बैठकीत चर्चेचा विषय बनले.

(३) अर्थात त्यांना विभाजित करून टाकले इतस्ततः विखरून टाकले जसे की सबाच्या प्रसिद्ध जमाती अनेक ठिकाणी जाऊन आबाद झाल्या. कोणी यसरिब आणि मक्का येथे आला, कोणी सीरिया प्रांतात निघून गेला, कोणी कोठे तर कोणी कोठे.

**२०.** आणि सैतानाने त्यांच्याविषयी आपला इरादा (अनुमान) खरा करून दाखविला, हे लोक (सर्वच्या सर्व) त्याचे अनुयायी बनले, ईमान राखणाऱ्यांच्या एका गटाखेरीज.

**२१.** आणि सैतानाचा त्यांच्यावर कोणताही दबाव (आणि जोर) नव्हता, परंतु अशासाठी की आम्ही त्या लोकांना, जे आखिरतवर ईमान राखतात, त्या लोकांमध्ये (चांगल्या प्रकारे) जाहीर करावे, जे त्याबाबत संशयग्रस्त आहेत, आणि तुमचा पालनकर्ता प्रत्येक गोष्टीचा संरक्षक आहे.

**२२.** सांगा की अल्लाहखेरीज ज्यांचा ज्यांचा तुम्हाला (उपास्य असण्याचा) भ्रम आहे (त्या सर्वांना) हाक द्या. त्यांच्यापैकी ना कोणाला आकाशांमध्ये आणि धरतीत कणाइतकाही अधिकार आहे, ना त्यांचा या दोघांत कसलाही हिस्सा आहे आणि ना त्यांच्यापैकी कोणी अल्लाहचा सहभागी आहे.

**२३.** आणि शिफारस (ची दुआ - प्रार्थना) ही त्याच्यासमोर काही लाभ देत नाही, त्यांच्याखेरीज, ज्यांच्यासाठी अनुमानित असावी. येथेपर्यंत की, जेव्हा त्यांच्या हृदयातून भय-दहशत दूर केली जाते, तेव्हा ते विचारतात, तुमच्या पालनकर्त्याने काय सांगितले? उत्तर देतात की खरे सांगितले आणि तो मोठा उच्चतम आणि मोठा महान आहे.

**२४.** त्यांना विचारा की तुम्हाला आकाशामधून आणि जमिनीतून आजिविका कोण पोहचवितो? (स्वतः) उत्तर द्या की (महान) अल्लाह! (ऐका) आम्ही अथवा तुम्ही, एक तर निश्चितपणे मार्गदर्शनावर आहे किंवा उघड मार्गभ्रष्टतेत आहे.

**२५.** सांगा की आम्ही केलेल्या अपराधांबाबत तुम्हाला काही विचारले जाणार नाही आणि ना तुमच्या कर्मासंबंधी आम्हाला विचारले जाईल.

**२६.** (त्यांना) खबरदार करा की आम्हा सर्वांना आमचा पालनकर्ता एकत्र करून मग आमच्या दरम्यान सत्यासह फैसला करील आणि तो फैसला करणारा, सर्व काही जाणणारा आहे.

**२७.** सांगा की बरे मलाही त्यांना दाखवा, ज्यांना तुम्ही अल्लाहचा सहभागी बनवून त्याच्यासोबत सामील करीत आहात. असे कदापि नाही, किंबहुना तोच अल्लाह आहे, जबरदस्त व हिकमतशाली.

**२८.** आणि आम्ही तुम्हाला सर्व लोकांकरिता शुभ समाचार ऐकविणारा आणि खबरदार करणारा बनवून पाठविले आहे, परंतु (खरी गोष्ट अशी की) अधिकांश लोक जाणत नाहीत.

**२९.** आणि विचारतात की तो वायदा केव्हा पूर्ण होईल? सच्चे असाल तर सांगा.

**३०.** उत्तर द्या, वायद्याचा दिवस अगदी निश्चित आहे, ज्यापासून एक क्षण ना तुम्ही मागे हटू शकता, आणि ना पुढे जाऊ शकता.

**३१.** आणि काफिर (इन्कारी लोक) म्हणाले, आम्ही तर या कुरआनास मानणारे नाहीत, ना याच्या पूर्वीच्या ग्रंथांना आणि जर तुम्ही पाहिले असते, जेव्हा हे अत्याचारी आपल्या पालनकर्त्यासमोर उभे, एकमेकांवर दोषारोप ठेवत असतील. खालच्या दर्जाचे लोक, उच्च दर्जाच्या लोकांना म्हणतील, जर तुम्ही राहिले नसते तर (खात्रीने) आम्ही ईमान राखणारे असतो.

**३२.** हे उच्च दर्जाचे लोक त्या दुर्बल लोकांना उत्तर देतील की, काय तुमच्याजवळ मार्गदर्शन येऊन पोहोचल्यानंतर आम्ही तुम्हाला त्यापासून रोखले होते (नाही), उलट तुम्ही (स्वतः) अत्याचारी होते.

**३३.** (आणि याला उत्तर देताना) हे दुर्बल लोक त्या घमेंडी लोकांना सांगतील (मुळीच नाही) किंबहुना रात्रंदिवस लबाडीने आम्हाला, अल्लाहसोबत कुफ्र करण्यास आणि त्याच्यासोबत सहभागी ठरविण्यास तुमचा आदेश देणे, आमच्या बेईमानीचे कारण ठरले आणि अज़ाबला (शिक्षा-यातनेला) पाहताच सर्वच्या सर्व मनातल्या मनात लज्जित होत असतील आणि काफिरांच्या गळ्यात आम्ही तौक (जोखड) टाकू, त्यांना केवळ त्यांच्या कृतकर्मांचा मोबदला दिला जाईल.

**३४.** आणि आम्ही ज्या ज्या वस्तीत एखादा खबरदार करणारा पाठविला, तेव्हा तिथल्या सुखसंपन्न अवस्थेच्या लोकांनी हेच म्हटले की ज्या गोष्टीसह तुम्ही पाठविले गेले आहात, आम्ही त्याचा इन्कार करणारे आहोत.

**३५.** आणि म्हणाले की आम्ही धन-संपत्ती आणि संतती अधिक बाळगतो आणि

आम्हाला अज़ाब (शिक्षा - यातना) दिलीच जाणार नाही.

**३६.** सांगा की माझा पालनकर्ता, ज्याच्यासाठी इच्छितो रोजी (आजिविका) व्यापक करतो, आणि ज्याच्यासाठी इच्छितो तंग (संकुचित) करतो, परंतु बहुतेक लोक हे जाणत नाहीत.

**३७.** आणि तुमची धन-संपत्ती आणि संतती अशी गोष्ट नव्हे की तुम्हाला आमच्याजवळ (दर्जांनी) निकट करील, परंतु ज्यांनी ईमान राखले आणि जे सत्कर्म करीत राहिले तर त्यांच्यासाठी त्यांच्या सत्कर्मांचा दुप्पट मोबदला आहे आणि ते निर्भय आणि समाधानी होऊन उंच महालांमध्ये राहतील.

**३८.** आणि जे लोक आमच्या आयतींना अवमानित करण्याच्या धावपळीत मग्न राहतात तर अशाच लोकांना अज़ाब (शिक्षा-यातना) ग्रस्त करून हजर केले जाईल.

**३९.** सांगा की माझा पालनकर्ता आपल्या दासांपैकी ज्याच्यासाठी इच्छितो रोजी (आजिविका) व्यापक करतो, आणि ज्याच्यासाठी इच्छितो तंग (मोजून मापून) देतो आणि तुम्ही जे काही अल्लाहच्या मार्गात खर्च कराल, अल्लाह त्याचा (पुरेपूर) मोबदला प्रदान करील. तो तर सर्वांत उत्तम रोजी (आजिविका) प्रदान करणारा आहे.

**४०.** आणि त्या सर्वांना अल्लाह त्या दिवशी एकत्र करून फरिश्त्यांना विचारेल, काय हे लोक तुमची उपासना करीत होते?

**४१.** ते म्हणतील, तू पवित्र आहेस, आणि आमचा मित्र - संरक्षक तर तू आहेस, हे लोक नव्हेत. हे तर जिन्नांची उपासना करत होते. यांच्यापैकी बहुतेकांचे त्यांच्यावरच ईमान होते.

**४२.** तेव्हा आज तुमच्यापैकी कोणीही, कोणाच्याहीकरिता (कशाही प्रकारे) लाभ - हानी (पोहचविण्या) चा मालक नसेल आणि आम्ही अत्याचारींना सांगू की त्या आगीची गोडी चाखा, जिला तुम्ही खोटे ठरवित राहिले.

**४३.** आणि जेव्हा त्यांच्यासमोर आमच्या स्पष्ट आयती वाचून ऐकविल्या जातात, तेव्हा म्हणतात की हा असा मनुष्य आहे, जो तुम्हाला, तुमच्या वाडवडिलांच्या उपास्य दैवतांपासून रोखू इच्छितो (याखेरीज आणखी काही नाही) आणि असे म्हणतात की हा तर मनाने रचलेला आरोप आहे, आणि सत्य त्यांच्याजवळ येऊन पोहोचले तरीही

इन्कार करणारे हेच म्हणत राहिले की ही तर उघड जादू आहे!

**४४.** आणि या (मक्काच्या रहिवाशां) ना, आम्ही ना ग्रंथ प्रदान करून ठेवले आहेत, ज्यांना हे वाचत असावेत आणि ना त्यांच्याजवळ तुमच्यापूर्वी कोणी खबरदार करणारा आला.

**४५.** आणि यांच्यापूर्वीच्या लोकांनीही आमच्या गोष्टींना खोटे ठरविले होते. आणि त्यांना आम्ही जे देऊन ठेवले होते, त्याच्या दहाव्या हिश्श्यापर्यंतही हे पोहचले नाहीत. तेव्हा, त्यांनी माझ्या पैगंबरांना खोटे ठरविले, (मग पाहा) माझ्या शिक्षा यातनेची किती (कठोर) अवस्था झाली.[१]

**४६.** सांगा की मी तुम्हाला केवळ एकाच गोष्टीचा उपदेश करतो की तुम्ही अल्लाहकरिता (प्रामाणिकपणे, हट्ट सोडून) दोन दोन मिळून किंवा एकट्या एकट्याने उभे राहून विचार तर करा. तुमच्या या साथीदाराला काही वेड वगैरे लागले नाही. तो तर तुम्हाला एका मोठ्या (सक्त) शिक्षा - यातनेच्या येण्यापूर्वी सावध करणारा आहे.

**४७.** सांगा की जो मोबदला मी तुमच्याकडून मागेन, तो तुमच्याकरिता आहे. माझा मोबदला देण्याची जबाबदारी अल्लाहवर आहे, आणि तो प्रत्येक गोष्टीस साक्षी आहे.

**४८.** सांगा, माझा पालनकर्ता सत्य (वहयी) अवतरित करतो. तो प्रत्येक लपलेली गोष्ट (गैब) जाणणारा आहे.

**४९.** सांगा, सत्य येऊन पोहोचले. असत्याने ना पहिल्यांदा डोके वर काढले आणि ना दुसऱ्यांदा डोके वर काढू शकेल.

**५०.** सांगा की जर मी मार्गभ्रष्ट होईन तर माझ्या मार्गभ्रष्टतेचे (संकट) माझ्यावरच

---

(१) याद्वारे मक्केच्या अनेकेश्वरवाद्यांना खबरदार केले जात आहे की तुम्ही खोटे ठरविण्याचा व इन्कार करण्याचा जो मार्ग अंगीकारला आहे तो मोठा हानिकारक आहे. तुमच्या पूर्वीचे जनसमूह देखील याच मार्गावर चालून नाश पावले, वास्तविक ते जनसमूह धन-संपत्ती, शक्ती-सामर्थ्य आणि आयुष्य वगैरेत तुमच्यापेक्षा खूप जास्त होते. तुम्ही तर त्यांच्या दहाव्या हिश्शालाही पोहोचू शकत नाही तरीही ते अल्लाहच्या अज़ाबपासून वाचू शकले नाहीत. या संदर्भात 'सूरह अहकाफ'च्या आयत क्र. २६ मध्ये वर्णन केले गेले आहे.

आहे आणि जर मी सत्य मार्गावर आहे तर त्या वहयीमुळे जिला माझा पालनकर्ता माझ्यावर अवतरित करतो. तो मोठा ऐकणारा, अतिशय निकट आहे.

**५१.** आणि जर तुम्ही (ती वेळ) पाहाल जेव्हा हे काफिर घाबरलेल्या स्थितीत फिरतील, मग पळून निघून जाण्याची कोणतीही अवस्था (मार्ग) नसेल आणि जवळच्या ठिकाणाहून धरले जातील.

**५२.** आणि त्या वेळी म्हणतील की आम्ही या (कुरआना) वर इमान राखले आहे, परंतु एवढ्या दूरच्या (अपेक्षित वस्तू) कशी हाती येऊ शकते ?

**५३.** आणि याच्यापूर्वी तर त्यांनी याचा इन्कार केला होता आणि लांबूनच न पाहता अटकळीचे तीर चालवित राहिले.

**५४.** आणि त्यांच्या व त्यांच्या इच्छा आकांक्षांच्या दरम्यान आड पडदा टाकला गेला, ज्या प्रकारे यापूर्वीही यांच्यासारख्यांशी केले गेले ते देखील (यांच्याप्रमाणेच) शंका संशयात पडले होते.

---

# सूरह फातिर - ३५

सूरह फातिर मक्का येथे अवतरली, यात पंचेचाळीस आयती आणि पाच रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** त्या अल्लाकरिता समस्त स्तुती - प्रशंसा आहे, जो आकाशांना आणि धरतीला निर्माण करणारा आणि दोन दोन, तीन तीन आणि चार चार पंख बाळगणाऱ्या फरिश्त्यांना आपला संदेशवाहक बनविणारा आहे[१] सृष्टीनिर्मितीत जे इच्छितो वाढवितो. निःसंशय, अल्लाह प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्य बाळगणारा आहे.

---

(१) अभिप्रेत जिब्रील, मीकाईल, इस्राफील आणि इज्राईल हे फरिश्ते होत, ज्यांना अल्लाह पैगंबरांकडे किंवा अनेक महत्त्वपूर्ण कार्यासाठी संदेशवाहक बनवून पाठवितो. यांच्यापैकी कोणाचे दोन, कोणाचे तीन तर कोणाचे चार पंख आहेत, ज्याद्वारे ते धरतीवर येतात आणि धरतीवरून आकाशाकडे जातात.

**२.** अल्लाह जो दया - कृपा (द्वार) लोकांकरिता उघड करील तर त्यास कोणी बंद करणारा नाही आणि ज्याच्यासाठी बंद करील तर त्यानंतर त्यास कोणी सुरू करणारा (उघडणारा) नाही आणि तोच जबरदस्त हिकमतशाली आहे.

**३.** लोकांनो! तुमच्यावर अल्लाहने जे उपकार केले आहेत, त्यांचे स्मरण करा. काय अल्लाहखेरीज दुसराही कोणी निर्माता आहे, जो तुम्हाला आकाशातून आणि जमिनीपासून रोजी (आजिविका) देत असावा? त्याच्याखेरीज कोणीही उपास्य नाही, तेव्हा तुम्ही कोठे उलट जात आहात?

**४.** आणि जर ते तुम्हाला खोटे ठरवितात तर तुमच्या पूर्वीचे (सर्व) पैगंबरही खोटे ठरविले गेले आहेत आणि समस्त कार्ये अल्लाहच्याचकडे परतविले जातात.

**५.** हे लोकांनो! अल्लाहचा वायदा सच्चा आहे. ऐहिक जीवनाने तुम्हाला धोक्यात न टाकावे आणि ना दगाबाज (सैताना) ने तुम्हाला गफलतीत मग्न ठेवावे.

**६.** (लक्षात ठेवा) सैतान तुमचा शत्रू आहे, तुम्ही त्याला शत्रूच जाणा, तो तर आपल्या टोळीला केवळ अशासाठी बोलवितो की ते सर्व जहन्नममध्ये जाणारे व्हावेत.

**७.** जे लोक काफिर (इन्कारी) झाले, त्यांच्याकरिता सक्त अज़ाब आहे आणि ज्या लोकांनी ईमान राखले आणि सत्कर्म करीत राहिले त्यांच्यासाठी क्षमा आणि मोठा चांगला मोबदला आहे.

**८.** काय तो मनुष्य, ज्याच्याकरिता त्याची दुष्कर्मे सुशोभित केली गेली आहेत तर तो त्यां (कर्मा) ना चांगले समजतो (काय तो मार्गदर्शन प्राप्त करणाऱ्या माणसा समान आहे?) (निश्चितच) अल्लाह ज्याला इच्छितो, मार्गभ्रष्ट करतो, आणि ज्याला इच्छितो मार्ग दाखवितो. तेव्हा तुम्ही त्यांच्याबद्दल दुःखी कष्टी होऊन आपला जीव कष्ट यातनेत टाकू नये. हे लोक जे काही करीत आहेत निःसंशय, अल्लाह ते चांगल्या प्रकारे जाणतो.

**९.** आणि अल्लाहच वाऱ्यांना वाढवितो, जे ढगांना उंच नेतात, मग आम्ही त्या ढगांना कोरड्या जमिनीकडे नेतो आणि त्याद्वारे त्या जमिनीला तिच्या मृत्युनंतर (पुन्हा) जिवंत करतो. अशाच प्रकारे दुसऱ्यांदा जिवंत होऊन उठणेही आहे.

**१०.** जो मनुष्य मान-सन्मान प्राप्त करू इच्छित असेल, तर (त्याने जाणून घ्यावे की)

समस्त मान-प्रतिष्ठा अल्लाहकरिताच आहे. समस्त पवित्र वचने त्याच्याचकडे चढतात आणि सत्कर्म त्यांना उंचविते, आणि जे लोक दुष्कर्मांच्या कट कारस्थानात व्यस्त राहतात, त्यांच्यासाठी मोठा सक्त अज़ाब आहे आणि त्यांचे हे पाखंड नाश पावेल.

**११.** लोक हो! अल्लाहने तुम्हाल मातीपासून निर्माण केले, मग वीर्यापासून, मग तुम्हाला जोडी (जोडपे नर-नारी) बनविले. स्त्रियांचे गर्भ धारण करणे आणि बाळाचे जन्म घेणे, या सर्वांचे त्याला ज्ञान आहे, आणि कोणताही आयुष्यमान दीर्घायुष्य प्राप्त करीत नाही आणि ना कोणाचे आयुष्य घडते, परंतु हे सर्व एका ग्रंथात अस्तित्वात आहे. अल्लाकरिता ही गोष्ट फार सोपी आहे.

**१२.** आणि दोन समुद्र समान नाहीत. हा गोड आहे, तहान भागवितो, प्यायला चांगला आणि तो दुसरा खारट आहे, कडू. तुम्ही या दोघांपासून ताजे मांस खाता आणि ते दागिने काढता, ज्यांना तुम्ही अंगावर घालता आणि तुम्ही पाहता की मोठमोठ्या नावा, पाण्याला छेदणाऱ्या, त्या समुद्रात आहे, यासाठी की तुम्ही त्याच्या कृपेचा शोध घ्यावा आणि यासाठी की तुम्ही त्याचे आभार मानावेत.

**१३.** तो रात्रीला दिवसात आणि दिवसाला रात्रीत दाखल करतो आणि सूर्य व चंद्राला त्यानेच कामास लावले आहे. प्रत्येक एका निर्धारित अवधीपावेतो चालत आहे. हाच अल्लाह होय, तुम्हा सर्वांचा पालनकर्ता. त्याचीच राज्य सत्ता आहे, आणि ज्यांना तुम्ही त्याच्याखेरीज पुकारत आहात, ते तर खजुरीच्या **बी** सालपटाचेही मालक नाहीत.

**१४.** जर तुम्ही त्यांना पुकाराल तर ते तुमची पुकार ऐकणारच नाहीत. आणि जर (समजा) ऐकूनही घेतील तर कबूल करणार नाहीत. किंबहुना कयामतच्या दिवशी तुमच्या शिर्क (अनेकईश्वरउपासना ) चा साफ इन्कार करतील[१] आणि तुम्हाला कोणीही अल्लाहसारखा जाणकार (वास्तवपूर्ण) खबरी देणार नाही.

**१५.** लोक हो! तुम्ही अल्लाहचे भिकारी आहात आणि अल्लाहच निःस्पृह (गरज नसलेला) प्रशंसनीय आहे.

---

(१) या आयतीद्वारे हेही कळून येते की अल्लाहखेरीज ज्यांची भक्ती उपासना केली जाते, त्या सर्व पाषाणाच्या मूर्त्याच नसतील, किंबहुना समज राखणारे (फरिश्ते, जिन्न, सैतान आणि नेक लोक) देखील असतील तेव्हा तेही इन्कार करतील आणि हेही कळाले की त्यांना गरजपूर्तीकरिता पुकारणे शिर्क आहे.

**१६.** जर त्याने इच्छिले तर तुमचा सर्वनाश करून टाकील आणि एक नवी निर्मिती (सृष्टी) निर्माण करील.

**१७.** आणि ही गोष्ट अल्लाहकरिता काहीच कठीण नाही.

**१८.** आणि कोणीही ओझे उचलणारा, दुसऱ्याचे ओझे उचलणार नाही आणि जर कोणी जास्त वजनाचे ओझे बाळगणारा आपला भार उचलण्याकरिता दुसऱ्या कोणाला बोलविल तर तो त्यातून काहीच उचलू शकणार नाही, मग तो जवळचा नातेवाईक का असेना. तुम्ही केवळ अशांनाच सावध करू शकता, जे पाहिल्याविनाच आपल्या पालनकर्त्याचे भय बाळगतात आणि नमाज नियमितपणे पढतात आणि जो पाक (स्वच्छ - शुद्ध) होईल, तो आपल्याच फायद्यासाठी पाक होईल आणि (शेवटी) अल्लाहकडेच परतून जायचे आहे.

**१९.** आणि आंधळा व डोळस दोन्ही समान नाहीत.

**२०.** आणि ना अंधार आणि ना प्रकाश.

**२१.** आणि ना सावली आणि ना ऊन.

**२२.** आणि जीवित व मृत दोघे समान असू शकत नाही, आणि अल्लाह ज्याला इच्छितो ऐकवितो, आणि तुम्ही त्या लोकांना ऐकवू शकत नाही, जे कबरींमध्ये आहेत.

**२३.** तुम्ही तर फक्त खबरदार करणारे आहात.

**२४.** आम्हीच तुम्हाला सत्यासह खूशखबर ऐकविणारा आणि भय दाखविणारा बनवून पाठविले आहे आणि कोणताही जनसमुदाय असा होऊन गेला नाही की ज्यात एखादा खबरदार करणारा आला नसावा.

**२५.** आणि जर हे लोक तुम्हाला खोटे ठरवतील तर त्यांच्यापूर्वी होऊन गेलेल्या लोकांनीही खोटे ठरविले होते, त्यांच्याजवळदेखील त्यांचे पैगंबर मोजिजे (ईशचमत्कार), सहीफे (पोथी) आणि स्पष्ट ग्रंथ घेऊन आले होते.

**२६.** मग मी त्या काफिरांना (सत्य-विरोधकांना) धरले, तर कशी होती माझी शिक्षा!

**२७.** काय तुम्ही या गोष्टीकडे लक्ष दिले नाही की अल्लाहने आकाशातून पाणी

अवतरित केले, मग आम्ही त्याच्याद्वारे अनेक रंगाची फळे निर्माण केली आणि पर्वतांचेही अनेक हिस्से आहेत सफेद आणि लाल की त्यांचे देखील अनेक रंग आहेत आणि गडद काळेही.

**२८.** आणि अशाच प्रकारे माणसांमध्ये, जनावरांमध्ये आणि चतुष्पाद प्राण्यांमध्येही काही असे आहेत ज्यांचे रंग वेगवेगळे आहेत. अल्लाहशी त्याचे तेच दास भय राखतात, जे ज्ञान बाळगतात. वास्तविक अल्लाह मोठा वर्चस्वशाली, माफ करणारा आहे.

**२९.** जे लोक अल्लाहच्या ग्रंथाचे पठण (तिलावत) करतात आणि नमाज नित्य नेमाने पढतात आणि जे काही आम्ही त्यांना प्रदान केले आहे त्यातून गुप्तपणे आणि उघडपणे खर्च करतात, ते अशा व्यापाराची आशा बाळगतात, जो कधीही तोट्यात राहणार नाही.

**३०.** यासाठी की त्यांना त्यांचा मोबदला पुरेपूर दिला जावा आणि त्यांना आपल्या कृपेने आणखी जास्त प्रदान करावे. निःसंशय, तो मोठा माफ करणारा, गुणग्राहक आहे.

**३१.** आणि हा ग्रंथ जो आम्ही तुमच्याकडे वहयी (प्रकाशना) द्वारे पाठविला आहे तो पूर्णतः सत्य आहे, जो आपल्या पूर्वीच्या ग्रंथांचीही पुष्टी करतो. निःसंशय, अल्लाह आपल्या दासांची पूर्ण माहिती ठेवणारा, चांगल्या प्रकारे पाहणारा आहे.

**३२.** मग (या) ग्रंथाचा उत्तराधिकारी आम्ही त्या लोकांना बनविले, ज्यांना आम्ही आपल्या दासांमधून निवडून घेतले. मग काही तर आपल्या प्राणांवर अत्याचार करणारे आहेत, आणि काही मध्यम दर्जाचे आहेत आणि त्यांच्यापैकी काही अल्लाहने दिलेल्या तौफिक (सुबुद्धी) ने सत्कर्मात पुढेच जात राहतात. हा फार मोठा अनुग्रह आहे.

**३३.** सदैव काळ राहण्याच्या त्या बागा आहेत, ज्यात हे लोक प्रवेश करतील, तिथे त्यांना सोन्याची कांकणे आणि मोती (अंगावर) घातली जातील आणि तिथे त्यांची वस्त्रे रेशमाची असतील.

**३४.** आणि म्हणतील की अल्लाहचे अनंत उपकार आहेत, ज्याने आमच्यापासून दुःख दूर केले. निःसंशय, आमचा पालनकर्ता मोठा माफ करणारा आणि कदर जाणणारा आहे.

**३५.** ज्याने आम्हाला आपल्या कृपेने सदैव काळ राहण्याच्या ठिकाणी उतरविले, जिथे ना आम्हाला काही कष्ट पोहोचेल आणि ना कसला थकवा जाणवेल.

**३६.** आणि जे लोक काफिर (इन्कारी) आहेत, त्यांच्यासाठी जहन्नमची आग आहे, ना तर त्यांना मृत्यु येईल की ते मरुन जावेत आणि ना जहन्नमची शिक्षाच कमी केली जाईल. आम्ही प्रत्येक काफिराला अशीच शिक्षा - यातना देतो.

**३७.** आणि ते लोक त्यात (जहन्नममध्ये) मोठमोठ्याने ओरडतील की हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला (यातून) बाहेर काढ आम्ही चांगले कर्म करू, त्या कर्मांखेरीज, जे आम्ही करीत होतो (अल्लाह फर्मावील) की काय आम्ही तुम्हाला एवढे आयुष्य दिले नव्हते की ज्याला समजून घ्यायचे असते, तो समजू शकत होता[१] आणि तुमच्याजवळ खबरदार करणाराही पोहचला होता,[२] तेव्हा आता गोडी चाखा (अशा) जुलमी अत्याचारी लोकांचा कोणीही सहाय्य करणारा नाही.

**३८.** निःसंशय, अल्लाह आकाशांच्या आणि जमिनीच्या लपलेल्या वस्तूंना जाणणारा आहे. निःसंशय, तो छातीतल्या (मनातल्या) गोष्टींनाही जाणणारा आहे.

**३९.** तोच असा आहे, ज्याने तुम्हाला धरतीवर बसविले, तेव्हा जो मनुष्य कुफ्र (इन्कार) करील तर त्याच्या कुफ्रचे ओझे त्याच्यावरच येईल आणि काफिर लोकांकरिता, त्यांचा इन्कार त्यांच्या पालनकर्त्याजवळ क्रोध वाढविण्याचेच कारण ठरतो आणि काफिरांसाठी त्यांचा इन्कार नुकसान वाढविण्याचीच सबब ठरतो.

**४०.** (तुम्ही) सांगा की तुम्ही आपल्या (ठरविलेल्या) सहभागी ईश्वरांची अवस्था तर सांगा, त्यांना तुम्ही अल्लाहखेरीज पुकारीत असता, अर्थात मला हे सांगा की त्यांनी धरतीचा कोणता (हिस्सा) बनविला आहे किंवा त्यांचा आकाशात काही सहभाग आहे

(१) यास अभिप्रेत केवढे आयुष्य आहे? भाष्यकारांनी वेगवेगळी आयुष्ये सांगितली आहेत. काहींनी काही हदीस वाचकांचा पुरावा देत म्हटले आहे की ६० वर्षांचे आयुष्य अभिप्रेत आहे. (इब्ने कसीर) परंतु आमच्या मते आयुष्य निश्चित करणे उचित नाही, कारण आयुष्य निश्चित करणे उचित नाही, कारण आयुष्य अनेक प्रकारचे असते. कोणी तरुण वयात कोणी प्रौढ़ वयात तर कोणी वृद्धावस्थेत मरण पावतो. मग हा काळही गेलेल्या क्षणासारखा कमी होत नाही, किंबहुना प्रत्येक अवधी विशेषतः दीर्घ असतो. उदा. तारुण्याचा काळ वयस्क होण्यापासून पौढहोईपर्यंत आणि पौढहोण्याचा काळ वृद्ध होईपर्यंत आणि वृद्धावस्थेचा काळ मृत्युपावेत असतो. कोणालाही विचार चिंतनासाठी, बोध प्राप्तीसाठी आणि प्रभावित होण्यासाठी काही वर्षे, एखाद्याला त्याहून जास्त तर कोणाला त्याहूनही अधिक समय लाभतो आणि सर्वांना हा प्रश्न विचारणे योग्य ठरेल की आम्ही तुला एवढे आयुष्य दिले मग तू सत्य समजून घेण्याचा आणि ते प्राप्त करण्याचा प्रयत्न का केला नाहीस?

(२) यास अभिप्रेत अंतिम पैगंबर मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम होत.

अथवा आम्ही त्यांना एखादा ग्रंथ दिला आहे की हे त्याच्या पुराव्यावर अटळ असावेत? नव्हे, किंबहुना हे अत्याचारी एकमेकांशी केवळ फसवणुकीच्या गोष्टींचे वायदे करीत असतात.

**४१.** निःसंशय, अल्लाहने आकाशांना आणि जमिनीला धरून ठेवले आहे की ते डगमगू नयेत आणि जर ते डगमगले तर मग अल्लाहखेरीज कोणी त्यांना धरूही शकत नाही. निःसंशय तो मोठा सहनशील, माफ करणारा आहे.

**४२.** आणि या काफिर लोकांनी मोठी दृढशपथ घेतली होती की जर त्यांच्याजवळ कोणी खबरदार करणारा आला तर ते प्रत्येक समुदाया (उम्मत) पेक्षा जास्त मार्गदर्शन प्राप्त करणारे बनतील, मग जेव्हा त्यांच्याजवळ एक पैगंबर येऊन पोहोचला तेव्हा त्यांच्या तिरस्कारातच प्रगति झाली.

**४३.** जगात स्वतःला मोठा समजल्यामुळे आणि त्यांच्या वाईट प्रयत्नांमुळे आणि वाईट प्रयत्न करणाऱ्यांची शिक्षा ते प्रयत्न करणाऱ्यांनाच भोगावी लागते तर काय हे त्याच व्यवहाराच्या प्रतीक्षेत आहेत, जो पूर्वीच्या लोकांशी केला जात राहिला? तेव्हा तुम्हाला अल्लाहच्या पद्धतीत कधीही बदल आढळणार नाही आणि तुम्हाला अल्लाहच्या नियमात कधी बदल होत असलेला आढळणार नाही.

**४४.** काय हे लोक धरतीवर हिंडले फिरले नाहीत की त्यांनी पाहिले असते की जे लोक यांच्यापूर्वी होऊन गेलेत, त्यांचा अंत कसा झाला. वास्तविक ते लोक यांच्यापेक्षा अधिक शक्तिशाली होते. आणि आकाशांमध्ये व धरतीवर अशी कोणतीही वस्तू नाही जी अल्लाहला लाचार करील. तो सर्व काही जाणणारा, मोठा सामर्थ्यशाली आहे.

**४५.** आणि जर अल्लाह, लोकांना त्यांच्या कर्मांमुळे त्वरित पकडीत घेऊ लागला असता तर संपूर्ण धरतीवर एक जीवदेखील सोडला नसता तथापि अल्लाह त्यांना एका निर्धारित समयापर्यंत सवड देत आहे, तर जेव्हा त्यांची ती वेळ येऊन पोहोचेल तेव्हा अल्लाह आपल्या दासांना स्वतः पाहून घेईल.

---

# सूरह यासीन - ३६

सूरह यासीन* मक्का येथे अवतरली, यात त्र्याऐंशी आयती आणि पाच रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** यासीन

**२.** शपथ आहे बुद्धी-कौशल्ययुक्त (आणि मजबूत) कुरआनाची.

**३.** की निश्चितच तुम्ही पैगंबरांपैकी आहात.

**४.** सरळ मार्गावर आहात.

**५.** (हा कुरआन, अल्लाह) जबरदस्त, मोठ्या दया करणाऱ्यातर्फे अवतरित केला गेला आहे.

**६.** यासाठी की तुम्ही अशा लोकांना खबरदार करावे, ज्यांच्या वाडवडिलांना खबरदार केले गेले नव्हते. यास्तव ते गफलतीत पडले आहेत.

**७.** त्यांच्यापैकी अधिकांश लोकांबाबत ही गोष्ट साबित झाली आहे. यास्तव हे लोक ईमान राखणार नाहीत.

**८.** आम्ही त्यांच्या मानांवर तौक (जोखंड) टाकले आहे, जे त्यांच्या हनुवटीपर्यंत आहे, ज्यामुळे त्यांची डोकी वर उठलेल्या स्थितीत आहेत.

**९.** आणि आम्ही एक आड त्यांच्यासमोर उभा केला आणि एक आड त्यांच्या मागे उभा केला, ज्याद्वारे आम्ही त्यांना झाकून टाकले, तेव्हा ते पाहू शकत नाही.

**१०.** आणि त्यांच्या संदर्भात तुमचे भय दाखविणे किंवा न दाखविणे दोन्ही सारखेच आहे. हे ईमान बाळगणार नाहीत.

---

* 'सूरह यासीन'च्या विशेषता व श्रेष्ठता संदर्भात अनेक कथने प्रसिद्ध आहेत. त्यापैकी उदा. ही सूरह कुरआनाचे हृदय आहे, हिला अशा व्यक्तीवर पढले जावे, जो मरणासन्न असावा वगैरे. परंतु सनद व प्रमाणच्या आधारावर कोणतेही कथन उचित नाही. काही पूर्णतः बनावटी आहेत तर काही प्रमाणदृष्ट्या कमकुवत आहेत. 'कुरआनचे हृदय' सांगणाऱ्या कथनाला हदीसचे विद्वान अलबानी यांनी बनावटी (रचलेली) म्हटले आहे. (अद् दईफा, हदीस क्रमांक १६९)

**११.** तुम्ही केवळ अशाच माणसाला भय दाखवू शकता, जो उपदेशाचे अनुसरण करील आणि रहमान (अल्लाह) चे न पाहता भय बाळगेल, तेव्हा तुम्ही अशा माणसाला क्षमा आणि उत्तम मोबदला दिला जाण्याची खूशखबर ऐकवा.

**१२.** निःसंशय, आम्ही मृतांना जिवंत करू आणि आम्ही लिहित असतो जे कर्म देखील लोक पुढे पाठवितात आणि त्यांची ती कर्मेही, जी ते मागे सोडून जातात आणि प्रत्येक गोष्टीस आम्ही एका स्पष्ट ग्रंथात संकलित करून ठेवले आहे.

**१३.** आणि तुम्ही त्यांच्यासमोर एक उदाहरण (अर्थात एका) वस्तीवाल्यांचा किस्सा (त्या काळचा) सादर करा, जेव्हा त्या वस्तीत अनेक रसूल आले.

**१४.** जेव्हा आम्ही त्यांच्याजवळ दोन रसूल पाठविलेत, तेव्हा त्या लोकांनी (प्रथम) त्या दोघांना समर्थन दिले, तेव्हा ते तिघे म्हणाले, आम्ही तुमच्याकडे (पैगंबर बनवून) पाठविलो गेलो आहोत.

**१५.** ते लोक म्हणाले, तुम्ही तर आमच्यासारखेच साधारण मनुष्य आहात आणि रहमान (दयावान) ने कोणतीही गोष्ट अवतरित केली नाही. तुम्ही केवळ खोटे बोलता.

**१६.** ते रसूल म्हणाले, आमचा पालनकर्ता जाणतो की आम्हाला तुमच्याकडे रसूल बनवून पाठविले गेले आहे.

**१७.** आणि आमचे कर्तव्य तर केवळ स्पष्टपणे पोहचविणे एवढेच आहे.

**१८.** ते म्हणाले की आम्ही तर तुम्हाला अभद्र समजतो आणि जर तुम्ही हे थांबविले नाही तर आम्ही तुम्हाला दगडांनी ठेचून तुमचे कामच तमाम करून टाकू आणि तुम्हाला आमच्यातर्फे सक्त शिक्षा मिळेल.

**१९.** ते पैगंबर म्हणाले की तुमची अभद्रता तर तुमच्या सोबतीला आहे, काय तिला (अशुभ समजता) की तुम्हाला शिकवण दिली जावी, किंबहुना तुम्ही तर मर्यादेचे उल्लंघन करणारे लोक आहात.

**२०.** आणि एक मुष्य त्या शहराच्या शेवटच्या किनाऱ्याकडून धावत आला, तो म्हणाला, हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! या पैगंबरांच्या मार्गाचे अनुसरण करा.

**२१.** अशा लोकांच्या मार्गाचे अनुसरण करा, जे तुमच्याकडून कसलाही मोबदला मागत

नाहीत आणि ते सत्य - मार्गावर आहेत.

**२२.** आणि मला काय झाले आहे की मी त्याची उपासना न करावी, ज्याने मला निर्माण केले आणि तुम्ही सर्व त्याच्याचकडे परतविले जाल.

**२३.** काय मी त्याला सोडून अशांना उपास्य बनवू की जर (अल्लाह) दयावान (रहमान) मला एखादे नुकसान पोहचवू इच्छिल तर त्यांची शिफारस मला काहीच फायदा पोहचवू शकणार नाही आणि ना ते मला वाचवू शकतील.

**२४.** मग तर मी निश्चितच उघड मार्गभ्रष्टतेत आहे.

**२५.** माझे म्हणणे ऐका! मी तर (साफ मनाने) तुम्हा सर्वांच्या पालनकर्त्यावर ईमान राखले आहे.

**२६.** (त्याला) सांगितले गेले की जन्नतमध्ये दाखल हो. तो म्हणाला, माझ्या जनसमूहानेही जाणून घेतले असते तर बरे झाले असते!

**२७.** की मला माझ्या पालनकर्त्याने माफ केले आणि मला प्रतिष्ठित लोकांमध्ये सामील केले.[१]

**२८.** आणि त्यानंतर आम्ही त्याच्या जनसमूहावर आकाशातून एखादे सैन्य अवतरित केले नाही आणि ना अशा प्रकारे आम्ही अवतरित करतो.

**२९.** तो तर केवळ एक भयंकर चित्कार होता, ज्यामुळे ते सर्वच्या सर्व विझून गेले.

**३०.** (अशा) दासांबद्दल खेद! कधीही असा कोणताही रसूल (पैगंबर) त्यांच्याजवळ आला नाही, ज्याची त्यांनी थट्टा उडविली नसेल.

---

(१) अर्थात ज्या ईमान आणि तौहीद (एकेश्वरवादा) मुळे मला माझ्या रबने (पालनकर्त्याने) माफ केले, हीच गोष्ट माझ्या जनसमूहानेही जाणून घेतली असती तर! यासाठी की त्यांनीही ईमान व तौहीद (एकेश्वरवादा) चा अंगीकार करून अल्लाहच्या क्षमा आणि त्याच्या कृपा - देणग्यांना पात्र व्हावे. अशा प्रकारे तो मेल्यानंतरही आपल्या जनसमूहाच्या लोकांचा हितचिंतक राहिला. एक सच्चा ईमानधारकाला असेच असायला हवे की त्याने प्रत्येक क्षणी लोकांचे शुभचिंतक असावे, त्यांना योग्य मार्गदर्शन करावे, मार्गभ्रष्ट करू नये. लोक त्याला वाटे ते म्हणोत आणि त्याच्याशी कसेही वर्तन करोत, येथपावेतो की त्याला जिवे ठार मारोत.

**३१.** काय त्यांनी नाही पाहिले की त्यांच्यापूर्वी कित्येक जनसमूहांना आम्ही नष्ट करून टाकले की ते यांच्याकडे परतणार नाहीत.

**३२.** प्रत्येक जनसमूह एकत्रित होऊन आमच्या समोर हजर केला जाईल.

**३३.** आणि त्यांच्यासाठी एक निशाणी मृत (कोरडी) जमीन आहे जिला आम्ही जिवंत केले आणि तिच्यातून अन्न (धान्य) काढले ज्यातून ते खातात.

**३४.** आणि आम्ही तिच्यात खजुरीच्या आणि द्राक्षांच्या बागा निर्माण केल्या आणि ज्यांच्यात झरे देखील प्रवाहित केले.

**३५.** यासाठी की (लोकांनी) तिची फळे खावीत आणि त्यांच्या हातांनी ते बनविले नाही, मग ते कृतज्ञता का नाही व्यक्त करीत?

**३६.** तो (अल्लाह) मोठा पवित्र आहे, ज्याने प्रत्येक वस्तूच्या जोड्या निर्माण केल्या, मग त्या जमिनीतून उगविलेल्या वस्तू असोत, किंवा यांचे स्वतःचे (अस्तित्व) असो, मग त्या (वस्तू) असोत, ज्यांना हे जाणतही नाहीत.

**३७.** आणि त्यांच्यासाठी एक निशाणी रात्र आहे, जिच्यातून आम्ही दिवसाला ओढून घेतो, तेव्हा ते अचानक अंधारात राहतात.

**३८.** आणि सूर्याकरिता जे निर्धारित मार्ग आहेत, तो त्यावरच चालत राहतो.[१] हे आहे निर्धारित केलेले जबरदस्त ज्ञानी (अल्लाह) चे.

**३९.** आणि चंद्राच्या आम्ही मजली निर्धारित केलेल्या आहेत. येथेपर्यंत की तो पुनश्च जुन्या फांदीसारखा होतो.

**४०.** ना सूर्याच्या आवाक्यात आहे की चंद्राला जाऊन धरावे आणि ना रात्र, दिवसाच्या पुढे जाणारी आहे आणि सर्वच्या सर्व आकाशात तरंगत फिरतात.

**४१.** आणि त्यांच्यासाठी एक निशाणी (ही देखील) आहे की आम्ही त्यांच्या संततीला

---

(१) अर्थात आपल्या आसावर चालत राहतो, जो अल्लाहने त्याच्यासाठी निर्धारित केला आहे. इथूनच तो आपल्या प्रवासाला आरंभ करतो, आणि तिथेच संपवितो. त्यापासून किंचितही ढळत नाही की ज्यामुळे एखाद्या ग्रहाशी टक्कर व्हावी.

भरलेल्या नौकेत स्वार केले.

**४२.** आणि यांच्यासाठी त्यासारख्याच इतर वस्तू निर्माण केल्या, ज्यांच्यावर ते स्वार होतात.

**४३.** आणि जर आम्ही इच्छिले असते तर त्यांना बुडवून टाकले असते, मग ना कोणी त्यांची मदत करणारा असता आणि ना ते वाचवले गेले असते.

**४४.** परंतु आम्ही आपल्यातर्फे दया - कृपा करतो आणि एका ठराविक मुदतीपर्यंत त्यांना लाभ देत आहोत.

**४५.** आणि त्यांना जेव्हा (कधी) सांगितले जाते की पुढच्या - मागच्या (दुष्कर्मा) पासून अलिप्त राहा, यासाठी की तुमच्यावर दया केली जावी.

**४६.** आणि त्यांच्याजवळ त्यांच्या पालनकर्त्याकडून अशी एखादी निशाणी येत नाही जिच्यापासून हे तोंड फिरवित नसावेत.

**४७.** आणि त्यांना जेव्हा सांगितले जाते की अल्लाहने जे दिले आहे, त्यातून काही खर्च करा, तेव्हा हे काफिर, ईमान राखणाऱ्यांना उत्तर देतात की आम्ही त्यांना का खाऊ घालावे, ज्यांना अल्लाहने इच्छिले असते तर स्वतःच खाऊ - पिऊ घातले असते? तुम्ही तर आहातच उघड मार्गभ्रष्टतेत.

**४८.** आणि ते म्हणतात, हा वायदा (कयामतची धमकी) केव्हा पूर्ण होईल, सच्चे असाल तर सांगा.

**४९.** त्यांना केवळ एका भयंकर चित्काराची प्रतीक्षा आहे, जो त्यांना येऊन धरेल आणि हे आपसात लढत - भांडतच असतील.

**५०.** त्यावेळी हे ना वसीयत (मृत्युपत्र) करू शकतील आणि ना - आपल्या कुटुंबाकडे परतू शकतील.

**५१.** आणि सूर (शंख) फुंकला जाताच सर्वच्या सर्व आपल्या कबरीमधून आपल्या पालनकर्त्याकडे (जलद गतीने) चालू लागतील.

**५२.** म्हणतील, अरेरे! आम्हाला आमच्या आरामच्या जागेतून कोणी उठविले? हेच आहे ते, ज्याचा वायदा रहमान (दयावान) ने केला होता, आणि पैगंबरांनी खरे खरे

सांगितले होते.

**५३.** असे नव्हे, परंतु एक भयंकर गर्जना की अचानक सर्वच्या सर्व जमा होऊन आमच्या समोर हजर केले जातील.

**५४.** तेव्हा आज कोणत्याही माणसावर किंचितही अत्याचार केला जाणार नाही आणि तुम्हाला त्याच कर्मांचा मोबदला दिला जाईल, जे तुम्ही करीत होते.

**५५.** निःसंशय, जन्नतवाले लोक आजच्या दिवशी आपल्या (मनोरंजन) कार्यात व्यस्त आणि आनंदित आहेत.

**५६.** ते आणि त्यांच्या पत्न्या सावलीत आसनांवर तक्के लावून बसले असतील.

**५७.** त्यांच्याकरिता जन्नतमध्ये प्रत्येक प्रकारचे मेवे असतील, आणि इतरही, जे काही ते मागतील.

**५८.** दया करणाऱ्या पालनकर्त्यातर्फे त्यांना 'सलाम' म्हटले जाईल.

**५९.** आणि हे अपराध्यांनो! आज तुम्ही वेगळे व्हा.

**६०.** हे आदमची संतती! काय मी तुमच्याकडून वचन नव्हते घेतले की तुम्ही सैतानाची उपासना न करावी. तो तर तुमचा उघड शत्रू आहे.

**६१.** आणि फक्त माझीच उपासना करावी. हाच सरळ मार्ग आहे.

**६२.** आणि सैतानाने तर तुमच्यापैकी अधिकांश समूहांना मार्गभ्रष्ट केले आहे. काय तुम्ही अक्कल नाही बाळगत?[१]

**६३.** हीच ती जहन्नम आहे, जिचा वायदा तुम्हाला दिला जात होता.

**६४.** आपल्या कुफ्र (इन्कारा) चा मोबदला प्राप्त करण्याकरिता आज तिच्यात दाखल व्हा.

**६५.** आम्ही आज त्यांच्या तोंडावर मोहर लावून देऊ आणि त्यांचे हात आमच्याशी

(१) अर्थात तुम्हाला एवढी सुद्धा अक्कल नाही की सैतान तुमचा शत्रू आहे, त्याचे म्हणणे मान्य करालया नको आणि मी (अल्लाह) तुमचा स्वामी व पालनकर्ता आहे. मीच तुम्हाला रोजीरोटी देतो

बोलतील आणि त्यांचे पाय साक्ष देतील, त्यांच्या त्या कर्मांची, जे ते करीत होते.

**६६.** आणि आम्ही इच्छिले असते तर त्यांचे डोळे आंधळे करून टाकले असते, मग हे मार्गाकडे धावत गेले असते, मग त्यांना कशा प्रकारे दिसून आले असते?

**६७.** आणि आम्ही इच्छिले असते तर त्यांच्या जागेवरच त्यांचे चेहरे बिघडवून (विकृत करून) टाकले असते. मग ना ते हिंडू फिरू शकले असते आणि ना परतू शकले असते.

**६८.** आणि आम्ही ज्याला वृद्ध करतो, त्याला जन्माच्या वेळेच्या अवस्थेकडे दुसऱ्यांदा परतवितो, मग काय हे तरीही समजून घेत नाही?

**६९.** आणि ना तर आम्ही या पैगंबरास काव्य (कविता) शिकविले, आणि ना हा त्यास योग्य आहे. हा तर केवळ बोध उपदेश आणि स्पष्ट कुरआन आहे.

**७०.** यासाठी की त्याने प्रत्येक माणसाला सावध करावे, जो जिवंत आहे आणि सत्य (प्रमाण) प्रस्थापित व्हावे.

**७१.** काय ते नाही पाहात की आम्ही आपल्या हातांनी बनविलेल्या वस्तूंपैकी, त्याच्यासाठी चतुष्पाद (गुरे-ढोरे) ही निर्माण केले ज्यांचे हे मालक बनले आहेत.

**७२.** आणि त्यां (पशूं) ना आम्ही त्यांच्या अधीन केले आहे, ज्यांच्यापैकी काही तर त्यांची वाहने आहेत आणि काहीं (चे मांस) खातात.

**७३.** आणि त्यांना त्यांच्यापासून इतरही अनेक फायदे आहेत, आणि पिण्याच्या वस्तू काय तरीही हे कृतज्ञता दर्शवित नाही?

**७४.** आणि ते अल्लाहखेरीज दुसऱ्यांनाही उपास्य बनवितात (या आशेने) की त्यांची मदत केली जावी.

**७५.** (वास्तविक) त्यांना मदत करण्याचे ते सामर्थ्य बाळगत नाहीत, तथापि हे (अनेकेश्वरवादी) त्यांचे सैन्य या नात्याने हजर आहेत.

---

आणि मीच तुमचे रात्रंदिवस संरक्षण करतो, यास्तव तुम्ही माझा आदेश मानला पाहिजे. तुम्ही तर सैतानाचे शत्रुत्व आणि माझ्या उपासनेचा हक्क न जाणून निर्बुद्धता आणि मूर्खपणा दाखवित आहात.

**७६.** यास्तव त्यांच्या गोष्टी (बोलण्या) ने दुःखी कष्टी न व्हावे आम्ही त्यांच्या लपलेल्या व उघड सर्वच गोष्टींना (चांगल्या प्रकारे) जाणतो.

**७७.** काय माणसाला एवढेही माहीत नाही की आम्ही त्याला विर्यापासून निर्माण केले आहे, तरीही तो उघड भांडखोर बनून बसला.

**७८.** आणि त्याने आमच्यासाठी उदाहरणे सांगितली आणि आपल्या (मूळ) उत्पत्तीला विसरला, म्हणाला की या सडल्या कुजल्या हाडांना कोण (पुन्हा) जिवंत करू शकतो ?

**७९.** सांगा की त्यांना तो जिवंत करील, ज्याने त्यांना पहिल्यांदा निर्माण केले, जो सर्व प्रकारची उत्पत्ती चांगल्या प्रकारे जाणणारा आहे.

**८०.** तोच होय, ज्याने तुमच्यासाठी हिरव्या वृक्षापासून आग निर्माण केली, ज्याद्वारे तुम्ही आग प्रज्वलित करता.

**८१.** ज्याने आकाशांना आणि धरतीला निर्माण केले आहे, काय तो यांच्यासारख्यांना निर्माण करण्यास समर्थ नाही ? निश्चितच समर्थ आहे आणि तोच निर्माण करणारा, जाणणारा आहे.

**८२.** जेव्हा तो एखाद्या गोष्टीचा इरादा करतो, तेव्हा त्याचे एवढे म्हणणे (पुरेसे) आहे की घडून ये, ती गोष्ट तत्काळ घडून येते.

**८३.** मोठा पवित्र आहे तो अल्लाह, ज्याच्या हाती प्रत्येक गोष्टीचा सत्ताधिकार आहे आणि ज्याच्याकडे तुम्ही सर्व परतविले जाल.

---

## सूरह साफ्फात - ३७

सूरह साफ्फात मक्का येथे अवतरली, यात एकशे ब्याऐंशी आयती आणि पाच रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** शपथ आहे पंक्तिबद्ध होणाऱ्यां (फरिश्त्यां) ची.

**२.** मग पूर्णतः दरडाविणाऱ्यांची.

**३.** मग अल्लाहचा पाठ करणाऱ्यांची.

**४.** निःसंशय, तुम्हा सर्वांचा उपास्य (माबूद) एकच आहे.

**५.** आकाशांच्या आणि धरतीच्या आणि त्यांच्या दरम्यानच्या सर्व वस्तूंचा आणि समस्त पूर्व दिशांचा तोच स्वामी आहे.

**६.** आम्ही जगाच्या (जवळ असलेल्या) आकाशाला तारकांनी सजविले आणि सुशोभित केले आहे.

**७.** आणि (आम्ही त्याचे) प्रत्येक विद्रोही सैतानापासून रक्षण केले आहे.

**८.** उच्च विश्वाच्या फरिश्त्यां (च्या गोष्टी) ऐकण्याकरिता ते कानही लावू शकत नाही, किंबहुना चोहीकडून त्यांच्यावर मारा होत असतो.

**९.** पिटाळून लावण्याकरिता आणि त्यांच्या साठी कायमस्वरूपी अज़ाब (शिक्षा - यातना) आहे.

**१०.** परंतु जो घाईगर्दीने एखादी गोष्टी हिसकावून पळेल तर (तत्क्षणी) एक धगधगता निखारा त्याच्या पाठीशी लागतो.

**११.** या काफिर लोकांना विचारा की त्यांना निर्माण करणे जास्त कठीण आहे की ज्यांना आम्ही निर्माण केले आहे? आम्ही तर मानवांना चिकण मातीपासून निर्माण केले आहे.

**१२.** किंबहुना तुम्ही आश्चर्य व्यक्त करत आहात आणि हे लोक थट्टा उडवित आहेत.

**१३.** आणि जेव्हा त्यांना उपदेश केला जातो तेव्हा ते मानत नाहीत.

**१४.** आणि जेव्हा एखादा ईश-चमत्कार (मोजिजा) पाहतात तेव्हा ते थट्टा उडवितात.

**१५.** आणि म्हणतात की ही तर पूर्णपणे उघड जादू आहे.

**१६.** काय जेव्हा आम्ही मरण पावणार आणि माती व हाडे होऊन जाऊ, मग काय (खरोखर) आम्ही जिवंत केले जाऊ?

**१७.** आणि आमच्यापूर्वी होऊन गेलेले वाडवडीलही?

**१८.** (तुम्ही) उत्तर द्या की होय, आणि तुम्ही अपमानितही व्हाल.

**१९.** ती तर केवळ एक जोरदार दटावणी असेल की ते अचानक पाहू लागतील.

**२०.** आणि म्हणतील की, अरेरे आमचा विनाश, हाच मोबदल्याचा दिवस आहे.

**२१.** हाच तो फैसल्याचा (निर्णयाचा) दिवस, ज्याला तुम्ही खोटे ठरवित राहिलात.

**२२.** अत्याचारींना आणि त्यांच्या साथीदारांना आणि ज्यांची ज्यांची ते (अल्लाहखेरीज) उपासना करीत होते.

**२३.** (त्या सर्वांना) एकत्र करून, त्यांना जहन्नमचा मार्ग दाखवा.

**२४.** आणि त्यांना थांबवून घ्या (यासाठी) की त्यांना आवश्यक प्रश्न विचारले जाणार आहेत.

**२५.** (या वेळी) तुम्ही एकमेकांची मदत करीत नाहीत, याला कारण काय?

**२६.** किंबहुना ते (सर्वजण) आज आज्ञाधारक बनले आहेत.

**२७.** आणि ते एकमेकांना संबोधून प्रश्नोत्तर करू लागतील.

**२८.** म्हणतील की तुम्ही तर आमच्याजवळ आमच्या उजव्या बाजूने येत असत.

**२९.** ते उत्तर देतील की नव्हे, उलट तुम्हीच ईमान राखणारे नव्हते.

**३०.** आणि आमच्या तुमच्यावर काहीच जोर नव्हता, किंबहुना तुम्ही तर (स्वतः) विद्रोही लोक होते.

**३१.** आता आम्हा (सर्वां) वर आमच्या पालनकर्त्याचे हे फर्मान लागू झालेच आहे की आम्ही (शिक्षा-यातनाची) गोडी चाखणार आहोत.

**३२.** तेव्हा आम्ही तुम्हाला पथभ्रष्ट केले, आम्ही तर स्वत:देखील पथभ्रष्टतेत होतो.

**३३.** तेव्हा आजच्या दिवशी (सर्वच) शिक्षा यातनेचे वाटेकरी आहेत.

**३४.** आम्ही अपराधी लोकांशी असाच (व्यवहार) करतो.

**३५.** हे असे (लोक) आहेत की जेव्हा त्यांना सांगितले जाते की अल्लाहखेरीज कोणीही उपास्य नाही, तेव्हा हे घमेंड करीत असत.

**३६.** आणि म्हणत की काय आम्ही आपल्या दैवतांना एका वेड्या कवीच्या बोलण्यावरून सोडून द्यावे!

**३७.** (नाही मुळीच नाही) किंबहुना पैगंबर तर सत्य (सच्चा दीन धर्म) घेऊन आले आहेत आणि सर्व पैगंबरांना खरे जाणतात.

**३८.** नि:संशय, तुम्ही दु:खदायक शिक्षा-यातनां (ची गोडी) चाखणार आहात.

**३९.** आणि तुम्हाला त्याचाच मोबदला दिला जाईल, जे तुम्ही करीत होते.

**४०.** तथापि अल्लाहचे सच्चे, प्रामाणिक दास!

**४१.** त्यांच्याचकरिता निर्धारित आजिविका (रोजी) आहे.

**४२.** (प्रत्येक प्रकारचे) मेवे आणि ते सन्मानित आदरणीय असतील.

**४३.** सुखांनी भरलेल्या जन्नतीमध्ये.

**४४.** आसनांवर एकमेकांच्या समोर बसले असतील.

**४५.** प्रवाहित (वाहत्या) मद्याचे प्याले त्यांच्या दरम्यान फिरत असतील.

**४६.** जे स्वच्छ सफेद आणि प्यायला स्वादिष्ट असेल.

**४७.** ना त्याद्वारे डोकेदुखी होईल आणि ना ते प्यायल्याने बहकतील.

**४८.** आणि त्यांच्याजवळ नजर खाली ठेवणाऱ्या आणि मोठमोठे सुंदर नेत्र असणाऱ्या (हूर-पऱ्या) असतील.

**४९.** अशा की जणू लपवून ठेवलेली अंडी!

**५०.** (जन्नतचे लोक) एकमेकांकडे तोंड करून विचारतील.

**५१.** त्यांच्यापैकी एक सांगणारा सांगेल की माझा एक जवळचा (सोबती) होता.

**५२.** जो (मला) सांगत असे की काय तू (कयामतच्या येण्याचा) विश्वास राखणाऱ्यांपैकी आहेस?

**५३.** काय जेव्हा आम्ही मेल्यावर माती आणि हाडे होऊन जाऊ, काय त्या वेळी आम्हाला (कृत कर्मांचा) मोबदला दिला जाईल?

**५४.** सांगितले जाईल, तुम्ही इच्छिता की डोकावून पाहावे?

**५५.** डोकावून पाहताच त्याला जहन्नममध्ये मध्यभागी (जळताना) दिसेल.

**५६.** तो म्हणेल, अल्लाहची शपथ! तू तर माझाही सर्वनाश करण्याच्या जवळ होता.

**५७.** जर माझ्यावर माझ्या पालनकर्त्याची कृपा नसती तर मी देखील जहन्नममध्ये हजर केल्या जाणाऱ्यांपैकी असतो.

**५८.** काय (हे उचित आहे की) आम्ही मरण पावणारच नाहीत?

**५९.** पहिल्या एका मृत्युखेरीज, आणि ना आम्हाला अज़ाब (शिक्षा - यातना) दिला जाईल.

**६०.** मग तर (स्पष्ट आहे की) ही फार मोठी सफलता आहे.

**६१.** अशी (सफलता) प्राप्त करण्यासाठी आचरण करणाऱ्यांनी आचरण केले पाहिजे.

**६२.** काय हे आतिथ्य अधिक चांगले आहे की जक्कूमचे झाड?

**६३.** ज्याला आम्ही अत्याचारी लोकांकरिता कठीण कसोटी बनविले आहे.

**६४.** निःसंशय, ते झाड जहन्नमच्या तळापासून निघते.

**६५.** ज्याचे घोंस (गुच्छे) सैतानाच्या डोक्यांसारखे असतात.

**६६.** जहन्नमवासी याच झाडाला खातील आणि याच्याचद्वारे पोट भरतील.

**६७.** मग त्यावर उकळते पाणी प्यावे लागले.

**६८.** मग त्या सर्वांचे परतणे जहन्नमच्या (आगी) कडेच असेल.

**६९.** विश्वास करा की त्यांना आपले वाडवडील पथभ्रष्ट (असल्याचे) आढळले.

**७०.** आणि हे त्यांच्याच पदचिन्हांवर धावत जात राहिले.

**७१.** आणि त्यांच्यापूर्वी होऊन गेलेले अनेक लोक मार्गभ्रष्ट झाले आहेत.

**७२.** आणि ज्यांच्यात आम्ही खबरदार करणारे रसूल (पैगंबर) पाठविले होते.

**७३.** आता तुम्ही पाहा की ज्यांना (अल्लाहच्या अज़ाबचे) भय दाखविले गेले होते, त्यांचा शेवट कसा झाला.

**७४.** अल्लाहच्या सच्चा प्रामाणिक दासांखेरीज.

**७५.** आम्हाला नूहने पुकारले तर पाहा की आम्ही किती चांगले दुआ (प्रार्थना) कबूल करणारे आहोत.

**७६.** आणि आम्ही त्यांना आणि त्यांच्या कुटुंबियांना त्या घोर संकटापासून वाचविले.

**७७.** आणि त्याच्या संततीला आम्ही बाकी राहणारी बनविले.

**७८.** आणि आम्ही त्याचे स्मरण (चर्चा) नंतरच्या लोकांमध्ये बाकी ठेवले.

**७९.** नूह (अले.) वर साऱ्या जगात सलाम असो.

**८०.** आम्ही सत्कर्म करणाऱ्यांना अशाच प्रकारे मोबदला प्रदान करतो.

**८१.** निःसंशय, तो आमच्या ईमान बाळगणाऱ्या दासांपैकी होता.

**८२.** मग इतर लोकांना आम्ही बुडवून टाकले.

**८३.** आणि त्याच्या (नूहच्या) मागे येणाऱ्यांपैकीच इब्राहीमही होते.

**८४.** जेव्हा ते आपल्या पालनकर्त्याजवळ शुद्ध (निर्दोष) अंतःकरणासह आले.

**८५.** ते आपल्या पित्यास आणि आपल्या जनसमूहाच्या लोकांना म्हणाले की तुम्ही कशाची भक्ती आराधना करीत आहात?

**८६.** काय तुम्ही अल्लाहखेरीज मनाने रचलेली उपास्ये इच्छिता?

**८७.** तर मग (सांगा की) तुम्ही सर्व विश्वांच्या पालनकर्त्याला काय समजून घेतले आहे?

**८८.** आता (इब्राहीमने) एक नजर ताऱ्यांवर टाकली.

**८९.** आणि म्हणाले की मी तर आजारी आहे.

**९०.** यावर सर्वजण त्याच्यापासून तोंड फिरवित परत चालले गेले.

**९१.** ते (इब्राहीम) हळूच त्यांच्या उपास्यां (देवतां) जवळ गेले आणि म्हणाले, तुम्ही खात का नाहीत?

**९२.** तुम्हाला झालं तरी काय की तुम्ही बोलत सुद्धा नाहीत!

**९३.** मग तर (पूर्ण शक्तीने) उजव्या हाताने त्यांना मारण्यास तुटून पडले.

**९४.** ते (अनेकेश्वरवादी) धावत पळत त्यांच्याकडे आले.

**९५.** तेव्हा ते (इब्राहीम) म्हणाले की तुम्ही अशांची पूजा करता, ज्यांना तुम्ही स्वतः बनविता.

**९६.** वास्तविक तुम्हाला आणि तुम्ही बनविलेल्या वस्तूंना अल्लाहनेच निर्माण केले आहे.

**९७.** ते (लोक) म्हणाले, याच्यासाठी एक घर (अग्निकुंड) तयार करा आणि त्या (धगधगत्या) आगीत याला टाकून द्या.

**९८.** त्यांनी तर त्याच्या (इब्राहीम) शी डाव खेळी इच्छिले, परंतु आम्ही त्यांनाच तोंडघशी पाडले.

**९९.** आणि (इब्राहीम) म्हणाले की मी तर (हिजरत- देशत्याग) करून आपल्या पालनर्त्याकडे जाणार आहे, तो निश्चितच मला मार्ग दाखविल.

**१००.** हे माझ्या पालनकर्त्या! मला नेक सदाचारी पुत्र प्रदान कर.

**१०१.** तेव्हा आम्ही त्याला एक सहनशील पुत्र (प्राप्ती) ची शुभवार्ता दिली.

**१०२.** मग तेव्हा (बालक) या वयास पोहचले की त्याच्यासोबत हिंडू फिरू शकेल, तेव्हा (इब्राहीम) म्हणाले, हे माझ्या प्रिय पुत्रा! मी स्वप्नात स्वतःला तुझे बलिदान (कुर्बानी) करताना पाहत आहे. आता तूच सांग, तुझा काय विचार आहे?[१] पुत्राने उत्तर दिले, हे पिता! जो आदेश (अल्लाहतर्फे) दिला जात आहे, त्याचे पालन करा. अल्लाहने इच्छिले तर मी तुम्हाला धीर-संयम राखणाऱ्यांपैकी आढळेल.

**१०३.** अर्थात जेव्हा दोघांनी स्वीकार केला आणि त्या (पित्या) ने त्या (पुत्रा) ला माथा टेकलेल्या अवस्थेत खाली पाडले.

**१०४.** तेव्हा आम्ही हाक मारली, हे इब्राहीम!

**१०५.** निःसंशय, तुम्ही स्वप्नाला खरे करून दाखविले. निःसंशय, आम्ही भलाई करणाऱ्यांना अशाच प्रकारे मोबदला प्रदान करतो.

**१०६.** वास्तविक ही उघड अशी कसोटी होती.

**१०७.** आणि आम्ही एक मोठा जबीहा (बळी), त्याच्या फिदिया (मुक्तीधन) स्वरूपात दिला.[२]

**१०८.** आणि आम्ही त्यांची शुभ चर्चा नंतरच्या लोकांमध्ये बाकी ठेवली.

**१०९.** इब्राहीमवर सलाम असो.

**११०.** आम्ही सत्कर्म करणाऱ्यांना अशाच प्रकारे मोबदला प्रदान करतो.

**१११.** निश्चितच तो आमच्या ईमान बाळगणाऱ्या दासांपैकी होता.

**११२.** आणि आम्ही त्याला पैगंबर इसहाकचा शुभ समाचार दिला, जो नेक सदाचारी

---

(१) पैगंबराचे स्वप्न, अल्लाहच्या वहयी आणि आदेशाने असते, या अनुषंगाने ते अमलात आणणे आवश्यक ठरते. पुत्राशी विचारणा करून, सल्ला घेण्याचा आदेश हे जाणून घ्यायचे होते की पुत्र देखील अल्लाहच्या आदेशाचे पालन करण्याकरिता कितपत तयार आहे.

(२) हा मोठा बळी एक मेंढा होता, ज्याला अल्लाहने जन्नतमधून हजरत जिब्रील यांच्याद्वारे पाठविले (इब्ने कसीर), त्याला इस्माईलच्या जागी बळी दिले गेले आणि मग इब्राहीमी सुन्नत (स्मरणिका) ला कयामतपावेतो अल्लाहचे सान्निध्य आणि ईदे अज्हा (बकरा ईद) चे सर्वोत्तम आचरण बनविले गेले.

लोकांपैकी असेल.

**११३.** आणि आम्ही इब्राहीम व इसहाकवर अनेक (प्रकारची) समृद्धी अवतरित केली आणि या दोघांच्या संततीत काही तर भाग्यशाली आहेत आणि काही आपल्या प्राणांवर उघड अत्याचार करतात.

**११४.** आणि निश्चितच आम्ही मूसा आणि हारूनवर मोठा उपकार केला.

**११५.** आणि त्यांची आणि त्यांच्या जनसमूहाची फार मोठ्या दुःख-यातनेतून सुटका केली.

**११६.** आणि त्यांची मदत केली, तेव्हा तेच वर्चस्वशाली (विजयी) राहिले.

**११७.** आणि आम्ही त्यांना (स्पष्ट आणि) दिव्य ग्रंथ प्रदान केला.

**११८.** आणि त्या दोघांना सरळ मार्गावर स्थिर (बाकी) ठेवले.

**११९.** आणि आम्ही त्या दोघांकरिता नंतर येणाऱ्यांमध्ये ही गोष्ट बाकी ठेवली.

**१२०.** मूसा आणि हारूनवर सलाम असो.

**१२१.** निःसंशय, आम्ही सत्कर्म करणाऱ्यांना अशाच प्रकारे मोबदला प्रदान करीत असतो.

**१२२.** निःसंशय, हे दोघे आमच्या ईमानधारक दासांपैकी होते.

**१२३.** आणि निःसंशय, इलियास देखील पैगंबरांपैकी होते.

**१२४.** जेव्हा ते आपल्या जनसमूहाच्या लोकांना म्हणाले, तुम्ही अल्लाहचे भय नाही बाळगत.

**१२५.** काय तुम्ही (वअ्ल) नावाच्या मूर्तीला पुकारता आणि सर्वांत उत्तम अशा निर्माणकर्त्याला सोडून देता?

**१२६.** अल्लाह, जो तुमचा आणि तुमच्यापूर्वी होऊन गेलेल्या सर्व वाडवडिलांचा स्वामी व पालनकर्ता आहे.

**१२७.** परंतु जनसमूहाच्या लोकांनी त्यांना खोटे ठरविले, तेव्हा ते अवश्य (शिक्षा -

यातनाग्रस्त अवस्थेत) हजर केले जातील.

**१२८.** मात्र अल्लाहच्या सच्चा प्रामाणिक दासांखेरीज.

**१२९.** आणि आम्ही (इलियासची) शुभा चर्चा नंतरच्या लोकांमध्ये बाकी ठेवली.

**१३०.** इलियासवर सलाम असो.

**१३१.** आम्ही सत्कर्म करणाऱ्यांना अशाच प्रकारे मोबदला प्रदान करतो.

**१३२.** निःसंशय, तो आमच्या ईमानधारक दासांपैकी होता.[१]

**१३३.** निःसंशय, लूत (अलै.) पैगंबरांपैकी होते.

**१३४.** आम्ही त्यांना आणि त्यांच्या कुटुंबियांना, सर्वांना मुक्ती प्रदान केली.

**१३५.** मात्र त्या म्हातारीखेरीज, जी मागे राहणाऱ्यांमध्ये राहिली.

**१३६.** मग आम्ही इतर सर्वांचा सर्वनाश केला.

**१३७.** आणि तुम्ही तर सकाळ झाल्यावर त्यांच्या वस्त्यांवरून जाता.

**१३८.** आणि रात्री देखील, मग काय तरीही समजून घेत नाही ?

**१३९.** आणि निःसंशय, यूनुस देखील पैगंबरांपैकी होते.

**१४०.** जेव्हा ते पळून जाऊन भरेलल्या नौकेजवळ पोहोचले.

**१४१.** मग (फासा टाकून) नाव काढले गेले, तेव्हा हे पराभूत झाले.

**१४२.** मग त्यांना माशाने गिळून टाकले आणि ते स्वतःचाच धिःक्कार करू लागले.

(१) अंतिम आकाशिय ग्रंथ कुरआनने पैगंबरांची चर्चा करून त्यांच्या संदर्भात अधिकांश ठिकाणी हे शब्द वापरले आहेत की ते आमच्या ईमानधारक दासांपैकी होते. याचे दोन अर्थ आहेत, त्यांचे चारित्र्य आणि आचरणाची श्रेष्ठता दर्शविणे, जो ईमानचा आवश्यक भाग आहे, यासाठी की लोकांचे खंडन व्हावे, जे बहुतेक पैगंबरांविषयी नैतिक गोष सिद्ध करतात. उदा. तौरात आणि इंजीलच्या आजच्या प्रतींमध्ये अनेक पैगंबरांविषयी अशा मनोरचित कहाण्या सामील आहेत. दुसरा हेतु त्या लोकांचे खंडन, जे काही पैगंबरांसबंधी अतिशयोक्ती करून त्यांच्या अंगी ईश्वरी गुण व सत्ताधिकार असल्याचे सिद्ध करतात. अर्थात ते पैगंबर जरूर होते, परंतु शेवटी अल्लाहचे दासच होते. स्वतः अल्लाह किंवा त्याचा अंश अथवा सहभागी मुळीच नव्हते.

**१४३.** तेव्हा जर ते तस्बीह (अल्लाहचे गुणगान) करणाऱ्यांपैकी नसते.

**१४४.** तर लोकांना उठविले जाण्याच्या दिवसापर्यंत माशाच्या पोटातच राहिले असते.

**१४५.** तर आम्ही त्याला सपाट मैदानात टाकून दिले, आणि त्या वेळी तो आजारी होता.

**१४६.** आणि त्याच्यावर सावली करणारे एक वेलीचे झाड उगविले.

**१४७.** आणि आम्ही त्यांना एक लाख, किंबहुना त्याहून जास्त लोकांकडे पाठविले.

**१४८.** तेव्हा त्यांनी ईमान राखले आणि आम्ही एका ठराविक मुदतपर्यंत त्यांना सुख सुविधा प्रदान केली.

**१४९.** त्यांना जरा विचारा की, काय तुमच्या पालनकर्त्याच्या तर मुली (कन्या) आहेत आणि त्यांच्यासाठी पुत्र आहेत?

**१५०.** किंवा हे त्या वेळी हजर होते, जेव्हा आम्ही फरिश्त्यांना स्त्रिया बनवून निर्माण केले?

**१५१.** खबरदार राहा की हे लोक आपल्या मनाने रचलेल्या गोष्टी बोलत आहेत.

**१५२.** की अल्लाहला संतान (मुले बाळे) आहेत, निःसंशय, हे अगदी खोटारडे आहेत.

**१५३.** काय अल्लाहने स्वतःकरिता कन्यांना पुत्रांवर प्राधान्य दिले?

**१५४.** तुम्हाला झाले तरी काय, कसा हुकूम लावत फिरता?

**१५५.** काय तुम्हाला एवढेही समजत नाही?

**१५६.** किंवा तुमच्याजवळ (त्याविषयी) एखादे स्पष्ट प्रमाण आहे?

**१५७.** तर मग जा, सच्चे असाल तर आपलाच ग्रंथ घेऊन या.

**१५८.** आणि त्या लोकांनी तर अल्लाह आणि जिन्नांच्या दरम्यानही नाते कायम केले आहे, आणि वास्तविक जिन्न लोक स्वतः हे ज्ञान बाळगतात की ते (अशी श्रद्धा राखणारे

अज़ाबच्या समोर) प्रस्तुत केले जातील.

**१५९.** हे, जे काही (अल्लाहविषयी) सांगत आहेत, त्यापासून सर्वश्रेष्ठ अल्लाह पवित्र (अलिप्त) आहे.

**१६०.** मात्र अल्लाहच्या सच्चा प्रामाणिक दासांखेरीज.

**१६१.** विश्वास करा की तुम्ही सर्व आणि तुमची (खोटी) उपास्ये.

**१६२.** कोणा एकालाही बहकवू शकत नाही.

**१६३.** मात्र त्यांच्याखेरीज, जे जहन्नममध्ये जाणारच आहेत.

**१६४.** (फरिश्त्यांचे कथन आहे) की आमच्यापैकी प्रत्येकाचे स्थान निर्धारित आहे.

**१६५.** आणि आम्ही (अल्लाहच्या आज्ञापालनात) पंक्तिबद्ध (रांगांनी) उभे आहोत.

**१६६.** आणि त्याची तस्बीह (पावित्र्यगान) करीत आहोत.

**१६७.** आणि काफिर तर म्हणत असत

**१६८.** की जर आमच्याजवळ पूर्वीच्या लोकांची स्मृती असती

**१६९.** तर आम्ही देखील अल्लाहचे निवडक दास बनलो असतो.

**१७०.** परंतु मग त्यांनी या (कुरआना) चा इन्कार केला, तेव्हा त्यांना लवकरच कळून येईल.

**१७१.** आणि निःसंशय, आमचा वायदा आधीच आपल्या पैगंबरांकरिता लागू झालेला आहे

**१७२.** की निःसंशय, त्याच लोकांची मदत केली जाईल.

**१७३.** आणि आमचे सैन्य वर्चस्वशाली (आणि श्रेष्ठतम) राहील.

**१७४.** आता तुम्ही काही दिवसा पर्यंत यांच्याकडून तोंड फिरवून घ्या.

**१७५.** आणि त्यांना पाहत राहा, आणि ते देखील लवकरच पाहतील.

**१७६.** काय हे आमच्या (शिक्षा-यातनांकरिता घाई माजवित आहेत.

**१७७.** (ऐका!) जेव्हा आमचा अज़ाब (शिक्षा यातना) त्यांच्या मैदानांमध्ये येईल, त्या वेळी त्यांची, ज्यांना सावध केले गेले होते, फार वाईट सकाळ असेल.

**१७८.** आणि तुम्ही काही काळापर्यंत त्यांच्याकडून ध्यान हटवा.

**१७९.** आणि पाहात राहा, हे सुद्धा लवकरच पाहतील.

**१८०.** पवित्र आहे तुमचा पालनकर्ता, जो मोठा प्रतिष्ठा बाळगणारा आहे, त्या प्रत्येक गोष्टीहून जी (अनेकेश्वरवादी) बोलत असतात.

**१८१.** आणि पैगंबरांवर सलाम आहे.

**१८२.** आणि समस्त प्रशंसा, सर्व विश्वांच्या पालनकर्त्या अल्लाहकरिता आहे.

------

## सूरह साद - ३८

सूरह साद मक्का येथे अवतरली, यात अठ्याऐंशी आयती आणि पाच रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** साद, या बोध उपदेशपूर्ण कुरआनाची शपथ.

**२.** परंतु काफिर (इन्कारी लोक) घमेंड आणि विरोधात पडले आहेत.[१]

**३.** आम्ही याच्यापूर्वीही अनेक जनसमूहांना नष्ट करून टाकले, त्यांनी प्रत्येक प्रकारे आरडाओरड केली, परंतु ती वेळ सुटकेची नव्हती.

**४.** आणि काफिर लोकांना या गोष्टीबद्दल आश्चर्य वाटले की त्यांच्यापैकीच एक खबरदार करणारा आला आणि म्हणू लागले की हा जादूगार आणि खोटारडा आहे.

---

(१) अर्थात हा कुरआन तर निश्चितच शंका संशय विरहित आणि त्या लोकांसाठी बोध-उपदेश आहे, जे बोध-ग्रहण करतील, तथापि काफिर लोकांना यापासून कसलाही लाभ पोहचू शकत नाही, कारण त्यांच्या बुद्धीत गर्व, अहंकार आणि घमेंड भरलेली आहे आणि हृदयांमध्ये विरोध आणि वैरभावना. मूळ शब्द 'इज्जत' त्याचा अर्थ सत्याच्या विरोधात अकडणे, ताठरता दर्शविणे.

**५.** काय याने एवढ्या साऱ्या आराध्य दैवतांना एकच दैवत (माबूद) बनवून टाकले, खरोखर ही मोठा विचित्र गोष्ट आहे!

**६.** त्यांचे सरदार (प्रमुख) असे बोलत निघून जाऊ लागले, जा, आपल्या दैवतांवर मजबूत (अटळ) राहा. निःसंशय, या गोष्टीत काहीतरी उद्दिष्ट (स्वार्थ) आहे.

**७.** आम्ही तर ही गोष्ट प्राचीन धर्मांमध्येही ऐकली नाही काही नाही, ही केवळ मनाने रचलेली गोष्टी आहे.

**८.** काय आम्ही सर्वांपैकी त्याच्यावरच (अल्लाहची) वहयी अवतरित केली गेली? वस्तुतः हे लोक माझ्या वहयी (प्रकाशना) बाबत संशयग्रस्त आहेत,[१] किंबहुना (खरेतर) त्यांनी माझ्या शिक्षा यातनेची गोडी अद्याप चाखलीच नाही.

**९.** काय त्यांच्याजवळ, तुमच्या वर्चस्वशाली, भरपूर प्रदान करणाऱ्या पालनकर्त्याच्या कृपेचे खजीने आहेत?

**१०.** किंवा आकाश आणि धरती आणि त्यांच्या दरम्यानच्या प्रत्येक गोष्टीचे राज्य त्यांचेच आहे, असे आहे तर दोऱ्या ताणून (आकाशात) चढून जावे.

**११.** हेदेखील (विशाल) सैन्यांपैकी पराभूत (लहानसे) सैन्य आहे.

**१२.** त्यांच्या पूर्वीही नूहचा जनसमूह आणि आदचा जनसमूह आणि खिळे (मेखां) वाल्या फिरऔनने खोटे ठरविले होते.

**१३.** आणि समूद व लूत जनसमूहाने आणि वनात राहणाऱ्यांनीही, हीच विशाल सैन्ये होती.

**१४.** यांच्यापैकी एक देखील असा नव्हता, ज्याने पैगंबरांना खोटे ठरविले नसेल, तेव्हा माझा अज़ाब त्यांच्यावर लागू झाला.

**१५.** आणि त्यांना केवळ एका तीव्र (भयंकर) चित्काराची प्रतीक्षा आहे, ज्यात

---

(१) अर्थात त्यांचा इन्कार या कारणाने नाही की त्यांना मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्या सत्यतेचे ज्ञान नाही, किंवा त्यांच्या सुबोध असण्याचा इन्कार आहे, किंबहुना हे त्या वहयी (प्रकाशना) विषयीच संशयात पडले आहेत, जी पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्यावर अवतरली, जिच्यात सर्वांत उघड तौहीद (एकेश्वरवाद) चे आवाहन आहे.

कसलाही अडथळा (आणि विलंब) नाही.

**१६.** आणि (ते) म्हणाले की हे आमच्या पालनकर्त्या! आमचा वाटा तू आम्हाला हिशोबाच्या दिवसापूर्वीच प्रदान कर.

**१७.** तुम्ही त्यांच्या बोलण्यावर सहनशीलता राखा आणि आमचे दास दाऊदचे स्मरण करा जो मोठा शक्तिशाली होता, निःसंशय, तो (अल्लाहकडे) मोठा रुजू करणारा होता.

**१८.** आम्ही पर्वतांना त्यांच्या अधीन केले (ताब्यात दिले) होते की त्याच्यासोबत सकाळ संध्याकाळ अल्लाहच्या पवित्रतेचा जाप (तस्बीह) करावा.

**१९.** आणि (उडणाऱ्या) पक्षांनाही एकत्र होऊन सर्वच्या सर्व त्याच्या अधीन होते.

**२०.** आम्ही त्याचे राज्य मजबूत केले होते आणि त्याला हिकमत (बुद्धिकौशल्य) प्रदान केले होते आणि गोष्टीचा फैसला (सुचविला होता.)

**२१.** आणि काय तुम्हाला भांडण करणाऱ्यांची खबर पोहोचली, जेव्हा ते भिंत ओलांडून मेहराबमध्ये (उपासनेच्या ठिकाणी) आले.

**२२.** जेव्हा ते दाऊदजवळ पोहोचले, तेव्हा ते यांना पाहून घाबरले. ते म्हणाले, भिऊ नका, आमचा आपसातील तंटा आहे. आमच्यापैकी एकाने दुसऱ्यावर अत्याचार केला आहे, तेव्हा तुम्ही आमच्या दरम्यान न्यायपूर्वक फैसला करावा आणि अन्याय करू नका आणि आम्हाला सरळ मार्ग दाखवा.

**२३.** (ऐका!) हा माझा भाऊ आहे. याच्याजवळ नव्याण्णव मेंढ्या आहेत. आणि माझ्याजवळ एकच आहे. परंतु हा मला म्हणतो की तुझी ती एक देखील मला देऊन टाक आणि माझ्यावर बोलण्यात मोठा सक्त मामला (व्यवहार) करतो.

**२४.** (दाऊद) म्हणाले, त्याचे आपल्या मेंढ्यांसोबत तुझी एक मेंढी सामील करून घेण्याचा प्रश्न निश्चितच तुझ्यावर अत्याचार आहे. आणि अधिकांश भागीदार आणि सहभागी (असेच असतात की) एकमेकांवर जुलूम अत्याचार आणि अन्याय करतात, मात्र त्यांच्याखेरीज, ज्यांनी ईमान राखले आणि जे सत्कर्म करीत राहिले, तथापि असे लोक फारच कमी आहेत आणि दाऊद (अलै.) यांनी जाणुन घेतले की आम्ही त्यांची परीक्षा घेतली आहे, मग तर आपल्या पालनकर्त्या (अल्लाह) जवळ तौबा (क्षमा

याचना) करू लागले आणि मोठ्या विनम्रतेने खाली पडले (सजद्यात गेले) आणि (पूर्णपणे) रुजू झाले.

**२५.** तेव्हा आम्ही देखील त्यांची ही (चूक) माफ केली. निःसंशय, ते आमच्याजवळ मोठे उच्च स्थान राखणारे आणि सर्वांत चांगले ठिकाण बाळगणारे आहेत.

**२६.** हे दाऊद! आम्ही तुम्हाला धरतीवर खलीफा बनविले, तेव्हा तुम्ही लोकांच्या दरम्यान न्यायासह फैसला करा आणि आपल्या मनाच्या इच्छा आकांक्षांचे अनुसरण करू नका, अन्यथा ती तुम्हाला अल्लाहच्या मार्गापासून हटविल. निःसंशय, जे लोक अल्लाहच्या मार्गापासून भटकतात, त्यांच्यासाठी सक्त अज़ाब (शिक्षा-यातना) आहे. अशासाठी की त्यांनी हिशोबाच्या दिवसाचा विसर पाडला आहे.

**२७.** आणि आम्ही आकाश व धरती आणि त्यांच्या दरम्यानच्या वस्तूंना (अस्तित्वांना) व्यर्थ (आणि अकारण) निर्माण नाही केले. ही शंका तर काफिर (इन्कारी) लोकांची आहे, तेव्हा काफिरांकरिता आगीचा विनाश आहे.

**२८.** काय आम्ही त्या लोकांना, ज्यांनी ईमान राखले आणि सत्कर्मे केली त्या लोकांसमान ठरवू जे (रोज) धरतीवर उत्पात (फसाद) माजवित राहिले, किंवा नेक सदाचारी लोकांना दुराचाऱ्यांसारखं बनवू?

**२९.** हा मोठा शुभग्रंथ आहे, जो आम्ही तुमच्याकडे अशासाठी अवतरित केला आहे की लोकांनी याच्या आयतींवर विचार चिंतन करावे आणि बुद्धी राखणाऱ्यांनी यापासून बोध ग्रहण करावा.

**३०.** आणि आम्ही दाऊदला सुलैमान (नावाचा पुत्र) प्रदान केला. जो मोठा उत्तम दास होता आणि (अल्लाहकडे) खूप रुजू करणारा होता.

**३१.** जेव्हा त्यांच्यासमोर संध्याकाळी वेगात चालणारे खास घोडे सादर केले गेले.

**३२.** तेव्हा म्हणाले, मी आपल्या पालनकर्त्या (अल्लाह) च्या स्मरणावर या घोड्याच्या प्रेमाला प्राधान्य दिले, येथेपर्यंत की सूर्य बुडाला.

**३३.** या घोड्यांना पुन्हा माझ्यासमोर आणा, मग पोटऱ्यांवर आणि मानांवर हात फिरवू लागले.

**३४.** आणि आम्ही सुलेमानची कसोटी घेतली आणि त्यांच्या सिंहासनावर एक धड (मृत शरीर) टाकून दिले, मग ते ध्यानमग्न झाले.

**३५.** म्हणाले की हे माझ्या पालनकर्त्या मला क्षमा कर आणि मला असे राज्य प्रदान कर, जे माझ्याखेरीज कोणत्याही (माणसास) पात्र नसावे. तू फार मोठा दाता आहेस.

**३६.** तेव्हा आम्ही हवेला त्यांच्या अधीन केले. ती त्यांच्या आदेशानं, जिकडे ते इच्छित, नरमीने पोहचवू देत असे.

**३७.** आणि (शक्तिशाली) जिन्नांना देखील, त्यांच्या अधीन (ताबे) केले होते आणि प्रत्येक घर बनविणाऱ्याला आणि पाणबुड्याला.

**३८.** आणि इतर (जिन्नांना) देखील, जे शृंखलांनी जखडलेले राहत.

**३९.** हा आहे आमचा अनुग्रह, आता तुम्ही उपकार करा किंवा रोखून ठेवा, काही हिशोब नाही.

**४०.** आणि त्यांच्यासाठी आमच्याजवळ मोठी निकटता आहे, आणि फार चांगले ठिकाण आहे.

**४१.** आणि आमचे दास अय्यूबचीही चर्चा करा, जेव्हा त्याने आपल्या पालनकर्त्याला पुकारले की मला सैतानाने दुःख - यातना पोहचविली आहे.

**४२.** आपला पाय जमिनीवर मारा. हे आंघोळीचे थंड आणि पिण्याचे पाणी आहे.

**४३.** आणि आम्ही त्याला त्याचे संपूर्ण कुटुंब प्रदान केले, किंबहुना तेवढेच आणखीही त्यासोबत आपल्या खास कृपेने, आणि बुद्धिमानांकरिता बोधप्राप्तीसाठी.

**४४.** आणि आपल्या हातात काड्यांचा गुच्छा घेऊन त्याने मार आणि शपथ तोडू नको.[१] खरे तर असे की आम्हाला तो मोठा सहनशील दास आढळला. तो मोठा नेक सदाचारी दास होता आणि (अल्लाहकडे) मोठा रुजू करणारा.

**४५.** आणि आमचे दास इब्राहीम, इसहाक आणि याकूब यांचीही (लोकांमध्ये) चर्चा

(१) आजारपणाच्या दिवसात शुश्रुषा करणाऱ्या पत्नीशी कसल्या तरी गोष्टीवर नाराज होऊन हजरत अय्यूब यांनी तिला शंभर कोडे (हंटर) मारण्याची शपथ घेतली होती. रोगमुक्त झाल्यानंतर अल्लाहने सांगितले की शंभर काड्यांचा एक झाडू घेऊन तिला मार, म्हणजे तुझी शपथ पूर्ण होईल.

करा जे हात आणि डोळे राखणारे होते.

**४६.** आम्ही त्यांना एक विशेष गोष्ट अर्थात आखिरतच्या स्मरणासोबत खासरित्या संबंधित करून घेतले होते.

**४७.** आणि हे सर्व आमच्याजवळ निवडक आणि सर्वाधिक चांगल्या लोकांपैकी होते.

**४८.** आणि इस्माईल, यसअ आणि जुलकिफ्ल यांचेही वर्णन करा. हे सर्व नेक लोक होते.

**४९.** हा उपदेश आहे आणि विश्वास करा की नेक सदाचारी लोकांसाठी सर्वांत उत्तम स्थान आहे.

**५०.** अर्थात सदैव काळ राहणारी जन्नत, ज्यांची दारे त्यांच्यासाठी खुली आहेत.

**५१.** ज्यांच्यात ते (मोठ्या चैनीने) तक्के लावून बसले असतील. वेगवेगळ्या प्रकारचे मेवे (फळे) आणि अनेक प्रकारची पेये मागत असतील.

**५२.** आणि त्यांच्याजवळ नजर खाली ठेवणाऱ्या समवयस्क हूर (पऱ्या) असतील.

**५३.** हीच ती गोष्ट जिचा वायदा तुम्हाला हिशोबाच्या दिवसाकरिता दिला जात होता.

**५४.** नि:संशय, ही आजिविका, आमचा (विशेष) उपहार आहे, जी कधीही संपणार नाही.

**५५.** हा तर झाला मोबदला (लक्षात ठेवा की) विद्रोही लोकांकरिता मोठे वाईट स्थान आहे.

**५६.** जहन्नम आहे, ज्यात ते दाखल होतील (अरेरे!) किती वाईट बिछोना आहे.

**५७.** हे आहे, त्यांनी ते चाखावे, गरम (उकळते) पाणी आणि पू.

**५८.** आणि काही इतर प्रकारच्या शिक्षा.

**५९.** हा एक समुदाय आहे, जो तुमच्यासोबत (आगीत) जाणार आहे. त्यांच्यासाठी कसलीही स्वागत नाही. हेच जहन्नममध्ये जाणार आहेत.

**६०.** (ते) म्हणतील की, किंबहुना तुम्हीच ते आहात ज्यांच्यासाठी कसलेही स्वागत

नाही. तुम्हीच तर यास आधीपासूनच आमच्यासमोर आणून ठेवले होते. तेव्हा राहण्याचे मोठे वाईट स्थान आहे.

**६१.** (ते) म्हणतील की हे आमच्या पालनकर्त्या! ज्याने ती (कुफ्रची प्रथा) आमच्यासाठी सर्वांत प्रथम सुरू केली असेल, त्याच्यासाठी जहन्नमची शिक्षा दुप्पट कर.

**६२.** आणि (जहन्नमवासी) म्हणतील की, हे काय! आम्हाला ते लोक दिसून येत नाहीत, ज्यांची गणना आम्ही वाईट लोकांमध्ये करीत होतो.

**६३.** काय आम्हीच त्यांना थट्टा-मस्करी बनवून ठेवले होते की आमचे डोळे त्यांच्यापासून बहकून गेले आहेत.

**६४.** निःसंशय, जहन्नमवाल्यांचे हे भांडण अवश्य होईल.

**६५.** सांगा की मी तर केवळ एक खबरदार करणारा आहे आणि एकमेव जबरदस्त अल्लाहखेरीज दुसरा कोणीही उपासनेस पात्र नाही.

**६६.** जो स्वामी व पालनकर्ता आहे आकाशांचा आणि धरतीचा, आणि जे काही त्यांच्या दरम्यान आहे, तो मोठा जबरदस्त (महान) आणि मोठा माफ करणारा आहे.

**६७.** सांगा की ही फार मोठी खबर आहे.

**६८.** तिच्यापासून तुम्ही तोंड फिरवित आहात.

**६९.** मला त्या उच्च पदस्थ फरिश्त्यां (च्या संभाषणा) चे किंचितही ज्ञान नाही, जेव्हा ते भांडण करीत होते.

**७०.** माझ्याकडे केवळ हीच वहयी केली जाते की मी तर स्पष्टपणे सावध करणारा आहे.

**७१.** जेव्हा तुमच्या पालनकर्त्या (अल्लाह) ने फरिश्त्यांना सांगितले, मी मातीपासून मानवाला निर्माण करणार आहे.

**७२.** तर जेव्हा मी त्याला यथायोग्य करीन आणि त्याच्यात आपला आत्मा फुंकीन, तेव्हा तुम्ही सर्व त्याच्यासमोर सजदा करा[१] (माथा टेका)

(१) हा सजदा (माथा टेकणे) आभार किंवा आदराप्रित्यर्थ आहे, उपासनेचा सजदा नाही. आदर-सन्मानाचा हा सजदा पूर्वी उचित होता. यास्तव अल्लाहने सर्व फरिश्त्यांना, आदमला सजदा

**७३.** तेव्हा सर्व फरिश्त्यांनी सजदा केला.

**७४.** परंतु इब्लिसने (केला नाही) त्याने घमेंड केली आणि तो इन्कार करणाऱ्यांपैकी होता.

**७५.** (अल्लाहने) फर्माविले की हे इब्लिस! त्याला (आदमला) सजदा करण्यापासून तुला कोणत्या गोष्टीने रोखले, ज्याला मी आपल्या हातांनी बनविले, काय तू गर्विष्ठ झाला आहेस की तू उच्च दर्जा राखणाऱ्यांपैकी आहेस?

**७६.** (त्याने) उत्तर दिले की मी याच्यापेक्षा अधिक श्रेष्ठ आहे, तू मला आगीपासून निर्माण केले आणि याला मातीपासून निर्माण केले.

**७७.** फर्माविले की तू येथून निघून जा, तू तिरस्कृत (धिःक्कारित) झाला.

**७८.** आणि कयामतच्या दिवसापर्यंत तुझा माझ्यातर्फे धिःक्कार आहे.

**७९.** तो म्हणाला, हे माझ्या स्वामी! मला त्या दिवसापर्यंत सवड प्रदान कर, जेव्हा लोक (जिवंत करून) उठविले जातील.

**८०.** (अल्लाहने) फर्माविले, तू सवड दिल्या जाणाऱ्यांपैकी आहेस.

**८१.** निर्धारित वेळेच्या दिवसापर्यंत .

**८२.** म्हणाला, मग तर तुझ्या प्रतिष्ठेची शपथ! मी या सर्वांना अवश्य भटकवीन.

**८३.** मात्र तुझ्या त्या दासांखेरीज, जे निवडक (आणि प्रिय, पवित्र) असतील.

**८४.** फर्माविले, सत्य हेच आहे आणि मी सत्यच सांगत असतो.

**८५.** की मी तुझ्याद्वारे आणि तुझ्या सर्व अनुयायींद्वारे जहन्नमला भरून टाकेन.

**८६.** सांगा की मी याबद्दल तुमच्याकडून कसलाही मोबदला मागत नाही आणि आणि मी

---

करण्याचा आदेश दिला. आता इस्लाम धर्मात सन्मानपूर्वक सजदा कोणाकरिताही उचित नाही. हदीसमधील उल्लेखानुसार पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांनी फर्माविले, ''जर हे उचित असते तर मी पत्नीला आदेश दिला असता की तिने आपल्या पतीला सजदा करावा.'' (मिश्कात, किताबुन्निकाह बाबु इशतिन्निसाए, संदर्भ तिर्मिजी, अलबानीच्या मते आपल्या साक्षींच्या आधारावर हे हदीसवचन खरे (उचित) आहे.)

बनावट करणाऱ्यांपैकी नाही.

**८७.** हा तर सर्व जगवाल्यांकरिता परिपूर्ण उपदेश आणि स्मरण आहे.

**८८.** निःसंशय, तुम्ही याची वास्तविकता थोड्याच काळानंतर (उचितरित्या) जाणून घ्याल.

---

# सूरह जुमर - ३९

सूरह जुमर* मक्का येथे अवतरित झाली आणि यात पंच्याहत्तर आयती आणि आठ रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** या ग्रंथाला अवतरित करणे अल्लाहतर्फे आहे, जो मोठा वर्चस्वशाली, आणि हिकमत बाळगणारा आहे.

**२.** निःसंशय, आम्ही हा ग्रंथ सत्यासह तुमच्याकडे अवतरित केला आहे, तेव्हा तुम्ही केवळ अल्लाहचीच भक्ती - उपासना करा, त्याच्याचकरिता दीन (धर्मा) ला विशुद्ध करीत.

**३.** ऐका! अल्लाहच्याचकरिता विशुद्ध (निर्भेळ) उपासना करणे आहे,[1] आणि ज्या

---

*** भाष्य सूरह जुमर :** हदीसमधील उल्लेखानुसार पैगंबर सल्लल्लाहु अलेहि वसल्लम रोज रात्री 'सूरह बनी इस्राईल' आणि 'सूरह जुमर'चा पाठ करीत असत. (सहीह तिर्मिजीमध्ये अलबानीने सहीह (प्रमाणदृष्ट्या उचित) म्हटले आहे.)

(१) इथे त्याचीच उपासना निखालसपणे करण्यावर जोर दिला गेला आहे, ज्याचा आदेश या आधीच्या आयतीत आहे की उपासना व आज्ञापालन केवळ एक अल्लाहचाच अधिकार आहे. ना त्याच्या उपासनेत दुसऱ्या कोणाला भागीदार बनविणे वैध आहे, ना आज्ञा पालनाचाही त्याच्याखेरीज दुसरा कोणी हक्कदार आहे. परंतु पैगंबर सल्लल्लाहु अलेहि वसल्लम यांच्या आज्ञा पालनास स्वतः अल्लाहनेच आपले आज्ञापालन म्हटले आहे, तेव्हा पैगंबर (स.) सल्लल्लाहु अलेहि वसल्लम यांचा आज्ञाधारक अल्लाहचाच आज्ञाधारक आहे, दुसऱ्या कोणाचा नाही. तसेच उपासनेत ही गोष्ट नाही. यासाठी की उपासना अल्लाहखेरीज एखाद्या मोठ्यात मोठ्या पैगंबराचीही वैध नाही, तर सर्वसामान्य माणसाची कोठून? ज्यांना लोकांनी मनमानी करून अल्लाहच्या हक्क व अधिकारांचा मालक बनवून ठेवले आहे. 'माअन्जुलल्लाहु बिहा मिन सुलतान.' ''अल्लाहतर्फे या संदर्भात कोणतेही प्रमाण नाही.''

लोकांनी त्याच्याखेरीज अवलिया बनवून ठेवले आहेत (आणि असे म्हणतात) की आम्ही यांची उपासना केवळ एवढ्यासाठी करतो की हे (बुजुर्ग, थोर) आम्हाला अल्लाहच्या निकट करतील, हे लोक ज्या गोष्टीबाबत मतभेद करीत आहेत, तिचा (न्यायसंगत) फैसला अल्लाह स्वतः करील, खोट्या आणि कृतघ्न लोकांना अल्लाह मार्ग दाखवित नाही.

**४.** जर अल्लाहने संततीच इच्छिली असती, तर आपल्या निर्मितीमधून ज्याला इच्छिले असते त्याची निवड केली असती (परंतु) तो तर पवित्र (व्यंग-दोषविरहित) आहे. तोच अल्लाह आहे एक आणि शक्ती - सामर्थ्य राखणारा.

**५.** खूप चांगल्या पद्धतीने त्याने आकाशांची आणि धरतीची निर्मिती केली. तो रात्रीला दिवसावर आणि दिवसाला रात्रीवर गुंडाळतो आणि त्याने सूर्य व चंद्राला कार्यरत केले आहे. प्रत्येक निर्धारित अवधीपर्यंत चालत आहे. विश्वास करा की तोच वर्चस्वशाली आणि अपराधांना माफ करणारा आहे.

**६.** त्याने तुम्हा सर्वांना एकाच जिवापासून निर्माण केले, मग त्यापासून त्याची जोडी निर्माण केली आणि तुमच्याकरिता जनावरांपैकी आठ जोडे (नर-मादा) अवतरित केले. तो तुम्हाला तुमच्या मातांच्या गर्भामध्ये एका स्वरूपानंतर दुसऱ्या स्वरुपात घडवितो, तीन तीन अंधारामध्ये हाच अल्लाह तुमचा रब (स्वामी व पालनकर्ता) आहे त्याच्याचकरिता राज्यसत्ता आहे, त्याच्याखेरीज कोणीही उपास्य नाही. मग तुम्ही कोठे भटकत जात आहात ?

**७.** जर तुम्ही कृतघ्नता कराल तर (लक्षात ठेवा की) अल्लाह तुम्हा सर्वांपासून निःस्पृह आहे आणि तो आपल्या दासांच्या कृतघ्नतेने खूश नाही आणि जर तुम्ही कृतज्ञता व्यक्त कराल तर तो त्यास तुमच्यासाठी पसंत करील आणि कोणीही कोणाचे ओझे उचलणार नाही, मग तुम्हा सर्वांचे परतणे तुमच्या पालनकर्त्याकडेच आहे, तो तुम्हाला दाखवून देईल, जे काही तुम्ही करत होते. निःसंशय, तो मनातल्या गोष्टी देखील जाणतो.

**८.** आणि माणसाला जेव्हा एखादे दुःख पोहोचते, तेव्हा तो खूप ध्यान एकवटून आपल्या पालनकर्त्यास पुकारतो. मग जेव्हा अल्लहा आपल्याकडुन त्याला सुख प्रदान करतो तो याच्यापूर्वी जी दुआ - प्रार्थना करीत होता, तिला पूर्णपणे विसरतो, आणि अल्लाहचे

भागीदार ठरवू लागतो. ज्याद्वारे (इतरांनाही) त्याच्या मार्गापासून विचलित करावे. (तुम्ही) सांगा की आपल्या कुफ्र (सत्य-विरोधा) चा फायदा आणखी काही दिवस उचलून घ्या, (शेवटी) तू जहन्नमवासींपैकी होणार आहेस.

**९.** काय तो मनुष्य, जो रात्रीच्या वेळी सजदा आणि उभे राहण्याच्या अवस्थेत उपासना करण्यात घालवित असेल, आखिरतचे भय बाळगत असेल आणि आपल्या पालनकर्त्याच्या दया - कृपेची आस बाळगत असेल, आणि तो, जो याच्या उलट असेल, समान असू शकतात, बरे हे सांगा की विद्वान आणि अज्ञानी दोघे समान आहेत ? निःसंशय, बोध तर तेच प्राप्त करतात, जे बुद्धिमान असतील.

**१०.** सांगा, (अल्लाह फर्मावितो) की हे माझ्या ईमान राखणाऱ्या दासांनो! आपल्या पालनकर्त्याचे भय बाळगत राहा. जे या जगात सत्कर्म करीत राहतात त्याच्यासाठी उत्तम मोबदला आहे आणि अल्लाहची धरती मोठी विशाल (विस्तृत) आहे. धीर संयम राखणाऱ्यांनाच त्यांचा पुरेपूर अगणित मोबदला दिला जातो.

**११.** (तुम्ही) सांगा की, मला हा आदेश दिला गेला आहे की अल्लाहची अशा प्रकारे उपासना करावी की त्याच्याचकरिता उपासनेला विशुद्ध (निर्भेळ) करून.

**१२.** आणि मला आदेश दिला गेला आहे की मी सर्वांत प्रथम आज्ञाधारक (मुस्लिम) व्हावे.

**१३.** सांगा की मला तर आपल्या पालनकर्त्या (अल्लाह) ची अवज्ञा करताना मोठ्या दिवसाच्या अज़ाब (शिक्षा - यातने) चे भय वाटते.

**१४.** सांगा की मी तर अगदी सचोटीने (निखालसपणे) केवळ अल्लाहचीच उपासना करतो.

**१५.** तुम्ही त्याच्याखेरीज वाटेल त्याची भक्ती - उपासना करीत राहा, सांगा की वस्तुतः तोट्यात तेच आहेत, जे स्वतःला आणि आपल्या कुटुंबियांना कयामतच्या दिवशी हानीग्रस्त करतील. लक्षात ठेवा, उघड स्वरूपाचा तोटा हाच आहे.

**१६.** त्यांना वरून-खालून आगीच्या ज्वाला छतासारख्या झाकत असतील. हाच अज़ाब होय, ज्यापासून अल्लाह आपल्या दासांना भय दाखवित आहे. हे माझ्या दासांनो! माझे भय बाळगत राहा.

**१७.** आणि जे लोक अल्लाहखेरीज तागूत (इतरां) ची उपासना करण्यापासून अलिप्त राहिले आणि तन-मनपूर्वक अल्लाहकडे आकर्षित राहिले, ते शुभ-समाचाराचे हक्कदार आहेत. तेव्हा माझ्या दासांना खूशखबर ऐकवा.

**१८.** जे लोक कथनास कान लावून (लक्ष्यपूर्वक) ऐकतात, मग जी मोठी चांगली गोष्ट असेल, तिच्यानुसार आचरण करतात, हेच ते लोक होत, ज्यांना अल्लाहने मार्गदर्शन केले आहे आणि हेच लोक बुद्धिमानही आहेत.

**१९.** बरे, ज्या माणसाला अज़ाब (शिक्षे) चे फर्मान लागू झाले आहे तर काय तुम्ही त्याला, जो जहन्नमध्ये आहे, सोडवू शकता ?

**२०.** मात्र ते लोक, जे आपल्या पालनकर्त्याचे भय बाळगत राहिले, त्यांच्यासाठी उच्च घरे आहेत. ज्यांच्यावर देखील मजले बनले आहेत आणि त्यांच्या खाली जलप्रवाह (झरे) वाहत आहेत. हा अल्लाहचा वायदा आहे आणि तो वचन भंग करीत नाही.

**२१.** काय तुम्ही नाही पाहिले की अल्लाह आकाशातून पाणी अवतरित करतो आणि त्यास जमिनीच्या झऱ्यांमध्ये पोहचवितो, मग त्याच्याचद्वारे अनेक प्रकारची शेती उगवितो, मग ती (शेते) सुकतात आणि तुम्ही त्यांना पिवळ्या रंगात पाहतात, मग त्यांचा अगदी चुराडा करून टाकतो. यात बुद्धिमानांकरिता मोठा बोध आहे.

**२२.** काय तो मनुष्य ज्याची छाती (हृदय) अल्लाहने इस्लामकरिता खुली केली आहे, तर तो आपल्या पालनकर्त्यातर्फे एका नूर (प्रकाशा) वर आहे, आणि सर्वनाश आहे त्या लोकांकरिता, ज्यांची हृदये अल्लाहच्या स्मरणाने (प्रभावित होत नाही, किंबहुना) कठोर झाली आहेत. हे लोक पूर्णतः मार्गभ्रष्टतेत पडले आहेत.

**२३.** अल्लाहने सर्वांत उत्तम वाणी अवतरित केली आहे, जो असा ग्रंथ आहे की आपसात मिळताजुळता आणि वारंवार पुनरावृत्ती केलेल्या आयतींचा आहे, ज्याद्वारे त्या लोकांच्या शरीरांचा थरकाप होतो, जे आपल्या पालनकर्त्याचे भय राखतात. शेवटी त्यांची शरीरे आणि हृदये अल्लाहच्या नामःस्मरणाकडे (कोमल होऊन) झुकतात. हे आहे अल्लाहचे मार्गदर्शन. ज्याच्याद्वारे तो ज्याला इच्छितो सत्य-मार्गाला लावतो, आणि ज्याला अल्लाहच मार्गाचा विसर पाडील तर त्याला मार्ग दाखविणारा कोणी नाही.

**२४.** बरे, जो मनुष्य कयामतच्या दिवसाच्या फार अधिक वाईट शिक्षा-यातनांची ढाल

आपल्या चेहऱ्याला बनविल (तर अशा) अत्याचारी लोकांना सांगितले जाईल की आपल्या कृत कर्मांची गोडी चाखा.

**२५.** त्यांच्यापूर्वी होऊन गेलेल्या लोकांनीही खोटे ठरविले, मग त्यांच्यावर तेथून अज़ाब येऊन कोसळला, जेथून (येण्याचे) त्यांना अनुमानही नव्हते.

**२६.** आणि अल्लाहने त्यांना या जगाच्या जीवनात अपमानाची गोडी चाखवली आणि अजून आखिरतचा अजाब तर मोठा सक्त आणि कठोर आहे. या लोकांनी हे समजून घेतले असते तर!

**२७.** निश्चितच आम्ही या कुरआनात लोकांकरिता प्रत्येक प्रकारचे उदाहरण सांगितले आहे. संभवतः त्यांनी बोध प्राप्त करून घ्यावा.

**२८.** अरबी भाषेत कुरआन आहे, ज्यात कसलीही वक्रता नाही, संभवतः त्यांनी संयम (दुराचारापासून अलिप्तता) अंगिकारावा.

**२९.** अल्लाह एक उदाहरण निवेदन करीत आहे की एक असा मनुष्य, ज्यात अनेक आपसात भिन्नता राखणारे भागीदार आहेत आणि दुसरा तो मनुष्य, जो फक्त एकाचाच दास आहे. काय हे दोघे गुणवैशिष्ट्यात एकसमान आहेत?[१] सर्व प्रशंसा अल्लाहकरिता आहे. वास्तविक, त्यांच्यापैकी अधिकांश लोक जाणत नाहीत.

**३०.** निःसंशय, स्वतः तुम्हालाही मृत्यु येईल आणि हे सर्व देखील मरण पावणार आहेत.[२]

**३१.** मग तुम्ही सर्वच्या सर्व कयामतच्या दिवशी आपल्या पालनकर्त्यासमोर तंटा-विवाद

---

(१) यात अनेकेश्वरवादी आणि एकेश्वरवादीचे उदाहरण दिले गेले आहे. अर्थात असा एक गुलाम, जो अनेक मालकांचा दास आहे, जे आपसात भांडत असतात आणि एक दुसरा गुलाम, ज्याचा केवळ एकच मालक आहे. त्याच्या मिळकतीत त्याचा कोणीही भागीदार नाही, तर काय हे दोन्ही गुलाम समान ठरू शकतात? नाही, कदापि नाही. त्याचप्रमाणे तो अनेकेश्वरवादी जो अल्लाहसोबत इतर उपास्यांचीही उपासना करतो आणि दुसरा निखालस ईमान राखणारा जो फक्त अल्लाहची उपासना करतो व त्याच्यासोबत कोणालाही सहभागी बनवित नाही, दोघे समान ठरू शकत नाही.

(२) अर्थात हे पैगंबर! तुम्ही स्वतःही आणि तुमचे विरोधकही मेल्यानंतर या जगातून आमच्याजवळ आखिरत (परलोका) मध्ये येतील नश्वर जगात तर एकेश्वरवाद आणि अनेकेश्वरवादचा फैसला तुमच्या दरम्यान होऊ शकला नाही आणि तुम्ही याविषयी आपसात भांडत राहिले, परंतु या ठिकाणी मी याचा

कराल.

३२. त्याहून जास्त अत्याचारी कोण आहे, जो अल्लाहच्या संबंधाने खोटे बोलेल आणि सत्य (धर्म) त्याच्याजवळ आला असता, तो त्यास खोटे असल्याचे सांगेल? काय अशा काफिरांचे ठिकाण जहन्नम नव्हे?

**३३.** आणि जे लोक सत्य (धर्म) घेऊन आले, आणि ज्यांनी त्यास सत्य जाणले, हेच लोक अल्लाहचे भय बाळगणारे आहेत.

**३४.** त्यांच्यासाठी, त्याच्या पालनकर्त्याजवळ ती प्रत्येक गोष्ट आहे, जी ते इच्छितील नेक सदाचारी लोकांचा हाच मोबदला आहे.

**३५.** यासाठी की अल्लाहने त्यांच्यापासून त्यांच्या दुष्कर्मांना दूर करावे आणि जी सत्कर्मे त्यांनी केली आहेत, त्यांचा उत्तम मोबदला त्यांना प्रदान करावा.

**३६.** काय अल्लाह आपल्या दासांकरिता पर्याप्त नाही? हे लोक तुम्हाला अल्लाहखेरीज इतरांचे भय दाखवित आहेत, आणि ज्याला अल्लाह मार्गभ्रष्ट करील, त्याला मार्ग दाखविणारा कोणीही नाही.

**३७.** आणि ज्याला अल्लाह मार्गदर्शन प्रदान करील, त्याला कोणी मार्गभ्रष्ट करणारा नाही. काय अल्लाह वर्चस्वशाली आणि प्रतिशोध घेणार नाही?

**३८.** जर तुम्ही त्यांना विचाराल की आकाशांना व धरतीला कोणी निर्माण केले आहे, तर ते निश्चित हेच उत्तर देतील की अल्लाहने! तुम्ही त्यांना सांगा की, बरे हे तर सांगा की ज्यांना तुम्ही अल्लाहखेरीज पुकारता, जर अल्लाह मला नुकसान पोहोचवू इच्छिल,

---

फैसला करीन आणि विशुद्ध एकेश्वरवाद बाळगणाऱ्यांना जन्नतमध्ये आणि इन्कार करणाऱ्या खोट्या अनेकेश्वरवाद्यांना जहन्नमध्ये टाकीन. या आयतीद्वारे पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्या मृत्युचा पुरावा मिळतो. जसा सूरह आले इम्रानच्या आयत क्र. १४४ द्वारेही मिळतो आणि याच आयतीपासून अर्थ काढून हजरत अबु बक्र सिद्दीक यांनी पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांचा मृत्यु सिद्ध केला. यास्तव नबी सल्लल्लाहु अलैहि वसल्लम याच्याविषयीही श्रद्धा राखणे की त्यांना बरजख (मृत्युनंतर कयामतपावेतोच्या दरम्यानचा अवधी) मध्ये तसेच जीवन लाभले आहे जसे जिवंत पाणी जगात लाभले होते, पवित्र कुरआनच्या विपरित आहे. त्यांचाही अन्य माणसांसारखा मृत्यु झाला. त्यांनाही गाडले गेले. कबरीत त्यांना बरजख (दरम्यान) चे जीवन अवश्य लाभले आहे ज्याच्या अवस्थेचे ज्ञान आम्हाला नाही, परंतु कबरीत त्यांना दुसऱ्यांदा या जगाचे जीवन दिले गेले नाही.

तर काय हे त्याच्या नुकसानाला हटवू शकतात किंवा जर अल्लाह माझ्यावर कृपा करू इच्छित असेल तर काय हे त्याच्या कृपेला अडवू शकतात? (तुम्ही) सांगा की अल्लाह (महान) मला पुरेसा आहे. भरवसा राखणारे त्याच्यावरच भरवसा राखतात.

**३९.** सांगा की, हे माझ्या जनसमुदाया (उम्मत) च्या लोकांनो! तुम्ही आपल्या जागी कर्म करीत राहा, मी आपल्या जागी कर्म करीत आहे.[१] लवकरच तुम्ही (परिणाम) जाणून घ्याल.

**४०.** की कोणावर अपमानित करणारा अज़ाब अवतरतो आणि कोणावर निरंतर (कायमस्वरुपी) अपमानित करणारा अज़ाब अवतरित होतो.

**४१.** निःसंशय, आम्ही तुमच्यावर सत्यासह हा ग्रंथ लोकांसाठी अवतरित केला आहे, तेव्हा जो मनुष्य सरळ मार्गावर येईल तर ते त्याच्या स्वतःच्या (फायद्या) करिता आहे आणि जो मार्गभ्रष्ट होईल तर त्याच्या मार्गभ्रष्टतेचे ओझे त्याच्याच (शिरा) वर आहे. तुम्ही त्यांच्याबाबत जबाबदार नाही.

**४२.** अल्लाहच जीवांना (आत्म्यांना) त्यांच्या मृत्युसमयी आणि ज्यांचा मृत्यु आला नाही त्यांना त्यांच्या निद्रावस्थेत काबीज करून घेतो, मग ज्यांच्या मृत्युचा आदेश दिला गेला आहे, त्यांना तो रोखून घेतो आणि इतर (आत्म्यांना) एका निर्धारित वेळेपर्यंत सोडून देतो. विचार चिंतन करणाऱ्यांसाठी यात निश्चितपणे अनेक निशाण्या आहेत.

**४३.** काय त्या लोकांनी अल्लाहखेरीज (दुसऱ्यांना) शिफारस करणारे निर्धारित करून ठेवले आहेत? (तुम्ही) सांगा की मग ते काहीच हक्क राखत नसले तरी आणि काही अक्कल राखत नसले तरीही?

**४४.** सांगा की सर्व शिफारसींचा मालक अल्लाहच आहे. सर्व आकाशांचे आणि धरतीचे राज्य त्याच्याचकरिता आहे, मग तुम्ही सर्व त्याच्याचकडे परतविले जाल.

**४५.** आणि जेव्हा एकमेव अल्लाहचे वर्णन केले जाते तेव्हा त्या लोकांची हृदये तिरस्कार करू लागतात, जे आखिरतवर ईमान राखत नाहीत, आणि जेव्हा

---

(१) अर्थात जर तुम्ही माझे एकेश्वरवादाचे आवाहन मान्य करीत नाही, ज्यासह अल्लाहने मला पाठविले आहे तर ठीक आहे, तुमची मर्जी तुम्ही आपल्या अवस्थेत राहा, जिच्यात तुम्ही आहात, मी त्या अवस्थेत राहतो, जिच्यात अल्लाहने मला ठेवले आहे.

त्याच्याखेरीज (इतरां) चे वर्णन केले जाते, तेव्हा त्यांची हृदये स्पष्टतः आनंदित होतात.[१]

**४६.** (तुम्ही) सांगा की हे अल्लाह! आकाशांना आणि धरतीला निर्माण करणाऱ्या, लपलेल्या व उघड गोष्टी जाणणाऱ्या! तूच आपल्या दासांच्या दरम्यान त्या गोष्टींचा फैसला करशील, ज्या गोष्टींमध्ये ते मतभेद करीत होते.

**४७.** आणि अत्याचारी लोकांजवळ जर ते सर्व काही असावे जे धरतीवर आहे, आणि त्यासोबत आणखी तेवढेच असावे तरी देखील कठोर शिक्षा यातनेच्या मोबदल्यात कयामतच्या दिवशी हे सर्व काही देऊन टाकतील, आणि त्यांच्यासमोर अल्लाहतर्फे असे जाहीर होईल ज्याचे त्यांनी अनुमानही केले नव्हते.

**४८.** आणि जे काही (कर्म) त्यांनी केले होते, त्याची दुष्परिणती त्यांच्यावर उघड होईल आणि ज्या गोष्टीची ते थट्टा उडवित होते, ती त्यांना येऊन घेरील.

**४९.** माणसाला जेव्हा एखादे दुःख यातना पोहोचते तेव्हा तो आम्हाला पुकारतो, मग जेव्हा आम्ही त्याला आपल्यातर्फे एखादे सुखप्रदान करतो, तेव्हा म्हणू लागतो की हे तर मला केवळ आपल्या अक्कल हुशारीमुळे प्रदान केले गेले आहे, किंबहुना ही कसोटी आहे, परंतु त्यांच्यापैकी बहुतेक लोक हे जाणत नाहीत.

**५०.** यांच्या पूर्वीचे लोक देखील हीच गोष्ट बोलले आहेत, तेव्हा त्यांची कृत कर्मे त्यांच्या काहीच उपयोगी पडली नाहीत.

**५१.** मग त्यांच्या (कर्मांची) समस्त दुष्परिणती त्यांच्यावर येऊन कोसळली आणि यांच्यापैकी जे दुराचारी आहेत, त्यांच्या कृत-कर्मांची दुष्परिणतीही आता त्यांच्यावर येऊन कोसळेल. हे (आम्हाला) परास्त करणारे नाहीत.

---

(१) होय. जेव्हा असे म्हटले जाते की अमुक अमुक देखील उपास्य आहे, किंवा ते देखील अल्लाहचे नेक सदाचारी दास आहेत. ते सुद्धा काही हक्क राखतात, तेही संकट दूर करणारे आहेत, गरजपूर्ती करणारे आहेत, तेव्हा हे अनेकेश्वरवादी खूश होतात. मार्गभ्रष्ट लोकांची आज हीच अवस्था आहे, जेव्हा त्यांना सांगितले जाते की, केवळ 'हे अल्लाह, मदद' असे म्हणा, कारण अल्लाहखेरीज दुसरा कोणी मदत करणारा नाही. तेव्हा क्रोधित होतात. हे बोलणे त्यांना मोठे वाईट वाटते, परंतु जेव्हा 'या अली मदद', 'या रसूल मदद' म्हटले जाते, त्याचप्रमाणे इतर मरण पावलेल्यांकडून मदत मागितली जाते, त्यांच्या नावाने आर्जव केले जाते, उदा. 'या शेख अब्दुल कादिर शेअन लिल्लाह' वगैरे तर मग त्यांची मने आनंदविभोर होतात.

**५२.** काय त्यांना हे नाही माहीत की अल्लाह ज्याच्यासाठी इच्छितो आजिविका वाढवितो आणि ज्याच्यासाठी इच्छितो मोजून मापून देतो, ईमान राखणाऱ्यांकरिता यात मोठमोठ्या निशाण्या आहेत.

**५३.** (माझ्यातर्फे) सांगा की, हे माझ्या दासांनो! ज्यांनी आपल्या प्राणांवर अत्याचार केला आहे, तुम्ही अल्लाहच्या कृपेपासून निराश होऊ नका. निःसंशय, अल्लाह समस्त अपराधांना माफ करतो. वस्तुतः तो मोठा माफ करणारा, मोठा दया करणारा आहे.

**५४.** आणि तुम्ही सर्व आपल्या पालनकर्त्याकडे झुका आणि त्याचे आज्ञापालन करीत राहा, यापूर्वी की तुमच्याजवळ अज़ाब येऊन पोहचावा, मग तुमची मदत न केली जावी.

**५५.** आणि अनुसरण करा त्या सर्वांत उत्तम गोष्टीचे, जी तुमच्याकडे तुमच्या पालनकर्त्यातर्फे अवतरित केली गेली आहे, यापूर्वी की तुमच्यावर अचानक अल्लाहची शिक्षा यातना यावी आणि तुम्हाला खबरही न व्हावी.

**५६.** (असे न व्हावे की) एखाद्या माणसाने म्हणावे की, अरेरे! खेद आहे या गोष्टीवर की मी अल्लाहच्या बाबतीत सुस्ती केली, किंबहुना मी थट्टा उडविणाऱ्यांमध्येच राहिलो.

**५७.** किंवा म्हणावे की जर अल्लाहने मला मार्ग दाखविला असता तर मी देखील अल्लाहचे भय राखणाऱ्यांपैकी राहिलो असतो.

**५८.** किंवा शिक्षा यातनांना पाहून म्हणू लागावे, कशाही प्रकारे माझे परत जाणे झाले असते तर मी देखील नेक सदाचारी लोकांपैकी राहिलो असतो.

**५९.** का नाही? निश्चितच तुमच्याजवळ माझ्या आयती पोहचल्या होत्या ज्यांना तू खोटे ठरविले आणि घमेंड (व गर्व) केला आणि तू काफिर (सत्यविरोधक) लोकांपैकीच होतास.

**६०.** आणि ज्या लोकांनी अल्लाहविषयी असत्य रचले आहे, तर तुम्ही पाहाल की कयामतच्या दिवशी त्यांचे चेहरे काळे झाले असतील. काय घमेंड करणाऱ्यांचे ठिकाण जहन्नममध्ये नाही?

**६१.** आणि ज्या लोकांनी अल्लाहचे भय (तकवा) बाळगले, त्यांना अल्लाह त्यांच्या सफलतेसह वाचविल, त्यांना एखादे दुःख स्पर्शही करू शकणार नाही आणि ना ते कशाही प्रकारे दुःखी होतील.

**६२.** अल्लाह समस्त वस्तूंचा निर्माणकर्ता आहे, आणि तोच प्रत्येक वस्तूचा संरक्षक आहे.

**६३.** आकाशांच्या आणि धरतीच्या चाव्यांचा मालक तोच आहे ज्या ज्या लोकांनी अल्लाहच्या आयतींचा इन्कार केला आहे, तेच नुकसान भोगणारे आहेत.

**६४.** (तुम्ही) सांगा की हे मूर्खांनो! काय तुम्ही मला, अल्लाहखेरीज इतरांची उपासना करण्यास सांगता?

**६५.** आणि निःसंशय, तुमच्याकडेही आणि तुमच्यापूर्वीच्या (सर्व पैगंबरां) कडेही वहयी केली गेली आहे की जर तुम्ही शिर्क (अल्लाहखेरीज दुसऱ्यांची भक्ती उपासना) केल्यास, निश्चितच तुमचे सर्व कर्म वाया जाईल आणि खात्रीने तुम्ही नुकसान उचलणाऱ्यांपैकी व्हाल.

**६६.** किंबहुना तुम्ही अल्लाहचीच उपासना करा आणि कृतज्ञता व्यक्त करणाऱ्यांपैकी व्हा.

**६७.** आणि त्या लोकांनी, अल्लाहचा जसा सन्मान करायला पाहिजे होता तसा केला नाही. समस्त धरती, कयामतच्या दिवशी त्याच्या मुठीत असेल आणि संपूर्ण आकाश त्याच्या उजव्या हातात गुंडाळलेले असेल तो मोठा पवित्र आणि अति उच्च आहे, त्या प्रत्येक वस्तू (व गोष्टी) पासून जिला लोक त्याचा सहभागी ठरवितात.

**६८.** आणि सूर (कयामतचा आरंभ दर्शविणारा शंख) फुंकला जाईल, तेव्हा आकाशांमध्ये आणि धरतीत अस्तित्वात असणारे सर्व बेशुद्ध होऊन कोसळतील तथापि ज्याला अल्लाह इच्छिल (तो सलामत राहील), मग दुसऱ्यांदा सूर फुंकला जाईल तेव्हा ते अचानक उभे राहून पाहू लागतील.

**६९.** आणि धरती आपल्या पालनकर्त्याच्या दिव्य तेजाने लख्ख चकाकेल. कर्म-लेख सादर केले जातील. पैगंबरांना आणि साक्षींना आणले जाईल आणि लोकांच्या दरम्यान न्यायपूर्वक फैसले केले जातील आणि त्यांच्यावर अत्याचार केला जाणार नाही.

**७०.** आणि ज्या माणसाने जे काही केले आहे ते त्याला पूर्णपणे दिले जाईल आणि लोक जे काही करीत आहेत ते तो चांगल्या प्रकारे जाणतो.

**७१.** आणि काफिरांचे झुंडच्या झुंड जहन्नमकडे हाकत नेले जातील जेव्हा ते तिच्याजवळ पोहचतील, तिचे दरवाजे त्यांच्यासाठी उघडले जातील आणि तिथले रक्षक त्यांना विचारतील की काय तुमच्या जवळ तुमच्याचमधून रसूल (संदेशवाहक) आले नव्हते? जे तुम्हाला तुमच्या पालनकर्त्यांच्या आयती वाचून ऐकवित होते आणि तुम्हाला या दिवसाच्या भेटीबाबत सावध करीत होते. हे उत्तर देतील की होय! का नाही? परंतु अज़ाब (शिक्षा यातने) चे फर्मान काफिरांना (शेवटी) लागू झाले.

**७२.** फर्माविले जाईल, आता जहन्नमच्या दरवाज्यांमध्ये दाखल व्हा जिथे ते नेहमी राहतील, तेव्हा अवज्ञाकारी लोकांचे ठिकाण मोठे वाईट आहे.

**७३.** आणि जे लोक आपल्या पालनकर्त्याचे भय राखत होते, त्यांचे समूहच्या समूह जन्नतकडे पाठविले जातील, येथेपर्यंत की जेव्हा ते जन्नतजवळ पोहोचतील आणि दरवाजे उघडले जातील,[1] आणि तिथले रक्षक त्यांना म्हणतील की तुमच्यावर सलाम असो, तुम्ही खूश राहा. तर तुम्ही यांच्यात सदैवकाळाकरिता या.

**७४.** आणि हे म्हणतील की, आभारी आहोत अल्लाहचे, ज्याने आपला वायदा पूर्ण केला, आणि आम्हाला या धरतीचा वारस बनविले की जन्नतमध्ये वाटेल तिथे राहावे. तेव्हा सत्कर्म करणाऱ्यांचा किती चांगला मोबदला आहे!

**७५.** आणि तुम्ही फरिश्त्यांना अल्लाहच्या अर्श (सिंहासना) भोवती घेरा बनवित, आपल्या पालनकर्त्याची प्रशंसा आणि पावित्र्याचे गुणगान करताना पाहाल,[2] आणि

---

(१) हदीस वचनातील उल्लेखानुसार जन्नतचे आठ दरवाजे आहेत. त्यापैकी एकाचे नाव 'रय्यान' आहे, ज्यातून केवळ रोजा (व्रत) राखणारेच दाखल होतील. (सहीह बुखारी नं. २२५७, मुस्लिम नं. ८०८) त्याच प्रकारे इतर दरवाज्यांचीही नावे असतील. उदा. नमाजचा दरवाजा, जकातचा दरवाजा, जिहाद (धर्मयुद्धा) चा दरवाजा वगैरे. (सहीह बुखारी किताबुस सेयाम, मुस्लिम-किताबुज जकात) प्रत्येक दरवाज्याची रुंदी चाळीस वर्षांच्या अंतराएवढी असेल, तरीही ते भरगच्च असतील. (सहीह मुस्लिम किताबुज जोहद) सर्वांत प्रथम जन्नतचा दरवाजा ठोठावणारे पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम असतील. (मुस्लिम किताबुल ईमान)

(२) अल्लाहच्या फैसल्यानंतर जेव्हा ईमान राखणारे जन्नतमध्ये आणि काफिर (इन्कारी) व अनेक ईश्वरांची पूजा करणारे जहन्नममध्ये दाखल होतील. आयतीत त्यानंतरची गोष्ट सांगितली गेली आहे की फरिश्ते अल्लाहच्या अर्श (सिंहासना) भोवती घेरा करून अल्लाहची स्तुती - प्रशंसा व त्याच्या पवित्रतेचे गुणगान करण्यात मग्न असतील.

त्यांच्या दरम्यान न्यायपूर्ण फैसला केला जाईल, आणि सांगितले जाईल की समस्त प्रशंसा अल्लाहकरिताच आहे, जो समस्त विश्वाचा स्वामी व पालनकर्ता आहे.

---

## सूरह मोमिन - ४०

सूरह मोमिन मक्का येथे अवतरली आणि यात पंच्याऐंशी आयती आणि नऊ रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** हा. मीम

**२.** या ग्रंथाचे अवतरित करणे, त्या अल्लाहतर्फे आहे जो वर्चस्वशाली आणि ज्ञान बाळगणारा आहे.

**३.** अपराधांना माफ करणारा आणि तौबा (क्षमा -यातना) कबूल करणारा, कठोर शिक्षा - यातना देणारा, उपकार (कृपा) आणि सामर्थ्य बाळगणारा, ज्याच्याखेरीज कोणी उपास्य नाही, त्याच्याचकडे परतावयाचे आहे.

**४.** अल्लाहच्या आयतींमध्ये तेच लोक वाद घालतात, जे काफिर आहेत तेव्हा त्या लोकांचे शहरांमध्ये हिंडणे फिरणे तुम्हाला धोक्यात न टाकावे.

**५.** त्यांच्यापूर्वी नूहच्या जनसमूहाने आणि त्यांच्या नंतरच्या इतर जनसमूहांनी देखील खोटे ठरविले होते आणि प्रत्येक जनसमुदायाने आपल्या पैगंबराला बंदिस्त बनविण्याचा इरादा केला आणि असत्याद्वआरे हटवादीपणा केला, यासाठी की त्याद्वारे सत्याला नष्ट करून टाकावे, तेव्हा मी त्यांना पकडीत घेतले, तर बघा कशी होती माझी शिक्षा!

**६.** आणि या प्रकारे तुमच्या पालनकर्त्याचे फर्मान लोकांवरही लागू झाले. ज्यांनी कुफ्र (इन्कार) केला की ते जहन्नमी आहेत.

**७.** अर्श (अल्लाहच्या सिंहासना) ला उचलून धरणारे आणि त्याच्याभोवती असणारे फरिश्ते आपल्या पालनकर्त्याच्या पवित्रतेचे गुणगान, प्रशंसेसह करतात आणि त्याच्यावर ईमान राखतात आणि ईमान राखणाऱ्यांसाठी क्षमा - याचनेची प्रार्थना

करतात, (म्हणतात) की हे आमच्या स्वामी व पालनकर्त्या! तू प्रत्येक गोष्टीला आपल्या दया आणि ज्ञानाने घेरून ठेवले आहे, तेव्हा तू त्यांना माफ कर, जे माफी मागतील आणि तुझ्या मार्गाचे अनुसरण करतील, आणि तू त्यांना जहन्नमच्या शिक्षा - यातनेपासूनही सुरक्षित ठेव.

**८.** हे आमच्या पालनकर्त्या! तू त्यांना सदैवकाळ राहणाऱ्या जन्नतींमध्ये मध्ये दाखल कर, ज्यांचा तू त्यांना वायदा दिला आहेस, आणि त्यांच्या वाडवडील आणि पत्न्या आणि संततीपैकी (ही) त्या सर्वांना जे नेक सदाचारी आहेत. निःसंशय, तू जबरदस्त व हिकमतशाली आहे.

**९.** आणि त्यांना कुकर्मांपासूनही सुरक्षित ठेव (खरी गोष्ट अशी की) त्या दिवशी ज्याला तू दुष्कर्मांपासून वाचवून घेतले, त्याच्यावर तू निश्चितच दया - कृपा केलीस आणि सर्वांत मोठी सफलता हीच आहे.

**१०.** निःसंशय, ज्या लोकांनी कुफ्र (इन्कार) केला, त्यांना मोठ्या आवाजाने सांगितले जाईल की निश्चितच अल्लाहचे तुमच्यावर नाराज होणे त्याहून फार जास्त आहे, जे तुम्ही नाराज होत होते आपल्या मनाने, जेव्हा तुम्हाला ईमानाकडे बोलविले जात होते, मग तुम्ही कुफ्र (इन्कार) करू लागत असत.

**११.** (ते) म्हणतील, हे आमच्या पालनकर्त्या! तू आम्हाला दुसऱ्यांदा मृत्यु दिला आणि दुसऱ्यांदाच जिवंत केले, आता आम्ही आपले अपराध कबूल करतो. तर काय आता एखादा मार्ग बाहेर पडण्याचाही आहे?

**१२.** ही शिक्षा तुम्हाला एवढ्यासाठी आहे की जेव्हा केवळ एकमेव अल्लाहकडे बोलाविले जात असे, तेव्हा तुम्ही इन्कार करीत आणि जर त्याच्यासोबत दुसऱ्या कोणाला सहभागी करून घेतले जात असे, तेव्हा तुम्ही मान्य करून घेत,[१] तेव्हा आता फैसला, सर्वोच्च आणि सर्वश्रेष्ठ अल्लाहचाच आहे.

**१३.** तोच होय जो तुम्हाला आपल्या निशाण्या दाखवितो, आणि तुमच्यासाठी

(१) हे त्यांना जहन्नममधून न काढले जाण्याचे कारण सांगितले गेले आहे, की तुम्ही जगात असताना अल्लाहच्या तौहीद (एकेश्वरवादा) चा इन्कार करीत असत आणि शिर्क (अनेकेश्वरोपासना) तुम्हाला पसंत होती यास्तव आता जहन्नमच्या कामयस्वरूपी अज़ाब (शिक्षा - यातने) खेरीज तुमच्यासाठी काहीच नाही.

आकाशातून रोजी (आजिविका) अवतरित करतो. बोध केवळ तेच ग्रहण करतात, जे (अल्लाहकडे) झुकतात.

**१४.** तुम्ही अल्लाहला पुकारत राहा, त्याच्यासाठी दीन (धर्मा) ला निखालस करून, मग ते काफिरांना कितीही अप्रिय वाटो!

**१५.** अति उच्च दर्जा बाळगणारा अर्श (ईशसिंहासना) चा स्वामी. तो आपल्या दासांपैकी ज्याच्यावर इच्छितो, वहयी (प्रकाशना) अवतरित करतो, यासाठी की त्याने भेटीच्या दिवशापासून खबरदार करावे.

**१६.** ज्या दिवशी सर्व लोक जाहीर होतील, त्यांची कोणतीही गोष्ट अल्लाहपासून लपून राहणार नाही. आज कोणाचे राज्य आहे? केवळ एकमेवआणि जबरदस्त अशा अल्लाहचे!

**१७.** आज प्रत्येक जीवाला त्याच्या कृत-कर्माचा मोबदला दिला जाईल, आज (कशाही प्रकारचा) अत्याचार नाही. निःसंशय, अल्लाह लवकरच हिशोब घेणार आहे.

**१८.** आणि त्यांना फार जवळ येणाऱ्या (कयामत) विषयी सावध करा, जेव्हा हृदये गळ्यापर्यंत पोहचतील आणि सर्व शांत राहतील, अत्याचारींचा ना कोणी मित्र असेल आणि ना शिफारस करणारा की ज्याचे म्हणणे मान्य केले जावे.

**१९.** तो डोळ्यांच्या बेईमानीला आणि छाती (हृदया) च्या लपलेल्या गोष्टींना (चांगल्या प्रकारे) जाणतो.[१]

**२०.** आणि सर्वश्रेष्ठ अल्लाह अगदी उचित फैसला करेल, आणि त्याच्याखेरीज ज्यांना ज्यांना हे लोक पुकारतात ते कोणत्याही गोष्टीचा फैसला करू शकत नाही. निःसंशय,

---

(१) यात अल्लाहच्या संपूर्ण ज्ञानाचे वर्णन आहे की त्याला प्रत्येक गोष्टीचे ज्ञान आहे, मग ती लहान असो की मोठी, बारीक असो की जाड, उच्च दर्जाची असो की खालच्या दर्जाची. अल्लाहची ही असीम ज्ञानकक्षा लक्षात घेता माणसाने त्याची अवज्ञा करण्यापासून दूर राहिले पाहिजे व खऱ्या अर्थाने त्याचे भय राखावे. डोळ्यांची बेईमानी म्हणजे चोरून पाहणे. उदा. रस्त्याने जाताना एखाद्या सुंदर स्त्रीला तिरप्या नजरेने पाहात राहणे छातीच्या गोष्टी म्हणजे त्या शंकाही येतात, ज्या माणसाच्या मनात उद्‌भवत राहतात. मात्र जोपर्यंत या शंका विचार रूपाने मनात येत जात राहतील तोपर्यंत पकडीत येण्यायोग्य ठरणार नाही, परंतु जेव्हा त्या इराद्याचे रूप धारण करतील तेव्हा मात्र त्याची पकड होऊ शकते. मग तसे करण्याची संधी त्याला मिळो किंवा न मिळो.

अल्लाह चांगल्या प्रकारे ऐकणारा आणि चांगल्या प्रकारे पाहणारा आहे.

**२१.** काय हे लोक जमिनीवर हिंडले फिरले नाहीत की त्यांनी पाहिले असते की जे लोक यांच्यापूर्वी होऊन गेले त्यांचा परिणाम (अंत) कसा झाला. ते शक्ती आणि सामर्थ्य आणि धरतीवर आपली स्मरके सोडून जाण्याच्या आधारावर यांच्या तुलनेत खूप जास्त होते, तरीही अल्लाहने त्यांना त्यांच्या अपराधांपायी धरले आणि असा कोणी होऊन गेला नाही ज्याने त्यांना अल्लाहच्या शिक्षा - यातनांपासून वाचवून घेतले असते.

**२२.** हे या कारणास्तव की त्यांच्याजवळ त्यांचे पैगंबर चमत्कार (मोजिजे) घेऊन येत होते, तेव्हा ते इन्कार करीत असत, मग अल्लाह त्यांना पकडीत घेत असे. निःसंशय, तो मोठा शक्तिशाली आणि सक्त शिक्षा - यातना देणारा आहे.

**२३.** आणि आम्ही मूसा (अलै.) ला आपल्या आयती (निशाण्या) आणि स्पष्ट प्रमाणांसह पाठविले.

**२४.** फिरऔन आणि हामान आणि कारूनकडे, तेव्हा ते म्हणाले की (हा तर) जादूगार आणि खोटारडा आहे.

**२५.** तर जेव्हा त्यांच्याजवळ मूसा (अलै.) आमच्यातर्फे सत्य (धर्म) घेऊन आले, तेव्हा ते म्हणाले की याच्यासोबत जे ईमान राखणारे आहेत, त्यांच्या पुत्रांना ठार मारून टाका आणि कन्यांना जिवंत ठेवा, आणि काफिरांचे जे निमित्त आहे ते मार्गभ्रष्टतेवरच आहे.

**२६.** आणि फिरऔन म्हणाला की मला सोडा की मी मूसाला मारून टाकावे आणि त्याने आपल्या पालनकर्त्याला पुकारावे. मला तर ही भीती वाटते की याने कदाचित तुमचा दीन (धर्म) बदलून न टाकावा किंवा देशात एखादा फार मोठा उत्पात (फसाद) निर्माण न करावा.

**२७.** आणि मूसा (अलै.) म्हणाले की मी आपल्या व तुमच्या पालनकर्त्याच्या शरणात येतो, त्या प्रत्येक घमेंडी माणसाच्या (उपद्रवा) पासून जो (कर्मांच्या) हिशोबाच्या दिवसावर ईमान राखत नाही.

**२८.** आणि एका ईमान राखणाऱ्या माणसाने जो फिरऔनच्या कुटुंबियांपैकी होता,

आणि आपले ईमान लपवून होता, म्हणाला की काय तुम्ही एका माणसाला केवळ या गोष्टीबद्दल ठार करू इच्छिता की तो म्हणतो की माझा स्वामी व पालनकर्ता अल्लाह आहे आणि तुमच्या पालनकर्त्यातर्फे स्पष्ट प्रमाण घेऊन आलो आहे, जर तो खोटा आहे, तर त्याच्या खोटेपणाचे संकट त्याच्यावरच आहे आणि जर तो सच्चा आहे तर तो ज्या (शिक्षा - यातनां) चा वायदा तुम्हाला देत आहे, त्यापैकी एक ना एक तुमच्यावर (नक्कीच) येऊन कोसळेल. अल्लाह, अशा लोकांना मार्ग दाखवित नाही जे मर्यादा ओलांडणारे आणि खोटारडे असावेत.

**२९.** हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! आज तर राज्य तुमचे आहे की तुम्ही या धरतीवर वर्चस्वशाली आहात, परंतु जर अल्लाहचा अज़ाब (प्रकोप) आमच्यावर झाला तर कोण आमची मदत करेल? फिरऔन म्हणाला की मी तर तुम्हाला तोच सल्ला देत आहे, जे स्वतः पाहत आहे आणि मी तर तुम्हाला भलाईचाच मार्ग दाखवित आहे.

**३०.** आणि तो ईमान राखणारा म्हणाला की हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! मला तर हे भय जाणवते की कदाचित तुमच्यावरही तसाच दिवस (अज़ाब) न यावा, जसा दुसऱ्या जनसमूहांवर आला.

**३१.** जशी नूहच्या जनसमूहाची आणि आद व समूद आणि त्यांच्यानंतरच्या समुदायांची (अवस्था झाली) आणि अल्लाह आपल्या दासांवर कोणत्याही प्रकारचा अत्याचार करू इच्छित नाही.

**३२.** आणि हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! मला तर तुमच्याविषयी पुकारल्या जाण्याच्या दिवसाचेही भय आहे.

**३३.** ज्या दिवशी पाठ फिरवून परताल. तुम्हाला अल्लाहपासून वाचविणारा कोणीही नसेल आणि ज्याला अल्लाह मार्गभ्रष्ट करील, त्याला मार्ग दाखविणारा कोणीही नाही.

**३४.** आणि त्यापूर्वी तुमच्याजवळ यूसुफ निशाण्या घेऊन आले. तरीही तुम्ही त्यांनी आणलेल्या निशाण्यांबाबत शंका संशय करीतच राहिले, येथपर्यंत की जेव्हा त्यांचा मृत्यु झाला, तेव्हा तुम्ही म्हणू लागले की त्यांच्यानंतर तर अल्लाह एखादा पैगंबर पाठविणारच नाही. अशा प्रकारे अल्लाह त्या प्रत्येक माणसाला पथभ्रष्ट करतो, जो मर्यादेचे उल्लंघन करणारा आणि शंका - संशय करणारा असावा.

**३५.** जे कसल्याही पुराव्याविना, जो त्यांच्याजवळ आला असेल, अल्लाहच्या आयतींबाबत वाद घालतात, ही गोष्टी अल्लाह आणि ईमान राखणाऱ्यांच्या नजीक फार नाराजीची गोष्टी आहे, अशा प्रकारे अल्लाह, प्रत्येक घमेंडी, अवज्ञाकारी माणसाच्या हृदयावर मोहर लावतो.

**३६.** आणि फिरऔन म्हणाले, हे हामान! माझ्यासाठी एक उंच महाल बनव, कदाचित मी त्या दरवाज्यांपर्यंत पोहोचावे.

**३७.** जे आकाशाचे दरवाजे आहेत आणि मूसाच्या उपास्या (ईश्वरा) ला डोकावून पाहावे आणि माझी तर पूर्ण खात्री आहे की तो खोटारडा आहे आणि अशा प्रकारे फिरऔनची वाईट कृत्ये त्याच्या नजरेत भली चांगली दाखविली गेलीत आणि त्याला सन्मार्गापासून रोखले गेले आणि फिरौनचे (प्रत्येक) कट-कारस्थान विनाशातच राहिले.

**३८.** आणि तो ईमान राखणारा मनुष्य म्हणाला की हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! तुम्ही (सर्व) माझे अनुसरण करा मी नेकीच्या मार्गाकडे तुमचे मार्गदर्शन करेन.

**३९.** हे माझ्या समुदायाच्या लोकांनो! या जगाचे हे जीवन नाश पावणारी सामुग्री आहे. (विश्वास करा की शांती) आणि कायमस्वरूपी घर तर आखिरतच आहे.

**४०.** ज्याने अपराध (दुष्कर्म केला आहे, त्याला तर तेवढाच मोबदला मिळेल आणि ज्याने नेकी (सत्कर्म) केले आहे, मग तो पुरुष असो किंवा स्त्री आणि तो ईमान राखणाराही असेल तर असे लोक[१] जन्नतमध्ये दाखल होतील आणि तिथे अगणित रोजी (आजिविका) प्राप्त करतील.

**४१.** आणि हे माझ्या जमातीच्या लोकांनो! हे काय की मी तुम्हाला मुक्तीकडे बोलावित आहे आणि तुम्ही, मला जहन्नमकडे बोलावित आहात.

**४२.** तुम्ही मला या गोष्टीचे आमंत्रण देत आहात की मी अल्लाहचा इन्कार करावा आणि (दुसऱ्याला) त्याचा सहभागी करावे, ज्याचे मला कसलेही ज्ञान नाही, आणि मी

(१) अर्थात ते लोक जे ईमान राखणारेही असतील आणि सत्कर्म करणारेही. याचा उघड अर्थ असा की सत्कर्माविना ईमान किंवा ईमानाविना सत्कर्म अल्लाहजवळ कवडी मोलाचेही नसेल. अल्लाहजवळ सफलता प्राप्तीकरिता ईमानासोबत नेकी (सत्कर्म) आणि नेकीसोबत ईमान असणे अत्यावश्यक आहे.

तुम्हाला वर्चस्वशाली, माफ करणाऱ्या (अल्लाह) कडे बोलावित आहे.

**४३.** हे अगदी निश्चित की तुम्ही मला ज्याच्याकडे बोलावित आहात, तो ना तर या जगात पुकारण्यायोग्य आहे आणि ना आखिरतमध्ये आणि हे देखील अगदी निश्चित की आम्हा सर्वांचे परतणे अल्लाहच्याकडे आहे आणि मर्यादेचे उल्लंघन करणारे निश्चितच जहन्नमी आहेत.

**४४.** तेव्हा भविष्यात तुम्ही माझ्या गोष्टींची (बोलण्याची) आठवण कराल, मी आपला मामला अल्लाहच्या हवाली करतो, निःसंशय, अल्लाह आपल्या दासांना पाहणारा आहे.

**४५.** तेव्हा अल्लाहने त्याला त्या सर्व वाईट गोष्टीपासून सुरक्षित ठेवले ज्या, त्या लोकांनी योजिल्या होत्या आणि फिरऔनच्या अनुयायींवर मोठ्या वाईट प्रकारचा अज़ाब कोसळला.

**४६.** आग आहे जिच्यासमोर हे प्रत्येक सकाळ आणि संध्याकाळ आणले जातात, आणि ज्या दिवशी कयामत प्रस्थापित होईल (आदेश दिला जाईल की) फिरऔनच्या अनुयायींना अतिशय कठोर शिक्षा - यातनेत टाका.

**४७.** आणि जेव्हा ते जहन्नममध्ये एकमेकांशी भांडतील, तेव्हा कमजोर लोक, मोठ्या लोकांना (ज्यांच्या ताब्यात हे होते) म्हणतील की, आम्ही तर तुमचे अनुयायी होतो, तर काय आता तुम्ही आमच्यापासून या आगीचा एखादा हिस्सा हटवू शकता?

**४८.** ते मोठे लोक उत्तर देतील की आम्ही तर सर्व याच आगीत आहोत. अल्लाहने आपल्या दासांच्या दरम्यान फैसला केलेला आहे.

**४९.** आणि सर्व जहन्नमी लोक (एकत्र होऊन) जहन्नमच्या रक्षकांना सांगतील की तुम्हीच आपल्या पालनकर्त्यास दुआ (प्रार्थना) करा की त्याने कोणा एका दिवशी आमच्या शिक्षेत कमी करावी.

**५०.** ते उत्तर देतील की काय तुमच्याजवळ तुमचे पैगंबर चमत्कार (मोजिजे) घेऊन आले नव्हते. ते म्हणतील, का नाही? त्यावर ते म्हणतील, मग तुम्हीच दुआ - प्रार्थना करा आणि काफिर लोकांची दुआ (प्रार्थना) अगदी (निष्प्रभ आणि) व्यर्थ आहे!

**५१.** निःसंशय, आम्ही आपल्या पैगंबरांची आणि ईमान राखणाऱ्यांची या जगाच्या

जीवनातही मदत करू आणि त्या दिवशीही, जेव्हा साक्ष देणारे उभे राहतील.

**५२.** ज्या दिवशी अत्याचारी लोकांची लाचारी काहीच फायदा देणार नाही आणि त्यांच्यासाठी धिःक्कार असेल आणि त्यांच्यासाठी वाईट घर असेल.

**५३.** आणि आम्ही मूसाला मार्गदर्शन प्रदान केले आणि इस्त्राईलच्या संततीला या ग्रंथाचा उत्तराधिकारी बनविले.

**५४.** की बुद्धिमानांकरिता तो, मार्गदर्शन आणि बोध होता.

**५५.** तेव्हा (हे पैगंबर!) तुम्ही धीर - संयम राखा, अल्लाहचा वायदा अगदी सच्चा आहे, तुम्ही आपल्या अपराधांची क्षमा मागत राहा आणि सकाळ संध्याकाळ आपल्या पालनकर्त्याच्या पावित्र्याचे गुणगान व स्तुती - प्रशंसा करीत राहा.

**५६.** निःसंशय, जे लोक आपल्याजवळ कोणतेही प्रमाण नसतानाही अल्लाहच्या आयतींबाबत वाद घालतात, त्यांच्या मनात अहंकाराशिवाय दुसरे काही नाही, जे या मोठेपणापर्यंत पोहचवणार नाहीत तेव्हा तुम्ही अल्लाहचे शरण मागत राहा. निःसंशय, तो पूर्णपणे ऐकणारा आणि सर्वाधिक पाहणारा आहे.

**५७.** आकाशांची आणि धरतीची निर्मिती निश्चितच मानवांच्या निर्मितीपेक्षा फार मोठे काम आहे, परंतु (ही गोष्ट वेगळी की) बहुतेक लोक हे जाणत नाहीत.

**५८.** आणि आंधळा व डोळस दोघे समान नाही, ना ते लोक, ज्यांनी ईमान राखले आणि सत्कर्म करीत राहिले, दुष्कर्म करणाऱ्यांच्या (समान आहेत) तुम्ही (फारच) कमी बोध ग्रहण करीत आहात.

**५९.** कयामत खात्रीने आणि निःसंशय येणार आहे, तथापि (ही गोष्ट वेगळी की) अधिकांश लोक ईमान राखत नाहीत.

**६०.** आणि तुमच्या पालनकर्त्याचा आदेश (लागू झालेला आहे) की मला दुआ (प्रार्थना) करा, मी तुमच्या दुआ (प्रार्थना) ना कबूल करेन, निःसंशय जे लोक माझ्या उपासनेशी घमेंड करतात, ते लवकरच अपमानित होऊन जहन्नममध्ये दाखल होतील.

**६१.** अल्लाहने तुमच्यासाठी रात्र बनविली आहे की तुम्ही तिच्यात आराम करू शकावे आणि दिवसाला, दाखविणारा बनविले. निःसंशय अल्लाह लोकांवर उपकार (कृपा)

आणि दया करणारा आहे, परंतु अधिकांश लोक कृतज्ञता व्यक्त करीत नाही.

**६२.** हाच अल्लाह आहे तुम्हा सर्वांचा पालनपोषण करणारा. प्रत्येक वस्तूंचा रचयिता, त्याच्याखेरीज कोणीही सच्चा उपास्य (माबूद) नाही, मग तुम्ही कोणत्या बाजूला भटकविले जात आहात?

**६३.** त्याच प्रकारे ते लोक देखील बहकाविले जात राहिले, जे अल्लाहच्या आयतींचा इन्कार करीत होते.

**६४.** तो अल्लाह होय, ज्याने तुमच्यासाठी जमिनीला राहण्याचे ठिकाण आणि आकाशाला छत बनविले आणि तुम्हाला रूप दिले आणि खूप चांगले बनविले आणि तुम्हाला खूप चांगल्या चांगल्या वस्तू खाण्यासाठी दिल्यात. तोच अल्लाह तुमचा पालनकर्ता आहे. तेव्हा मोठा शुभ आहे अल्लाह, जो समस्त विश्वांचा स्वामी व पालनकर्ता आहे.

**६५.** तो जिवंत आहे, त्याच्याखेरीज कोणीही उपास्य नाही, तेव्हा तुम्ही विशुद्ध मनाने त्याचीच उपासना करीत त्याला पुकारा, सर्व प्रशंसा अल्लाह करीताच आहे, जो समस्त विश्वांचा स्वामी व पालनकर्ता आहे.

**६६.** (तुम्ही) सांगा की मला त्यांची उपासना करण्यापासून रोखले गेले आहे, ज्यांना तुम्ही अल्लाहखेरीज पुकारत आहात[१] या कारणास्तव की माझ्याजवळ माझ्या पालनकर्त्याचे स्पष्ट पुरावे येऊन पोहोचले आहेत. मला हा आदेश दिला गेला आहे की मी समस्त विश्वांच्या पालनकर्त्याच्या हुकुमाअधीन व्हावे.

**६७.** तोच होय, ज्याने तुम्हाला मातीपासून, मग वीर्यापासून, मग रक्ताच्या (जमलेल्या) गोळ्यापासून निर्माण केले, मग तुम्हाला अर्भकाच्या स्वरूपात बाहेर काढले, मग तो तुम्हाला वाढीस लावतो की तुम्ही आपल्या पूर्ण शक्ती - सामर्थ्यास पोहोचावे, मग

(१) मग त्या दगडातून साकार केलेल्या मूर्त्या असोत, पैगंबर आणि औलिया असोत, व कबरी-समाधीमध्ये गाडले गेलेली माणसे असोत, मदतीसाठी कोणालाही पुकारू नका, त्यांच्या नावाचे चढावे (नजराणे) चढवू नका, त्यांच्या नावाचा जाप (वजीफा) करू नका, त्यांचे भय बाळगू नका आणि त्यांच्याशी आस बाळगू नका. कारण हे सर्व उपासनेचेच प्रकार आहेत जो केवळ एकमेव अल्लाहचा हक्क आहे.

म्हातारे व्हावे आणि तुमच्यापैकी काहींचा याच्या आधीच मृत्यु होतो (आणि तो तुम्हाला सोडून देतो यासाठी की तुम्ही निर्धारित आयुपर्यंत पोहोचावे आणि यासाठी की तुम्ही विचार - चिंतन करावे.

**६८.** तोच होय, जो जीवन आणि मृत्यु देतो, मग जेव्हा तो एखादे कार्य करण्याचा निर्णय घेतो तेव्हा त्यास फक्त एवढेच म्हणतो 'घडून ये' आणि ते घडून येते.

**६९.** काय तुम्ही त्यांना नाही पाहिले, जे अल्लाहच्या आयतींसदर्भात वाद घालतात. त्यांना कोठे परतविले जात आहे?

**७०.** ज्या लोकांनी ग्रंथाला खोटे ठरविले आणि त्यालाही जो आम्ही आपल्या पैगंबरांसोबत पाठविला, त्यांना फार लवकर वस्तुस्थितीचे ज्ञान होईल.

**७१.** जेव्हा त्यांच्या गळ्यांमध्ये जोखड (तौक) असतील आणि शंखला असतील, फरफटत ओढून नेले जातील.

**७२.** उकळत्या पाण्यात आणि मग जहन्नमच्या आगीत जाळले जातील.

**७३.** मग त्यांना विचारले जाईल की ज्यांना तुम्ही (अल्लाहचे) सहभागी ठरवित होते, ते आहेत कोठे?

**७४.** जे अल्लाहखेरीज होते, ते म्हणतील की ते आमच्याकडून हरवलेत किंबहुना आम्ही तर यापूर्वी कोणालाही पुकारत नव्हतो. अल्लाह काफिर (इन्कारी) लोकांना अशाच प्रकारे मार्गभ्रष्ट करतो.

**७५.** हे अशासाठी की तुम्ही जमिनीवर नाहक तोरा मिरवित होते, आणि (व्यर्थ) डौल दाखवित फिरत होते.

**७६.** (आता या) जहन्नमध्ये नेहमी नेहमी राहण्याकरिता (त्याच्या) दरवाज्यांमध्ये दाखल व्हा, केवढे वाईट ठिकाण आहे अहंकार करणाऱ्यांकरिता.

**७७.** तेव्हा तुम्ही धीर - संयम राखा, अल्लाहचा वायदा पूर्णतः सच्चा आहे. आम्ही त्यांना जो वायदा देऊन ठेवला आहे, त्यापैकी काही आम्ही तुम्हाला दाखवून द्यावे किंवा त्या आधी तुम्हाला मृत्यु द्यावा, त्यांचे परतविले जाणे तर आमच्याचकडे आहे.

**७८.** निःसंशय, आम्ही तुमच्या पूर्वीही अनेक रसूल (पैगंबर) पाठविले आहेत, ज्यांच्यापैकी काहींचे वृत्तांत आम्ही तुम्हाला ऐकविले आहेत. आणि त्यांच्यापैकी काहींचे वृत्तांत आम्ही तुम्हाला ऐकविले नाहीत आणि कोणा पैगंबराच्या (अवाक्यात हे) नव्हते की एखादा चमत्कार (मोजिजा) अल्लाहच्या अनुमतीविना आणू शकला असता, मग ज्या वेळी अल्लाहचा आदेश येईल, सत्यासह फैसला केला जाईल आणि त्या वेळी असत्याचे पुजारी नुकसानातच राहतील.

**७९.** अल्लाह तो आहे ज्याने तुमच्यासाठी चतुष्पाद जनावरे (गुरे) निर्माण केलीत, ज्यांच्यापैकी काहींवर तुम्ही स्वार होता आणि काहींना तुम्ही खातात.

**८०.** आणि इतरही तुमच्यासाठी त्यांच्यात अनेक फायदे आहेत, यासाठी की आपल्या मनात लपलेल्या गरजांना, त्यांच्यावर स्वार होऊन तुम्ही पूर्ण करून घ्यावे आणि ज्या जनावरांवर आणि नौकांवर तुम्ही स्वार केले जाता.

**८१.** आणि अल्लाह तुम्हाला आपल्या निशाण्या दाखवित आहे, तेव्हा तुम्ही अल्लाहच्या कोणकोणत्या निशाण्यांचा इन्कार करीत राहाल ?

**८२.** किंवा त्यांनी धरतीवर हिंडून फिरून आपल्या पूर्वी होऊन गेलेल्या लोकांची परिणति नाही पाहिली, जे संख्येत यांच्यापेक्षा जास्त होते, शक्ती - सामर्थ्यात सक्त आणि धरतीत त्यांनी अनेक अवशेष मागे सोडले होते. (परंतु) त्यांच्या केलेल्या कार्यांनी त्यांना किंचितही लाभ पोहचविला नाही.

**८३.** तर जेव्हा जेव्हा त्यांच्याजवळ त्यांचे रसूल (पैगंबर) स्पष्ट निशाण्या घेऊन आले, तेव्हा हे आपल्याजवळ असलेल्या ज्ञानावर घमेंड दाखवू लागले. शेवटी ज्या गोष्टीची थट्टा उडवित होते, तीच त्यांच्यावर उलटली.

**८४.** मग आमची शिक्षा-यातना पाहताच म्हणू लागले की एकमेव अल्लाहवर आम्ही ईमान राखले आणि ज्यांना ज्यांना आम्ही त्याचा सहभागी ठरवित होतो, आम्ही त्या सर्वांचा इन्कार केला.

**८५.** परंतु आमच्या शिक्षा - यातनेला पाहून घेतल्यानंतर त्यांच्या ईमान राखण्याने त्यांना लाभ दिला नाही, अल्लाहने आपला हाच नियम निर्धारित केलेला आहे, जो त्याच्या दासांमध्ये सतत चालत आला आहे आणि त्या ठिकाणी काफिर दुर्दशाग्रस्त (आणि दुर्बल) झाले.

—–

# सूरह हा. मीम. अस्सजदा - ४१

सूरह हा-मीम-अस्सजदा* मक्का येथे अवतरली आणि यात चोपन्न आयती आणि सहा रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** हा. मीम.

**२.** (हा ग्रंथ) मोठ्या कृपावान, मोठ्या दयावानतर्फे अवतरित झाला आहे.

**३.** (असा) ग्रंथ आहे, ज्याच्या आयतीं (सूत्रां) चा स्पष्ट तपशील दिला गेला आहे (अशा स्थितीत की) कुरआन अरबी भाषेत आहे, त्या लोकांसाठी जे जाणतात.

**४.** शुभ समाचार ऐकविणारा आणि भय दाखविणारा आहे. तरीही त्यांच्यापैकी अधिकांश लोकांनी तोंड फिरविले आणि ते ऐकतही नाहीत.

**५.** आणि ते म्हणाले, तुम्ही ज्या गोष्टीकडे आम्हाला बोलावित आहात, त्यापासून आमची हृदये पडद्यात आहेत. आमच्या कानात बधीरता आहे (किंवा काही ऐकायला येत नाही) आणि आमच्या व तुमच्या दरम्यान एक आड-पडदा आहे. तेव्हा तुम्ही आपले काम करत जा, आम्हीही निश्चित आपले काम करीत राहू.

**६.** (तुम्ही) सांगा की मी तर तुमच्यासारखाच एक मनुष्य आहे. माझ्यावर वहयी (प्रकाशना) केली जात आहे की तुम्हा सर्वांचा माबूद (उपास्य) केवळ एक अल्लाहच आहे, तेव्हा तुम्ही त्याच्याकडे ध्यान केंद्रित करा आणि त्याच्याकडे अपराधांची क्षमा मागा आणि त्या अनेक ईश्वरांच्या उपासकांकरिता सर्वनाश आहे.

**७.** जे जकात देत नाहीत आणि आखिरतचाही इन्कार करतात.

**८.** निःसंशय, ज्या लोकांनी ईमान राखले आणि सत्कर्म करीत राहिले त्यांच्याकरिता असीम व अमर्याद मोबदला आहे.

---

* या सूरहचे दुसरे नाव 'फुस्सेलत' आहे. याच्या अवतरित होण्याविषयी मक्काचे सरदार उत्बा बिन रबीआसोबत पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांची घटना प्रसिद्ध आहे. (इब्ने कसीर)

**९.** (तुम्ही सांगा की, काय तुम्ही त्या (अल्लाह) चा इन्कार करता, आणि त्याचे सहभागी ठरविता, ज्याने दोन दिवसांत जमिनीला निर्माण केले. सर्व विश्वांचा स्वामी व पालनकर्ता तोच आहे.

**१०.** आणि त्याने जमिनीत तिच्यावरूनच पर्वत रोवले आणि तिच्यात समृद्धी राखली आणि तिच्यात राहणाऱ्यांच्या आहारा (अन्न सामुग्री) चेही अनुमान तिच्यातच केले, केवळ चार दिवसांतच. विचारणा (किंवा याचना) करणाऱ्यांकरिता समानरित्या.

**११.** मग आकाशाकडे उचावला जे धूरासारखे होते, तेव्हा त्याला आणि जमिनीला आदेश दिला की तुम्ही दोघे या इच्छेने किंवा अनिच्छेने दोघांना निवेदन केले की आम्ही राजीखुशीने हजर आहोत.

**१२.** तेव्हा दोन दिवसांत सात आकाश बनविलेत. प्रत्येक आकाशात त्याच्या योग्य आदेशांची वहयी पाठविली आणि आम्ही या जगाच्या आकाशाला ताऱ्यांनी सुशोभित केले व त्याचे रक्षण केले. ही योजना प्रभुत्वशाली व सर्वज्ञ अशा अल्लाहची आहे.

**१३.** आणि तरीही जर हे तोंड फिरवित असतील तर सांगा की मी तुम्हाला त्या वीजेच्या कडाडण्या (आकाशिय अज़ाब) चे भय दाखवितो, जो आद जनसमूह आणि समूद जनसमूहावर कोसळलेल्या, वीजेच्या कडाडण्यासमान असेल.

**१४.** त्याच्याजवळ जेव्हा त्यांच्या पुढून-मागून पैगंबर आले की तुम्ही अल्लाहखेरीज कोणाचीही उपासना करू नका, तेव्हा त्यांनी उत्तर दिले की जर आमच्या पालनकर्त्याने इच्छिले असते, त्याने फरिश्त्यांना पाठविले असते. आम्ही तर तुमच्या प्रेषित्वाचा पूर्णतः इन्कार करतो.

**१५.** तर जेव्हा आदने अकारण धरतीवर घमेंड करायला सुरुवात केली आणि म्हणू लागले की आमच्याहून शक्तिशाली कोण आहे, काय त्यांना हे दिसून येत नाही की ज्याने त्यांना निर्माण केले आहे, तो त्यांच्यापेक्षा अधिक शक्तिशाली आहे. ते (शेवटपर्यंत) आमच्या आयतींचा इन्कारच करीत राहिले.

**१६.** तेव्हा शेवटी आम्ही त्यांच्यावर एक सोसाट्याचे वादळ अशुभ दिवसात पाठविले, यासाठी की त्यांना ऐहिक जीवनात अपमानदायक शिक्षा - यातनेची गोडी चाखवावी, (विश्वास करा) की आखिरतचा अज़ाब, यापेक्षा जास्त अपमानित करणारा आहे आणि

त्यांना मदतही केली जाणार नाही.

**१७.** आणि राहिलेत समूद, तर आम्ही त्यांनाही मार्गदर्शन केले, परंतु त्यांनी मार्गदर्शनाच्या तुलनेत आंधळेपणास जास्त महत्व दिले. ज्यामुळे त्यांना (पूर्णपणे) अपमानदायक शिक्षेच्या कडाडण्याने त्यांच्या करतूतींपायी धरले.

**१८.** आणि ईमान राखणाऱ्यांना व अल्लाहचे भय बाळगणाऱ्यांना आम्ही (पूर्णतः) वाचविले.

**१९.** आणि ज्या दिवशी अल्लाहचे वैरी जहन्नमकडे आणले जातील, आणि त्या (सर्वां) ना एकत्रित केले जाईल.

**२०.** येथेपर्यंत की जेव्हा जहन्नमच्या अगदी जवळ येऊन पोहचतील तेव्हा त्यांच्यावर त्यांचे कान आणि त्यांचे डोळे व त्यांच्या त्वचा त्यांच्या कर्मांची साक्ष देतील.

**२१.** आणि आपल्या त्वचांना म्हणतील की तुम्ही आमच्याविरूद्ध साक्ष का दिली, ते उत्तर देतील की आम्हाला त्या अल्लाहने बोलण्याचे सामर्थ्य प्रदान केले, ज्याने प्रत्येक वस्तूला बोलण्याचे सामर्थ्य प्रदान केले आहे. त्यानेच पहिल्यांदा तुम्हाला निर्माण केले आणि त्याच्याच कडे तुम्ही सर्व परतविले जाल.

**२२.** आणि तुम्ही (आपली दुष्कर्मे) या कारणाने लपवून ठेवतच नव्हते की तुमच्यावर तुमचे कान, तुमचे डोळे आणि तुमच्या त्वचा साक्ष देतील आणि तुम्ही असे समजत राहिलात की तुम्ही जे काही करीत आहात, त्यापैकी बहुतेक कर्मांशी अल्लाह अनभिज्ञ आहे.

**२३.** आणि तुमच्या या कुविचारांनी, जे तुम्ही आपल्या पालनकर्त्याविषयी केलेले होते, तुमचा सर्वनाश केला आणि शेवटी तुम्ही नुकसान उचलणाऱ्यांपैकी झालात.

**२४.** आता जर हे सहनशीलता राखतील, तरीही त्यांचे ठिकाण जहन्नमच आहे आणि जर हे तौबा (क्षमा-याचना) ही करू इच्छितील, तरीही त्यांना माफ केले जाणार नाही.

**२५.** आणि आम्ही त्यांचे काही साथीदार निर्धारित केलेले होते, ज्यांनी त्यांच्या पुढच्या मागच्या कर्मांना त्यांच्या नजरेत सुंदर सुशोभित बनवून ठेवले होते, आणि त्यांच्या बाबतीतही अल्लाहचा वायदा त्या जनसमूहांसोबत पूर्ण झाल, जे त्यांच्यापूर्वी जिन्नांचे

आणि मानवांचे होऊन गेले आहेत. निःसंशय ते नुकसान उचलणारे सिद्ध ठरले.

**२६.** आणि काफिर म्हणाले, या कुरआनास ऐकूच नका (त्याचे पठण होत असताना) आणि वाह्यात बडबड करा, नवल नव्हे की तुम्ही वरचढ ठराल.

**२७.** तर निःसंशय, आम्ही त्या काफिरांना सक्त अज़ाब (शिक्षे) ची गोडी चाखवू आणि त्यांना त्यांच्या अतिशय वाईट कर्माचा मोबदला (निश्चितच) देऊ.

**२८.** अल्लाहच्या शत्रूंचा मोबदला (शिक्षा) जहन्नमची हीच आग आहे, ज्यात त्यांचे नेहमीचे घर आहे. (हा) मोबदला आहे, आमच्या आयतींचा इन्कार करणाऱ्यांचा.

**२९.** आणि काफिर लोक म्हणतील की हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला जिन्न आणि मानवांच्या त्या (दोन्ही समूहां) ना दाखव, ज्यांनी आम्हाला मार्गभ्रष्ट केले, (यासाठी की) आम्ही त्यांना आपला पायाखाली तुडवावे यासाठी की ते खूप खाली (सक्त शिक्षा - यातनाग्रस्त) व्हावेत.

**३०.** वास्तविक ज्या लोकांनी असे म्हटले की आमचा स्वामी व पालनकर्ता अल्लाह आहे, मग त्यावर अटळ राहिले[१] तर त्यांच्याजवळ फरिश्ते (हे सांगत) येतात की तुम्ही मुळीच भयभीत आणि दुःखी होऊ नका. (किंबहुना) त्या जहन्नतचा शुभ समाचार ऐकवा, जिचा तुम्हाला वायदा दिला गेला आहे.

**३१.** तुमच्या ऐहिक जीवनातही आम्ही तुमचे मित्र व मदत करणारे होतो आणि आखिरतमध्येही राहू. ज्या गोष्टीची तुमच्या मनाला इच्छा होईल आणि जे काही मागाल, ते सर्व तुमच्यासाठी (जन्नतमध्ये हजर) आहे.

**३२.** मोठा माफ करणाऱ्या, मोठा मेहेरबान अशा (अल्लाह) तर्फे हे सर्व काही पाहुणचाराच्या स्वरूपात आहे.

---

(१) अर्थात परिस्थिती कितीही कठीण असो, ईमानावर अटळ राहावे, त्यापासून परावृत्त होऊ नये. काहींनी कायम राहण्याचा अर्थ निष्कपटता असा घेतला आहे, म्हणजे केवळ एक अल्लाहचीच उपासना व आज्ञा पालन करणे. जसे हदीस वचनात उल्लेखित आहे की एका माणसाने पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांना विनंती केली, ''मला अशी गोष्ट सांगा की तुमच्यानंतर मला दुसऱ्या कोणाला विचारण्याची गरज न भासावी,'' त्यावर पैगंबरांनी फर्माविले, ''सांगा, मी अल्लाहवर ईमान राखले, मग यावर अटळ राहा.'' (सहीह मुस्लिम किताबुल ईमान बाबु जामिअे औसाफिल इस्लाम)

**३३.** आणि त्याच्यापेक्षा अधिक चांगली गोष्ट बोलणारा कोण आहे, जो अल्लाहकडे बोलाविल, सत्कर्म करील आणि असे म्हणेल की मी खात्रीने मुस्लिमांपैकी आहे.

**३४.** आणि सत्कर्म व दुष्कर्म समान असू शकत नाही, वाईट गोष्टीचे भलेपणाने निवारण करा, मग तोच, ज्याच्या व तुमच्या दरम्यान शत्रूता आहे, असा होईल जणू जीवलग मित्र.[1]

**३५.** आणि ही गोष्ट त्यांच्याच सद्‌भाग्यात असते, जे धीर - संयम राखतात आणि तिला मोठ्या भाग्यवानांखेरीज कोणीही प्राप्त करू शकत नाही.

**३६.** आणि जर सैतानाकडून एखादी शंका निर्माण झाली तर अल्लाहचे शरण मागा. निःसंशय, तो मोठा ऐकणारा, जाणणारा आहे.

**३७.** आणि दिवस-रात्र आणि सूर्य व चंद्र देखील त्याच्या निशाण्यांपैकी आहेत. तुम्ही सूर्य आणि चंद्रासमोर नतमस्तक होऊ नका, किंबहुना आपला माथा त्या अल्लाहसमोर टेकवा, ज्याने त्या सर्वांना निर्माण केले आहे, जर तुम्हाला त्याचीच उपासना करायची आहे.

**३८.** तरीही जर ते घमेंड करतील तर ते (फरिश्ते) जे तुमच्या पालनकर्त्याच्या निकट आहेत, ते तर रात्रंदिवस त्याच्या पावित्र्याचा जाप करीत राहतात आणि (कधीही) थकत नाहीत.

**३९.** आणि त्या (अल्लाह) च्या निशाण्यांपैकी (हेही) आहे की तुम्ही जमिनीला दाबली गेलेली (कोरडी पडलेली) पाहता, मग जेव्हा आम्ही तिच्यावर पर्जन्यवृष्टी करतो, तेव्हा ती हिरवी टवटवीत होऊन वाढीस लागते, ज्याने तिला जिवंत केले तोच खात्रीने मृतांनाही जिवंत करणारा आहे. निःसंशय तो प्रत्येक गोष्ट करण्यास समर्थ आहे.

**४०.** निःसंशय, जे लोक आमच्या आयतींमध्ये वाकडेपणा आणतात ते (काही) आमच्यापासून लपलेले नाहीत. (जरा सांगा) जो आगीत टाकला जावा, तो चांगला आहे किंवा तो, जो शांतिपूर्वक कयामतच्या दिवशी यावा. तुम्ही वाटेल ते करीत राहा. तो

(१) हे मोठे महत्त्वपूर्ण नैतिक मार्गदर्शन आहे की दुराचाराला सदाचाराने टाळा, अर्थात दुराचाराचे उत्तर उपकाराने, अत्याचाराचे क्षमाशीलतेने, क्रोधाचे. धैर्य संयमाने आणि अप्रिय गोष्टींचे, समजावून सांगून दिले जावे अशाने दूरचा जवळ आणि रक्तपिपासू तुमचा चाहता आणि जीवलग दोस्त बनेल.

तुमचे सर्व केले करविले पाहात आहे.

**४१.** ज्या लोकांनी आपल्याजवळ कुरआन पोहोचल्यानंतरही त्याचा इन्कार केला (तेदेखील) आमच्यापासून लपलेले नाहीत निःसंशय, हा मोठा भव्य-दिव्य (सन्मानपूर्ण) ग्रंथ आहे.

**४२.** असत्य, त्याच्या जवळूनही जाऊ शकत नाही, ना त्याच्यापुढून, आणि ना त्याच्या मागून हा (ग्रंथ) त्या (अल्लाह) कडून अवतरित केला गेला आहे, जो मोठा हिकमतशाली आणि गुणसंपन्न आहे.

**४३.** (हे पैगंबर!) तुम्हालाही तेच सांगितले जात आहे, जे तुमच्या पूर्वीच्या पैगंबरांनाही सांगितले गेले आहे. निःसंशय, तुमचा पालनकर्ता मोठा माफ करणारा आणि दुःखदायक शिक्षा - यातना देणारा आहे.

**४४.** आणि जर आम्ही त्याला अरबीऐवजी दुसऱ्या भाषेचा कुरआन बनविले असते, तर म्हणाले असते की याच्या आयती (वचने) स्पष्टपणे का नाही सांगितली गेलीत? हे काय की ग्रंथ अरबीऐवजी दुसऱ्या भाषेत आणि तुम्ही अरबी रसूल? (तुम्ही) सांगा की हा (ग्रंथ) ईमान राखणाऱ्यांकरिता मार्गदर्शन व रोगमुक्ती आहे आणि जे ईमान राखत नाहीत तर त्यांच्या कानांमध्ये बधीरता आहे आणि हा त्यांच्यासाठी अंधत्व आहे. हे असे लोक आहेत, ज्यांना दूरच्या ठिकाणापासून पुकारले जात आहे.

**४५.** आणि निःसंशय, आम्ही मूसा (अलै.) ला ग्रंथ प्रदान केला होता तेव्हा त्याच्यातही मतभेद केला गेला आणि जर ती गोष्ट नसती जी तुमच्या पालनकर्त्यातर्फे या आधीच निश्चित झालेली आहे, तर त्यांच्या दरम्यान (केव्हाच) फैसला झाला असता. हे लोक तर त्याच्याविषयी सक्त बेचैन करणाऱ्या संशयात आहेत.

**४६.** जो मनुष्य सत्कर्म करेल, ते तो आपल्या फायद्याकरिता आणि जो दुष्कर्म करेल तर त्या (पापा) चे ओझे त्याच्यावरच आहे आणि तुमचा पालनकर्ता दासांवर अत्याचार

करणारा नाही.

**४७.** कयामतचे ज्ञान अल्लाहकडेच परतविले जाते आणि जे जे फळ आपल्या गाभ्यांमधून (बोंडामधून) बाहेर पडते आणि जी मादी गर्भवती असते आणि ज्या बाळाला ती जन्म देते, त्या सर्वांचे ज्ञान त्याला आहे, आणि ज्या दिवशी अल्लाह त्या (अनेकेश्वर उपासकांना) बोलावून विचारेल की माझे सहभागी कोठे आहेत? ते उत्तर देतील की आम्ही तर सांगून टाकले की आमच्यापैकी कोणीही त्याचा साक्षी नाही.

**४८.** आणि हे ज्यांची भक्ती - आराधना यापूर्वी करीत होते, ते सर्व त्यांच्या नजरेतून नाहीसे झाले आणि त्यांनी समजून घेतले की आता त्यांच्या सुटकेचा (मार्ग) नाही.

**४९.** भलेपणाची याचना करण्यापासून मनुष्य थकत नाही, आणि जर त्याला एखादा त्रास किंवा यातना पोहचते, तेव्हा हताश आणि नाउमेद होतो.

**५०.** आणि जी कष्ट - यातना त्याला पोहचली आहे, त्यानंतर जर आम्ही त्याला एखाद्या दया - कृपेची गोडी चाखवितो, तेव्हा तो उद्‌गारतो, मी तर यास पात्र होतोच आणि मला नाही वाटत की कयामत प्रस्थापित होईल आणि जर मला आपल्या पालनकर्त्याकडे परतविले गेलेच, तरीही खात्रीने त्याच्याजवळही माझ्यासाठी भलाईच असेल. निःसंशय, आम्ही त्या काफिरांना त्यांच्या कर्मांशी अवगत करू, आणि त्यांना कठोर शिक्षा - यातनेची गोडी चाखवू.

**५१.** आणि जेव्हा आम्ही माणसावर आपला उपकार करतो, तेव्हा तो तोंड फिरवितो आणि बाजू बदलून घेतो आणि जेव्हा त्याच्यावर दुःख कोसळले तेव्हा मात्र लांबलचक दुआ (प्रार्थना) करणारा बनतो.

**५२.** (तुम्ही) सांगा, बरे हे तर सांगा की जर हा कुरआन अल्लाहतर्फे आलेला असेल, मग तुम्ही त्यास मानले नाही तर त्याच्यापेक्षा अधिक पथभ्रष्ट आणखी कोण असेल, जो (सत्याचा) विरोध करण्यात दूर निघून जावा.

**५३.** लवकरच आम्ही त्यांना आपल्या निशाण्या जगाच्या किनाऱ्यां (क्षितिजां) मध्येही दाखवू आणि स्वतः त्यांच्या अस्तित्वातही, येथे पर्यंत की त्यांना स्पष्टतः कळून यावे की सत्य हेच आहे. काय तुमच्या पालनकर्त्याचे प्रत्येक गोष्टीशी अवगत असणे पुरेसे नाही?

**५४.** विश्वास करा की हे लोक आपल्या पालनकर्त्यासमोर हजर होण्याबाबत साशंक आहेत. लक्षात ठेवा, अल्लाहने समस्त गोष्टींना घेरून ठेवले आहे.

---

# सूरह शूरा - ४२

सूरह शूरा मक्का येथे अवतरली आणि यात त्रेपन्न आयती आणि पाच रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** हा मीम.

**२.** ऐन. सीन. काफ.

**३.** अल्लाह, जो मोठा वर्चस्वशाली आणि हिकमतशाली आहे, अशा प्रकारे तुमच्याकडे आणि तुमच्या पूर्वीच्या लोकांकडे वहयी पाठवित राहिला.

**४.** जे काही आकाशांमध्ये आहे आणि जे काही धरतीत आहे सर्व त्याचेच आहे आणि तो सर्वोच्च व सर्वांत महान आहे.

**५.** निकट आहे की आकाश आपल्यावरून विदीर्ण व्हावे, आणि सर्व फरिश्ते आपल्या पालनकर्त्याची पवित्रता त्याच्या प्रशंसेसह वर्णन करीत आहेत आणि धरतीवर असणाऱ्यांकरिता क्षमा-याचना करीत आहेत. खूप लक्षात घ्या की अल्लाहच माफ करणारा, दया करणारा आहे.

**६.** आणि ज्या लोकांनी त्याच्याखेरीज दुसऱ्यांना औलिया (मित्र, सहाय्यक) बनवून घेतले आहे, अल्लाह त्यांना चांगल्या प्रकारे पाहत आहे, आणि तुम्ही त्यांच्याकरिता उत्तरदायी (जबाबदार) नाहीत.

**७.** आणि त्याच प्रकारे आम्ही आपल्याकडे अरबी कुरआनाची वहयी केली आहे, यासाठी की तुम्ही मक्का आणि त्याच्या जवळपासच्या इलाक्यात राहणाऱ्यांना खबरदार करावे आणि एकत्रित केले जाण्याच्या दिवसापासून, ज्याच्या येण्याबाबत काही शंका नाही, भय दाखवावे. एक गट जन्नतमध्ये असेल आणि एक गट जहन्नममध्ये असेल.

**८.** जर अल्लाहने इच्छिले असते तर त्या सर्वांना एकच समुदाय (उम्मत) बनविले

असते, परंतु तो ज्याला इच्छितो आपल्या दया-कृपेत सामील करतो आणि अत्याचारींचा पाठीराखा आणि सहाय्यक कोणीही नाही.

**९.** काय त्या लोकांनी अल्लाहखेरीज दुसरे कार्य साधक बनवून घेतले आहे, (वस्तुतः) अल्लाहच वाली (संरक्षक) आहे. तोच मृतांना जिवंत करील आणि तोच प्रत्येक गोष्ट करण्यास समर्थ आहे.

**१०.** आणि ज्या ज्या गोष्टीत तुमचा मतभेद असेल, त्याचा फैसला अल्लाहच्या हाती आहे.[१] हाच अल्लाह माझा स्वामी व पालनकर्ता आहे, ज्यावर मी भरवसा ठेवला आहे आणि ज्याच्याकडे मी झुकतो.

**११.** तो आकाश आणि धरतीला निर्माण करणारा आहे. त्याने तुमच्यासाठी तुमच्या जाती-प्रकारातून जोड्या बनविल्या आहेत आणि चतुष्पाद प्राण्यांच्याही जोड्या बनविल्या आहेत. तुम्हाला तो त्यात पसरवित आहे, त्याच्यासारखे अन्य काहीही नाही. तो सर्व काही ऐकणारा आणि पाहणारा आहे.

**१२.** आकाशांच्या व धरतीच्या चाव्या त्याच्याच ताब्यात आहेत. ज्याला इच्छितो अमाप रोजी (आजिविका) प्रदान करतो आणि ज्याला इच्छितो अपर्याप्त देतो. निःसंशय, तो प्रत्येक गोष्टीचे ज्ञान बाळगणारा आहे.

**१३.** अल्लाहने तुमच्यासाठी तोच दीन (धर्म) निर्धारित केला आहे, ज्याला कायम करण्याचा आदेश त्याने नूह (अलै.) ला दिला होता, जो (वहयीद्वारे) आम्ही तुमच्याकडे पाठविला आहे आणि ज्याचा खास आदेश आम्ही इब्राहीम आणि मूसा आणि ईसा (अलै.) यांना दिला होता की या दीन (धर्मा) ला कायम राखा आणि यात फूट पाडू नका, ज्या गोष्टीकडे तुम्ही त्यांना बोलावित आहात, ती तर (त्या) अनेकेश्वरवाद्यांना अप्रिय वाटते. अल्लाह ज्याला इच्छितो आपला निवडक (दास) बनवितो आणि जो देखील त्याच्याकडे

---

(१) या मतभेदाशी अभिप्रेत दीन (धर्म) चा मतभेद होय. उदा. ज्यू, ख्रिश्चन आणि इस्लाम वगैरेत आपसात मतभेद आहेत. प्रत्येक धर्माचा मनुष्य हा दावा करतो की त्याचाच धर्म खरा आहे, वस्तुतः सर्व धर्म एकाच वेळी खरे असू शकत नाहीत. सत्य धर्म तर एकच आहे आणि एकच असू शकतो जगात सत्य धर्म आणि सत्य मार्ग ओळखण्याकरिता अल्लाहचा ग्रंथ 'कुरआन' अस्तित्वात आहे, परंतु जगातील लोक या ईशवाणीला आपला फैसला करणारा व शासक मानण्यास तयार नाही. शेवटी मग कयामतचाच दिवस बाकी राहतो, ज्या दिवशी अल्लाह या मतभेदाचा फैसला करील आणि सत्यवादी लोकांना जन्नतमध्ये आणि इतरांना जहन्नममध्ये आणि इतरांना जहन्नममध्ये दाखल करील.

लक्ष केंद्रित करतो, तर अशांचे तो यथायोग्य मार्गदर्शन करतो.

**१४.** आणि त्या लोकांनी आपल्याजवळ ज्ञान येऊन पोहोचल्यानंतर मतभेद केला (केवळ) हट्टापायी आणि जर तुमच्या पालनकर्त्याचे फर्मान एका निर्धारित अवधीपर्यंत आधीपासून निश्चित केले गेले नसते तर त्यांचा फैसला केव्हाच झाला असता आणि ज्यांना, त्यांच्यानंतर ग्रंथ दिला गेला आहे, तेही त्याच्या संबंधाने संशयात पडले आहेत.

**१५.** तेव्हा तुम्ही त्याच्याचकडे लोकांना बोलवित राहा आणि जे काही तुम्हाला सांगितले गेले आहे, त्यावर दृढतापूर्वक राहा आणि त्यांच्या इच्छा - आकांक्षांचे अनुसरण करू नका आणि सांगा की अल्लाहने जेवढे ग्रंथ अवतरित केले आहेत, मी त्यांच्यावर ईमान राखतो आणि मला आदेश दिला गेला आहे की तुमच्या दरम्यान न्याय-निवाडा करीत राहावे. आमचा आणि तुम्हा सर्वांचा स्वामी व पालनकर्ता अल्लाहच आहे. आमचे आचरण आमच्यासाठी आहे आणि तुमचे आचरण तुमच्यासाठी आहे. आमच्या व तुमच्या दरम्यान कसलाही तंटा नाही, अल्लाह आम्हा सर्वांना एकत्र करील आणि त्याच्याचकडे परतून जायचे आहे.

**१६.** आणि जे लोक अल्लाहच्या संदर्भात वाद निर्माण करतात, या उपरांत की (सृष्टीने) ते मान्य केले आहे, त्यांचा विवाद अल्लाहच्या निकट खोटा आहे आणि त्यांच्यावर ईश-प्रकोप आहे आणि त्यांच्यासाठी सक्त अज़ाब (शिक्षा - यातना) आहे.

**१७.** अल्लाहने सत्यासह ग्रंथ अवतरित केला आहे आणि तराजू देखील (अवतरित केला आहे) आणि तुम्हाला काय माहीत की कदाचित कयामत जवळच येऊन ठेपली असेल.

**१८.** याची घाई त्यांनाच पडली आहे, जे त्यावर ईमान राखत नाहीत आणि जे त्यावर ईमान राखतात, ते त्याचे भय बाळगतात आणि त्यांना ते सत्य असण्याचे पूर्ण ज्ञान आहे. लक्षात ठेवा, जे लोक कयामतविषयी वाद-विवाद करीत आहेत, ते दूरच्या मार्गभ्रष्टतेत जाऊन पडले आहेत.

**१९.** अल्लाह आपल्या दासांवर मोठा कृपा करणारा आहे, ज्याला इच्छितो अधिक आजिविका (रोजी) प्रदान करतो आणि तो मोठा शक्तिशाली मोठा वर्चस्वशाली आहे.

**२०.** ज्याचा संकल्प आखिरतच्या शेतीचा असेल तर आम्ही त्याच्या शेतीत आणखी

जास्त वाढकरू आणि जो ऐहिक शेतीची इच्छा बाळगत असेल तर आम्ही त्याला त्यातून काही देऊन टाकू, मात्र अशा माणसाचा आखिरतमध्ये कसलाही हिस्सा नाही.

**२१.** काय त्या लोकांनी (अल्लाहचे) असे सहभागी (निर्धारित केले) आहेत, ज्यांनी असे धार्मिक आदेश निश्चित केले आहेत, जे अल्लाहने फर्माविलेले नाहीत. जर फैसल्याच्या दिवसाचा वायदा नसता तर (याच क्षणी) त्यांचा फैसला केला गेला असता. निःसंशय, त्या अत्याचारींकरिताच दुःखदायक शिक्षा - यातना आहे.

**२२.** तुम्ही पाहाल की हे अत्याचारी आपल्या दुष्कर्मां (च्या दुष्परिणती) चे भय बाळगत असतील, जे निश्चितच त्यांच्यावर घडून येणार आहे, आणि ज्या लोकांनी ईमान राखले आणि जे सत्कर्मही करीत राहिले तर ते जे काही इच्छितील, त्यांना आपल्या पालनकर्त्याजवळ लाभेल हाच आहे मोठा अनुग्रह.

**२३.** हेच ते होय, ज्याचा शुभ समाचार अल्लाह त्या दासांना देत आहे ज्यांनी ईमान राखले आणि (पैगंबर आचरणशैलीनुसार) कर्म करीत राहिले, तेव्हा सांगा की मी त्याबद्दल तुमच्याकडून कसलाही मोबदला इच्छित नाही, परंतु नाते-संबंधाचे प्रेम, आणि जो मनुष्य सत्कर्म करील आम्ही त्याच्या सत्कर्मात आणखी जास्त वाढकरू. निःसंशय, अल्लाह मोठा माफ करणारा, मोठा कदर जाणणारा आहे.

**२४.** काय हे असे सांगतात की (पैगंबराने) अल्लाहविषयी खोटे रचले आहे. अल्लाहने इच्छिले तर तुमच्या हृदयावर मोहर लावील, आणि अल्लाह आपल्या कथनांनी असत्याला मिटवितो आणि सत्याला बाकी राखतो. तो तर छाती (मना) तल्या गुप्त गोष्टीही जाणणारा आहे.

**२५.** आणि तोच आहे जो आपल्या दासांची तौबा (क्षमा - याचना) कबूल करतो[१] आणि अपराधांना क्षमा करतो आणि तुम्ही जे काही करीत आहात, ते सर्व जाणतो.

**२६.** आणि ईमान राखणाऱ्यांची व नेक सदाचारी लोकांची (दुआ - प्रार्थना) ऐकतो आणि त्यांना आपल्या कृपेने आणखी जास्त प्रदान करतो, आणि काफिरांसाठी कठोर

(१) तौबा (क्षमा - याचना) चा अर्थ अपराधावर पश्चात्ताप करून लज्जित होणे आणि भविष्यात तो गुन्हा न करण्याचा दृढसंकल्प करणे. केवळ तोंडाने तौबा करणे व तो गुन्हा आणि अवज्ञाकारीतेचे कर्म करीत राहणे, आणि तौबाचा देखावा करणे खऱ्या अर्थाने तौबा नव्हे. ही तर तौबाची थट्टा-मस्करी होय. तरी देखील मनापासून केलेली सच्ची तौबा अल्लाह अवश्य कबूल करतो.

शिक्षा - यातना आहे.

**२७.** आणि जर अल्लाहने आपल्या समस्त दासांना विशालतापूर्वक रोजी (आजिविका) दिली असती तर त्यांनी धरतीवर उत्पात (फसाद) माजविला असता, परंतु तो अनुमानाने जे काही इच्छितो अवतरित करतो. तो आपल्या दासांविषयी चांगल्या प्रकारे जाणकार आहे आणि चांगल्या प्रकारे पाहणारा आहे.

**२८.** आणि तोच होय, जो लोकांचे निराश झाल्यानंतर पर्जन्यवृष्टी करतो. आणि आपल्या दयेला विस्तृत करतो. तोच आहे मित्र- सहाय्यक, आणि श्रेष्ठता व प्रशंसेस पात्र.

**२९.** आणि त्याच्या निशाण्यांपैकी आकाश व धरतीचे निर्माण करणे, आणि त्यांच्यात सजीवांना पसरविणे होय. तो या गोष्टीसही समर्थ आहे की जेव्हा इच्छिल त्यांना एकत्र करील.

**३०.** आणि जे काही संकट तुम्हाला पोहोचते, ते तुमच्या आपल्या हातांच्या दुष्कर्मांचे (फळ) आहे आणि तो बहुतेक गोष्टींना माफ करतो.

**३१.** आणि तुम्ही आम्हाला धरतीवर अगतिक (लाचार) करणारे नाहीत. आणि तुमच्यासाठी अल्लाहखेरीज कोणीही मित्र - सहाय्यक नाही आणि ना कोणी मदत करणारा.

**३२.** आणि समुद्रात चालणाऱ्या पर्वतांसमान नौका, त्याच्या निशाण्यांपैकी आहेत.

**३३.** जर त्याने इच्छिले तर हवा बंद करील आणि या नौका समुद्रात स्थिर थांबतील. निःसंशय, यात प्रत्येक सहनशील, कृतज्ञशील माणसाकरिता निशाण्या आहेत.

**३४.** किंवा त्यांना त्यांच्या दुष्कृत्यांपायी नष्ट करून टाकील. तो तर बहुतेक चूका माफ करतो.

**३५.** आणि यासाठी की जे लोक आमच्या निशाण्यांबाबत वाद घालतात, त्यांनी जाणून घ्यावे की त्यांच्याकरिता कशाही प्रकारे सुटका नाही.

**३६.** तेव्हा तुम्हाला जे काही दिले गेले आहे ते ऐहिक जीवनाची अल्पशी साधन-सामुग्री आहे आणि अल्लाहजवळ जे आहे ते त्यापेक्षा अनेक पटींनी चांगले व बाकी राहणारे

आहे. ते त्या लोकांकरिता आहे ज्यांनी ईमान राखले आणि जे केवळ आपल्या पालकनर्त्यावरच भरवसा राखतात.

**३७.** आणि ते मोठ्या अपराधांपासून आणि निर्लज्जतेच्या कामांपासून अलिप्त राहतात आणि क्रोधाच्या वेळीही माफ करतात.

**३८.** आणि आपल्या पालनकर्त्याचा आदेश स्वीकारतात आणि नमाजला नियमितपणे कायम करतात आणि त्यांचे प्रत्येक काम आपसातील सल्लामसलतीने पार पडते. आणि आम्ही जे काही त्यांना देऊन ठेवले आहे, त्यातून (आमच्या नावाने) देत असतात.

**३९.** आणि जेव्हा त्यांच्यावर अत्याचार (व क्रूरता) होते तेव्हा ते केवळ प्रतिशोध घेतात.

**४०.** आणि दुचाराचा मोबदला त्याच प्रकारचा दुराचार आहे आणि जो कोणी माफ करील आणि (आपल्या आचरणात) सुधारणा करून घेईल तर त्याचा मोबदला अल्लाहच्या जबाबदारीवर आहे, वस्तुतः अल्लाह अत्याचारींशी प्रेम राखत नाही.

**४१.** आणि जो मनुष्य आपल्यावर अत्याचार झाल्यानंतर सूड घेईल तर अशा माणसावर दोषारोप ठेवण्याचा मार्ग नाही.

**४२.** (दोषारोपाचा) मार्ग तर अशा लोकांवर आहे, जे स्वतः दुसऱ्यांवर जुलूम अत्याचार करतात आणि धरतीवर नाहक उत्पात (फसाद) माजवित फिरतात. अशाच लोकांकरिता दुःखदायक शिक्षा-यातना (अज़ाब) आहे.

**४३.** आणि जो मनुष्य सहनशीलता राखेल आणि माफ करेल तर निःसंशय हे मोठ्या हिंमतीच्या कामांपैकी (एक काम) आहे.

**४४.** आणि ज्याला अल्लाह पथभ्रष्ट करील, त्यानंतर त्याचा कोणी मित्र व संरक्षक नाही, आणि तुम्ही पाहाल की अत्याचारी लोक शिक्षा-यातनांना पाहून म्हणत असतील की, परतीचा एखादा मार्ग आहे काय?

**४५.** आणि तुम्ही त्यांना पाहाला की ते (जहन्नमच्या) समोर आणून उभे केले जातील. अपमानापायी झुकत जातील, खालच्या नजरेने पाहत असतील. ईमान राखणारे स्पष्टपणे सांगतील की, वस्तुतः तोट्यात राहणारे ते लोक आहेत, ज्यांनी आज कयामतच्या दिवशी स्वतःला आणि आपल्या कुटुंबियांना हानिग्रस्त केले. लक्षात ठेवा

की, अत्याचारी लोक निश्चितच कायमस्वरूपी अज़ाबमध्ये आहेत.

**४६.** आणि त्यांना कोणी मदत करणारा नसेल, जो अल्लाहव्यतिरिक्त त्यांची मदत करू शकेल आणि ज्याला अल्लाह मार्गापासून हटविल, त्याच्यासाठी कोणताही मार्ग नाही.

**४७.** आपल्या पालनकर्त्याचा आदेश मान्य करा, यापूर्वी की अल्लाहतर्फे तो दिवस यावा, ज्याचे टळणे असंभव आहे. तुम्हाला त्या दिवशी ना तर एखादे आश्रयस्थान लाभेल आणि ना लपून अनभिज्ञ बनण्याचे (ठिकाण).

**४८.** जर ते तोंड फिरवित असतील तर आम्ही तुम्हाला त्यांच्यावर देखरेख ठेवणारा बनवून पाठविले नाही. तुमचे कर्तव्य केवळ (आमचा) संदेश पोहचविण्याचे आहे. आणि जेव्हा आम्ही माणसाला आपल्या दया-कृपेची गोडी चाखवितो, तेव्हा तो त्यावर शेखी मिरवू लागतो आणि जर त्यांच्यावर, त्यांच्या आचरणामुळे एखादे संकट येते, तेव्हा निश्चितच मनुष्य मोठा कृतघ्न आहे.

**४९.** आकाशांची आणि धरतीची राज्यसत्ता अल्लाहकरिताच आहे. तो जे काही इच्छितो, निर्माण करतो, ज्याला इच्छितो कन्या देतो, आणि ज्याला इच्छितो पुत्र देतो.

**५०.** किंवा त्यांना पुत्र आणि कन्या दोन्ही मिळून प्रदान करतो, आणि ज्याला इच्छितो निःसंतान ठेवतो, तो मोठा ज्ञान राखणारा आणि सामर्थ्यशाली आहे.

**५१.** एखाद्या दासाशी (माणसाशी) अल्लाहने संभाषण करावे हे अशक्य आहे तथापि वहयीच्या स्वरूपात किंवा पडद्यामागून अथवा एखादा फरिश्ता पाठवून, आणि तो अल्लाहच्या आदेशाने, तो जे इच्छिल वहयी करील. निःसंशय तो (अल्लाह) सर्वांत महान आणि हिकमतशाली आहे.

**५२.** आणि याच प्रकारे आम्ही तुमच्याकडे आपल्या आदेशाने रुह (आत्मा) अवतरित केला आहे. तुम्ही त्यापूर्वी हेही जाणत नव्हते की ग्रंथ आणि ईमान काय आहे? परंतु आम्ही त्यास नूर (दिव्य प्रकाश) बनविले. त्याच्याद्वारे आपल्या दासांपैकी, ज्याला इच्छितो, मार्गदर्शन करतो. निःसंशय तुम्ही सत्य मार्ग दाखवित आहात.

**५३.** त्या अल्लाहच्या मार्गाचे ज्याच्या स्वामीत्वात आकाशांची आणि धरतीची प्रत्येक वस्तू आहे. खबरदार असा, समस्त कार्ये - अल्लाहकडेच परततात.

—–

# सूरह जुखरुफ - ४३

सूरह जुखरुफ मक्का येथे अवतरली आणि यात एकोण्णव्वद आयती आणि सात रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** हा - मीम

**२.** शपथ आहे या स्पष्ट ग्रंथाची.

**३.** आम्ही यास अरबी भाषेचा कुरआन बनविला आहे, यासाठी की तुम्ही समजून घ्यावे.

**४.** आणि निःसंशय, हा सुरक्षित ग्रंथात आहे आणि आमच्या निकट उच्च दर्जाचा आहे. बुद्धी-कौशल्यपूर्ण आहे.

**५.** काय आम्ही या सदुपदेशाला तुमच्यापासून या कारणास्तव हटवावे की तुम्ही मर्यादा ओलांडणारे लोक आहात.

**६.** आणि आम्ही पूर्वीच्या जनसमूहांमध्येही अनेक पैगंबर पाठविले.

**७.** आणि जो देखील पैगंबर त्यांच्याजवळ आला, त्यांनी त्याची थट्टाच उडविली.

**८.** तेव्हा आम्ही त्यांच्यापेक्षा जास्त शक्तिशाली लोकांना नष्ट करून टाकले आणि पूर्वीच्या लोकांची उदाहरणे दिली गेली आहेत.

**९.** आणि जर तुम्ही त्यांना विचाराल की आकाशांना व धरतीला कोणी निर्माण केले, तर निःसंशय त्यांचे उत्तर हेच असेल की, त्यांना सर्वांत जबरदस्त आणि सर्वाधिक ज्ञान बाळगणाऱ्या (अल्लाह) नेच निर्माण केले आहे.

**१०.** (तोच आहे) ज्याने तुमच्यासाठी जमिनीला बिछाईत (आणि अंथरुण) बनविले आणि तिच्यात तुमच्यासाठी रस्ते बनविले, यासाठी की तुम्ही मार्ग प्राप्त करून घ्यावा.

**११.** आणि त्यानेच आकाशातून एका अनुमानानुसार पर्जन्यवृष्टी केली तेव्हा आम्ही त्याद्वारे मृत शहराला जिवंत केले. याच प्रकारे तुम्ही बाहेर काढले जाल.

**१२.** आणि ज्याने सर्व वस्तूंच्या जोड्या[1] बनविल्या आणि तुमच्या (वाहना) करिता नौका बनविल्या आणि चतुष्पाद पशु निर्माण केले, ज्यांच्यावर तुम्ही स्वार होता.

**१३.** यासाठी की तुम्ही त्यांच्या पाठीवर स्वार व्हावे आणि जेव्हा तुम्ही यांच्यावर व्यवस्थित बसाल, तेव्हा आपल्या पालनकर्त्याने (प्रदान केलेल्या) देणग्यांचे स्मरण करा आणि म्हणा, मोठा पवित्र आहे तो, ज्याने यास आमच्या अधीन केले, अन्यथा यास काबूत आणण्याची आमची ताकद नव्हती.

**१४.** आणि निश्चितपणे आम्ही आपल्या पालनकर्त्याकडे परतणार आहोत.

**१५.** आणि त्यांनी अल्लाहच्या काही दासांना त्याचा अंश बनवून घेतले. निःसंशय, मनुष्य, स्पष्टपणे कृतघ्न आहे.

**१६.** काय अल्लाहने आपल्या निर्मितीमधून कन्या, स्वतःसाठी राखल्यात आणि तुम्हाला पुत्रांनी सुशोभित केले?

**१७.** जेव्हा त्यांच्यापैकी एखाद्याला त्या गोष्टींची खबर दिली जाते जिचे उदाहरण त्याने दयावान अल्लाहकरिता सांगितले आहे, तेव्हा त्याचा चेहरा काळवंडतो आणि तो दुःखी होतो.

**१८.** किंवा, काय (अल्लाहची संतती मुली आहेत) ज्या दाग-दागिन्यांत वाढतात आणि भांडण-तंट्यात (आपले म्हणणे) स्पष्ट बोलू शकत नाहीत.

**१९.** आणि त्यांनी दयावान (अल्लाह) ची उपासना करणाऱ्या फरिश्त्यांना स्त्री बनवून टाकले. काय त्यांच्या निर्मितीच्या वेळी ते हजर होते? थ्यांची ही साक्ष लिहून घेतली जाईल आणि त्यांना त्यासंबंधी विचारणा केली जाईल.

---

(१) प्रत्येक वस्तू जोडी-जोडीने बनविली. नर-मादी, वनस्पती, शेती, फळ-फूल आणि प्राणी सर्वांत नर मादी आहेत. काहींच्या मते यास अभिप्रेत एकमेकांची प्रतिकूल वस्तू होत. उदा. उजेड आणि अंधार, रोग आणि स्वास्थ्य, न्याय व अन्याय, सत्य - असत्य, भलेपणा आणि बुरेपणा, ईमान आणि कुफ्र (विश्वास व नकार) नरमी आणि सक्ती वगैरे. काहीच्या मते जोडी, प्रकाराच्या अर्थाने आहे. अर्थात सर्वच प्रकारांचा निर्माणकर्ता अल्लाह आहे.

**२०.** आणि म्हणतात की अल्लाहने इच्छिले असते तर आम्ही त्यांची उपासना केली नसती. त्यांना त्याचे काहीच ज्ञान नाही. हे तर केवळ अटकळीच्या (खोट्या गोष्टी) बोलतात.

**२१.** काय आम्ही यापूर्वी त्यांना (दुसरा) एखादा ग्रंथ प्रदान केला आहे ज्याला यांनी मजबूतपणे धरून ठेवले आहे?

**२२.** (नव्हे) किंबहुना हे तर म्हणतात की आम्हाला आमचे वाडवडील एका धर्मावर आढळले, आणि आम्ही त्यांच्याच पदचिन्हांवर चालून सन्मार्ग प्राप्त केला आहे.

**२३.** आणि अशाच प्रकारे तुमच्या पूर्वीही आम्ही, ज्या ज्या वस्तीत एखादा खबरदार करणारा पाठविला, तिथल्या सुखवस्तू लोकांनी हेच उत्तर दिले की आम्हाला आपले पूर्वज (वाडवडील) (एकाच पाऊलवाटेवर आणि) एका धर्मावर आढळले आणि आम्ही तर त्यांच्याच पदचिन्हांचे अनुसरण करणारे आहोत.

**२४.** (पैगंबराने) सांगितलेही की जरी मी त्याहून अधिक चांगल्या (ध्येयापर्यंत पोहचविणारा) मार्ग घेऊन आलो आहे, ज्यावर तुम्हाला आपले वाडवडील आढळले (तरीही तुम्ही त्यांचेच अनुसरण कराल?) तेव्हा त्यांनी उत्तर दिले की, आम्ही ते मान्य करणार नाहीत, जे देऊन तुम्हाला पाठविले गेले आहे.

**२५.** तेव्हा आम्ही त्यांचा सूड घेतला आणि पाहा, खोटे ठरविणाऱ्यांचा काय परिणाम (अंत) झाला!

**२६.** आणि जेव्हा इब्राहीम (अलै.) आपल्या पित्यास आणि आपल्या जनसमूहाच्या लोकांना म्हणाले, मी त्या गोष्टींपासून अलग आहे, ज्यांची तुम्ही उपासना करता.

**२७.** त्या शक्ती-सामर्थ्याखेरीज, ज्याने मला निर्माण केले आहे आणि तोच मला मार्गदर्शनही करेल.

**२८.** आणि इब्राहीम (अलै.) तिलाच आपल्या संततीलाही बाकी राहणारी गोष्ट कायम करून गेले, यासाठी की लोकांनी (अनेकेश्वरउपासनेपासून) आपला बचाव करीत राहावे.

**२९.** किंबहुना मी त्या लोकांना आणि त्यांच्या पूर्वजांना सामुग्री (आणि साधन) प्रदान

केली, येथपावेतो की त्यांच्याजवळ सत्य आणि स्पष्टरित्या ऐकविणारा रसूल (पैगंबर) आला.

**३०.** आणि सत्य येऊन पोहोचताच हे उद्गारले की ही तर जादू आहे, आणि आम्ही याचा इन्कार करणारे आहोत.

**३१.** आणि म्हणू लागले की हा कुरआन या दोन्ही वस्त्यांपैकी एखाद्या सुखसंपन्न माणसावर का अवतरित केला गेला नाही?

**३२.** काय तुमच्या पालनकर्त्याच्या दया-कृपेची हे विभागणी करतात? आम्हीच त्यांच्या ऐहिक जीवनाची (आजिविका) त्यांच्यात वाटून दिली आहे आणि एकाला दुसऱ्याहून अधिक चांगले केले आहे यासाठी की एकमेकांना अधीन करून घ्यावे आणि ज्याला हे लोक जमा करीत फिरत आहेत, त्याहून तुमच्या पालनकर्त्याची दया - कृपा अतिशय उत्तम आहे.

**३३.** आणि जर अशी गोष्ट नसती की सर्व लोक एकाच पद्धतीचे अनुसरण करतील तर दयावान (रहमान) शी कुफ्र (इन्कार) करणाऱ्यांच्या घरांची छते आम्ही चांदीची बनविली असती आणि जिने (पायऱ्या) देखील, ज्यावर ते चढतात.

**३४.** आणि त्यांच्या घरांचे दरवाजे व आसने देखील, ज्यावर ते तक्के (लोड) लावून बसतात.

**३५.** आणि सोन्याचेही, आणि हा सर्व काही या जगाचाच लाभ आहे, आणि आखिरत तर तुमच्या पालनकर्त्याच्या निकट केवळ नेक सदाचारी लोकांकरिताच आहे.

**३६.** आणि जो मनुष्य अल्लाहच्या स्मरणापासून सुस्ती करील, आम्ही त्याच्यावर एक सैतान निर्धारित करतो. तोच त्याचा साथीदार बनतो.

**३७.** आणि ते त्यांना (अल्लाहच्या) मार्गापासून रोखतात आणि हे याच विचारात राहतात की आम्ही मार्गदर्शन प्राप्त केलेले आहोत.

**३८.** येथेपर्यंत की जेव्हा तो आमच्याजवळ येईल, तेव्हा म्हणेल की माझ्या आणि तुझ्या दरम्यान पूर्व आणि पश्चिमेचे अंतर असते तर फार बरे झाले असते. तू मोठा वाईट सोबती आहेस.

**३९.** आणि जेव्हा तुम्ही अत्याचार करूनच बसाल तर तुम्हाला आज कधीही तुम्हा सर्वांच्या शिक्षा - यातनेत सहभागी होणे काहीच लाभदायक ठरणार नाही.

**४०.** तेव्हा काय तुम्ही बहिऱ्याला ऐकवू शकता किंवा आंधळ्याला मार्ग दाखवू शकता आणि त्याला जो उघड मार्गभ्रष्टतेत असावा.

**४१.** मग जर आम्ही तुम्हाला येथून जरी नेले तरीही आम्ही त्यांच्याशी सूड घेणारच आहोत.

**४२.** किंवा जो काही वायदा त्यांच्याशी केला आहे, तो तुम्हाला दाखवू आम्ही त्यांच्यावरही सामर्थ्य बाळगतो.

**४३.** तेव्हा जी वहयी (प्रकाशना) तुमच्याकडे केली गेली आहे तिला दृढपणे बाळगून राहा. निःसंशय, तुम्ही सरळ मार्गावर आहात.

**४४.** आणि निःसंशय, हा (स्वतः) तुमच्याकरिता आणि तुमच्या जनसमूहाकरिता उपदेश आहे आणि निकट भविष्यात तुमची विचारणा होईल.

**४५.** आणि आमच्या त्या पैगंबरांकडून माहीत करून घ्या, ज्यांना आम्ही तुमच्या पूर्वी पाठविले होते की काय आम्ही रहमान (दयावान अल्लाह) च्या खेरीज दुसरी उपास्ये (आराध्य दैवते) निर्धारित केली होती, ज्यांची उपासना केली जावी.

**४६.** आणि आम्ही मूसा (अलै.) ला आपल्या निशाण्यास देऊन, फिरऔन आणि त्याच्या दरबारी लोकांजवळ पाठविले, तेव्हा (मूसा, त्यांना) म्हणाले की मी समस्त विश्वांच्या पालनकर्त्याचा रसूल (संदेशवाहक) आहे.

**४७.** तर जेव्हा ते आमच्या निशाण्या घेऊन त्या लोकांजवळ आले, तेव्हा ते अचानक त्यांची थट्टा उडवू लागले.

**४८.** आणि आम्ही जी निशाणी त्यांना दाखवित होतो, ती दुसऱ्या निशाणीपेक्षा सरस असे, आणि आम्ही त्यांना शिक्षा - यातनेत धरले, यासाठी की त्यांनी रुजू करावे.

**४९.** आणि ते म्हणाले, हे जादूगार! आमच्यासाठी आपल्या पालनकर्त्याला त्या गोष्टीची दुआ-प्रार्थना कर जिचा त्याने तुला वायदा दिलेला आहे विश्वास कर की आम्ही सन्मार्गाला लागू.

**५०.** मग जेव्हा आम्ही त्यांच्यावरून तो अज़ाब हटविला तेव्हा त्यांनी त्याच वेळी आपला वायदा व आपल्या वचनाचा भंग केला.

**५१.** आणि फिरऔनने आपल्या जनसमूहात ऐलान करविले व म्हणाला, हे माझ्या जमातीच्या लोकानो! काय मिस्त्रचा देश माझा नाही, आणि माझ्या राजमहालांच्या खाली जे हे जलप्रवाह वाहत आहेत, काय तुम्ही पाहात नाही?

**५२.** किंबहुना मी श्रेष्ठतम आहे याच्या तुलनेत जो तुच्छ आहे आणि साफ (स्पष्टपणे) बोलूही शकत नाही.

**५३.** बरे, याच्यावर सोन्याची कांकणे का नाही अवतरित झालीत, किंवा याच्यासोबत फरिश्तेच झुंडीने (गोळा होऊन) आले असते.

**५४.** तेव्हा त्याने आपल्या जनसमूहाच्या लोकांना मूर्ख बनविले आणि त्यांनी त्याचे म्हणणे मानले. निःसंशय, ते सर्व दुराचारी लोक होते.

**५५.** मग जेव्हा त्यांनी आम्हाला क्रोधित केले, तेव्हा आम्ही त्यांचा सूड घेतला आणि सर्वांना (समुद्रात) बुडवून टाकले.

**५६.** तेव्हा आम्ही त्यांना भूतकालीन करून टाकले आणि नंतरच्या लोकांकरिता नमूना बनविले.

**५७.** आणि जेव्हा मरियमच्या पुत्राचे उदाहरण सांगितले गेले, तेव्हा त्या वृत्तांताने तुमचा जनसमूह (आनंदाने) ओरडला.

**५८.** आणि ते म्हणाले की आमची उपास्ये चांगली आहेत की तो? तुम्हाला त्यांचे हे सांगणे केवळ वाद घालण्याच्या हेतूने आहे, किंबहुना हे लोक आहेतच भांडखोर.

**५९.** तो (ईसा अलै.) देखील केवळ एक दास मात्र आहे, ज्याच्यावर आम्ही उपकार केला आणि त्याला इस्त्राईलच्या संततीकरिता (आपल्या सामर्थ्याची) निशाणी बनविले.

**६०.** जर आम्ही इच्छिले असते तर तुमच्याऐवजी फरिश्ते बनविले असते ज्यांनी धरतीवर एकमेकांचे वारस म्हणून काम केले असते.

**६१.** आणि निःसंशय, तो (ईसा अलै.) कयामतची निशाणी आहे, तेव्हा तुम्ही कयामतविषयी शंका करू नका आणि माझे म्हणणे मान्य करा. हाच सरळ मार्ग आहे.

**६२.** आणि सैतानाने तुम्हाला प्रतिबंध घालू नये. निःसंशय, तो तुमचा उघड शत्रू आहे.

**६३.** आणि जेव्हा ईसा (अलै.) ईशचमत्कार (मोजिजे) घेऊन आले, तेव्हा म्हणाले, मी तुमच्याजवळ ज्ञान घेऊन आलो आहे आणि अशासाठी आलो आहे की ज्या ज्या गोष्टींमध्ये तुम्ही मतभेद करता, त्या स्पष्ट कराव्यात. तेव्हा तुम्ही अल्लाहचे भय बाळगा आणि माझे आज्ञापालन करा.

**६४.** माझा आणि तुमचा स्वामी व पालनकर्ता अल्लाहच आहे. तेव्हा तुम्ही सर्व त्याचीच उपासना करा. हाच सरळ मार्ग आहे.

**६५.** मग (इस्राईलच्या संततीच्या) समूहांनी आपसात मतभेद केला तेव्हा अत्याचारी लोकांकरिता सर्वनाश आहे. दुःखदायक दिवसाच्या अज़ाब (शिक्षा - यातने) ने.

**६६.** हे लोक फक्त कयामतच्या प्रतीक्षेत आहेत की ती अचानक त्यांच्यावर येऊन कोसळावी आणि त्यांना खबरही न व्हावी.

**६७.** त्या दिवशी (जीवलग) मित्र देखील एकमेकांचे शत्रू बनतील, मात्र अल्लाहचे भय राखणाऱ्यांखेरीज.

**६८.** हे माझ्या दासांनो! आज ना तुमच्यावर एखादे भय आहे आणि ना तुम्ही दुःखी व्हाल.

**६९.** ज्यांनी आमच्या आयतींवर ईमान राखले आणि जे मुस्लिम (आज्ञाधारक) बनून राहिले.

**७०.** तुम्ही आणि तुमच्या पत्न्या आनंदित व खूश होऊन जन्नतमध्ये दाखल व्हा.

**७१.** त्यांच्या चोहीबाजूंना सोन्याची ताटे आणि सोन्याचे प्याले फिरविले जातील. यात ते सर्व काही असेल, जे मनाला आवडणारे आणि नेत्यांना सुखदायक ठरणारे असेल, आणि तुम्ही त्यात नेहमी-नेहमीकरिता राहाल.

**७२.** आणि हीच ती जन्नत होय की तुम्ही आपल्या आचरणाच्या मोबदल्यात तिचे उत्तराधिकारी (वारस) बनविले गेले आहात.

**७३.** इथे तुमच्यासाठी विपुल प्रमाणात मेवे आहेत, ज्यांना तुम्ही खात राहाल.

**७४.** निःसंशय, अपराधी लोक जहन्नमच्या शिक्षा-यातनेत सदैव राहतील.

**७५.** ही (शिक्षा-यातना) कधीही त्यांच्यावरून सौम्य केली जाणार नाही आणि ते तिच्यातच नैराश्यग्रस्त पडून राहतील.

**७६.** आणि आम्ही त्यांच्यावर अत्याचार नाही केला, उलट ते स्वतःच अत्याचारी होते.

**७७.** ते हाक मारून म्हणतील की हे मालक! तुमचा पालनकर्ता तर आमचा पुरता नायनाट करून टाकील! तो म्हणेल, तुम्हाला तर (याच अवस्थेत नेहमी) राहावयाचे आहे.

**७८.** आम्ही तर तुमच्याजवळ सत्य घेऊन आलो, परंतु तुमच्यापैकी बहुतेक लोक सत्याशी तिरस्कार करणारे होते.

**७९.** काय त्यांनी एखाद्या कामाचा मजबूत इरादा करून घेतला आहे? तर मग खात्री बाळगा की आम्हीही मजबूत काम करणारे आहोत.

**८०.** काय त्यांनी असे गृहित धरले आहे की आम्ही त्यांच्या गुप्त गोष्टींना आणि त्यांच्या कानगोष्टींना ऐकत नाहीत? (निःसंशय आम्ही सर्व काही ऐकतो) किंबहुना आम्ही पाठविलेले (फरिश्ते) त्यांच्याजवळच लिहित आहेत.

**८१.** (तुम्ही) सांगा की, जर समजा रहमान (दयावान अल्लाह) ची एखादी संतती असती तर मी सर्वांत प्रथम उपासना करणारा राहिले असतो.

**८२.** आकाशांचा आणि धरती व अर्श (ईश-सिंहासना) चा स्वामी, त्या गोष्टींपासून पवित्र (व्यंग-दोष विरहित) आहे. ज्या (हे) सांगतात.

**८३.** आता तुम्ही त्यांना याच वाद-विवादात आणि खेळण्या-बागडण्यात सोडून द्या. येथेपर्यंत की त्यांची त्या दिवसाशी गाठ पडावी, ज्याचा यांना वायदा दिला जात आहे.

**८४.** आणि तोच आकाशांमध्येही पूज्य (उपासनीय) आहे आणि धरतीवरही तोच उपासना करण्यायोग्य आहे आणि तो मोठा बुद्धिकौशल्य बाळगणारा आणि संपूर्ण ज्ञान राखणारा आहे.

**८५.** आणि तो मोठा शुभ-कल्याणकारी आहे, ज्याच्या हाती आकाशांचे आणि धरतीचे आणि या दोघांच्या दरम्यानचे राज्य आहे आणि कयामतचे ज्ञान देखील त्याच्याचजवळ आहे आणि त्याच्याचकडे तुम्ही सर्व परतविले जाल.

**८६.** आणि ज्यांना हे लोक अल्लाहखेरीज पुकारतात, ते शिफारस करण्याचा अधिकार बाळगत नाही, तथापि (शिफारसीचा हक्क ते बाळगतात) जे सत्य गोष्टींचा स्वीकार करतील आणि त्यांना ज्ञानही असावे.

**८७.** जर तुम्ही त्यांना विचाराल की त्यांना कोणी निर्माण केले तर हे अवश्य उत्तर देतील की अल्लाहने, मग हे कोठे उलट जात आहेत ?

**८८.** आणि त्यांचे (पैगंबरांचे अधिकांश) हे म्हणणे की हे माझ्या पालनकर्त्या! निःसंशय, हे असे लोक आहेत, जे ईमान राखत नाहीत.

**८९.** तेव्हा तुम्ही त्यांच्याकडून तोंड फिरवून घ्या आणि (निरोपाचा) सलाम सांगा. त्यांना (स्वतःलाच) माहीत पडेल.

---

# सूरह दुखान - ४४

सूरह दुखान मक्का येथे अवतरली आणि यात एकोणसाठ आयती व तीन रुकू आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** हा. मीम.

**२.** शपथ आहे या स्पष्ट ग्रंथाची.

**३.** निःसंशय, आम्ही या ग्रंथाला एका शुभरात्रीत[१] अवतरित केले आहे. निःसंशय,

(१) शुभरात्रीशी अभिप्रेत 'लैलतुल कद्र' आहे. जसे की अन्य ठिकाणी सांगितले गेले आहे ''अन्ना अल्जल्ना फी लैलतुल कद्र'' (सूरह कद्र) ''आम्ही हा कुरआन कद्रच्या रात्रीत अवतरित केला.'' ही मुबारक (शुभ) रात्र रमजान महिन्याच्या अंतिम दहा रात्रींच्या विषम तारखेच्या रात्रींपैकी एक रात्र असते. इथे कद्र (सन्मान) च्या या रात्रीला शुभरात्र म्हटले गेले आहे. हिचे शुभ असण्यात काय शंका असू शकते. एक तर या रात्रीत कुरआनाचे अवतरण झाले. दुसरे हे की या रात्री फरिश्ते आणि जिब्रील अवतरित होतात. तिसरे असे की या रात्री संपूर्ण वर्षात घडणाऱ्या महत्त्वपूर्ण गोष्टींचा फैसला केला जातो (जसे पुढे येत आहे). चौथे हे की या रात्रीची उपासना हजार महिन्यां (अर्थात ८३ वर्षे ३ महिने) च्या उपासनेपेक्षा उत्तम आहे. 'शबे कद्र' किंवा 'लैल-ए-मुबारकह'मध्ये कुरआन अवतरित होण्याचा अर्थ हा की या रात्रीत पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्यावर पवित्र कुरआनचे अवतरण सुरू झाले होते. किंवा यास अभिप्रेत 'लौहे महफूज' (सुरक्षित पट्टिका) मधून याच रात्री 'बैतुल इज्जत'

आम्ही अवगत करून देणारे आहोत.

**४.** त्याच रात्रीत प्रत्येक महत्त्वपूर्ण कार्याचा निर्णय घेतला जातो.

**५.** आमच्याकडून एक फर्मान बनून आम्हीच आहोत रसूल (संदेशवाहक) बनवून पाठविणारे.

**६.** तुमच्या पालनकर्त्याच्या कृपेने, तोच आहे ऐकणारा आणि जाणणारा.

**७.** जो आकाशांचा आणि धरतीचा आणि त्यांच्या दरम्यान जे काही आहे त्या सर्वांचा स्वामी आहे, जर तुम्ही विश्वास राखणारे असाल.

**८.** त्याच्याशिवाय दुसरा कोणीही उपासना करण्यास पात्र नाही. तोच जिवंत करतो आणि मारतो. तोच तुमचा आणि तुमच्यापूर्वी होऊन गेलेल्या पूर्वजांचा स्वामी व पालनकर्ता आहे.

**९.** किंबहुना ते संशयात पडून खेळत आहेत.

**१०.** तुम्ही त्या दिवसाच्या प्रतीक्षेत राहा, जेव्हा आकाश उघड स्वरूपाचा धूर आणील.

**११.** जो लोकांना घेरा टाकील. ही मोठी दुःखदायक शिक्षा - यातना आहे.

**१२.** (म्हणतील की) हे आमच्या पालनकर्त्या! हा अज़ाब (शिक्षा - यातना) आमच्यापासून दूर कर, आम्ही ईमान स्वीकारले.

**१३.** त्यांच्यासाठी आता उपदेश कोठे आहे? स्पष्टरित्या निवेदन करणारे पैगंबर त्यांच्याजवळ (केव्हाच) येऊन गेलेत.

---

(सन्मानगृह) मध्ये अवतरित केला गेला, जे जगाच्या आकाशात आहे. मग तेथून गरजेनुसार २३ वर्षांपावेतो विभिन्न काळांत पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्यावर अवतरित होत राहिला. काहींनी 'लैल-ए-मुबारकह' (शुभरात्र) शी अभिप्रेत शाबान महिन्याची पंधरावी रात्र घेतली आहे. परंतु हे उचित नाही. जेव्हा कुरआनाच्या स्पष्ट शब्दांत 'शबे कद्र'मध्ये अवतरित होणे सिद्ध आहे तेव्हा यापासून 'शबे बराअत' अभिप्रेत घेणे कदापि योग्य नव्हे. याखेरीज 'शबे बराअत' (शाबान महिन्याची पंधरावी रात्र)विषयी जेवढी कथने आहेत, ज्यात तिची श्रेष्ठता व महत्ता सांगितले गेली आहे किंवा त्यात तिला फैसल्याची रात्र म्हटले गेले आहे, ती सर्व निवेदने प्रमाणाच्या आधारास कमकुवत आहेत. अशी कथने कुरआनाच्या स्पष्ट शब्दांचा सामना कशा प्रकारे करू शकतात?

**१४.** तरीही त्यांनी त्यांच्याकडून तोंड फिरविले आणि सांगितले की हा तर शिकविलेला वेडा आहे.

**१५.** आम्ही शिक्षा - यातनेला थोडेसे दूरही करू तरी तुम्ही परत पुन्हा आपल्या त्याच अवस्थेत याल.

**१६.** ज्या दिवशी आम्ही मोठ्या सक्त पकडीत धरू, निश्चितच आम्ही प्रतिशोध (सूड) घेणार आहोत.

**१७.** आणि निःसंशय, आम्ही यापूर्वी फिरऔनच्या जनसमूहाची (ही) परीक्षा घेतली आहे ज्यांच्याजवळ (अल्लाहचा) प्रतिष्ठासंपन्न रसूल (पैगंबर) आला.

**१८.** की अल्लाहच्या दासांना माझ्या हवाली करा, विश्वास राखा की मी तुमच्यासाठी विश्वस्त पैगंबर आहे.

**१९.** आणि तुम्ही अल्लाहसमोर विद्रोह दाखवू नका. मी तुमच्यासमोर उघड पुरावा प्रस्तुत करेन.

**२०.** आणि मी, आपल्या व तुमच्या पालनकर्त्याच्या शरणात येतो. या गोष्टीपासून की तुम्ही मला दगडांनी ठेचून मारावे.

**२१.** आणि जर तुम्ही माझ्यावर ईमान राखत नसाल तर माझ्यापासून अलग राहा.

**२२.** मग त्यांनी आपल्या पालनकर्त्याला दुआ-प्रार्थना केली की हे सर्व अपराधी लोक आहेत.

**२३.** (आम्ही फर्माविले) की रात्रीतूनच तुम्ही माझ्या दासांना घेऊन निघा. निश्चितच तुमचा पाठलाग केला जाईल.

**२४.** आणि तुम्ही समुद्राला स्थिर अवस्थेत सोडून निघून जा. निःसंशय, हे सैन्य बुडविले जाईल.

**२५.** ते अनेक बागा आणि झरे सोडून गेले.

**२६.** आणि शेते व उत्तम निवासस्थाने.

**२७.** आणि त्या सुखदायक वस्तू ज्यांच्यात ते सुख भोगत होते.

**२८.** अशा प्रकारे घडले, आणि आम्ही त्या सर्वांचा उत्तराधिकारी (वारस) दुसऱ्या जनसमूहाला बनविले.

**२९.** तेव्हा त्यांच्यासाठी ना आकाश रडले ना धरती आणि ना त्यांना कसली संधी लाभली.

**३०.** आणि आम्हीच इस्त्राईलच्या संततीला (अतिशय) अपमानदायक शिक्षा-यातनेपासून मुक्ती दिली.

**३१.** (जी) फिरऔनतर्फे (दिली जात) होती. वास्तविक तो विद्रोही आणि मर्यादेचे उल्लंघन करणाऱ्यांपैकी होता.

**३२.** आणि आम्ही जाणूनबुजून इस्त्राईलच्या संततीला जगातील लोकांवर श्रेष्ठता प्रदान केली.

**३३.** आणि आम्ही त्यांना अशा निशाण्या प्रदान केल्या, ज्यांच्यात उघड कसोटी होती.

**३४.** हे लोक तर हेच म्हणतात.

**३५.** की (अंतिम गोष्ट) हेच आमचे पहिल्यांदा (जगात) मरण पावणे आहे आणि आम्ही दुसऱ्यांदा उठविलो जाणार नाहीत.

**३६.** जर तुम्ही सच्चे असाल तर आमच्या पूर्वजांना घेऊन या.

**३७.** काय हे लोक अधिक चांगले आहेत की तुब्बअ च्या जनसमूहाचे लोक आणि जे त्यांच्याही पूर्वीचे होते? आम्ही त्या सर्वांना नष्ट करून टाकले. निःसंशय, ते अपराधी होते.

**३८.** आणि आम्ही आकाशांना व धरतीला आणि त्यांच्या दरम्यानच्या वस्तूंना खेळ स्वरूपात निर्माण केले नाही.

**३९.** किंबहुना आम्ही त्यांना उचित हेतुसहच निर्माण केले आहे. परंतु अधिकांश लोक हे जाणत नाहीत.

**४०.** निःसंशय, निर्णयाचा दिवस त्या सर्वांसाठी निर्धारित वेळी आहे.

**४१.** त्या दिवशी कोणी मित्र कोणा मित्राच्या काहीच कामी येणार नाही आणि ना त्यांची मदत केली जाईल.

**४२.** परंतु (त्याच्याखेरीज) ज्याच्यावर अल्लाहची दया - कृपा व्हावी. निःसंशय, तो मोठा शक्तिशाली आणि दया करणारा आहे.

**४३.** निःसंशय, जक्कूमचे झाड

**४४.** गुन्हेगारांचे भोजन आहे

**४५.** जे वितळलेल्या तांब्यासारखे आहे आणि पोटात उकळत राहते.

**४६.** खूप गरम उकळत्या पाण्यासारखे.

**४७.** त्याला धरा, मग फरफटत ओढत नेऊन जहन्नमच्या मध्यभागी पोहचवा,

**४८.** मग त्याच्या डोक्यावर गरम उकळत्या पाण्याची यातना (अज़ाब) ओता.

**४९.** (त्याला सांगितले जाईल) चाखत जा (गोडी), तू तर मोठा प्रतिष्ठित आणि आदरसन्मान बाळगणारा होता.

**५०.** हीच ती गोष्ट होय, जिच्याबाबत तुम्ही शंका करीत असत.

**५१.** निःसंशय, अल्लाहचे भय बाळगणारे शांतीपूर्ण ठिकाणी असतील

**५२.** बागांमध्ये आणि जलस्त्रोतां (झऱ्यां) मध्ये.

**५३.** पातळ व मुलायम रेशमी वस्त्रे घातलेले, समोरासमोर बसले असतील.

**५४.** हे त्याच प्रकारे आहे, आणि आम्ही मोठया नेत्रांच्या हूर-परींशी त्यांचा विवाह करून देऊ.

**५५.** निर्भयतापूर्वक तिथे प्रत्येक प्रकारच्या मेव्याची मागणी करतील.

**५६.** तिथे ते मृत्युचा स्वाद चाखणार नाहीत, पहिल्या मृत्युखेरीज (जो जगात घडला) त्यांना अल्लाहने जहन्नमच्या (भयंकर) शिक्षा - यातने (अज़ाब) पासून वाचविले.

**५७.** ही केवळ तुमच्या पालनकर्त्याची कृपा आहे. हीच आहे मोठी सफलता.

**५८.** आम्ही या (कुरआना) ला तुमच्या भाषेत सोपे केले, यासाठी की त्यांनी (लोकांनी) बोध ग्रहण करावा.

**५९.** आता तुम्ही प्रतीक्षा करा, हे देखील प्रतीक्षा करीत आहेत.

---

## सूरह जासियः - ४५

सूरह जासियः मक्का येथे अवतरली आणि यात पस्तीस आयती व चार रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** हा. मीम

**२.** हा ग्रंथ, जबरदस्त हिकमत (बुद्धिकौशल्य) बाळगणाऱ्या अल्लाहतर्फे अवतरित झाला आहे.

**३.** आकाशांमध्ये आणि धरतीत ईमान राखणाऱ्यांकरिता अनेक निशाण्या आहेत.

**४.** आणि स्वतः तुमच्या जन्मात आणि जनावरांच्या पसरविण्यात, विश्वास ठेवणाऱ्या जनसमूहाकरिता अनेक निशाण्या (बोधचिन्हे) आहेत.

**५.** आणि रात्र व दिवसाच्या फेरबदलात आणि जी काही आजिविका (रोजी) अल्लाह, आकाशातून अवतरित करून जमिनीला, तिच्या मृत्युनंतर (पुन्हा) जिवंत करतो, त्यात आणि वाऱ्यांच्या फेरबदलातही, त्या लोकांकरिता निशाण्या आहेत, जे बुद्धी बाळगतात.

**६.** या आहेत अल्लाहच्या आयती, ज्या आम्ही तुम्हाला सत्यासह ऐकवित आहोत, तेव्हा अल्लाह आणि त्याच्या आयतीनंतर हे (अखेर) कोणत्या गोष्टीवर ईमान राखतील?

**७.** धिःक्कार (आणि खेद आहे) प्रत्येक खोट्या अपराधीबाबत.

**८.** अल्लाहच्या आयती आपल्यासमोर वाचल्या जात असताना जो ऐकेल, तरीही गर्व करील अशा प्रकारे अडून राहावा, जणू त्याने ऐकलेच नाही, तर अशा लोकांना दुःखदायक शिक्षेची खबर द्या.

**९.** आणि जेव्हा तो आमच्या आयतींपैकी एखाद्या आयतीची खबर मिळवितो तेव्हा तिची थट्टा उडवितो. हेच ते लोक होत, ज्यांच्याकरिता अपमानदायक अज़ाब (शिक्षा-यातना) आहे.

**१०.** त्यांच्या मागे जहन्नम आहे, जे काही त्यांनी साध्य केले होते, ते त्यांना काहीच उपयोगी पडणार नाही आणि ना ते (काही उपयोगी पडतील) ज्यांना त्यांनी अल्लाहखेरीज वली (संरक्षक, मित्र) बनवून ठेवले होते. त्यांच्यासाठी तर मोठा भयंकर अज़ाब आहे.

**११.** हे (परिपूर्ण) मार्गदर्शन आहे,[१] आणि ज्या लोकांनी आपल्या पालनकर्त्याच्या आयतींचा इन्कार केला, त्यांच्यासाठी मोठी कठीण शिक्षा - यातना आहे.

**१२.** अल्लाहच आहे ज्याने तुमच्यासाठी समुद्राला ताबेदार बनविले, यासाठी की त्याच्या आदेशाने त्यात नौका चालाव्यात आणि तुम्ही त्याच्या कृपेचा शोध घ्यावा आणि यासाठी की तुम्ही त्याच्याशी कृतज्ञ व्हावे.

**१३.** आणि आकाशांच्या व धरतीच्या प्रत्येक वस्तूलाही त्याने आपल्यातर्फे तुमच्या सेवेत लावून ठेवले आहे, निःसंशय, विचार-चिंतन करणाऱ्या लोकांना यात अनेक निशाण्या आढळून येतील.

**१४.** तुम्ही ईमान राखणाऱ्यांना सांगा की त्यांनी अशा लोकांना माफ करत राहावे, जे अल्लाहच्या दिवसांची आशा बाळगत नाही, यासाठी की सर्वश्रेष्ठ अल्लाहने एका जनमसूहाच्या लोकांना त्यांच्या दुष्कृत्यांचा मोबदला द्यावा.

**१५.** जो कोणी सत्कर्म करील तो आपल्या स्वतःच्या भल्याकरिता आणि जो दुष्कर्म करील, त्याची दुष्परिणती त्याच्यावरच आहे. मग तुम्ही सर्व आपल्या पालनकर्त्याकडे

---

(१) कधी हवेची दिशा उत्तर आणि दक्षिणेकडे तर कधी पूर्व आणि पश्चिमेकडे असते. कधी पाणी पाऊस आणणारी हवा तर कधी भूभागावरील हवा, कधी रात्री तर कधी दिवसा, काही हानिकारक तर काही लाभदायक, काही आत्म्यास पोषक तर काही, सर्व काही होरपळून टाकणारी आणि केवळ धूलमिश्रित वादळ. हवेचे एवढे प्रकार हे सिद्ध करतात की या विश्वाचा कोणीतरी कर्ता करविता आहे जो केवळ एकमेव आहे, दोन किंवा अधिक नाही. समस्त अधिकारांचा स्वामी तोच एकटा आहे. त्याचा कोणी भागीदार नाही. प्रत्येक प्रकारची व्यवस्था तोच एकटा सांभाळतो. दुसऱ्या कोणाच्याही जवळ कणाइतकाही अधिकार नाही. याच अर्थाची आयत 'सूरह बकरा'ची आयत नं. १६४ देखील आहे.

परतविले जाल.

**१६.** आणि निःसंशय, आम्ही इस्त्राईलच्या संततीला ग्रंथ, राज्यसत्ता आणि पैगंबरपद प्रदान केले होते, आणि आम्ही त्यांना पाक (स्वच्छ - शुद्ध) व चांगली रोजी (आजिविका) प्रदान केली होती, आणि त्यांना जगातील लोकांवर श्रेष्ठता प्रदान केली होती.

**१७.** आणि आम्ही त्यांना धर्माच्या स्पष्ट निशाण्या प्रदान केल्या, मग त्यांनी आपल्याजवळ ज्ञान येऊन पोहोचल्यानंतर आपसातील द्वेष-विवादापायी मतभेद केला. हे ज्या ज्या गोष्टीत मतभेद करीत आहेत त्यांचा फैसला कयामतच्या दिवशी त्यांच्या दरम्यान तुमचा पालनकर्ता स्वतः करील.

**१८.** मग आम्ही तुम्हाला धर्माच्या (स्पष्ट) मार्गावर कायम केले. तेव्हा तुम्ही त्याच मार्गाचे अनुसरण करीत राहा आणि नादान अडाणी लोकांच्या इच्छा आकांक्षांचे अनुसरण करू नका.

**१९.** (लक्षात ठेवा) की हे लोक कधीही अल्लाहसमोर तुमच्या काहीच कामी येऊ शकत नाही (जाणून घ्या की) अत्याचारी लोक आपसात एकमेकांचे मित्र असतात आणि अल्लाहचे भय राखणाऱ्यांचा सखा - सोबती, महान अल्लाह आहे.

**२०.** हा कुरआन लोकांकरिता अंतर्दृष्टीच्या गोष्टी आणि मार्गदर्शन व दया आहे, त्या लोकांकरिता जे विश्वास राखतात.

**२१.** काय त्या लोकांनी, जे वाईट कर्म करतात, असे समजून घेतले आहे की आम्ही त्यांना त्या लोकांसारखे ठरवू, ज्यांनी ईमान राखले आणि सत्कर्म करीत राहिले की त्यांचे जगणे-मरणे एकसमान व्हावे. मोठा वाईट फैसला आहे, जो ते करीत आहेत.

**२२.** आणि आकाशांना व धरतीला अल्लाहने अतिशय न्यायासह निर्माण केले आहे आणि यासाठी की प्रत्येक माणसाला त्याच्या कृत-कर्माचा पुरेपूर मोबदला दिला जावा आणि त्यांच्यावर जुलूम केला जाणार नाही.

**२३.** काय तुम्ही त्यालाही पाहिले, ज्याने आपल्या मनाच्या इच्छेला आपला उपास्य (माबूद) बनवून ठेवले आहे आणि अल्लाहने जाणीवपूर्वक त्याला पथभ्रष्ट केले आहे आणि त्याच्या कानावर आणि हृदयांवर मोहर लावली आहे आणि त्याच्या डोळ्यांवर

पडदा टाकला आहे, आता अशा माणसाला अल्लाहनंतर कोण मार्गदर्शन करू शकतो? काय अजूनही तुम्ही बोध ग्रहण करीत नाहीत?

**२४.** आणि ते म्हणाले, आमचे जीवन केवळ याच जगाचे जीवन आहे, आम्ही मरण पावतो आणि जगतो आणि आम्हाला केवळ काळच मरण देतो. (वस्तुतः) त्यांना त्याचे काही ज्ञानच नाही, हे तर केवळ अनुमान आणि अटकळीचाच वापर करतात.

**२५.** आणि जेव्हा त्यांच्यासमोर आमच्या स्पष्ट आयतींचे पठण केले जाते तेव्हा त्यांच्याजवळ या कथनाखेरीज कोणतेही प्रमाण नसते की जर तुम्ही सच्चे असाल तर आमच्या वाडवडिलांना घेऊन या.

**२६.** (तुम्ही) सांगा की अल्लाहच तुम्हाला जिवंत करतो, मग तुम्हाला मृत्यु देतो, मग तुम्हाला कयामतच्या दिवशी एकत्रित करील, ज्याबाबत कसलीही शंका नाही, परंतु अधिकांश लोक हे जाणत नाहीत.

**२७.** आणि आकाशांची व धरतीची राज्यसत्ता अल्लाहचीच आहे आणि ज्या दिवशी कयामत प्रस्थापित होईल त्या दिवशी असत्याचे पुजारी मोठ्या तोट्यात राहतील.

**२८.** आणि तुम्ही पाहाल की प्रत्येक जनसमूह गुडघे टेकून पडला असेल. प्रत्येक समूह आपल्या कर्म-लेखाकडे बोलाविला जाईल. आज तुम्हाला आपल्या कृत-कर्माचा मोबदला दिला जाईल.

**२९.** हा आहे आमचा ग्रंथ, जो तुमच्याविषयी खरे खरे बोलत आहे. आम्ही तुमची कर्मे लिहवून घेत होतो.

**३०.** तेव्हा, ज्यांनी ईमान राखले व जे सत्कर्म करीत राहिले[१] तर त्यांना त्यांचा

(१) इथेही ईमानासह सत्कर्माची चर्चा करून त्याचे महत्त्व सांगितले आहे. अर्थात सत्कर्माशी अभिप्रेत असे कर्म जे पैगंबर आचरण शैलीनुसार केले जावे. असे कोणतेही कर्म नव्हे, ज्यास मनुष्य आपल्या मनाने चांगले समजून घेईल आणि ते नित्यनेमाने व मनापासून करील. उदाहरणार्थ, अनेक बिदआत (धर्मात दाखल झालेल्या नव्या गोष्टी) धार्मिक गटांमध्ये प्रचलित आहेत आणि ज्या त्यांच्या निकट अनिवार्य व आवश्यक धार्मिक कर्मांपेक्षाही जास्त महत्त्वाच्या आहे. यास्तव आवश्यक आणि पैगंबर आचरण शैलीनुसार आचरण सोडणे त्याच्या ठायी सर्वसामान्य बाब आहे, परंतु बिदअत अशी आवश्यक आहे की त्यात कसलीही सुस्ती करण्याचा विचारही त्यांच्या मनात येत नाही. वस्तुतः पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांनी त्यास सर्वाधिक वाईट काम सांगितले आहे.

पालनकर्ता (अल्लाह) आपल्या दया - कृपेच्या सावलीत घेईल, हीच स्पष्ट सफलता आहे.

**३१.** परतु ज्या लोकांनी कुफ्र (इन्कार) केला, तर (मी त्यांना फर्माविन) की काय माझ्या आयती तुम्हाला ऐकविल्या जात नव्हत्या? तरीही तुम्ही गर्व करीत राहिले आणि तुम्ही होतेच अपराधी लोक.

**३२.** आणि जेव्हा कधी सांगितले जात असे की अल्लाहचा वायदा निश्चितच खरा आहे आणि कयामतच्या येण्याबाबत कसलीही शंका नाही, तेव्हा तुम्ही उत्तर देत की आम्ही नाही जाणत कयामत काय आहे. आमच्या मनात असाच काही विचार येतो, परंतु आम्हाला खात्री नाही.

**३३.** आणि त्यांच्यावर त्यांच्या कर्मांचा वाईटपणा उघड झाला आणि ज्या गोष्टीची ते थट्टा उडवित राहिले, तिनेच त्यांना घेरले.

**३४.** आणि सांगितले गेले की आज आम्ही तुमचा विसर पाडू जसा तुम्ही आपल्या या दिवसाच्या भेटीचा विसर पाडला होता, तुमचे ठिकाण जहन्नम आहे आणि तुमची मदत करणारा कोणीही नाही.

**३५.** हे अशासाठी की तुम्ही अल्लाहच्या आयतींची थट्टा उडविली होती, आणि ऐहिक जीवनाने तुम्हाला धोक्यात टाकले होते तेव्हा आजच्या दिवशी ना तर ते (जहन्नममधून) बाहेर काढले जातील आणि ना त्यांच्याकडून लाचारी व बहाणा कबूल केला जाईल.

**३६.** तेव्हा सर्व प्रशंसा अल्लाहकरिता आहे, जो आकाशांचा व जमिनीचा, आणि सर्व विश्वांचा पालनकर्ता आहे.

**३७.** आणि समस्त (प्रशंसा व) महानता, आकाशांमध्ये व धरतीत त्याचीच आहे, आणि तोच वर्चस्वशाली आणि हिकमत बाळगणारा आहे.

---

# सूरह अहक़ाफ - ४६

सूरह अहक़ाफ मक्का येथे अवतरली, यात पस्तीस आयती आणि चार रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** हा मीम.

**२.** या ग्रंथाला अवतरित करणे, जबरदस्त हिकमत (बुद्धिकौशल्य) बाळगणाऱ्या अल्लाहतर्फे आहे.

**३.** आम्ही आकाशांना आणि धरतीला आणि त्या दोघांच्या दरम्यानच्या समस्त वस्तूंना अति उत्तम योजनेसह निर्धारित अवधीकरिता बनविले आहे आणि काफिर लोकांना ज्या गोष्टीचे भय दाखविले जाते तिच्यापासून तोंड फिरवितात.

**४.** (तुम्ही) सांगा की, बरे ज्यांना तुम्ही अल्लाहखेरीज पुकारता, मलाही दाखवा की त्यांनी जमिनीचा कोणता हिस्सा बनविला आहे किंवा आकाशांमध्ये त्यांचा कोणता हिस्सा आहे? जर तुम्ही सच्चे असाल तर याच्या पूर्वीचाच एवादा ग्रंथ किंवा एखादे ज्ञान, जे उद्धृत केले जात असेल, माझ्याजवळ आणा.

**५.** आणि त्याहून जास्त मार्गभ्रष्ट दुसरा कोण असेल, जो अल्लाहखेरीज अशांना पुकारतो, जे कयामतपर्यंत त्याची दुआ - प्रार्थना कबूल करू शकणार नाहीत, उलट त्याच्या पुकारण्यापासून गाफीलच असावेत.

**६.** आणि जेव्हा लोकांना एकत्र केले जाईल, तेव्हा हे त्यांचे वैरी होतील आणि यांच्या उपासनेचा साफ इन्कार करतील.

**७.** आणि जेव्हा त्यांना आमच्या स्पष्ट आयती वाचून ऐकविल्या जातात तेव्हा काफिर लोक सत्य गोष्टीस, जेव्हा ती त्यांच्याप्रत येऊन पोहोचली, सांगतात की ही तर उघड जादू आहे.

**८.** काय ते असे म्हणतात की ते तर त्याने स्वतः बनविले आहे. (तुम्ही) सांगा की जर मीच ते बनवून आणले आहे तर तुम्ही माझ्यासाठी अल्लाहतर्फे कोणत्याही गोष्टीचा अधिकार बाळगत नाही. तुम्ही या कुरआनाविषयी जे काही सांगत ऐकत आहात, ते अल्लाह चांगल्या प्रकारे जाणतो. माझ्या आणि तुमच्या दरम्यान साक्ष देण्यास तोच पुरेसा

आहे आणि तो मोठा माफ करणारा, मोठा दयावान आहे.

**९.** (तुम्ही) सांगा की मी काही अगदी नवीन पैगंबर तर नाही आणि ना मला हे माहीत की माझ्याशी व तुमच्याशी कसा व्यवहार केला जाईल. मी तर फक्त त्याच गोष्टीचे अनुसरण करतो, जी माझ्याकडे वहयी केली जाते आणि मी तर स्पष्टपणे सावध करणारा आहे.

**१०.** (तुम्ही) सांगा की जर हा कुरआन अल्लाहतर्फे असेल आणि तुम्ही त्यास मान्य केले नसेल आणि इस्त्राइलच्या संततीचा एक साक्षी त्यासारखी साक्षही देऊन चुकला असेल आणि त्याने ईमानही राखले असेल आणि तुम्ही विद्रोह केला असेल तर निःसंशय, अल्लाह अत्याचारी लोकांना मार्ग दाखवित नाही.

**११.** आणि काफिर (इन्कारी) लोक ईमान राखणाऱ्यांविषयी म्हणाले की जर हा (धर्म) चांगला असता तर हे लोक त्याच्याकडे आमच्या आधी जाऊ शकले नसते आणि ज्याअर्थी त्यांनी कुरआनापासून मार्गदर्शन प्राप्त केले नाही, तेव्हा असे म्हणतील की हे जुने असत्य आहे.

**१२.** आणि याच्यापूर्वी मूसाचा ग्रंथ मार्गदर्शक व दया म्हणून होता, आणि हा ग्रंथ त्याचे सत्य-समर्थन करणारा आहे अरबी भाषेत, यासाठी की अत्याचारी लोकांना भय दाखवावे आणि अल्लाहचे भय बाळगणाऱ्या लोकांसाठी शुभ समाचार ठरावा.

**१३.** निःसंशय, ज्या लोकांनी सांगितले की आमचा स्वामी व पालनकर्ता अल्लाह आहे, मग त्यावर अटळ राहिलेत तर अशा लोकांना ना कसले भय राहील आणि ना ते दुःखी होतील.

**१४.** हे तर जन्नतमध्ये जाणारे लोक आहेत, जे सदैव तिच्यातच राहतील, त्या कर्मांच्या मोबदल्यात जे ते करीत होते.

**१५.** आणि आम्ही माणसाला, आपल्या माता-पित्याशी सद्‌वर्तन करण्याचा आदेश दिला आहे. त्याच्या मातेने त्याला कष्ट-यातना झेलून उदरात ठेवले आणि यातना सहन करून त्याला जन्म दिला.[१] त्याची गर्भधारणा आणि त्याचे दूध सोडविण्याची मुदत तीस

(१) या दुःख-यातनेचा उल्लेख करून माता-पित्याशी सद्‌वर्तन करण्यावर खास जोर दिला आहे, ज्यावरून हे कळते की माता या सद्‌वर्तनाच्या आदेशात पित्याच्या आधी आहे, कारण सतत नऊ

महिन्यांची आहे.येथेपर्यंत  की जेव्हा तो आपल्या पूर्ण वयास (तरुण वयास) आणि चाळीस वर्षांच्या वयास पोहचला, तेव्हा म्हणू लागला, हे माझ्या पालनकर्त्या! मला तौफीक (सुबुद्धी) दे की मी तुझ्या त्या देणगीबद्दल कृतज्ञता व्यक्त करू शकावे, जी तू मला आणि माझ्या माता-पित्यास प्रदान केली आहे आणि हे की मी अशी सत्कर्मे करावीत, ज्यांनी तू प्रसन्न व्हावे आणि तू माझ्या संततीलाही नेक सदाचारी बनव. मी तुझ्याकडे लक्ष केंद्रित करतो आणि मी मुस्लिमांपैकी आहे.

**१६.** हेच ते लोक होत, ज्यांची सत्कर्मे आम्ही कबूल करतो आणि दुष्कर्मांना माफ करतो, (हे) जन्नतमध्ये दाखल होणाऱ्या लोकांपैकी आहेत, त्या सच्चा वायद्यानुसार, जो त्यांच्याशी केला जात होता.

**१७.** आणि ज्याने आपल्या माता-पित्यास म्हटले की, धिःक्कार असो तुमचा (मी तुमच्यापासून अगदी बेजार झालो) तुम्ही मला हेच सांगत राहाल की (मी मेल्यानंतर पुन्हा दुसऱ्यांदा) जिवंत केला जाईल, माझ्यापूर्वीही अनेक जनसमूह होऊन गेलेत. ते दोघे अल्लाहच्या दरबारात विनंती (गाऱ्हाणे) करतात, (आणि म्हणतात) वाईट होवो तुझे, तू ईमान राखणारा हो, निःसंशय, अल्लाहचा वायदा सच्चा आहे, तो उत्तर देतो की हे तर केवळ पूर्वी होऊन गेलेल्या लोकांचे किस्से आहेत.

**१८.** (हेच) ते लोक होत, ज्यांच्यावर अल्लाह (च्या अज़ाब) चे फर्मान लागू झाले त्या जिन्न आणि मानवांच्या समूहांसोबत, जे त्यांच्यापूर्वी होऊन गेलेत हे निश्चितपणे तोट्यात राहिले.

**१९.** आणि प्रत्येकाला आपापल्या आचरणानुसार दर्जा मिळेल, यासाठी की त्यांना त्यांच्या कर्मांचा पुरेपूर मोबदला द्यावा आणि त्यांच्यावर जुलूम अत्याचार केला जाणार

---

महिने गर्भाचा त्रास आणि नंतर प्रसुतीच्या वेदना फक्त आईच झेलते, तसेच दुग्धपानाची पीडाही एकटी आईच सहन करते, पित्याचा त्यात सहभाग नसतो. यास्तव हदीस वचनात मातेशी सद्वर्तन करण्याला प्राधान्य दिले गेले आहे आणि पित्याचा दर्जा त्या नंतरचा सांगितला गेला आहे. एकदा एका निकट सहवासातील अनुयायी (साहबी) ने पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांना विचारले, 'माझ्या चांगल्या वागणुकीचा सर्वांत जास्त हक्कदार कोण आहे?' पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांनी फर्माविले, 'तुमची माता.' त्याने पुन्हा हेच विचारले. पैगंबरांनी पुन्हा तेच उत्तर दिले. तिसऱ्यांदाही हेच उत्तर दिले. चौथ्या वेळेस प्रश्न विचारल्यावर पैगंबरांनी फर्माविले, 'तुमचा पिता'. (सहीह मुस्लिम किताबूल बिर्रेवस्सिला, पहिला अध्याय)

नाही.

**२०.** आणि ज्या दिवशी काफिरांना जहन्नमच्या किनाऱ्याशी आणले जाईल, (तेव्हा सांगितले जाईल) की तुम्ही आपली सत्कर्मे ऐहिक जीवनातच संपवून टाकलीत आणि त्यांच्यापासून लाभ प्राप्त करून घेतला, तेव्हा आज तुम्हाला अपमानदायक शिक्षा-यातनेचा दंड दिला जाईल, या कारणाने की तुम्ही धरतीवर अहंकार करीत होते आणि या कारणानेही की तुम्ही आदेशाचे पालन करीत नव्हते.

**२१.** आणि आदच्या भावाचे स्मरण करा, जेव्हा त्याने आपल्या जनसमूहाच्या लोकांना अहकाफमध्ये (वाळूच्या टेकडीवर) खबरदार केले, आणि निःसंशय, त्याच्या पूर्वीही भय दाखविणारे होऊन गेलेत आणि त्याच्या नंतरही की तुम्ही अल्लाहखेरीज दुसऱ्यांची उपासना करू नका. निःसंशय, मला तुमच्याबद्दल मोठ्या दिवसाच्या अज़ाबचे भय वाटते.

**२२.** जनसमूहाच्या लोकांनी उत्तर दिले की काय तुम्ही आमच्याजवळ अशासाठी आलात की आम्हाला आमच्या दैवतांची पूजा अर्चना करण्यापासून रोखावे, तेव्हा जर तुम्ही सच्चे असाल तर ज्या शिक्षा - यातनां (अज़ाब) चा तुम्ही वायदा करीत आहात, त्या आमच्यावर आणून सोडा.

**२३.** (हजरत हूद) म्हणाले, (याचे) ज्ञान तर अल्लाहजवळ आहे. मला तर जो संदेश देऊन पाठविले गेले आहे, तोच तुम्हाला मी पोहचवित आहे, परंतु मी असे पाहतो की तुम्ही मूर्खपणा करीत आहात.

**२४.** मग जेव्हा त्यांनी अज़ाब (शिक्षा - यातने) ला ढगाच्या स्वरूपात पाहिले आपल्या मैदानांकडे येत असलेला, तेव्हा म्हणू लागले की हा ढग आमच्यावर पाऊस पाडणार आहे (नव्हे), किंबहुना, वस्तुतः हा ढग तो (प्रकोप) आहे ज्याची तुम्ही घाई माजवित होते. ही हवा (वादळ) आहे ज्यात दुःखदायक अज़ाब (शिक्षा - यातना) आहे.

**२५.** जी आपल्या पालनकर्त्याच्या आदेशाने, प्रत्येक वस्तूंचा विध्वंस करून टाकील, तेव्हा त्यांची अशी अवस्था झाली की त्यांच्या घरांखेरीज दुसरे काही दिसून येत नव्हते. अपराध्यांच्या समूहाला आम्ही अशाच प्रकारे शिक्षा देतो.

**२६.** आणि निश्चितपणे आम्ही (आदच्या समुदायाला) ते शक्ती-सामर्थ्य प्रदान केले होते, जे तुम्हाला दिलेच नाही आणि आम्ही त्यांना कान, डोळे आणि हृदयेही देऊन

ठेवली होती, परंतु त्यांच्या कांनानी, डोळ्यांनी आणि हृदयांनी त्यांना काहीच लाभ पोहचविला नाही. जेव्हा ते अल्लाहच्या आयतींचा इन्कार करू लागले आणि ज्या गोष्टीची ते थट्टा उडवित असत, तीच त्यांच्यावर उलटली.

**२७.** आणि निःसंशय, आम्ही तुमच्या जवळपास (प्रदेशा) च्या वस्त्यांचा नायनाट करून टाकला, आणि (अनेक प्रकारे) आम्ही आपल्या निशाण्या सादर केल्या, यासाठी की त्यांनी (अल्लाहकडे) वळावे.

**२८.** तेव्हा अल्लाहचे सान्निध्य प्राप्त करण्याकरिता त्यांनी ज्यांना ज्यांना उपास्य (दैवत) बनवून ठेवले होते, त्यांनी त्यांची मदत का नाही केली, किंबहुना ते तर त्यांच्यापासून हरवले गेलेत (वस्तुतः) हे त्यांचे केवळ असत्य आणि (पूर्णतः) मिथ्यारोप होता.

**२९.** आणि स्मरण करा, जेव्हा आम्ही जिन्नांचा एक समूह तुमच्याकडे वळविला, यासाठी की त्यांनी कुरआन ऐकावे, तर जेव्हा ते पैगंबरांजवळ पोहचले, तेव्हा (एकमेकांना) म्हणू लागले की गप्प राहा. मग जेव्हा पठण समाप्त झाले तेव्हा आपल्या जनसमूहाच्या लोकांना खबरदार करण्याकरिता परतले.

**३०.** म्हणाले, हे आमच्या जनसमूहाच्या लोकांनो! आम्ही खात्रीने तो ग्रंथ ऐकला आहे, जो मूसा (अलै.) नंतर अवतरित केला गेला आहे, जो आपल्या पूर्वीच्या ग्रंथाची पुष्टी करणारा आहे, जो सत्य-धर्म आणि सरळ मार्गाकडे मार्गदर्शन करतो.

**३१.** हे आमच्या जातीसमूहाच्या लोकांनो! अल्लाहकडे बोलविणाऱ्याचे म्हणणे मान्य करा, त्याच्यावर ईमान राखा, तर (अल्लाह) तुमचे काही अपराध माफ करील आणि तुम्हाला दुःखदायक अज़ाब (शिक्षा - यातने) पासून वाचवील.

**३२.** आणि जो मनुष्य अल्लाहकडे बोलविणाऱ्याचे म्हणणे मानणार नाही तर तो जमिनीवर कोठेही (पळून जाऊन अल्लाहला) लाचार करू शकत नाही आणि ना अल्लाहखेरीज त्याला कोणी मदत करणारा असेल, हे लोक उघड मार्गभ्रष्टतेत आहेत.

**३३.** काय ते नाही पाहत की ज्या अल्लाहने आकाशांना व धरतीला निर्माण केले आहे आणि त्यांची निर्मिती करून तो थकला नाही, तो निःसंशय मृतांना जिवंत करण्याचे सामर्थ्य बाळगतो, का नव्हे? निःसंशय, तो प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्य बाळगतो.

**३४.** आणि ते लोक ज्यांनी कुफ्र (इन्कार) केला ज्या दिवशी जहन्नमच्या समोर आणले जातील (आणि त्यांना सांगितले जाईल) की काय हे सत्य नाही? तेव्हा ते उत्तर देतील की होय, का नव्हे? शपथ आहे आमच्या पालनकर्त्याची (हे अगदी सत्य आहे). (अल्लाह) फर्माविल की आता आपल्या इन्काराच्या मोबदल्यात अज़ाबचा स्वाद चाखा.

**३५.** तेव्हा (हे पैगंबरा!) तुम्ही असे धैर्य राखा, जसे धैर्य दृढसंकल्प आणि साहस बाळगणाऱ्या पैगंबरांनी राखले, आणि त्यांच्यासाठी (शिक्षा मागण्यात) घाई करू नका. हे ज्या दिवशी तो अज़ाब पाहून घेतील ज्याचा वायदा त्यांना दिला जात आहे, तेव्हा (त्यांना हे जाणवू लागेल की) दिवसाची एक घटिका मात्र (ते जगात) राहिले होते. हे आहे संदेश पोहचविणे. दुराचारी लोकांखेरीज कोणी नष्ट केला जाणार नाही.

---

## सूरह मुहम्मद - ४७

सूरह मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) मदीना येथे अवतरली, यात अडतीस आयती आणि चार रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** ज्या लोकांनी कुफ्र (इन्कार) केला आणि अल्लाहच्या मार्गापासून रोखले, अल्लाहने त्यांची कर्मे निष्फळ करून टाकलीत.

**२.** आणि ज्या लोकांनी ईमान राखलेत आणि सत्कर्मे केलीत आणि त्यावरही विश्वास राखला जो मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) वर अवतरित केला गेला आहे आणि वस्तुतः त्यांच्या पालनकर्त्यातर्फे सत्य (धर्म) देखील तोच आहे. अल्लाहने त्याचे अपराध मिटविले आणि त्यांच्या अवस्थेत सुधारणा केली.

**३.** हे अशासाठी की काफिर (इन्कारी) लोकांनी असत्याचे अनुसरण केले आणि ईमान राखणाऱ्यांनी त्या सत्य (धर्मा) चे अनुसरण केले, जो त्यांच्या पालनकर्त्यातर्फे आहे. अल्लाह लोकांना त्यांची स्थिती अशा प्रकारे दर्शवितो.

**४.** तर जेव्हा काफिरांशी तुमचा सामना होईल, तेव्हा त्याच्या मानांवर वार करा येथे पर्यंत की जेव्हा त्यांना खूप चांगल्या प्रकारे ठेचून काढाल, तर आता खूप मजबूत

कारागृहात कैद करा (मग तुम्हाला अधिकार आहे की) उपकार करून कैदेतून मुक्त करा किंवा काही अर्थदंड (फिदिया) घेऊन, जोपर्यंत युद्ध (करणारे) आपले शस्त्र खाली ठेवतील. हाच आदेश आहे आणि जर अल्लाहने इच्छिले असते तर स्वतःच त्यांचा सूड घेतला असता, परंतु (तो असे इच्छितो) की तुमच्यापैकी एकाची परीक्षा दुसऱ्याकडून घ्यावी आणि जे लोक अल्लाहच्या मार्गात शहीद केले जातात, अल्लाह त्यांची कर्मे कधीही वाया जाऊ देणार नाही.

**५.** तो त्यांना मार्गदर्शन करील आणि त्यांच्या अवस्थेत सुधारणा करील.

**६.** आणि त्यांना त्या जन्नतमध्ये दाखल करील, जिचा परिचय त्यांना करून दिला गेला आहे.

**७.** हे ईमान राखणाऱ्यांनो! जर तुम्ही अल्लाह (च्या धर्मा) ची मदत कराल, तर तो तुमची मदत करेल आणि तुमचे पाय मजबूत (स्थिर) राखेल.

**८.** आणि जे लोक काफिर (इन्कारी) झालेत, त्यांचा सर्वनाश असो, अल्लाहने त्यांची कर्मे निष्फळ केली.

**९.** हे अशासाठी की अल्लाहने अवतरित केलेल्या गोष्टीपासून नाराज झाले, तेव्हा अल्लाहने देखील त्यांची कर्मे वाया घालवलीत.

**१०.** काय त्या लोकांनी जमिनीवर हिंडून फिरून या गोष्टीचे निरीक्षण नाही केले की त्यांच्या पूर्वी होऊन गेलेल्या लोकांची काय परिणीती झाली? अल्लाहने त्यांना नष्ट करून टाकले आणि काफिरांसाठी अशीच शिक्षा आहे.

**११.** ते यासाठी की ईमान राखणाऱ्यांचा संरक्षक स्वतः अल्लाह आहे, आणि यासाठी की काफिर लोकांचा कोणीही संरक्षक नाही.

**१२.** ज्या लोकांनी ईमान राखले आणि सत्कर्मे केलीत, त्यांना अल्लाह निश्चितपणे अशा बागांमध्ये दाखल करील, ज्यांच्याखाली प्रवाह वाहत आहेत आणि जे लोक काफिर (इन्कारी) झालेत, ते (केवळ या जगाचाच) लाभ घेत आहेत आणि जनावरांसारखे खात आहेत. त्यांचे (खरे) ठिकाण जहन्नम आहे.

**१३.** आणि आम्ही कित्येक वस्त्यांना, ज्या शक्ती-सामर्थ्यात तुमच्या या वस्तीपेक्षा

अधिक होत्या, जिच्यातून तुम्हाला बाहेर काढले गेले. आम्ही त्यांना नष्ट करून टाकले, ज्यांची मदत करणारा कोणीही नव्हता.

**१४.** काय ते लोक, जे आपल्या पालनकर्त्यातर्फे स्पष्ट प्रमाणावर असावेत त्या माणसासारखे असू शकतात, ज्याच्यासाठी त्याची दुष्कर्मे चांगली (सुशोभित) बनविली गेली असावी. आणि तो आपल्या इच्छा आकांक्षांचे अनुसरण करत असावा?

**१५.** त्या जन्नतचे वैशिष्ट्य, जिचा वायदा अल्लाहचे भय राखणाऱ्या लोकांशी केला गेला आहे, असे आहे की तिच्यात (शीतल) जलप्रवाह वाहत आहेत, ज्यांना दुर्गंध नाही आणि दुधाच्या नद्या आहेत, ज्यांचा स्वाद बदलणार नाही. आणि मद्याचे प्रवाह आहेत. ज्यांच्यात पिणाऱ्यांकरिता खूप स्वाद आहे आणि स्त्रच्छ निर्भेळ मधाचे प्रवाह आहेत, आणि त्यांच्यासाठी तिथे प्रत्येक प्रकारचे मेवे (फळ) आहेत, आणि त्यांच्या पालनकर्त्यातर्फे क्षमा आहे, काय हे त्या लोकांसमान आहेत, जे नेहमी आगीत राहणारे आहेत आणि ज्यांना खूप गरम उकळते पाणी पाजले जाईल, जे त्यांच्या आतडींचे तुकडे तुकडे करील.

**१६.** आणि त्यांच्यापैकी काही (असेही आहेत की) जे तुमच्याकडे कान लावतात येथेपर्यंत की जेव्हा तुमच्या जवळून जातात, तेव्हा ज्ञान बाळगणाऱ्यांना (सुस्ती आणि बावळटपणे) विचारतात की त्याने (पैगंबराने) आता एवढ्यात काय सांगितले होते? हेच लोक होत, ज्यांच्या हृदयांवर अल्लाहने मोहर लावली आहे आणि ते आपल्या इच्छा आकांक्षांचे अनुसरण करतात.

**१७.** आणि ज्या लोकांनी सन्मार्ग प्राप्त करून घेतला आहे, अल्लाहने त्यांच्या मार्गदर्शनात आणखी वाढ केली आहे, आणि त्यांना त्यांचा सदाचार प्रदान केला आहे.

**१८.** तर काय हे लोक कयामतची प्रतीक्षा करीत आहेत की ती त्यांच्याजवळ अचानक येऊन पोहचावी. निःसंशय, तिची लक्षणे तर जाहीर झाली आहेत, मग जेव्हा कयामत त्यांच्याजवळ येऊन पोहोचेल, तेव्हा त्यांच्यासाठी बोध प्राप्त करण्याची संधी कोठे बाकी राहील?

**१९.** तेव्हा (हे पैगंबर!) तुम्ही खात्री बाळगा की अल्लाहखेरीज दुसरा कोणी (सच्चा) उपास्य नाही, आणि आपल्या अपराधांची माफी मागत राहा आणि ईमान राखणाऱ्या

पुरुषांकरिता व ईमान राखणाऱ्या स्त्रियांकरिताही[१] अल्लाह तुमच्या येण्या-जाण्याच्या व निवासाच्या ठिकाणास चांगल्या प्रकारे जाणतो.

**२०.** आणि ज्यांनी ईमान राखले ते म्हणतात की एखादी सूरह (अध्याय) का नाही अवतरित केली गेली, मग जेव्हा एखादी स्पष्ट अर्थाची सूरह अवतरित केली जाते आणि तिच्यात जिहादचा उल्लेख केला जातो, तेव्हा तुम्ही पाहता की ज्यांच्या मनात रोग आहे, ते तुमच्याकडे अशा प्रकारे पाहतात जसे तो मनुष्य पाहतो, जो मृत्युने मूर्छित झाला असेल. तेव्हा फार चांगले होते त्यांच्याकरिता.

**२१.** आज्ञापालन करणे आणि भल्या चांगल्या गोष्टी बोलणे मग जेव्हा कार्य निर्धारित होईल, तेव्हा जर ते अल्लाहशी सचोटीने राहतील तर त्यांच्यासाठी भलाई आहे.

**२२.** आणि तुमच्याकडून तेही दूर (असंभव) नाही की जर तुम्हाला राज्य लाभेल, तर तुम्ही धरतीवर उत्पात (फसाद) निर्माण कराल आणि नाते संबंध तोडाल.

**२३.** हेच ते लोक होत, ज्यांचा अल्लाहने धिःक्कार केला आहे आणि (अल्लाहने) ज्यांची श्रवण शक्ती आणि डोळ्यांचा प्रकाश हिरावून घेतला आहे.

**२४.** काय हे लोक कुरआनावर विचार चिंतन नाही करीत किंवा त्यांच्या हृदयांवर कुलुपे लावली गेली आहेत?

**२५.** ज्या लोकांनी मार्गदर्शन स्पष्ट झाल्यानंतरही आपली पाठ फिरवली तर निःसंशय, सैतानाने त्यांच्याकरिता (त्यांच्या कर्मांना) सुशोभित केले आहे आणि त्यांना ढील (सवड) देऊन ठेवली आहे.

**२६.** हे अशासाठी की, त्यांनी त्या लोकांना, ज्यांनी अल्लाहने अवतरित केलेल्या (वहयी)ला नापसंत केले, हे सांगितले की आम्हीही निकट भविष्यात काही कामांमध्ये

---

(१) यात पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांना माफी मागण्याचा आदेश दिला गेला आहे. स्वतःसाठीही, आणि ईमान राखणाऱ्यांसाठीही. 'इस्तगफार' (क्षमा याचनेचे मोठे महत्त्व आणि प्राधान्य आहे. हदीस वाचनात यावर मोठा जोर दिला गेला आहे. एका हदीसमध्ये पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांनी फर्माविले, 'या युहन्नासु तुबुईल रब्बूहुम फइन्नी अस्तग़ फिरुल्लाहा व वुतुबू इलैही फिल यौमिल अक्सरु मिन समईना मर्रतु.' ''लोकांनो! अल्लाहजवळ तौबा आणि इस्तगफार (क्षमा याचना) करीत राहा, मी देखील अल्लाहजवळ दिवसातून सत्तरपेक्षा जास्त रेळा तौबा इस्तगफार करतो.'' (सहीह बुखारी, बाबु इस्तगफारीन नबीये फिल यौमि वल लैलति)

तुमचे म्हणणे मान्य करून आणि अल्लाह त्यांच्या रहस्यभेदांना चांगल्या प्रकारे जाणतो.

**२७.** तेव्हा त्यांची कशी दुरावस्था होईल, जेव्हा फरिश्ते त्यांचे प्राण काढताना त्यांच्या तोंडावर आणि कंबरेवर मारतील.

**२८.** हे या कारणास्तव की यांनी त्या मार्गाचे अनुसरण केले, ज्यामुळे (त्यांनी) अल्लाहला नाराज केले आणि त्यांनी त्याच्या प्रसन्नतेला वाईट जाणले, तेव्हा अल्लाहने त्यांच्या कर्मांना निष्फळ केले.

**२९.** काय त्या लोकांनी, ज्यांच्या मनात रोग (विकृती) आहे, असे समजून घेतले आहे की अल्लाह त्यांचे कपट जाहीर करणारच नाही.

**३०.** आणि जर आम्ही इच्छिले असते तर तुम्हाला, त्या सर्वांना दाखविले असते तेव्हा तुम्ही त्यांच्या चेहऱ्यांवरूनच त्यांना ओळखले असते, आणि निःसंशय, तुम्ही त्यांना त्यांच्या संभाषण शैलीवरून ओळखाल, तुमची समस्त कर्मे अल्लाह जाणून आहे.

**३१.** आणि निःसंशय आम्ही तुमची कसोटी घेऊ यासाठी की तुमच्यापैकी जिहाद करणाऱ्यांना आणि धैर्य-संयम राखणाऱ्यांना पाहावे, आणि तुमच्या अवस्थांचीही जाच पडताळ करून घ्यावी.

**३२.** निःसंशय, ज्या लोकांनी कुफ्र (इन्कार) केला आणि अल्लाहच्या मार्गापासून लोकांना रोखले आणि पैगंबराचा विरोध केला यानंतर की त्यांच्यासाठी मार्गदर्शन स्पष्ट झाले, हे कधीही अल्लाहला कसलेही नुकसान पोहचविणार नाहीत. अल्लाह लवकरच त्यांच्या कर्मांना नष्ट करून टाकील.

**३३.** हे ईमान राखणाऱ्यांनो! अल्लाहचे आज्ञापालन करा आणि पैगंबरांचे आज्ञापालन करा आणि आपली कर्मे वाया घालवू नका.

**३४.** निःसंशय, ज्या लोकांनी कुफ्र (इन्कार) केला आणि अल्लाहच्या मार्गापासून (दुसऱ्यांना) रोखले, मग कुफ्रच्या अवस्थेतच मरण पावले (विश्वास राखा की) अल्लाह त्या लोकांना कधीही माफ करणार नाही.

**३५.** तेव्हा तुम्ही कमजोर बनून तह (समजोता) ची विनंती करण्याच्या स्तरावर येऊ

नका, जेव्हा की तुम्हीच (विजयी आणि) वर्चस्वशाली राहाल,[१] आणि अल्लाह तुमच्या सोबतीला आहे (आपल्या ज्ञानाद्वारे) अशक्य आहे की तो तुमची कर्मे वाया घालविल.

**३६.** वस्तुतः या जगाचे जीवन तर खेळ तमाशा आहे आणि जर तुम्ही ईमान राखाल आणि अल्लाहचे भय (तकवा) अंगीकाराल, तर अल्लाह तुम्हाला तुमच्या कर्मांचा मोबदला प्रदान करील आणि तो तुमच्याकडून तुमची धन-दौलत मागत नाही.

**३७.** जर तो तुमच्याकडून तुमचे धन मागेल आणि बलपूर्वक मागेल तर तुम्ही त्याच्याशी कंजूसपणा करू लागाल आणि तो तुमचा व्यंग- दोष जाहीर करेल.

**३८.** खबरदार! तुम्ही ते लोक आहात की अल्लाहच्या मार्गात खर्च करण्यासाठी बोलविले जातात, तेव्हा तुमच्यापैकी काही जण कंजूसपणा करू लागतात आणि जो कंजूसपणा करतो, तो निःसंशय स्वतःशीच कंजूसपणा करतो. सर्वश्रेष्ठ अल्लाह निःस्पृह आहे आणि तुम्ही गरजवंत आहात, आणि जर तुम्ही तोंड फिरविणारे व्हाल तर तो तुमच्या जागी, तुमच्याखेरीज दुसऱ्या लोकांना आणिल जे मग तुमच्यासारखे नसतील.

---

# सूरह फत्ह - ४८

सूरह फत्ह मदीना येथे अवतरली, यात एकोणतीस आयती आणि चार रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

---

(१) अभिप्रेत हे की जेव्हा तुम्ही संख्येने आणि शक्ती-सामर्थ्यात शत्रूवर वर्चस्वशाली आणि उच्तम असाल तर अशा स्थितीत काफिरांशी तह (समजोता) आणि कमजोरीचे प्रदर्शन करू नका, किंबहुना कुफ्रवर असा कठोर प्रहार करा की अल्लाहचा दीन (धर्म) उंचावला जावा. वर्चस्वशाली आणि प्रबळ असतानाही काफिरांशी नमते घेऊन समजोता करण्याचा अर्थ कुफ्रचा प्रभाव वाढविण्यास मदत करणे होय. हा फार मोठा गुन्हा आहे. याचा अर्थ असा नव्हे की काफिरांशी तह करण्याची अनुमती नाही, अशी अनुमती निश्चितच आहे परंतु प्रत्येक समयी नाही. फक्त अशाच वेळी, जेव्हा मुसलमान संख्येने कमी आणि साधन सामुग्रीत कमजोर असावेत, अशा परिस्थितीत युद्धाच्या तुलनेत तह (समजोता) करण्यात जास्त फायदा आहे, यासाठी की या संधीचा लाभ घेऊन मुसलमानांनी भरपूर तयारी करावी ज्या प्रकारे पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांनी मक्काच्या काफिरांशी (इन्कारी लोकांशी) युद्ध न करण्याचा दहा वर्षांपावेतोचा समजोता केला होता.

**१.** निःसंशय, (हे पैगंबर!) आम्ही तुम्हाला एक खुला विजय प्रदान केला आहे.

**२.** यासाठी की अल्लाहने तुमच्या पुढच्या मागच्या चुका माफ कराव्यात, आणि तुमच्यावर आपली कृपा-देणगी पूर्ण करावी आणि तुम्हाला सरळ मार्गावर चालवावे.

**३.** आणि तुम्हाला एक भरपूर मदत प्रदान करावी.

**४.** तोच आहे ज्याने मुसलमानांच्या मनात शांती (आणि आत्मिवश्वास) अवतरित केला, यासाठी की त्यांनी आपल्या ईमानासोबतच आणखी जास्त ईमानात वृद्धिंगत व्हावे. आणि आकाशांची व धरतीची समस्त सैन्ये अल्लाहचीच आहेत, आणि अल्लाह जाणणारा, हिकमतशाली आहे.

**५.** यासाठी की मुस्लिम पुरुषांना आणि स्त्रियांना त्या जन्नतींमध्ये दाखल करावे, ज्यांच्या खाली प्रवाह वाहत आहेत, जिथे ते सदैव काळ राहतील आणि त्यांच्यापासून त्यांची दुष्कर्मे दूर करावीत आणि अल्लाहच्या जवळही फार मोठी सफलता आहे.

**६.** आणि यासाठी की त्या मुनाफिक (दांभिक) पुरुषांना आणि मुनाफिक स्त्रियांना, आणि मूर्तिपूजक पुरुषांना व मूर्तिपूजक स्त्रियांना अज़ाब (शिक्षा) द्यावी, जे अल्लाहविषयी गैरसमज बाळगतात (वस्तुतः) त्याच्यावरच वाईटपणाचे चक्र आहे. अल्लाह त्यांच्यावर नाराज झाला आणि त्याने त्यांना धिःक्कारले आणि त्यांच्यासाठी जहन्नम तयार केली आणि ते परतीचे मोठे वाईट ठिकाण आहे.

**७.** आणि अल्लाहच्याचकरिता आकाशांची आणि धरतीची सैन्ये आहेत, आणि अल्लाह वर्चस्वशाली, हिकमत बाळगणारा आहे.

**८.** निःसंशय, आम्ही तुम्हाला साक्ष देणारा आणि शुभ समाचार ऐकविणारा व खबरदार करणारा बनवून पाठविले आहे.

**९.** यासाठी की (हे ईमानधारकांनो!) तुम्ही अल्लाह आणि त्याच्या पैगंबरावर ईमान राखा आणि त्याला सहाय्य करा व त्याचा आदर राखा, आणि अल्लाहचे पावित्र्य सकाळ-संध्याकाळ वर्णन करा.

**१०.** निःसंशय, जे लोक तुमच्याशी बैअत (अल्लाह आणि त्याच्या पैगंबरांचे आज्ञापालन व अनुसरण करण्याचा वायदा ताकीदपूर्वक जाहीर करणे) करतात, ते

निःसंशय, अल्लाहशीच बैअत करतात. त्यांच्या हातावर अल्लाहचा हात आहे, तेव्हा जो मनुष्य वचन भंग करील तर तो स्वतःवरच वचन भंग करतो, आणि जो मनुष्य तो वायदा पूर्ण करील, जो त्याने अल्लाहशी केला आहे, तर त्याला लवकरच अल्लाह फार महान मोबदला प्रदान करील.

**११.** ग्रामीणांपैकी जे मागे सोडून दिले गेले होते, ते आता तुम्हाला निश्चित म्हणतील की आम्ही आपल्या धन-संपत्ती व संततीतच व्यस्त राहिलो, तेव्हा तुम्ही आमच्यासाठी माफीची दुआ-प्रार्थना करा. हे लोक आपल्या तोंडांनी ते बोलतात, जे त्यांच्या मनात नाही. तुम्ही उत्तर द्या की तुमच्यासाठी अल्लाहतर्फे एखाद्या गोष्टीचाही अधिकार कोण बाळगतो, जर तो तुम्हाला नुकसान पोहचवू इच्छिल किंवा तुम्हाला काही लाभ पोहचवू इच्छिल? किंबहुना तुम्ही जे काही करीत आहात, अल्लाह ते चांगल्या प्रकारे जाणतो.

**१२.** (नव्हे) किंबहुना तुम्ही तर असे गृहीत धरले होते की पैगंबर आणि मुसलमानांचे आपल्या घरांकडे परतणे अगदी अशक्य आहे आणि हाच विचार तुमच्या मनांमध्ये रुजला, तुम्ही दुराग्रह बाळगला होता (वास्तविक) तुम्ही लोक आहातच नष्ट होणारे.

**१३.** आणि जो मनुष्य अल्लाहवर आणि त्याच्या पैगंबरावर ईमान राखणारे नाही तर आम्ही देखील अशा काफिरांकरिता धगधगणारी आग तयार करून ठेवली आहे.

**१४.** आणि आकाशांची व धरतीची राज्य-सत्ता अल्लाहकरिताच आहे तो ज्याला इच्छिल माफ करील आणि ज्याला इच्छिल अज़ाब (शिक्षा) देईल आणि अल्लाह मोठा माफ करणारा, दया करणारा आहे.

**१५.** जेव्हा तुम्ही (युद्धात हाती लागलेला) परिहार घेण्यास जाऊ लागला, तेव्हा त्वरित हे मागे सोडलेले लोक म्हणतील की आम्हालाही आपल्या सोबत येण्याची आज्ञा द्या. ते असे इच्छितात की अल्लाहचे कथन बदलून टाकावे (तुम्ही त्यांना) सांगा की, अल्लाहने या आधीच सांगून टाकले आहे की तुम्ही कधीही आमचे अनुसरण न कराल तेव्हा ते यावर उत्तर देतील की (नाही, नाही) किंबहुना तुम्हीच आमचा मत्सर करता. (खरी गोष्ट अशी की) हे लोक फार कमी समजतात.

**१६.** (तुम्ही) मागे सोडलेल्या ग्रामीण लोकांना सांगा की लवकरच तुम्ही एका मोठ्या शूरवीर जनसमूहाकडे बोलाविले जाल, की तुम्ही त्याच्याशी युद्ध कराल किंवा ते

ईमानधारक होतील. तेव्हा जर तुम्ही आज्ञापालन कराल, तर अल्लाह तुम्हाला फार चांगला मोबदला प्रदान करील आणि जर तुम्ही तोंड फिरविले, जसे की तुम्ही यापूर्वी तोंड फिरवून घेतले आहे, तर तो तुम्हाला दुःखदायक शिक्षा यातना देईल.

**१७.** आंधळ्यावर कसलाही अपराध नाही, ना पांगळ्यावर काही अपराध आहे आणि ना आजारी माणसावर काही अपराध आहे आणि जो कोणी अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचे आदेशाचे पालन करील, त्याला अल्लाह अशा जन्नतमध्ये दाखल करील, जिच्या खाली प्रवाह वाहत आहेत आणि जो तोंड फिरविल, त्याला तो दुःखदायक अज़ाब (शिक्षा-यातना) देईल.

**१८.** निःसंशय, अल्लाह ईमान राखणाऱ्यांशी प्रसन्न झाला, जेव्हा ते झाडाखाली तुमच्याशी बैअत (प्रतिज्ञा) करीत होते. त्याच्या मनात जे काही होते, ते त्याने माहीत करून घेतले आणि त्याच्यावर शांती अवतरित केली आणि त्यांना निकटचा विजय प्रदान केला.

**१९.** आणि युद्धात जिंकलेला अनेक प्रकारचा माल, जो ते प्राप्त करतील आणि अल्लाह वर्चस्वशाली, हिकमत बाळगणारा आहे.

**२०.** अल्लाहने तुमच्याशी खूप जास्त युद्धात जिंकलेल्या मालाचा वायदा केला आहे, जो तुम्ही प्राप्त कराल आणि हे तर तुम्हाला त्वरित प्रदान केले, आणि लोकांचे हात तुमच्यापासून रोखले, यासाठी की ईमान राखणाऱ्यांकरिता ही एक निशाणी ठरावी, आणि यासाठी की त्याने तुम्हाला सरळ मार्गावर चालवावे.

**२१.** आणि (तो) तुम्हाला इतर गनीमती (युद्धात हाती लागलेला माल) देखील देईल, ज्यांच्यावर तुम्ही अजून काबू मिळविला नाही अल्लाहने त्यांना काबूत ठेवले आहे आणि अल्लाह प्रत्येक गोष्ट करण्यास समर्थ आहे.

**२२.** आणि जर तुमच्याशी काफिरांनी लढाई केली असती तर निःसंशय ते पाठ दाखवून पळाले असते. मग ना त्यांना कोणी कार्यसाधक आढळला असता, ना कोणी मदत करणारा.

**२३.** अल्लाहच्या त्या नियमानुसार जो पहिल्यापासून चालत आला आहे आणि तुम्हाला अल्लाहच्या नियमात कधीही बदल झालेला आढळत नाही.

**२४.** तोच आहे, ज्याने खास मक्का येथे काफिरांच्या हातांना तुमच्यापासून आणि तुमच्या हातांना त्यांच्यापासून रोखले. यानंतर की त्याने तुम्हाला त्यांच्यावर विजयी केले, आणि तुम्ही जे काही करीत आहात अल्लाह ते सर्व पाहत आहे.

**२५.** हेच ते लोक होत, ज्यांनी कुफ्र (इन्कार) केला आणि तुम्हाला मस्जिदे हराम (काबागृहा) पासून रोखले आणि कुर्बानीसाठी थांबलेल्या जनावरांना त्याच्या ठिकाणापर्यंत पोहचण्यापासून (रोखले) आणि जर असे (अनेक) मुस्लिम पुरुष आणि (अनेक) मुस्लिम स्त्रिया नसत्या, ज्यांची तुम्हाला खबर नव्हती की तुम्ही त्यांना (अजाणतेपणी) चिरडून टाकाल, ज्याबद्दल त्यांच्यामुळे तुम्हालाही नकळत हानि पोहचली असती (तर तुम्हाला लढण्याची अनुमती दिली गेली असती, परंतु असे केले गेले नाही) यासाठी की अल्लाहने आपल्या दया कृपेत, ज्याला इच्छिल त्याला दाखल करावे, आणि जर ते वेगवेगळे राहिले असते, तर त्यांच्यात जे काफिर होते, आम्ही त्यांना दुःखदायक अज़ाब (शिक्षा-यातना) दिला असता.

**२६.** जेव्हा त्या काफिरांनी आपल्या मनात पक्षपात भावनेला स्थान दिले, आणि पक्षपातही अडाणीपणाचा, तेव्हा अल्लाहने आपल्या पैगंबरावर आणि ईमान राखणाऱ्यांवर आपल्यातर्फे शांती अवतरित केली, आणि ईमान राखणाऱ्यांना ईशभया (तकवा) च्या गोष्टीवर दृढराखले[१] आणि ते या गोष्टीस पात्र आणि जास्त हक्कदार होते आणि अल्लाह प्रत्येक गोष्टीस चांगल्या प्रकारे जाणतो.

**२७.** वस्तुतः अल्लाहने आपल्या पैगंबराला, खरे स्वप्न दाखविले की जर अल्लाहने इच्छिले तर तुम्ही अवश्य शांती-सुरक्षापूर्वक मस्जिदे हराममध्ये दाखल व्हाल, डोके मुंडवित आणि डोक्याचे केस कापवून घेत अगदी निर्भय होऊन. तो त्या गोष्टी जाणतो, ज्या तुम्ही जाणत नाहीत, तेव्हा त्याने तुम्हाला यापूर्वी एक निकटचा विजय प्रदान केला.

**२८.** तोच होय, ज्याने आपल्या पैगंबराला मार्गदर्शन आणि सत्य धर्मासह पाठविले, यासाठी की त्याला प्रत्येक धर्मावर वर्चस्वशाली करावे, आणि साक्ष देण्यासाठी अल्लाह

(१) यास अभिप्रेत तौहीद (एकेश्वरवाद) आणि रिसालत (प्रेषितत्वा) चा कलिमा (सूत्र) ''ला इल्हा इल्लल्लाह मुहम्मदुर्रसूलुल्लाह'' आहे, ज्याचा हुदैबियाच्या दिवशी अनेकेश्वरवाद्यांनी इन्कार केला. (इब्ने कसीर) अथवा तो धीर-संयम आणि शांती (सन्मान) आहे, जी त्यांनी हुदैबियात दाखविली होती किंवा ते प्रतिज्ञापालन आणि त्यावर दृढतापूर्वक अटळ राहणे आहे, जे अल्लाहचे भय अंगीकारून आचरण करण्याचा परिणाम आहे. (फतहुल कदीर)

पुरेसा आहे.

**२९.** मुहम्मद (सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) अल्लाहचे रसूल (पैगंबर) आहेत आणि जे लोक त्यांच्यासोबत आहेत, ते काफिरांवर कठोर आहेत. आपसात दयाशील आहेत. तुम्ही त्यांना पाहाल की रुकूअ व सजदे करीत आहेत. अल्लाहची कृपा व त्याच्या प्रसन्नतेची कामना करण्यात (मग्न) आहेत. त्यांचे निशाण त्याच्या चेहऱ्यांवर सजद्यांच्या प्रभावाने आहे. त्यांचा हाच गुणविशेष (उदाहरण) तौरातमध्ये आहे आणि त्यांचे उदाहरण इंजीलमध्ये आहे, त्या शेतीसारखे, जिने आपले अंकूर बाहेर काढले, मग त्याला मजबूती दिली आणि ते जाड झाले, मग आपल्या खोडावर सरळ उभे राहिले आणि शेतकऱ्यांना आनंदित करू लागले, यासाठी की त्यांच्यामुळे काफिरांना चिडवावे, आणि ईमान राखणाऱ्यांशी व नेक सदाचारी लोकांशी अल्लाहने माफीचा आणि फार मोठ्या मोबदल्याचा वायदा केला आहे.

---

# सूरह हुजुरात - ४९

सूरह हुजुरात मदीना येथे अवतरली, यात अठरा आयती आणि दोन रुकुअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** हे ईमान राखणाऱ्यांनो! अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या पुढे जाऊ नका[१] आणि अल्लाहचे भय बाळगत राहा. निःसंशय अल्लाह ऐकणारा, जाणणारा आहे.

**२.** हे ईमान राखणाऱ्यांनो! आपला स्वर (आवाज) पैगंबराच्या स्वरापेक्षा उंचावू नका,

---

(१) अर्थात धर्माच्या संदर्भात स्वतःच एखादा निर्णय घेत जाऊ नका, ना स्वतःच्या आकलन व विचाराला प्राधान्य द्या, किंबहुना अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या आदेशआचे पालन करा. आपल्यातर्फे धर्मात वाढकिंवा बिदआत (नव्या गोष्टी) जारी करणे, अल्लाह आणि पैगंबराच्या पुढे जाण्याचे दुःसाहस करणे होय. जे कोणत्याही ईमानधारकासाठी योग्य नव्हे. त्याचप्रमाणे एखादा फतवा कुरआन व हदीसमध्ये विचार न करता दिला जावा आणि दिल्यानंतर जर तो शरिअतविरूद्ध दिल्याचे स्पष्ट व्हावे, तर त्यावर अडून राहणे देखील, या आयतीत दिल्या गेलेल्या अनुमतीच्या विरूद्ध आहे. ईमान राखणाऱ्याचे आचरण तर अल्लाह आणि पैगंबराच्या आदेशापुढे समर्पण आणि पालन करण्यासाठी नतमस्तक होणे होय. त्याच्या विरोधात आपले स्वतःचे कथन किंवा एखाद्या इमामाच्या विचारावर अडून राहणे नव्हे.

आणि त्यांच्याशी अशा प्रकारे उंच स्वरात बोलू नका ज्या प्रकारे आपसात एकमेकांशी बोलता. (कदाचित असे न व्हावे) की तुमची कर्मे वाया जावीत आणि तुम्हाला खबरही न व्हावी.[१]

**३.** वस्तुतः जे लोक पैगंबर (सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) यांच्या समोर आपला स्वर धीमा (खालचा) राखतात, हेच ते लोक होत, ज्यांच्या हृदयांना, अल्लाहने तकवा (अल्लाहच्या भया) करीता पारखून घेतले आहे, त्यांच्यासाठी माफी आहे आणि फार मोठे पुण्य आहे.

**४.** निःसंशय, जे लोक तुम्हाला खोल्यांच्या मागून हाक मारतात, त्यांच्यापैकी अधिकांश (पूर्णतः) निर्बुद्ध आहेत.

**५.** आणि जर या लोकांनी येथेपर्यंत धीर संयम राखला असता की तुम्ही (स्वतः) त्यांच्या जवळ आले असते तर हेच त्यांच्यासाठी अधिक चांगले झाले असते, आणि अल्लाह माफ करणारा, दया करणारा आहे.

**६.** हे ईमान राखणाऱ्यांनो! जर तुम्हाला एखादा दुराचारी खबर देईल तर तुम्ही त्याची चांगल्या प्रकारे चौकशी करून घेत जा (असे न व्हावे) की अजाणतेपणामुळे तुम्ही एखाद्या समुदायाला हानी पोहचवावी, मग नंतर आपल्या कृत्यावर पश्चात्ताप करू लागावे.

**७.** आणि जाणून असा की तुमच्या दरम्यान अल्लाहचा पैगंबर हजर आहे जर बहुतेक गोष्टींमध्ये ते तुमचे म्हणणे मानत राहिले तर तुम्ही अडचणीत पडाल, परंतु अल्लाहने तुमच्यासाठी ईमानास प्रिय बनविले आणि त्यास तुमच्या हृदयात सुशोभित केले आहे आणि कुफ्र (इन्कार) ला आणि दुष्कर्मांना व अवज्ञाकारितेला तुमच्या नजरेत अप्रिय बनवेले आहे. हेच लोक सन्मार्ग प्राप्त झालेले आहेत.

**८.** अल्लाहच्या कृपा आणि अनुग्रहाने, आणि अल्लाह जाणणारा व बुद्धिकौशल्य बाळगणारा आहे.

**९.** आणि जर मुसलमानांचे दोन गट आपसात लढू लागतील तर त्याच्यात समेट

(१) यात पैगंबर (सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) करिता आदर सन्मान राखण्याचे वर्णन आहे, जे प्रत्येक मुसलमानाकडून अपेक्षित आहे.

(मिलाफ) घडवून आणा, मग जर त्यांच्यापैकी एक गट दुसऱ्या गटावर अत्याचार करील, तर तुम्ही (सर्व) अत्याचार करणाऱ्या गटाशी लढा. येथे पर्यंत की तो अल्लाहच्या आदेशाकडे परत यावा,[१] जर परतून आला तर न्यायपूर्वक त्यांच्या दरम्यान समजोता करा आणि न्याय करा. नि:संशय, अल्लाह न्याय करणाऱ्यांशी प्रेम राखतो.

**१०.** (लक्षात ठेवा) समस्त ईमान राखणारे (आपसात) भाऊ भाऊ आहेत, तेव्हा आपल्या दोन बांधवांच्या दरम्यान समेट (मिलाफ) करून देत राहा आणि अल्लाहचे भय बाळगत राहा, यासाठी की तुमच्यावर दया कृपा केली जावी.

**११.** हे ईमान राखणाऱ्यांनो! पुरुषांनी दुसऱ्या पुरुषांची थट्टा उडवू नये, संभवतः ते यांच्याहून अधिक चांगले असावेत आणि ना स्त्रियांनी (इतर) स्त्रियांची थट्टा करावी. संभवतः त्या, त्यांच्याहून अधिक चांगल्या असाव्यात, आणि आपसात एकमेकांवर दोषारोप ठेवू नका आणि ना एखाद्याला वाईट टोपण नाव द्या. ईमानानंतर फिस्क (वाईट शब्द) वाईट नाव आहे। आणि जे क्षमा-याचना न करतील, तर तेच अत्याचारी लोक आहेत.

**१२.** हे ईमान राखणाऱ्यांनो! अनेक वाईट तर्क (दुराग्रह) करण्यापासून दूर राहा, विश्वास राखा की काही तर्क अपराध आहेत आणि भेद (जाणून घेण्यासाठी) पाळतीवर राहू नका आणि ना तुमच्यापैकी कोणी एखाद्याची निदा-नालस्ती (त्याच्या पश्चात) करावी. काय तुमच्यापैकी कोणीही आपल्या मेलेल्या भावाचे मांस खाणे पसंत करतो? तुम्हाला तर त्या गोष्टीचा तिरस्कारच वाटेल आणि अल्लाहचे भय बाळगत राहा. नि:संशय, अल्लाह माफी कबूल करणारा दयाशील आहे.

**१३.** लोकांनो! आम्ही तुम्हाला एकाच पुरुष आणि स्त्रीपासून निर्माण केले आहे आणि यासाठी की तुम्ही आपसात एकमेकांना ओळखावे, अनेक जाती आणि प्रजाती बनविल्या, अल्लाहच्या नजरेत तुम्हा सर्वांत प्रतिष्ठासंपन्न तो आहे, जो सर्वांत जास्त

---

(१) अर्थात अल्लाह आणि पैगंबर (सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) यांच्या आदेशानुसार आपसातील मतभेद मिटविण्यास तयार नसतील आणि उत्पात (फसाद) माजविण्याची नीती अंगीकारतील तर अशा स्थितीत इतर मुसलमानांची ही जबाबदारी आहे की सर्वांनी मिळून उत्पात माजविणाऱ्यांशी लढा द्यावा, येथपावेतो की त्यांनी अल्लाहचा आदेश मानण्यास तयार व्हावे.

(अल्लाहचे) भय बाळगणारा आहे.[१] निःसंशय, अल्लाह जाणणारा, चांगल्या प्रकारे जाणतो.

**१४.** ग्रामीण लोक म्हणतात की आम्ही ईमान राखले. (तुम्ही) सांगा की, तुम्ही ईमान राखले नाही, परंतु तुम्ही असे म्हणा की आम्ही इस्लामचा स्वीकार केला (विरोध सोडून आज्ञाधारक झालोत) वास्तविक अजूनपर्यंत ईमान तुमच्या हृदयात दाखल झालेच नाही. जर तुम्ही अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचे आज्ञापालन करू लागाल तर अल्लाह तुमच्या कर्मांमधून काहीच घटविणार नाही. निःसंशय, अल्लाह मोठा माफ करणारा दया करणारा आहे.

**१५.** ईमान राखणारे (खरे) तर ते आहेत, जे अल्लाहवर आणि त्याच्या पैगंबरावर (मजबूत) ईमान राखतील, मग शंका संशय न करतील आणि आपल्या धनाने आणि आपल्या प्राणाने अल्लाहच्या मार्गात जिहाद (धर्मयुद्ध) करीत राहतील (आपल्या ईमानाच्या दाव्यात) हेच सच्चे आहेत.

**१६.** सांगा की काय तुम्ही अल्लाहला आपल्या धार्मिकतेची जाणीव करून देत आहात? अल्लाह, ते सर्व काही जे आकाशांमध्ये आणि धरतीत आहे, चांगल्या प्रकारे जाणतो, आणि अल्लाह प्रत्येक गोष्ट जाणणारा आहे.

**१७.** ते तुम्हाला आपल्या मुसलमान होण्याचा उपकार जाणिवतात. (तुम्ही) सांगा की आपल्या मुसलमान होण्याचा उपकार माझ्यावर ठेवू नका, किंबहुना अल्लाहचा तुमच्यावर उपकार आहे की त्याने तुम्हाला ईमानकडे मार्गदर्शन केले, जर तुम्ही सच्चे असाल.

**१८.** निःसंशय, आकाशांच्या आणि जमिनीच्या सर्व लपलेल्या गोष्टी अल्लाह चांगल्या प्रकारे जाणतो, आणि जे काही तुम्ही करीत आहात, ते अल्लाह चांगल्या प्रकारे पाहत आहे.

---

(१) अर्थात अल्लाहजवळ प्राधान्य किंवा श्रेष्ठतेचे स्तर परिवार, जात किंवा वंशावळीवर अवलंबून नाही. आणि हे कोणा माणसाच्या अधिकारकक्षेतही नाही. किंबहुना हे स्तर तकवा (अल्लाहचे भय राखून केलेले कर्म) आहे, जे अंगीकारणे माणसाच्या अवाक्यात आहे. होय आयत त्या धर्मज्ञानी लोकांचे प्रमाण आहे, जे विवाहसंदर्भात जात आणि वंशाच्या समनातेला आवश्यक जाणत नाहीत आणि केवळ दीन (धर्मा) च्या आधारावर विवाह करण्यास पसंत करतात. (इब्ने कसीर)

# शूरह क़ाफ - ५०

सूरह क़ाफ मक्का येथे अवतरली, यात पंचेचाळीस आयती आणि तीन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** क़ाफ. फार मोठी गरिमा राखणाऱ्या या कुरआनाची शपथ आहे.

**२.** तथापि त्यांना आश्चर्य वाटले की त्यांच्याजवळ त्यांच्यामधूनच एक खबरदार करणारा आला, तेव्हा काफिर म्हणाले, ही एक विचित्र गोष्ट आहे.

**३.** काय जेव्हा आम्ही मेल्यावर माती होऊन जाऊ, मग हे परतणे दूरची गोष्ट आहे.

**४.** जमीन जे काही त्यांच्यातून घटविते, ते आम्ही जाणतो आणि आमच्याजवळ सर्व स्मरणात राखणारा ग्रंथ आहे.

**५.** तथापि त्यांनी सत्य गोष्टीला खोटे म्हटले, जेव्हा ती त्यांच्याजवळ पोहचली, तेव्हा ते गोंधळात पडले आहेत.

**६.** काय त्यांनी आकाशाला आपल्यावर (असलेले) पाहिले नाही की आम्ही ते कशा प्रकारे बनविले आहे आणि त्याला सुशोभित केले आहे? त्यात कोठेही फट (किंवा छिद्र) नाही.

**७.** आणि जमिनीला आम्ही बिछविले आहे आणि तिच्यावर आम्ही पर्वत रोवले आणि तिच्यात वेगवेगळ्या प्रकारच्या सुंदर वस्तू उगविल्या.

**८.** यासाठी की प्रत्येक (अल्लाहकडे) परतणाऱ्या दासाकरिता पाहण्याचे व समजण्याचे साधन व्हावे.

**९.** आणि आम्ही आकाशातून शुभ पाण्याचा वर्षाव केला आणि त्याद्वारे बागा आणि कापणी केल्या जाणाऱ्या शेताचे अन्न-धान्य निर्माण केले.

**१०.** आणि खजुरींचे उंच उंच वृक्ष, ज्यांचे गुच्छे एकावर एक आहेत.

**११.** दासांच्या आजिविकेकरिता आणि आम्ही पाण्याद्वारे मृत शहराला जिवंत केले. अशाच प्रकारे (कबरींमधून) निघायचे आहे.

**१२.** त्यांच्यापूर्वी नूहच्या जनसमूहाने आणि रस्सच्या निवासींनी आणि समूदच्या

लोकांनी खोटे ठरविले होते.

**१३.** आणि आदने आणि फिरऔनने आणि लूतच्या बांधवांनी

**१४.** आणि आयकावाल्यांनी आणि तुब्बअच्या जनसमूहाने (देखील खोटे ठरविले होते) सर्वांनी पैगंबरांना खोटे ठरविले, तेव्हा माझ्या शिक्षेचा वायदा त्यांच्याकरिता खरा ठरला.

**१५.** काय आम्ही पहिल्यांदा निर्माण केल्याने थकलो? किंबहुना हे लोक नव्या जीवनाच्या संदर्भात संशयग्रस्त आहेत.

**१६.** आम्ही माणसाला निर्माण केले आहे आणि त्याच्या मनात जे विचार निर्माण होतात आम्ही त्यांना जाणतो,[१] आणि आम्ही त्याच्या मुख्य शिरे (प्राण नाडी) पेक्षाही अधिक त्याच्या समीप आहोत.

**१७.** जेव्हा दोन (नोंद) घेणारे जे घेतात, एक उजव्या बाजूला, आणि दुसरा डाव्या बाजूला बसला आहे.

**१८.** (मनुष्य) तोंडाने एखादा शब्द काढत नाही तोच त्याच्याजवळ रक्षक (पहारेकरी) तयार आहे.

**१९.** आणि मृत्युची मुर्छा सत्यासह येऊन पोहचली, हीच ती गोष्ट होय, जिच्यापासून तू पळ काढत होतास.

**२०.** आणि सूर फुंकला जाईल अज़ाब (शिक्षा-यातने) च्या वायद्याचा दिवस हाच आहे.

**२१.** आणि प्रत्येक मनुष्य अशा प्रकारे येईल की त्याच्यासोबत एक हाकणारा असेल आणि एक साक्ष देणारा.

**२२.** नि:संशय, तू यापासून बेसावध (गफलतीत) होता, परंतु आम्ही तुझ्या समोरून

(१) अर्थात मनुष्य जे काही लपवितो आणि मनात लपवून ठेवतो ते सर्व काही आम्ही जाणतो. 'वस्वसा' मनात येणाऱ्या विचारांना म्हटले जाते, ज्याचे ज्ञान त्या माणसाखेरीज दुसऱ्या कोणालाही निसते, परंतु अल्लाह या विचारांनाही जाणतो. यास्तव 'हदीसे कुदसी'मध्ये उल्लेखित आहे, ''माझ्या अनुयायींच्या मनात येणाऱ्या विचारांना अल्लाहने माफ केले आहे, अर्थात त्याबद्दल तो गुन्हेगार ठरविणार नाही, जोपर्यंत ते विचार आपल्या तोंडाने व्यक्त करीत नाही किंवा त्यानुसार आचरण करणार नाही.'' (अल बुखारी, किताबुल ईमान बाबुइजा हनस नासियन फिल ऐमान, मुस्लिम बाबु तजाबुजिल्लाहि अन हदीसिन नफ्से वल ख्तितिरे बिल कल्बे इजालम तस्तकिर्र)

पडदा हटविला, तेव्हा आज तुझी नजर फार तीक्ष्ण आहे.

**२३.** त्याच्यासोबत राहणारे फरिश्ते म्हणतील, हा हजर आहे, जो की माझ्याजवळ होता.

**२४.** दोघे टाकून द्या जहन्नममध्ये प्रत्येक काफिर, उदंड(उध्दट) माणसाला.

**२५.** जो सत्कर्मांपासून रोखणारा, मर्यादा भंग करणारा आणि संशयी होता.

**२६.** ज्याने अल्लाहसोबत दुसरा माबूद (उपास्य) ठरवून घेतला होता, तेव्हा त्याला कठोर शिक्षा - यातनेत टाकून द्या.

**२७.** त्याचा साथीदार (सैतान) म्हणेल की हे आमच्या पालनकर्त्या! मी याला मार्गभ्रष्ट केले नव्हते, उलट हा स्वतःच दूरच्या मार्गभ्रष्टतेत होता.

**२८.** (अल्लाह) फर्माविल की, माझ्यासमोर वादविवाद करू नका. मी तर आधीच तुमच्याकडे शिक्षा - यातनेचा वायदा पाठविला होता.

**२९.** माझ्याजवळ गोष्ट बदलली जात नाही आणि ना मी आपल्या दासांवर (उपासकांवर) किंचितही अत्याचार करणारा आहे .

**३०.** ज्या दिवशी आम्ही जहन्नमला विचारू की काय तू (पूर्णतः) भरली? ती उत्तर देईल की, आणखी काही जास्त आहे का?

**३१.** आणि जन्नत, नेक सदाचारी लोकांसाठी अगदी जवळ केली जाईल किंचितही दूर नसेल.

**३२.** हे आहे, ज्याचा वायदा तुमच्याशी केला जात होता, अशा त्या प्रत्येक माणसासाठी, जो ध्यानमग्न आणि नियमित (आज्ञापालन) करणारा असेल.

**३३.** जो रहमान (दयावान अल्लाह) चे गुप्तपणे भय राखत असेल आणि रुजू होणारे हृदय घेऊन आला असेल.

**३४.** तुम्ही या जन्नतमध्ये शांतीपूर्वक दाखल व्हा. हा नेहमी राहण्याचा दिवस आहे.

**३५.** हे तिथे जे काही इच्छितील ते त्यांना मिळेल (किंबहुना) आमच्याजवळ आणखीही जास्त आहे.

**३६.** आणि त्यांच्यापूर्वीही आम्ही अनेक जनसमूहांना नष्ट करून टाकले आहे, जे त्याच्यापेक्षा शक्ती सामर्थ्यात खूप जास्त होते. ते शहरामध्ये फिरतच राहिले की एखादे पळ काढण्याचे स्थान आहे?

**३७.** यात, त्या प्रत्येक माणसाकरिता बोध उपदेश आहे, जो हृदय बाळगत असेल किंवा लक्षपूर्वक ऐकत असेल आणि तो हजर असेल.

**३८.** निःसंशय, आम्ही आकाशांच्या आणि धरतीच्या आणि त्या दोघांच्या दरम्यान जे काही आहे, ते सर्व (फक्त) सहा दिवसांत निर्माण केले, आणि आम्हाला थकव्याने स्पर्शही केला नाही.

**३९.** यास्तव तुम्ही त्या गोष्टींवर धीर-संयम राखा आणि आपल्या पालनकर्त्याचे पावित्र्यगान, प्रशंसेसह सूर्योदयापूर्वीही आणि सूर्यास्तापूर्वीही करीत राहा.

**४०.** आणि रात्रीच्या काही काळातही महिमागान करा आणि नमाजनंतरही.

**४१.** आणि ऐका की ज्या दिवसी एक पुकारणारा जवळच्या ठिकाणाहूनच पुकारेल.

**४२.** ज्या दिवशी तो भयंकर आवाज खात्रीपूर्वक ऐकतील, हा बाहेर पडण्याचा दिवस असेल.

**४३.** आम्हीच जिवंत करतो आणि आम्हीच मृत्यु देतो आणि आमच्याचकडे परतून यायचे आहे.

**४४.** ज्या दिवशी जमीन विदीर्ण होईल आणि हे धावत पळत (बाहेर पडतील) हे एकत्रित करणे आमच्यासाठी फार सोपे आहे.

**४५.** आम्ही चांगल्या प्रकारे जाणतो, जे काही हे सांगत आहेत आणि तुम्ही त्यांना जबरदस्तीपूर्वक राजी करून घेणारे नाही, तेव्हा तुम्ही त्यांना कुरआनाच्या माध्यमाने समजावित राहा, जे माझ्या ताकीदीचे भय बाळगतात.

---

# सूरह ज़ारियात - ५१

सूरह ज़ारियात मक्का येथे अवतरली, यात साठ आयती आणि तीन रुकुअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** शपथ आहे उडवून विखुरणाऱ्यां (वाऱ्यां) ची

**२.** मग ओझे उचलणाऱ्यांची

**३.** मग धीम्या गतीने चालणाऱ्यांची

**४.** मग कामाची वाटणी करणाऱ्यांची.

**५.** निःसंशय, तुम्हाला जे वायदे दिले जातात (ते सर्व) खरे आहेत.

**६.** आणि निश्चितच न्याय होणार आहे.

**७.** शपथ आहे, मार्ग राखणाऱ्या आकाशाची.

**८.** निश्चितच तुम्ही विभिन्न गोष्टीत पडला आहात.

**९.** त्या (सत्या) पासून तोच फिरविला जातो, जो फिरविला गेला असावा.

**१०.** अटकळीच्या गोष्टी बोलणारे नष्ट केले गेले.

**११.** जे चेतनाहीन आहेत आणि विसर पडलेले.

**१२.** विचारतात की मोबदल्याचा दिवस केव्हा येईल ?

**१३.** (होय) हा तो दिवस आहे की हे आगीवर तापविले जातील.

**१४.** स्वाद चाखा. हेच ते, ज्याची तुम्ही घाई माजवित होते.

**१५.** निःसंशय, अल्लाहचे भय बाळगणारे जन्नतींमध्ये आणि (शीतल) झऱ्यांमध्ये असतील.

**१६.** त्यांच्या पालनकर्त्याने जे काही त्यांना प्रदान केले आहे, ते घेत असतील ते तर त्यापूर्वीच सत्कर्म करणारे होते.

**१७.** ते रात्री फार कमी झोपत असत.

**१८.** आणि ते रात्रीच्या अंतिम प्रहरी (पहाटे) क्षमा - याचना करीत.

**१९.** आणि त्यांच्या धन-संपत्तीत याचकांचा(मागणाऱ्यांचा)आणि याचना करण्यापासून अलिप्त राहणाऱ्यांचा हक्क होता.

**२०.** आणि विश्वास राखणाऱ्यांकरिता तर धरतीत अनेक निशाण्या आहेत.

**२१.** आणि स्वतः तुमच्या अस्तित्वात देखील, तर काय तुम्ही पाहत नाहीत?

**२२.** आणि तुमची आजिविका(अन्न सामुग्री) आणि जो तुम्हाला वायदा दिला जात आहे, सर्व आकाशात आहे.

**२३.** तेव्हा आकाश आणि धरतीच्या स्वामी व पालनकर्त्याची शपथ! हे अगदी सत्य आहे, असेच खात्रीपूर्वक, जसे तुम्ही बोलता.

**२४.** काय तुम्हाला इब्राहीम (अलैहिस्सलाम) च्या सन्मानित अतिथींची वार्ताही पोहचली आहे?

**२५.** ते जेव्हा त्यांच्याजवळ आले तेव्हा सलाम केला. (इब्राहीम) यांनी सलामला उत्तर दिले (आणि म्हणाले, हे तर) अनोळखी लोक आहेत.

**२६.** मग (गुपचुप घाईघाईने) आपल्या कुटुंबियांकडे गेले आणि एका लठ्ठ वासरुचे (मांस) घेऊन आले.

**२७.** आणि ते त्यांच्या पुढे ठेवले आणि म्हणाले, तुम्ही खात का नाही?

**२८.** मग मनातल्या मनात त्यांच्यापासून भयभित झाले. (अतिथी) म्हणाले, तुम्ही भिऊ नका आणि त्यांना (हजरत) इब्राहीमला एका ज्ञानी पुत्रप्राप्तीची शुभवार्ता दिली.

**२९.** तेव्हा त्यांच्या पत्नीने आश्चर्यचकित होऊन आपल्या तोंडावर हात मारून म्हटले की मी तर म्हातारी आहे, त्याचबरोबर वांझ देखील.

**३०.** ते म्हणाले की होय, तुमच्या पालनकर्त्या (अल्लाह) ने असेच फर्माविले आहे. निःसंशय, तो हिकमशाली आणि जाणणारा आहे.

**३१.** (हजरत इब्राहीम अलै.) म्हणाले की अल्लाहने पाठविलेल्या (फरिश्त्यां) नो! तुमच्या (येण्याचा) हेतू काय?

**३२.** त्यांनी उत्तर दिले की आम्ही अपराधी लोकांकडे पाठविले गेलो आहोत.

**३३.** यासाठी की आम्ही त्याच्यावर (भाजलेल्या) मातीच्या दगडांचा वर्षाव करावा.

**३४.** जे तुमच्या पालनकर्त्यातर्फे चिन्हांकित झाले आहेत त्या मर्यादा भंग करणाऱ्यांकरिता.

**३५.** तेव्हा जेवढे ईमान राखणारे तिथे होते, आम्ही त्यांना तेथून काढले.

**३६.** आणि आम्हाला तिथे मुसलमानांचे फक्त एकच घर आढळले.

**३७.** आणि आम्ही तिथे त्यांच्यासाठी, जे दु:खदायक शिक्षा यातनेचे भय बाळगतात, एक पूर्ण चिन्ह सोडले.

**३८.** आणि मूसाच्या वृत्तांतात (ही आमच्यातर्फे तंबी आहे) जेव्हा आम्ही त्यांना फिरऔनकडे स्पष्ट प्रमाणासह पाठविले.

**३९.** तेव्हा त्याने आपल्या सामर्थ्याच्या घमेंडीत तोंड फिरविले, आणि म्हणाले, हा (एकतर) जादूगार आहे किंवा वेडसर आहे.

**४०.** शेवटी आम्ही त्याला आणि त्याच्या सैन्याला आपल्या शिक्षा-यातनेत धरून, समुद्रात टाकले. तो होताच निर्भर्त्सना करण्यायोग्य.

**४१.** त्याचप्रमाणे आदच्या लोकांमध्येही (आमच्यातर्फे तंबी आहे) जेव्हा आम्ही त्यांच्यावर वांझ (अशुभ) वादळ पाठविले.

**४२.** ते ज्या ज्या वस्तूवरून गेले, तिला जीर्ण हाडांप्रमाणे चूरेचूर करून टाकले.

**४३.** आणि समूद (च्या वृत्तांता) मध्येही (बोध) आहे, जेव्हा त्यांना सांगितले गेले की तुम्ही काही दिवसापर्यंत लाभ प्राप्त करून घ्या.

**४४.** परंतु त्यांनी आपल्या पालनकर्त्याच्या आदेशाचे पालन केले नाही, ज्याबद्दल त्यांना एका भयंकर गर्जनेने नष्ट करून टाकले आणि ते बघतच राहिले.

**४५.** मग ना तर ते उभे राहू शकले, आणि ना सूड घेऊ शकले.

**४६.** आणि नूह (अलै.) यांच्या जनसमूहाची देखील याच्या आधी (हीच अवस्था झाली होती) ते देखील मोठे अवज्ञाकारी लोक होते.

**४७.** आणि आकाशाला आम्ही (आपल्या) हातांनी बनविले आहे आणि निःसंशय, आम्ही व्यापक करणारे आहोत.

**४८.** आणि जमिनीला आम्ही बिछाईत बनविले आहे, तेव्हा आम्ही किती चांगले बिछाईत करणारे आहोत.

**४९.** आणि प्रत्येक वस्तूला आम्ही जोडी जोडीने निर्माण केले आहे,[१] यासाठी की तुम्ही बोध ग्रहण करावा.

**५०.** तेव्हा तुम्ही अल्लाहकडे धाव घ्या. निःसंशय, मी तुम्हाला त्याच्यातर्फे खबरदार करणारा आहे.

**५१.** आणि अल्लाहसोबत दुसऱ्या कोणालाही उपास्य (दैवत) बनवू नका, निश्चितच, मी तुम्हाला त्याच्यातर्फे स्पष्टतः सावध करणारा आहे.

**५२.** अशाच प्रकारे जे लोक त्यांच्या पूर्वी होऊन गेलेत, त्यांच्याजवळ जो देखील पैगंबर आला, त्याला ते म्हणाले की एकतर हा जादूगार आहे किंवा वेडा!

**५३.** काय हे, या गोष्टीची एकमेकांना ताकीद करत गेलेत, नव्हे, किंबहुना हे सर्व विद्रोही (उन्मत्त) लोक आहेत.

**५४.** तेव्हा तुम्ही त्यांच्याकडून तोंड फिरवून घ्या, तुमच्यावर कसलाही दोषारोप नाही.

**५५.** आणि उपदेश करीत राहा, निःसंशय हा उपदेश ईमान राखणाऱ्यांना लाभ देईल.

**५६.** मी जिन्नांना आणि मानवांना फक्त अशासाठी निर्माण केले आहे की त्यांनी केवळ

---

(१) अर्थात प्रत्येक वस्तूची जोडी, जसे नर-मादी, किंवा विरुद्धार्थानेही निर्माण केले आहे. जसे अंधार-उजेड, जल-थल, चंद्र-सूर्य, गोड-कडू, रात्र-दिवस, भले-बुरे, जीवन-मृत्यु, ईमान-कुफ्र, सौभाग्य-दुर्भाग्य, जन्नत-जहन्नम, जिन्न-मनुष्य वगैरे. येथपावेतो की सजीवांच्या तुलनेत निर्जीव. यास्तव या जगाचीही जोडी आहे ते म्हणजे आखिरत.

माझी उपासना करावी.[१]

**५७.** त्यांच्याकडून मी ना आजिविका (रोजी) इच्छितो ना असे इच्छितो की त्यांनी मला खाऊ घालावे.

**५८.** निःसंशय, अल्लाह स्वतः रोजी देणारा सामर्थ्यशाली व बलवान आहे.

**५९.** तेव्हा ज्या लोकांनी अत्याचार केला आहे, त्यांनाही त्यांच्या साथीदारांच्या हिश्श्याइतकाच हिस्सा मिळेल, यास्तव त्यांनी माझ्याशी घाईने मागू नये.

**६०.** तेव्हा दुर्दशा आहे काफिरांसाठी, त्यांच्या त्या दिवशी ज्याचा त्यांना वायदा दिला जात आहे.

---

# सूरह तूर - ५२

सूरह तूर मक्का येथे अवतरली, यात एकोणपन्नास आयती आणि दोन रुकुअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** शपथ आहे तूरची

**२.** आणि लिखित ग्रंथाची.

**३.** जो पातळ चामड्याच्या खुल्या पृष्ठांमध्ये आहे.

**४.** आणि आबाद घराची.

---

(१) यात अल्लाहच्या त्या इराद्यास जाहीर केले गेले आहे, जो शरिअतीनुसार तो आपल्या दासांकडून इच्छितो की समस्त जिन्न आणि मानवांनी केवळ एक अल्लाहचीच उपासना करावी व आज्ञापालनही त्याच एकाचे करावे. जर याचा संबंध उत्पत्तीच्या इराद्याशी असता तर सर्वच त्याची उपासना व आज्ञापालन करण्यास विवश झाले असते, मग कोणी अवज्ञा करण्याचे सामर्थ्य राखू शकला नसता. अर्थात यात जिन्न आणि मानवांना त्याच्या जीवन उद्देशाची आठवण करून दिली गेली आहे, ज्याचा त्यांनी विसर पाडल्यास आखिरतमध्ये सक्तीने विचारपूस होईल. परिणामी ते त्या कसोटीत असफल ठरतील, ज्यात अल्लाहने त्यांना संकल्प आणि पसंतीचे स्वातंत्र्य देऊन ठेवले आहे.

**५.** आणि बुलंद छताची.

**६.** आणि उफाळलेल्या सागराची.

**७.** निःसंशय, तुमच्या पालनकर्त्याचा प्रकोप होईलच.

**८.** त्याला कोणी रोखणारा नाही.

**९.** ज्या दिवशी आकाश थरथरु लागेल.

**१०.** आणि पर्वत चालायला लागतील.

**११.** त्या दिवशी खोटे ठरविणाऱ्यांचा सर्वनाश आहे.

**१२.** जे आपल्या वाह्यात गोष्टींमध्ये खेळत बागडत आहेत.

**१३.** ज्या दिवशी त्यांना धक्के देऊन जहन्नमच्या आगीकडे आणले जाईल.

**१४.** हीच ती (जहन्नमची) आग होय, जिला तुम्ही खोटे ठरवित होते.

**१५.** (आता सांगा) काय ही जादू आहे? की तुम्ही पाहातच नाहीत?

**१६.** दाखल व्हा यात (जहन्नममध्ये) आता तुमचे धीर-संयम राखणे आणि न राखणे तुमच्यासाठी सारखेच आहे. तुम्हाला केवळ तुमच्या कर्मांचा मोबदला दिला जाईल.

**१७.** निःसंशय, नेक सदाचारी लोक जन्नतमध्ये सुखांमध्ये आहेत.

**१८.** त्यांना, त्यांच्या पालनकर्त्याने जे देऊन ठेवले आहे त्यावर खूश आहेत आणि त्यांना त्यांच्या पालनकर्त्याने जहन्नमच्या अज़ाब (शिक्षा-यातने) पासूनही वाचविले.

**१९.** तुम्ही मजेने खात-पीत राहा, त्या कर्मांच्या मोबदल्यात जी तुम्ही करीत होते.

**२०.** बरोबरीने मांडलेल्या सुंदर आसनांवर तक्के लावून, आणि आम्ही त्याचा विवाह मोठ्या नेत्राच्या हूर (परीं) शी करविला आहे.

**२१.** आणि ज्या लोकांनी ईमान राखले, आणि त्यांच्या संततीनेही ईमान राखण्यात त्यांचे अनुसरण केले, आम्ही त्यांच्या संततीला त्यांच्यापर्यंत पोहचवू आणि आम्ही त्यांच्या कर्मांमधून काहीच कमी करणार नाही. प्रत्येक मनुष्य आपापल्या कर्मांच्या बदली

गहाण आहे.

**२२.** आणि आम्ही त्यांच्यासाठी मेवे आणि स्वादिष्ट मांसाची अधिकता करू.

**२३.** (आनंदाने) ते एकमेकांपासून (मद्याचे) प्याले हिसकावून घेत असतील, त्या मद्याच्या स्वादात ना वाह्यात गोष्टी बोलतील आणि ना अपराध असेल.

**२४.** आणि त्यांच्या चारी बाजूला सेवेसाठी (सेवक म्हणून) लहान मुले फिरत असतील, जणू काही ते मोती होते, ज्यांना लपवून ठेवले होते.

**२५.** आणि ते आपसात एकमेकांकडे तोंड करून विचारपूस करतील.

**२६.** म्हणतील की याच्यापूर्वी आपल्या कुटुंबियांमध्ये फार भय राखत होतो.

**२७.** तेव्हा अल्लाहने आमच्यावर फार मोठा उपकार केला आणि आम्हाला होरपळून टाकणाऱ्या अति उष्ण हवेच्या प्रकोपा (अज़ाब) पासून वाचविले.

**२८.** आम्ही याच्या पूर्वीही त्याला पुकारत होतो. निःसंशय, तो मोठा उपकार करणारा आणि मोठा दया करणारा आहे.

**२९.** तेव्हा तुम्ही समजावित राहा, कारण की तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कृपेने ना तर ज्योतिषी आहात, ना वेडसर.

**३०.** काय (काफिर) असे म्हणतात की हा कवी आहे, आम्ही त्याच्यासाठी काल चक्रा (अर्थात मृत्यु) ची प्रतीक्षा करीत आहोत.

**३१.** (तुम्ही) सांगा की तुम्ही प्रतीक्षा करा मी देखील तुमच्यासोबत प्रतीक्षा करणाऱ्यांपैकी आहे.

**३२.** काय त्यांच्या अकला त्यांना हेच शिकवितात? किंवा हे लोक आहेतच उध्दट (विद्रोही)?

**३३.** काय हे म्हणता की या (पैगंबरा) ने (कुरआन) स्वतः रचले आहे, वस्तुतः हे ईमान राखत नाहीत.

**३४.** बरे, जर हे सच्चे आहेत तर मग यासारखी एक तरी गोष्ट यांनी आणून दाखवावी.

**३५.** काय हे एखाद्या (निर्माण करणाऱ्या) च्या विना स्वतः (आपोआप) निर्माण झाले

आहेत? किंवा हे स्वतः निर्माण करणारे आहेत?

**३६.** काय त्यांनीच आकाशांना आणि जमिनीला निर्माण केले आहे? किंबहुना हे विश्वास न राखणारे लोक आहेत.

**३७.** अथवा काय यांच्याजवळ तुमच्या पालनकर्त्याचे खजिने आहेत? किंवा (त्या खजिन्यांचे) हे संरक्षक आहेत?

**३८.** किंवा यांच्याजवळ एखादी शिडी आहे, जिच्यावर चढून हे ऐकतात? (जर असे आहे) तर ऐकणाऱ्याने एखादे स्पष्ट प्रमाण सादर करावे.

**३९.** काय अल्लाहकरिता सर्व कन्या आहेत आणि तुमच्यासाठी पुत्र?

**४०.** काय तुम्ही यांच्याकडून काही मजुरी मागता की हे त्या ओझ्याने दाबले जात आहेत?

**४१.** काय यांच्याजवळ परोक्ष ज्ञान आहे की हे लिहून घेत असतात?

**४२.** काय हे लोक एखादा कावेबाजपणा करू इच्छितात? तर (विश्वास ठेवा) की कपट कारस्थान करणारा गट काफिरांचा आहे.

**४३.** काय अल्लाहखेरीज त्यांचा कोणी दुसरा माबूद (उपास्य) आहे? (कदापि नाही) अल्लाह त्यांच्या सहभागी ठरविण्यापासून (शुद्ध) आणि पवित्र आहे.

**४४.** जर हे लोक आकाशाचा एखादा तुकडा जरी कोसळताना पाहतील तरी हेच म्हणतील की हे थरावर थर ढग आहेत.

**४५.** तेव्हा तुम्ही त्यांना सोडा, येथे पर्यंत की यांची आपल्या त्या दिवसाशी भेट व्हावी ज्यात हे बेशुद्ध केले जातील.

**४६.** ज्या दिवशी त्यांना त्यांची चाल (खेळी) काहीच कामी येणार नाही आणि ना त्यांना मदत केली जाईल.

**४७.** निःसंशय, अत्याचारी लोकांकरिता याखेरीजही अन्य शिक्षा-यातना आहेत, परंतु त्या लोकांपैकी अधिकांश लोक हे जाणत नाहीत.

**४८.** तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या आदेशाच्या प्रतीक्षेत धीर - संयम राखा.

निःसंशय, तुम्ही आमच्या डोळ्यांसमोर आहात आणि सकाळी जेव्हा तुम्ही उठाल, आपल्या पालनकर्त्याची पवित्रतेसह प्रशंसा करा.

**४९.** आणि रात्री देखील त्याचे महिमागान करा आणि ताऱ्यांच्या अस्तास जाण्याच्या वेळीही.

---

## सूरह नज्म - ५३

सूरह नज्म मक्का येथे अवतरली, यात बासष्ठ आयती आणि तीन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** ताऱ्याची शपथ आहे, जेव्हा तो कोसळेल.

**२.** की तुमचा साथीदार ना वाट चुकलेला आहे, ना तो वाकड्या मार्गावर आहे.

**३.** आणि ना आपल्या मर्जीने तो काही बोलतो.

**४.** ती तर केवळ वहयी (आकाशवाणी) आहे, जी अवतरित केली जाते.

**५.** त्याला पूर्ण सामर्थ्यशाली फरिश्त्याने शिकविले आहे.

**६.** जो मोठा शक्तिशाली आहे, मग तो सरळ उभा राहिला.

**७.** आणि तो अति उच्च आकाशाच्या किनाऱ्या (क्षितिजा) वर होता.

**८.** मग जवळ आला आणि अवतरला.

**९.** तेव्हा तो दोन कमानीइतक्या अंतरावर राहिला, किंबहुना त्याहून कमी.

**१०.** मग त्याने अल्लाहच्या दासाला संदेश पोहचविला, जो काही पोहचविला.

**११.** हृदयाने खोटे म्हटले नाही, जे (पैगंबरा) ने पाहिले.

**१२.** काय तुम्ही त्या गोष्टीबद्दल वाद घालता, जे पैगंबर पाहतात.

**१३.** त्याला तर आणखी एका वेळी पाहिले होते.

**१४.** ‘सिदरतुल मुन्तहा’च्या जवळ.

**१५.** त्याच्याच निकट ‘जन्नतुल मावा’ आहे.

**१६.** जेव्हा सिदरला लपवून घेत होती, ती वस्तू, जी त्यावर आच्छादित होत होती.

**१७.** ना तर दृष्टी वळली, ना मर्यादेच्या पुढे गेली.

**१८.** निश्चितच त्याने आपल्या पालनकर्त्याच्या मोठमोठ्या निशाण्यांपैकी काही निशाण्या पाहिल्या होत्या.

**१९.** काय तुम्ही ‘लात’ आणि ‘उज्जा’ला पाहिले?

**२०.** आणि तिसऱ्या अंतिम ‘मनात’ला?[१]

**२१.** काय तुमच्यासाठी पुत्र आणि त्या (अल्लाह) साठी कन्या आहेत?

**२२.** ही तर मोठी अन्यायपूर्ण वाटणी आहे!

**२३.** वास्तविक ती केवळ नावे आहेत, जी तुम्ही आणि तुमच्या वाडवडिलांनी त्यांना ठेवली आहेत. अल्लाहने त्यांची कोणतीही सनद अवतरित केली नाही. हे लोक तर केवळ अटकळ (भ्रम) आणि आपल्या मनाच्या इच्छा आकांक्षांमागे लागले आहेत. आणि निःसंशय, त्यांच्या पालनकर्त्यातर्फे त्यांच्याजवळ मार्गदर्शन येऊन पोहोचले आहे.

**२४.** काय प्रत्येक मनुष्य जी कामना देखील करील ती त्याला साध्य होईल?

**२५.** अल्लाहकरिताच आहे हे विश्व आणि ती आखिरत.

**२६.** आणखी कितीतरी फरिश्ते आकाशांमध्ये आहेत, ज्यांची शिफारस काहीच उपयोगी पडू शकत नाही, मात्र ही गोष्ट वेगळी की अल्लाह आपल्या इच्छेने व आपल्या

---

(१) हे अनेकेश्वरवाद्यांची कानउघडणी करण्यासाठी म्हटले जात आहे की अल्लाह तर तो आहे, ज्याने जिब्रील (अलै.) सारखा महान फरिश्ता निर्माण केला. मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्यासारखे त्याचे पैगंबर आहेत, ज्यांना त्याने आकाशांवर बोलावून आपल्या मोठमोठ्या निशाण्याही दाखविल्या आणि त्यांच्यावर वहयी देखील अरतरित करतो. काय तुम्ही ज्या उपास्यांची भक्ती आराधना करता, त्यांच्यातही अशी आणि या स्वरूपाची गुणवैशिष्ट्ये आहेत?

खुशीने ज्याला इच्छिल आज्ञा (अनुमती) देईल.[१]

**२७.** नि:संशय, जे लोक आखिरतवर ईमान राखत नाही, ते फरिश्त्यांना स्त्रीरूपी देवतांची नावे देतात.

**२८.** वास्तविक त्यांना याचे काहीच ज्ञान नाही. ते केवळ आपल्या भ्रमाच्या मागे लागले आहेत आणि नि:संशय, भ्रम (आणि अनुमान) सत्यासमोर काहीच उपयोगी पडत नाही.

**२९.** तेव्हा तुम्ही त्याच्याकडून तोंड फिरवून घ्या, जो आमच्या स्मरणांपासून तोंड फिरविल आणि ज्यांचा उद्देश केवळ ऐहिक जीवनाखेरीज काही नसावा.

**३०.** हीच त्यांच्या ज्ञानाची सीमा आहे. तुमचा पालनकर्ता त्याला चांगल्या प्रकारे जाणतो, जो त्याच्या मार्गापासून विचलित झाला आहे आणि तोच चांगल्या प्रकारे जाणतो त्याला देखील, जो सन्मार्गावर आहे.

**३१.** आणि अल्लाहचेच आहे, जे काही आकाशांमध्ये आहे आणि जे काही धरतीत आहे, यासाठी की त्याने (अल्लाहने) दुष्कर्म करणाऱ्यांना त्यांच्या कर्मांचा मोबदला द्यावा आणि सत्कर्म करणाऱ्या लोकांना चांगला मोबदला द्यावा.

**३२.** जे लोक मोठमोठे अपराध आणि उघड निर्लज्जतेच्या कृत्यांपासून दूर राहतात, याखेरीज की काही लहान सहान अपराध त्यांच्याकडून घडतात, नि:संशय, (अशा लोकांसाठी) तुमच्या पालनकर्त्याची क्षमाशीलता अति विशाल आहे. तो तुम्हाला चांगल्या प्रकारे जाणतो, जेव्हा त्याने तुम्हाला जमिनीतून निर्माण केले आणि जेव्हा तुम्ही आपल्या मातांच्या गर्भात मूल (अर्भक) होते तेव्हा तुम्ही आपले पावित्र्य स्वतः सांगू नका. तोच नेक - सदाचारी लोकांना चांगल्या प्रकारे जाणतो.

**३३.** काय तुम्ही त्याला पाहिले, ज्याने तोंड फिरवून घेतले,

---

(१) अर्थात फरिश्ते, जी अल्लाहच्या निकटची सृष्टी (निर्मिती) आहे, त्यांना देखील शिफारस करण्याचा अधिकार फक्त त्याच लोकांसाठी असेल, ज्यांच्यासाठी अल्लाह पसंत करील. जेव्हा ही वस्तुस्थिती आहे, तेव्हा मग या दगडाच्या मूर्त्या कशा प्रकारे शिफारस करू शकतील, ज्याच्याशी तुम्ही आस बाळगून बसला आहात? तसेच अल्लाह अनेक ईश्वरांच्या उपासकांसाठी, एखाद्याला शिफारस करण्याचा अधिकार देईल तरी कसा? वस्तुतः शिर्क (अल्लाहसोबत इतरांनाही उपास्य ठरविणे) त्याच्या ठायी माफ होणार नाही. कारण हा गुन्हा अगदी अक्षम्य आहे.

**३४.** आणि फार कमी दिले आणि हात रोखला.

**३५.** काय त्याला परोक्ष ज्ञान आहे की तो (सर्व काही) पाहत आहे?

**३६.** काय त्याला त्या गोष्टीची खबर नाही दिली गेली, जी मूसा (अलै.) च्या ग्रंथात होती.

**३७.** आणि एकनिष्ठ इब्राहीम (अलै.) च्या ग्रंथात होती.

**३८.** की कोणताही मनुष्य दुसऱ्या कोणाचेही ओझे उचलणार नाही.

**३९.** आणि हे की प्रत्येक माणसाकरिता केवळ तेच आहे, ज्याचा त्याने स्वतः प्रयत्न केला.

**४०.** आणि हे की निःसंशय, त्याचा प्रयत्न लवकरच पाहिला जाईल.

**४१.** मग त्याला पुरेपूर मोबदला दिला जाईल.

**४२.** आणि हे की तुमच्या पालनकर्त्या (अल्लाह) कडेच पोहचायचे आहे.

**४३.** आणि हे की तोच हसवितो आणि तोच रडवितो.

**४४.** आणि हे की तोच मारतो आणि तोच जिवंत करतो.

**४५.** आणि हे की त्यानेच जोडा अर्थात नर - मादी निर्माण केला.

**४६.** वीर्यापासून जेव्हा तो टपकविला जातो.

**४७.** आणि हे की दुसऱ्यांदा जिवंत करणे त्याचीच जबाबदारी आहे.

**४८.** आणि हे की तोच धनवान बनवितो आणि धन देतो.

**४९.** आणि हे की तोच शेअरा (ताऱ्या) चा स्वामी व पालनकर्ता आहे.

**५०.** आणि हे की त्यानेच पहिल्या आदला नष्ट केले आहे,

**५१.** आणि समूदला देखील, (ज्यापैकी) एकालाही शिल्लक ठेवले नाही.

**५२.** आणि त्याच्यापूर्वी नूहच्या जनसमूहाला. निःसंशय, ते मोठे अत्याचारी आणि

उध्दट लोक होते.

**५३.** आणि 'मुतफिका' (शहर किंवा पालथ्या पडलेल्या वस्त्यांना) त्यानेच पालथे घातले.

**५४.** मग त्यांच्यावर आच्छादित केले, जे काही आच्छादित केले.

**५५.** तेव्हा हे मानवा! तू आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या कृपा देणगी (नेमत) बद्दल वाद करशील?

**५६.** हे (पैगंबर) खबरदार करणारे आहेत, पूर्वी होऊन गेलेल्या खबरदार करणाऱ्यांपैकी.

**५७.** येणारी वेळ (घटिका) जवळ येऊन ठेपली आहे.

**५८.** अल्लाहशिवाय तिला जाहीर करणारा अन्य कोणी नाही.

**५९.** तेव्हा काय तुम्ही या गोष्टीवर आश्चर्य करता?

**६०.** आणि हसत आहात, रडत नाही?

**६१.** (किंबहुना) तुम्ही खेळत आहात!

**६२.** आता अल्लाहसमोर सजदे करा (माथा टेका) आणि (त्याचीच) उपासना करा.

---

## सूरह क़मर - ५४

सूरह क़मर मक्का येथे अवतरली, यात पंचावन्न आयती आणि तीन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** कयामत जवळ आली आणि चंद्र दुभंगला.

**२.** हे जेव्हा एखादा मोजिजा (चमत्कार) पाहतात, तेव्हा तोंड फिरवितात, आणि म्हणतात ही तर पहिल्यापासून चालत आलेली जादू आहे.

**३.** आणि त्यांनी खोटे ठरविले व आपल्या इच्छा आकांक्षांचे अनुसरण केले. आणि

प्रत्येक कार्य निश्चित वेळेवरच निर्धारित आहे.

**४.** निःसंशय, त्याच्याजवळ त्या वार्ता येऊन पोहचल्या आहेत, ज्यात तंबी - ताकीदी (ची शिकवण) आहेत.

**५.** आणि पूर्ण बुद्धिकौशल्याची गोष्ट आहे, परंतु या भयभीत करणाऱ्या गोष्टींनीही काही लाभ दिला नाही.

**६.** (तेव्हा, हे पैगंबर!) तुम्ही त्यांच्याकडून तोंड फिरवा, ज्या दिवशी एक पुकारणारा अप्रिय गोष्टीकडे बोलाविल.

**७.** हे झुकलेल्या नेत्रांनी कबरीमधून अशा प्रकारे उठून उभे राहतील की जणू इतस्ततः पसरलेला टोळ थवा.

**८.** पुकारणाऱ्याकडे धावत जात असतील आणि काफिर म्हणतील की हा दिवस तर मोठा कठीण आहे!

**९.** त्यांच्यापूर्वी नूहच्या जनसमूहानेही आमच्या दासाला खोटे ठरविले होते. आणि वेडा दर्शवून झिडकारले होते.

**१०.** तेव्हा त्याने आपल्या पालनकर्त्याजवळ दुआ (प्रार्थना) केली की मी तावडीत सापडलेलो आहे. तू माझी मदत कर.

**११.** तेव्हा आम्ही आकाशाचे दरवाजे मुसळधार पावसाने उघडले.

**१२.** आणि जमिनीतून झरे प्रवाहित केले, तेव्हा त्या कार्यासाठी जे भाग्यात लिहिले गेले होते, (दोघेही) पाणी एकत्रित झाले.

**१३.** आणि आम्ही त्याला अशा नौकेत चढविले, जी तक्ते आणि मेखा असलेली होती.

**१४.** जी आमच्या डोळ्यांसमोर चालत होती. हा मोबदला त्याच्यातर्फे, ज्याचा इन्कार केला गेला होता.

**१५.** आणि निःसंशय, आम्ही या घटनेला निशाणी बनवून बाकी राखले तेव्हा आहे कोणी बोध ग्रहण करणारा?

**१६.** तेव्हा (सांगा) कसा होता माझा प्रकोप आणि माझी भयपूर्ण तंबी.

**१७.** आणि नि:संशय, आम्ही कुरआनाला समजण्याकरिता सोपे केले आहे[१] तेव्हा आहे कोणी बोध ग्रहण करणारा?

**१८.** आदच्या जनसमूहानेही खोटे ठरविले तेव्हा कसा होता माझा अज़ाब आणि माझी भयपूर्ण तंबी.

**१९.** आम्ही त्यांच्यावर सतत वेगाने वाहणारी हवा (वादळी वारा) एका सततच्या अशुभ दिवशी पाठविली.

**२०.** जी लोकांना उचलून आपटत होती, जणू मुळासकट उखडलेले खजुरीचे वृक्ष आहेत.

**२१.** तेव्हा कसा होता माझा प्रकोप आणि माझे भयभीत करणे.

**२२.** आणि नि:संशय, आम्ही कुरआनानला बोधप्राप्तीकरिता सोपे केले आहे तेव्हा आहे कोणी बोध ग्रहण करणारा?

**२३.** समूदच्या जनसमूहाने (ही) खबरदार करणाऱ्यांना खोटे ठरविले.

**२४.** आणि म्हणाले की, काय आमच्यापैकीच एका माणसाचे आम्ही अनुसरण करू लागावे? मग तर आम्ही अवश्य वाईटपणात आणि वेडेपणात पडलेले असू.

**२५.** काय आम्हा सर्वांमधून फक्त त्याच्यावरच वहयी (प्रकाशना) अवतरित केली गेली? तेव्हा तो खोटारडा, घमेंडी आहे.

---

(१) अर्थात त्याचा अर्थ व आशय समजणे त्यापासून बोध प्राप्त करणे आणि त्यास मुखोद्गत (तोंडी पाठ) करणे आम्ही सहज सुलभ केले आहे. वस्तुस्थिती अशी की पवित्र कुरआन आपल्या चमत्कार (मोजिजे) प्रभाव आणि भाषाशैलीच्या आधारे सर्वांत उच्चप्रतीचा ग्रंथ असतानाही एखादा मनुष्य थोडेसेही लक्ष देईल तर अरबी व्याकरण आणि भाषाशैलीच्या ग्रंथआंचे अध्ययन केल्याविनाही त्यास सहजपणे समजून घेईल. तद्वतच जगातील हा एकमेव असा ग्रंथ आहे, ज्याचा एकेक शब्द तोंडी पाठ केला जातो अन्यथा लहानसहान पुस्तकही अशा प्रकारे कंठस्थ करणे व ते स्मरणात राखणे मोठे कठीण आहे. जर मनुष्य आपल्या मन-मस्तष्काचे दरवाजे उघडून, त्याचे बोधप्राप्तीच्या नेत्रांनी पठण करील, बोधप्राप्तीसाठी ऐकेल आणि समजून घेणाऱ्या हृदयाने त्यावर विचार चिंतन करील तर लोक परलोक (हे जग आणि आखिरत) च्या सद्भाग्याचे दरवाजे त्याच्यावर उघडतील आणि हा ग्रंथ त्याच्या मनात खूप खोलवर जाऊन कुफ्र आणि दुष्कर्मांची सर्व घाण दूर करतो.

**२६.** आता सर्व जाणून घेतील की उद्या कोण खोटारडा व घमेंडी होता.

**२७.** निःसंशय, आम्ही त्यांच्या कसोटीकरिता सांडणी पाठवू तेव्हा (हे स्वालेह!) तुम्ही त्यांची प्रतीक्षा करा आणि धीर संयम राखा.

**२८.** आणि त्यांना खबर द्या की पाण्याची त्याच्यात वाटणी आहे. प्रत्येक आपल्या पाळीवर हजर होईल.

**२९.** तेव्हा त्यांनी आपल्या साथीदाराला बोलविले, ज्याने (सांडणीवर) हल्ला केला आणि (तिच्या) घोडनसा कापून टाकल्या.

**३०.** तेव्हा कसा होता माझा अज़ाब आणि माझे भयभीत करणे.

**३१.** आम्ही त्यांच्यावर एक भयंकर चित्कार पाठविला तेव्हा ते असे झाले, जणू कुंपण बनविणाऱ्याची तुडविलेली घास (चारा).

**३२.** आणि आम्ही बोधप्राप्तीकरिता कुरआनाला सोपे केले आहे तेव्हा आहे कोणी बोध ग्रहण करणारा?

**३३.** लूतच्या जनसमूहाने देखील खबरदार करणाऱ्यांना खोटे ठरविले.

**३४.** निःसंशय, आम्ही त्यांच्यावर दगडांचा वर्षाव करणारी हवा पठविली, लूत (अलै.) यांच्या कुटुंबियांखेरीज, त्यांना प्रातःकाळी आम्ही सुरक्षा (मुक्ती) प्रदान केली.

**३५.** आपल्या कृपेने प्रत्येक कृतज्ञशील (दासा) ला आम्ही अशा प्रकारे मोबदला देतो.

**३६.** निःसंशय, त्या (लूत) ने त्यांना आमच्या पकडीचे भय दाखविले होते, परंतु त्यांनी भय दाखविणाऱ्यांबाबत शंका धरून वाद घातला.

**३७.** आणि लूत (अलै.) यांना त्यांच्या अतिथींच्या संदर्भात फूस लावू इच्छिले तेव्हा आम्ही त्यांचे डोळे आंधळे केले (आणि सांगितले), माझ्या शिक्षा - यातनेची व भयपूर्ण तंबीची गोडी चाखा.

**३८.** आणि निश्चित आहे की त्यांना सकाळीच एका ठिकाणी धरणाऱ्या निर्धारित अज़ाब (ईशशिक्षे) ने नष्ट करून टाकले.

**३९.** तेव्हा माझ्या प्रकोपाचा आणि माझ्या तंबीचा स्वाद चाखा.

**४०.** आणि निःसंशय, आम्ही कुरआनाला बोध आणि उपदेशाकरिता सोपे केले आहे. तेव्हा आहे कोणी बोध ग्रहण करणारा?

**४१.** आणि फिरऔनच्या लोकांजवळही खबरदार करणारे आले.

**४२.** त्यांनी आमच्या सर्व निशाण्यांना खोटे ठरविले तेव्हा आम्ही त्यांना मोठ्या जबरदस्त आणि शक्तिशाली पकडणाऱ्याप्रमाणे पकडले.

**४३.** (हे मक्काच्या लोकांनो!) काय तुमच्या समुदायातील काफिर त्या समुदायांच्या काफिरांपेक्षा श्रेष्ठ आहेत की तुमच्यासाठी पूर्वीच्या ग्रंथांमध्ये सुटका लिहिलेली आहे?

**४४.** काय हे असे म्हणतात की आम्ही वर्चस्वशाली होणारे लोक आहोत?

**४५.** लवकरच हा समूह पराभूत केला जाईल आणि पाठ दाखवून पळ काढील.

**४६.** किंबहुना कयामतची वेळ, त्यांच्या वायद्याची वेळ आहे आणि कयामत अतिशय कठीण आणि मोठी कटू बाब आहे.

**४७.** निःसंशय, अपराधी लोक मार्गभ्रष्टतेत आणि यातनेत आहेत.

**४८.** ज्या दिवशी ते तोंडघशी पाडून आगीत फरफटत नेले जातील (आणि त्यांना सांगितले जाईल) जहन्नमच्या आगीच्या स्पर्शाची गोडी चाखा.

**४९.** निःसंशय, आम्ही प्रत्येक गोष्ट एका (निर्धारित) अनुमानावर निर्माण केली आहे.

**५०.** आणि आमचा आदेश केवळ एकदा (चा एक शब्द) च असतो, जसे पापणीचे लवणे.

**५१.** आणि आम्ही तुमच्यासारख्या कित्येकांना नष्ट करून टाकले आहे, तेव्हा आहे कोणी बोध ग्रहण करणारा?

**५२.** आणि जे जे (कर्म) त्यांनी केले आहे ते सर्व कर्मपत्रात लिहिलेले आहे.

**५३.** (अशा प्रकारे) प्रत्येक लहान मोठी गोष्ट लिहिलेली आहे.

**५४.** निःसंशय, अल्लाहचे भय राखणारे लोक जन्नत आणि प्रवाहांमध्ये असतील.

**५५.** सचोटी व प्रतिष्ठेच्या स्थानी सामर्थ्यशाली मालका (अल्लाह) जवळ.

# सूरह रहमान - ५५

सूरह रहमान मदीना येथे अवतरली, यात अठ्ठ्याहत्तर आयती आणि तीन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** दयावान (रहमान) ने.

**२.** कुरआन शिकविले.

**३.** त्यानेच मानवाला निर्माण केले.

**४.** त्याला बोलणे शिकविले.

**५.** सूर्य आणि चंद्र (निर्धारित) हिशोबाचे पालन करतात.

**६.** आणि तारे व वृक्ष दोघे सजदा करतात.

**७.** त्यानेच आकाशाला उंच केले आणि त्यानेच तुला (तराजू) राखली.

**८.** यासाठी की तुम्ही तोलण्यात मर्यादेचे उल्लंघन न करावे.

**९.** आणि न्यायासह तोल उचित राखा आणि तोलण्यात कमी देऊ नका.

**१०.** आणि त्यानेच सृष्टीकरिता जमिनीला बिछविले.

**११.** जिच्यात मेवे आहेत आणि गुच्छांच्या खजुरीचे वृक्ष आहेत.

**१२.** आणि भूसेदार धान्य आहे आणि सुगंधित फुले आहेत.

**१३.** तेव्हा (हे जिन्नांनो आणि मानवांनो!) तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल?

**१४.** त्याने मानवाला खणखणणाऱ्या मातीपासून निर्माण केले, जी ठिकरीसारखी होती.

**१५.** आणि जिन्नांना अग्निशिखेपासून निर्माण केले.

**१६.** तेव्हा (हे जिन्नांनो आणि मानवांनो!) तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल?

**१७.** तो दोन्ही पूर्वांचा आणि दोन्ही पश्चिमांचा स्वामी आहे.

**१८.** तेव्हा (हे जिन्नांनो आणि मानवांनो!) तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल?

**१९.** त्याने दोन समुद्र प्रवाहित केले जे एकमेकास मिळतात.

**२०.** त्या दोघांच्या दरम्यान एक आड (पडदा) आहे की त्यापुढे जाऊ शकत नाहीत.

**२१.** तेव्हा (हे जिन्नांनो आणि मानवांनो!) तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल?

**२२.** त्या दोघांमधून मोती आणि प्रवाळ निघतात.

**२३.** तेव्हा (हे जिन्नांनो आणि मानवांनो!) तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल?

**२४.** आणि अल्लाहच्याच (अधिकारकक्षेत) आहेत ती जहाजे, जी समुद्रात पर्वतांसारखी उंच (उभी) चालत आहेत.

**२५.** तेव्हा (हे जिन्नांनो आणि मानवांनो!) तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल?

**२६.** जमिनीवर जे काही आहे ते सर्व नाश पावणारे आहे.

**२७.** केवळ तुमच्या पालनकर्त्याचे मुख (अस्तित्व), जो मोठा महान आणि प्रतिष्ठा बाळगणारा आहे, बाकी राहील.

**२८.** तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल?

**२९.** आकाशांमध्ये व जमिनीवर जे जे आहेत सर्व त्याच्याचकडे याचना करतात, प्रत्येक दिवस तो एका कार्यात आहे.[१]

---

(१) प्रत्येक दिवसाशी अभिप्रेत क्षण. मूळ शब्द ‘शान’ याचा अर्थ काम आणि विषय अर्थात प्रत्येक क्षणी तो काही ना काही करत असतो. कोणाला रोगी बनवितो तर कोणाला स्वस्थ, कोणाला श्रीमंत बनवितो तर कोणा श्रीमंताला गरीब, कोणाला रंक (भिकारी) चा राजा तर कोणा राजाला रंक, कोणाला उच्च पदावर बसवितो तर कोणाला खालच्या पदावर आणतो, कोणाला शून्यातून निर्माण

**३०.** तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल?

**३१.** (हे जिन्न आणि मानवांच्या समूहांनो!) लवकरच आम्ही तुमच्याकडे पूर्णतः लक्ष केंद्रित करू.

**३२.** तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल?

**३३.** (हे जिन्न आणि मनावांच्या समूहांनो!) जर तुमच्यात आकाशांच्या आणि धरतीच्या किनाऱ्या (सीमा) बाहेर निघण्याचे सामर्थ्य आहे, तर निघून जा (तथापि) वर्चस्व आणि सामर्थ्याविना तुम्ही निघू शकत नाही.

**३४.** तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल?

**३५.** तुमच्यावर आगीचे निखारे आणि धूर सोडला जाईल, मग तुम्ही सामना करू शकणार नाहीत.

**३६.** तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल?

**३७.** मग जेव्हा आकाश विदीर्ण होऊन लाल होईल, जणू लाल चामडे असावे.

**३८.** तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल?

**३९.** त्या दिवशी कोणत्याही मानवाला आणि कोणत्याही जिन्नाला त्याच्या अपराधांविषयी विचारणा केली जाणार नाही.

**४०.** तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल?

**४१.** अपराधी लोक केवळ आपल्या चेहऱ्या-मोहऱ्यावरूनच ओळखले जातील आणि त्यांच्या कपाळाचे केस व पाय धरले जातील.

**४२.** तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल?

**४३.** हीच ती जहन्नम आहे, जिला अपराधी खोटे मानत होते.

---

करतो तर कोणाला अस्तित्वहीन करतो वगैरे. थोडक्यात सांगायचे तर विश्वात नित्य घडून येणारे सर्व स्थित्यंतर आणि परिवर्तन त्याच्या मर्जीने व आदेशाने होत आहे आणि रात्र व दिवसाचा असा एकही क्षण नाही जो त्याच्या या शान (वैभवा) विरहित असावा.

**४४.** तिच्या गरम उकळत्या पाण्याच्या दरम्यान फेर खातील.

**४५.** तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल?

**४६.** आणि त्या माणसाकरिता, जो आपल्या पालनकर्त्यासमोर उभे राहण्यास घाबरला , दोन जन्नत आहेत.

**४७.** तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल?

**४८.** दोन्हीही जन्नती अनेक शाखा असलेल्या आहेत.

**४९.** तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल?

**५०.** त्या दोन्ही जन्नतींमध्ये दोन वाहते झरे आहेत.

**५१.** तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल?

**५२.** त्या दोन्हीं (जन्नतीं) मध्ये प्रत्येक मेव्याचे दोन प्रकार असतील.

**५३.** तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल?

**५४.** जन्नतमध्ये राहणारे अशा बिछायतींवर तक्के लावून बसतील, ज्यांचे अस्तर जाड रेशमाचे असेल आणि त्या दोन्ही जन्नतींची फळे (मेवे) खूप जवळ असतील.

**५५.** तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल?

**५६.** तिथे (लाजाळू) खाली नजर ठेवणाऱ्या हूर (पऱ्या) आहेत, ज्यांना त्यांच्यापूर्वी कोणत्याही जिन्न आणि मानवाने हात लावला नसेल.

**५७.** तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल?

**५८.** त्या (हूर-पऱ्या) माणिक (याकूत) आणि प्रवाळासारख्या असतील.

**५९.** तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल?

**६०.** भलेपणाचा मोबदला, भलेपणाशिवाय दुसरा काय आहे.

**६१.** तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल?

**६२.** आणि त्याच्याखेरीज दोन जन्नती आणखी आहेत.

**६३.** तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल ?

**६४.** दोन्ही गाढहिरव्या रंगाच्या.

**६५.** तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल ?

**६६.** त्यांच्यात दोन (वेगाने) उचंबळणारे झरे आहेत.

**६७.** तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल ?

**६८.** त्या दोघांमध्ये मेवे आणखी खजुरी व डाळींब असतील.

**६९.** तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल ?

**७०.** त्यांच्यात सत्शील चारित्र्यवान सुंदर स्त्रिया आहेत.

**७१.** तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल ?

**७२.** (गौरवर्णीय) हूर (पऱ्या) जन्नतच्या खेम्यांमध्ये राहणाऱ्या आहेत.

**७३.** तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल ?

**७४.** त्यां (हूर - पऱ्या) ना कोणत्याही मानव आणि जिन्नाने यापूर्वी हात लावला नाही (स्पर्शही केला नाही).

**७५.** तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल ?

**७६.** हिरव्या गाद्या आणि सुंदर बिछान्यांवर तक्के लावून बसले असतील.

**७७.** तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कोणकोणत्या उपकारांना खोटे ठरवाल ?

**७८.** मोठे शुभ (आणि समृद्धशाली) आहे तुमच्या पालनकर्त्याचे नाव, जो मोठा प्रतापशाली आणि मोठा प्रतिष्ठासंपन्न आहे.

---

# सूरह वाकिअः - ५६

सूरह वाकिअः मक्का येथे अवतरली, यात शहाण्णव आयती आणि तीन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** जेव्हा कयामत प्रस्थापित होईल.

**२.** जिचे घडून येण्यात काहीच असत्य नाही.

**३.** ती वर-खाली करणारी असेल.

**४.** जेव्हा जमीन भूकंपासह हालवून टाकली जाईल.

**५.** आणि पर्वत अगदी कण - कण केले जातील.

**६.** मग ते विखुरलेल्या धुळीसारखे होतील.

**७.** आणि तुम्ही तीन गटात विभागले जाल.

**८.** तेव्हा उजव्या हाताचे, किती चांगले आहेत उजव्या हाताचे!

**९.** आणि डाव्या हाताचे, काय अवस्था आहे डाव्या हाताच्या लोकांची!

**१०.** आणि जे पुढे जाणारे आहेत, ते तर आहेतच पुढे जाणारे.

**११.** ते अगदी सान्निध्य प्राप्त केलेले आहेत.

**१२.** सुख-विलासाच्या जन्नतींमध्ये आहेत.

**१३.** (फार मोठा) समूह तर पूर्वी होऊन गेलेल्यांपैकी असेल.

**१४.** आणि थोडेसे नंतरच्या लोकांपैकी.

**१५.** (हे लोक) सोन्याच्या तारांनी विणलेल्या आसनांवर.

**१६.** एकमेकांसमोर तक्के लावून बसले असतील.

**१७.** त्यांच्याजवळ अशी मुले, जी नेहमी (मुलेच) राहतील, ये-जा करतील.

**१८.** प्याले आणि सुरई घेऊन आणि मद्याचा प्याला घेऊन, जो मद्याने भरून वाहत

असेल.

**१९.** ज्यामुळे ना डोके गरगरु लागेल आणि ना बुद्धी भ्रष्ट होईल.

**२०.** आणि असे मेवे घेऊन, जे ते पसंत करतील.

**२१.** आणि पक्ष्यांचे मांस, जे त्यांना (फार) आवडेल.

**२२.** आणि मोठमोठ्या डोळ्यांच्या (मृगनयनी) हूर (पऱ्या)

**२३.** ज्या लपलेल्या मोत्यांसारख्या आहेत.

**२४.** हा मोबदला आहे त्याच्या कर्मांचा

**२५.** तिथे ना ते निरर्थक गोष्ट ऐकतील आणि ना अपराधाची गोष्ट

**२६.** केवळ सलामच सलाम (शांती सलामती) चा आवाज असेल.

**२७.** आणि उजव्या हाताचे किती चांगले आहेत उजव्या हाताचे!

**२८.** ती काटे नसलेली बोरे,

**२९.** आणि थरांवर थर केळी,

**३०.** आणि लांब लांब सावल्या,

**३१.** आणि वाहते पाणी,

**३२.** आणि खूप जास्त फळांमध्ये,

**३३.** जे ना संपतील, ना रोखले जातील,

**३४.** आणि उंच उंच बिछायतीवर असतील.

**३५.** आम्ही त्या (च्या पत्नीं) ना खास प्रकारे बनविले आहे.

**३६.** आणि आम्ही त्यांना कुमारिका बनविले आहे.

**३७.** प्रेम करणाऱ्या, समवयस्क आहेत.

**३८.** उजव्या हाताच्या लोकांकरिता आहे.

**३९.** (फार) मोठा समूह आहे पूर्वीच्या लोकांपैकी

**४०.** आणि (फार) मोठा समूह आहे नंतरच्या लोकांपैकी.

**४१.** आणि डाव्या हाताचे, कसे आहेत डाव्या हाताचे.

**४२.** उष्ण हवा आणि गरम (उकळत्या) पाण्यात असतील

**४३.** आणि काळ्याकुट्ट धुराच्या सावलीत

**४४.** जी ना थंड आहेत ना सुखदायक

**४५.** निःसंशय हे लोक यापूर्वी फार सुख-संपन्न अवस्थेत वाढले होते.

**४६.** आणि घोर अपराधांवर आग्रह करीत होते.

**४७.** आणि म्हणत की काय जेव्हा आम्ही मरण पावू आणि माती व हाडे होऊन जावू तर काय आम्ही दुसऱ्यांदा जिवंत करून उभे केले जावू?

**४८.** आणि काय आमचे वाडवडील देखील?

**४९.** (तुम्ही) सांगा की निःसंशय, सर्व पूर्वीचे आणि नंतरचे

**५०.** एका निर्धारित दिवसाच्या वेळी अवश्य एकत्र केले जातील

**५१.** मग तुम्ही हे मार्गभ्रष्ट झालेल्यांनो, खोटे ठरविणाऱ्यांनो!

**५२.** जक्कूमचे झाड जरूर खाल

**५३.** आणि त्याच्यानेच पोट भराल

**५४.** मग त्यावर गरम उकळते पाणी प्याल

**५५.** मग पिणारेही तहानलेल्या उंटांसारखे

**५६.** कयामतच्या दिवशी त्यांचा हाच पाहुणचार आहे

**५७.** आम्ही तुम्हा सर्वांना निर्माण केले, मग तुम्ही का नाही मानत?

**५८.** बरे हे तर सांगा की जे वीर्य तुम्ही टपकविता,

**५९.** काय त्यापासून (मानव) तुम्ही बनवितात की आम्ही निर्माण करतो?

**६०.** आम्हीच तुमच्या दरम्यान मृत्युला भाग्य (निश्चित) केले आहे, आणि आम्ही त्यापासून हरलेलो नाही.

**६१.** की तुमच्या जागी तुमच्यासारखे दुसरे निर्माण करावेत, आणि तुम्हाला नव्या रुपात (या जगात) निर्माण करावे, जे तुम्ही जाणत नाहीत.

**६२.** आणि तुम्हाला पहिल्या निर्मितीचे ज्ञानही आहे, तरीही तुम्ही बोध का नाही प्राप्त करीत?

**६३.** बरे, मग हेही सांगा की तुम्ही जे काही पेरता,

**६४.** त्याला तुम्ही उगविता की आम्ही त्यास उगविणारे आहोत?

**६५.** आम्ही इच्छिले तर त्याचा चुराडा (कण कण) करून टाकू आणि तुम्ही आश्चर्याने बोलतच राहावे!

**६६.** की आमच्यावर तर भुर्दंड पडला!

**६७.** किंबहुना आम्ही तर पूर्णपणे वंचित राहिलो.

**६८.** बरे तर हे सागा की जे पाणी तुम्ही पीता

**६९.** त्यास ढगांमधून तुम्ही अवतरित केले आहे की आम्ही पाऊस पाडतो?

**७०.** आम्ही इच्छिले तर त्या (पाण्या) स कडू (जहर) करून टाकू, मग तुम्ही आमच्याशी कृतज्ञता का नाही व्यक्त करीत?

**७१.** बरे हेही सांगा की जी आग तुम्ही पेटविता

**७२.** तिचे झाड तुम्ही निर्माण केले आहे की आम्ही त्याचे निर्माणकर्ते आहोत?

**७३.** आम्ही तिला बोध प्राप्त करण्याचे साधन आणि प्रवाशांच्या फायद्याची गोष्ट बनविले आहे.

**७४.** तेव्हा आपल्या महान पालनकर्त्याच्या नावाचे गुणगान करा.

**७५.** तर मी शपथ घेतो ताऱ्यांच्या कोसळण्याची

**७६.** आणि जर तुम्हाला ज्ञान असेल तर ही फार मोठी शपथ आहे.

**७७.** की निःसंशय हा कुरआन मोठा प्रतिष्ठासंपन्न आहे.

**७८.** जो एका सुरक्षित ग्रंथात (लिहिलेला) आहे.

**७९.** ज्याला केवळ स्वच्छ शुद्ध (पाक) लोकच स्पर्श करू शकतात.

**८०.** हा सर्व विश्वांच्या पालनकर्त्यातर्फे अवतरित केला गेला आहे.

**८१.** तर काय तुम्ही अशा गोष्टीला साधारण (आणि तुच्छ) समजता?

**८२.** आणि आपल्या वाट्याला हेच घेता की यास खोटे ठरवित फिरावे?

**८३.** तर जेव्हा (प्राण) कंठाशी येऊन पोहचावा

**८४.** आणि तुम्ही त्या वेळी (डोळ्यांनी) पाहात राहावे.

**८५.** आणि आम्ही तुमच्या तुलनेत त्या माणसाच्या अधिक जवळ असतो, परंतु तुम्ही पाहू शकत नाही.

**८६.** तेव्हा जर तुम्ही एखाद्याच्या आज्ञेच्या अधीन नाहीत

**८७.** आणि त्या कथनात सच्चे असाल तर तो प्राण परतवून दाखवा.

**८८.** तर जो कोणी (अल्लाहच्या दरबारात) निकटतम असेल

**८९.** त्याच्यासाठी ऐषआराम आहे (उत्तम भोजन आहे आणि देणग्यांनी युक्त अशी जन्नत आहे.

**९०.** आणि जो मनुष्य उजव्या हाताच्या लोकांपैकी आहे

**९१.** तरीही सलाम (शांती सलामती) आहे तुझ्यासाठी की तू उजव्या हाताच्या लोकांपैकी आहेस.

**९२.** परंतु जर कोणी खोटे ठरविणाऱ्या मार्गभ्रष्ट लोकांपैकी आहे

**९३.** तर उकळत्या पाण्याने त्याचा पाहुणचार आहे

**९४.** आणि जहन्नममध्ये जायचे आहे.

**१५.** ही (वार्ता) अगदी सत्य आणि निश्चित आहे.

**१६.** तेव्हा तुम्ही आपल्या (अतिमहान) पालनकर्त्याच्या नावाचे पावित्र्य वर्णन करा.

---

# सूरह हदीद - ५७

सूरह हदीद मदीना येथे अवतरली आणि यात एकोणतीस आयती व चार रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** आकाशांमध्ये आणि धरतीत जे काही आहे (ते सर्व) अल्लाहचे महिमागान करीत आहेत आणि तो मोठा वर्चस्वशाली, हिकमतशाली आहे.

**२.** आकाशांचे आणि धरतीचे (समस्त) राज्य त्याचेच आहे, तोच जीवन देतो आणि मृत्युही आणि तो प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्य राखतो.

**३.** तोच आद्य आणि तोच अंतिम आहे, तोच उघड आणि तोच लपलेला आहे आणि तो प्रत्येक गोष्ट चांगल्या प्रकारे जाणणारा आहे.[१]

**४.** तोच आहे ज्याने आकाशांना व जमिनीला सहा दिवसांत निर्माण केले, मग अर्श (सिंहासना) वर उंचावला तो चांगल्या प्रकारे जाणतो त्या गोष्टीला, जी जमिनीत जाते आणि जी तिच्यातून निघते, आणि जी आकाशातून खाली येते आणि जी चढून आकाशात जाते आणि तुम्ही कोठेही ्सा, तो तुमच्यासोबत आहे आणि तुम्ही जे काही करीत आहात, अल्लाह ते पाहात आहे.

**५.** आकाशांची व धरतीची राज्यसत्ता त्याचीच आहे आणि समस्त कार्य त्याच्याचकडे परतविली जातात.

**६.** तोच रात्रीला दिवसात दाखल करतो आणि तोच दिवसाला रात्रीत दाखल करतो

---

(१) तोच प्रथम म्हणजे त्याच्या आधी काहीच नव्हते. तोच अंतिम म्हणजे त्याच्या नंतर काहीच नसेल, तोच उघड म्हणजे तो सर्वांवर वर्चस्वशाली आहे. त्याच्यावर कोणी वर्चस्व राखू शकत नाही, तोच गुप्त म्हणजे लपलेल्या सर्व गोष्टी तो चांगल्या प्रकारे जाणतो, ज्या लोकांच्या नजरेपासून आणि त्यांच्या बुद्धीपासून लपलेल्या आहेत. (फतहुल कदीर)

आणि छाती (मना) मध्ये लपलेल्या गोष्टींचे तो पूर्ण ज्ञान राखणारा आहे.

**७.** अल्लाहवर आणि त्याच्या पैगंबरावर ईमान राखा आणि धनातून खर्च करा ज्यात अल्लाहने तुम्हाला (इतरांचा) वारस बनविले आहे तेव्हा तुमच्यापैकी जो कोणी ईमान राखेल आणि खर्च करेल तर अशांना फार मोठे पुण्य लाभेल.

**८.** तुम्ही अल्लाहवर ईमान का नाही राखत? वास्तविक पैगंबर स्वतः तुम्हाला आपल्या पालनकर्त्यावर ईमान राखण्याचे आवाहन करीत आहे आणि जर तुम्ही ईमान राखणारे असाल तर त्याने तुमच्याकडून दृढवचन घेतले आहे.

**९.** तो (अल्लाह) च आहे, जो आपल्या दासावर स्पष्ट आयती अवतरित करतो, यासाठी की त्याने तुम्हाला अंधाराकडून उजेडाकडे न्यावे. निःसंशय अल्लाह तुमच्यावर स्नेह, दया करणारा आहे.

**१०.** आणि तुम्हाला झाले तरी काय की तुम्ही अल्लाहच्या मार्गात खर्च नाही करीत? वास्तविक आकाशांच्या आणि धरतीच्या समस्त वस्तूंचा स्वामी (एकटा) अल्लाहच आहे. तुमच्यापैकी ज्या लोकांनी विजयापूर्वी अल्लाहच्या मार्गात दिले आहे आणि धर्मयुद्ध (जिहाद) केले आहे ते दुसऱ्यांच्या समान नाहीत किंबहुना त्यांच्यापेक्षा उच्च पदाचे आहेत, ज्यांनी विजय प्राप्तीनंतर दान दिले आणि जिहाद केले. होय भलाईचा वायदा तर अल्लाहचा त्या सर्वांशी आहे आणि जे काही तुम्ही करीत आहात, अल्लाह ते जाणतो.

**११.** असा कोण आहे, जो अल्लाहला चांगल्या प्रकारे कर्ज देईल, मग अल्लाह त्याच्यासाठी ते वाढवित जाईल आणि त्याचा चांगला मोबदला ठरावा.

**१२.** (कयामतच्या) दिवशी तुम्ही पाहाल की ईमान राखणाऱ्या पुरुषांचे आणि स्त्रियांचे तेज (नूर) त्यांच्या पुढे पुढे आणि त्यांच्या उजवीकडे धावत असेल. आज तुम्हाला त्या जन्नतींचा शुभ समाचार आहे, ज्यांच्या खाली (थंड पाण्याचे) प्रवाह वाहत आहेत, ज्यात ते नेहमी राहतील, हीच मोठी सफलता आहे.

**१३.** त्या दिवशी दांभिक (मूनाफिक) पुरुष आणि दांभिक स्त्रिया ईमानधारकांना म्हणतील की आमची प्रतीक्षा तर करा की आम्हीही तुमच्या प्रकाशामधून थोडा प्रकाश घ्यावा, उत्तर दिले जाईल की तुम्ही मागे फिरा आणि प्रकाश शोधा, मग त्यांच्या आणि

यांच्या दरम्यान एक भिंत उभी केली जाईल, जिच्यात दरवाजाही असेल, त्याच्या आतल्या भागात रहमत (अल्लाहची कृपा) असेल आणि बाहेरच्या भागात अज़ाब (शिक्षा - यातना) असेल.

**१४.** हे ओरडून ओरडून त्यांना सांगतील की काय आम्ही तुमच्यासोबत नव्हतो? ते म्हणतील, हो, होते जरूर, परंतु तुम्ही स्वतःला मार्गभ्रष्टतेत ठेवले होते. आणि प्रतीक्षा करीत राहिले आणि शंका - संशय करीत राहिले आणि तुम्हाला तुमच्या (निरर्थक) इच्छा आकांक्षांनी धोक्यातच ठेवले येथेपर्यंत की अल्लाहचा आदेश येऊन पोहोचला आणि तुम्हाला अल्लाहच्या बाबतीत धोका देणाऱ्याने धोक्यातच ठेवले.

**१५.** तेव्हा आज ना तुमच्याकडून फिदिया (आणि न बदला) स्वीकारला जाईल आणि ना काफिरांकडून. तुम्हा सर्वांचे ठिकाण जहन्नम आहे. तीच तुमची सोबती आहे आणि ते मोठे वाईट ठिकाण आहे.

**१६.** काय अजूनपर्यंत ईमान राखणाऱ्यांकरिता ती वेळ नाही आली की त्यांची हृदये अल्लाहच्या स्मरणाने आणि जे सत्य अवतरित झाले आहे त्याने कोमल व्हावीत, आणि त्या लोकांसारखी न व्हावीत, ज्यांना यांच्या पूर्वी ग्रंथ प्रदान केला गेला, मग जेव्हा त्यांच्यावर एक दीर्घ मुदत लोटली, तेव्हा त्यांची हृदये कठोर झालीत आणि त्यांच्यापैकी अधिकांश दुराचारी आहेत.

**१७.** विश्वास राखा की अल्लाहच धरतीला तिच्या मृत्युनंतर जिवंत करतो. आम्ही तर तुमच्यासाठी आपल्या निशाण्या स्पष्ट सांगितल्या, यासाठी की तुम्ही समजून घ्यावे.

**१८.** निःसंशय, दान देणारे पुरुष आणि स्त्रिया आणि जे अल्लाहला प्रेमाने चांगले कर्ज देत आहेत त्यांच्यासाठी अनेक पटींनी वाढविले जाईल, आणि त्यांच्यासाठी उत्तम असा मोबदला आहे.

**१९.** अल्लाह आणि त्याच्या पैगंबरावर जे लोक ईमान राखतात तेच आपल्या पालनकर्त्याजवळ सच्चे आणि शहीद आहेत. त्यांच्यासाठी त्यांचा मोबदला आणि त्यांचे दिव्य तेज आहे, आणि जे कुफ्र (इन्कार) करतात आणि आमच्या निशाण्यांना खोटे ठरवितात ते जहन्नमी आहेत.

**२०.** लक्षात ठेवा की या जगाचे जीवन तर केवळ खेळ तमाशा आणि शोभा सजावट

आणि आपसात अभिमान (आणि अहंकार) आणि धन व संततीत एकमेकाहून स्वतःला जास्त दाखविणे आहे. ज्याप्रमाणे पाऊस आणि त्यापासून झालेली पैदावार शेतकऱ्यांना सुखद वाटते, मग जेव्हा ती सुकते तेव्हा तिला तुम्ही पिवळ्या रंगात पाहतात, मग ती अगदी चुरेचूर होऊन जाते, आणि आखिरतमध्ये सक्त शिक्षा-यातना आणि अल्लाहची माफी आणि प्रसन्नता आहे आणि या जगाचे जीवन केवळ धोक्याच्या सामुग्रीशिवाय आणखी काहीच नाही.

**२१.** (या) धावा आपल्या पालनकर्त्याच्या माफीकडे आणि त्या जन्नतकडे जिचा विस्तार आकाश आणि जमिनीच्या विस्ताराइतका आहे. ती अशा लोकांसाठी बनविली गेली आहे, जे अल्लाहवर आणि त्याच्या पैगंबरांवर ईमान राखतात, ही अल्लाहची दया कृपा आहे, ज्याला इच्छितो प्रदान करतो आणि अल्लाह मोठा कृपावान आहे.

**२२.** कोणतेही संकट या जगावर येत नाही ना खास तुमच्या प्राणांवर परंतु यापूर्वी की आम्ही त्यास निर्माण करावे, ते एका विशेष ग्रंथात लिहिलेले आहे. निःसंशय हे काम अल्लाहकरिता (मोठे) सोपे आहे.

**२३.** यासाठी की तुम्ही आपल्याकडून हिरावून घेतल्या जाणाऱ्या गोष्टीबद्दल दुःखी न व्हावे आणि ना प्रदान केलेल्या गोष्टीबद्दल गर्विष्ठ व्हावे आणि शेखी मिरविणाऱ्या, घमेंड करणाऱ्यांशी अल्लाह प्रेम राखत नाही.

**२४.** जे (स्वतःही) कंजूसपणा करतात आणि इतरांनाही कंजूसपणा करण्याची शिकवण देतात, (ऐका!) जो कोणी तोंड फिरविल, अल्लाह निःस्पृह आणि प्रशंसेस पात्र आहे.

**२५.** निःसंशय, आम्ही आपल्या पैगंबरांना (संदेशवाहकांना) स्पष्ट निशाण्या देऊन पाठविले आणि त्यांच्यासोबत ग्रंथ आणि न्याय (तराजू) अवतरित केला, यासाठी की लोकांनी न्यायावरकायम राहावे आणि आम्ही लोखंडही अवतरित केले, ज्यात मोठी (हैबत आणि) ताकद आहे आणि लोकांसाठी इतरही अनेक फायदे आहेत आणि यासाठीही की अल्लाहने हे जाणून घ्यावे की त्याची व त्याच्या पैगंबरांची मदत न पाहता कोण करतो. निःसंशय, अल्लाह मोठा शक्तिशाली आणि वर्चस्वशाली आहे.

**२६.** निःसंशय, आम्ही नूह आणि इब्राहीम (अलै.) यांना (पैगंबर बनवून) पाठविले आणि आम्ही त्या दोघांच्या संततीत प्रेषित्व आणि ग्रंथ कायम ठेवला , तेव्हा त्यांच्यापैकी

काहींनी मार्गदर्शन अंगीकारले आणि त्यांच्यापैकी बहुतेक जण दुराचारी राहिले.

**२७.** त्यांच्यानंतर, तरीही आम्ही सतत आपले पैगंबर पाठवित राहिलो आणि त्यांच्यानंतर मरियमचा पुत्र ईसाला पाठविले व त्यांना इंजील (ग्रंथ) प्रदान केला आणि त्यांच्या अनुयायींच्या मनात प्रेम आणि दयेची भावना ठेवली, परंतु वैराग्याचा मार्ग त्यांनी स्वतः शोधून कढला, आम्ही तो त्यांच्यासाठी अनिवार्य केला नव्हता, अल्लाहच्या प्रसन्नतेचा शोध घेण्याखेरीज, तेव्हा त्यांनी त्याचे पूर्णतः पालन केले नाही, तरी देखील आम्ही त्यांच्यापैकी ज्यांनी ईमान राखले होते, त्यांना त्यांचा मोबदला प्रदान केला आणि त्यांच्यापैकी अधिकांश लोक दुराचारी आहेत.

**२८.** हे ईमान राखणाऱ्या लोकांनो! अल्लाहचे भय बाळगत राहा आणि त्याच्या पैगंबरावर ईमान राखा, अल्लाह तुम्हाला आपल्या दयेने दुप्पट हिस्सा देईल आणि तुम्हाला दिव्य तेज (नूर) प्रदान करील, ज्याच्या प्रकाशात तुम्ही चालाल आणि तो (तुमचे अपराधीही) माफ करील, अल्लाह मोठा माफ करणारा अतिशय दयावान आहे.

**२९.** हे अशासाठी की (अल्लाहचा) ग्रंथ बाळगणाऱ्यांनी जाणून घ्यावे की अल्लाहच्या कृपेच्या कोणत्याही हिश्यावर त्यांचा अधिकार नाही आणि हे की, समस्त कृपा अल्लाहच्याच हाती आहे, तो ज्याला इच्छिल, देईल आणि अल्लाहच मोठा कृपावंत आहे.

---

# सूरह मुजादिलः - ५८

सूरह मुजादिलः मदीना येथे अवतरली, यात बावीस आयती आणि तीन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** निश्चितच, अल्लाहने त्या स्त्रीचे म्हणणे ऐकले, जी तुमच्याशी आपल्या पतीबाबत वाद घालीत होती, आणि अल्लाहसमोर गाऱ्हाणे करीत होती. अल्लाह तुम्हा दोघांचा वार्तालाप (वादविवाद) ऐकत होता. निःसंशय, अल्लाह ऐकणारा, पाहणारा आहे.

**२.** तुमच्यापैकी जे लोक आपल्या पत्नींशी जिहार करतात (म्हणजे त्यांना माता संबोधून बसतात) त्या वास्तविक त्यांच्या माता नाहीत, त्यांच्या माता तर त्याच आहेत, ज्यांच्या गर्भातून त्यांनी जन्म घेतला आहे, निःसंशय हे लोक एक अयोग्य आणि असत्य गोष्ट बोलतात. निःसंशय, अल्लाह मोठा क्षमाशील आणि माफ करणारा आहे.

**३.** जे लोक आपल्या पत्नींशी जिहार करून बसतील, मग आपले कथन परत घेतील तर त्यांना, आपसात एकमेकांना हात लावण्याआधी एक गुलाम (दास) मुक्त करावा लागेल. याच्याद्वारे तुम्हाला उपदेश केला जात आहे, आणि अल्लाह तुमच्या समस्त कर्मांना जाणतो.

**४.** तथापि ज्याला गुलाम आढळून न आला तर त्याने दोन महीने सतत रोजे राखावेत, यापूर्वी की एकमेकांना हात लावावा आणि ज्याला याचेही सामर्थ्य नसेल तर त्याने साठ गरीबांना जेऊ घालावे, हे यासाठी की तुम्ही अल्लाहवर आणि त्याच्या पैगंबरावर ईमान राखावे. या अल्लाहने निर्धारित केलेल्या सीमा (मर्यादा) आहेत आणि काफिरांसाठीच दुःखदायक अज़ाब (शिक्षा-यातना) आहेत.

**५.** निःसंशय, जे लोक अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचा विरोध करतात ते अपमानित केले जातील, जसे त्यांच्या पूर्वीचे लोक अपमानित केले गेले आणि निःसंशय, आम्ही स्पष्ट आयती अवतरित केल्या आहेत आणि काफिर (सत्य विरोधक) लोकांसाठी अपमानित करणारा अज़ाब आहे.

**६.** ज्या दिवशी अल्लाह त्या सर्वांना (जिवंत करून) उठविल, मग त्यांना त्यांच्या कृत-कर्मांशी अवगत करील (ज्यास) अल्लाहने मोजून ठेवले आहे आणि ज्याचा यांना विसर पडला होता आणि अल्लाह प्रत्येक गोष्टीशी अवगत आहे.

**७.** काय तुम्ही नाही पाहिले की अल्लाह आकाशांची व जमिनीची प्रत्येक गोष्ट जाणतो. असे नाही होत की तीन माणसांमध्ये कानगोष्टी व्हाव्यात आणि त्यांच्यात चौथा अल्लाह नसावा आणि ना पाच माणसांमध्ये, व त्यांच्यात सहावा अल्लाह नसावा. कानगोष्टी करणारे याहून कमी असोत किंवा जास्त असोत, तो त्यांच्यासोबतच असतो. मग ते कोठेही असोत, मग कयामतच्या दिवशी त्यांना त्यांच्या कर्मांशी अवगत करविल. निःसंशय, अल्लाह प्रत्येक गोष्टीचे ज्ञान बाळगतो.

**८.** काय तुम्ही त्या लोकांना नाही पाहिले, ज्यांना कानगोष्टी करण्यापासून रोखले गेले होते, तरीही ते त्या मनाई केलेल्या कामाला पुन्हा करतात आणि आपसात अपराधाच्या, अन्यायाच्या आणि पैगंबराशी अवज्ञा करण्याच्या कानगोष्टी करतात आणि जेव्हा तुमच्याजवळ येतात, तेव्हा तुम्हाला त्या शब्दांत सलाम करतात, ज्या शब्दांत अल्लाहने सांगितले नाही, आणि आपल्या मनात म्हणतात की अल्लाह आम्हाला आमच्या अशा बोलण्यावर शिक्षा का नाही देत? त्यांच्यासाठी जहन्नम पुरेशी आहे, ज्यात हे लोक दाखल होतील, तेव्हा किती वाईट ठिकाण आहे!

**९.** हे ईमान राखणाऱ्यांनो! जेव्हा तुम्ही कानगोष्टी कराल तर या कानगोष्टी अपराध, अतिरेक (उदंडता) आणि पैगंबरांची अवज्ञासंबंधी नसाव्यात. किंबहुना सत्कर्म आणि अल्लाहच्या भयासंबंध असाव्यात आणि त्या अल्लाहचे भय बाळगत राहा, ज्याच्याजवळ तुम्ही एकत्रित केले जाल.

**१०.** (वाईट) कानगोष्टी सैतानाचे काम आहे, ज्यामुळे ईमानधारकांना दुःख व्हावे.[१] वस्तुतः अल्लाहच्या मर्जीविना तो त्यांना काहीच नुकसान पोहचवू शकत नाही. आणि ईमान राखणाऱ्यांनी अल्लाहवरच भरवसा ठेवला पाहिजे.

**११.** हे ईमान राखणाऱ्यांनो! जेव्हा तुम्हाला सांगितले जाईल की सभा-बैठकांमध्ये जरा विस्तारपूर्वक बसा, तेव्हा तुम्ही जागा व्यापक करा. अल्लाह तुम्हाला विस्तार प्रदान करेल आणि जेव्हा सांगितले जाईल की उठून उभे राहा, तेव्हा तुम्ही उठून उभे राहा.[२] अल्लाह तुमच्यापैकी त्या लोकांचे, ज्यांनी ईमान राखले आहे व ज्यांना ज्ञान दिले गेले आहे, दर्जा उंचाविल आणि अल्लाह (ते प्रत्येक कर्म) जे तुम्ही करीत आहात, (चांगल्या प्रकारे) जाणतो.

**१२.** हे ईमान राखणाऱ्यांनो! जेव्हा तुम्ही पैगंबराशी एकांतात बोलू इच्छित असाल तर आपल्या या एकांतात बोलण्यापूर्वी काही दान (सदका) करत जा, हे तुमच्यासाठी अधिक चांगले आणि पवित्र (निर्मळ) आहे, मात्र जर काहीच नसेल तर निःसंशय,

---

(१) अपराध, दुष्कर्म व पैगंबराची अवज्ञा या गोष्टींवर आधारित कानगोष्टी सैतानी काम होय, कारण सैतान या गोष्टींची प्रेरणा देतो, यासाठी की याद्वारे ईमान राखणाऱ्यांना दुःखी कष्टी करावे.

(२) यात ईमानधारकांना सभा-संमेलनाचे शिष्टाचार सांगितले जात आहेत. इथे सभा (मजलिस) शी अभिप्रेत ती सभा, ज्यात ईमान राखणारे भलाई व नेकी प्राप्त करण्यासाठी जमले असावेत. सभा

अल्लाह माफ करणारा, दया करणारा आहे.

**१३.** काय तुम्ही कानगोष्टीपूर्वी दान करण्यास भ्याले तर जेव्हा तुम्ही असे केले नाही आणि अल्लाहने देखील तुम्हाला माफ केले तेव्हा आता (उचितपणे) नमाजांना कायम राखा, जकात देत राहा आणि अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या आदेशाचे पालन करीत राहा आणि तुम्ही जे काही करता ते सर्व अल्लाह (चांगल्या प्रकारे) जाणून आहे.

**१४.** काय तुम्ही त्या लोकांना नाही पाहिले, ज्यांनी त्या जनसमूहाशी मैत्री केली, ज्यांच्यावर अल्लाह नाराज झाला आहे, हे ना तुमच्यापैकी आहेत, ना त्यांच्यापैकी, आणि ज्ञान असतानाही खोट्या गोष्टींवर शपथ घेत आहेत.

**१५.** अल्लाहने त्यांच्यासाठी कठोर शिक्षा यातना तयार करून ठेवली आहे. खात्रीने हे जे काही करीत आहेत, वाईट करीत आहेत.

**१६.** या लोकांनी आपल्या शपथांना ढाल बनवून ठेवले आहे आणि लोकांना अल्लाहच्या मार्गापासून रोखतात, तेव्हा त्यांच्यासाठी अपमानदायक अज़ाब (शिक्षा-यातना) आहे.

**१७.** त्यांची धन-संपत्ती आणि त्यांची संतती अल्लाहसमोर काहीच उपयोगी पडणार नाही. हे तर जहन्नममध्ये जाणार आहेत, नेहमी तिच्यातच राहतील.

**१८.** ज्या दिवशी अल्लाह त्या सर्वांना उठवून उभे करील, तेव्हा हे ज्या प्रकारे तुमच्यासमोर शपथ घेतात, अल्लाहच्या समोरही शपथ घेऊ लागतील आणि समजतील की ते देखील एखाद्या (प्रमाणा) वर आहेत, विश्वास करा की निःसंशय तेच खोटारडे आहेत.

**१९.** त्याच्यावर सैतानाने वर्चस्व प्राप्त केले आहे आणि त्यांना अल्लाहच्या स्मरणाचा विसर पाडला आहे. ही सैतानाची सेना आहे. ऐका! सैतानाची सेनाच तोट्यात राहणार आहे.

---

शिक्षा-दीक्षा हेतुस्तव असो किंवा जुमा (शुक्रवार) ची असो (तफसीर अल कुर्तबी) विस्तारपूर्वक बसा याचा अर्थ सभेचे क्षेत्र संकुचित राखू नका की ज्यामुळे नंतर येणाऱ्यांना उभे राहावे लागावे, किंवा इतरांना हटवून जागा करणे भाग पडावे. पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांनी फर्माविले, कोणीही दुसऱ्या माणसाला हटवून त्याच्या जागी बसू नये. यास्तव सभेचे क्षेत्र विस्तृत करा (सहीह बुखारी, किताबुल जुमआ, बाबु मुस्लिम, किताबुस सलाम)

**२०.** निःसंशय, अल्लाहचा आणि त्याच्या पैगंबराचा जे लोक विरोध करतात, तेच लोक सवार्धिक अपमानित होणाऱ्यांपैकी आहेत.

**२१.** अल्लाहने लिहून टाकले आहे की निःसंशय, मी आणि माझे रसूल वर्चस्वशाली (विजयी) राहतील. निःसंशय, अल्लाह मोठा शक्तिशाली आणि वर्चस्वशाली आहे.

**२२.** अल्लाहवर आणि कयामतच्या दिवसावर ईमान राखणाऱ्यांना तुम्ही अल्लाह आणि त्याच्या पैगंबराच्या विरोधकांशी स्नेह प्रेम राखत असलेले पाहणार नाही, मग ते त्यांचे पिता किंवा त्यांचे पुत्र किंवा त्यांचे बांधव किंवा त्यांचे नातेवाईक (कुटुंबाच्या जवळचे) का असेनात हेच लोक आहेत, ज्यांच्या मनात अल्लाहने ईमान लिहून दिले आहे, आणि ज्यांचे समर्थन आपल्या आत्म्याद्वारे केले आहे आणि ज्यांना अशा जन्नतींमध्ये दाखल करील, ज्यांच्या खाली (थंड) पाण्याचे प्रवाह वाहत आहेत, जिथे हे सदैव काळ राहतील. अल्लाह त्यांच्याशी राजी आहे आणि हे अल्लाहशी राजी आहेत. ही अल्लाहची फौज आहे. जाणून घ्या की निःसंशय, अल्लाहच्या समूहाचे लोकच यशस्वी लोक आहेत.

---

# सूरह हश्र - ५९

सूरह हश्र मदीना येथे अवतरली, यात चोवीस आयती आणि तीन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** आकाशांची आणि धरतीची प्रत्येक वस्तू अल्लाहच्या पवित्रतेसह गुणगान करते आणि तो मोठा वर्चस्वशाली, हिकमत बाळगणारा आहे.

**२.** तोच आहे ज्याने ग्रंथधारकांमधल्या काफिरांना त्यांच्या घरातून पहिल्या हश्र (एकत्र होण्याचा) वेळी काढले. तुम्हाला कल्पनाही नव्हती की ते निघतील आणि ते स्वतः समजत होते की त्याचे मजबूत किल्ले त्यांना अल्लाहच्या शिक्षा यातनेपासून वाचवून घेतील. तेव्हा त्यांच्यावर अल्लाह (चा प्रकोप) अशा ठिकाणाहून येऊन कोसळला की त्यांना त्याचे अनुमानही नव्हती आणि त्यांच्या मनात अल्लाहने भय टाकले, ते आपल्या घरांना आपल्याच हातांनी ओसाड करीत होते आणि ईमान

राखणाऱ्यांच्या हातून (नष्ट करीत होते) तेव्हा, हे डोळे राखणाऱ्यांनो! बोध ग्रहण करा.

**३.** आणि जर अल्लाहने त्यांच्यासाठी हद्दपारी लिहिली नसती तर निश्चितच त्यांना या जगातच शिक्षा यातना दिली असती आणि आखिरतमध्ये (तर) त्यांच्यासाठी आगीची शिक्षा आहेच.

**४.** हे अशासाठी की त्यांनी अल्लाह आणि त्याच्या पैगंबराचा विरोध केला, आणि जो देखील अल्लाहचा विरोध करील तर अल्लाह देखील मोठी कठोर शिक्षा यातना देणारा आहे.

**५.** खजुरींची जी झाडे तुम्ही कापून टाकलीत आणि ज्यांना तुम्ही त्यांच्या मुळासकट बाकी राहू दिले तर हे सर्व अल्लाहच्या आदेशाने झाले, आणि यासाठीही की दुराचारी लोकांना अल्लाहने अपमानित करावे.

**६.** आणि त्यांची जी संपत्ती अल्लाहने आपल्या पैगंबराच्या हाती दिली ज्यासाठी तुम्ही ना घोडे दौडविले आहेत ना ऊंट, किंबहुना अल्लाह आपल्या पैगंबराला, ज्याच्यावर इच्छितो वर्चस्वशाली करतो आणि अल्लाह प्रत्येक गोष्ट करण्यास समर्थ आहे.

**७.** वस्त्यावाल्यांचे जे धन अल्लाहने तुमच्या लढण्याविनाच आपल्या पैगंबराच्या हाती दिले, ते अल्लाहचे आहे आणि पैगंबराचे आहे, जवळच्या नातेवाईकांचे, अनाथांचे, गोरगरीबांचे व प्रवाशांचे आहे यासाठी की तुमच्यातल्या धनवानांच्याच हातात हे धन फिरत राहू नये आणि तुम्हाला पैगंबर जे काही देईल ते घ्या आणि ज्यापासून रोखेल त्यापासून अलिप्त राहा आणि अल्लाहचे भय बाळगत राहा. निःसंशय, अल्लाह मोठी सक्त शिक्षा यातना देणारा आहे.

**८.** हे धन त्या गरीब मुहाजिर लोकां (देशत्याग केलेल्या ईमानधारकां) करिता आहे, ज्यांना आपल्या घरातून आणि आपल्या संपत्तीतून बाहेर काढले गेले आहे. ते अल्लाहची दया कृपा व प्रसन्नता इच्छितात आणि अल्लाहची आणि त्याच्या पैगंबराची मदत करतात. हेच लोक सच्चे आहेत.

**९.** आणि (त्यांच्याकरिता) ज्यांनी या घरात (अर्थात मदीनेत) आणि ईमान राखण्यात त्यांच्यापूर्वी स्थान बनवून घेतले आणि आपल्याकडे हिजरत (देशत्याग) करून येणाऱ्यांशी प्रेम राखतात आणि देशत्याग केलेल्यां (मुहाजिर लोकां) ना जे काही दिले

जाते, त्याबद्दल ते आपल्या छातीत (मनात) कसलाही संकोच करीत नाहीत, उलट स्वतः आपल्यावर त्यांना प्राधान्य देतात, मग ते स्वतः कितीही गरजवंत असोत (खरी गोष्ट अशी की) जो कोणी आपल्या मनाच्या इच्छा अभिलाषांपासून वाचविला गेला, तोच सफलता प्राप्त करणारा आहे.[१]

**१०.** आणि (त्यांच्यासाठी) जे त्यांच्यानंतर आले, जे म्हणतील की, हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला माफ कर आणि आमच्या त्या बांधवांनाही, ज्यांनी आमच्या आधी ईमान राखले आहे आणि ईमान राखणाऱ्यांच्याविषयी आमच्या मनात कपट (आणि वैरभावना) आणू नको. हे आमच्या पालनकर्त्या! निःसंशय, तू प्रेम आणि दया करणारा आहे.

**११.** काय तुम्ही त्या दांभिक (मुनाफिक) लोकांना नाही पाहिले, जे आपल्या ग्रंथ बाळगणाऱ्यांमधील काफिर बांधवांना म्हणतात की जर तुम्हाला देशाबाहेर घालविले गेले तर आम्हीही अवश्य तुमच्यासोबत देशत्याग करू आणि तुमच्याविषयी कधीही कोणाचे म्हणणे मान्य करणार नाही आणि जर तुमच्याशी युद्ध केले केले तर निश्चित आम्ही तुमची मदत करू, परंतु अल्लाह साक्ष देतो की हे अगदी खोटारडे आहेत.

**१२.** जर त्यांना देशाबाहेर घालविले गेले तर हे त्यांच्यासोबत जाणार नाहीत आणि जर त्यांच्याशी युद्ध छेडले गेले तर हे त्यांची मदतही करणार नाहीत आणि (समजा) हे मदत करण्यास तयारही झालेत तर पाठ दाखवून (पळ काढतील) मग त्यांची मदत केली जाणार नाही.

**१३.** (मुसलमानांनो! विश्वास करा) की तुमचे भय त्यांच्या छातीत (मनात) अल्लाहच्या भयाच्या तुलनेत फार जास्त आहे, हे यासाठी की ते सुज्ञता बाळगत नाही.

**१४.** हे सर्व मिळूनही तुमच्याशी लढू शकत नाही, मात्र ही गोष्ट वेगळी की किल्ल्याने घेरलेल्या ठिकाणी असावेत किंवा भिंतींच्या आडोशाला असावेत. त्यांची लढाई तर आपसातच मोठी सक्त आहे. जरी तुम्ही त्यांना एकसंघ समजत आहात तरी, वस्तुतः

---

(१) हदीसमधील उल्लेखानुसार माणसाने मनाच्या इच्छा आकांक्षांपासून दूर राहिले पाहिजे कारण याच मनोकांक्षांनी पूर्वीच्या लोकांना बरबाद केले, त्यांना रक्तपात करण्यास प्रवृत्त केले आणि त्यांनी अवैध (हराम) गोष्टींना वैध (हलाल) ठरवून घेतले. (सहीह मुस्लिम, किताबुल बिर्र, बाबु तहरीमिज, जुल्मे)

त्यांची मने आपसात विभक्त आहेत हे अशासाठी की हे निर्बुद्ध लोक आहेत.

**१५.** त्या लोकांसारखे, जे त्यांच्या थोड्याचपूर्वी होऊन गेलेत, ज्यांनी आपल्या दुष्कर्मांची गोडी चाखली आणि ज्यांच्यासाठी दुःखदायक शिक्षा (तयार) आहे.

**१६.** सैतानासारखे की तो माणसाला म्हणतो, कुफ्र (इन्कार) कर, मग जेव्हा तो कुफ्र करून बसतो, तेव्हा म्हणतो, मी तुझ्यापासून वेगळा आहे. मी तर साऱ्या विश्वांच्या पालनकर्त्यांचे भय बाळगतो.

**१७.** तेव्हा दोघांचा परिणाम हा झाला की (जहन्नमच्या) आगीत नेहमी नेहमीकरिता गेले आणि अत्याचारी लोकांची हीच शिक्षा आहे.

**१८.** हे ईमान राखणाऱ्यांनो! अल्लाहचे भय बाळगत राहा[१] आणि प्रत्येक माणसाने हे बघावे की उद्या (कयामतकरिता) त्याने कर्मांचे कोणते (भांडार) पाठविले आहे,[२] आणि (प्रत्येक क्षणी) अल्लाहचे भय राखा, अल्लाह तुमच्या समस्त कर्मांशी परिचित आहे.

**१९.** आणि तुम्ही त्या लोकांसारखे होऊ नका, ज्यांनी अल्लाह (च्या आदेशा) चा विसर पाडला, तेव्हा अल्लाहने त्यांना स्वतःचेच विस्मरण घडविले. असेच लोक दुराचारी असतात.

**२०.** जहन्नमवाले आणि जन्नतवाले (आपसात) समान नाहीत.[३] जे जन्नतवाले आहेत तेच सफल आहेत.

**२१.** जर आम्ही कुरआनाला एखाद्या पर्वतावर अवतरित केले असते तेव्हा तुम्ही पाहिले

---

(१) ईमान राखणाऱ्यांना संबोधित करून त्यांना उपदेश केला जात आहे. अल्लाहशी भय राखण्याचा अर्थ, त्याने ज्या ज्या गोष्टींचा आदेश दिला आहे त्या अमलात आणाव्या आणि ज्या गोष्टींची मनाई केली आहे, त्यापासून अलिप्त राहावे. या आयतीत ही गोष्ट जोर देण्यासाठी दोन वेळा फर्माविली गेली आहे. कारण हा तकवा (अल्लाहचे भय) च माणसाला सत्कर्म करण्यास व दुष्कर्माचा अव्हेर करण्यास प्रवृत्त करतो.

(२) 'उद्या'शी अभिप्रेत कयामत आहे. अर्थात विश्वाचा अंत. त्याला उद्या या अर्थाने सांगून या गोष्टीकडेही इशारा केला आहे की कयामतचे घडून येणे खूप लांब नाही, किंबहुना निकटचे आहे.

(३) ज्यांनी अल्लाहचा विसर पाडून ही गोष्टही ध्यानी राखली नाही की अशा प्रकारे ते स्वतःच आपल्या प्राणांवर अत्याचार करीत आहेत, आणि एक दिवस असा येईल की याच्या परिणामस्वरूपी

असते की अल्लाहच्या भयाने तो झुकून चूर चूर (कण कण) झाला असता. आम्ही ही उदाहरणे लोकांसाठी निवेदित आहोत यासाठी की त्यांनी विचार चिंतन करावे.

**२२.** तोच अल्लाह आहे, ज्याच्याखेरीज कोणीही उपासनीय (पूज्य) नाही. लपलेल्या व उघड गोष्टी जाणणारा, तोच माफ व दया करणारा.

**२३.** तोच अल्लाह आहे, ज्याच्याखेरीज कोणी सच्चा माबूद (उपास्य) नाही. मालक (स्वामी) अतिशय पवित्र, सर्व व्यंग दोषांपासून मुक्त शांती (सलामती) प्रदान करणारा, संरक्षक, वर्चस्वशाली, शक्तिशाली, महानतम पवित्र आहे अल्लाह त्या गोष्टींपासून ज्यांना हे त्याचा सहभागी ठरवितात.

**२४.** तोच अल्लाह आहे निर्माणकर्ता, रचयिता, स्वरूप देणारा, त्याच्याचसाठी (अतिशय) उत्तम नावे आहेत. प्रत्येक वस्तू मग ती आकाशात असो किंवा धरतीत असो, त्याचेच पवित्र वर्णन करते आणि तोच मोठा जबरदस्त आणि बुद्धिकौशल्य बाळगणारा आहे.

---

त्यांचे हे शरीर, ज्याच्यासाठी ते जगात मोठ्या कष्ट यातना झेलत होते, जहन्नमच्या आगीचे इंधन बनेल. आणि त्यांच्या तुलनेत दुसरे लोक होते ज्यांनी अल्लाहचे स्मरण राखले, त्याच्या आदेशानुसार जीवन व्यतीत केले. एक वेळ येईल की अल्लाह त्यांना त्याचा उत्तम मोबदला प्रदान करील आणि आपल्या जन्नतमध्ये दाखल करील जिथे त्यांच्या आरामासाठी सर्व प्रकारची सुख-सुविधा असेल. हे दोन्ही समूह अर्थात जहन्नमवाले आणि जन्नतवाले समान असूच शकत नाही. हे दोन्ही समान कसे बरे असू शकतात? एकाने आपला शेवट ध्यानी राखला आणि त्यासाठी तयारी करीत राहिला, तर दुसरा आपल्या शेवटाविषयी निश्चिंत राहिला. म्हणून त्यासाठी त्याने कसलीही पूर्वतयारी केली नाही, किंबहुना गफलतीतच पडून राहिला.

# सूरह मुम्तहिनः - ६०

सूरह मुम्तहिनः मदीना येथे अवतरली आणि यात तेरा आयती आणि दोन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** हे ईमान राखणाऱ्या लोकांनो! माझ्या आणि आपल्या शत्रूंना मित्र बनवू नका. तुम्ही तर मित्रत्वाने त्यांच्याकडे संदेश पाठविता आणि ते त्या सत्याचा, जे तुमच्याजवळ येऊन पोहोचले आहे, इन्कार करतात, पैगंबराला आणि स्वतः तुम्हाला केवळ या कारणास्तव (देशाबाहेर) काढतात की तुम्ही आपल्या पालनकर्त्यावर ईमान राखतात. जर तुम्ही माझ्या मार्गात जिहाद (धर्मयुद्धा) करिता आणि माझ्या प्रसन्नतेच्या शोधात निघाले आहात (तर त्यांच्याशी मैत्री करू नका). तुम्ही त्यांच्याजवळ लपून छपून प्रेमसंदेश पाठविता, आणि मला चागल्या प्रकारे माहीत आहे, जे तुम्ही लपविले आणि तेही जे तुम्ही जाहीर केले. तुमच्यापैकी जो कोणी हे काम करील, तो निःसंशय सरळ मार्गापासून विचलित होईल.

**२.** जर त्यांनी तुमच्यावर काबू मिळविला तर ते तुमचे (उघड) शत्रू होतील आणि वाईटरित्या तुमच्यावर हात उचलू लागतील आणि अपशब्द बोलू लागतील आणि (मनापासून) इच्छितील की तुम्हीही कुफ्र करू लागावे.

**३.** तुमचे नातेसंबंध आणि संतती तुम्हाला कयामतच्या दिवशी (काहीच) उपयोगी पडणार नाही. अल्लाह तुमच्या दरम्यान फैसला करील आणि तुम्ही जे काही करीत आहात अल्लाह ते चांगल्या प्रकारे पाहत आहे.

**४.** (हे ईमान राखणाऱ्यांनो!) तुमच्याकरिता (हजरत) इब्राहीम आणि त्यांच्या साथीदारांमध्ये फार उत्तम नमुना आहे, जेव्हा त्या सर्वांनी आपल्या जनसमूहाला स्पष्ट शब्दांत सांगितले की आम्ही तुमच्यापासून आणि ज्यांची तुम्ही अल्लाहखेरीज आराधना करता, त्या सर्वांपासून पूर्णपणे विभक्त आहोत. आम्ही तुमच्या (श्रद्धेचा) इन्कार करतो आणि तोपर्यंत तुम्ही अल्लाहच्या एक असण्यावर ईमान राखत नाही (तोपर्यंत) आमच्या व तुमच्या दरम्यान नेहमीकरिता कपट आणि शत्रुत्व निर्माण झाले. परंतु इब्राहीम आपल्या पित्यास असे म्हणाले होते की मी तुमच्यासाठी क्षमा-याचना अवश्य करीन आणि तुमच्यासाठी मला अल्लाहसमोर कसलाही अधिकार नाही. हे आमच्या

पालनकर्त्या! तुझ्यावरच आम्ही भरवसा राखला आहे[१] आणि तुझ्याचकडे आम्ही रुजू होतो, आणि तुझ्याकडेच परतून यायचे आहे.

**५.** हे आमच्या पालनकर्त्या! तू आम्हाला काफिरांच्या कसोटीत टाकू नको आणि हे आमच्या पालनकर्त्या! आमचे अपराध माफ कर. नि:संशय, तूच वर्चस्वशाली आणि हिकमतशाली आहेस.

**६.** निसंशय, तुमच्यासाठी त्या लोकांमध्ये उत्तम आदर्श (आणि चांगले अनुसरण आहे, विशेषत:) त्या प्रत्येक माणसाकरिता, जो अल्लाह आणि कयामतच्या दिवसाच्या भेटीवर विश्वास राखत असेल आणि जर कोणी तोंड फिरविल, तर अल्लाह पूर्णत: नि:स्पृह आहे आणि महानता व प्रशंसेस पात्र आहे.

**७.** नवल नव्हे की अल्लाहने, लवकरच तुमच्या आणि त्यांच्या दरम्यान प्रेम निर्माण करावे.[२] अल्लाह सर्व सामर्थ्य बाळगतो आणि अल्लाह मोठा माफ करणारा आणि दया करणारा आहे.

**८.** ज्या लोकांनी तुमच्याशी धर्माच्या संदर्भात युद्ध केले नाही आणि तुम्हाला देशाबाहेर काढले नाही, त्यांच्याशी सद्व्यवहार उपकाराचे व न्यायपूर्ण वर्तन करण्यापासून अल्लाह तुम्हाला रोखत नाही. (किंबहुना) नि:संशय, अल्लाह न्याय करणाऱ्यांशी प्रेम राखतो.

**९.** अल्लाह तुम्हाला केवळ त्या लोकांशी प्रेम राखण्यापासून रोखतो, ज्यांनी तुमच्याशी धर्माच्या बाबतीत लढाई केली आणि तुम्हाला देशाबाहेर काढले आणी देशाबाहेर

---

(१) मूळ शब्द 'तवक्कल' (भरवसा) अर्थात बाह्य साधनांचा अवलंब केल्यानंतर मामला अल्लाहच्या हवाली केला जावा. भरवशाचा अर्थ हा नव्हे की साधनांचा प्रयोग न करताच अल्लाहवर भरवसा राखला जावा, असे करण्यापासून आम्हाल रोखले गेले आहे. एकदा एक मनुष्य पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्या सेवेत हजर झाला आणि उंटाला तसेच बाहेर उभे करून आत आला. पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांनी विचारले असता म्हणाला की मी उंटाला अल्लाहच्या हवाली करून आलो आहे. त्यावर पैगंबर म्हणाले, हा भरवसा नव्हे. 'आकल व तवक्कल' (''आधी त्याला बांध, नंतर अल्लाहवर भरवसा कर.'' (तिर्मिजी))

(२) अर्थात त्यांना मुस्लिम बनवून तुमचा बांधव आणि साथीदार बनवावे, ज्यामुळे तुमची आपसातील शत्रुता, मैत्रीत रुपांतर होईल आणि असेच घडले. मक्का विजयानंतर लोक समूहासमूहांनी इस्लाम धर्म स्वीकारू लागले आणि ते मुस्लिम होताच घृणाचे रूपांतर प्रेमात झाले. कालपर्यंत जे मुलसमानांचे रक्तपिपासू वैरी होते, ते त्यांचे जीवश्च कंठश्च बनले.

काढणाऱ्यांना मदत केली, जे लोक अशा काफिरांशी प्रेम राखतील तेच निश्चितपणे अत्याचारी आहेत.

**१०.** हे ईमान राखणाऱ्यांनो! जेव्हा तुमच्याजवळ ईमान राखणाऱ्या स्त्रिया देशत्याग करून येतील, तेव्हा तुम्ही त्यांची परीक्षा घेत जा. वस्तुतः त्यांच्या ईमानास चांगल्या प्रकारे जाणणारा तर अल्लाहच आहे, परंतु जर त्या तुम्हाला ईमान राखणाऱ्या वाटतील, तर मग तुम्ही त्यांना काफिरांकडे परत पाठवू नका. या त्यांच्यासाठी हलाल (वैध) नाहीत आणि ना ते यांच्यासाठी हलाल आहेत, आणि जो काही खर्च त्या काफिरांनी केला असेल, तो त्यांना देऊन टाका, त्या स्त्रियांना त्यांचा महर अदा करून त्याच्याशी विवाह करून घेण्यात तुमच्यावर कसलाही गुन्हा नाही. आणि काफिर स्त्रियांच्या विवाहबंधनास आपल्या कब्जात ठेवू नका आणि जो काही खर्च तुम्ही केला असेल तो मागून घ्या आणि जो काही खर्च त्या काफिरांनी केला असेल, तो त्यांनीही मागून घ्यावा. हा अल्लाहचा फैसला आहे, जो तुमच्या दरम्यान करीत आहे आणि अल्लाह जाणणारा (आणि) हिकमत बाळगणारा आहे.

**११.** आणि जर तुमची एखादी पत्नी तुमच्या हातून निघून जावी आणि काफिरांजवळ चालली जावी, मग तुम्हाला सूडाची संधी (वेळ) मिळावी तर ज्यांच्या पत्न्या चालल्या गेल्या आहेत, त्यांना त्यांच्या खर्चाइतके अदा करा, आणि त्या अल्लाहचे भय बाळगत राहा ज्यावर तुम्ही ईमान राखता.

**१२.** हे पैगंबर! जेव्हा ईमान राखणाऱ्या स्त्रिया तुमच्याशी या गोष्टींवर बैअत (प्रतिज्ञा) करण्यासाठी येतील की त्या अल्लाहसोबत दुसऱ्या कोणाला सहभागी बनविणार नाहीत, चोरी करणार नाहीत, व्यभिचार करणार नाहीत, आपल्या संततीची हत्या करणार नाहीत आणि ना असा एखादा आक्षेप ठेवतील जो स्वतः आपल्या हाता-पायांसमोर रचून घ्यावा आणि एखाद्या नेकीच्या कामात तुमची अवज्ञा करणार नाहीत तर तुम्ही त्यांच्याकडून बैअत करून घेत जा आणि त्यांच्यासाठी अल्लाहकडे क्षमा-याचना करा. निःसंशय, अल्लाह मोठा माफ करणारा दयावान आहे.

**१३.** हे ईमान राखणाऱ्यांनो! तुम्ही त्या लोकांशी मैत्री ठेवू नका, ज्यांच्यावर अल्लाहचा प्रकोप आलेला आहे, जे आखिरतपासून अशा प्रकारे निराश झाले आहे ज्या प्रकारे मृत कबरीवाल्यांपासून, काफिर निराश आहेत.

---

# सूरह सफ्फ - ६१

सूरह सफ्फ मदीना येथे अवतरली आणि यात चौदा आयती आणि दोन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** आकाशांची आणि धरतीची प्रत्येक वस्तू अल्लाहच्या पवित्रतेचे गुणगान करते आणि तोच वर्चस्वशाली आणि हिकमत बाळगणारा आहे.

**२.** हे ईमान राखणाऱ्यांनो! तुम्ही ती गोष्ट का सांगता, जी (स्वतः) करीत नाही.

**३.** तुम्ही जे करीत नाही ते बोलणे अल्लाहला नापसंत आहे.

**४.** निःसंशय, अल्लाह त्या लोकांना प्रिय राखतो, जे त्याच्या मार्गात पंक्तिबद्ध (रांगारांगांनी) होऊन जिहाद करतात, जणू ते शिसा पाजलेली इमारत होय.

**५.** आणि (स्मरण करा) जेव्हा मूसाने आपल्या समुदायाच्या लोकांना म्हटले की हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! तुम्ही मला क्लेश यातना का देत आहात, वास्तविक तुम्हाला चांगले माहीत आहे की मी तुमच्याकडे अल्लाहचा रसूल (पैगंबर) आहे. तर जेव्हा ते लोक वाकडेच राहिले तेव्हा अल्लाहने त्यांच्या हृदयांना आणखी वाकडे करून टाकले, आणि अल्लाह अवज्ञाकारी जनसमूहाला मार्ग दाखवित नाही.

**६.** आणि जेव्हा मरियमचे पुत्र ईसा म्हणाले, हे (माझ्या लोकांनो!) इस्राईलची संतती! मी तुम्हा सर्वांकडे अल्लाहचा रसूल (पैगंबर) आहे, माझ्या पूर्वीचा ग्रंथ तौरातचे समर्थन करणारा आहे आणि आपल्यानंतर येणाऱ्या एका पैगंबराची खूशखबर ऐकविणारा आहे, ज्यांचे नाव अहमद आहे. मग जेव्हा ते त्यांच्यासमोर स्पष्ट निशाण्या घेऊन आले, तेव्हा ते म्हणू लागले की ही तर उघड जादू आहे!

**७.** आणि त्या माणसाहून अधिक अत्याचारी कोण असेल, जो अल्लाहबद्दल असत्य रचेल? वास्तविक त्याला इस्लामकडे बोलाविले जाते. आणि अल्लाह अशा अत्याचारी लोकांना मार्गदर्शन करीत नाही.

**८.** अल्लाहच्या दिव्य तेजाला (नूरला) ते आपल्या फुंकीन विझवू इच्छितात. आणि अल्लाह आपले दिव्य तेच उच्च पदांपर्यंत घेऊन जाणारा आहे, मग इन्कार करणाऱ्या (काफिरांना) कितीही वाईट वाटो.

**९.** तोच आहे ज्याने आपल्या पैगंबराला मार्गदर्शन आणि सत्य धर्म देऊन पाठविले, यासाठी की त्यास अन्य सर्व धर्मांवर वर्चस्वशाली करावे, मग अनेक ईश्वरांची भक्ती-उपासना करणाऱ्यांना कितीही अप्रिय वाटो.

**१०.** हे ईमान राखणाऱ्यांनो! काय मी तुम्हाला तो व्यापार दाखवू जो तुम्हाला कष्ट यातनादायक शिक्षा-यातनेपासून वाचविल.[१]

**११.** अल्लाह आणि त्याच्या पैगंबरावर ईमान राखा आणि अल्लाहच्या मार्गात आपल्या तन, मन आणि धनाने जिहाद करा, हे तुमच्यासाठी अधिक चांगले आहे जर तुम्ही ज्ञान बाळगत असाल.

**१२.** अल्लाह तुमचे अपराध माफ करील आणि तुम्हाला त्या जन्नतींमध्ये दाखल करील ज्यांच्या खाली प्रवाह वाहत असतील आणि स्वच्छ शुद्ध घरांमध्ये, जे 'अदन'च्या जन्नतमध्ये असतील. ही फार मोठी सफलता आहे.

**१३.** आणि तुम्हाला एक दुसरी देणगीही प्रदान करील, जी तुम्ही इच्छिता, ती आहे अल्लाहची मदत आणि लवकरच प्राप्त होणारा विजय आणि ईमान राखणाऱ्यांना खूशखबर द्या.

**१४.** हे ईमान राखणाऱ्यांनो! तुम्ही अल्लाहचे सहाय्यक बना,[२] ज्याप्रमाणे (हजरत) मरियमचे पुत्र (हजरत) ईसा यांनी हवारींना (मित्रांना) सांगितले, कोण आहे जो अल्लाहच्या मार्गात माझा मदतनीस बनेल? (त्यांचे) मित्र म्हणाले की, आम्ही अल्लाहच्या मार्गात मदतनीस आहोत. तेव्हा इस्त्राईलच्या संततीपैकी एका गटाने तर

---

(१) हे कर्म (अर्थात ईमान राखणे व जिहाद करणे) व्यापार या अर्थाने घेतले आहे, कारण याच्यातही त्यांना व्यापारासारखा लाभ होईल आणि तो लाभ कोणता आहे? जन्नतमध्ये प्रवेश आणि जहन्नमपासून मुक्ती. तेव्हा याहून मोठा लाभ आणखी काय असेल? याच गोष्टीला दुसऱ्या एका ठिकाणी अशा प्रकारे सांगितले गेले आहे- 'इन्नल्लाहस्तरा मिनल्मुअ्मिनीन अन्फुसहुम् व अम्वालहुम् बिअन्न लहुमुल्जन्नत.' ''अल्लाहने ईमान राखणाऱ्यांशी त्यांच्या प्राणांचा व संपत्तीचा सौदा जन्नतच्या बदल्यात केला आहे.'' (सूरह तौबा-१११)

(२) सर्व परिस्थितीत आपल्या वचनांद्वारे आणि आचरणाद्वारे तसेच धन आणि प्राणाद्वारेही, जेव्हा आणि ज्या वेळी देखील आणि ज्या अवस्थेतही अल्लाह आणि त्याचा पैगंबर आपल्या धर्माच्या मदतीसाठी हाक मारील, तुम्ही त्वरित त्यांच्या हाकेला होकार देऊन म्हणाल, आम्ही हजर आहोत, ज्याप्रमाणे हवारींनी हजरत ईसा यांच्या आवाहनावर म्हटले होते.

ईमान राखले आणि एका गटाने कुफ्र (इन्कार) केला,[१] तर आम्ही ईमान राखणाऱ्यांना त्यांच्या शत्रूंच्या विरोधात मदत केली (आणि) ते विजयी झाले.

# शूरह जुमअः - ६२

सूरह जुमअः मदीना येथे अवतरली, यात अकरा आयती व दोन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** आकाशांच्या आणि धरतीच्या समस्तू वस्तू अल्लाहच्या पावित्र्याचे गुणगान करतात जो बादशहा (सर्वसत्ताधीश) आणि मोठा पवित्र, वर्चस्वशाली (आणि) बुद्धिकौशल्य बाळगणारा आहे.

**२.** तोच आहे, ज्याने निरक्षर लोकांमध्ये त्यांच्यातूनच एक रसूल (पैगंबर) पाठविला, जो त्यांना त्याच्या आयती वाचून ऐकवितो आणि त्यांना स्वच्छ शुद्ध (पाक) करतो आणि त्यांना ग्रंथ व ज्ञान शिकवितो. निःसंशय हे यापूर्वी स्पष्ट अशा मार्गभ्रष्टतेत होते.

**३.** आणि दुसऱ्यांकरिताही त्यांच्यामधूनच जे अद्याप त्यांना सामील झाले नाहीत आणि तोच वर्चस्वशाली आणि हिकमत बाळगणारा आहे.

**४.** ही अल्लाहची कृपा आहे ज्याला इच्छितो आपली कृपा प्रदान करतो आणि अल्लाह मोठा कृपाळू आहे.

**५.** ज्या लोकांना तौरातनुसार काम करण्याचा आदेश दिला गेला, परंतु त्यांनी तो अमलात आणला नाही, त्यांचे उदाहरण त्या गाढवासारखे आहे ज्याने (पाठीवर) अनेक

---

(१) हे यहूदी होते, ज्यांनी ईसा (अलै.) यांच्या प्रेषितत्वाचा केवळ इन्कारच केला नाही किंबहुना त्यांच्यावर आणि त्यांच्या आईवर लांझनही लावले. काहींच्या मते हा मतभेद आणि अलगाव त्या वेळी झाला जेव्हा हजरत ईसाला आकाशात उचलून घेतले गेले. एक म्हणाला की ईसा यांच्या रूपात अल्लाह (ईश्वर) च धरतीवर प्रकट झाला होता. (असे सनातन धर्मात ईशदूतांना अवतार मानले गेले आहे.) आता तो पुन्हा आकाशात चालला गेला. हा पंथ 'याकूबिया' संबोधिला जातो. 'नस्तुरिया' पंथाचे लोक म्हणाले की ते (हजरत ईसा) अल्लाहचे पुत्र होते. पित्याने पुत्राला आकाशात बोलावून घेतले. तिसरा असे म्हणाला की ते अल्लाहचे उपासक आणि त्याचे पैगंबर (संदेशवाहक) होते. अर्थात हे सांगणारा संप्रदायच खरा व उचित होता.

ग्रंथ लादलेले असावेत.[१] अल्लाहच्या आयतींना याला खोटे ठरविणाऱ्यांचे फार वाईट उदाहरण आहे आणि अल्लाह अशा जुलमी लोकांना मार्गदर्शन करीत नाही.

**६.** सांगा की हे यहुद्यांनो! जर तुमचा हा दावा आहे की तुम्ही अल्लाहचे दोस्त आहात, इतर लोकांखेरीज, तर तुम्ही मृत्युची अभिलाषा करा जर तुम्ही सच्चे असाल.

**७.** हे मृत्युची कामना कधीही करणार नाहीत, (आपल्या) त्या कर्मांमुळे जी त्यांनी स्वहस्ते आपल्या आधी पाठविली आहेत आणि अल्लाह अत्याचारींना चांगल्या प्रकारे जाणतो.

**८.** सांगा की, ज्या मृत्युपासून तुम्ही पळ काढत आहात, तो तर तुम्हाला अवश्य येऊन गाठेल, मग तुम्ही सर्व, लपलेल्या व उघड गोष्टींना जाणणाऱ्या अल्लाहकडे परतविले जाल आणि मग तो दाखविल की तुम्ही कसकसे कर्म करीत राहिलात.

**९.** हे ईमान राखणाऱ्या लोकांनो! जुमअः (शुक्रवार) च्या दिवशी नमाजसाठी अजान दिली गेली असता तुम्ही अल्लाहच्या स्मरणाकडे त्वरित येत जा आणि खरेदी - विक्री सोडून द्या हे तुमच्यासाठी अधिक चांगले आहे, जर तुम्ही जाणत असाल.

**१०.** मग जेव्हा नमाज पूर्ण होईल तेव्हा धरतीवर (इतस्ततः) पसरा आणि अल्लाहची कृपा शोधा आणि अल्लाहचे अत्याधिक स्मरण करा, यासाठी की तुम्ही सफलता प्राप्त करून घ्यावी.

**११.** आणि जेव्हा एखादा सौदा विकताना पाहतात किंवा एखादा तमाशा दृष्टीस पडला असता त्याकडे धावतात आणि तुम्हाला उभेच सोडून देतात. (तुम्ही) सांगा की अल्लाहजवळ जे काही आहे ते खेळ आणि व्यापारापेक्षा अधिक चांगले आहे आणि अल्लाह सर्वांत चांगला रोजी देणारा (अन्नदाता) आहे.

---

(१) हे कर्महीन यहुद्यांचे उदाहरण दिले गेले आहे ज्याप्रमाणे गाढवाला ज्ञान नसते की त्याच्या पाठीवर जे ग्रंथ लादलेले आहेत, त्यांच्यात काय लिहिले आहे किंवा त्याच्यावर ग्रंथ लादले आहेत की केरकचरा. हाच प्रकार यहुद्यांचा आहे. हे तौरात ग्रंथ बाळगतात त्याच्या पठणाच्या व स्मरणात राखण्याच्या गोष्टीही करतात, परंतु त्याला ना समजून घेतात ना त्याच्या आदेशानुसार आचरण करतात, उलट त्यात फेरबदल आणि उलटसुलट करण्याचे काम करतात. यास्तव ते गाढवापेक्षाही खालच्या दर्जाचे आहेत.

# सूरह मुनाफ़िकून - ६३

सूरह मुनाफिकून मदीना येथे अवतरली आणि यात अकरा आयती आणि दोन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** दांभिक (मुनाफिक) जेव्हा तुमच्याजवळ येतात, तेव्हा म्हणतात की आम्ही या गोष्टीस साक्ष आहोत की निःसंशय, तुम्ही अल्लाहचे रसूल (पैगंबर) आहात आणि अल्लाह जाणतो की तुम्ही निःसंशय त्याचे रसूल आहात. आणि अल्लाह साक्ष देतो की हे मुनाफिक (दांभिक) निश्चितपणे खोटारडे आहेत.

**२.** त्यांनी आपल्या शपथांना ढाल बनवून ठेवले आहे, तर अल्लाहच्या मार्गापासून थांबले, निःसंशय फार वाईट आहे ता काम जे हे करीत आहेत.

**३.** हे या कारणास्तव की हे ईमान राखून पुन्हा काफिर झाले, तेव्हा त्यांच्या हृदयांवर मोहर लावली गेली आता त्यांना काहीही समजत नाही.

**४.** आणि जेव्हा तुम्ही त्यांना पाहाल तेव्हा त्यांची शरीरे तुम्हाला मनमोहक वाटतील आणि जेव्हा हे बोलू लागतील तेव्हा त्यांच्या गोष्टी (ऐकण्या) साठी कान लावाल, ज्याप्रमाणे ही लाकडे आहेत भिंतीच्या आधारे लावलेली (ते) प्रत्येक (उंच) आवाजाला आपल्याविरूद्ध समजतात. तेच वास्तविक शत्रू आहेत, त्यांच्यापासून सावध राहा, अल्लाह त्यांचा सर्वनाश करो. कोठे भरकटत जात आहेत?

**५.** आणि जेव्हा त्यांना सांगितले जाते की, या, अल्लाहच्या पैगंबराने तुमच्यासाठी क्षमा याचनेची प्रार्थना करावी, तेव्हा आपल्या माना फिरवतात आणि तुम्ही त्यांना पाहाल की ते गर्व (घमेंड) करीत थांबतात.

**६.** तुम्ही त्यांच्याकरिता माफीची प्रार्थना करणे आणि न करणे सारखेच आहे. अल्लाहच्यांना कधीही माफ करणार नाही. निःसंशय, अल्लाह अशा दुराचारी लोकांना मार्ग दाखवित नाही.

**७.** हेच ते लोक होत जे म्हणतात की जे लोक अल्लाहच्या पैगंबरासोबत आहेत, त्यांच्यावर काही खर्च करू नका, येथे पर्यंत की ते इतस्ततः व्हावेत वस्तुतः आकाशांचे

आणि जमिनीचे सर्व खजिने अल्लाहच्याच मालकीचे आहेत, परंतु या दांभिकांना हे समजत नाही.

**८.** हे म्हणतात की जर आम्ही आता परतून मदीना येथे गेलो तर प्रतिष्ठा बाळगणारा, अपमानितास तेथून बाहेर काढील. (ऐका) मान-प्रतिष्ठा तर केवळ अल्लाहकरिता आणि त्याच्या पैगंबराकरिता व ईमान राखणाऱ्यांकरिता आहे, तथापि हे दांभिक (मुनाफिक) जाणत नाहीत.

**९.** हे ईमान राखणाऱ्यांनो! तुमच्या धनसंपत्ती व संततीने तुम्हाला अल्लाहच्या स्मरणापासून गाफील न करावे[1] आणि जे असे करतील, तेच लोक नुकसान उचलणारे (तोट्यात राहणारे) आहेत.

**१०.** आणि आम्ही जे काही तुम्हाला प्रदान केले आहे, त्याच्यातून (आमच्या मार्गात) खर्च करा, यापूर्वी की तुमच्यापैकी एखाद्याला मरण यावे, तेव्हा म्हणू लागले की, हे माझ्या पालनकर्त्या! तू मला थोड्या उशिराची सवड का नाही देत? की मी दान-पुण्य करावे आणि नेक व सदाचारी लोकांपैकी व्हावे.

**११.** आणि जेव्हा एखाद्याची निर्धारित वेळ येऊन पोहोचते, मग अल्लाह त्याला काहीच सवड देत नाही आणि तुम्ही जे काही करता अल्लाह ते चांगल्या प्रकारे जाणतो.

---

# शूरह तग़ाबुन - ६४

सूरह तग़ाबुन मदीना येथे अवतरली आणि यात अठरा आयती आणि दोन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

(१) अर्थात धन-संपत्ती आणि संततीचे प्रेम तुमच्यावर इतके प्रभावी न व्हावे की तुम्ही अल्लाहने फर्माविलेल्या आदेशांपासून व कर्तव्यांपासून निर्धास्त व्हावे आणि अल्लाहने निर्धारित केलेल्या हलाल (वैध) आणि हराम (अवैध) च्या मर्यादांची काळजी न घ्यावी. मुनाफिक लोकांचा उल्लेख केल्यानंतर त्वरित ही ताकिद करण्याचा हेतू हा आहे की ही मुनाफिक लोकांची पद्धती आहे, जी माणसाला हानिग्रस्त करणारी आहे. ईमान राखणाऱ्यांचे वर्तन याच्या अगदी उलट असते आणि ते असे की ते प्रत्येक क्षणी अल्लाहचे स्मरण राखतात, अर्थात त्याच्या आदेशांचे अनिवार्य केलेल्या गोष्टींचे पालन करतात आणि हलाल व हराममध्ये फरक राखतात.

**१.** आकाशांची आणि धरतीची प्रत्येक वस्तू अल्लाहची पवित्रता वर्णन करते, त्याचीच राज्य-सत्ता आहे आणि त्याचीच स्तुती-प्रशंसा आहे. आणि तो प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्य बाळगतो.

**२.** त्यानेच तुम्हाला निर्माण केले आहे, मग तुमच्यापैकी काही काफिर (इन्कारी) आहेत आणि काही ईमान राखणारे आहेत आणि तुम्ही जे काही करीत आहात, अल्लाह ते चांगल्या प्रकारे पाहत आहे.

**३.** त्यानेच आकाशांना आणि धरतीला सत्यासह (बुद्धिकौशल्याने) निर्माण केले, त्यानेच तुमचे चेहरे मोहरे बनविले आणि खूप सुंदर बनविले आणि त्याच्याचकडे परतायचे आहे.

**४.** तो आकाशांच्या आणि जमिनीच्या सर्व वस्तूंचे ज्ञान राखतो, आणि जे काही तुम्ही लपविता आणि जाहीर करता ते सर्व तो जाणतो. अल्लाह तर छातीतल्या (मनातल्या) गोष्टी देखील जाणतो.

**५.** काय तुम्हाला या पूर्वीच्या काफिरांची खबर नाही पोहचली, ज्यांनी आपल्या कर्मांच्या परिणामांचा स्वाद चाखला, आणि ज्यांच्यासाठी दुःखदायक शिक्षा यातना आहे.

**६.** हे या कारणास्तव की त्यांच्याजवळ त्यांचे पैगंबर स्पष्ट प्रमाण (पुरावे) घेऊन आले तेव्हा ते म्हणाले की काय एक मनुष्य आम्हाला मार्गदर्शन करील?[१] आणि इन्कार केला व तोंड फिरविले आणि अल्लाहने त्यांची पर्वा केली नाही, आणि अल्लाह तर आहेच मोठा निःस्पृह, सर्वगुण संपन्न.

**७.** त्या काफिर (इन्कारी) लोकांनी असे गृहीत धरले आहे की त्यांना दुसऱ्यांदा जिवंत केले जाणार नाही. तुम्ही सांगा की का नाही? अल्लाहची शपथ! तुम्हाला अवश्य पुन्हा जिवंत केले जाईल, मग जे काही (कर्म) तुम्ही केले आहे त्याची खबर तुम्हाला दिली जाईल आणि अल्लाहकरिता हे फारच सोपे आहे.

---

(१) हे त्यांच्या इन्कारा (कुफ्र) मुळे आहे की त्यांनी हा कुफ्र, जो दोन्ही जमात त्यांच्या शिक्षा यातनेचे कारण बनला, यासाठी अंगीकारला की त्यांनी एक मनुष्याला आपला मार्गदर्शक मानण्यास इन्कार केला, अर्थात एका माणसाचे पैगंबर बनून लोकांना सन्मार्ग दाखविण्यासाठी येणे, त्यांच्यासाठी स्वीकार करण्यायोग्य नव्हते. असे आजच्या काळात देखील बिदअती (धर्मात नव्या गोष्टी सामील करणाऱ्या) लोकांसाठी पैगंबर (सल्लल्लाहु अलैहि वसल्लम) यांना मनुष्य मानणे मोठे असह्य व कठीण वाटते.

**८.** तेव्हा तुम्ही अल्लाहवर आणि त्याच्या पैगंबरावर आणि त्या दिव्य तेजावर जो आम्ही अवतरित केला आहे, ईमान राखा, आणि अल्लाह तुमच्या प्रत्येक कर्माला (चांगल्या प्रकारे) जाणून आहे.

**९.** ज्या दिवशी अल्लाह तुम्हा सर्वांना, त्या एकत्रित केले जाण्याच्या दिवशी एकत्र करील, तोच पराजय आणि विजयाचा दिवस आहे, आणि जो (मनुष्य) अल्लाहवर ईमान राखून सत्कर्म करील, अल्लाह त्याच्यापासून त्याची दुष्कर्मे दूर करील आणि त्याला जन्नतीमध्ये दाखल करील, ज्यांच्या खाली प्रवाह वाहत आहेत, ज्यांच्यात ते सदैवकाळ राहतील. हीच फार मोठी सफलता आहे.

**१०.** आणि ज्या लोकांनी कुफ्र (इन्कार) केला आणि आमच्या आयतींना खोटे ठरविले, ते सर्वच जहन्नममध्ये जाणारे आहेत, ज्यात ते नेहमी राहतील. ते मोठे वाईट ठिकाण आहे.

**११.** कोणतेही संकट अल्लाहच्या आज्ञेविना पोहचू शकत नाही आणि जो कोणी अल्लाहवर ईमान राखतो, अल्लाह त्याच्या हृदयाला मार्गदर्शन करतो, आणि अल्लाह प्रत्येक गोष्ट चांगल्या प्रकारे जाणणारा आहे.

**१२.** (लोकांनो!) अल्लाहच्या आदेशाचे पालन करा आणि पैगंबराचे आज्ञापालन करा, मग जर तुम्ही तोंड फिरविणारे व्हाल तर आमच्या पैगंबराचे कर्तव्य केवळ स्पष्टपणे (संदेश) पोहचविणे आहे.

**१३.** अल्लाहखेरीज कोणीही सच्चा माबूद (खरा उपास्य) नाही, आणि ईमान राखणाऱ्यांनी केवळ अल्लाहवरच भरवसा ठेवला पाहिजे.

**१४.** हे ईमान राखणाऱ्यांनो! तुमच्या काही पत्न्या आणि संततीपैकी काही तुमचे शत्रू आहेत, तेव्हा त्यांच्यापासून सतर्क राहा आणि जर तुम्ही माफ कराल, व सोडून द्याल आणि माफ कराल तर अल्लाह माफ करणारा, दयाळू आहे.

**१५.** तुमची धन-संपत्ती आणि तुमची संतती (तर खात्रीने) तुमची कसोटी आहे[१] आणि फार मोठा मोबदला, अल्लाहजवळ आहे.

**१६.** तेव्हा यथासंभव अल्लाहचे भय बाळगत राहा आणि ऐकत व आज्ञापालन करीत राहा, आणि (अल्लाहच्या मार्गात) दान करीत राहा, जे तुमच्यासाठी अधिक चांगले आहे आणि जे लोक आपल्या मनाच्या लालसेपासून सुरक्षित ठेवले गेले, तेच सफल आहेत.

**१७.** जर तुम्ही अल्लाहला चांगले कर्ज द्याल (अर्थात त्याच्या मार्गात खर्च कराल) तर तो ते तुमच्यासाठी वाढवित जाईल आणि तुमचे अपराधही माफ करील. आणि अल्लाह मोठा कदर करणारा आणि सहन करणारा आहे.

**१८.** तो लपलेल्या आणि उघड गोष्टी जाणणारा, जबरदस्त व हिकमतशाली आहे.

---

## सूरह तलाक़ - ६५

सूरह तलाक़ मदीना येथे अवतरली, यात बारा आयती व दोन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** हे पैगंबर! (आपल्या जनसमुदायाच्या लोकांना सांगा) जेव्हा तुम्ही आपल्या पत्न्यांना तलाक देऊ इच्छित असाल तर त्यांच्या इद्दत (ची मुदत सुरू होत) असताना तलाक द्या आणि इद्दतची गणना करा, आणि अल्लाहचे, जो तुमचा पालनकर्ता आहे. भय बाळगत राहा, ना तुम्ही त्यांना त्यांच्या घरांमधून बाहेर काढावे आणि ना त्यांनी (स्वत:) निघावे, मात्र ही गोष्ट वेगळी की त्यांनी उघडपणे दुष्कर्म करून बसावे. या अल्लाहने निर्धारित केलेल्या सीमा (मर्यादा) आहेत, आणि जो मनुष्य अल्लाहच्या मर्यादांचे उल्लंघन करील त्याने खात्रीने आपल्या स्वत:वर अत्याचार केला, तुम्ही नाही जाणत

---

(१) अर्थात जे तुम्हाला हराम कमाईसाठी प्रोत्साहित करतात आणि अल्लाहचा हक्क पूर्ण करण्यापासून रोखतात, तेव्हा या परीक्षेत तुम्ही त्याच वेळी सफल होऊ शकता जेव्हा तुम्ही अल्लाहची अवज्ञा करण्यात त्यांचे अनुसरण न कराल, अर्थात हे की धन आणि संतती, एकीकडे अल्लाहचे नजराणे आहेत तर दुसरीकडे माणसाच्या कसोटीचे साधनेही आहेत. अशा प्रकारे अल्लाह पाहतो की माझा आज्ञाधारक दास कोण आहे आणि अवज्ञाकारी कोण?

की कदाचित त्यानंतर अल्लाहने एखादी नवी गोष्ट (स्थिती) निर्माण करावी.[१]

**२.** तर जेव्हा या (स्त्रिया) आपला अवधी पूर्ण करण्याप्रत पोहचतील तेव्हा त्यांना रीतसर आपल्या विवाहबंधनात राहू द्या किंवा नियमानुसार त्यांना विभक्त करा,[२] आणि आपसात दोन न्याय करणाऱ्या माणसांना साक्षी बनवून घ्या, आणि अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी यथायोग्य साक्ष द्या, हेच ते, ज्याची शिकवण त्यांना दिली जात आहे, जे अल्लाहवर आणि कयामतच्या दिवसावर ईमान राखत असतील, आणि जो मनुष्य अल्लाहचे भय बाळगतो अल्लाह त्याच्यासाठी सुटकेचा मार्ग काढतो.

**३.** आणि त्याला अशा ठिकाणाहून रोजी (आजिविका) उपलब्ध करून देतो ज्याची त्याला कल्पनाही नसेल आणि जो मनुष्य अल्लाहवर भरवसा करील, अल्लाह त्याच्यासाठी पुरेसा असेल. अल्लाह आपले कार्य पूर्ण केल्याशिवाय राहणार नाही. अल्लाहने प्रत्येक गोष्टीचे एक अनुमान निर्धारित केलेले आहे.

**४.** तुमच्या स्त्रियांपैकी ज्या स्त्रिया मासिक पाळीबाबत निराश झाल्या असतील, जर तुम्हाला शंका असेल तर त्यांची इद्दत तीन महीने आहे, आणि त्यांचीदेखील, ज्यांना अजून मासिक पाळी सुरू झालेली नसेल, आणि गर्भवती स्त्रियांची इद्दत त्यांची प्रस्तुती होणे आहे आणि जो मनुष्य अल्लाहचे भय बाळगेल, अल्लाह त्याच्या प्रत्येक कामात सहजता निर्माण करील.

**५.** हा अल्लाहचा आदेश आहे, जो त्याने तुमच्याकडे अवतरित केला आहे, आणि जो मनुष्य अल्लाहचे भय बाळगेल, अल्लाह त्याचे अपराध मिटविल आणि त्याला फार महान मोबदला प्रदान करील.

---

(१) अर्थात पतीच्या मनात, घटस्फोटित स्त्रीविषयी ओढनिर्माण करील आणि तो तिला पुन्हा ठेवण्यास तयार होईल, जसे की पहिल्या व दुसऱ्या तलाकनंतर पतीला इद्दत (अवधी) च्या आत पुन्हा ठेवण्याचा अधिकार आहे. या सर्व काही भाष्यकारांच्या मते अल्लाहने या आयतीत फक्त एक तलाक देण्याची शिकवण दिली आहे आणि एकाच वेळी तीन तलाक देण्यापासून रोखले आहे. कारण जर त्याने एकाच वेळी तीन तलाक देऊन टाकल्यास (आणि शरीअत नियमाने ते उचितही ठरल्यास) मग हे म्हणणे व्यर्थ आहे की कदाचित अल्लाह एखादी नवीन स्थिती निर्माण करील. (फतहुल कदीर)

(२) अर्थात ज्या स्त्रीशी पतीने सहवास केला असेल आणि तिला तलाक दिला तर तिची इद्दत तीन मासिक पाळीइतकी आहे. जर तिला परत ठेवण्याचा इरादा असेल तर इद्दत पूर्ण होण्याआधीच रुजू करून घ्या, अन्यथा नियमानुसार आपल्यापासून वेगळे करा.

**६.** तुम्ही आपल्या सामर्थ्यानुसार जिथे राहात असाल तिथे त्या (घटस्फोटित) स्त्रियांना ठेवा, आणि त्यांना सतविण्याकरिता कष्ट यातना देऊ नका, आणि जर त्या गर्भवती असतील तर त्या प्रसूत होई पर्यंत त्यांना खर्च देत राहा, मग जर तुमच्या सांगण्यावरून त्याच दूध पाजतील तर तुम्ही त्यांना त्यांचे पारश्रमिक देऊन टाका, आणि आपसात चांगल्या प्रकारे सल्लामसलत करून घेत जा आणि जर तुम्ही आपसात तणाव राखाल तर त्याच्या (पित्याच्या) सांगण्यावरून दुसरी स्त्री दूध पाजेल.

**७.** धनवानाने आपल्या धन (सामर्थ्या) नुसार खर्च केला पाहिजे, आणि ज्याची जीविका (रोजी) त्याच्यासाठी कमी केली गेली असेल तर अल्लाहने जे काही त्याला देऊन ठेवले आहे, त्यातून त्याने (आपल्या सामर्थ्यानुसार) द्यावे, कोणत्याही माणसावर अल्लाह ओझे ठेवत नाही, परंतु इतकेच जेवढे सामर्थ्य त्याला दिले गेले आहे. अल्लाह गरीबीनंतर धन देखील प्रदान करेल.

**८.** आणि अनेक वस्ती (वाल्यां) नी आपल्या पालनकर्त्याच्या आदेशाची आणि त्याच्या पैगंबराची अवज्ञा केली तेव्हा आम्ही देखील त्यांचा सक्त हिशोब घेतला आणि न पाहिलेला (कठोर) अज़ाब त्यांच्यावर टाकला.

**९.** तेव्हा त्यांनी आपल्या कृत-कर्मांचा स्वाद चाखून घेतला आणि परिणामस्वरुपी त्यांचे नुकसान झाले.

**१०.** त्यांच्यासाठी अल्लाहने फार कठोर शिक्षा - यातना तयार करून ठेवली आहे, तेव्हा हे बुद्धिमान ईमानधारकांनो, अल्लाहचे भय राखा, निःसंशय, अल्लाहने तुमच्याकडे बोध - उपदेश पाठविला आहे.

**११.** (अर्थात) पैगंबर, जो तुम्हाला अल्लाहचे स्पष्ट आदेश वाचून ऐकवितो, यासाठी की त्या लोकांना, ज्यांनी ईमान राखले आणि सत्कर्म केले, त्यांना अंधाराकडून उजेडाकडे आणावे आणि जो मनुष्य अल्लाहवर ईमान राखेल आणि सत्कर्म करेल, अल्लाह त्याला अशा जन्नतमध्ये दाखल करेल, जिच्याखाली प्रवाह वाहत आहेत, ज्यात ते नेहमी नेहमी राहतील. निःसंशय, अल्लाहने त्याला सर्वांत उत्तम रोजी (जीविका) देऊन ठेवली आहे.

**१२.** अल्लाह तो आहे, ज्याने सात आकाश बनविले आणि त्याचप्रमाणे जमीन देखील.[1] त्याचा आदेश त्यांच्या दरम्यान अवतरित होतो, यासाठी की तुम्ही जाणून घ्यावे की अल्लाह प्रत्येक गोष्ट करण्यास समर्थ आहे, आणि अल्लाहने प्रत्येक गोष्टीला आपल्या ज्ञानकक्षेत घेरलेले आहे.

---

# सूरह तहरीम - ६६

सूरह तहरीम मदीना येथे अवतरली, यात बारा आयती आणि दोन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** हे पैगंबर! ज्या गोष्टीला अल्लाहने तुमच्यासाठी हलाल (वैध) केले आहे, तिला तुम्ही हराम (अवैध) का ठरविता? (काय) तुम्ही आपल्या पत्नींची प्रसन्नता प्राप्त करू इच्छिता, आणि अल्लाह मोठा माफ करणारा, मोठा दयाळू आहे.

**२.** निःसंशय, अल्लाहने तुमच्यासाठी (अशा) शपथांमधून बाहेर पडण्याचा मार्ग निर्धारित केला आहे, आणि अल्लाह तुमचा कार्यसाधक (मित्र) आहे आणि तोच (पूर्ण) ज्ञान बाळगणारा आणि हिकमतशाली आहे.

**३.** आणि (स्मरण करा) जेव्हा पैगंबरांनी आपल्या काही पत्नींना गोपनीयतेत एक गोष्ट सांगितली तर जेव्हा तिने त्या गोष्टीची वाच्यता केली, आणि अल्लाहने आपल्या पैगंबराला त्याबाबत अवगत केले, तेव्हा पैगंबरांनी काही गोष्ट तर सांगितली आणि काही सांगायचे टाळले, मग जेव्हा पैगंबरानी आपल्या त्या पत्नीला ही गोष्ट सांगितली, तेव्हा ती म्हणाली, याची खबर तुम्हाला कोणी दिली? सांगितले, सर्व काही जाणणाऱ्या, पूर्ण खबर राखणाऱ्या अल्लाहने मला याची खबर दिली आहे.

**४.** (हे पैगंबराच्या दोन्ही पत्नींनो!) जर तुम्ही अल्लाहकडे माफी मागाल (तर फार चांगले आहे). निःसंशय, तुमची हृदये झुकली आहेत आणि जर तुम्ही पैगंबराच्या

(१) 'ख़लक़ मिनल् अर्ज़ी मिस्लहुन्न' अर्थात सात आकाशांप्रमाणे अल्लाहने सात जमिनीही निर्माण केल्या आहेत. काहींनी यास अभिप्रेत सात महाद्वीप घेतले आहे, परंतु हे उचित नाही. ज्याप्रमाणे एकावर एक सात आकाश आहेत, तद्वतच सात जमिनीही आहेत. ज्यांच्या दरम्यान फरक व अंतर आहे आणि प्रत्येक जमिनीवर अल्लाहची सृष्टीनिर्मिती आबाद आहे. (अल् कुर्तबी)

विरोधात एकमेकांची मदत कराल तर निःसंशय, त्यांचा मित्र संरक्षक अल्लाह आहे आणि जिब्रील नेक ईमान राखणारे आणि त्याच्याखेरीज फरिश्तेही मदत करणारे आहेत.

**५.** जर तो (रसूल) तुम्हाला तलाक देऊन टाकील तर लवकरच त्यांना, त्यांचा पालनकर्ता (अल्लाह) तुमच्याऐवजी तुमच्यापेक्षा चांगल्या पत्न्या प्रदान करील, ज्या इस्लाम (धर्म) बाळगणाऱ्या, ईमान राखणाऱ्या, अल्लाहसमोर झुकणाऱ्या, माफी मागणाऱ्या, उपासना करणाऱ्या, रोजे (व्रत) राखणाऱ्या असतील विधवा आणि कुमारिका.

**६.** हे ईमान राखणाऱ्यांनो! तुम्ही स्वतः आपल्याला आणि आपल्या कुटुंबियांना त्या आगीपासून वाचवा,[१] जिचे इंधन मानव आणि दगड आहेत, जिच्यावर कठोर हृदयाचे सक्त फरिश्ते तैनात आहेत. ज्यांना अल्लाह जो आदेश देतो, त्याची ते अवज्ञा करीत नाहीत, किंबहुना जो काही आदेश दिला जातो त्याचे पालन करतात.

**७.** हे इन्कारी लोकांनो! आज तुम्ही (विवशता आणि) बहाणा दाखवू नका, तुम्हाला केवळ तुमच्या दुष्कर्मांचे प्रतिफळ दिले जात आहे.

**८.** हे ईमान राखणाऱ्यांनो! तुम्ही अल्लाहपुढे (खरी आणि) निखालस माफी मागा. संभवतः तुमच्या पालनकर्त्याने तुमची दुष्कर्मे मिटवावित. आणि तुम्हाला अशा जन्नतमध्ये दाखल करावे जिच्या खाली प्रवाह वाहत आहेत. ज्या दिवशी अल्लाह पैगंबराला आणि ईमान राखणाऱ्यांना, जे त्यांच्यासोबत आहेत अपमानित करणार नाही. त्यांचे दिव्य तेज (नूर) त्यांच्या पुढे आणि त्यांच्या उजवीकडे धावत असेल. हे दुआ (प्रार्थना) करत असतील की हे आमच्या पालनकर्त्या! आम्हाला संपूर्ण तेज (नूर) प्रदान कर आणि आम्हाला क्षमा कर. निःसंशय, तू प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्य बाळगणारा आहे.

---

(१) यात ईमान राखणाऱ्यांना त्याच्या एका फार मोठ्या जबाबदारीची जाणीव दिली गेली आहे आणि ती ही की आपल्यासह आपल्या कुटुंबियांचा सुधार आणि त्यांच्या इस्लामी शिक्षणाची व्यवस्था करावी, यासाठी की या सर्वांनी जहन्नमचे इंधन होण्यापासून वाचावे. यास्तव पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांनी फर्माविले की जेव्हा मूल सात वर्षांचे होईल त्याला नमाज पढण्याचा आदेश द्या, दहा वर्षांचा झाल्यावर नमाजबाबत सुस्ती करताना पाहाल तर त्यांना मार द्या. (अबू दाऊद, तिर्मिजी किताबुल सलात) धर्मज्ञानी लोकांनी सांगितले आहे की याच प्रकारे त्यांना रोजे (व्रत) राखण्यासही प्रवृत्त करावे आणि इतर धार्मिक आदेशांचे पालन करण्याची ताकीद द्यावी यासाठी की जेव्हा ते सूज्ञतेच्या वयास पोहचतील तेव्हा त्यांच्यात धार्मिक सूज्ञताही भिनलेली असेल. (इब्ने कसीर)

**९.** हे पैगंबर! काफिरांशी आणि मुनाफिक (दांभिक) लोकांशी जिहाद करा आणि त्यांच्यावर सक्ती (कठोरता) करा. त्यांचे ठिकाण जहन्नम आहे आणि ते मोठे वाईट ठिकाण आहे.

**१०.** अल्लाहने काफिर लोकांकरिता नूहच्या आणि लूतच्या पत्नींचे उदाहरण दिले आहे. या दोघी आमच्या दासांपैकी दोन नेक सदाचारी दासांच्या कुटुंबात होत्या. मग त्यांनी त्यांच्याशी विश्वासघात केला, तेव्हा ते दोन्ही (दास) त्यांच्यापासून अल्लाहच्या (कोणत्याही शिक्षा - यातनेला) रोखू शकले नाहीत आणि आदेश दिला गेला की (स्त्रियांनो!) जहन्नममध्ये जाणाऱ्यांसोबत तुम्ही दोघीही जा.

**११.** आणि अल्लाहने ईमान राखणाऱ्यांकरिता फिरऔनच्या पत्नीचे उदाहरण सांगितले. जेव्हा तिने दुआ (प्रार्थना) केली की हे माझ्या पालनकर्त्या! माझ्यासाठी आपल्या जवळ जहन्नतमध्ये एक घर बनव आणि मला फिरऔनपासून व त्याच्या कर्मांपासून वाचव आणि मला अत्याचारी लोकांपासून मुक्ती दे.

**१२.** आणि (उदाहरण दिले) इमरानची कन्या मरियमचे जिने आपल्या शील-अब्रूचे रक्षण केले, मग आम्ही आपल्यातर्फे तिच्यात प्राण (आत्मा) फुंकला आणि (मरियम) ने आपल्या पालनकर्त्याच्या वचनांचे आणि त्याच्या ग्रंथांचे समर्थन केले आणि ती उपासना करणारीं पैकी होती.

---

# सूरह मुल्क - ६७

सूरह मुल्क* मक्का येथे अवतरली, यात तीस आयती आणि दोन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** मोठा समृद्धशाली आहे तो, ज्याच्या हाती राज्य (सत्ता) आहे आणि जो प्रत्येक गोष्टीचे सामर्थ्य बाळगणारा आहे.

**२.** ज्याने जीवन आणि मृत्युला अशासाठी निर्माण केले की तुमची परीक्षा घ्यावी की तुमच्यापैकी चांगले कर्म कोण करतो आणि तो वर्चस्वशाली आणि माफ करणारा आहे.

**३.** ज्याने सात आकाश वर-खाली निर्माण केले (तेव्हा हे पाहणाऱ्यांनो!) रहमान (अल्लाह) च्या निर्मितीत कसलीही विसंगती आढळणार नाही. दुसऱ्यांदा परतून पाहा की काय एखादा (व्यंग - दोष) दिसून येतो?

**४.** मग परत पुन्हा दोन दोन वेळा पाहा, तुझी दृष्टी तुझ्याकडे अपमानित (आणि लाचार) होऊन थकलेली परत येईल.

**५.** आणि निःसंशय, आम्ही या जगाच्या आकाशाला दिव्यांनी (ताऱ्यांनी) सुशोभित केले आणि त्यांना सैतानांना मारण्याचे साधन बनविले. आणि सैतानांकरिता आम्ही (जहन्नमचा जाळणारा) अज़ाब तयार करून ठेवला आहे.

**६.** आणि आपल्या पालनकर्त्याशी इन्कार करणाऱ्यांकरिता जहन्नमचा अज़ाब (शिक्षा - यातना) आहे आणि ते किती वाईट स्थान आहे!

**७.** जेव्हा हे त्यात टाकले जातील, तेव्हा तिचा (जहन्नमचा) भयंकर आवाज ऐकतील

---

* या सूरहची श्रेष्ठता अनेक हदीसवचनांत उल्लेखित आहे, ज्यापैकी काही सहीह किंवा हसन आहेत. एकात पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांनी फर्माविले, ''अल्लाहच्या ग्रंथात एक सूरह आहे, ज्यात फक्त ३० आयती आहेत. ही माणसाची शिफारस करेल, येथपावेतो की त्याला माफ केले जाईल.'' (तिर्मिजी, अबु दाऊद, इब्ने माजा आणि मुस्नद अहमद, २/२९९,२३१) एक कथन अल्लामा अलबानी यांनी 'अस सहीहा'मध्ये उल्लेखिले आहे, 'सुरतुन तबारका मिनल आलिमतु मिन अताबिल कमर.' ''सूरह मुल्क कबरीचा अज़ाब रोखणारी आहे. (नं. १९४०, भाग ३, पेज १३१) अर्थात जो तिचे पठण करीत राहील, आशा आहे की कबरीच्या शिक्षा यातनेपासून सुरिक्षत राहील, या अटीवर की तो इस्लामचे आदेश आणि अनिवार्य गोष्टींचे पालन करीत राहील.''

आणि ती उकळत असेल.

**८.** (असे दिसेल की आताच) क्रोधातिरेकाने फाटून जाईल. जेव्हा जेव्हा त्यात एखादा समूह टाकला जाईल, तेव्हा त्याला जहन्नमचा रक्षक विचारेल की, काय तुमच्याजवळ कोणी खबरदार करणारा आला नव्हता?

**९.** ते उत्तर देतील, निःसंशय, आला तर होता, परंतु आम्ही त्याला खोटे ठरविले आणि म्हटले की अल्लाहने काहीच अवतरित केले नाही, तुम्ही फार मोठ्या मार्गभ्रष्टतेत आहात.

**१०.** आणि म्हणतील की जर आम्ही ऐकले असते किंवा समजून घेतले असते तर जहन्नमवाल्यांमध्ये (सामील) झालो नसतो.

**११.** जेव्हा त्यांनी आपले अपराध कबूल केले. आता हे जहन्नमी लोक दूर होवोत.

**१२.** निःसंशय, जे लोक आपल्या पालनकर्त्याचे न पाहताच भय बाळगतात, त्यांच्यासाठी माफी आहे आणि मोठा मोबदला आहे.

**१३.** आणि तुम्ही आपल्या गोष्टी अगदी हळू स्वरात बोला किंवा उंच आवाजात, तो तर छातीमध्ये (मनात लपलेल्या) गोष्टींनाही चांगल्या प्रकारे जाणतो.

**१४.** काय तोच नाही जाणणार, ज्याने निर्माण केले? मग तो सूक्ष्मदर्शी आणि खबर राखणाराही असावा.

**१५.** तो, तोच आहे, ज्याने तुमच्यासाठी जमिनीला सखल (आणि कोमल) बनविले, यासाठी की तुम्ही तिच्या रस्त्यांवर येणे-जाणे करीत राहावे आणि तिने दिलेल्या जीविके (अन्न-सामुग्री) ला खावे-प्यावे. त्याच्याचकडे (तुम्हाला) जिवंत होऊन उठून उभे राहायचे आहे.

**१६.** काय तुम्ही या गोष्टीपासून निर्भय झालात की आकाशांच्या स्वामीने तुम्हाला जमिनीत धसवून टाकावे आणि जमीन अकस्मात थरथरावी.

**१७.** किंवा काय तुम्ही या गोष्टीपासून निर्भय झाला आहात की आकाशांच्या स्वामीने तुमच्यावर दगडांचा वर्षाव करावा? मग तर तुम्हाला कळूनच येईल की माझे भय दाखवणे कसे होते?

**१८.** आणि त्यांच्या पूर्वी होऊन गेलेल्या लोकांनीही खोटे ठरविले होते, (तर पाहा) त्यांच्यावर माझा प्रकोप (अज़ाब) कसा झाला?

**१९.** काय हे कधी आपल्या वर पक्ष्यांना पंख पसरविताना आणि (कधी) मिटविताना पाहत नाहीत? त्यांना रहमान (अल्लाह) नेच (वातावरणात व आकाशात) आधार दिलेला आहे. निःसंशय, प्रत्येक गोष्ट त्याच्या नजरेत आहे.

**२०.** अल्लाहखेरीज तुमची कोणती सेना आहे, जी तुम्हाला मदत करू शकेल, काफिर (इन्कार करणारे) तर पूर्णतः धोक्यातच आहेत.

**२१.** जर अल्लाह आपली रोजी रोखून घेईल तर (सांगा) कोण आहे जो तुम्हाला रोजी (जीविका) देईल? किंबहुना (काफिर) तर विद्रोह आणि सत्यापासून उद्विग्न होण्यावर अडून बसले आहेत.

**२२.** काय तो मनुष्य अधिक मार्गदर्शनावर चालणारा आहे, जो तोंडघशी पडून चालत असावा की तो, जो सरळ (पायांवर) मार्गावर चालत असेल?

**२३.** सांगा की तोच (अल्लाह) आहे ज्याने तुम्हाला निर्माण केले आणि तुमचे कान, डोळे आणि हृदय बनविले, (परंतु) तुम्ही फार कमीच कृतज्ञता व्यक्त करता.

**२४.** सांगा की तोच आहे, ज्याने तुम्हाला धरतीवर (इतस्ततः) पसरविले, आणि त्याच्याचकडे तुम्ही एकत्रित केले जाल.

**२५.** आणि (काफिर) विचारतात की तो वायदा केव्हा प्रकट (पूर्ण) होईल, जर तुम्ही सच्चे असाल (तर सांगा)?

**२६.** (तुम्ही) सांगा की याचे ज्ञान तर केवळ अल्लाहलाच आहे. मी तर स्पष्टपणे खबरदार करणारा आहे.

**२७.** जेव्हा या लोकांना तो वायदा निकट आलेला आढळेल, त्या वेळी या काफिरांचे चेहरे बिघडतील, मग त्यांना सांगितले जाईल की, हेच आहे ते, ज्याची तुम्ही मागणी करीत होते.

**२८.** (तुम्ही) सांगा की, ठीक आहे. जर मला आणि माझ्या साथीदारांना अल्लाह नष्ट करील किंवा आमच्यावर दया कृपा करील (जे काही होवो, परंतु हे सांगा) की

काफिरांना (इन्कार करणाऱ्यांना) कष्टदायक शिक्षा - यातनेपासून कोण वाचविल?

**२९.** (तुम्ही) सांगा की तोच रहमान (दयावान) आहे, आम्ही त्याच्यावर ईमान राखले आणि त्याच्यावरच आम्ही भरवसा केला. तुम्हाला लवकरच माहीत पडेल की उघड (स्वरूपाच्या) मार्गभ्रष्टतेत कोण आहे?

**३०.** (तुम्ही) सांगा, ठीक आहे, बरे हे तर सांगा की जर तुमचे (पिण्याचे) पाणी जमीन शोषून घेईल तर मग कोण आहे जो तुमच्यासाठी निथारलेले साफ पाणी घेऊन येईल?

---

## सूरह कलम - ६८

सूरह कलम मक्का येथे अवतरली, यात बावन्न आयती आणि दोन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** नून. शपथ आहे कलम (लेखणी) ची,[१] आणि त्या गोष्टीची, जी काही ते (फरिश्ते) लिहितात.

**२.** तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या कृपेने वेडे नाहीत.

**३.** आणि निःसंशय, तुमच्यासाठी कधीही न संपणारा मोबदला आहे.

**४.** आणि निःसंशय, तुम्ही फार (उत्तम) स्वभावा (चारित्र्या) वर आहात.[२]

---

(१) कलमची शपथ घेतली, जिचे एक महत्त्व यासाठी आहे की याद्वारे वर्णन आणि भाष्य केले जाते. काहींच्या मते यास अभिप्रेत तो खास कलम होय, ज्याला अल्लाहने सर्वांत प्रथम निर्माण केले आणि त्यास भाग्य लिहिण्याचा आदेश दिला. यास्तव त्याने शेवटपावेतो घडणाऱ्या सर्व गोष्टी लिहिल्या. (तिर्मिजी, तफसीर सूरह नून वल कलम आणि अलबानी यांनी यास उचित म्हटले आहे.)

(२) 'खुल्के अज़ीम'शी अभिप्रेत इस्लाम धर्म किंवा पवित्र कुरआन होय. अर्थात तुम्ही त्या पद्धतीवर आहात, ज्याचा आदेश तुम्हाला अल्लाहने कुरआनात किंवा इस्लाम धर्मात दिला आहे किंवा यास अभिप्रेत ती सभ्यता, शिष्टाचार, नरमी, स्नेहशीलता, विश्वस्तता, सचोटी, गांभीर्य, श्रेष्ठता आणि इतर नैतिक गुण आहेत. हे गुण पैगंबर (सल्लल्लाहु अलैहि वसल्लाम) यांच्या चारित्र्यात त्यांच्या पैगंबर होण्यापूर्वीच होते आणि पैगंबर झाल्यानंतर ही गुणवत्ता आणखी उंचावली व विस्तृत झाली. यास्तव जेव्हा हजरत आयेशा (रजि.) यांना पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांच्या चारित्र्याबाबत विचारले गेले तेव्हा त्यांनी फर्मावले, ''काय तुम्ही कुरआन वाचले नाही?'' (मुस्लिम, किताबुल मुसाफिरीन,

**५.** तेव्हा आता तुम्हीही पाहाल आणि हे देखील पाहतील

**६.** की तुमच्यापैकी उपद्रवग्रस्त कोण आहे.

**७.** निःसंशय, तुमचा पालनकर्ता आपल्या मार्गापासून भटकणाऱ्यांना चांगल्या प्रकारे जाणतो आणि तो, मार्गदर्शन प्राप्त केलेल्यांनाही चांगल्या प्रकारे जाणतो.

**८.** तेव्हा तुम्ही खोटे ठरविणाऱ्यांचे (म्हणणे) मान्य करू नका.

**९.** ते तर इच्छितात की तुम्ही थोडे सुस्त पडावे तर हे देखील ढीले पडतील.

**१०.** आणि तुम्ही अशा एखाद्या माणसाचेही म्हणणे मान्य करू नका, जो अधिक शपथ घेणारा तुच्छ (अपमानित) असेल.

**११.** नीच (क्षुद्र), व्यंग दोष काढणारा, आणि चहाडी करणारा असेल.

**१२.** भलेपणापासून रोखणारा, मर्यादेचे उल्लंघन करणारा, अपराधी असेल.

**१३.** घमेंडी, मग त्याचसोबत वंशहीन असेल.

**१४.** (त्याची घमेंड) केवळ यासाठी आहे की तो धनवान आणि अनेक पुत्र बाळगणारा आहे.

**१५.** जेव्हा त्याच्यासमोर आमच्या आयती वाचून ऐकविल्या जातात, तेव्हा हा म्हणतो की या तर पूर्वी होऊन गेलेल्या लोकांच्या कथा-कहाण्या आहेत.

**१६.** आम्हीही त्याच्या सोंडे (नाका) वर डाग देऊ.

**१७.** निःसंशय, आम्ही त्यांची तशीच परीक्षा घेतली जशी आम्ही बागवाल्यांची घेतली होती, तेव्हा त्यांनी शपथ घेतली की सकाळ होताच त्या (बागे) ची फळे तोडून घेऊ.

**१८.** आणि इन्शा अल्लाह (जर अल्लाहने इच्छिले) म्हटले नाही.

**१९.** तेव्हा त्या (बागे) वर तुमच्या पालनकर्त्यातर्फे एक आपत्ती चारी बाजूंनी फिरून गेली आणि ते झोपतच राहिले.

---

बाबु जामेअ सलातिल लैले व मन नाम अन्हु मरेज) हजरत आयेशा यांचे उत्तर 'खुल्के अज़ीम'च्या वर उल्लेखित दोन्ही अर्थांनी युक्त आहे.

**२०.** तर ती (बाग) अशी झाली, जणू कापणी केलेले शेत.

**२१.** आता सकाळ होताच त्यांनी एकमेकांना हाक मारली

**२२.** की जर तुम्हाला फळे तोडायची आहेत तर आपल्या शेतावर सकाळीच निघा.

**२३.** मग हे सर्व हळू हळू बोलत निघाले

**२४.** की आजच्या दिवशी कोणा गरिबाने तुमच्याजवळ येऊ नये.

**२५.** आणि घाईघाईने सकाळीच पोहोचले (समजत होते) की आम्ही काबू मिळविला.

**२६.** मग जेव्हा त्यांनी बाग पाहिली, तेव्हा म्हणू लागले की, निश्चितच आम्ही रस्ता विसरलो.

**२७.** नव्हे, किंबहुना आम्ही वंचित केले गेलो.

**२८.** त्या सर्वांत जो चांगला होता, तो म्हणाला की, मी तुम्हा सर्वांना सांगत नव्हतो का तुम्ही (अल्लाहची) तस्बीह (गुणगान) का नाही करीत?

**२९.** (तेव्हा) सर्व म्हणू लागले की आमचा पालनकर्ता मोठा पवित्र आहे. निःसंशय, आम्हीच अत्याचारी होतो.

**३०.** मग ते एकमेकांकडे तोंड करून बरे-वाईट बोलू लागले.

**३१.** म्हणाले, अरेरे! निःसंशय, आम्हीच विद्रोही (अवज्ञाकारी) होतो.

**३२.** काय नवल की आमचा पालनकर्ता आम्हाला यापेक्षा चांगला मोबदला प्रदान करील. निःसंशय, आम्ही आता आपल्या पालनकर्त्याशीच आशा राखतो.

**३३.** अशाच प्रकारे अज़ाब येतो, आणि आखिरतचा अज़ाब फार मोठा आहे, त्यांना अक्कल असती तर (बरे झाले असते).

**३४.** निःसंशय, अल्लाहचे भय राखणाऱ्यांकरिता त्यांच्या पालनकर्त्याजवळ देणग्यांनी युक्त अशा जन्नती आहेत.

**३५.** काय आम्ही ईमान राखणाऱ्यांना, अपराधी लोकांसमान ठरवू?

**३६.** तुम्हाला झाले तरी काय, कसे निर्णय घेत आहात?

**३७.** काय तुमच्याजवळ एखादा ग्रंथ आहे, ज्यात तुम्ही वाचता?

**३८.** किंवा त्यात तुमच्या मनाला पसंत अशा गोष्टी आहेत?

**३९.** किंवा आमच्याकडून तुम्ही काही अशा शपथा घेतल्या आहेत, ज्या कयामत पर्यंत बाकी राहतील, की तुमच्यासाठी ते सर्व आहे, जे तुम्ही आपल्यातर्फे निर्धारित करून घ्यावे?

**४०.** त्यांना विचारा की त्यांच्यापैकी कोण या गोष्टीस जबाबदार (आणि दावेदार आहे?

**४१.** काय त्यांचे काही भागीदार आहेत? (असे असेल) तर त्यांनी आपल्या आपल्या भागीदारांना घेऊन यावे, जर ते सच्चे आहेत.

**४२.** ज्या दिवशी पोटरी उघड केली जाईल, आणि सजदा करण्यासाठी त्यांना बोलाविले जाईल (परंतु ते सजदा) करू शकणार नाहीत.[१]

**४३.** त्यांचे डोळे (नजरा) झुकलेले असतील, आणि त्यांच्यावर अपमान आच्छादित होत असेल, वस्तुतः यांना सजदा करण्याकरिता (त्या वेळीही) बोलाविले जात होते, जेव्हा ते धडधाकट होते.

**४४.** तेव्हा मला आणि या गोष्टीस खोटे ठरविणाऱ्यांना सोडून द्या. आम्ही त्यांना अशा प्रकारे हळू हळू खेचून घेऊ की त्यांना खबरही नसेल.

**४५.** आणि मी त्यांना ढील देईन (सैल सोडेन), निःसंशय, माझी उपाययोजना मोठी

---

(१) काहींनी पोटरी उघडण्याचा अर्थ कयामतची भयानकता असा घेतला आहे. परंतु एका सहीह हदीसमध्ये याचे भाष्य अशा प्रकारे केले गेले आहे की कयामतच्या दिवशी अल्लाह आपली पोटरी उघडी करील (जसे त्याच्या शान-प्रतिष्ठेस योग्य आहे) तेव्हा प्रत्येक ईमानधारक पुरुष आणि स्त्री त्याच्या पुढे सजद्यात पडतील. परंतु ते लोक बाकी राहतील, जे लोकांना दाखविण्यासाठी आणि नावाला सजदे करीत असत. ते सजदा करू इच्छितील, परंतु त्यांचा पाठीचा कणा लाकडी तक्त्यासारखा होईल, ज्यामुळे सजद्यासाठी झुकणे त्यांना अशक्य होईल. (सहीह बुखआरी, तफसीर सूरह नून वल कलम) अल्लाह ही पोटरी कशी उघडेल आणि ती कशी असेल? हे तर आम्ही जाणू शकत नाही, ना त्याचे वर्णन करू शकतो, यास्तव ज्याप्रमाणे कसल्याही उपमेविना आम्ही त्याचे कान, डोळे आणि हात वगैरे वर विश्वास राखतो, तद्वतच पोटरीची बाबही कुरआन व हदीसमध्ये उल्लेखित आहे, ज्यावर कसलेही भाष्य न करता विश्वास राखणे आवश्यक आहे. हेच सलफ आणि हदीसच्या विद्वानांचे मत आहे.

मजबूत आहे.

**४६.** काय तुम्ही त्यांच्याकडून एखादे पारिश्रमिक इच्छिता, ज्याच्या ओझ्याने हे दबले जात असावेत?

**४७.** किंवा काय यांच्याजवळ परोक्ष ज्ञान आहे, ज्यास हे लिहीत असावेत?

**४८.** तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या आदेशाची धैर्यपूर्वक प्रतीक्षा करा आणि मासेवाल्यासारखे होऊ नका, जेव्हा त्याने दुःखाच्या अवस्थेत (आपल्या पालनकर्त्यास) पुकारले.

**४९.** जर त्यास त्याच्या पालनकर्त्या (अल्लाह) च्या कृपेने प्राप्त करून घेतले नसते, तर निःसंशय, तो वाईट अवस्थेत उघड्या जमिनीवर टाकला गेला असता.

**५०.** मग त्याला त्याच्या पालनकर्त्याने निवडले आणि त्याला नेक सदाचारी लोकांमध्ये सामील केले.

**५१.** आणि निकट आहे की (या) काफिरांनी आपल्या (तीक्ष्ण) नजरेने तुम्हाला घसरून टाकले.[१] हे जेव्हा जेव्हा कुरआन ऐकतात आणि म्हणतात की हा तर खात्रीने वेडा आहे!

**५२.** आणि वास्तविक हा (कुरआन) तर समस्त जगातील लोकांकरिता पूर्ण बोध-उपदेश आहे.

---

(१) जर तुम्हाला अल्लाहची मदत आणि संरक्षण लाभले नसते तर या काफिर लोकांच्या मत्सरपूर्ण नजरेला तुम्ही वाईटरित्या बळी पडला असता अर्थात त्यांची वाईट नजर तुम्हाला लागली असती. इमाम इब्ने कसीर यांनी याचा हाच अर्थ सांगितला आहे. पुढे ते लिहितात की हे या गोष्टीचे प्रमाण आहे की दृष्ट लागणे आणि अल्लाहच्या अनुमतीने त्याचा दुसऱ्यांवर वाईट प्रभाव पडणे सत्य आहे. जसे की अनेक हदीस वचनांनी हे सिद्ध आहे आणि हदीस वचनांमध्ये त्यापासून सुरक्षित राहण्याकरिता दुआ (प्रार्थना) सांगितल्या आहेत आणि हेही सांगितले आहे की तुम्हाला जर एखादी वस्तू चांगली वाटली तर 'माशा अल्लाह' किंवा 'बारकल्लाह' म्हणत जा, यासाठी की त्यास दृष्ट न लागावी. तसेच जर कोणाला दृष्टी लागली जर फर्माविले की त्याला आंघोळ घालून त्याचे पाणी त्यावर टाकले जावे, ज्याची दृष्ट त्याला लागली आहे. (विवरणाकरिता पाहा तफसीर इब्ने कसीर आणि हदीसचे ग्रंथ) काहींनी याचा अर्थ असा केला आहे की यांनी तुम्हाला धर्माचा प्रचार करण्यापासून परावृत्त केले असते.

# सूरह हाक्क: - ६९

सूरह हाक्क: मक्का येथे अवतरली, यात बावन्न आयती आणि दोन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** सिद्ध होणारी.

**२.** काय आहे सिद्ध होणारी ?

**३.** आणि तुम्हाला काय माहीत की ती सिद्ध होणारी काय आहे ?

**४.** त्या खडकाविणारीला समूद आणि आदच्या लोकांनी खोटे ठरविले.

**५.** (परिणामी) समूद तर अतिशय तीव्र (आणि भयंकर जोराच्या) चित्काराद्वारे नष्ट केले गेले.

**६.** आणि आद, मोठ्या वेगाच्या पालापाचोळा असलेल्या वादळाद्वारे नष्ट केले गेले

**७.** ज्यास (अल्लाहने) त्यांच्यावर सतत सात रात्री आणि आठ दिवसपर्यंत लावून ठेवले. तेव्हा तुम्ही पाहिले असते की लोक जमिनीवर अशा प्रकारे चीत केले गेले आहेत जणू खजुरीची पोकळ खोडे!

**८.** तर काय त्यांच्यापैकी कोणीही तुम्हाला बाकी दिसून येत आहे ?

**९.** फिरऔन आणि त्याच्या पूर्वीचे लोक आणि ज्यांच्या वस्त्या पालथ्या घातल्या गेल्या, त्यांनीही अपराध केले.

**१०.** आणि आपल्या पालनकर्त्याच्या रसूल (पैगंबरा) ची अवज्ञा केली (शेवटी) अल्लाहने त्यांना (ही) पकडीत घेतले.

**११.** जेव्हा पाण्यात पूर आला तर त्या वेळी आम्ही तुम्हाला नौकेत चढविले.

**१२.** यासाठी की त्यास तुमच्यासाठी बोध उपदेश (आणि स्मारक) बनवावे, आणि (यासाठी की) स्मरण राखणाऱ्या कानांनी त्यास स्मरणात राखावे.

**१३.** तर जेव्हा सूर (शंखा) मध्ये एक फुंक मारली जाईल.

**१४.** आणि धरती व पर्वत उचलून घेतले जातील आणि एकाच प्रहारात कण-कण

(चुरेचूर) बनविले जातील.

**१५.** त्या दिवशी घडून येणारी घटना (कयामत) घडून येईल.

**१६.** आणि आकाश विदीर्ण होईल तर त्या दिवशी फार कमजोर होईल.

**१७.** आणि त्याच्या किनाऱ्यांवर फरिश्ते असतील आणि तुमच्या पालनकर्त्याचे आसन (अर्श) त्या दिवशी आठ फरिश्ते आपल्यावर उचलून घेतलेले असतील.

**१८.** त्या दिवशी तुम्ही सर्व हजर केले जाल, तुमचे कोणतेही रहस्य लपून राहणार नाही.

**१९.** तेव्हा त्याचे कर्मपत्र त्याच्या उजव्या हातात दिले जाईल, तेव्हा तो म्हणू लागेल की घ्या, माझे कर्मपत्र वाचा.

**२०.** मला तर पूर्ण विश्वास होता की मी आपला (कर्मांचा) हिशोब प्राप्त करणारा आहे.

**२१.** तर तो एका सुख-संपन्न जीवनात असेल

**२२.** उच्च (आणि सुंदर) जन्नतमध्ये.

**२३.** जिची फळे खाली झुकलेली असतील.

**२४.** (त्यांना सांगितले जाईल) की मजेने खा व प्या, आपल्या त्या कर्मांच्या मोबदल्यात जी तुम्ही मागच्या काळात केलीत.

**२५.** परंतु ज्याला त्याचे कर्मपत्र डाव्या हातात दिले जाईल, तर तो म्हणेल की अरेरे! मला माझे कर्मपत्र दिले गेले नसते.

**२६.** आणि मी जाणतच नाही की हिशोब काय आहे.

**२७.** मृत्युनेच माझे काम संपविले असते तर (बरे झाले असते)

**२८.** माझ्या धनानेही मला काही लाभ पोहचविला नाही.

**२९.** माझे राज्यही माझ्यापासून दुरावले.

**३०.** (आदेश होईल) धरा त्याला, मग त्याच्या गळ्यात जोखंड (तौक) टाका.

**३१.** मग त्याला जहन्नममध्ये टाका.

**३२.** मग त्याला अशा साखळीत की जिचे माप सत्तर हाताचे आहे, जखडून टाका.

**३३.** नि:संशय, हा महान अल्लाहवर ईमान राखत नव्हता.

**३४.** आणि गरीबाला जेवू  घालण्यावर प्रोत्साहित करीत नव्हता.

**३५.** तर आज इथे त्याचा ना कोणी मित्र आहे

**३६.** आणि ना पू खेरीज त्याचे एखादे भोजन आहे

**३७.** ज्यास अपराधी लोकांशिवाय कोणीही खाणार नाही.

**३८.** तेव्हा मला शपथ आहे त्या वस्तूंची, ज्यांना तुम्ही पाहता

**३९.** आणि त्या वस्तूंची, ज्यांना तुम्ही पाहत नाही.

**४०.** की नि:संशय, हा (कुरआन) प्रतिष्ठित पैगंबराचे कथन आहे.[१]

**४१.** ही एखाद्या कवीची कल्पना नव्हे (अरेरे!) तुम्ही फार कमी विश्वास राखता.

**४२.** आणि ना एखाद्या ज्योतिषीचे कथन आहे. (खेद आहे) तुम्ही फार कमी बोध ग्रहण करता.

**४३.** (हे तर) समस्त विश्वांच्या पालनकर्त्याने अवतरित केले आहे.

**४४.** आणि जर याने एखादी गोष्ट (मनाने) रचून, तिचा संबंध आमच्याशी जोडला असता.

**४५.** तर आम्ही त्याचा उजवा हात अवश्य धरला असता.

**४६.** मग त्याच्या हृदयाची शीर (नस) कापून टाकली असती.

---

(१) प्रतिष्ठित पैगंबराशी अभिप्रेत मुहम्मद सल्लल्लाहु अलैहि वसल्लम होत. आणि कथनाशी अभिप्रेत पठण करणे अथवा असे कथन, ज्यास हा प्रतिष्ठित पैगंबर अल्लाहतर्फे तुम्हास पोहचवितो. कारण कुरआन पैगंबराचे किंवा जिब्रीलचे स्वत:चे कथन नाही, किंबहुना अल्लाहचे कथन आहे, जे त्याने फरिश्त्याद्वारे आपल्या पैगंबरावर अवतरित केले, मग त्यानंतर पैगंबरांनी लोकांपर्यंत पोहचविले आहे.

**४७.** मग तुमच्यापैकी कोणीही (मला) तसे करण्यापासून रोखणारा नसता.

**४८.** निःसंशय, हा (कुरआन) अल्लाहचे भय बाळगणाऱ्यांकरिता बोध - उपदेश आहे.

**४९.** आणि आम्ही पूर्णतः जाणून आहोत की तुमच्यापैकी काहीजण याला खोटे ठरविणारे आहेत.

**५०.** निःसंशय, (हे खोटे ठरविणे) काफिरांकरिता पश्चात्तापकारक आहे.

**५१.** आणि निःसंशय, हे अगदी खात्रीचे सत्य आहे.

**५२.** तेव्हा तुम्ही आपल्या महिमावान (महामहीम) पालनकर्त्याच्या पावित्र्याचे गुणगान करा.

---

# सूरह मआरिज - ७०

सूरह मआरिज मक्का येथे अवतरली, यात चव्वेचाळीस आयती आणि दोन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** एका मागणी करणाऱ्याने त्या अज़ाब (शिक्षा - यातने) ची मागणी केली जो घडून येणार आहे.

**२.** काफिरांवर, ज्याला कोणी हटविणारा नाही.

**३.** या अल्लाहतर्फे, जो शिड्या बाळगणारा आहे.

**४.** ज्याच्याकडे फरिश्ते आणि आत्मा चढून जातात एका दिवसात, ज्याची मुदत पन्नास हजार वर्षांची आहे.

**५.** तेव्हा तुम्ही चांगल्या प्रकारे धीर संयम राखा.

**६.** निःसंशय, हे त्या (अज़ाब) ला दूर समजतात.

**७.** आणि आम्ही त्याला जवळ असल्याचे पाहतो.

**८.** ज्या दिवशी आकाश वितळलेल्या धातूसारखे होईल.

**९.** आणि पर्वत रंगीत लोकरीसारखे होतील.

**१०.** आणि कोणी मित्र कोणा मित्राला विचारणार नाही.

**११.** (जरी ते) एकमेकांना दाखविले जातील. अपराधी, त्या दिवसाच्या शिक्षा - यातनेच्या मोबदल्यात (दंड म्हणून) आपल्या पुत्रांना देऊ इच्छिल.

**१२.** आपल्या पत्नीला आणि आपल्या भावाला.

**१३.** आणि आपल्या कुटुंबाला, जे त्याला आश्रय देत होते.

**१४.** आणि जमिनीवरील समस्त लोकांना, यासाठी की यांनी त्याला मुक्ती मिळवून द्यावी.

**१५.** (परंतु) हे कदापि होणार नाही. निःसशय, तो (धगधगणाऱ्या) निखाऱ्यांची (आग) आहे.

**१६.** जी (तोंडाची व डोक्याची) त्वचा सोलून काढणारी आहे.

**१७.** ती अशा त्या प्रत्येक माणसाला हाक मारील, जो मागे हटतो आणि विमुख होतो.

**१८.** आणि गोळा (जमा) करून सांभाळून ठेवतो.

**१९.** निःसंशय, मनुष्य मोठ्या कच्च्या हृदयाचा बनविला गेला आहे.

**२०.** जेव्हा त्याला कष्ट - यातना पोहचते, तेव्हा भयचिंतीत होतो.

**२१.** आणि जेव्हा त्याला सुख प्राप्त होते, कंजूसपणा करू लागतो.

**२२.** परंतु ते नमाज पढणारे.

**२३.** जे आपल्या नमाजचे वक्तशीर पालन करणारे आहेत.[१]

---

(१) अर्थात पूर्णतः ईमान राखणारे एकेश्वरवादी त्यांच्यात वर सांगितलेले वैगुण्य नसते. किंबहुना याच्या उलट ते सद्‌गुणांनी युक्त असतात. रोज नित्यनेमाने नमाज पढण्याचा अर्थ असा की ते नमाजबाबतच सुस्ती दिरंगाई करीत नाही. ते प्रत्येक नमाज तिच्या ठरलेल्या वेळेवर अगदी वक्तशीरपणे अदा करतात. कोणतेही काम त्यांना नमाजपासून रोखत नाही आणि जगाचा कोणताही

**२४.** आणि ज्यांच्या धन-संपत्तीत निर्धारित हिस्सा आहे.

**२५.** याचकांचाही आणि याचना करण्यापासून अलिप्त राहणाऱ्यांचाही.

**२६.** आणि जे न्यायाच्या दिवसावर विश्वास राखतात.

**२७.** आणि जे आपल्या पालनकर्त्याच्या शिक्षेचे भय बाळगत राहतात.

**२८.** निःसंशय, त्यांच्या पालनकर्त्याची शिक्षा यातना, निर्धास्त होण्याची बाब नाही.

**२९.** आणि जे लोक आपल्या लज्जास्थानां (गुप्तांगां) चे (हराम कृत्यापासून) रक्षण करतात.

**३०.** पंरतु आपल्या पत्नींच्या आणि आपल्या दासींच्याखेरीज ज्यांचे ते मालक (स्वामी) आहेत, या बाबतीत ते निंदनीय नाहीत.

**३१.** आता जो कोणी याच्याखेरीज (मार्ग) शोधेल, तर असे लोक मर्यादेचे उल्लंघन करणारे ठरतील.

**३२.** आणि जे आपल्या अनामती (ठेवी) ची, आणि आपल्या वायद्या-वचनांची व प्रतिज्ञेची कास बाळगतात.

**३३.** आणि जे आपल्या साक्षींवर सरळ (आणि अटळ) राहतात.

**३४.** आणि जे आपल्या नमाजांचे संरक्षण करतात.

**३५.** हेच लोक जन्नतमध्ये मान - प्रतिष्ठा राखणारे असतील.

**३६.** तेव्हा, या काफिरांना झाले तरी काय की ते तुमच्याकडे धावत येतात.

**३७.** उजव्या आणि डाव्या बाजूने, समूहासमूहाने.

**३८.** काय त्यांच्यापैकी प्रत्येकजण असे इच्छितो की त्यांना देणग्यांनी युक्त (ऐश-आरामाच्या) जन्नतमध्ये प्रवेश लाभेल ?

**३९.** (असे) कदापि होणार नाही. आम्ही त्यांना त्या (वस्तू) पासून निर्माण केले आहे,

---

लाभ त्यांना नमाज पढण्यापासून विमुख (गाफील) करीत नाही.

जिला ते जाणतात.

**४०.** तेव्हा मला शपथ आहे दोन्ही पूर्व आणि पश्चिम (दिशां) च्या पालनकर्त्याची की आम्ही निश्चतपणे समर्थ आहोत.

**४१.** या गोष्टीवर की त्यांच्याऐवजी त्यांच्यापेक्षा चांगले लोक आणावेत, आणि आम्ही लाचार विवश नाहीत.

**४२.** तेव्हा तुम्ही त्यांना भांडत-खेळत (असलेले) सोडा, येथे पर्यंत की हे आपल्या त्या दिवसाला जाऊन मिळावेत, ज्याचा वायदा त्यांच्याशी केला जात आहे.

**४३.** ज्या दिवशी कबरीमधून हे धावत पळत बाहेर पडतील, जणू काही ते साध्य-चिन्हाकडे वेगाने जात आहेत.

**४४.** त्यांचे डोळे (नजरा) झुकलेले असतील, त्यांच्यावर अपमानाचे सावट (पसरलेले) असेल. हाच तो दिवस, ज्याचा त्यांच्याशी वायदा केला जात होता.

---

# सूरह नूह - ७१

सूरह नूह मक्का येथे अवतरली, यात अठ्ठावीस आयती आणि दोन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** निःसंशय, आम्ही नूह (अलै.) यांना त्यांच्या जनसमूहाकडे पाठविले की आपल्या जनसमूहाला खबरदार करा (आणि सावध करा) यापूर्वी की त्यांच्याजवळ दुःखदायक अज़ाब (शिक्षा - यातना) येऊन पोहचावा.

**२.** (नूह अलै.) म्हणाले, हे माझ्या जनसमूहाच्या लोकांनो! मी तुम्हाला स्पष्टपणे खबरदार करणारा आहे.

**३.** की तुम्ही अल्लाहची उपासना करा आणि त्याचेच भय बाळगा आणि माझे म्हणणे मान्य करा.

**४.** तर तो तुमचे अपराध माफ करील, आणि तुम्हाला एका निर्धारित वेळे पर्यंत सवड

देईल.[१] नि:संशय, अल्लाहचा वायदा (निर्धारित समय) जेव्हा येतो, तेव्हा तो टळत नाही. तुम्हाला हे माहीत असते तर (बरे झाले असते!)

**५.** (नूह) म्हणाले, हे माझ्या पालनकर्त्या! मी आपल्या जनसमूहाच्या लोकांना रात्रंदिवस तुझ्याकडे बोलाविले आहे.

**६.** तथापि माझ्या बोलाविण्याने हे लोक पळ काढण्यात आणखी वाढतच गेले.

**७.** आणि जेव्हा जेव्हा मी त्यांना बोलाविले, यासाठी की तू त्यांना माफ करावे, तेव्हा त्यांनी आपली बोटे आपल्या कानात खुपसलीत आणि आपली वस्त्रे (अंगावर) टाकून घेतली, आणि अडून राहिले व मोठा अहंकार केला.

**८.** मग मी त्यांना उंच स्वरात बोलाविले.

**९.** आणि नि:संशय, मी त्यांना उघडपणेही सांगितले व गुपचुपरित्याही.

**१०.** आणि मी म्हणालो की आपल्या पालनकर्त्याकडून आपले अपराध माफ करवून घ्या (आणि क्षमा-याचना करा). नि:संशय, तो मोठा माफ करणारा आहे.

**११.** तो तुमच्यावर आकाशाला खूप पर्जन्यवृष्टी करताना सोडील.

**१२.** आणि तुम्हाला धन-संपत्ती आणि संततीच्या विपुलतेत वाढविल, आणि तुम्हाला बाग प्रदान करील व तुमच्यासाठी प्रवाह जारी करील.

**१३.** तुम्हाला झाले तरी काय की तुम्ही अल्लाहच्या महानतेवर विश्वास करीत नाही.

**१४.** वास्तविक त्याने तुम्हाला अनेकरित्या निर्माण केले आहे.

**१५.** काय तुम्ही पाहत नाही की अल्लाहने कशा प्रकारे वर खाली सात आकाश निर्माण केले आहेत?

**१६.** आणि त्या चंद्राला खूप झगमगणारा बनविले आणि सूर्याला तेजस्वी दीप बनविले.

---

(१) अर्थात ईमान राखण्याच्या स्थितीत, तुमच्या मृत्युचा आणि जो निर्धारित आहे, तो टळून तुम्हाला दीर्घायुष्य प्रदान करील आणि तो अज़ाब तुमच्यावरून दूर करील, जो ईमान न राखण्याच्या स्थितीत तुमच्या नशिबी होता. या आयतीद्वारे हे सांगितले गेले आहे की, आज्ञापालन, सत्कर्म व सदाचरण, नातेवाईकांशी सद्व्यवहार केल्याने आयुष्य वाढते. हदीसमधील उल्लेखानुसार 'मिल्लतुर्रहीमी तज़िजुफील उमुर.' ''नातेवाईकांशी सद्व्यवहार आयुष्य वाढण्याचे कारण आहे.'' (इब्ने कसीर)

**१७.** आणि तुम्हाला जमिनीतून (एका विशेष पद्धतीने) उगविले (निर्माण केले आहे)

**१८.** मग तुम्हाला तिच्यातच परतविल आणि (एका विशेषरितीने) पुन्हा तुम्हाला बाहेर काढील.

**१९.** आणि तुमच्यासाठी धरतीला अल्लाहने बिछाईत बनविले.

**२०.** यासाठी की तुम्ही तिच्या विस्तृत मार्गावर चालावे फिरावे.

**२१.** (नूह) म्हणाले की हे माझ्या पालनकर्त्या! त्या लोकांनी माझी अवज्ञा केली, आणि अशांचे आज्ञापालन केले, ज्यांच्या संपत्ती व संततीने त्यांच्या नुकसानातच भर घातली.

**२२.** आणि त्या लोकांनी फार मोठा धोका (कपट) केला.

**२३.** आणि ते म्हणाले की कधीही आपल्या दैवतांना सोडू नका, आणि ना वद्द, सुवाअ, यगूस, यअुक आणि नस्त्रला (सोडा).[१]

**२४.** आणि त्यांनी अनेक लोकांना मार्गभ्रष्ट केले. (हे पालनकर्त्या!) तू या अत्याचारी लोकांच्या मार्गभ्रष्टतेत आणखी वाढ कर.

**२५.** हे लोक आपल्या अपराधांपायी (पाण्यात) बुडविले गेले आणि जहन्नममध्ये पोहचविले गेले आणि अल्लाहखेरीज त्यांना आपला कोणी मदत करणारा आढळला नाही.

---

(१) ही नूह यांच्या जनसमूहातील पाच सदाचारी माणसे होती, ज्यांची ते लोक उपासना करत असत आणि त्यांची एवढी ख्याती झाली की असब देशातही त्यांची पूजा होत राहिली. उदा. 'वद्द' दूमतुल जनदल (ठिकाणी) कल्ब कबिल्याचा, 'सुवाअ' समुद्रतटाचा कबिला हुजैलचा, 'यगूस' सबाजवळील जुर्फ नावाच्या ठिकाणी मुराद व बनू गुतैफचा. 'यऊक' हमदान कबिल्याचा आणि 'नस्त्र' हिम्यर जमातीचा कबिला जुल कलाअचा उपास्य होता. (इब्ने कसीर, फतहुल कदीर) हे पाचही लोक नूह जनसमूहाचे नेक सदाचारी लोक होते. जेव्हा हे मरण पावले, तेव्हा सैतानाने त्यांच्या श्रद्धाळूंना म्हटले की त्यांचे चित्र (फोटो) बनवून आपल्या घरात आणि दुकानात ठेवा, यासाठी की त्यांचे स्मरण राहावे आणि त्यांचे ध्यान धरून तुम्हीही सत्कर्म करीत राहा. जेव्हा हे चित्र बनवून ठेवणारे मरण पावले, तेव्हा त्याच्या वंशजांना सैतानाने हे सांगून शिर्कच्या अपराधात ग्रस्त केले की तुमचे पूर्वज तर यांची भक्ती उपासना करीत असत. ज्यांचे चित्र तुमच्या घरांमध्ये लावलेले आहे, यास्तव त्यांनी त्यांची पूजा सुरू केली. (सहीह बुखारी, तफसीर सूरह नूह)

**२६.** आणि (नूह) म्हणाले की हे माझ्या पालनकर्त्या! तू या धरतीवर कोणत्याही काफिराला (इन्कार करणाऱ्याला) वास्तव्य करणारा सोडू नकोस.

**२७.** जर त्यांना तू सोडशील तर निःसंशय हे तुझ्या दुसऱ्या दासांनाही मार्गभ्रष्ट करतील आणि हे दुष्कर्म करणाऱ्या काफिरांनाच जन्म देतील.

**२८.** हे माझ्या पालनकर्त्या! तू मला आणि माझ्या माता-पित्याला आणि जे देखील ईमान राखून माझ्या घरात येतील आणि समस्त ईमानधारक पुरुषांना आणि समस्त ईमानधारक स्त्रियांना माफ कर आणि काफिरांना विनाशाखेरीज अन्य कोणत्याही गोष्टीत वृद्धिंगत करू नकोस.

---

## सूरह जिन्न - ७२

सूरह जिन्न मक्का येथे अवतरली, यात अठ्ठावीस आयती आणि दोन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** (हे मुहम्मद स.) तुम्ही सांगा की मला वहयी (प्रकाशना) केली गेली आहे की जिन्नांच्या एका समूहाने (कुरआन) ऐकले आणि म्हटले की आम्ही मोठे आश्चर्यकारक कुरआन ऐकले आहे.

**२.** जो सत्य मार्ग दाखवितो आम्ही तर त्यावर ईमान राखले, (आता) आम्ही कधीही आपल्या पालनकर्त्याचा दुसऱ्या एखाद्याला सहभागी बनविणार नाही.

**३.** आणि निःसंशय, आमच्या पालनकर्त्याची शान (महानता) अति उच्च आहे, त्याने ना कोणाला (आपली) पत्नी बनविले आहे आणि ना संतती.

**४.** आणि निःसंशय, आमच्यातला मूर्ख, अल्लाहविषयी खोट्या गोष्टी बोलत होता.

**५.** आणि आम्ही तर हेच समजत राहिलो की मनुष्य आणि जिन्न अल्लाहविषयी कधीही खोटे बोलणार नाहीत.

**६.** वस्तुतः काही माणसे, काही जिन्नांकडे शरण मागत होते, ज्यामुळे जिन्नांच्या उदंडतेत अधिकच भर पडली.

**७.** आणि (मानवां) नी देखील जिन्नांप्रमाणे हे गृहीत धरले होते की अल्लाह कधीही कोणाला पाठविणार नाही (किंवा कोणाला दुसऱ्यांदा जिवंत करणार नाही).

**८.** आणि आम्ही आकाशाचे निरीक्षण करून पाहिले तेव्हा ते सक्त पहारेकऱ्यांनी आणि प्रखर अग्नि-शिखांनी (ज्वालांनी) भरलेले आढळले.

**९.** आणि याच्यापूर्वी आम्ही गोष्टी (बोलणे) ऐकण्याकरिता आकाशात ठिकठिकाणी बसत असू, आता जो देखील कान लावतो, त्याला एक ज्वाला आपल्यावर टपून असल्याचे आढळते.

**१०.** आणि आम्ही नाही जाणत की धरतीवर राहणाऱ्यांशी एखाद्या वाईट गोष्टीचा इरादा केला गेला आहे की त्यांच्या पालनकर्त्याचा इरादा त्यांच्याशी भलाईचा आहे.

**११.** आणि हे की (निःसंशय) आमच्यापैकी काही तर नेक सदाचारी आहेत आणि काही त्याच्या विपरीत आहेत. आम्ही अनेक प्रकारे विभागलेलो आहोत.

**१२.** आणि आम्हाला (आता) पूर्ण खात्री झाली की आम्ही अल्लाहला धरतीत कधीही विवश करू शकत नाही आणि ना आम्ही पळून जाऊन त्याला परास्त करू शकतो.

**१३.** आणि आम्ही मार्गदर्शनाची गोष्ट ऐकताच तिच्यावर ईमान राखले आणि जो देखील आपल्या पालनकर्त्यावर ईमान राखेल, त्याला ना एखाद्या हानीचे भय आहे ना अत्याचारा (व दुःखा) चे.

**१४.** आणि आमच्यापैकी काही मुस्लिम आहेत तर काही अन्यायी आहे, तेव्हा जे मुस्लिम झाले, त्यांनी सन्मार्ग शोधून घेतला.

**१५.** आणि जे अत्याचारी आहेत, ते जहन्नमचे इंधन बनले.

**१६.** आणि हे की जर हे लोक सरळ मार्गावर दृढपणे राहिले असते, तर अवश्य आम्ही त्यांना भरपूर पाणी पाजले असते.

**१७.** यासाठी की आम्ही यात त्यांची परीक्षा घ्यावी आणि जो मनुष्य आपल्या पालनकर्त्याच्या स्मरणापासून तोंड फिरविल, तर अल्लाह त्याला कठोर शिक्षा - यातनेत टाकील.

**१८.** आणि हे की मस्जिद केवळ अल्लाहच्याचकरिता (खास) आहेत. तेव्हा

अल्लाहसोबत दुसऱ्या कोणाला पुकारु नका.[१]

**१९.** आणि जेव्हा अल्लाहचा दास (उपासक) त्याच्या उपासनेसाठी उभा राहिला तेव्हा निकट होते की ते जमावाजमावाने त्याच्यावर तुटून पडावेत.[२]

**२०.** (तुम्ही) सांगा की, मी तर केवळ आपल्या पालनकर्त्यास पुकारतो आणि त्याच्यासोबत दुसऱ्या कोणाला सहभागी बनवित नाही.

**२१.** सांगा, मला तुमच्या बाबतीत कसल्याही लाभ-हानीचा अधिकार नाही.

**२२.** सांगा की मला अल्लाहपासून कधीही कोणी वाचवू शकत नाही, आणि मी कधीही त्याच्याखेरीज एखादे आश्रयस्थान प्राप्त करू शकत नाही.

**२३.** तथापि (माझे काम) तर केवळ अल्लाहची वाणी आणि त्याचा संदेश (लोकांना) पोहचविणे आहे (आता) जो देखील अल्लाह आणि त्याच्या पैगंबराची अवज्ञा करील तर त्याच्यासाठी जहन्नमची आग आहे, जिच्यात असे लोक सदैव राहतील.

**२४.** येथेपर्यंत की, जेव्हा ते तिला पाहून घेतील, जिचा त्यांना वायदा दिला जात आहे, तेव्हा निकट भविष्यात जाणून घेतील की कोणाचा सहाय्यक कमजोर आणि कोणाचा समूह (संख्येने) कमी आहे.

**२५.** (तुम्ही) सांगा की मला नाही माहीत की ज्या गोष्टीचा वायदा तुमच्याशी केला

---

(१) 'मसजिद'चा अर्थ सजदा करण्याचे स्थान. सजदा नमाजचा एक स्तंभ (अनिवार्य कृती) आहे. यास्तव नमाज पढण्याच्या ठिकाणास मस्जिद म्हणतात. आयतीचा अर्थ स्पष्ट आहे की मस्जिदीचा उद्देश केवळ एक अल्लाहची उपासना होय. यास्तव मस्जिदींमध्ये दुसऱ्या कोणाची उपासना, दुसऱ्या कोणाला दुआ (प्रार्थना), आर्जव, गाऱ्हाणे किंवा त्यास मदतीसाठी पुकारणे वैध नाही. जर इथेही अल्लाहखेरीज दुसऱ्या कोणाला पुकारले जाऊ लागले तर हे फार वाईट आणि मोठे अत्याचाराचे कृत्य ठरेल. परंतु दुर्दैवाने नामधारी मुसलमान आता मस्जिदींमध्येही अल्लाहसोबत इतरांना मदतीसाठी पुकारतात किंबहुना मस्जिदीत असे शिलालेख (तक्ते) लावून ठेवले आहेत की ज्यात अल्लाहला सोडून दुसऱ्यांना मदतीसाठी पुकारले गेले आहे.

(२) 'अब्दुल्लाह' (अल्लाहचा दास) शी अभिप्रेत पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम होत. अर्थात जिन्न आणि मानव दोघे मिळून इच्छितात की अल्लाहचे हे दिव्य तेज (नूर) आपल्या फुंकींनी विझवावे. याचे दुसरेही अर्थ सांगितले गेले आहेत, परंतु इमाम इब्ने कसीर यांनी उपरोक्त अर्थास प्राधान्य दिले आहे.

जात आहे, ती जवळ आहे की माझा पालनकर्ता त्याकरिता लांबची मुदत निर्धारित करील.

**२६.** तोच परोक्ष ज्ञाता आहे आणि आपल्या परोक्ष (ज्ञाना) ने तो कोणालाही अवगत करवित नाही.

**२७.** मात्र त्या रसूल (पैगंबरा) खेरीज, ज्याला तो पसंत करील,[१] यासाठी की त्याच्याही पुढे - मागे पहारेकरी (संरक्षक) तैनात करतो.

**२८.** यासाठी की हे कळून घ्यावे की त्यांनी आपल्या पालनकर्त्याचे संदेश पोहचविलेत. अल्लाहने त्यांच्या निकटच्या गोष्टींना घेरून ठेवले आहे आणि प्रत्येक गोष्टीची गणना करून ठेवली आहे.

---

## सूरह मुज्जम्मिल - ७३

सूरह मुज्जम्मिल मक्का येथे अवतरली, यात वीस आयती आणि दोन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** हे चादरीत लपेटून घेणाऱ्या,

**२.** रात्री (तहज्जुदच्या नमाजसाठी) उठून उभे राहा, परंतु थोडा वेळ.

**३.** अर्धी रात्र किंवा त्यापेक्षाही काही कमी.

**४.** किंवा त्यावर वाढवून आणि कुरआनाचे थोडे थांबून थांबून (स्पष्टतः) पठण करा.

---

(१) अर्थात आपल्या पैगंबराला काही परोक्ष गोष्टींची खबर करवितो, ज्याचा संबंध एकतर संदेश पोहचविण्याशी असतो किंवा त्याच्या रसूल होण्याचे पुरावे असतात. उघड आहे की अल्लाहद्वारे सूचित केल्याने रसूल गैब (परोक्ष) चा जाणणारा ठरू शकत नाही, कारण जर स्वतः पैगंबरालाही गैबचे ज्ञान असते, तर अल्लाहतर्फे त्याला गैबच्या गोष्टींची खबर देण्याची गरजच काय? अल्लाह आपले परोक्ष ज्ञान त्याच वेळी आपल्या रसूलवर प्रकट करतो, जेव्हा तो ते पहिल्यापासून जाणत नसतो, अर्थात हे निर्विवाद सत्य आहे की गैब (परोक्ष) ज्ञान केवळ अल्लाहलाच आहे. जसे की या ठिकाणी स्पष्टतः सांगितले गेले आहे.

**५.** नि:संशय, आम्ही तुमच्यावर एक भारदस्त गोष्ट लवकरच अवतरित करू.

**६.** नि:संशय, रात्रीचे उठणे मनाच्या एकाग्रतेकरिता फार योग्य आहे आणि कथनास मोठे दुरुस्त (उचित) करणारे आहे.

**७.** निश्चितच, दिवसा तुम्हाला अनेक कामे असतात.

**८.** आणि तुम्ही आपल्या पालनकर्त्याचे नाम:स्मरण करीत जा आणि संपूर्ण सृष्टी (निर्मिती) पासून अलग होऊन त्याच्याकडे ध्यानमग्न व्हा.

**९.** पूर्व आणि पश्चिमेचा स्वामी, ज्याच्याखेरीज कोणीही उपास्य नाही. तुम्ही त्यालाच आपला कार्यसाधक (व संरक्षक) बनवा.

**१०.** आणि जे काही ते सांगतात, तुम्ही ते सहन करीत राहा आणि त्यांना चांगल्या प्रकारे सोडून द्या.

**११.** आणि मला व त्या खोटे ठरविणाऱ्या सुसंपन्न लोकांना सोडून द्या, आणि त्यांना थोडी सवड द्या.

**१२.** नि:संशय, आमच्याजवळ कठोर बेड्या आहेत, आणि धगधग पेटत असलेली जहन्नम आहे.

**१३.** आणि गळ्यात अडकणारे जेवण आहे आणि दु:खदायक अज़ाब आहे.

**१४.** ज्या दिवशी धरती आणि पर्वत कंपित होतील आणि पर्वत भुरभुरित वाळूच्या टेकड्यांसारखे होतील.

**१५.** नि:संशय, आम्ही तुमच्याकडेही तुमच्यावर साक्ष देणारा पैगंबर पाठविला आहे, जसा आम्ही फिरऔनकडे रसूल (पैगंबर) पाठविला होता.

**१६.** तेव्हा फिरऔनने त्या पैगंबराची अवज्ञा केली तर आम्ही त्याला घोर संकटात धरले.

**१७.** तुम्ही जर इन्कारी राहाल तर त्या दिवशी कसे सुरक्षित राहाल, जो दिवस लहान बालकांना वृद्ध करून टाकील.[१]

---

(१) कयामतच्या दिवसाची भयानकता एवढी जास्त असेल की खरोखर लहान बालके म्हातारी

**१८.** ज्या दिवशी आकाश विदीर्ण होईल, अल्लाहचा हा वायदा पूर्ण झाल्याशिवाय राहणार नाही.

**१९.** निःसंशय, हा बोध (उपदेश) आहे, तेव्हा जो इच्छिल त्याने आपल्या पालनकर्त्याकडे (जाण्या) चा मार्ग पत्करावा.

**२०.** निःसंशय, तुमचा पालनकर्ता चांगल्या प्रकारे जाणतो की तुम्ही आणि तुमच्यासोबत असलेल्या लोकांचा एक समूह सुमारे दोन तृतियांश रात्रीला आणि अर्ध्या रात्रीला आणि एक तृतियांश रात्रीला (तहज्जुदच्या नमाजसाठी) उभे राहतात, आणि रात्र-दिवसाचे पूर्ण अनुमान अल्लाहलाच आहे. तो (चांगल्या प्रकारे) जाणतो की तुम्ही ते मुळीच निभावू शकणार नाहीत, तेव्हा त्याने तुमच्यावर कृपा केली, यास्तव जेवढे कुरआन पठण करणे तुम्हाला सहज असेल, तेवढेच पठण करा. तो जाणतो की तुमच्यापैकी काही रोगीही असतील, दुसरे काही जमिनीवर हिंडून फिरून अल्लाहची कृपा (अर्थात रोजीरोटी) शोधतील आणि काही अल्लाहच्या मार्गात जिहादही करतील, तेव्हा तुम्ही जेवढे (कुरआन) पठण सहजपणे करू शकता, तेवढे करा, आणि नमाज नियमितपणे पढत राहा आणि जकात (देखील) देत राहा, आणि अल्लाहला चांगले कर्ज द्या, आणि जी नेकी (सत्कर्मे) तुम्ही आपल्या स्वतःसाठी पुढे पाठवाल ती अल्लाहच्या ठिकाणी सर्वोत्तमरित्या मोबदल्यात अधिक प्राप्त कराल. आणि अल्लाहजवळ माफी मागत राहा. निःसंशय, अल्लाह मोठा माफ करणारा, दया करणारा आहे.

---

## सूरह मुद्दस्सिर - ७४

सूरह मुद्दस्सिर मक्का येथे अवतरली, यात छप्पन आयती आणि दोन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** हे वस्त्र पांघरूण घेणारे!

---

होतील. हे उदाहरणार्थ सांगितले गेले. हदीसमधील उल्लेखानुसार कयामतच्या दिवशी अल्लाह आदम (अलै.) यांना फर्माविल, आपल्या संततीमधून जहन्नमकरिता वेगळे काढून घ्या. हजरत आदम म्हणतील हे अल्लाह कशा प्रकारे? अल्लाह फर्माविल की प्रत्येक हजारातून ९९९. या वेळी गर्भवती स्त्रियांचा गर्भपात होईल आणि बारके वृद्ध होतील. (अल हदीस, अल बुखारी, तफसीर सूरतुल हज्ज)

**२.** उभे राहा आणि खबरदार करा.

**३.** आणि आपल्या पालनकर्त्याचीच महिमा वर्णन करा.

**४.** आणि आपल्या वस्त्रांना पवित्र (स्वच्छ शुद्ध) राखत जा.

**५.** आणि अपवित्रता (मलीनता) सोडून द्या.

**६.** आणि उपकार करून जास्त प्राप्त करून घेण्याची इच्छा धरू नका.

**७.** आणि आपल्या पालनकर्त्याच्या मार्गात धैर्य-संयम राखा.

**८.** तर जेव्हा सूर (शंख) फुंकला जाईल.

**९.** तर तो दिवस अतिशय कठीण दिवस असेल.

**१०.** (जो) काफिरांकरिता सहज - सोपा नसेल.

**११.** मला आणि त्याला सोडून द्या, ज्याला मी एकटा निर्माण केले.

**१२.** आणि त्याला खूप धन देऊन ठेवले आहे.

**१३.** आणि हजर राहणारे पुत्र देखील.

**१४.** आणि मी त्याला पुष्कळशी व्यापकता (संपन्नता) देऊन ठेवली आहे.

**१५.** तरीही तो इच्छा बाळगतो की मी त्याला आणखी जास्त द्यावे.

**१६.** कदापि नाही, तो आमच्या आयतींचा विरोधक आहे.

**१७.** लवकरच मी त्याला कठीण चढ चढविन.

**१८.** त्याने विचार करून एक गोष्ट योजिली.

**१९.** त्याचा नाश होवो! त्याने कशी गोष्ट योजिली.

**२०.** तो पुन्हा नष्ट होवो! त्याने कशी गोष्ट योजिली!

**२१.** मग त्याने पाहिले.

**२२.** मग तोंडावर (कपाळावर) आठ्या घातल्या आणि तोंड वाकडे केले.

**२३.** मग मागे सरकला आणि गर्व केला.

**२४.** आणि म्हणाला, ही तर फक्त जादू आहे, जी साध्य केली जाते.

**२५.** (हे) मानवी कथनाखेरीज आणखी काही नाही.

**२६.** मी लवकरच त्याला जहन्नममध्ये टाकीन.

**२७.** आणि तुम्हाला काय माहीत की जहन्नम काय आहे?

**२८.** ती ना बाकी ठेवते आणि ना सोडते.

**२९.** त्वचेला होरपळून टाकते.

**३०.** आणि तिच्यावर एकोणीस (फरिश्ते तैनात) आहेत.

**३१.** आणि आम्ही जहन्नमचे रक्षक केवळ फरिश्ते ठेवले आहेत आणि आम्ही त्यांची संख्या केवळ काफिरांच्या कसोटीकरिता निर्धारित केली आहे. यासाठी की ग्रंथधारकांनी विश्वास करावा आणि ईमान राखणाऱ्यांच्या ईमानात वृद्धी व्हावी आणि ग्रंथधारक व मुस्लिमांनी संशय करू नये, आणि ज्यांच्या मनात रोग आहे त्यांनी व काफिरांनी म्हणावे की या अशा उदाहरणाने अल्लाहला काय अभिप्रेत आहे? अशा प्रकारे अल्लाह, ज्याला इच्छितो मार्गभ्रष्ट करतो आणि ज्याला इच्छितो सन्मार्ग दाखवितो. आणि तुमच्या पालनकर्त्याच्या लष्करांना त्याच्याखेरीज कोणीही जाणत नाही. हा समस्त मानवांकरिता (परिपूर्ण) बोध (आणि भलाई) आहे.

**३२.** कदापि नाही. चंद्राची शपथ

**३३.** आणि रात्रीची जेव्हा ती पालटते.

**३४.** आणि प्रातःकाळची, जेव्हा तो प्रकाशमान व्हावा.

**३५.** की (निःसंशय ती जहन्नम) मोठ्या गोष्टींपैकी एक आहे.

**३६.** माणसाला भयभीत करणारी

**३७.** त्या माणसांकरिता, जे तुमच्यापैकी पुढे जाऊ इच्छितील किंवा मागे हटू इच्छितील.

**३८.** प्रत्येक मनुष्य आपल्या कर्मांच्या ऐवजी गहाण आहे.

**३९.** परंतु उजव्या हाताचे

**४०.** (की) ते जन्नतींमध्ये (बसून) विचारत असतील

**४१.** अपराधी लोकांना

**४२.** तुम्हाला जहन्नममध्ये कोणत्या गोष्टीने टाकले?

**४३.** ते उत्तर देतील की आम्ही नमाज पढणारे नव्हतो.

**४४.** भुकेल्यांना जेवु घालत नव्हतो.

**४५.** आणि आम्ही निरर्थक गोष्ट (इन्कार) करणाऱ्यांसोबत निरर्थक गोष्टीत व्यस्त राहात होतो.

**४६.** आणि आम्ही मोबदल्याच्या दिवसाला खोटे ठरवित होतो.

**४७.** येथेपर्यंत की आमचा मृत्यु आला.

**४८.** तेव्हा त्यांना शिफारस करणाऱ्यांची शिफारस उपयोगी पडणार नाही.

**४९.** त्यांना झाले तरी काय की ते उपदेशापासून तोंड फिरवित आहेत.

**५०.** जणू काही बिचकलेली गाढवे होत.

**५१.** जे सिंहापासून पळत असावे.

**५२.** किंबहुना त्यांच्यापैकी प्रत्येक मनुष्य इच्छितो की त्याला स्पष्ट ग्रंथ दिले जावेत.

**५३.** असे कदापि (होऊ शकत) नाही, किंबहुना हे कयामतबाबत निर्भय आहेत.

**५४.** कदापि नाही! हा (कुरआन) एक उपदेश आहे.

**५५.** आता जो इच्छिल, त्यापासून बोध ग्रहण करील.

**५६.** आणि हे त्याच वेळी बोध ग्रहण करतील, जेव्हा अल्लाह इच्छिल. तो या गोष्टीस पात्र आहे की त्याचे भय राखावे आणि यासही पात्र की त्याने माफ करावे.

# सूरह कियामः - ७५

सूरह कियामः मक्का येथे अवतरली यात चाळीस आयती व दोन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** मी शपथ घेतो कयामतच्या दिवसाची

**२.** आणि मी शपथ घेतो, धिःक्कार करणाऱ्या मना (आत्म्या) ची.

**३.** काय मनुष्य असा विचार करतो की आम्ही त्याची हाडे एकत्र करणारच नाहीत?

**४.** होय अवश्य करू, आम्हाला सामर्थ्य आहे की त्याच्या बोटांचे एक एक पेर ठीक करावे.

**५.** परंतु मनुष्य तर इच्छितो की पुढे अवज्ञा आणि अवहेलना करीत राहावे.

**६.** विचारतो की कयामतचा दिवस केव्हा येईल.

**७.** तर जेव्हा डोळे जडवत होतील.

**८.** आणि चंद्र निस्तेज होईल.

**९.** आणि सूर्य व चंद्र एकत्र केले जातील.

**१०.** त्या दिवशी मनुष्य म्हणेल की आज पळून जाण्यास जागा कोठे आहे?

**११.** नाही नाही, आश्रय घेण्याचे कोणतेही ठिकाण नाही.

**१२.** आज तर तुझ्या पालनकर्त्याकडेच (आश्रयाचे) ठिकाण आहे.

**१३.** आज माणसाला, त्याने जे काही पुढे पाठविले आणि जे काही मागे सोडले, त्याविषयी अवगत करून दिले जाईल.

**१४.** किंबहुना मनुष्य स्वतःच स्वतःवर प्रमाण आहे.

**१५.** मग तो कितीही सबबी सादर करीत असला तरी.

**१६.** (हे पैगंबर!) तुम्ही कुरआनास त्वरित तोंडी पाठ करण्यासाठी आपल्या जीभेला

(घाईने) हलवू नका.

**१७.** त्यास एकत्र करणे आणि (तुमच्या तोंडून) पठण करविणे आमची जबाबदारी आहे.

**१८.** (यास्तव) आम्ही जेव्हा त्याचे पठण संपवू तेव्हा तुम्ही त्याच्या पठणाचे अनुसरण करा.

**१९.** त्यास स्पष्ट करणे आमचे काम आहे.

**२०.** नव्हे, तुम्ही तर लवकर प्राप्त होणाऱ्या (जगा) शी प्रेम राखता.

**२१.** आणि आखिरतला सोडून बसला आहात.

**२२.** त्या दिवशी अनेक चेहरे ताजे टवटवीत (व तेजस्वी) असतील.

**२३.** आपल्या पालनकर्त्याकडे पाहत असतील

**२४.** आणि कित्येक चेहरे त्या दिवशी (कुरुप आणि) उदास असतील

**२५.** समजत असतील की त्यांच्याशी कंबर तोडणारा व्यवहार केला जाईल.

**२६.** नाही नाही जेव्हा (प्राण) कंठाशी पोहचतील

**२७.** आणि सांगितले जाईल की कोणी झाड फुंक (तंत्र मंत्र) करणारा आहे ?

**२८.** आणि त्याने खात्री केली की ही वियोगाची वेळ आहे.

**२९.** आणि पोटरीशी पोटरी बिलगेल.

**३०.** आज तुझ्या पालनकर्त्याकडे जायचे आहे.

**३१.** तेव्हा त्याने ना तर समर्थन केले, ना नमाज अदा केली.

**३२.** उलट खोटे ठरविले आणि विमुख झाला

**३३.** मग आपल्या कुटुंबियांकडे तोऱ्यात गेला

**३४.** खेद आहे तुझ्याबद्दल! पश्चात्ताप आहे तुझ्यावर!

**३५.** पुन्हा दुःख आहे आणि दुर्दशा आहे तुझ्यासाठी!

**३६.** काय मनुष्य असे समजतो की त्याला व्यर्थ असे सोडून दिले जाईल

**३७.** काय तो एक गाढ पाण्याचा थेंब नव्हता, जो टपकविला जातो?

**३८.** मग तो रक्ताचा गोळा बनला, मग (अल्लाहने) त्याला निर्माण केले आणि योग्यरित्या बनविले.

**३९.** मग त्यापासून जोडी अर्थात नर-मादा बनविले

**४०.** काय (अल्लाह) या गोष्टी समर्थ नाही की मेलेल्यास जिवंत करावं?

---

## सूरह दहर - ७६

सूरह दहर मदीना येथे अवतरली आणि यात एकवीस आयती व दोन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** निश्चितच माणसावर काळाचा एक समय असाही आला आहे, जेव्हा तो काहीच उल्लेख करण्यायोग्य नव्हता.

**२.** निःसंशय, आम्ही मानवाला मिश्र वीर्याद्वारे कसोटीकरिता निर्माण केले, आणि त्याला ऐकणारा पाहणारा बनविले.

**३.** आम्ही त्याला मार्ग दाखविला मग तो कृतज्ञ बनो किंवा कृतघ्न.

**४.** निःसंशय, आम्ही काफिर (इन्कारी) लोकांकरिता शृंखला आणि जोखंड व धगधगणारी आग तयार करून ठेवली आहे.

**५.** निःसंशय, नेक (सदाचारी) लोक त्या प्याल्याने पितील, ज्यात कापूराचे मिश्रण आहे.

**६.** जो एक झरा आहे, ज्यातून अल्लाहचे दास पितील, त्याचे प्रवाह (पाट) काढतील (जिकडे इच्छितील)

**७.** जे नवस पूर्ण करतात[1] आणि त्या दिवसाचे भय बाळगतात, ज्याचे संकट चारी बाजूंना पसरणार आहे.

**८.** आणि अल्लाहच्या प्रेमाखातर गरीब, अनाथ आणि कैद्यांना जेवू घालतात.

**९.** आम्ही तर तुम्हाला केवळ अल्लाहच्या प्रसन्नतेसाठी जेवू घालतो, तुमच्याकडून ना मोबदला इच्छितो, ना आभार.

**१०.** निःसंशय, आम्ही आपल्या पालनकर्त्यातर्फे त्या दिवसाचे भय राखतो जो मोठा दुःस्थितीचा आणि कठोरतापूर्ण असेल.

**११.** तेव्हा अल्लाहने त्यांना त्या दिवसाच्या संकटापासून वाचविले. आणि त्यांना तजेलता व आनंद प्रदान केला.

**१२.** आणि त्यांना त्यांच्या धीर - संयमाच्या मोबदल्यात जन्नत आणि रेशमी वस्त्र प्रदान केले.

**१३.** ते तिथे आसनांवर तक्के लावून बसतील, त्यांना तिथे ना सूर्याची प्रखर उष्णता जाणवेल, ना सक्त थंडीची तीव्रता.

**१४.** आणि त्यांच्या (जन्नतच्या) सावल्या त्यांच्यावर झुकलेल्या असतील आणि त्यांचे (मेवे) आणि गुच्छे खाली लोंबकळत असतील.

**१५.** आणि त्यांच्या दरम्यान चांदीची भांडी आणि काचेचे प्याले ये - जा करतील.

**१६.** काचही चांदीची असेल, ज्यांना (पिणाऱ्यांनी) अनुमानाने मापून ठेवले असेल.

**१७.** आणि त्यांना तिथे अशी पेये पाजली जातील, ज्यात सुंठीचे मिश्रण असेल.

**१८.** जन्नतच्या एका प्रवाहातून ज्याचे नाव सलसबील आहे.

---

(१) अर्थात केवळ एक अल्लाहची उपासना करतात, नवसही मानतात तर फक्त अल्लाहकरिता आणि तो पूर्णही करतात. तात्पर्य, नवस पूर्ण करणे आवश्यक आहे, या अटीवर की तो अवज्ञेचा नसावा. हदीसमधील उल्लेखानुसार ज्याने नवस मानला असेल की तो अल्लाहचे आज्ञापालन करील तर त्याचे पालन करावे आणि ज्याने अल्लाहच्या अवज्ञेचा नवस मानला असेल तर त्याने असा नवस पूर्ण करू नये. (सहीह बुखारी, किताबुल ऐमान, बाबुन नज़्रे फित ताअते)

**१९.** आणि त्यांच्या चोहीकडे ती अल्पवयीन बालके हिंडत-फिरत असतील. जे नेहमी (बालक) राहणारे आहेत. जेव्हा तुम्ही त्यांना पाहाल तर कल्पना कराल की ते (जणू) विखुरलेले (अस्सल) मोती आहेत.

**२०.** आणि तुम्ही तिथे, जिकडे पाहाल तिकडे पूर्ण ईशदेणग्या आणि महान राज्यसत्ता दिसून येईल.

**२१.** त्यांच्या (शरीरा) वर हिरवे मौल्यवान आणि जाड रेशमी वस्त्रे असतील. आणि त्यांना चांदीच्या कांकणाचा दागिना घातला जाईल आणि त्यांना त्यांचा पालनकर्ता स्वच्छ शुद्ध (पाक) मद्य पाजेल.

**२२.** (फर्माविले जाईल) हा आहे तुमच्या कर्मांचा मोबदला आणि तुमच्या प्रयत्नांची प्रशंसा केली गेली.

**२३.** निःसंशय, आम्ही तुमच्यावर कुरआन हळू हळू (क्रमाक्रमाने) अवतरित केले.

**२४.** तेव्हा तुम्ही आपल्या पालनकर्त्याच्या आदेशावर अटळ राहा, आणि त्यांच्यापैकी कोणत्याही अपराध्याचे किंवा कृतघ्नाचे म्हणणे मान्य करू नका.

**२५.** आणि सकाळ संध्याकाळ आपल्या पालनकर्त्याचे नामःस्मरण करा.

**२६.** आणि रात्रीच्या वेळी त्याच्या समोर सजदे करा आणि रात्रीच्या दीर्घ भागापर्यंत त्याचे पावित्र्यासह गुणगान करा.

**२७.** निःसंशय, हे लोक लवकर प्राप्त होणाऱ्या जगाची इच्छा धरतात, आणि आपल्या मागे एक मोठ्या भारदस्त दिवसाला सोडून देतात.

**२८.** आम्ही त्यांना निर्माण केले आणि आम्हीच त्यांचे जोड (सांधे) मजबूत केले आणि आम्ही वाटेल तेव्हा त्यांच्या बदल्यात त्यांच्यासारखे दुसऱ्यांना बदलून आणू.

**२९.** निःसंशय, हा तर एक उपदेश आहे. तेव्हा जो इच्छिल त्याने आपल्या पालनकर्त्याचा मार्ग प्राप्त करावा.

**३०.** आणि तुम्ही इच्छा न कराल परंतु हे की अल्लाहच इच्छिल. निःसंशय, अल्लाह जाणणारा आणि हिकमत बाळगणारा आहे.

**३१.** ज्याला इच्छिल, आपल्या कृपेत सामील करून घेईल आणि अपराधी (अत्याचारीं) करिता त्याने दु:खदायक अज़ाब तयार करून ठेवला आहे.

---

## सूरह मुर्सलात - ७७

सूरह मुर्सलात मक्का येथे अवतरली, यात पन्नास आयती व दोन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** मनमोहक, सतत चालणाऱ्या मंद हवेची शपथ

**२.** मग जोरात (वेगाने) वाहू लागणारींची शपथ.

**३.** आणि (ढगांना) पसरविणारींची शपथ

**४.** मग सत्य - असत्याला वेगवेगळे करणारे!

**५.** आणि वहयी (प्रकाशना) आणणाऱ्या फरिश्त्यांची शपथ

**६.** जी (वहयी) आरोपाचे खंडन करण्यासाठी किंवा सचेत करण्यासाठी असते.

**७.** नि:संशय, ज्या गोष्टीचा तुमच्याशी वायदा केला जात आहे ती अगदी निश्चितपणे घडून येणार आहे.

**८.** तर जेव्हा तारे निस्तेज केले जातील.

**९.** आणि आकाशाचा विध्वंस केला जाईल.

**१०.** आणि जेव्हा पर्वत तुकडे तुकडे करून उडविले जातील

**११.** आणि जेव्हा पैगंबरांना निर्धारित वेळेवर आणले जाईल

**१२.** कोणत्या दिवसाकारीता (त्यांना) थांबविले गेले आहे?

**१३.** निर्णयाच्या दिवसाकरिता.

**१४.** आणि तुम्हाला काय माहीत की निर्णयाचा दिवस काय आहे?

**१५.** त्या दिवशी खोटे ठरविणाऱ्यांसाठी दु:स्थिती (विनाश) आहे.

**१६.** काय आम्ही पूर्वी होऊन गेलेल्या लोकांना नष्ट नाही केले?

**१७.** मग आम्ही त्यांच्या पाठोपाठ नंतरच्या लोकांना आणले.

**१८.** आम्ही अपराधी लोकांशी असाच व्यवहार करतो.

**१९.** त्या दिवशी खोटे ठरविणाऱ्यांकरिता विनाश आहे.

**२०.** काय आम्ही तुम्हाला तुच्छ पाण्या (वीर्या) पासून निर्माण केले नाही?

**२१.** मग आम्ही त्यास मजबूत (आणि सुरक्षित) स्थानी ठेवले.

**२२.** एका निर्धारित वेळे पर्यंत .

**२३.** मग आम्ही अनुमान लावले, तर आम्ही किती चांगले अनुमान लावणारे आहोत!

**२४.** त्या दिवशी खोटे ठरविणाऱ्यांसाठी विनाश आहे.

**२५.** काय आम्ही जमिनीला संचयित करणारी नाही बनविले?

**२६.** जिवंत असलेल्यांनाही आणि मेलेल्यांनाही

**२७.** आणि आम्ही तिच्यात उंच (आणि वजनदार) पर्वत बनविले, आणि तुम्हाला सिंचित करणारे गोड पाणी पाजले.

**२८.** त्या दिवशी खोटे ठरविणाऱ्यांसाठी विनाश आहे.

**२९.** त्या (जहन्नम) कडे जा, जिला तुम्ही खोटे ठरवित होते.

**३०.** चला त्या सावलीकडे, जिला तीन शाखा आहेत.

**३१.** जी वास्तविक ना छाया देणारी आहे आणि ना ज्वालापासून वाचवू शकते.

**३२.** नि:संशय, (जहन्नम) महालासारख्या चिंगाऱ्या फेकते

**३३.** जणू काही ते पिवळे उंट आहेत.

**३४.** त्या दिवशी खोटे ठरविणाऱ्यांसाठी दुर्दशा (विनाश) आहे.

**३५.** आज (चा दिवस) असा दिवस आहे की ते बोलूही शकणार नाहीत.

**३६.** ना त्यांना सबब मांडण्याची अनुमती दिली जाईल.

**३७.** त्या दिवशी खोटे ठरविणाऱ्यांची दुःस्थिती ( खराबी ) आहे.

**३८.** हा आहे फैसल्याचा दिवस. आम्ही तुम्हाला आणि पूर्वी होऊन गेलेल्या लोकांना (सर्वांना) एकत्रित केले आहे.

**३९.** तेव्हा जर तुम्ही माझ्याशी एखादी चाल खेळू शकत असाल तर खेळून पाहा.

**४०.** दुःख आहे त्या दिवशी खोटे ठरविणाऱ्यांकरिता.

**४१.** निःसंशय, नेक सदाचारी लोक सावलीत असतील आणि वाहत्या झऱ्यांमध्ये.

**४२.** आणि त्या फळांमध्ये, ज्यांची ते इच्छा करतील

**४३.** (हे जन्नतमध्ये राहणाऱ्यांनो!) मजेत खा आणि प्या, आपल्या कृत-कर्मांच्या मोबदल्यात.

**४४.** निःसंशय, आम्ही सत्कर्म (नेकी) करणाऱ्यांना अशाच प्रकारे मोबदला प्रदान करतो.

**४५.** त्या दिवशी खोटे ठरविणाऱ्यांकरिता मोठे दुःख आहे.

**४६.** (हे खोटे ठरविणाऱ्यांनो!) तुम्ही (या जगात) थोडे खाऊन पिऊन घ्या आणि लाभ प्राप्त करून घ्या. निश्चितच तुम्ही अपराधी आहात.

**४७.** त्या दिवशी खोटे ठरविणाऱ्यांसाठी विनाश आहे.

**४८.** त्यांना जेव्हा सांगितले जाते की रुकूअ करा (झुका) तर करीत नाही.

**४९.** त्या दिवशी खोटे ठरविणाऱ्यांचा विनाश आहे.

**५०.** आता या (कुरआना) नंतर कोणत्या गोष्टीवर ईमान राखतील ?

---

# सूरह नबा - ७८

सूरह नबा मक्का येथे अवतरली आणि यात चाळीस आयती व दोन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** हे लोक कोणत्या गोष्टीची विचारपूस करीत आहेत?

**२.** त्या मोठ्या खबरीची?

**३.** ज्याबाबत हे अनेक मत (विचार) राखतात.

**४.** निश्चितपणे हे आताच जाणून घेतील.

**५.** पुन्हा निश्चितपणे त्यांना फार लवकर माहीत पडेल.

**६.** काय आम्ही जमिनीला बिछाईत नाही बनविले?

**७.** आणि पर्वतांना मेखा नाही बनविले?

**८.** आणि आम्ही तुम्हाला जोडी जोडीने निर्माण केले.

**९.** आणि आम्ही तुमच्या झोपेला तुमच्या आरामाचे कारण बनविले.

**१०.** आणि रात्रीला आम्ही पडदा (आवरण) बनविले.

**११.** आणि दिवसाला आम्ही रोजी प्राप्त करण्याचा समय बनविले.

**१२.** आणि तुमच्या वरती आम्ही सात मजबूत आकाश बनविले.

**१३.** आणि एक चकाकणारा तेजस्वी दीप निर्माण केला.

**१४.** आणि ढगांद्वारे आम्ही मुसळधार पर्जन्यवृष्टी केली.

**१५.** यासाठी की त्याद्वारे अन्न (धान्य) आणि वनस्पती उगवाव्यात.

**१६.** आणि घनदाट बागाही (उगवाव्या).

**१७.** निःसंशय, निर्णयाचा दिवस निर्धारीत आहे.

**१८.** ज्या दिवशी सूर (शंख) फुंकला जाईल, मग तुम्ही सर्व झुंडच्या झुंड बनून याल.

**१९.** आणि आकाश उघडले जाईल, तेव्हा त्यात दारेच दारे बनतील.

**२०.** आणि पर्वत चालविले जातील, तेव्हा ते पांढरी वाळू बनतील.

**२१.** निःसंशय, जहन्नम टपून बसली आहे.

**२२.** विद्रोही (उदंड) लोकांचे ठिकाण तेच आहे.

**२३.** त्यात ते युगानुयुगे (आणि शतके) पडून राहतील.

**२४.** ना कधी त्यात शीतलतेची गोडी चाखतील, ना पाण्याची.

**२५.** गरम (उकळते) पाणी आणि वाहत्या पू-खेरीज.

**२६.** (त्यांना) पूर्णपणे मोबदला मिळेल.

**२७.** त्यांना तर हिशोबाची आशाच नव्हती.

**२८.** ते निडरतेने आमच्या आयतींना खोटे ठरवित असत.

**२९.** आम्ही प्रत्येक गोष्ट लिहून सुरक्षित ठेवली आहे.

**३०.** आता तुम्ही (आपल्या कर्मांचा) स्वाद चाखा. आम्ही तुमच्या शिक्षेतच वाढकरीत राहू.

**३१.** निःसंशय, अल्लाहचे भय राखणाऱ्यांकरिता सफलता आहे.

**३२.** बागा आहेत आणि द्राक्षे आहेत.

**३३.** आणि नवयुवती कुमारिका समवयस्क स्त्रिया आहेत.

**३४.** आणि भरून वाहणारे मद्याचे प्याले आहेत.

**३५.** तिथे ना तर ते अश्लील गोष्टी ऐकतील आणि ना खोट्या गोष्टी ऐकतील.

**३६.** (त्यांना) तुमच्या पालनकर्त्यातर्फे (त्यांच्या सत्कर्मांचा) हा मोबदला मिळेल, जो फार मोठे बक्षीस असेल.

**३७.** (त्या) पालनकर्त्यातर्फे मिळेल, जो आकाशांचा आणि जमिनीचा, आणि जे काही त्यांच्या दरम्यान आहे, त्या सर्वांचा स्वामी व पालनकर्ता आहे, आणि मोठा दयावान

आहे. कोणालाही त्याच्याशी बोलण्याचा अधिकार नसेल.

**३८.** ज्या दिवशी रुह (आत्मा) आणि फरिश्ते रांगा बांधून उभे असतील तेव्हा कोणी बोलू शकणार नाही, मात्र ज्याला अतिशय दयावान (रहमान) अनुमती देईल, आणि तो उचित गोष्ट तोंडातून काढील (बोलेल).

**३९.** हा दिवस सत्य आहे, आता ज्याची इच्छा असेल त्याने आपल्या पालनकर्त्याजवळ (सत्कर्मे करून) स्थान बनवावे.

**४०.** आम्ही तुम्हाला निकट भविष्यात घडून येणाऱ्या शिक्षा यातनेचे भय दाखविले (आणि सावध केले) ज्या दिवशी मनुष्य आपल्या हातांनी केलेल्या कमाई (कर्मा) ला पाहील आणि काफिर म्हणेल की, मी माती झालो असतो तर (बरे झाले असते)!

---

# सूरह नाजिआत - ७९

ही सूरह मक्का येथे अवतरली आणि यात शेहचाळीस आयती व दोन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** बुडून कठोरतापूर्वक खेचणाऱ्यांची शपथ.[१]

**२.** बंधन उकलून सोडविणाऱ्यांची शपथ.

**३.** आणि पोहणाऱ्या फिरणाऱ्यांची शपथ.[२]

**४.** मग धावत पुढे जाणाऱ्यांची शपथ!

**५.** मग कार्याची योजना करणाऱ्यांची शपथ!

---

(१) हे प्राण काढणाऱ्या फरिश्त्यांचे वर्णन आहे. फरिश्ते काफिरांचे प्राण मोठ्या कठोरपणे काढतात आणि तेही शरीरात बुडून.

(२) फरिश्त्ये प्राण काढण्यासाठी माणसाच्या शरीरात असे पोहत फिरतात, जणू पाण्यात तळाशी जाणारा पाणबुड्या मोती काढण्यासाठी समुद्रात अगदी खोलवर पोहत फिरतो किंवा असा अर्थ की अतिशय वेगाने फरिश्ते अल्लाहचा आदेश घेऊन आकाशातून उतरतात कारण वेगवान घोड्यालाही 'सबिअ' म्हणतात.

**६.** ज्या दिवशी थरथर कांपणारी थरथर कांपेल,

**७.** त्यानंतर एक मागे येणारी (मागोमाग) येईल.

**८.** (अनेक) हृदय त्या दिवशी धडधड करतील.

**९.** ज्यांच्या नजरा खाली असतील.

**१०.** असे म्हणतात की, काय आम्हाला पहिल्यासारख्या अवस्थेकडे पुन्हा परतविले जाईल?

**११.** काय अशा वेळी की जेव्हा आम्ही अगदी जीर्णशीर्ण हाडे होऊन जाऊ?

**१२.** म्हणतात की मग तर हे परतणे नुकसानदायक आहे. (माहीत असले पाहिजे)

**१३.** की ती तर केवळ एक (भयानक) दरडावणी आहे.

**१४.** (जी दिली जाताच) ते एकदम मैदानात जमा होतील.

**१५.** काय, मूसा (अलैहिस्सलाम) चा वृत्तांत तुम्हास पोहचला आहे?

**१६.** जेव्हा त्यांना त्यांच्या पालनकर्त्याने तूवाच्या पवित्र मैदानात पुकारले.

**१७.** (की) तुम्ही फिरऔनजवळ जा, त्याने बंडखोरी (उदंडता) अंगीकारली आहे.

**१८.** त्याला सांगा की, काय तू स्वतःची दुरुस्ती आणि सुधारणा इच्छितो.

**१९.** आणि हे की मी तुला तुझ्या पालनकर्त्याचा मार्ग दाखवू यासाठी की तू (त्याचे) भय बाळगू लागावे.

**२०.** तेव्हा त्याला मोठी निशाणी दाखविली.

**२१.** तर त्याने खोटे ठरविले आणि अवज्ञा केली.

**२२.** मग पुन्हा परतला प्रयत्न करीत[१]

---

(१) अर्थात त्याने ईमान आणि आदेशाचा केवळ इन्कारच केला नाही तर धरतीत उत्पात माजविण्याचा आणि हजरत मूसाशी सामना (विरोध) करण्याचा प्रयत्न करीत राहिला आणि जादूगारांना एकत्र करून मूसा (अलै.) यांच्याशी सामना करविला यासाठी की त्यांना खोटे ठरविले

**२३.** मग सर्वांना एकत्र करून उंच स्वरात ऐलान केले.

**२४.** म्हणाला, तुम्हा सर्वांचा पालनहार मीच आहे.

**२५.** तेव्हा (सर्वोच्च व सर्वश्रेष्ठ) अल्लाहने देखील त्याला आखिरत (मरणोत्तर जीवना) च्या आणि या जगाच्या शिक्षा - यातनेत घेरले.

**२६.** निःसंशय, यात त्या माणसाकरिता बोध आहे, जो भय राखील.

**२७.** काय तुम्हाला निर्माण करणे अधिक कठीण आहे किंवा आकाशाला? सर्वश्रेष्ठ अल्लाहने त्याला निर्माण केले.

**२८.** त्याची उंची वाढविली, मग त्याला यथायोग्य केले.

**२९.** आणि त्याच्या रात्रीला अंधकारपूर्ण बनविले आणि त्याच्या दिवसाला प्रकट केले.

**३०.** आणि त्यानंतर जमिनीला (समतल) बिछविले.

**३१.** त्यातून पाणी आणि चारा काढला.

**३२.** आणि पर्वतांना (मजबूत) रोवले.

**३३.** हे सर्व तुमच्या आणि तुमच्या जनावरांच्या फायद्यासाठी (आहे).

**३४.** तर जेव्हा ते मोठे संकट (कयामत) येईल.

**३५.** ज्या दिवशी मनुष्य आपल्या केलेल्या कर्मांची आठवण करील.

**३६.** आणि (प्रत्येक) पाहणाऱ्याच्या समोर जहन्नम उघडपणे आणली जाईल.

**३७.** तेव्हा, ज्या (माणसा) ने विद्रोह अंगीकारला (असेल).

**३८.** आणि ऐहिक जीवनाला प्राधान्य दिले (असेल).

**३९.** (त्याचे) ठिकाण जहन्नमच आहे.

**४०.** तथापि, जो मनुष्य आपल्या पालनकर्त्यासमोर उभे राहण्यापासून भीत राहिला असेल आणि आपल्या मनाला इच्छा-अभिलाषांपासून रोखले असेल.

---

जाऊ शकावे.

**४१.** तर त्याचे ठिकाण जन्नतच आहे.

**४२.** लोक तुम्हाला कयामत केव्हा घडून येईल असे विचारतात.

**४३.** ते सांगण्याशी तुमचा काय संबंध?

**४४.** तिच्या ज्ञानाची अंतिम सीमा तर अल्लाहकडे आहे.

**४५.** तुम्ही तर फक्त तिच्याशी भयभीत राहणाऱ्यांना सावधान करणारे आहात.[१]

**४६.** ज्या दिवशी हे तिला (प्रत्यक्ष) पाहून घेतील तेव्हा असे वाटेल की केवळ दिवसाचा अंतिम भाग अथवा आरंभीचा भागच ते (या जगात) राहिलेत.

---

## सूरह अबस - ८०

सूरह अबस मक्का येथे अवतरली आणि यात बेचाळीस आयती व दोन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** त्याने तोंड आंबट केले आणि तोंड फिरविले.

**२.** (केवळ अशासाठी) की त्याच्याजवळ एक आंधळा आला.

**३.** तुम्हाला काय माहीत, कदाचित तो सुधारला असता.

**४.** किंवा त्याने उपदेश ऐकला असता आणि त्याला उपदेश लाभदायक ठरला असता.

**५.** (परंतु) जो बेपर्वाईने वागतो.

**६.** त्याच्याकडे तर तुम्ही पुरेपूर लक्ष देत आहात.

---

(१) अर्थात तुमचे काम केवळ 'इन्ज़ार' (भय दाखविणे) आहे, परोक्ष (गैब) च्या वार्ता देणे नव्हे, ज्यात कयामतचे ज्ञान आहे जे अल्लाहने कोणालाही दिले नाही. 'मनयख्शाहा' अशासाठी म्हटले आहे की तंबी (चेतावणी) आणि धर्म-प्रचाराचा खरा लाभ त्यालाच मिळतो, ज्याच्या मनात अल्लाहचे भय असते, अन्यथा खबरदार करण्याचा आणि संदेश पोहचविण्याचा आदेश तर प्रत्येक माणसाकरिता आहे.

**७.** वास्तविक त्याच्या न सुधारण्याने तुमची काहीच हानी नाही.

**८.** आणि जो मनुष्य तुमच्याजवळ धावत येतो.

**९.** आणि तो भीत (ही) आहे.

**१०.** तर त्याच्याशी तुम्ही उपेक्षावृत्ती दाखविता.

**११.** हे योग्य नाही.[१] कुरआन तर बोध (दायक वस्तू) आहे.

**१२.** ज्याची इच्छा होईल (त्याने) यापासून बोध घ्यावा.

**१३.** (हा तर) आदर-सन्मान पूर्ण ग्रंथांमध्ये आहे.

**१४.** जे उच्चतम व पवित्र आणि स्वच्छ शुद्ध आहेत.

**१५.** अशा लिहिणाऱ्यांच्या हातात आहे.

**१६.** जे उच्च दर्जाचे पवित्र आहेत.

**१७.** अल्लाहची मार असो मानवावर, कसा कृतघ्न आहे.

**१८.** याला (अल्लाहने) कोणत्या वस्तूपासून निर्माण केले.

**१९.** (याला) एका वीर्यबिंदूपासून मग अनुमानावर राखले त्याला.

**२०.** मग त्याच्यासाठी मार्ग सोपा केला.

**२१.** मग त्याला मरण दिले आणि मग कबरीत गाडले.

**२२.** मग जेव्हा इच्छा होईल, त्याला जिवंत करील.

**२३.** मुळीच नाही. त्याने आतापर्यंत अल्लाहच्या आदेशाचे पालन केले नाही.

**२४.** माणसाने आपल्या भोजनावर नजर टाकली पाहिजे.

---

(१) अर्थात अशा लोकांचा तर सन्मान वाढविला पाहिजे. त्यांच्याकडून तोंड फिरवून घेणे उचित नव्हे. ही आयत हे स्पष्ट करते की धर्म प्रचारासंदर्भात कोणाला विशेष लेखू नये, किंबहुना गरीब-श्रीमंत, मालक-नोकर, पुरुष-स्त्री, लहान-मोठा, राव-रंक सर्वांना एकसमान समजावे आणि सर्वांना एकत्र संबोधित करावे. मग अल्लाह ज्याला इच्छिल, आपल्या मार्गदर्शनाने उपकृत करेल.

**२५.** की आम्ही भरपूर पाणी वर्षविले.

**२६.** मग जमिनीला चांगल्या प्रकारे फाडले.

**२७.** मग तिच्यातून अन्न (धान्य) उगविले.

**२८.** आणि द्राक्ष व भाजीपाला.

**२९.** आणि जैतून व खजूर.

**३०.** आणि घनदाट बागा.

**३१.** आणि मेवे व (गवत) चारा (देखील उगविला).

**३२.** तुमच्या वापराकरिता व फायद्याकरिता आणि तुमच्या चार पायांच्या जनावरांकरिता.

**३३.** मग जेव्हा कान बधीर करून टाकणारी (कयामत) येईल.

**३४.** त्या दिवशी माणूस पळ काढील आपल्या भावापासून.

**३५.** आणि आपल्या माता व पित्यापासून.

**३६.** आणि आपल्या पत्नी व आपल्या संततीपासून.

**३७.** त्यांच्यापैकी प्रत्येकाला त्या दिवशी अशी चिंता (लागून) राहील, जी त्याला (व्यस्त राखण्या) साठी पुरेशी असेल.

**३८.** त्या दिवशी अनेक चेहरे उज्वल असतील.

**३९.** (जे) हसत आणि आनंदित असतील.

**४०.** आणि बहुतेक चेहरे त्या दिवशी धुळीने माखलेले असतील.

**४१.** त्यांच्यावर काळिमा आच्छादित असेल.

**४२.** हे तेच इन्कारी, दुराचारी लोक असतील.

---

# सूरह तकवीर - ८१

सूरह तकवीर मक्का येथे अवतरली आणि यात एकोणतीस आयती व दोन रुकूअ आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** जेव्हा सूर्य गुंडाळून घेतला जाईल.

**२.** आणि जेव्हा तारे निस्तेज होतील.

**३.** आणि जेव्हा पर्वतांना चालविले जाईल.

**४.** आणि जेव्हा गर्भधारक सांडणींना सोडून दिले जाईल.

**५.** आणि जेव्हा हिंस्त्र पशूंना एकत्रित केले जाईल.

**६.** आणि जेव्हा समुद्र भडकाविले जातील.

**७.** आणि जेव्हा प्राणांना (शरीराशी) जोडले जाईल.

**८.** आणि जेव्हा जिवंत गाडल्या गेलेल्या मुलींना विचारले जाईल.

**९.** की कोणत्या अपराधापायी त्यांची हत्या केली गेली.

**१०.** आणि जेव्हा कर्म-लेख उघडले जातील.

**११.** आणि जेव्हा आकाशाची चामडी (आवरण) उतरविली जाईल.

**१२.** आणि जेव्हा जहन्नम भडकविली जाईल.

**१३.** आणि जेव्हा जन्नतला जवळ आणले जाईल.

**१४.** तेव्हा त्या दिवशी प्रत्येक मनुष्य जाणून घेईल, जे काही (सोबत) घेऊन आला असेल.

**१५.** मी शपथ घेतो मागे हटणाऱ्या,

**१६.** चालणाऱ्या फिरणाऱ्या, लपणाऱ्या ताऱ्यांची.

**१७.** आणि रात्रीची जेव्हा ती जाऊ लागेल.

**१८.** आणि सकाळची जेव्हा चकाकू लागेल.

**१९.** निःसंशय, हे एका सन्मानित संदेशवाहकाचे कथन आहे.

**२०.** जो मोठा शक्तिशाली आहे. अर्शचा स्वामी (अल्लाह) च्या ठायी उच्च दर्जाचा आहे.

**२१.** ज्याचे तेथे (आकाशांमध्ये) आज्ञापालन केले जाते, (तो) अमानतदार आहे.

**२२.** आणि तुमचा साथीदार वेडा नाही.

**२३.** त्याने त्या (फरिश्त्या) ला आकाशाच्या उघड्या किनाऱ्यावर पाहिलेही आहे.

**२४.** आणि हा परोक्षाच्या गोष्टी सांगण्यात कंजूसही नाही.

**२५.** आणि हा (कुरआन) धिःक्कारलेल्या सैतानाचे कथन नाही.

**२६.** मग तुम्ही कोठे जात आहात?

**२७.** हे तर समस्त विश्ववासीयांकरिता बोधपत्र आहे.

**२८.** (खासकरून त्याच्यासाठी,) जो तुमच्यपैकी सरळ मार्गावर चालू इच्छितो.

**२९.** आणि तुम्ही, सर्व विश्वांच्या पालनकर्त्या (अल्लाह) च्या (इच्छे) विना काहीच इच्छू शकत नाही.

---

## सूरह इन्फितार - ८२

सूरह इन्फितार मक्का येथे अवतरली आणि यात एकोणीस आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** जेव्हा आकाश विदीर्ण होईल.

**२.** आणि जेव्हा तारे झडतील (गळून पडतील)

**३.** आणि जेव्हा समुद्र वाहून जातील.

**४.** आणि जेव्हा कबरींना (फाडून) उखडून टाकले जाईल.

**५.** त्या वेळी प्रत्येक मनुष्य, त्याने जे काही पुढे पाठविले आणि मागे सोडले (अर्थात आपल्या पुढच्या मागच्या कर्मांना) जाणून घेईल.

**६.** हे मानवा! तुला आपल्या दयाळू पालनकर्त्याबाबत कोणत्या गोष्टीने बहकविले?[१]

**७.** ज्या (पालनकर्त्याने) तुला निर्माण केले, मग यथायोग्य केले, मग (सुयोग्यरित्या) व्यवस्थित घडविले.

**८.** ज्या रूपात इच्छिले तुला बनविले आणि तुला घडविले.

**९.** मुळीच नाही, किंबहुना तुम्ही तर शिक्षा आणि मोबदल्याच्या दिवसाला खोटे ठरविता.

**१०.** निःसंशय, तुमच्यावर रक्षक (पहारेकरी)

**११.** सन्मानित लिहिणारे नियुक्त आहेत.

**१२.** जे काही तुम्ही करता, ते जाणतात.

**१३.** निःसंशय, नेक - सदाचारी लोक (जन्नतचे ऐषआराम आणि) देणग्यांनी लाभान्वित असतील.

**१४.** आणि निश्चितच वाईट (दुराचारी) लोक जहन्नममध्ये असतील.

**१५.** मोबदल्याच्या दिवशी तिच्यात प्रवेश करतील.

**१६.** ते तिच्यातून कधीही गायब होऊ शकणार नाहीत.

**१७.** आणि तुम्हाला काही माहीतही आहे की मोबदल्याचा दिवस काय आहे?

**१८.** मी दुसऱ्यांदा (सांगतो की) तुम्हाला काय माहीत की मोबदल्याचा (आणि शिक्षेचा)

(१) अर्थात कोणत्या गोष्टीने तुला धोक्यात ठेवले की तू आपल्या पालनकर्त्या (अल्लाह) चा इन्कार केला, ज्याने तुला अस्तित्व प्रदान केले. तुला सुज्ञता प्रदान केली आणि तुझ्यासाठी जीवनोपयोगी साधनसामुग्री तयार केली.

दिवस काय आहे?

**१९.** (तो असा की) ज्या दिवशी कोणी मनुष्य, कोणा माणसाकरिता कसल्याही गोष्टीचा अधिकार बाळगणारा नसेल आणि समस्त आदेश त्या दिवशी अल्लाहचेच असतील.

---

## सूरह मुतफ्फिफीन - ८३

सूरह मुतफ्फिफीन मक्का येथे अवतरली आणि यात छत्तीस आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** मोठी वाईट अवस्था आहे माप-तोलमध्ये कमी करणाऱ्यांसाठी.

**२.** की जेव्हा लोकांकडून माप मोजून घेतात तेव्हा पुरेपूर मोजून घेतात.

**३.** आणि जेव्हा त्यांना माप मोजून किंवा तोल करून देतात, तेव्हा कमी देतात.

**४.** काय त्यांना आपल्या मृत्युनंतर जिवंत होऊन उठण्याबाबतचा विश्वास नाही.

**५.** त्या महान दिवसाकरिता.

**६.** ज्या दिवशी सर्व लोक, सर्व विश्वांच्या पालनकर्त्यासमोर उभे असतील.

**७.** निःसंशय, दुराचारी लोकांचा कर्म-लेख 'सिज्जीन' मध्ये आहे.

**८.** तुम्हाला काय माहीत 'सिज्जीन' काय आहे?

**९.** (हा तर) लिखित ग्रंथ आहे.

**१०.** त्या दिवशी खोटे उठविणाऱ्यांची मोठी दुर्दशा आहे.

**११.** जे मोबदला आणि शिक्षेच्या दिवसाला खोटे ठरवितात.

**१२.** याला फक्त तोच खोटे ठरवितो, जो मर्यादेचे उल्लंघन करणारा आणि अपराधी असतो.

**१३.** जेव्हा त्याच्यासमोर आमच्या आयती वाचल्या जातात तेव्हा तो म्हणतो की हे तर

पूर्वीच्या लोकांचे किस्से आहेत.

**१४.** असे नाही, किंबहुना त्यांच्या मनावर त्यांच्या कर्मांमुळे गंज (चढलेला) आहे.

**१५.** एवढेच नाही. हे लोक त्या दिवशी आपल्या पालनकर्त्याच्या दर्शनापासून वंचित ठेवले जातील.

**१६.** मग या लोकांना निश्चितपणे जहन्नममध्ये फेकून दिले जाईल.

**१७.** मग त्यांना सांगितले जाईल की हेच आहे ते, ज्याला तुम्ही खोटे ठरवित राहिले.

**१८.** निःसंशय, सत्कर्मी लोकांचा कर्म-लेख 'इल्लियीन' मध्ये आहे.

**१९.** तुम्हाला काय माहीत की 'इल्लियीन' काय आहे?

**२०.** (तो तर) लिखित ग्रंथ आहे.

**२१.** अल्लाहचे निकटवर्ती (फरिश्ते) हजर असतात.

**२२.** निःसंशय, नेक सदाचारी लोक (मोठ्या) सुखा-समाधानात असतील.

**२३.** आसनांवर बसून पाहात असतील.

**२४.** तुम्ही त्यांच्या चेहऱ्यावरूनच (अल्लाहच्या) कृपा देणग्यांची प्रफुल्लता ओळखाल.

**२५.** या लोकांना शुद्ध निर्भेळ मद्य पाजले जाईल.

**२६.** ज्यावर कस्तुरीची मोहर लागली असेल. इच्छा करणाऱ्यांनी त्याचीच इच्छा केली पाहिजे.

**२७.** आणि त्यात 'तस्नीम'चे मिश्रण असेल.

**२८.** (अर्थात) तो झरा, ज्याचे पाणी, अल्लाहचे सान्निध्य लाभलेले लोक पितील.

**२९.** निःसंशय, अपराधी लोक ईमान राखणाऱ्या लोकांची थट्टा उडवित असत.

**३०.** आणि त्यांच्या जवळून जाताना नेत्र कटाक्ष (व इशाऱ्याने) त्याचा अपमान करीत असत.

**३१.** आणि जेव्हा आपल्या लोकांकडे परत येत, तेव्हा थट्टा - मस्करी करीत असत.

**३२.** आणि जेव्हा त्यांना पाहत, तेव्हा असे म्हणत, निश्चितच हे लोक वाट चुकलेले आहेत.

**३३.** यांना, त्याच्यावर निरीक्षक बनवून तर नाही पाठविले गेले!

**३४.** तेव्हा आज ईमान राखणारे या इन्कारी लोकांवर हसतील.

**३५.** आसनांवर विराजमान होऊन पाहत असतील.

**३६.** की आता या इन्कार करणाऱ्यांनी, जसे कर्म ते करीत होते, त्याचा पुरेपूर मोबदला प्राप्त करून घेतला.

---

## सूरह इन्शिकाक - ८४

सूरह इन्शकाक मक्का येथे अवतरली आणि यात पंचवीस आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** जेव्हा आकाश विदीर्ण होईल.

**२.** आणि आपल्या पालनकर्त्याचा आदेश कान लावून ऐकेल, आणि त्याला तसे करणे भाग आहे.

**३.** आणि जेव्हा जमिनीला (खेचून) पसरविले जाईल.

**४.** आणि तिच्यात जे आहे ते ओकून बाहेर काढील आणि अगदी खाली होईल.

**५.** आणि आपल्या पालनकर्त्याचा आदेश कान लावून ऐकेल आणि ती त्यास पात्र आहे.

**६.** हे मानवा! तू आपल्या पालनकर्त्याशी भेट होईपर्यंत हे प्रयत्न आणि सर्व कार्य आणि परिश्रम करून त्याची भेट घेणार आहेस.

**७.** तर त्या वेळी ज्या माणसाच्या उजव्या हातात कर्म-पत्र दिले जाईल.

**८.** त्याचा हिशोब मोठ्या सहजतेने घेतला जाईल.[१]

---

(१) सहज सोपा हिशोब असा की, ईमान राखणाऱ्याचे कर्म-पत्र प्रस्तुत केले जाईल, त्याचे दोष

**९.** आणि तो आपल्या कुटुंबियांकडे आनंदित होऊन परत जाईल.

**१०.** परंतु ज्या माणसाचे कर्म-पत्र त्याच्या पाठीमागून दिले जाईल.

**११.** तेव्हा तो मृत्युला बोलावू लागेल.

**१२.** आणि भडकत्या जहन्नममध्ये दाखल होईल.

**१३.** हा मनुष्य आपल्या कुटुंबात (जगात) आनंदित होता.

**१४.** तो समजत होता की अल्लाहकडे परतून जाणारच नाही.

**१५.** हे कसे शक्य आहे, वास्तविक त्याचा पालनकर्ता त्याला चांगल्या प्रकारे पाहात होता.

**१६.** मला संध्याकाळच्या लालिमेची शपथ.

**१७.** आणि रात्रीची आणि तिने गोळा केलेल्या वस्तूंची शपथ.

**१८.** आणि पूर्ण चंद्राची शपथ.

**१९.** निःसंशय, तुम्ही एका अवस्थेतून दुसऱ्या अवस्थेत पोहोचाल.

**२०.** त्यांना झाले तरी काय की ईमान राखत नाहीत?

**२१.** आणि जेव्हा त्यांच्यासमोर कुरआन वाचले जाते, तेव्हा सजदा करीत नाहीत.

**२२.** किंबहुना त्यांनी कुफ्र (इन्कार) केला, ते खोटे ठरवित आहेत.

---

(अपराध) देखील त्याच्यासमोर आणले जातील. मग अल्लाह आपल्या असीम दया-कृपेने त्याला माफ करील. हजरत आयशा (रजि.) फर्मावितात की पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम यांनी फर्माविले, ज्याचा हिशोब घेतला गेला तो नाश पावला. मी म्हटले, हे अल्लाहचे रसूल! अल्लाह माझे आपणावर बलिदान करो. काय अल्लाहने नाही फर्माविले की ज्याच्या उजव्या हाता कर्म-पत्र दिले गेले, त्याचा हिशोब सह सोपा होईल. (हजरत आयशा यांच्या मते या आयतीनुसार तर ईमान राखणाऱ्याचाही हिशोब घेतला जाईल, परंतु तो नाश पावणार नाही.) पैगंबरांनी स्पष्ट केले, ही तर पेशी (हजर होणे) आहे. अर्थात ईमान राखणाऱ्याशी हिशोबाचा (सक्त) व्यवहार होणार नाही. एक सर्वसाधारण पेशी असेल. ईमान राखणाऱ्यांना अल्लाहसमोर हजर केले जाईल, ज्याला सक्तीने विचारपूस होईल तो नाश पावेल. (सहीह बुखारी, तफसीर सूरह इन्शिकाक)

**२३.** आणि हे जे काही मनात ठेवतात, अल्लाह ते चांगल्या प्रकारे जाणतो.

**२४.** तेव्हा तुम्ही त्यांना दुःखदायक शिक्षा यातनांची खूशखबर द्या.

**२५.** तथापि ईमान राखणाऱ्या नेक सदाचारी लोकांना अगणित आणि कधीही न संपणारा मोबदला प्रदान केला जाईल.

---

## सूरह बुरुज - ८५

सूरह बुरुज मक्का येथे अवतरली आणि यात बावीस आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** बुरुजांवाल्या आकाशाची शपथ.

**२.** वायदा केलेल्या दिवसाची शपथ!

**३.** हजर होणाऱ्या आणि हजर केल्या गेलेल्याची शपथ!

**४.** (की) खंदकवाल्यांचा सर्वनाश केला गेला.

**५.** ती एक आग होती इंधनाची.

**६.** जेव्हा ते लोक तिच्या जवळपास बसले होते.

**७.** आणि ईमानधारकांशी जे करीत होते, ते आपल्या समोर पाहात होते.

**८.** हे लोक त्या ईमानधारकांच्या अन्य एखाद्या अपराधाचा सूड घेत नव्हते, याखेरीज की त्यांनी वर्चस्वशाली, सर्व प्रशंसेस पात्र अशा अल्लाहवर ईमान राखले होते.

**९.** ज्याच्यासाठी आकाश आणि धरतीचे साम्राज्य व राज्यसत्ता आहे आणि प्रत्येक वस्तू सर्वश्रेष्ठ अल्लाहसमोर आहे.

**१०.** निःसंशय, ज्या लोकांनी ईमानधारक पुरुषांना व स्त्रियांना सताविले, मग माफीही मागितली नाही तर त्यांच्यासाठी जहन्नमची शिक्षा-यातना आहे आणि जळण्याची शिक्षा.

**११.** निःसंशय, ईमान कबूल करणाऱ्यांकरिता आणि सत्कर्म करणाऱ्यांकरिता त्या बागा

आहे, ज्यांच्या खाली प्रवाह वाहत आहेत. हीच मोठी सफलता आहे.

**१२.** निःसंशय, तुमच्या पालनकर्त्याची पकड मोठी सक्त आहे.

**१३.** तोच पहिल्यांदा निर्माण करतो आणि तोच दुसऱ्यांदा जिवंत करील.

**१४.** तो मोठा माफ करणारा आणि खूप स्नेह-प्रेम करणारा आहे.

**१५.** अर्शचा स्वामी, अत्याधिक महानता राखणारा.

**१६.** जे इच्छिल ते करून टाकणारा आहे.

**१७.** काय तुम्हाला लष्करांची बातमीही मिळाली आहे?

**१८.** (अर्थात) फिरऔन आणि समूदची.

**१९.** खरे तर हे इन्कारी लोक खोटे ठरविण्याच्याच मागे लागले आहेत.

**२०.** आणि सर्वश्रेष्ठ अल्लाहनेही त्यांना सगळीकडून घेरले आहे.

**२१.** किंबहुना हा कुरआन मोठी शान वैभव (प्रशंसा) राखणारा आहे.

**२२.** 'लोहे महफूज'मध्ये (लिहिलेला).

---

## सूरह तारिक - ८६

सूरह तारिक मक्का येथे अवतरली आणि यात सतरा आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** शपथ आहे आकाशाची आणि अंधारात प्रकट होणाऱ्याची.

**२.** तुम्हाला काय माहीत की तो रात्री प्रकट होणारा काय आहे.

**३.** तो एक तेजस्वी तारा आहे.

**४.** असा कोणीही नाही, ज्याच्यावर संरक्षक फरिश्ता (नियुक्त) नसेल.

**५.** माणसाने विचार केला पाहिजे की त्याला कोणत्या वस्तूपासून निर्माण केले गेले

आहे.

**६.** त्याला एका उसळत्या पाण्यापासून निर्माण केले गेले आहे.

**७.** जे पाठ आणि छाती यांच्या दरम्यानी भागातून निघते.

**८.** निःसंशय, तो (अल्लाह) त्याला परत आणण्यावर निश्चितच सामर्थ्य राखणारा आहे.

**९.** ज्या दिवशी गुप्त रहस्यभेदांची जांच-पडताळ केली जाईल.

**१०.** तेव्हा त्याचा ना काही जोर चालेल आणि ना कोणी मदतकर्ता असेल.

**११.** पर्जन्यवृष्टी करणाऱ्या आकाशाची शपथ.

**१२.** आणि दुभंगणाऱ्या जमिनीची शपथ.

**१३.** निःसंशय, हा (कुरआन) काटेकोर फैसला करणारी भाषा आहे.

**१४.** ही हास्य-विनोदाची (आणि निरर्थक) गोष्ट नाही.

**१५.** तथापि इन्कारी लोक कट - कारस्थान करीत आहेत.

**१६.** आणि मी देखील एक डाव चालत आहे.

**१७.** तुम्ही या इन्कारी लोकांना सवड देऊन टाका, त्यांना काही दिवस मोकळीक द्या.

---

## सूरह अअ़ला - ८७

सूरह अअ़ला मक्का येथे अवतरली आणि यात एकोणीस आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** आपल्या अति उच्च पालनकर्त्याच्या नावाची पवित्रता वर्णन करा.

**२.** ज्याने निर्माण केले आणि सही सलामत बनविले.

**३.** आणि ज्याने (यथायोग्य) अनुमान केले आणि मग मार्गदर्शन केले.

**४.** आणि ज्याने ताजे गवत उगविले.

**५.** मग त्याने ते (सुकवून) काळा केर - कचरा करून टाकले.

**६.** आम्ही तुम्हाला शिकवू, मग तुम्ही विसरणार नाही.

**७.** परंतु जे काही अल्लाह इच्छिल. निःसंशय, तो उघड आणि लपलेले सर्व काही जाणतो.

**८.** आणि आम्ही तुमच्यासाठी सहजता निर्माण करू.

**९.** तेव्हा तुम्ही उपदेश करीत राहा जर उपदेश काही लाभ देईल.

**१०.** (अल्लाहचे) भय बाळगणारा तर बोध ग्रहण करील.

**११.** तथापि दुर्दैवी, यापासून दूर पळेल.

**१२.** जो मोठ्या भयंकर आगीत दाखल होईल.

**१३.** जिथे मग तो ना मरेल, ना जगेल, (किंबहुना मरणासन्न स्थितीतच पडून राहील).

**१४.** निःसंशय, त्याने सफलता प्राप्त केली, जो स्वच्छ शुद्ध झाला.

**१५.** आणि ज्याने आपल्या पालनकर्त्याचे नाम स्मरणात ठेवले, आणि नमाज पढत राहिला.

**१६.** परंतु तुम्ही तर ऐहिक जीवनालाच प्राधान्य देता.

**१७.** आणि आखिरत (मरणोत्तर जीवन) अतिशय उत्तम निरंतर टिकून राहणारी आहे.

**१८.** या गोष्टीचे वर्णन पूर्वी (अवतरित झालेल्या) ग्रंथातही आहे.

**१९.** (अर्थात) इब्राहीम आणि मूसा यांच्या ग्रंथात.

---

# सूरह गाशिया - ८८

सूरह गाशिया मक्का येथे अवतरली आणि यात सव्वीस आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** काय तुम्हालाही, झाकून टाकणाऱ्या (कयामत) ची वार्ता पोहचली आहे?

**२.** त्या दिवशी बहुतेक चेहरे अपमानित असतील.

**३.** (आणि) दु:खांनी पीडित कष्ट - यातनाग्रस्त असतील.

**४.** ते धगधगत्या आगीत जाऊन पडतील.

**५.** आणि अतिशय उष्ण झऱ्याचे पाणी त्यांना पाजले जाईल.

**६.** त्यांच्यासाठी काटेदार झाडांखेरीज आणखी काही खायला नसेल.

**७.** जे ना त्यांना धष्ट पुष्ट करील, ना त्यांची भूक मिटवील.

**८.** बहुतेक चेहरे त्या दिवशी प्रफुल्ल टवटवीत आणि (सुसंपन्न स्थितीत) असतील.

**९.** आपल्या कर्मांमुळे आनंदित असतील.

**१०.** उच्च (प्रतीच्या) जन्नतींमध्ये असतील.

**११.** जिथे कोणतीही असभ्य निरर्थक गोष्ट ऐकणार नाहीत.

**१२.** जिथे (शीतल) झरे वाहत असतील.

**१३.** (आणि) त्या (जन्नतीं) मध्ये उंच उंच आसने असतील.

**१४.** आणि प्याले ठेवलेले (असतील).

**१५.** आणि एका रांगेत लावलेले तक्के असतील.

**१६.** आणि मऊ मखमली गालिचे पसरलेले असतील.

**१७.** काय हे उंटाकडे नाही पाहत की त्यांना कशा प्रकारे निर्माण केले गेले आहे?

**१८.** आणि आकाशांना की कशा प्रकारे उंच केले गेले आहे.

**१९.** आणि पर्वतांकडे, की कशा प्रकारे गाडले गेले आहेत.

**२०.** आणि जमिनीकडे की कशा प्रकारे ती बिछविली गेली आहे.

**२१.** तर तुम्ही उपदेश करीत राहा (कारण) तुम्ही फक्त उपदेश करणारे आहात.

**२२.** तुम्ही काही यांच्यावर देखरेख ठेवणारे नाहीत.

**२३.** परंतु जो मनुष्य तोंड फिरवील आणि इन्कार करील.

**२४.** त्याला सर्वश्रेष्ठ अल्लाह फार मोठा अज़ाब (शिक्षा - यातना) देईल.

**२५.** निःसंशय, त्यांना तर आमच्याचकडे परतायचे आहे.

**२६.** निःसंशय, त्यांचा हिशोब घेण्याची जबाबदारी आमची आहे.

---

## सूरह फज्र - ८९

सूरह फज्र मक्का येथे अवतरली आणि यात तीस आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** शपथ आहे प्रातःकाळची!

**२.** आणि दहा रात्रींची!

**३.** आणि सम आणि विषम संख्येची!

**४.** आणि रात्रीची जेव्हा ती निघू लागावी!

**५.** काय यात बुद्धिमानांसाठी पुरेशी शपथ आहे?

**६.** काय तुम्ही नाही पाहिले की तुमच्या पालनकर्त्याने आदच्या लोकांशी काय व्यवहार केला?

**७.** मोठमोठे खांब बनविणाऱ्या इरमशी.

**८.** ज्यांच्यासारखा (कोणताही जनसमूह) अन्य भूभागात निर्माण केला गेला नाही.

**९.** आणि समूदच्या लोकांशी, ज्यांनी दऱ्या-खोऱ्यात मोठमोठे पाषाण कोरले होते.

**१०.** आणि फिरऔनशी, जो मेखा बाळगणारा होता.

**११.** या सर्वांनी धरतीवर उपद्रव पसरविला होता.

**१२.** आणि खूप उत्पात (फसाद) माजविला होता.

**१३.** शेवटी तुमच्या पालनकर्त्याने या सर्वांवर अज़ाबचा आसूड बरसविला.

**१४.** निःसंशय, तुमचा पालनकर्ता लक्ष ठेवून आहे.

**१५.** माणसा (ची ही दशा आहे की) जेव्हा त्याचा पालनकर्ता त्याची परीक्षा घेतो, आणि त्याला मान प्रतिष्ठा व कृपा देणग्या प्रदान करतो तेव्हा तो म्हणू लागतो की माझ्या पालनकर्त्याने मला सन्मानित केले.

**१६.** आणि जेव्हा तो (अल्लाह) याची कसोटी घेतो, त्याची आजिविका तंग (कमी) करून टाकतो, तेव्हा तो म्हणू लागतो की माझ्या पालनकर्त्याने माझी अव्हेलना केली (आणि मला अपमानित केले).

**१७.** असे मुळीच नाही किंबहुना (खरी गोष्ट अशी) की तुम्ही लोक अनाथाचा मान-सन्मान राखत नाही.[१]

**१८.** आणि गरिबांना जेवू घालण्याचे एकमेकांना प्रोत्साहन देत नाही.

**१९.** आणि (मेलेल्यांची) वारस संपत्ती गोळा करून खातात.

**२०.** आणि धन-संपत्तीशी जीवनापाड प्रेम राखता.

**२१.** निःसंशय, जमिनीला जेव्हा कुटून कुटून तिला अगदी सपाट केले जाईल.

---

(१) अर्थात अनाथाशी चांगले वर्तन राखत नाही, ज्यास तो पात्र आहे. पैगंबर सल्लल्लाहु अलैहि वसल्लम या संदर्भात फर्मावितात की ते घर सर्वांत उत्तम आहे, ज्यात अनाथाशी चांगला व्यवहार केला जात असेल आणि ते घर सर्वांत वाईट आहे, ज्यात अनाथाशी वाईट व्यवहार केला जात असेल. मग आपल्या बोटांकडे इशारा करून फर्माविले की मी आणि अनाथाचे पालनपोषण करणारा जन्नतमध्ये अशा प्रकारे सोबत राहू, जशी ही दोन बोटे मिळालेली आहेत. (अबू दाऊद, किताबुल अदब, बाबुन फी जम्मिल यतीमे)

**२२.** आणि तुमचा पालनकर्ता (स्वतः) प्रकट होईल आणि फरिश्ते रांगा बांधून (येतील).

**२३.** आणि ज्या दिवशी जहन्नमलाही आणले जाईल त्या दिवशी माणूस बोध ग्रहण करील. परंतु आता त्याच्या बोध ग्रहण करण्याचा काय लाभ?

**२४.** तो म्हणेल की मी आपल्या या जीवनाकरिता काही सत्कर्मे, पहिल्यापासून करून ठेवली असती तर फार बरे झाले असते.

**२५.** तर आज अल्लाहच्या शिक्षा - यातनेसारखी शिक्षा - यातना अन्य कोणाचीही नसेल.

**२६.** ना त्याच्या बंधनासारखे कोणाचे बंधन असेल.

**२७.** हे संतुष्ट आत्मा!

**२८.** तू आपल्या पालनकर्त्याकडे परत चल, अशा अवस्थेत की तू त्याच्याशी राजी, तो तुझ्याशी प्रसन्न.

**२९.** तेव्हा, माझ्या खास दासांमध्ये सामील हो.

**३०.** आणि माझ्या जन्नतमध्ये प्रवेश कर.

---

## सूरह बलद - ९०

सूरह बलद मक्का येथे अवतरली आणि यात वीस आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** मी या शहराची शपथ घेतो.

**२.** आणि तुम्ही या शहरात वास्तव्य करता.

**३.** आणि (शपथ आहे) मानवी पिता आणि संततीची.

**४.** निःसंशय, आम्ही मानवाला (मोठ्या) कष्ट-यातनेत निर्माण केले.

**५.** काय मनुष्य असे समजतो की तो कोणाच्या नियंत्रणाखाली नाही?

**६.** सांगत (फिरतो) की मी तर भरपूर धन-संपत्ती खर्च करून टाकली.

**७.** काय, तो (असे) समजतो की कोणी त्याला पाहिलेच नाही?

**८.** काय, आम्ही त्याचे दोन डोळे नाही बनविले?

**९.** आणि एक जीभ व दोन ओठ (नाही बनविले?)

**१०.** आणि त्याला दोन्ही मार्ग दाखवून दिले.

**११.** तेव्हा, घाटीत प्रवेश करणे त्याला शक्य झाले नाही.

**१२.** तुम्हाला काय माहीत की तो घाटी मार्ग काय आहे?

**१३.** एखाद्याची मान (दास, दासी) मुक्त करणे.

**१४.** किंवा भुकेल्या दिवशी पोटभर जेवु घालणे.

**१५.** एखाद्या नातेवाईक अनाथाला.

**१६.** किंवा मातीस मिळालेल्या अतिशय गरीब माणसाला.

**१७.** मग त्या लोकांपैकी झाला असता, जे ईमान राखतात, आणि एकमेकांना धीर संयम व दया करुणा करण्याची ताकीद करतात.

**१८.** हेच लोक आहेत उजव्या बाजूचे.

**१९.** आणि ज्या लोकांनी आमच्या आयतींचा इन्कार केला, तेच लोक डाव्या हाताचे आहेत.

**२०.** हेच आगीच्या कोंडीत असतील जी चारी बाजूंनी घेरलेली असेल.

---

# सूरह शम्स - ९१

सूरह शम्स मक्का येथे अवतरली आणि यात पंधरा आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** शपथ आहे सूर्याची आणि त्याच्या उन्हाची.

**२.** शपथ आहे चंद्राची जेव्हा त्याच्या मागे येईल.

**३.** शपथ आहे दिवसाची जेव्हा सूर्याला प्रकट करील.

**४.** शपथ आहे रात्रीची जेव्हा त्याला झाकून टाकील.

**५.** शपथ आहे आकाशाची आणि त्याला बनविण्याची.

**६.** शपथ आहे जमिनीची आणि तिला समतल करण्याची.

**७.** शपथ आहे प्राणा (आत्म्या) ची आणि त्याला योग्य बनविण्याची.

**८.** मग समज दिली त्याला दुराचाराची आणि त्यापासून अलिप्त राहण्याची.

**९.** ज्याने या (आत्म्या) ला स्वच्छ शुद्ध केले, तो सफल झाला.

**१०.** आणि ज्याने याला मातीत मिळवले तो असफल झाला.

**११.** समूद जनसमूहाने आपल्या विद्रोहामुळे खोटे ठरविले.

**१२.** जेव्हा त्यांच्यातला एक मोठा अभागी उठून उभा राहिला.

**१३.** त्यांना अल्लाहच्या पैगंबराने फर्माविले होते की सर्वश्रेष्ठ अल्लाहच्या सांडणीचे आणि तिच्या पिण्याच्या पाळीचे (रक्षण करा).

**१४.** त्या लोकांनी आपल्या पैगंबरांना खोटे जाणून त्या सांडणीला मारून टाकले. तेव्हा त्यांच्या पालनकर्त्याने त्यांच्या अपराधापायी त्यांना विनाशात टाकले आणि मग विनाशाला सार्वत्रिक केले आणि त्या संपूर्ण वस्तीला भुईसपाट करून टाकले.

**१५.** तो या प्रकोपाच्या परिणामापासून निर्भय आहे.

---

# सूरह लैल - ९२

सूरह लैल मक्का येथे अवतरली आणि यात एकवीस आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** शपथ आहे रात्रीची जेव्हा ती पसरते.

**२.** आणि शपथ आहे दिवसाची जेव्हा तो प्रकाशमान होतो.

**३.** आणि शपथ आहे त्याची ज्याने नर व मादी निर्माण केले.

**४.** निःसंशय, तुमचे प्रयत्न वेगवेगळ्या प्रकारचे आहेत.

**५.** तर जो (अल्लाहच्या मार्गात) देत राहिला आणि भय बाळगत राहिला.

**६.** आणि भलाईपूर्ण गोष्टीचे सत्य-समर्थन करीत राहिला.

**७.** तर आम्हीही त्याला सहज सुलभता प्रदान करू.

**८.** परंतु ज्याने कंजूसी केली आणि बेपर्वाई दाखविली.

**९.** आणि सत्कर्माच्या गोष्टींना खोटे ठरविले.

**१०.** तर आम्हीही त्याच्यासाठी तंगी अडचणीची सामुग्री उपलब्ध करू.

**११.** त्याची धन-संपत्ती त्याला (तोंडघशी) पडतेवेळी काहीच उपयोगी पडणार नाही.

**१२.** निःसंशय, मार्ग दाखविण्याची जबाबदारी आमची आहे.

**१३.** आणि आमच्याच हाती आखिरत आणि ही दुनिया आहे.

**१४.** मी तर तुम्हाला अंगारे(निखारे) मारणाऱ्या आगीपासून भयभीत केले आहे.

**१५.** जिच्यात फक्त तोच कमनशिबी दाखल होईल.

**१६.** ज्याने खोटे ठरविले आणि (याचे अनुसरण करण्यापासून) तोंड फिरविले.

**१७.** आणि या (आगी) पासून असा मनुष्य दूर ठेवला जाईल, जो अल्लाहचे मोठे भय राखून वागणारा असेल.

**१८.** जो स्वच्छ शुद्धता (पाकी) प्राप्त करण्यासाठी आपले धन देतो.

**१९.** कोणाचा त्याच्यावर काही उपकार नाही की ज्याची फेड केली जात असावी.

**२०.** किंबहुना, केवळ आपल्या अतिउच्च व सर्वश्रेष्ठ पालनकर्त्याची प्रसन्नता प्राप्त करण्याकरिता.

**२१.** निःसंशय, तो (अल्लाह देखील) लवकरच राजी होईल.

---

## सूरतुद दुहा - ९३

सूरतुद दुहा दुहा मक्का येथे अवतरली आणि यात अकरा आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** शपथ आहे चाश्त (सूर्य वर आल्या) च्या वेळेची.

**२.** आणि शपथ आहे रात्रीची जेव्हा ती पसरते.

**३.** ना तर तुमच्या पालनकर्त्याने तुम्हाला (एकटे) सोडले आहे, आणि ना तो तुमच्याशी बेजार झाला आहे.

**४.** निःसंशय, तुमच्यासाठी आरंभापेक्षा शेवट अधिक चांगला आहे.

**५.** तुम्हाला तुमचा पालनकर्ता फार लवकरच (इनाम) देईल आणि तुम्ही राजी (व खूश) व्हाल.

**६.** काय त्याने तुम्हाला अनाथ जाणून आश्रय दिला नाही?

**७.** आणि तुम्हाला, मार्ग विसरलेले पाहून मार्ग दाखविला नाही?

**८.** आणि तुम्हाला निर्धन असलेले पाहून श्रीमंत बनविले नाही?

**९.** तेव्हा अनाथावर तुम्हीही सक्ती (कठोरता) करू नका.

**१०.** आणि ना याचना करणाऱ्याला दाटून दरडावून बोलू नका.

**११.** आणि आपल्या पालनकर्त्याच्या कृपा-देणग्यांचे वर्णन करीत राहा.

## सूरह अलम नशरह - ९४

सूरह अलम नशरह मक्का येथे अवतरली आणि यात आठ आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** काय आम्ही तुमची छाती (हृदय) उघड केली नाही?

**२.** आणि तुमच्यावरून तुमचे ओझे उतरविले.

**३.** ज्याने तुमची पाठ मोडून टाकली होती.

**४.** आणि आम्ही तुमची चर्चा बुलंद केली.

**५.** तेव्हा निश्चितच कठीणतेसह सहजता आहे.

**६.** निःसंशय, कठीणतेसह सहजता आहे.

**७.** तर, जेव्हा तुम्ही कामकाज आटोपून मोकळे व्हाल, तर तेव्हा (उपासनेत) मग्न व्हा.

**८.** आणि आपल्या पालनकर्त्याकडे मन लावा.

---

## सूरतुत्तीन - ९५

सूरतुत्तीन मक्का येथे अवतरली आणि यात आठ आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** शपथ आहे अंजीरची आणि जैतूनची.

**२.** आणि सनायीच्या तूर (पर्वता) ची.

**३.** आणि या शांतीपूर्ण शहराची.

**४.** निःसंशय, आम्ही मनावाला अति उत्तम स्वरूपात निर्माण केले.

**५.** मग त्याला खालच्या स्तरांपेक्षा खालच्या स्तराचा करून टाकले.

**६.** परंतु ज्या लोकांनी ईमान राखले आणि मग सत्कर्म करीत राहिले तर त्यांच्यासाठी असा चांगला मोबदला आहे जोकधी संपणार नाही.

**७.** मग तुम्हाला आता, मोबदल्याच्या दिवसाला खोटे ठरविण्यास कोणती गोष्ट प्रवृत्त करते ?

**८.** काय सर्वश्रेष्ठ अल्लाह (सर्व) शासकांचा शासक नाही.

---

## सूरह अ़लक - ९६

सूरह अलक मक्का येथे अवतरली आणि यात एकोणीस आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** पठण करा आपल्या पालनकर्त्याच्या नावाने, ज्याने निर्माण केले.

**२.** ज्याने मानवाला रक्ताच्या लोथड्या (गोळ्या) पासून निर्माण केले.

**३.** तुम्ही पठण करीत राहा तुमचा पालनकर्ता मोठा कृपाशील आहे.

**४.** ज्याने लेखणीद्वारे (ज्ञान) शिकविले

**५.** ज्याने माणसाला ते शिकविले, जे तो जाणत नव्हता.

**६.** खरोखर मनुष्य तर स्वतःवर काबू ठेवत नाही.

**७.** अशासाठी की तो स्वतःला निश्चिंत (किंवा श्रीमंत) समजतो.

**८.** निःसंशय, तुमच्या पालनकर्त्याकडेच परत जायचे आहे.

**९.** (बरे) त्यालाही तुम्ही पाहिले, जो (एका दासाला) रोखतो.

**१०.** वास्तिवक तो दास नमाज अदा करतो.

**११.** आता तुम्हीच सांगा जर तो सन्मार्गावर असेल.

**१२.** किंवा अल्लाहचे भय राखून वागण्याचा आदेश देत असेल.

**१३.** बरे पाहा तर, जर हा खोटे ठरवित असेल आणि तोंड फिरवित असेल.

**१४.** काय हा हे नाही जाणत की सर्वश्रेष्ठ अल्लाह त्याला चांगल्या प्रकारे पाहात आहे.

**१५.** निश्चितच, जर त्याने आपले वाईट वर्तन सोडले नाही तर आम्ही त्याच्या माथ्यावरचे केस धरून त्याला फरफटत ओढू.

**१६.** असा माथा जो खोटा व गुन्हेगार आहे.

**१७.** त्याने आपल्या बैठकीतल्या लोकांना बोलावून घ्यावे.

**१८.** आम्हीही जहन्नमच्या रक्षकांना बोलावून घेऊ.

**१९.** खबरदार! त्याचे म्हणणे मुळीच मान्य करू नका आणि सजदा करा व (अल्लाहशी) निकट व्हा.

---

## सूरह क़द्र - ९७

सूरह क़द्र मक्का येथे अवतरली आणि यात पाच आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** निःसंशय, आम्ही या (कुरआना) ला कद्र (बरकती) च्या रात्री अवतरित केले.

**२.** तुम्हाला काय माहीत की कद्रची रात्र काय आहे ?

**३.** कद्रची रात्र एक हजार महिन्यांपेक्षा उत्तम आहे.

**४.** या रात्री (प्रत्येक कार्य पार पाडण्यास) आपल्या पालनकर्त्याच्या आदेशाने फरिश्ते आणि रुह (जिब्रील) अवतरित होतात.

**५.** ही रात्र पूर्णपणे सलामतीची असते आणि प्रातःकाळाचा उदय (पहाट) होईपर्यंत असते.

---

# सूरह बय्यिनः - ९८

सूरह बय्यिनः मदीना येथे अवतरली आणि यात आठ आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** ग्रंथधारकंपैकी इन्कार करणारे आणि अनेकेश्वरवादी लोक आपल्या वर्तनापासून मागे हटणारे नव्हते, जोपर्यंत त्यांच्याजवळ उघड प्रमाण न यावे (आणि ते प्रमाण हे होते की).

**२.** सर्वश्रेष्ठ अल्लाहचा एक पैगंबर, जो पवित्र ग्रंथ वाचून दाखविल.

**३.** ज्यात उचित व स्पष्ट ईशआदेश असावेत.

**४.** ग्रंथधारक आपल्याजवळ स्पष्ट प्रमाण येऊन पोहचल्यानंतरच (मतभेदात पडून) विभाजित झाले.

**५.** वास्तविक त्यांना याखेरीज कोणताही आदेश दिला गेला नाही की त्यांनी फक्त अल्लाहचीच उपासना करावी, त्याच्याचकरिता दीन (धर्मा) ला विशुद्ध राखावे. (इब्राहीम) हनीफच्या दीन (धर्मा) वर आणि नमाजला कायम राखावे आणि जकात (कर्तव्य-दान) देत राहावे. हाच सरळ दीन (धर्म) आहे मुस्लिम संप्रदायाचा.

**६.** निःसंशय, जे लोक ग्रंथधारकांपैकी इन्कारी झाले. आणि अनेकेश्वरवादी, सर्वच्या सर्व जहन्नमच्या आगीत (जातील), ज्यात ते नेहमी (नेहमी) राहतील. हेच लोक सर्वांत वाईट निर्मिती होय.

**७.** निःसंशय, ज्या लोकांनी ईमान राखले आणि सत्कर्म केले, तर असे लोक (अल्लाहची) सर्वांत उत्तम निर्मिती होय.

**८.** यांचा मोबदला, त्यांच्या पालनकर्त्याजवळ निरंतर राहणाऱ्या जन्नती आहेत, ज्यांच्या खाली (थंड पाण्याचे) प्रवाह वाहत असतील, ज्यात ते सदैवकाळ राहतील. सर्वश्रेष्ठ अल्लाह त्यांच्याशी राजी झाला, आणि हे त्याच्याशी राजी झाले. हे (केवळ अशा माणसाकरिता आहे जो आपल्या पालनकर्त्याचे भय राखतो.[१]

(१) अर्थात हा चांगला मोबदला आणि सुख - संपन्नता त्याच लोकांसाठी आहे जे या जगात अल्लाहचे भय बाळगून राहतात आणि या भयामुळे अल्लाहच्या अवज्ञेपासून दूर राहतात. जर प्रसंगी, मानवी

## सूरह ज़िल्ज़ाल - ९९

सूरह ज़िल्ज़ाल मदीना येथे अवतरली आणि यात आठ आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** जेव्हा जमिनीला पूर्णपणे थरथर हलविले जाईल.

**२.** आणि ती आपल्यात असलेले सर्व ओझे बाहेर काढून फेकेल.

**३.** मनुष्य म्हणू लागेल की हिला झाले तरी काय?

**४.** त्या दिवशी जमीन आपला सर्व अहवाल सादर करील.

**५.** यासाठी की तुमच्या पालनकर्त्याने तिला तसा आदेश दिला असेल.

**६.** त्या दिवशी लोक वेगवेगळ्या जमाती बनून (परत) फिरतील यासाठी की त्यांना त्यांची कर्मे दाखविली जावीत.

**७.** तेव्हा, ज्याने कणाइतकेही सत्कर्म केले असेल, तो ते पाहील.

**८.** आणि ज्याने कणाइतकेही दुष्कर्म केले असेल, तो ते पाहील.

---

## सूरह आदियात - १००

सूरह आदियात मक्का येथे अवतरली आणि यात अकरा आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** धापा टाकीत धावणाऱ्या घोड्यांची शपथ!

**२.** मग टाप मारून चिंगाऱ्या उडविणाऱ्यांची शपथ!

---

निकडीमुळे अल्लाहची अवज्ञा झाली, तर त्वरित क्षमा याचना (तौबा) करतात आणि पुढे तसा अपराध न करण्याचा दृढसंकल्प करून आपले आचरण सुधारतात. येथपावेतो की त्यांच्या मृत्यु याच आज्ञापालनासह झाला, अवक्षेसह नव्हे.

तात्पर्य, जो मनुष्य अल्लाहचे भय राखतो तो अवज्ञा करण्यावर दुराग्रह करीत नाही आणि ना त्यावर अटळ राहतो.

**३.** मग सकाळच्या वेळी हल्ला चढविणाऱ्यांची शपथ!

**४.** तर त्या वेळी धूळ उडवितात.

**५.** मग त्याचसोबत सैन्यांमध्ये घुसतात.

**६.** निःसंशय, मनुष्य आपल्या पालनकर्त्याशी मोठा कृतघ्न आहे.

**७.** आणि खात्रीने तो स्वतःही यावर साक्षी आहे.

**८.** आणि हा धनाच्या मोहातही मोठा सक्त (कठोर) आहे.

**९.** काय याला ती वेळ माहीत नाही जेव्हा कबरीमध्ये जे (काही) आहे, काढून घेतले जाईल.

**१०.** आणि मनातल्या गुप्त गोष्टींना उघड केले जाईल.

**११.** निःसंशय, यांचा पालनकर्ता त्या दिवशी यांच्या अवस्थेची पुरेपूर खबर राखणारा असेल.

---

## सूरह कारिअः - १०१

सूरह कारिअः मक्का येथे अवतरली आणि यात अकरा आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** खडखडविणारी.

**२.** काय आहे ती खडखडविणारी.

**३.** तुम्हाला काय माहीत की ती खडखडविणारी काय आहे?

**४.** ज्या दिवशी माणसे इतस्ततः विखुरलेल्या कीटक पतंगांप्रमाणे होतील.

**५.** आणि पर्वत, पिंजलेल्या रंगीत लोकरीसारखे होतील.

**६.** मग ज्याचे पारडे वजनात भारी असेल

**७.** तर तो ऐष-आरामाच्या जीवनात असेल.

**८.** आणि ज्याचे पारडे वजनात हलके असेल

**९.** तर त्याचे ठिकाण ‘हाविया’ आहे.

**१०.** आणि तुम्हाला काय माहीत की ती काय आहे.

**११.** ती खूप प्रखरतेने भडकत असलेली आग आहे.

---

## सूरह तकासुर - १०२

सूरह तकासुर मक्का येथे अवतरली आणि यात आठ आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** जास्तीत जास्त मिळविण्याच्या मोहाने तुम्हाला गाफील करून टाकले.

**२.** **येथेपर्यंत** की तुम्ही कब्रस्तानात जाऊन पोहोचले (दफन झाले).

**३.** मुळीच नाही, तुम्ही लवकरच जाणून घ्याल.

**४.** मुळीच नाही, तुम्हाला फार लवकर कळून येईल.

**५.** मुळीच नाही, जर तुम्ही खात्रीशीरपणे जाणून घ्याल.

**६.** तर निश्चितच तुम्ही जहन्नम जरूर पाहाल.

**७.** आणि तुम्ही तिला विश्वासाच्या डोळ्यांनी पाहाल.

**८.** मग त्या दिवशी तुम्हाला निश्चितपणे कृपा देणग्यांबाबत विचारले जाईल.

---

## सूरह अस्र - १०३

सूरह अस्र मक्का येथे अवतरली आणि यात तीन आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** काळाची शपथ.

**२.** वस्तुत सारे मानव पूर्णतः घाट्यात आहेत.

**३.** मात्र त्या लोकांखेरीज, ज्यांनी ईमान राखले आणि सत्कर्म करीत राहिले आणि (ज्यांनी) आपसात सत्यावर कायम राहण्याची ताकीद केली आणि एकमेकांना धीर संयम राखण्याचा उपदेश केला.

---

## सूरह हुमजः - १०४

सूरह हुमजः मक्का येथे अवतरली आणि यात नऊ आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** मोठी वाईट अवस्था आहे अशा त्या प्रत्येक माणसाची जो व्यंग दोष शोधणारा, चहाडी करणारा असेल.

**२.** जो धन - दौलत एकत्र करतो आणि मोजून ठेवतो.

**३.** तो असे समजतो की त्याची धन - दौलत त्यांच्याजवळ सदा सर्वकाळ राहील.

**४.** मुळीच नाही. हा तर चुराडा करून टाकणाऱ्या आगीत फेकला जाईल.

**५.** आणि तुम्हाला काय माहीत की अशी आग काय असेल ?

**६.** ती अल्लाहने पेटविलेली आग असेल.

**७.** जी हृदयांवर चढतच जाईल.

**८.** (ती आग) सगळीकडून बंदिस्त असेल.

**९.** आणि त्यांच्यावर मोठमोठ्या खांबांमध्ये.

# सूरह फील - १०५

सूरह फील मक्का येथे अवतरली आणि यात पाच आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** काय तुम्ही नाही पाहिले की तुमच्या पालनकर्त्याने हत्तीवाल्यांशी कसा व्यवहार केला ?

**२.** काय त्यांचा डाव असफल नाही केला ?

**३.** आणि त्यांच्यावर पक्ष्यांच्या झुंडीवर झुंडी पाठविल्या

**४.** जे त्यांच्यावर माती आणि दगडांच्या खड्यांचा मारा करीत होते.

**५.** मग त्यांना खाऊन टाकलेल्या भूशा (चोथ्या) प्रमाणे करून टाकले.

---

# सूरह कुरैश - १०६

सूरह कुरैश मक्का येथे अवतरली आणि यात चार आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** कुरैशला आसक्ती मिळवून देण्याकरिता

**२.** (अर्थात) त्यांना सर्दी व गरमीच्या प्रवासाची सवय लावून देण्याकरिता

**३.** त्यांनी (कृतज्ञता म्हणून) या घराच्या (काबागृहाच्या) स्वामीची उपासना करीत राहिले पाहिजे.

**४.** ज्याने त्यांना भुकेल्या अवस्थेत खायला दिले आणि भय-दहशतीच्या अवस्थेत शांती (सुरक्षा) प्रदान केली.

---

## सूरह माऊन - १०७

सूरह माऊन मक्का येथे अवतरली आणि यात सात आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** काय तुम्ही (त्यालाही) पाहिले जो मोबदल्याच्या दिवसाला खोटे ठरवितो.

**२.** हाच तो होय, जो अनाथाला धक्के मारतो.

**३.** आणि गरीबाला जेवु घालण्यास प्रोत्साहन देत नाही.

**४.** त्या नमाजी लोकांकरिता 'वैल' (नामक जहन्नमची एक जागा) आहे.

**५.** जे आपल्या नमाजांपासून गाफील आहेत.

**६.** जे केवळ देखावा दाखवितात.

**७.** आणि वापरण्याची वस्तू रोखून धरतात.

---

## सूरह कौसर - १०८

सूरह कौसर मक्का येथे अवतरली आणि यात तीन आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** निःसंशय, आम्ही तुम्हाला कौसर (आणि बरेच काही) प्रदान केले आहे.

**२.** तेव्हा, तुम्ही आपल्या पालनकर्त्यासाठी नमाज पढा आणि कुर्बानी करा.

**३.** निःसंशय, तुमचा शत्रूच बेवारशी आणि नाव-निशाण नसलेला आहे.

---

## सूरह काफिरून - १०९

सूरह काफिरून मक्का येथे अवतरली आणि यात सहा आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** तुम्ही सांगून टाका की हे इन्कारी लोकांनो!

**२.** ना मी उपासना करतो त्याची, ज्याची तुम्ही उपासना करता.

**३.** ना तुम्ही उपासना करणारे आहात त्याची, ज्याची मी उपासना करतो.

**४.** आणि ना मी उपासना करेन त्याची, ज्याची तुम्ही उपासना करता.

**५.** आणि ना तुम्ही त्याची उपासना कराल, ज्याची मी उपासना करतो.

**६.** तुमच्यासाठी तुमचा दीन (धर्म) आहे आणि माझ्यासाठी माझा दीन (धर्म) आहे.

---

## सूरह नस्र - ११०

सूरह नस्र मदीना येथे अवतरली आणि यात तीन आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** जेव्हा अल्लाहतर्फे मदत आणि विजय प्राप्त होईल.

**२.** आणि लोकांना तुम्ही अल्लाहच्या दीन (धर्मा) कडे समूहासमूहांनी येताना पाहाल.

**३.** तेव्हा आपल्या पालनकर्त्याची स्तुती प्रशंसेसह पवित्रता वर्णन करू लागा आणि त्याच्याजवळ क्षमा याचनेची प्रार्थना करीत राहा. नि:संशय, तो मोठा तौबा (क्षमा-याचना) कबूल करणारा आहे.

---

## सूरह लहब - १११

सूरह लहब मक्का येथे अवतरली आणि यात पाच आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** अबु लहबचे दोन्ही हात तुटले आणि तो (स्वतः) नष्ट झाला.

**२.** ना तर त्याची संपत्ती त्याच्या कामी आली आणि ना त्याची कमाई.

**३.** लवकरच तो भडकणाऱ्या आगीत जाऊन पडेल.

**४.** आणि त्याची पत्नीही (जाईल), जी लाकडे वाहून नेणारी आहे.

**५.** तिच्या गळ्यात खजुरीच्या सालीचा पीळ घातलेला दोरखंड असेल.

---

## सूरह इख्लास - ११२

सूरह इख्लास मक्का येथे अवतरली आणि यात चार आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** तुम्ही सांगा की तो अल्लाह एकमेव आहे.

**२.** अल्लाह निरपेक्ष आहे.

**३.** ना त्याच्यापासून कोणी जन्मास आला ना तो कोणापासून जन्मला.

**४.** आणि ना कोणी त्याचा समकक्ष आहे.

---

## सूरह फलक - ११३

सूरह फलक मक्का येथे अवतरली आणि यात पाच आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** तुम्ही सांगा की मी प्रातःकाळच्या स्वामीच्या शरणात येतो.

**२.** त्या प्रत्येक वस्तूच्या उपद्रवापासून जी त्याने निर्माण केली आहे.

**३.** आणि अंधारमय रात्रीच्या उपद्रवापासून, जेव्हा तिचा अंधार पसरेल.

**४.** आणि गाठी (बांधून त्या) वर फुंकणारींच्या उपद्रवापासून (ही)

**५.** आणि ईर्ष्या करणाऱ्यांच्या उपद्रवापासूनही, जेव्हा ते ईर्ष्या करतील.

---

## सूरह नास - ११४

सूरह नास मक्का येथे अवतरली आणि यात सहा आयती आहेत.

अल्लाहच्या नावाने आरंभ करतो जो मोठा मेहेरबान आणि अतिशय दयावान आहे.

**१.** तुम्ही सांगा, मी लोकांच्या पालनकर्त्याच्या शरणात येतो.

**२.** लोकांच्या स्वामीच्या (आणि)

**३.** लोकांच्या उपास्या (अल्लाह) च्या (आश्रयात)

**४.** (मनात) कुविचार टाकणाऱ्या, मागे हटणाऱ्याच्या उपद्रवापासून.

**५.** जो लोकांच्या मनात वाईट विचार टाकतो.

**६.** (मग तो) जिन्नांपैकी असो किंवा माणसांपैकी.

---

हे लोकांनो! तुमच्याजवळ तुमच्या पालनकर्त्यातर्फे एक अशी गोष्ट आली आहे,
जी बोध- उपदेश आहे आणि हृदयात जे (विकार) आहेत, त्यांच्याकरिता रोगमुक्ती आहे
आणि मार्गदर्शन करणारी आहे आणि (अल्लाहची) दया- कृपा आहे ईमान राखणाऱ्यांसाठी.

कुरआन – सुरह १० : ५७



Printed by : **SMILE PRINT**, Chembur, Mumbai +91 9819889864 * smileprint89@gmail.com